# THE KEKÂVALI

OF

# MOROPANTA.

( THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA. )

'*The greatest poet is the one who selects the best, the most appropriate Symbols to convey the best, the highest, the sublimest thoughts. The highly and purely poetic is the sudden bursting into blossom of a great and tender thought.*'
( *A CRITIC ON WALT WHITMAN.* )

SECOND EDITION.

CONSIDERABLY ENLARGED AND REVISED.

*EDITED WITH*

FULL, CRITICAL AND EXPLANATORY NOTES.

BY

SHRIDHAR VISHNU PARANJPEY B. A.

SOMETIME PROFESSOR OF MATHEMATICS,

HISLOP COLLEGE, NAGPUR.




PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂMA JÂVAJI,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS

Bombay.

*March* 1902.

*Price 2 Rupees.*

# ग्रंथसमर्पण.

'मातृदेवो भव । पितृदेवो भव'

(तैत्तिरीयोपनिषद्, शिक्षाध्याय.)

माझी परम प्रिय माता

## कै० ती० सौ० वज्रचुडेमं० अन्नपूर्णाबाई परांजपे,

(मृत्यु-आश्विन शुक्ल पंचमी शके १८२१. इ. स. ९ आक्टोबर १८९९ सोमवार)

व

माझे परम प्रिय तीर्थरूप

## कै० ती० रा० रा० विष्णु नारायण परांजपे,

(मृत्यु-आश्विन शुक्ल अष्टमी शके १८२१, इ. स. १२ आक्टोबर १८९९ गुरुवार)

(जन्म-पौष कृष्ण दशमी शके १७६४, शुभकृत् संवत्सर बुधवार)

या दोघांच्या पूज्य आत्म्यांस

हा ग्रंथ

त्यांच्या पुत्रानें

**अत्यंत सन्मानपुरःसर व भक्तिपूर्वक**

**अर्पण केला आहे.**

**श्रीधर विष्णु परांजपे.**

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

सुमारें तीन वर्षांपूर्वी कै० वामनराव ओक ह्यांनीं मला 'काव्यसंग्रहा'करितां 'केकावली'वर विस्तृत टीका लिहिण्यास सांगितली. माझ्यानें हें अवघड काम होणार नाहीं म्हणून मीं तें प्रथम नाकारिलें, पण त्यांचा व इतर मित्रमंडळीचा आग्रह पडल्यामुळें मला भीतभीतच कां होईना, परंतु तें काम शेवटीं पत्करावें लागलें. नंतर ह्या कामास उपयोगीं पडतील अशा पुस्तकांची जुळवाजुळव करून मी सबंध एक वर्ष केकावलि, यशोदापांडुरंगी, केकादर्श, ज्ञानप्रसारकांतील यशोदापांडुरंगीवरील विवेचन हे तीन केकावलीवरील टीकाग्रंथ व तत्संबंधी इतर ग्रंथ वाचण्यांत घालविलें. हें काव्य पंतांच्या सर्व काव्यांतील गुणावगुणांचें उत्तम निदर्शक आहे, ह्याचा प्रत्यय पाहण्यास मला पंतांचे पुष्कळ काव्यग्रंथ लक्ष्यपूर्वक वाचावे लागले. तसेंच अर्थसादृश्याचे उतारे देण्याचें ठरल्यामुळें प्राचीन कवींपैकीं कांहींच्या ग्रंथांची व विशेषतः अर्वाचीन संतकवींच्या काव्यांची चांगली माहिती करून घेणें मला आवश्यक वाटल्यावरून मीं तसें केलें. इतक्या गोष्टी झाल्यावर मीं टीका लिहिण्यास सुरवात करून कांहीं महिन्यांनीं तें काम संपविलें. दरम्यानच्या काळांत मीं लिहिलेला मजकूर वामनरावजींकडे पाठवित असें. सर्व ग्रंथ संपल्यावर, तो सर्व तपासून, योग्य वाटले ते त्यांत फेरफार करून व कांहीं नवीन मजकूर त्यांत घालून गेल्याच्या मागील एप्रिल महिन्याच्या सुमारास त्यांनीं तो सर्व मजकूर 'काव्यसंग्रहां'त छापविण्यास मुंबईस पाठविला. गेल्या वर्षाच्या म्हणजे १८९८ च्या मेपासून डिसेंबरपर्यंतच्या सर्व अंकांत 'केकावली' वरील सर्व टीका छापून प्रसिद्ध झाली आहे. केकावलि हें काव्य पुस्तकरूपानें स्वतंत्र छापून निघाल्यास महाराष्ट्र वाचकांपैकीं बऱ्याच जणांस तें घेणें सोईचें पडेल व विशेषतः मुंबईविश्वविद्यालयांतील बी. एस. एम.च्या परीक्षेस हें काव्य नेमलें असल्यामुळें मराठी घेऊन त्या परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांस व मद्रासविश्वविद्यालयांतील मराठी भाषा घेणाऱ्या विद्यार्थ्यांस त्याचा फार उपयोग होईल असें बऱ्याच लोकांचें म्हणणें पडल्यावरून त्या काव्याची ही स्वतंत्र आवृत्ति काढली आहे. परीक्षेस नेमलेल्या इंग्रजी काव्यग्रंथांच्या धर्तीवर ह्याला मोरोपंतकवींचें चरित्र व 'केकावली'ची प्रस्तावना हे दोन नवीन निबंध लिहून जोडले आहेत. पहिल्या निबंधांत कविचरित्र देतांना पंतांच्या एकंदर काव्यांतील गुणदोषांचें संक्षिप्त विवरण केलें असून, दुसरींत केकावलीसंबंधीं विशेष रीतीनें दोन शब्द लिहिले आहेत. तसेंच काव्यवृत्तावर दोन शब्द लिहिले असून ह्यांत आलेल्या अलंकारांची व केकावलींतील श्लोकांच्या प्रथमचरणांची सूची पुरवणींत जोडल्या आहेत. ह्याप्रमाणें मोरोपंतांच्या ह्या काव्याचा मार्मिकपणें अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस व पंतांच्या

कवितेचा थोडक्यांत रसास्वाद घेऊं इच्छिणाऱ्या इतर वाचकांस हें काव्य होईल तितकें सुलभ करण्याचा यत्न केला असून त्याचें लक्ष्यपूर्वक परिशीलन करणाऱ्या वाचकांस ह्या काव्यकुसुमांतील थोडा तरी मकरंद मिळावा अशी योजना केली आहे. हें काम मजसारख्या अल्पमतीकडे न देतां एखाद्या विद्वान् गृहस्थाकडे सोंपविलें असतें तर ह्यापेक्षां पुष्कळपटीनें तें चांगलें झालें असतें यांत तिळमात्र शंका नाहीं. पण कै० वामनरावजी ओकांप्रमाणें महाराष्ट्रकाव्यग्रंथांचा जीर्णोद्धार करणारी, त्यांतील अनर्घ्य रत्नांस शाणोल्लेखन करून त्यांच्या प्रभेनें रत्नपरीक्षकांस व इतर प्रेक्षकांस आकर्षण करणारी व स्वभाषेच्या उन्नत्यर्थ कायावाचामनेंकरून झटणारी अशी मंडळी फार थोडी आहे. महाराष्ट्रांतील बहुतेक विद्वान् मंडळी देशी भाषेविषयीं अगदीं उदासीन अशी आहे. तेव्हां ह्या काव्यावर टीपा देण्यास, तसेंच त्यांस कविचरित्र, केकावलीची प्रस्तावना इ० जोडण्यास माझ्यासारख्या अनधिकाऱ्यासच पुढें येणें भाग पडलें. मी लिहिलेली संपूर्ण टीका कै० वामनरावजींसारख्या विद्वानाच्या डोळ्यांखालून गेली ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट आहे. ही आवृत्ति स्वतंत्र पुस्तकरूपानें काढण्याचें दुसरें कारण असें कीं, सध्यां मुंबईविश्वविद्यालयांतून मराठी, गुजराथी इत्यादि देशीभाषांचा प्रवेश व्हावा म्हणून विद्वद्रत्न नामदार न्यायमूर्ति रावबहादुर माधवराव गोविंद रानडे हे अश्रांत परिश्रम करीत आहेत. अशा वेळीं आमच्या महाराष्ट्र कवींची योग्यता लोकांपुढें आणून आमच्या पदवीधर विद्वानांचें महाराष्ट्र कवितासंग्रहाचे संबंधीं अनुकूल मत तयार करणें फार अगत्याचें आहे. ह्या कामास आपणही आपल्याकडून होईल तितकें साह्य करावें या हेतूनें महाराष्ट्रकविवर्यांच्या अत्युत्तम काव्याची विस्तृत टिपांसहित ही आवृत्ति काढली आहे. ह्या पुस्तकावरून पंतांचें हें काव्य समजून घेणाऱ्या वाचकांस महाराष्ट्रकाव्यांची गोडी लागून आमची मातृभाषा विश्वविद्यालयांतील अत्युच्च परीक्षेच्या अभ्यासक्रमांत शिरण्याच्या योग्यतेची आहे असें कालांतरानें कां होईना पण वाटल्यास माझ्या श्रमांचें चांगलें साफल्य झालें असें मी समजेन.

ह्या ग्रंथांत माझ्या अल्पज्ञतेमुळें दोषस्थळें पुष्कळच राहिलीं असतील, तीं सर्व रसिक व मार्मिक अशा वाचकांनीं दाखवावीं म्हणजे पुढच्या आवृत्तींत तीं काढून टाकण्यांत येतील. तेव्हां वाचकांस विनंति एवढीच आहे कीं, 'पुरुषाचा धर्म भ्रम म्हणोनि कांहीं पडेल येथ उणें । पूर्ण करावें शोधुनि भगवत्प्रीत्यर्थ सज्जनें निपुणें ॥' (भगवद्गीतेवरील पंतांच्या आर्या). ह्या पुस्तकासंबंधीं बरा वाईट जसा ज्याचा अभिप्राय पडेल तसा त्यानें सौम्यपणें किंवा कडकपणानें निःशंक द्यावा. अनुकूल, प्रतिकूल, कडक, सौम्य, अशा सर्व प्रकारच्या अभिप्रायांचा सादर स्वीकार करण्यांत येऊन त्याप्रमाणें पुढें वर्तन करण्यांत येईल. टीकाकारांच्या कडक व स्पष्ट अशा टीकेपासून ग्रंथकारांस

प्रथम थोडे दिवस वाईट वाटलें तरी परिणामीं त्यापासून त्याचें हितच होतें. एकमेकांचे पक्के हाडवैरी अशा देवदैत्यांनीं समुद्राचें जेव्हां मंथन केलें, तेव्हां प्रथम विषोत्पत्ति झाली खरी, पण त्या मंथनामुळेंच पुढें अत्युत्कृष्ट अशीं त्रयोदश रत्नें निर्माण झालीं. मृतांस सजीव करणारें प्रसिद्ध अमृतही त्यांतीलच एक रत्न होय. तद्वत् टीकाकाराच्या प्रखर व अमोघ अशा शरांच्या संधानामुळें कांहीं वेळ मनःक्षोभ होऊन संताप आला, तरी शेवटीं ग्रंथकर्त्याची खरी सुधारणा होण्यास तेंच उत्तम साधन होतें. उलटपक्षीं गुळमुळित किंवा गुळचट टीकेपासून सत्यनिर्णय किंवा ग्रंथकाराची सुधारणा होण्याच्या कामीं उपयोग न होतां प्रतिबंध मात्र होतो. तेव्हां यांतील दोषस्थळें अवश्य दाखवावींत एवढेंच वाचकांपाशीं मागणें आहे.

आतां हें पुस्तक लिहितांना मला ज्या कांहीं सद्गृहस्थांनीं साह्य केलें त्या सर्वांचे आभार मानणें ह्या स्थळीं उचित आहे. महाराष्ट्रकाव्यपंडित व सुप्रसिद्ध टीकाकार असे माझे गुरु रा. रा. हरिपंत पंडित, डेप्युटी म्यानेजर, कोर्ट ऑफ वार्ड्स, नागपुर, यांनीं केकावलीवर टीपा देतांना मला पुष्कळ उपयुक्त सूचना केल्या ह्याबद्दल मजवर यांचे फार उपकार आहेत. तसेंच शालापत्रककार रा. रा. रामचंद्र भिकाजी जोशी यांनींही बऱ्याच गोष्टी सुचविल्या ह्मणून त्यांचे मी आभार मानितों. कविचरित्र व केकावलीची प्रस्तावना हे दोन निबंध लिहितांना मला नामदार न्यायमूर्ति रावबहादुर माधवराव गोविंद रानडे व प्रो. राजारामशास्त्री भागवत यांनीं बऱ्याच गोष्टी सुचविल्या याबद्दल मी त्या उभयतांचा अत्यंत ऋणी आहें. आतां समाप्तीचे समयीं, मयूरकवीच्या ह्या स्तोत्रावर टिप्पणी देऊन त्याचें मधुर कूजित अंशतः तरी इतरांच्या कर्णांवर पाडण्याचें मला ज्या जगज्जनकानें सामर्थ्य दिलें त्यास त्याला भक्तिपूर्वक नमन करून मी सध्यां येथेंच विराम पावतों.

ता. १ नोव्हेंबर, १८९७.

सर्व रसिकांचा नम्र सेवक,

श्रीधर विष्णु परांजपे.

खेदप्रदर्शनः—मराठी भाषेचे कैवारी व पंतांचे मार्मिक भक्त न्यायमूर्ति रानडे, रा. सा. हरिपंत पंडित व श्री. बापूसाहेब कुरुंदवाडकर हे मला गुरुस्थानीं असणारे तिघे विद्वन्मणि ही दुसरी आवृत्ति पाहण्यास आज जिवंत नाहींत ह्मणून मला फार खेद वाटतो.

ता. १ मार्च १९०२.

श्री. वि. प.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यावर सुमारें एका वर्षाच्या आंतच पहिली आवृत्ति संपून दुसरी आवृत्ति काढण्याची मला माझे मित्र शेट तुकारामजी यांजकडून सूचना झाली. तेव्हांपासून ह्या दुसऱ्या आवृत्तीची तयारी चालली, पण मध्यंतरीं अनेक अडचणी आल्यामुळें आजपर्यंत ही आवृत्ति प्रसिद्ध करितां आली नाहीं. पहिल्या आवृत्तीवर अनेक विद्वानांनीं आपले अनुकूळ अभिप्राय दिले व अनेकांकडून दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं अमुक अमुक सुधारणा कराव्या ह्मणून सप्रेम सूचनाही आल्या. त्या सर्वांचा योग्य विचार करून ही आवृत्ति आज प्रसिद्ध केली आहे. ही बाहेर पडण्यास जरी भारी वेळ (सुमारें तीन सवातीन वर्षें) लागला तरी त्या मानानें रसिक वाचकांस हिच्यांत भरपूर मोबदला मिळेल अशी तजवीज केली आहे. मोरोपंतांचें चरित्र बरेंच विस्तृत दिलें असून टीपांतही पुष्कळच सुधारणा केली आहे. अलंकारांच्या टीपा, समानार्थक उतारे, पौराणिक रूपकें वगैरे पुष्कळ विषय टीपांतून वाढविले किंवा नवीन घातले असून विद्यार्थ्यांस अवश्यक अशी माहिती जाड टायपांत दिली आहे. विद्यार्थ्यांच्या व इतर वाचकांच्या सोयीकरितां 'केकावली'चें मूळ (१२२ केका.) आरंभीं छापलें आहे. त्यांत विषयाची संगति दाखविण्याचा यत्न केला असून मधून मधून विषयानुरोधानें चित्रेंही घातलीं आहेत. सामान्य विद्यार्थ्यांस अनवश्यक वाटली तरी मोरोपंतांचें हें काव्य उत्कृष्टरीतीनें समजण्यास पुष्कळांस अवश्यक वाटणारी अवांतर उपयुक्त माहिती बारीक टायपांतून दिली आहे व त्यांतील मजकुराचें धोरण कळण्याकरितां सूचक शिरोभाग जाड टायपांत छापले आहेत. केकावलीच्या टीपांच्या अखेर केकावलीच्या सहा उपयुक्त पुरवण्या दिल्या असून त्यापुढें मोरोपंतांच्या चरित्राचीं ह्मणून एकोणीस परिशिष्टें दिलीं आहेत. पुरवण्या व परिशिष्टें वाचकांस पंतांच्या काव्याची गोडी लागून त्यांच्या इतर काव्यांचा त्यांनीं प्रसार करावा व पंतांप्रमाणेंच त्यांनींही यथाशक्ति आपल्या मातृभाषेची मनोभावें सेवा करण्यास झटावें ह्मणून अतिशय परिश्रम घेऊन तयार केलीं आहेत. ही आवृत्ति तयार करितांना मला संस्कृत, प्राकृत व इंग्रजी पुष्कळ ग्रंथांचा फार उपयोग झाला व माझ्या पुष्कळ मित्रांनीं मला उपयुक्त सूचना करून फार उत्तेजन दिलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. त्या सर्वांचीं नांवें विस्तारभयास्तव येथें देतां आलीं नाहींत ह्मणून खेद वाटतो. विशेषतः मित्र रा. लक्ष्मणराव पांगारकर बी. ए. शिक्षक पंढरपुर हायस्कुल, यांच्यापासून पंतांच्या चरित्राविषयीं मला पुष्कळ उपयुक्त माहिती मिळाली व माझे मित्र शेट तुकारामजी निर्णयसागरचे मालक यांनीं ह्या आवृत्तीचें अंतरंग व बहिरंग हीं दोन्ही उत्कृष्ट व्हावीं ह्मणून मला लागली

तेवढी छापण्यासंबंधी मदत मोठ्या आनंदानें दिली व ही आवृत्ति तयार करण्यास मला पुष्कळ विलंब लागला तरी निभावून घेतलें याबद्दल त्या दोघांचा मी फार ऋणी आहें. गेल्या वर्षापासून रा. पांगारकर हे मोरोपंतांच्या चरित्राविषयीं लोकमान्य 'केसरि' पत्रांतून उपयुक्त माहिती प्रसिद्ध करित असून पंताचें विस्तृत चरित्र लिहिण्याची ते खटपट करित आहेत याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे. पहिल्या आवृत्तीप्रमाणेंच या आवृत्तींतील मजकुराची सर्व जबाबदारी मजवरच आहे. त्यांतील गुणांचें श्रेय सर्वस्वी माझ्या वडील मंडळीचें व मित्रांचें असून त्यांतील दोषांचा विभागी मात्र मी स्वतः आहें. तेव्हां वाचकांनीं यांतील गुणदोषांचें विवेचन निर्भीडपणें करून या ग्रंथाची पूर्णता करावी अशी त्यांस सप्रेम विनंती आहे. कारण महानुभाव श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं ह्मटल्याप्रमाणें 'तुह्मां संतांच्या समेंत उणीव जर जशीच्या तशीच राहील–ती पूर्ण होणार नाहीं, तर लडिवाळपणानें मी तुह्मांवरच रुसेन;' कारण 'परिसानें स्पर्श केल्यावरही जर लोखंडांतील हलकेपणा निघून गेला नाहीं तर तो दोष कोणाचा?' रसिकवाचकांपुढें कृति ठेवूनही त्यांतील कमीपणा निघून गेला नाहीं तर एवढेंच ह्मणावें लागेल:—'स्पर्शमणि सुवर्ण करी लोहासी, काय करिल? खापर मी.' (मोरोपंत.) शेवटीं, ही दुसरी आवृत्ति काढण्याचे निमित्तानें तरी अनेक संतांचा दृढ परिचय झाला व मातृभाषेची कशी बशी सेवा घडली याबद्दल 'वेदप्रतिपाद्य स्वसंवेद्य आद्य आत्मरूपा'ला नमस्कृतिरूप पुष्पांजली भक्तिभावानें अर्पण करून पंतांच्या मधुर वाणीनेंच पुढील वरप्रदान मागून संतमेळ्यां लागतों:—

'तुमच्या आशीर्वादें जन्मोजन्मीं घडो अशी सेवा ।
हे वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा!' ॥ (कृष्णविजय ८३.२११)

१ मार्च १९०२ } सर्व भागवतांचा दासानुदास,
**श्रीधर विष्णु परांजपे.**

## ईशप्रार्थना.

स्तन्य स्वस्थ प्रवृत्तें सकळहि करितांना च 'आ'वाळ लाहे; ।
वार्ता कोणी न मानी कुशळ सुरभिचा वत्स आवाळला हे; ॥
प्रेमें पाळी, कधींही निजगुण न ह्मणे माय गा बाळकाला; ।
व्हावाचि श्रीधरास प्रिय बहु जरि हा ग्रंथ गावाळ काला. ॥
(रम्यरामायण–उपसंहार ४)

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यावर सुमारें एका वर्षाच्या आंतच पहिली आवृत्ति संपून दुसरी आवृत्ति काढण्याची मला माझे मित्र शेट तुकारामजी यांजकडून सूचना झाली. तेव्हांपासून ह्या दुसऱ्या आवृत्तीची तयारी चालली, पण मध्यंतरीं अनेक अडचणी आल्यामुळें आजपर्यंत ही आवृत्ति प्रसिद्ध करितां आली नाहीं. पहिल्या आवृत्तीवर अनेक विद्वानांनीं आपले अनुकूळ अभिप्राय दिले व अनेकांकडून दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं अमुक अमुक सुधारणा कराव्या ह्मणून सप्रेम सूचनाही आल्या. त्या सर्वांचा योग्य विचार करून ही आवृत्ति आज प्रसिद्ध केली आहे. ही बाहेर पडण्यास जरी भारी वेळ (सुमारें तीन सवातीन वर्षे) लागला तरी त्या मानानें रसिक वाचकांस हिच्यांत भरपूर मोबदला मिळेल अशी तजवीज केली आहे. मोरोपंतांचें चरित्र बरेंच विस्तृत दिलें असून टीपांतही पुष्कळच सुधारणा केली आहे. अलंकारांच्या टीपा, समानार्थक उतारे, पौराणिक रूपकें वगैरे पुष्कळ विषय टीपांतून वाढविले किंवा नवीन घातले असून विद्यार्थ्यांस अवश्यक अशी माहिती जाड टायपांत दिली आहे. विद्यार्थ्यांच्या व इतर वाचकांच्या सोयीकरितां 'केकावली'चें मूळ (१२२ केका.) आरंभीं छापलें आहे. त्यांत विषयाची संगति दाखविण्याचा यत्न केला असून मधून मधून विषयानुरोधानें चित्रेंही घातलीं आहेत. सामान्य विद्यार्थ्यांस अनवश्यक वाटली तरी मोरोपंतांचें हें काव्य उत्कृष्टरीतीनें समजण्यास पुष्कळांस अवश्यक वाटणारी अवांतर उपयुक्त माहिती बारीक टायपांतून दिली आहे व त्यांतील मजकुराचें धोरण कळण्याकरितां सूचक शिरोभाग जाड टायपांत छापले आहेत. केकावलीच्या टीपांच्या अखेर केकावलीच्या सहा उपयुक्त पुरवण्या दिल्या असून त्यापुढें मोरोपंतांच्या चरित्राचीं ह्मणून एकोणीस परिशिष्टें दिलीं आहेत. पुरवण्या व परिशिष्टें वाचकांस पंतांच्या काव्याची गोडी लागून त्यांच्या इतर काव्यांचा त्यांनीं प्रसार करावा व पंतांप्रमाणेंच त्यांनींही यथाशक्ति आपल्या मातृभाषेची मनोभावें सेवा करण्यास झटावें ह्मणून अतिशय परिश्रम घेऊन तयार केलीं आहेत. ही आवृत्ति तयार करितांना मला संस्कृत, प्राकृत व इंग्रजी पुष्कळ ग्रंथांचा फार उपयोग झाला व माझ्या पुष्कळ मित्रांनीं मला उपयुक्त सूचना करून फार उत्तेजन दिलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. त्या सर्वांचीं नांवें विस्तारभयास्तव येथें देतां आलीं नाहींत ह्मणून खेद वाटतो. विशेषतः मित्र रा. लक्ष्मणराव पांगारकर बी. ए. शिक्षक पंढरपुर हायस्कुल, यांच्यापासून पंतांच्या चरित्राविषयीं मला पुष्कळ उपयुक्त माहिती मिळाली व माझे मित्र शेट तुकारामजी निर्णयसागरचे मालक यांनीं ह्या आवृत्तीचें अंतरंग व बहिरंग हीं दोन्ही उत्कृष्ट व्हावीं ह्मणून मला लागली

तेवढी छापण्यासंबंधी मदत मोठ्या आनंदानें दिली व ही आवृत्ति तयार करण्यास मला पुष्कळ विलंब लागला तरी निभावून घेतलें याबद्दल त्या दोघांचा मी फार ऋणी आहें. गेल्या वर्षापासून रा. पांगारकर हे मोरोपंतांच्या चरित्राविषयीं लोकमान्य 'केसरि' पत्रांतून उपयुक्त माहिती प्रसिद्ध करित असून पंतांचें विस्तृत चरित्र लिहिण्याची ते खटपट करित आहेत याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे. पहिल्या आवृत्तीप्रमाणेंच या आवृत्तींतील मजकुराची सर्व जबाबदारी मजवरच आहे. त्यांतील गुणांचें श्रेय सर्वस्वी माझ्या वडील मंडळीचें व मित्रांचें असून त्यांतील दोषांचा विभागी मात्र मी स्वतः आहें. तेव्हां वाचकांनीं यांतील गुणदोषांचें विवेचन निर्भीडपणें करून या ग्रंथाची पूर्णता करावी अशी त्यांस सप्रेम विनंती आहे. कारण महानुभाव श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं ह्मटल्याप्रमाणें 'तुह्मां संतांच्या सभेंत उणीव जर जशीच्या तशीच राहील-ती पूर्ण होणार नाहीं, तर लडिवाळपणानें मी तुह्मांवरच रुसेन;' कारण 'परिसानें स्पर्श केल्यावरही जर लोखंडांतील हलकेपणा निघून गेला नाहीं तर तो दोष कोणाचा?' रसिकवाचकांपुढें कृति ठेवूनही त्यांतील कमीपणा निघून गेला नाहीं तर एवढेंच ह्मणावें लागेल:—'स्पर्शमणि सुवर्ण करी लोहासी, काय करिल? खापर मी.' (मोरोपंत.) शेवटीं, ही दुसरी आवृत्ति काढण्याचे निमित्तानें तरी अनेक संतांचा दृढ परिचय झाला व मातृभाषेची कशी बशी सेवा घडली याबद्दल 'वेदप्रतिपाद्य स्वसंवेद्य आद्य आत्मरूपा'ला नमस्कृतिरूप पुष्पांजळी भक्तिभावानें अर्पण करून पंतांच्या मधुर वाणीनेंच पुढील वरप्रदान मागून संतसेवेला लागतों:—

'तुमच्या आशीर्वादें जन्मोजन्मीं घडो अशी सेवा ।
हे वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा!' ॥ (कृष्णविजय ८३. २११)

१ मार्च १९०२ } सर्व भागवतांचा दासानुदास,
**श्रीधर विष्णु परांजपे.**

## ईशप्रार्थना.

स्तन्य स्वस्थ प्रसूचें सकळहि करितांना च 'आं'बाळ लाहे; ।
वार्ता कोणी न मानी कुशळ सुरभिचा वत्स आबाळला हे; ॥
प्रेमें पाळी, कधींही निजगुण न ह्मणे माय गा बाळकाला; ।
व्हावाचि श्रीधरास प्रिय बहु जरि हा ग्रंथ गाबाळ काला. ॥
(रम्यरामायण-उपसंहार ४)

# अनुक्रमणिका.

पृष्ठें.



## केकावलीच्या पुरवण्याः—



## मोरोपंताच्या चरित्राचीं परिशिष्टें:—

# मोरोपंताचें चरित्र.

## १ विषयाचें अभिनंदन.

'कवि शब्दसृष्टीचा अलंकार । कवि लक्ष्मीचा शृंगार । सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवि ॥ १ ॥ कवि सभेचें मंडण । कवि भाग्याचें भूषण । नानासुखांचें संरक्षण । ते हे कवी ॥ २ ॥ नाना विद्या ज्ञातृत्व कांहीं । कवीश्वरेंवीण तें नाहीं । कवीपासून सर्वही । सर्वज्ञता ॥ ३ ॥ नसता कवींचा व्यापार । तरी कैंचा असता जगदुद्धार । ह्मणोनि कवि हे आधार । सकळ सृष्टीसी. ॥ ४ ॥' (दासबोध १.७)

श्रीसमर्थ रामदासस्वामी ह्यांनीं कवीविषयीं जें वर ह्मटलें आहे तें अक्षरशः खरें आहे. कोणत्याही राष्ट्राचा अभ्युदय होण्यास ज्या सत्पुरुषांचे परिश्रम कारणीभूत होतात त्यांत कवींची गणना प्रमुखत्वानें केली पाहिजे. कवि हे राष्ट्राचे आत्मे होत. ते 'शब्दसृष्टीचे ईश्वर', 'कल्पनेचे कल्पतरु', 'चातुर्याच्या मूर्ति', 'बुद्धीचें वैरागर', 'सरस्वतीचें निजस्थान', 'अमृताचे मेघ', 'सुखाचें सरोवर', व 'स्वधर्माचे आश्रय' असल्यामुळें राष्ट्रांत श्रेष्ठ प्रतीचे धर्मविचार जागृत करून धर्माचा पाया बळकट करणें, त्यांतील उपयुक्त संस्थांविषयीं योग्य अभिमान वाढवून त्या चिरस्थायी करणें, त्यांतील थोर पुरुषांविषयीं आदर उत्पन्न करवून राष्ट्रीय सद्गुणांचा प्रसार करणें इत्यादि राष्ट्रोन्नतीस अत्यंत अवश्यक अशीं महत्कार्यें शांतपणें करण्यास कविच समर्थ होतात. अशांच्या मालिकेंत महाराष्ट्रभाषेचा कंठमणि, व महाराष्ट्रकविनावधूचा प्राणेश्वर प्रसिद्ध रामभक्त मोरोपंत यांची गणना होते. ह्मणून त्यांचें संक्षिप्त चरित्र केकावलीच्या रसिक वाचकांकरितां येथें सादर केलें आहे.

## २ कुळाची थोडीशी पूर्वपीठिका वगैरे.

'उपजला तरि तोचि मला गमे, । कुलसमुन्नति ज्यास्तव घे, रमे.' ॥ (वामन.)

कोंकणांत रत्नागिरी जिल्ह्यांत राजापुर तालुक्यांत सौंदळ या नांवाचें एक लहानसें गांव आहे. तेंच या कविश्रेष्ठाच्या पूर्वजांचें मूळ ठिकाण. त्यांचें उपनांव पराडकर. पराडकर हे जामदग्न्य गोत्री कऱ्हाडे ब्राह्मण. कसबें सौंदळ येथें पंतांचे आजे डोंगपतकीचें ह्मणजे जमिनीवरील व समुद्रावरील जकात घेण्याचें काम करित. पूर्वी हें गांव चांगलें भरभराटीस आलें होतें. परंतु कालचक्रास अनुसरून आजला तें अगदीं निकृष्टस्थितींत आलें आहे. पराडकरांचा जमीनजुमला सध्यां तेथें कांहीं नसून भालेराव वाडींत शंकराच्या देवळाजवळ त्यांच्या वाड्याचा पडका चौथरा मात्र आजला दृष्टीस पडतो. सध्यां ह्या गांवांत ब्राह्मणाचें एकच घर असून तें पराडकरांचे कुलोपाध्याय वरेकर भटजी यांचें आहे. याच गांवीं पंतांचे तीर्थरूप रामचंद्रपंत पराडकर हे लहानाचे मोठे झाले. याच सुमारास कोंकणांतील पुष्कळ मंडळी मराठी राज्यांत रोजगार पहाण्यासाठीं कोंकण सोडून घाटावर गेली. रामाजीपंतही आपल्या वडिलोपार्जित वृत्तीस कंटाळून ह्मणा किंवा इतरांप्रमाणें मराठी राज्यांत आपल्या नशीबाची परीक्षा पहाण्याकरितां ह्मणून ह्मणा आपला गांव सोडून आपल्या

कुटुंबासुद्धां घाटावर कोल्हापुरप्रांतीं आले. तेथें प्रथम ते कोल्हापुर दरबारीं मुजुमदारीच्या कामावर खुद्द पन्हाळगडावरच चाकर राहिले. यांचा स्वभाव फार कडक होता. एकदां यांनीं आपल्या मोतद्दारास कांहीं अपराधास्तव पैसा तापवून डाग दिला; तेव्हां राजानें मात्र करावयास योग्य असा दंड आपण आपल्या सेवकास केला याबद्दल आपणांस शासन होईल या भीतीनें त्यांनीं कोल्हापुरकरांची नोकरी सोडून पुण्याहून सुमारें तीस कोसांवर बारामती नामक गांव आहे तेथें ते गेले. बारामतीस बाबूजी नाईक जोशी (शांडिल्यगोत्री कोंकणस्थ ब्राह्मण) ह्मणून कोणी जहागिरदार सरदार राहत असत. यांच्या पदरीं रामाजीपंत हे पागेच्या कामावर कारकून ह्मणून राहिले. हे बाबूजी नाईक छत्रपति शाहू महाराजांच्या पदरीं एक नामांकित सरदार असून पहिल्या बाजीराव पेशव्यांच्या मरणानंतर पेशवाई-करितां नानासाहेबांचे (बाळाजी बाजीरावांचे) प्रतिस्पर्धी होते. पुढें हे माधवरावसाहेब पेशवे यांच्या कारकीर्दीत रावसाहेब पेशवे अज्ञान असतांना त्यांच्या तर्फेच्या सरदारांपैकीं एक असून त्यांचें रघुनाथराव दादासाहेब व त्यांचे दिवाण सखाराम बापु यांशीं वैमनस्य होतें. बारामतीकर हे पेशव्यांचे आप्त होते. बाळाजी विश्वनाथ पेशवे ह्यांची कन्या भिऊताई ही बाबूजी नाईकाचे बंधु आबाजी नाईक यांस दिली होती. नाईक हे कोट्याधीश सावकार होते. बाजीराव पेशव्यांस पैशाची मदत यांजकडून होत असे. तसेंच राघोबा दादांची कन्या दुर्गाबाई ही बाबूजी नाईकाचे मध्यमपुत्र पांडुरंगराय यांस दिली होती. (इ. स. १७७२) आदेंचें अघोर कृत्य हिला न आवडल्यामुळें ती बारभाईस अनुकूल होती. पुरंदरीं राघोबाचे पक्षाची ह्मणून हिला नारायणराव पेशव्याची पत्नी गंगाबाई हिच्या प्रसूतकालीं नेली होती. आनंदीबाईस तिचा राग येऊन तिनें बाजीरावास तिची खोड मोडण्याविषयीं लिहून सांगितलें होतें. त्यावरूनच त्यानें पुढें बारामतीकरांचा वाडा लुटून जहागिर जप्त केली. (ऐतिहासिक गोष्टी भा. १ पृ० ५०) व त्यांच्या कुटुंबास काशीवास करावयास लाविलें. यांचे वंशज बारामतीकर, मेहेंदळकर, बावडेकर या नांवानें पुण्यास हल्लीं प्रसिद्ध आहेत. ('परिशिष्ट–आ,२' पहा.)

## ३ जन्म व बाळपण.

'धन्य श्रीराम पिता, धन्या लक्ष्मी प्रसू जगीं झाली, ।
आली सत्यवतीची, कीं भारतकीर्ति सुतमुखीं आली.' ॥ (स्वर्गा. २.४२)
'सुयशें पितृमातुलकुलउज्वलकर तनय तो असावा गे !' (द्रोण. ८.२३).

रामाजीपंत पराडकर कोंकणांतून पन्हाळगडीं आपली पत्नी लक्ष्मीबाई हिला बरोबर घेऊन आले ह्मणून वर सांगितलेंच आहे. लक्ष्मीबाई ह्या सुशील व सात्विकवृत्तीच्या असून पतिसेवापरायण होत्या. हिच्यापासून रामाजीपंतांस तीन पुत्र व एक कन्या अशीं चार अपत्यें झालीं. वडील पुत्राचें नांव **सोनोपंत** असून धाकट्याचें **आबा** होतें. त्यांचे मध्यम **पुत्र मोरोपंत हेच** प्रकृत चरित्राचे नायक होत. यांचा जन्म शके १६५१ सौम्यनाम संवत्सरीं ह्मणजे इसवी सन १७२९ त पन्हाळगडीं झाला. हे आपल्या वडिलांजवळ पन्हाळगडीं लहानाचे मोठे झाले. यांची प्रकृति जात्या अशक्त असून स्वभाव बापाप्रमाणेंच

नापट होता. श्रीरामचंद्र हें पराडकरांच्या घरचें आराध्यदैवत होतें. श्रीराम हे मोठे पितृभक्त होते. त्याप्रमाणेंच मोरोपंताची निष्ठा आपल्या वडिलांचे ठिकाणीं फार होती. त्यांची बुद्धि मोठी तीव्र असून त्यांना लहानपणापासूनच पुराणकीर्तनश्रवणाचा फार नाद होता. त्यामुळें अल्पवयांतच भारत, भागवत, रामायण, पुराणादि ग्रंथांची यांना चांगली माहिती झाली. यांचे अगदीं पहिले शिक्षक त्यांचे वडिल रामाजीपंत होत. त्यांच्याजवळच हे बाळपणीं लिहिणें वाचणें, व रामरक्षादिस्तोत्रें शिकले व अमळ मोठे झाले तेव्हां कारकुनांच्या फडावर बापाजवळ बसून त्या वेळच्या कारकुनास अवश्य तो सर्व जमाखर्ची हिशेब ते शिकले.

## ४ मोरोपंतांचा विद्याभ्यास.

गुरु माझे श्रीराम श्रीमत्केशव, गणेश–हरि चवघे.' ॥ (गंगावकिली १०९)

'श्रीकेशवं श्रीगणेशं । वंदे विद्यागुरुं हरिं.' ॥ (संस्कृतमंत्ररामायण)

आपल्या बापाशिवाय पंत लहानपणीं 'हरि' नामक गुरुजवळ शिकले. यांनींच पंतांचें उपनयन झाल्यावर त्यांना ब्रह्मकर्म, विष्णुसहस्रनामादि स्तोत्रें व बालबोध व मोडी अक्षर घटविण्यास शिकविलें असावें. पंढरपुरास पंतांचे हातचे लिहिलेले ग्रंथ आहेत त्यांवरून त्यांचें मोडी व बालबोध अक्षर चांगलें वळणदार व घटींव होतें, तसेंच ते फार बारीक अक्षर लिहित असून अनुस्वाराबद्दल वर्तुल काढित असें दिसून येतें. पुढें ते कोल्हापुरप्रांतीं आपल्या विद्वत्तेबद्दल गाजलेले प्रख्यात पंडित केशव पाध्ये व गणेश पाध्ये यांचे जवळ पन्हाळगडीं संस्कृत काव्यनाटकव्याकरणालंकारादि शिकण्यास राहिले. पाध्यांच्या घरीं पंत शिकावयास राहिले यासंबंधीं एक मौजेची आख्यायिका सांगतात. पंत चवदा वर्षांचे होते तेव्हां एकदां द्वादशीचे दिवशीं ब्राह्मण म्हणून पाध्ये यांजकडे जेवावयास गेले. जेवण झाल्यानंतर रिकामपणीं त्या दिवसाचे प्रसंगास अनुसरून त्यांनीं एक सुंदर श्लोक रचिला, व तो त्यांनीं पाध्याचे ओटीचे भिंतीवर लिहून ठेविला व घरीं निघून गेले. असें दोन तीन वेळां झालें तेव्हां पाध्यांनीं चौकशी केली. तेव्हां ते श्लोक रामाजीपंत मुजुमदाराचा मुलगा मोरोबा यानें रचिले असें समजलें. त्यावरून त्यांनीं रामाजीपंतास बोलावून तुमचा मुलगा मोठा बुद्धिमान आहे, त्याला आमच्याकडे संस्कृत शिकण्याकरितां पाठवित जा म्हणून सांगितलें. पाध्याचें घराणें आदिलशाहींत चांगलें प्रख्यात असून त्यांस यवनांकडून उत्पन्न होतें. गणेशपाध्ये व केशवपाध्ये हे उभय बंधु पन्हाळ्यास आले. दोघांसही कऱ्हाडाकडे पंतप्रतिनिधींकडून व कोल्हापुरच्या महाराजांकडून जमिनी मिळाल्या. यांचे पूर्वज कोंकणांत रत्नागिरी जिल्ह्यांत उब्रज गांवीं राहणारे. त्यांचें उपनांव गोळवलीकर. हे काश्यपगोत्री कऱ्हाडे ब्राह्मण. दोघेही बंधु मोठे विद्वान् होते. त्यांतल्या त्यांत गणेश पाध्ये हे विशेष जाडे विद्वान् होते. ते न्यायव्याकरणमीमांसादि शास्त्रांत अत्यंत प्रवीण असून मोठे निस्पृही व नेमनिष्ठ होते. कोल्हापुरच्या राजवाड्यांत हे पुराण सांगत. यांच्या हस्ताक्षराशीं पंतांच्या हस्ताक्षराचें बरेंच साम्य दिसतें. या उभयतां बंधूंचे वंशज पन्हाळगड, कोल्हापुर, कऱ्हाड वगैरे ठिकाणीं आहेत. केशव पाध्यांचे पुत्र सदाशिव पाध्ये हे पंतांचे सहाध्यायी होते. पंतांनीं थोडेंसें संस्कृत व्याकरण अगो-

दर पढून मग संस्कृत काव्यें, नाटकें, व अलंकारशास्त्र वगैरे ग्रंथांचें अध्ययन केलें. न्याय व वेदांत ग्रंथांचेंही त्यांनीं थोडेंबहुत परिशीलन केलें होतें. पंतांनीं आपणास शिकावयास किंवा वाचावयास लागणारे चाळीस ग्रंथ स्वतः हातांनीं लिहिले असून कांहीं इतरांकडून लिहून घेतले आहेत असें त्यांच्या पंढरपुरच्या दप्तरावरून दिसतें. बहुतेक ग्रंथांच्या शेवटीं संवत्सर, मास, तिथि, यांचा निर्देश असून गुरु, पिता व आपण स्वतः इतक्यांच्या नांवाचा उल्लेख केलेला आढळतो. पुढील ग्रंथ पंतांनीं खुद्द लिहिले आहेत:— १ रघुवंश (इ. स. १७५०). २ नैषधोदय, ३ अनर्घ्यराघव सटीक (१७५२), ४ चित्तप्रबोध (१७५४), ५ वाणीभूषण (१७५६) [हा ग्रंथ मुंगीसारख्या अगदीं बारिक अक्षरांनीं लिहिला आहे], ६ प्रबोधचंद्रोदय (१७५८), ७ रसमंजरी, ८ राघवपांडवीय काव्य, ९ रसतरंगिणी, १० पंचदशी (१७६०), ११ षट्पदी टीका, १२ कुवलयानंद (१७६१), १३ विक्रमोर्वशीय (१७६५), १४ पार्वतीपरिणय, १५ काव्यप्रकाश (१७६७), १६ नरहरिकृत समश्लोकी (१७७३), १७ मालविकाग्निमित्र (१७७८), १८ भगवन्नाम कौमुदीटीका, १९ रामकृष्णकाव्य, २० वेदांतसारतत्वदीपिका, २१ अधिकरणरत्नमाला, २२ विद्वन्मोदतरंगिणी, २३ रसमंजरीटीका, २४ हनूमन्नाटक, २५ शाकुंतल, २६ मत्स्यनीति, २७ जैमिनीकृत कुशलवोपाख्यान, २८ नागानंद, २९ बृहदारण्य, ३० देशावतारखंडप्रशस्ती, इत्यादि. या शिवाय १ भामिनीविलास, २ ज्ञानेश्वरी, ३ भट्टीकाव्य, ४ कुमारसंभव, ५ छायाभिधा रसमीमांसाव्याख्या, ६ वसंततिलक भाण, ७ नैमिनिर्वाण इत्यादि ग्रंथ दुसऱ्याकडून लिहून घेतले आहेत. पंत फार जलद लिहित. भारतचंपू नांवाचा एक मोठा संस्कृत ग्रंथ त्यांनीं कोल्हापुरास दुसरा गृहस्थ सावकाश वाचित असतांना एकाकडे बसून भराभर लिहून काढला असें सांगतात. यावरून पंतांनीं काव्यनाटकांचा व अलंकारशास्त्राचा चांगलाच व्यासंग केला होता व कालिदासादि महाकवींचीं काव्यें व नाटकें त्यांच्या उत्तम परिचयाचीं होतीं हें दिसून येतें. पंचमहाकाव्यांचा व नाटकांचा पंतांस कितपत परिचय होता या प्रश्नाचें यावरून चांगलेंच समाधान होतें (केकावली पृ० २१८-२२० पहा). त्यांना पुढें पुराण सांगावें लागत असल्यामुळें व भारतभागवतरामायण हे ग्रंथ, व विष्णुपुराण, मार्कंडेय पुराण इत्यादि पुराणांचे कांहीं भाग त्यांनीं महाराष्ट्र भाषेंतच रचिले असल्यामुळें मूळ ग्रंथाशीं त्यांना उत्कृष्ट परिचय असावा हें स्पष्ट होतें. वरील हकिकतीवरून पंत पन्हाळगडीं पाध्यांकडे शिकत असतांना त्यांनीं आपल्या बुद्धिमत्तेचा उत्तम उपयोग केला व गुरुकृपेस स्वतःस पात्र केलें असें दिसून येतें. पाध्ये व पंत या उभयतांमधील प्रेम आमरण कायम राहिले. पुढें बारामतीस गेल्यावर पंत नवीन काव्यें रचिलीं म्हणजे प्रथम गुरुकडे पाठवित. त्यांनीं पसंत करून दुरुस्त केल्यावर मग दुसऱ्यांस वाचावयास देत. मधून मधून ते पन्हाळ्यासही भेटीकरितां जात असत. संस्कृत ग्रंथांचे पंतांनीं चांगलें अध्ययन केलें होतें म्हणून त्यांचें प्राकृत ग्रंथाकडे दुर्लक्ष नव्हतें. ज्ञानेश्वरी, परमामृत या जुनाट ग्रंथांशीं त्यांचा परिचय असून एकनाथ, नामदेव, रामदास, वामनपंडित, तुकाराम यांच्या ग्रंथांचें परिशीलन त्यांनीं लक्ष्यपूर्वक केलें. प्रसिद्ध नाझरेकर श्रीधरकवि हे त्यांच्या जन्माच्या फक्त एकच वर्ष अगोदर मृत्यु पावले. त्यांचे 'विजय,' 'प्रताप', 'लीलामृतादि' ग्रंथ व त्यांचे

समकालीन ताहराबादकर प्रसिद्ध संतभक्त महिपति यांचे ग्रंथ त्यांनीं ऐकिले व वाचिले होते. पंतांचें शिकणें संपल्यावर पन्हाळगडीं कांहीं दिवस ते मुजुमदारीच्या कामावर असतांना यांना एकदां हिशेबांत पाव आण्याची चूक लागली. पुष्कळ वेळ रात्रीचें जाग्रण करून उलट सुलट हिशेब केल्यावर शेवटीं एकदांची चूक उमगली, तेव्हां त्यांनीं आनंदानें टाळी पिटली. ही गोष्ट त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यास कळली तेव्हां 'पाव आण्याची चूक शोधून काढण्याकरितां जर तूं चित्ताची एकाग्रता करून एवढे परिश्रम केलेस, व ती शोधून काढ-ल्यावर तुला एवढा आनंद झाला, तर मग ह्या संसाराची जी मोठी चूक आपल्या प्रत्येकाच्या हातून घडत आहे, ती दुरुस्त करण्यासाठीं जर तूं परमेश्वराची अनन्यभावें भक्ति करून ती चूक काढून टाकलीस तर तुझ्या जन्माचें कल्याण होऊन तुला महदानंद प्राप्त होईल' असें ते बोलले. तेव्हां ह्या आमच्या मोरोबा कारकुनास उपरति होऊन त्यानें त्याच वेळेस कानावरील बोरूची लेखणी अधिकाऱ्याच्या पायांवर वाहिली व इतःपर कारकुनी न करितां भगवद्भक्ति करण्याकडे आपलें आयुष्य खर्चावयाचें असा आपला निश्चय त्यांस सांगितला. पंत पाध्यांकडे शिकत असतांनाच वडील रामाजीपंत पन्हाळगडची आपली नोकरी सोडून बारामतीस बाबूजी नाईकाच्या येथें आश्रयास राहिले होते. वरील गोष्ट झाल्यावर पंत बरेच दिवसांपासून बारामतीस जाऊन राहिलेल्या आपल्या वडिलांच्या भेटीकरितां पन्हाळ्याहून सुमारें चोवीस वर्षांचें वय असतां बारामतीस गेले.

## ५ बारामतीकरांचा आश्रय.

'श्री बाबुराय प्रभु माझा अत्यंत सदय अन्नद, हा ।
अर्थिजनां न ह्मणे दे तेसा, नमाग जेंवि सन्नद हा ! ॥ (विष्णुपद. ८)
भीष्मद्रोणसम गुणें शांडिल्यसुगोत्रपद्मरवि, दे हा ।
आश्रय शंकर जेसा उपमन्युमना मयूरकविदेहा. ॥ (स्वर्गा. २.३६)

पंत बारामतीस बाबुजीनाईक जोशी यांजकडे जाऊन आठपंधरा दिवस झाल्यावर त्यांनीं यजमानांचें लक्ष्य आपल्याकडे जावें ह्मणून एक चमत्कारिक युक्ति काढिली. यजमानांच्या घरच्या बायकामुलींना जात्यावर किंवा ओंपाळ्यावर बसून ओंव्या ह्मणतांना पाहून त्यांनीं मी तुह्मांला पतिव्रता स्त्रियांचीं गाणीं रचून देतों तीं तुह्मी ह्मणाल काय असें विचारिलें असतां बायकामुलींनीं 'होय' ह्मणून उत्तर दिलें. त्यावरून पंतांनीं बायकांच्या ओंव्यांच्या चालीवर 'सीतागीत,' 'रुक्मिणीहरणगीत,' व 'सावित्रीगीत' अशीं तीन गाणीं रचून दिलीं. मुलींना व बायकांना हीं गाणीं आवडून ओंपाळ्यावर बसल्या ह्मणजे किंवा दळ-तांना पंतांच्या ओंव्या त्या ह्मणूं लागल्या. त्या यजमानांच्या कानीं पडल्या. त्याबद्दल चौकशी करितां रामचंद्रपंतांचे चिरंजीव मोरोपंत यांनीं त्या ओंव्या केल्या असें कळून त्यांस फार संतोष झाला. यानंतर कांहीं दिवसांनीं नाईकांचे जवळच्या मंडळीनें रामचंद्रपंतांचे चिरंजीव मोरोपंत मोठे विद्वान् असून ते आज कांहीं दिवस पंक्तीस असतात असें यजमानांस कळविलें. त्यावरून संध्येच्या वेळीं पंतांस नाईकांनीं बोलावून सर्व हकिकत विचारली व जवळ रुद्राची पोथी होती तिचा अर्थ सांगण्यास पंतांस सांगितलें. त्यावर

रुद्रासारख्या वैदिकग्रंथाचा अर्थ सांगण्यापूर्वी भाष्य पाहून ठेविलें पाहिजे, दुसरा एखादा संस्कृत ग्रंथ दिल्यास त्याचा अर्थ यथाशक्ति सांगेन अशी पंतांनीं विनंति केली. ती ऐकून जवळच शिवकवचाची पोथी होती त्याचा अर्थ सांगण्यास नाइकांनीं पंतांस सांगितलें. तेव्हां मूळश्लोक वाचून त्याचा अर्थ लागलाच मराठी श्लोक शार्दूलविक्रीडित छंदांत रचून पंत सांगूं लागले. याप्रमाणें सर्व शिवकवचाचा व पुढें दुसऱ्या खेपेस रामरक्षेचा अर्थ पंतांनीं नाईकांस सांगितला. त्यावरून नाईकांस अतिशय संतोष होऊन त्यांनीं पंतांस आपल्या वाड्यांत पुराण सांगण्यास ठेवलें. वेतनाचें ठरलें नव्हतें. पंत कुटुंबासुद्धां निराळ्या वाड्यांत राहात. त्यांच्या जवळ दहावीस माणसें होतीं. यजमानाच्या कोठींतून भरपुर शिधा येई. ते द्रव्य देत व लग्नकार्यादिप्रसंगीं पूर्ण साह्य करीत. पंतांचे ज्येष्ठबंधु राघोपंत किंवा सोनोपंत यांजलाही नाईकांनीं आश्रय देऊन त्यांला आगळगांवची फडनविशी सांगितली. नाईक पंतांस जाहगीरही करून देत होते. परंतु त्यांनीं ती घेतली नाहीं. यापुढें पंत आपला वेळ कीर्तनपुराणश्रवणांत, भक्तिपर ग्रंथ वाचण्यांत, कविता रचण्यांत व पुराण सांगण्यांत घालवूं लागले. यजमान बाबुजी नाईक वर्षांतून आठ महिने स्वारीस जात व पावसाळ्यांत चातुर्मास बारामतीस राहत. तेव्हां पंत त्यांस हरिवंशादि ग्रंथांचें पुराण सांगत. पंतांचें संस्कृताचें अध्ययन उत्कृष्ट असून ते फार चतुर, समय-सूचक, मार्मिक, मितभाषी पण मुद्देसीर भाषण करणारे असल्यामुळें त्यांचे पुराणास रंग येऊन श्रोत्यांची अतिशय दाटी होई व ते पुराण ऐकून भक्तिसुखसमुद्रांत तल्लीन होऊन कांहीं वेळ तरी या नश्वर संसाराला कंटाळून विरक्त बनत. पंतांची विद्वत्ता, त्यांचें सौजन्य व त्यांची सदाचरणप्रियता पाहून बारामतीकरांच्या कुटुंबांतील माणसांचा, त्यांच्या आश्रितांचा व गांवांतील सर्व जनांच्या आबालवृद्धांचा त्यांच्यावर फार लोभ असे. बाबूजी नाईकांचे मध्यमपुत्र पांडुरंगराव यांचें व पंतांचें परस्पर फार प्रेम होतें. पंतांनी बारामतीकरांची चाकरी पुष्कळ वर्षें केली. त्यांचें आपल्या यजमानाविषयीं फार प्रेम होतें म्हणून ते एक दोनदां दुसरीकडचा थोर आश्रय मिळत असतां तो न पतकरतां बाराम-तीसच आपल्या यजमानाजवळ राहिले. पेशवे होण्याच्या अगोदर दुसरे बाजीराव साहेब हे भाउबीजेकरितां एकदां बारामतीस आले असतां तेथें नाईकांचे पदरीं मोरोपंत पराडकर मोठे विद्वान गृहस्थ आहेत असें पाहून त्यांना आपल्याजवळ ठेवण्याची इच्छा रावसाहेबांनीं नाईकांस कळविली. त्याजवर नाईकांनीं आमच्या येथें पंत आश्रयानें राहात नसून आम्हीच त्यांचे आश्रित आहों. तेव्हां याजविषयीं आपण पंतांस विचारावें. ते कोणत्याही कामीं स्वतंत्र आहेत असा जबाब दिला. त्यावरून पंतांस विचारतां त्यांनीं नाईकांस सोडून जाण्याची आपली इच्छा नाहीं असें सांगितलें. नंतर आम्हांस एकदां आपण पुराण तरी सांगावें असें रावजींनीं म्हटलें. त्यावर पंतांनीं यजमानास आपण पुराणास असल्यावर दुसरे कोणी असले तरी चिंता नाहीं असें सांगितलें. त्यावरून बाजीरावास फार राग आला. शिवाय बारामती-करांशीं त्यांचें वैमनस्य असल्यामुळें पंत त्यांचे आश्रित म्हणून ते पंतांचा व त्यांच्या काव्यांचा फार द्वेष करूं लागले. या गोष्टीच्या ऐतिहासिक सत्यत्वाविषयीं शंका घेण्यास बरीच जागा आहे. तरी वृद्धकथेचा तिला आश्रय असल्यामुळें ती येथें दिली आहे. पंतांचें देखील बाजी-

रावाविषयीं मत चांगलें नव्हतें (तुकारामस्तुति २२). पुढें बाजीराव गादीवर असतांना व ब्रह्मावर्ती पदच्युत झाल्यावर असतांना कोणाही हरदासाची कथा करावयाची झाल्यास यजमानाचे आज्ञेवरून कारभारी पुढील पांच कलमें हरिदासास कळवित असत:—(१) सगळी कथा चार घटकांत आटपावी; (२) यजमान कथेस येऊन बसल्यावर सभेकडे हरदासानें पाठ करूं नये; (३) कथेंत कृष्णचरित्र लावावें; (४) लावलेलें आख्यान अर्धवट न ठेवतां संपविलेंच पाहिजे; (५) मोरोपंतांची आर्या कथेंत ह्मणूं नये.

## ६ कुटुंबसौख्य, स्नेहसंबंध व स्वभाव.

पंतांचें कुटुंब फार मोठें होतें. त्यांचे वडील, मातोश्री, सख्खे व चुलतबंधु, भावजया, स्त्री, स्वतःचे व बंधूंचे पुत्र व कन्या, बहिण, त्यांची आत्या वगैरे माणसें एका वाड्यांतच राहत असत. त्यांची स्त्री रमाबाई ही मोठी साध्वी होती. तिच्या नेत्रास कांहीं विकार असल्यामुळें बंधूंचे आग्रहास्तव पंतांनीं आनंदीबाई नांवाची दुसरी स्त्री केली. दोघी स्त्रियांपैकीं वडील रमाबाईस मात्र संतति झाली. त्यांचे व त्यांच्या बंधूंचे जांवई, व्याही, साडु, मेहुणे वगैरे गणगोतही बरेंच असून सर्व माणसांचें पंतांवर मोठें प्रेम असे. पंतांनीं गंगावकिलींत व विष्णुपदवकिलींत या सर्वांचा उल्लेख केला आहे. त्यावरून त्यांच्याविषयीं पुष्कळच गोष्टी कळतात. पंतांस रघुनाथ व रामकृष्ण असे दोघे पुत्र असून एक कन्या होती. धाकटा रामकृष्ण हा पंतांस त्यांच्या ३१ व्या वर्षी झाला. याला पंढरपुरकर प्रसिद्ध धर्मसिंधुकार काशिनाथबावा पाध्ये यांची कन्या आवडी ऊर्फ आऊताई दिली होती. त्या वेळीं रामकृष्णाचें वय सुमारें चवदा पंधरा वर्षांचें होतें. पाध्यांचें घराणें पंतांचें गुरुघराणें असल्यामुळें त्याजविषयीं पंतांच्या मनांत मोठी पूज्यबुद्धि होती. त्यांत त्या घराण्याशीं शरीरसंबंध झाल्यावर तर त्या उभयतांमधील स्नेह फारच वाढला. कोंकणांत संगमेश्वर तालुक्यांतील ६८ गांवची 'ज्योतिष, धर्माधिकरण, उपाध्येपण, पुजारीपण' यांची वृत्ति पाध्येघराण्याकडे फार दिवसांपासून चालत आली होती. ही वृत्ति पाध्यांच्या घराण्याकडून निघाल्यावर सुमारें इ. स. १७५८।५९ या वर्षी अनंत पाध्ये पंढरीस आले. हे मोठे विरक्त भगवद्भक्त असल्यामुळें पंत त्यांना फार पूज्य मानित. यांचे पुत्र काशिनाथ पाध्ये व विठ्ठलपाध्ये. पंत आपलीं काव्यें अभिप्रायार्थ व शोधनार्थ यांचकडे पाठवित; व काशिनाथ बावाही आपल्या व्याह्याच्या कविता मोठ्या आवडीनें वाचून त्यांचें संशोधन करित. बावा जसे धर्मशास्त्रांत निष्णात होते तसेच ते मोठे निस्पृह भगवद्भक्त होते. पंढरपुरास श्रीविठ्ठलाचे उपचार बावांनीं पुष्कळ वाढविले. स्वतः एवढा अधिकार असून बावा पंतांस गुरु समजत. त्यांनीं पंतांच्या धर्तीवर 'रुक्मिणीपत्रिका' ह्मणून एक लहानसें प्रकरण रचिलें आहे. त्याच्या शेवटीं 'श्रीमदार्याचार्य मयूरेश्वरशिक्षित महामहोपाध्याय काशिनाथविरचित' असा उल्लेख आहे. भागवत दशमस्कंधावर ह्या दोन्ही व्याह्यांनीं टीका केली आहे. बावांची 'तोषणीसार' नांवाची टीका प्रसिद्ध असून पंतांचे बृहद्दशम व मंत्रभागवत हे ग्रंथ सर्वश्रुतच आहेत. सदाशिवपाध्ये कऱ्हाडकर, ताहराबादकर महिपतिसुत विठ्ठल गोसावी, विठोबादादा चातुर्मासे, भैराळबोवा, बीडकर कौस्तुभभट, बाळंभट

काजळे, व प्रसिद्ध 'लावणी' कार रामजोशी सोलापुरकर हे पंतांचे स्नेही असून त्यांच्या आर्येचे मोठे भोक्ते होते. या व इतर मंडळींशीं पंतांचा पत्रव्यवहार असून पंत आपलीं काव्यें लेखनार्थ यांजकडे पाठवित. विठोबादादा व त्यांचे पुत्र भैराळबावा ह्यांस पंतांनीं पुष्कळ पत्रें पाठविलीं आहेत त्यांवरून पुष्कळ नवीन गोष्टी कळतात. उभयतां पितापुत्र प्रेमळ भगवद्भक्त असून कीर्तन करित. यांच्या घराण्याशीं पंतांचा फार घरोबा असे. दादांस तर पंत गुरुतुल्य मानीत असून काव्यरचनेच्या कार्यांत ते त्यांच्या पुण्याशीर्वादाची नेहमीं अपेक्षा करित. स्फुट काव्यें भाग १ यांत छापलेली 'विठ्ठलभक्तस्तुति' विठोदादांची स्तुति होय. दादांची बालविधवा बहिण जिजाबाई हीही भगवत्सेवापरायण होती. तिला पंत मातोश्रीतुल्य समजत. दादांना पाठविलेल्या प्रत्येक पत्रांत पंतांनीं तिला नमस्कार लिहिले असून तिजवर त्यांनीं एका पत्रांत पुढील आर्या रचली आहे:—भवभय जायास्तव त्या नमितों मी सर्वकाळ जीजीतें, । बहु भूतदया हृदयीं, रंकाची सर्व काळजी जीतें. ॥ रामजोशी हे पूर्वी तमाशा करित. ते पुढें एकदां बारामतीस तमाशा घेऊन गेले. नटाचें तोंड पहाणें शास्त्रविरुद्ध ह्मणून पंत त्यांच्या तमाशास जात नसत. मंडळींच्या आग्रहावरून पंत जोशीबोवांचें कवन ऐकण्याकरितां एकदां माडीवर बसले. ही गोष्ट मंडळीनें जोशीबोवांस कळविली. तेव्हां त्यांनीं डफावर थाप मारिल्यापासून बोधवैराग्यपर सुंदर लावण्या रचून ह्मणण्याचा सपाटा चालविला. त्या ऐकून पंतांचें मन प्रसन्न झालें व त्यांनीं माडीवरून खालीं येऊन जोशीबोवांची स्तुति केली व तुमची वाणी रसाळ आहे. नटास पुढें करून तमाशा न करितां कीर्तन करित जा असा उपदेश केला. त्यावर कीर्तनाचें साहित्य आपणाजवळ नाहीं असें जोशीबोवांनीं सांगितल्यावरून ' मी तुमच्यासारख्या कीर्तनेच्छूकरितांच काव्य करित आहें. त्याचा उपयोग तुह्मी कीर्तनांत करावा ' असें पंत ह्मणाले. तेव्हांपासून जोशीबोवांनीं तमाशा सोडून कीर्तन करण्यास आरंभ केला. पंतांची आर्या जोशीबोवांच्या कीर्तनामुळेंच बहुतेकडे फार प्रसिद्ध झाली. यासंबंधीं एक अशी आर्या आहे:—

जैसी जनकें दिधली साधुन राम जो सिता त्याला; ।
तैशी मयुरें दिधली आर्या ही रामजोसि तात्याला. ॥

पंतांचे आईबाप त्यांनीं अनुशासन पर्व लिहिण्यापूर्वीच ह्मणजे पंत सुमारें ४०।४५ वर्षांचे असतांनाच वारले. विठोबादादांस पाठविलेल्या पत्रावरून पंतांनीं आपल्या मुलींस व सुनांसही लिहिण्या वाचण्यास शिकविलें होतें असें दिसतें. त्यांची नातसून रघुकिरातादि काव्यें पढली होती असें सांगतात. स्त्रीजातीविषयीं पंतांचे विचार फार थोर होते. त्यांचे पुत्र रामकृष्णपंत हेही चांगले विद्वान् होते. त्यांचे चुलत सासरे प्रसिद्ध वैयाकरणी व नैयायिक विठ्ठल पाध्ये यांनीं पंढरपुरास त्यांना राहण्यास वाडा बक्षिस दिला व भागानगरचे राजे चंदुलाल यांजकडून इ. स. १८२६ त सुमारें पांचशें रुपये उत्पन्नाचें सारोळें गांव इनाम देवविलें. हेच विठ्ठल पाध्ये पूर्वी कवित्वशक्तीसंबंधानें पंतांशीं मत्सर करित असत. 'मोरोपंतच काय आर्या करितात, मीही करितों' असें यांनीं एकदा

अभिमानानें झटल्यावरुन काशिनाथ बाबांच्या सांगण्यावरून पंत व विठ्ठल या उभयतांच्या आर्या रात्रीं देवाजवळ ठेविल्या. प्रातःकाळीं मंडळी पाहावयास गेली तेव्हां पंतांच्या आर्या देवाजवळ असून विठ्ठल पार्ध्ये यांच्या दूर खालीं पडलेल्या दिसल्या. तेव्हांपासून विठ्ठल पार्ध्ये यांनीं पंतांचा मत्सर करणें सोडून दिलें. पंतांचा स्वभाव गोड, मनमिळाऊ पण अमळ तिरसट असे. पंडितपुराणिकांत दिसून येणारी अहंमन्यता त्यांच्या ठिकाणीं नसून ते फार नम्र होते. त्यांना ग्रंथसंग्रह करण्याचा मोठा नाद असे. त्यांचें आचरण फार पवित्र होतें. या त्यांच्या गुणांवरून बारामतीकरांच्या घरची मंडळी, त्यांचे आश्रित, बारामतीची व इतर ठिकाणची त्यांची स्नेहीमंडळी यांची त्यांजविषयीं मोठी पूज्यबुद्धि असून ते त्यांना फार मानित असत. तसेंच बाबूरावांनीं पंतांस आश्रय दिला होता यास्तव त्यांनीं आपल्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं आपल्या यजमानांचा व त्यांच्या पुत्रांचा कृतज्ञपणें उल्लेख केला आहे.

## ७ भगवद्भक्ति, सत्संग व तीर्थयात्रा.

'मन होतें फार इच्छी कीं आतां सेवणें तुझे पाय,
तुजवांचुनि इतरांच्या भजनीं मजलागि होय फळ काय?' ॥ (आर्या के[illegible])
'मातेतें त्यजुनि पळहि जाय न भक्तांकडे जसें वांसरुं,
सत्संगति सोडुनि मन नच जाउ, नसोंचि पेउ हें आळ.' ॥ (सन्मनोरथ.)

मोरोपंत महाभगवद्भक्त होते. त्यांना कीर्तनपुराणश्रवणाची व सत्संगाची लहानपणापासून फार गोडी होती. याविषयीं त्यांच्या स्फुटकाव्यांतून व विशेषतः 'सन्मनोरथराजि' या काव्यांतून पुष्कळ उल्लेख आढळतात. 'जसें मांजर दुधावर टपतें, हळद, कुंकू हीं सौभाग्यद्रव्यें जशीं सुवासिनीला प्रिय असतात, फाल्गुनी पौर्णिमेची जशी लहान मुलांना आवड असते, तसें मला कीर्तन प्रिय असावें व हरिकीर्तनप्रसंगीं धनिकाच्या येथें जसा चोर जपून शिरतो तसें शिरून अनेक कामें मागें असलीं तरी कुचर ढोराप्रमाणें कीर्तन सोडून मी उठूं नये' अशी इच्छा पंत सन्मनोरथराजींत प्रकट करितात. कीर्तनमहिमा एकास्थळीं पंत असा वर्णन करितात:—
काढिली स्पष्ट मोहाच्या पाठिची साल साधुनीं । भगवत्कीर्तनें, केली देवांची सालसा धुनी. ॥
(मोहाच्या पाठीची साल संतांनीं भगवत्कथा करून काढिली व पाप्यांचा उद्धार करण्याचें काम कीर्तनांनीच होत असल्यामुळे देवपदी गंगेकडे फारसें राहिलें नाहीं ह्मणून ती आळशी झाली—हें तात्पर्य.) भगवन्नामवर्णनाची पंतांस केवढी मोठी आवड होती ती त्यांच्या अष्टोत्तरशतरामायणांवरून व इतर काव्यांवरून स्पष्ट होते. भगवद्भक्तांच्या समागमाचे पंत फार भुकेले होते. त्यांच्याविषयीं पंतांचे मनांत केवढी पूज्यबुद्धि वसत असे तें त्यांच्या साधुसत्कार, साधुरीति, साधुस्तव, सद्वर्णन इत्यादि प्रकरणांवरून दिसून येतें. 'न शूद्रा भगवद्भक्ता विप्रा भागवताः स्मृताः । सर्ववर्णेषु ते शूद्रा अभक्ता वै जनार्दने' हें भागवती वचन त्यांच्या ठिकाणीं इतकें बाणून गेलें होतें कीं सन्मणिमालेंत मुकुंदराज, ज्ञानदेव, मुक्ताबाई, नामदेव शिंपी, एकनाथ, तुकाराम वाणी, सावळा माळी, गोरा कुंभार, जनी दासी, बोधला पाटील, सेना न्हावी, दादु पिंजारी, धना जाट, मीराबाई,

कर्माबाई, कबीर, मानपुरी गोसावी, शेख फकीर, नरहरि सोनार, कान्हुपात्रा वेश्या, चोखा महार, रोहिदास चांभार, शेख महंमद, सजणा कसाई, लतीबा, इत्यादि भिन्नभिन्न जातींच्या भगवद्भक्त स्त्रीपुरुषांना त्यांनीं अत्यंत प्रेमपुरःसर नमस्कार केला आहे. सन्मणिमालेंत एके ठिकाणीं (८७ गीति) ते लिहितातः—'हृदया ! स्मर त्यासि. असो श्रीभगवद्भक्तजाति भलती वा ! '. जवळपास कोठें संत आले असें वर्तमान त्यांना कळलें तर ते दर्शनास गेल्याशिवाय रहात नसत. एवढेंच नव्हे तर संतदर्शनार्थ ते दूरचा प्रवास करण्यास देखील मागें पुढें पहात नसत. 'सन्मणिमाला' काव्यांत अनेक महाभगवद्भक्तांचा उल्लेख करून तें काव्य संपल्यावर कऱ्हाडा नजीक नरसिंहपुर येथें श्रीसिद्धेश्वर भटजी बोवा नामक प्रसिद्ध कथानकर्ते अमृतराय यांचे शिष्य मोठे प्रासादिक भगवद्भक्त योगी राहतात असें पंतांस कळल्यावरून ते इ. स. १६७८ त म्हणजे ४५ व्या वर्षीं बारामतीहून श्रींचे दर्शनार्थ मुद्दाम नरसिंहपुरास गेले व तेथें जाऊन त्यांनीं 'महाराज ! मी अल्पमतीनें सन्मणिमाला म्हणोन कांहीं आर्या केल्या, त्यांत आपलें नांव घालण्याचें राहिलें. त्यांस त्या मालेमध्यें आपलें नांव व्यक्तरूपानें असावें अशी बुद्धीस प्रेरणा श्रींनीं करावी' म्हणून बोवांस आग्रहपूर्वक प्रार्थना केली. त्यावर 'बरें आहे' म्हणून आज्ञा झाली असतां त्यांनीं पुढील गीति रचिली:--

> नमिलें श्रीसिद्धेश्वर भटजी बावाचिया सुपद कमला; ।
> या सन्मणिमालेला सांपडलें हें बरें सुपदक मला. ॥

पंतांनीं आपल्या उत्तरवयांत पुष्कळ यात्रा केल्या हें त्या त्या ठिकाणच्या देवतांच्या स्तुतिपर ज्या त्यांनीं कविता केल्या त्यांतील उल्लेखांवरून समजतें. पंत आपल्या वयाचे साठवे वर्षीं शके १७११ सौम्य संवत्सरीं यजमानपुत्र पांडुरंगराय यांनीं पाठविल्यावरून वडील भाऊ सोनोपंत, आपली स्त्री रमाबाई, आईपेक्षां अधिक प्रेम करणारी आत्या, व इतर नातलग घेऊन धनाजी जाधवाचे नातु अमरसिंह जाधव यांजबरोबर काशीयात्रेस गेले. पंतांस यात्रेस जाण्यास प्रथम त्यांच्या पत्नीनेंच आग्रहपूर्वक सुचविलें असून बंधु आबा व भावजय सगुणाबाई यांनीं त्यांना अनुमोदन देऊन यात्रेचें सर्व साहित्य करून दिलें, ह्या गोष्टी विष्णुपदवकिलीवरून कळतात. पंतांनीं 'गंगावकिली'त सवाई माधवराव पेशवे, नाना फडनवीस, हरिपंत फडके, रास्ते, अहल्याबाई होळकरीण या सर्वांचा उल्लेख केला आहे त्यावरून इ. स. १७८८-८९ ह्या वर्षीं वर निर्दिष्ट केलेली मंडळी जिवंत होती असें दिसतें. यांनीं प्रथम, गयेस जाऊन पिंडप्रदान केलें. नंतर ते काशीस गेले. पंत काशीस चातुर्मास राहिले. तेथें असतांना रोज सकाळीं स्नानानंतर भगवद्गीतेचें पद्यात्मक भाषांतर रचून तें ब्राह्मणाला दान केल्याशिवाय ते भोजन करित नसत अशी त्यांच्याविषयीं एक गोष्ट सांगतात. काशीस असतांना पंतांनीं आपली कविता काशिकर पंडितांस दाखविली. ती त्यांना फार पसंत पडली. याच महायात्रेंत पंतांनीं अनेक पवित्र क्षेत्रांचें व तीर्थांचें दर्शन घेऊन त्यांवर स्तोत्रें रचिलीं. काशींतल्या तर सर्व देवतांचें त्यांनीं पृथक् वर्णन केलें आहे. गंगा, गोदावरी, कृष्णा, इत्यादि देशांवरील तीर्थांतच पंतांनीं स्नान केलें असें नाहीं. तर कोंकणांतील राजापुरच्या गंगेचेंही त्यांना 'सत्संगतीनें एकवेळ. अलभ्य मज्जन घडलें.' 'पंत भूमीवरची मोक्षपुरी

पंढरी' सही पुष्कळ वेळां गेले होते. त्यांनीं पांडुरंगाचीं संस्कृत प्राकृत अशा दोन्ही तऱ्हेचीं स्तोत्रें रचिलीं आहेत. पंढरीसच बाबापाध्ये यांची मुलगी पंतांचे चिरंजीव रामकृष्णपंत यांस दिली. हा शरीरसंबंध जुळल्यामुळें पंतांचें तेथें बरेच वेळां जाणें झालें व पंतांच्या मृत्यूनंतर त्यांचे चिरंजीव सासऱ्याच्या आग्रहामुळें कायमचे पंढरीसच राहिले. काशीयात्रेहून परत येतांना पंतांनीं 'देवी अहिल्याबाई'ची भेट घेतली व तिच्या थोरपणाबद्दल आपला आदर प्रकट करावा ह्मणून त्यांनीं 'अहिल्यास्तुति' नामक एक लहानसें प्रकरण रचिलें. या उदार स्त्रीनें पंतांशीं सालिना '१०० रुपये घेऊन आपल्याजवळ राहावें ह्मणून फार आग्रह केला, परंतु पंतांचें आपल्या यजमानांवर फार प्रेम होतें ह्मणून त्यांनीं ती गोष्ट मोठ्या दुःखानें नाकारली. पंतांची सर्व देवांविषयीं समबुद्धि होती तरी ते रामोपासक होते. आपल्या उपास्य देवतेप्रीत्यर्थ त्यांनीं आपल्या उत्तर वयांत १०८ रामायणें रचिलीं. त्यांत त्यांनीं आपली चित्रकाव्याभिरुचि प्रकट केली आहे. (परिशिष्ट—'अ' पहा) यांपैकीं सुमारें ७४ रामायणें आजवर छापून प्रसिद्ध झालीं आहेत.

## ८ पंतांची काव्यरचना व काव्यगुणदोषविवेचन.

'सरसा सालंकारा सुपदन्यासा सुवर्णमयमूर्ती ।
आर्या तथैव भार्या न लभ्यते पुण्यहीनेन.' ॥
प्रेम, प्रतिभा, शिक्षाशक्ति पहा; आयका बरें कवन; ।
पवनप्रियपुत्रा ! बा ! स्यां हें केलें न निजगुणस्तवन. ॥ (नामरसायन.)

संस्कृतप्राकृत कवींचीं काव्यें वाचून व पुराणकीर्तन श्रवण करून पंतांना काव्यरचना-स्फूर्ति झाली. हे एकदां पंढरपुरास गेले असतांना रेवडीकर बोवांचें कीर्तन आपल्यास ऐका-वयास सांपडावें ह्मणून सर्वांत पुढें घुसले. तेव्हां लोकांस जरा एकीकडे होण्याविषयीं विनंति करावयाच्या इच्छेवरून त्यांस तेथल्या तेथेंच आर्या करावयाची स्फूर्ति होऊन त्यांनीं पुढील आर्या रचिली:—

नित्य तुह्मी प्रभुपाशीं पेढे बरफी नवा खवा खावा, ।
तरि स्यां एक दिवशीं रेवडिचा स्वाद कां न चाखावा ? ॥

हीच त्यांची पहिली आर्या. तेव्हांपासून ह्यांच्या काव्यरचनेस आरंभ होऊन बारामतीस आल्यावर वीस एकवीस वर्षांच्या आंत ह्मणजे आपल्या वयाच्या पंचेचाळिसाव्या वर्षापूर्वीं त्यांनीं भारत, बृहद्दशम, प्रल्हादविजय, चषक, आर्याकेका, कुशलवचरित, संशयरत्नावलि, रामनामार्या, मुक्तामाला, नामरसायन, ब्रह्मोत्तरखंड, मंत्ररामायण, सन्मणिमाला, वगैरे काव्यें रचिलीं. ब्रह्मोत्तरखंड रचिलें तेव्हां पंत नवीनच कविता करावयास लागले होते असें दिसतें. (ब्रह्मो० २२. ८०) तसेंच गंगाप्रार्थनादि कांहीं कविता पंतांनीं काव्यरचना करावयास लाग त्यानंतर थोड्याच दिवसांनीं काशीरामेश्वरच्या पंडितांकडे अभिप्रायार्थ पाठविल्या. ('ज्या उपजतांचि गेल्या काशीरामेश्वरा नमायाला.') तसेंच शके १६९५ माघ शुद्ध ८ मीचे सुमारास (२०जानेवारी१७७४) पंत नाशकास गेले होते. तेथें श्रीमती गोपिकाबाई पेशवे (नानासाहेब पेशव्यांची पत्नी) ह्या त्या वेळेस तेथें होत्या. त्यांच्या सांगण्यावरून त्यांनीं 'भीष्मभक्तिभाग्य'

नांवाचें एक सुंदर काव्य भागवत प्रथम स्कंधाच्या आठव्या अध्यायाच्या आधारानें रचिलें असे त्यांतील उपसंहारात्मक श्लोकावरून दिसून येतें. यावरून हेंही काव्य ४५ वर्षांच्या आंतच झालें हें सिद्ध होतें. तसेंच हरिवंश, मंत्रभागवत (१७८०-१७८८), अष्टोत्तरशत रामायणें व केकावलि हीं काव्यें त्यांनीं उत्तरवयांत रचिलीं असावींत असें अंतःप्रमाणांवरून दिसतें. पंतांनीं मंगळ भाऊस लिहिलेल्या एका पत्रावरून १०८ रामायणांची सोमवती वाहण्याची त्यांची इच्छा स्पष्ट होते. यावरून त्यांनीं एकंदर १०८ रामायणें रचिलीं असावींत हें खचित होतें. पंतांच्या हातचीं अस्सल रामायणें प्रती करून घेण्याकरितां मैराळबाबा अनवें गांवास जात असतांना त्यांस वाटेंत अंजिठ्याच्या घाटांत चोरांनीं गांठलें व त्यांच्याजवळील द्रव्य व रामायणांचीं दप्तरें हिसकावून घेऊन दप्तरें घाटाखालीं फेकून दिलीं. बाबांनीं पुढें त्या दप्तरांचा पुष्कळ शोध केला पण त्यांस तीं सांपडलीं नाहींत अशा रीतीनें पंतांच्या अनुपलब्ध रामायणांची कायमची वाट लागल्याची गोष्ट सांगतात. मंत्रभागवतानंतर त्यांनीं हरिवंश रचिला. आर्या केकावलीच्या काव्यसंग्रहांत सगळ्या ६१ गीती छापल्या असून पंतांच्या पोथींत त्या १७८ लिहिल्या आहेत. हें रम्य काव्य वाचून पंतांचे व्याही बाबा पाध्ये यांनीं पुढील मयूरकविवर्णनपर गीति रचिली म्हणून सांगतात:—

> ऐकुनि विश्व सुखावे ज्या केकांचा अपूर्व तो टाहो, ।
> त्याला आयुष्याचा ईशकृपेनें कधीं न तोटा हो. ॥

पंत काव्यरचना फार जलद करित. ते एकेका बैठकीस १००-१५० आर्या रचित. दररोज रात्रीं पुढील पाठ, संस्कृत पोथी व त्यांतील यमकें एकदां तयारी चाकरानें करून ठेवावी; नित्यकर्म आटपल्यावर पंतांनीं सर्व पाठांवर ग्रंथ लिहून मग झोंप घ्यावी. मग दुसरे दिवशीं प्रातःकाळीं पाठांवरील ग्रंथाची प्रत लक्ष्मणभट वांईकर यानें करून ठेवावी असा त्यांचा नित्यक्रम होता. पंतांचीं काव्यें तयार होतांच ठिकठिकाणचे त्यांचे स्नेही त्यांच्या प्रती करून नेत. पंतांच्या काव्यांतून जागोजागीं उत्तम यमकें आढळतात. त्यांविषयीं असें सांगतात कीं बारामतीस पंत आपल्या खोलींत फावल्या वेळीं सुचतील तीं यमकें भिंतीवर लिहून ठेवीत. अशा रीतीनें सर्व भिंतीवर यमकें लिहिलेलीं असत. त्यांपैकीं काव्यरचना करितेवेळीं त्यांना जीं योग्य वाटत तीं यमकें त्यांतून निवडून त्यांचा ते उपयोग करित. पंतांच्या वृद्धाप वर्षाकाळीं किंचित मांस येत असल्यामुळें त्या वेळेस त्यांच्या हातून काव्यरचना कमी होई. पंतांनीं भारतापैकीं कर्णपर्व प्रथम रचून तें लोकांस आवडल्यामुळें नंतर समग्र भारतावर काव्यरचना केली. भारताच्या प्रत्येक पर्वाच्या पहिल्या गीतेचें प्रथमाक्षर घेतलें असतां 'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति' असें संस्कृत वाक्य होतें. सर्व पर्वांची माळ गुंफण्याच्या उद्देशानें प्रत्येक पर्वाच्या प्रथम गीतीची रचना करित करित पंत कर्णपर्वावर आले तेव्हां त्यांतील प्रथमगीतींत रचावयाचें आद्याक्षर 'भ' प्रथमच बिनचूक रचिलें गेलेलें पाहून त्यांना ईश्वरी प्रसादाचें कौतुक वाटलें. पंतांची ग्रंथसंपत्ति फार मोठी आहे. त्याबद्दल विशेष माहिती 'परिशिष्ट-ड' त पहावी. गीति किंवा आर्या (हीं जरी वास्तविक भिन्न वृत्तें आहेत तरी पंत गीतीलाच आर्या म्हणत) हें पंतांचें आवडतें वृत्त

होय. त्यांची बहुतेक कविता याच वृत्तांत रचिलेली आढळते. आर्या छंदाची योजना पंतांपूर्वी फारशी कोणी काव्यांत केलेली नसून पंतांनींच तिचा प्रथम प्रचार पाडिला (परिशिष्ट-ई पहा). भस्मासुर आख्यान, भृगुचरित्र हीं आख्यानें, कांहीं रामायणें, व कृष्णविजय उत्तरार्धाचे बरेच अध्याय इतके श्लोकबद्ध आहेत; 'दुर्वासभिक्षा' हें प्रकरण त्यांनीं ओवीवृत्तांत रचिलें आहे. कृष्णविजय पूर्वार्ध हा सबंध आर्यागीतींत रचिला आहे. पंतांनीं ध्रुवचरित्र, अंबरीषाख्यान वगैरे प्रकरणें साकी वृत्तांत रचिलीं असून 'दोहा' वृत्तांत थोडीं रामायणें व कांहीं स्फुट कविता हीं रचिलेलीं आढळतात. लहान मुलांकरितां रचिलेलीं रुक्मिणीस्वयंवर, सीतास्वयंवर, सावित्रीआख्यान, व श्रीरामायण एवढीं प्रकरणें त्यांनीं अभंगवृत्तांत रचिलीं आहेत. कांहीं पदें, आरत्या हींही केलीं आहेत. त्यांनीं आपलीं काव्यें बहुतेक प्राकृत भाषेतच रचिलीं. तरी एक सबंध रामायण, मुक्तामाला, कृष्णस्तवराज, पांडुरंगस्तोत्रें, शिवार्याशतक, शंकरस्तव, रामस्तुति, हरिसंबोधनस्तोत्र इत्यादि स्फुट प्रकरणें त्यांनीं संस्कृत भाषेंत रचिलीं आहेत. पंत काव्यरचना करित असतांना श्रीधरी, नीलकंठी इत्यादि टीकांकडे चांगलें लक्ष देत असावे असें दिसतें. 'प्रल्हादप्रकरण' हें लहानसें (गीति २०) काव्य त्यांनीं भागवत सप्तम स्कं० श्लो० १८ 'सत्यं विधातु निजभृत्यभाषितं' ८. या श्लोकावरील श्रीधरटीकेच्या आधारानेंच रचिलें आहे. उद्योगपर्वांतील श्रीकृष्णोक्ति (अ. ३, गी. ५३-६२), तसेंच हरिवंश अ. ४५ (पुष्करप्रादुर्भाव), अ. ५४ (त्रिपुरवध) या प्रकरणांस नीलकंठी टीकेचाच मुख्यत्वें आधार आहे. काव्यरचना करितांना मनासारखें वर्णन येण्याकरितां पंत कधीं कधीं दोन दोन तीनतीन प्रयत्न करित असावेत असें मानण्यास पंतांच्या काव्यांत जागा आहे (द्रोण. ८.१३-१४). पंतांनीं आपल्या ग्रंथांत बहुशः वर्णनसंक्षेपच केलेला आढळतो. मूळ लक्ष ग्रंथ भारताचा सारांश त्यांनीं १७१७० गीतींत आणला आहे. तथापि प्रसंगविशेषीं पंत वर्णनविस्तारही करित (परिशिष्ट-क पहा). मंत्र साधण्याकरितांहि कांहीं ठिकाणीं ते वर्णनसंक्षेप करित [परिशिष्ट-क-ड]. पंतांनीं आपलीं काव्यें कांहीं स्वतःच्या प्रेरणेवरून व बरीच दुसऱ्यांनीं सुचविल्यावरून रचिलीं आहेत. बृहद्दशम हा त्यांनीं बाबा पाध्ये यांच्या सांगण्यावरून लिहिला. तो कठिण झाला असें बाबांनीं म्हटल्यावरून नंतर 'मंत्रभागवत' रचिला. 'हरिवंश' पांडुरंगराय नाईक यांचे सांगण्यावरून लिहिला. 'ब्रह्मोत्तरखंड,' 'कृष्णामाहात्म्य', व 'मदालसाख्यान' हीं काव्यें स्वगुरुपुत्र सदाशिव पंडितांच्या सांगण्यावरून त्यांनीं रचिलीं. गीतिवर सयमक व निर्यमक अशी दोन प्रकारची गीतिरचना पंतांनीं केली आहे. निर्यमक गीतीचे पहिले सहा अध्याय मात्र पंतांचे असून बाकीचे त्यांचा पुतण्या आपा पराडकर म्हणून ब्रह्मावर्तांत राहत असे त्यानें केले म्हणून सांगतात. पंतांनीं वैद्यकाचा अभ्यास सुश्रुतादि ग्रंथांवरून चांगला केला असून ते कधीं कधीं औषधयोजनाही करित असत. तसेंच त्यांच्या वैद्यकीवर आर्या असल्याचें सांगतात. बाबा पाध्ये यांनीं भर्तृहरीच्या तीन शतकांवर आर्या रचिण्यास, तसेंच दोन सहस्रांत एक अशीं संस्कृत पंचकाव्यें रघुवंशादि पंचकाव्यांच्या धोरणावर सर्गादि रचना धरून करण्यास पंतांस सुचविलें होतें. बाबा पाध्ये यासारख्या विद्वच्छ्रेष्ठाच्या मनांत जेव्हां मोरो-

पंतांच्या संस्कृतभाषाज्ञानाविषयीं व काव्यसामर्थ्याविषयीं एवढा भरंवसा होता तेव्हां ते सरस्वतीदत्तवरप्रसाद कविश्रेष्ठ होते असें ह्मणण्यास काय हरकत आहे?

## काव्यगुणदोषविवेचन.

मोरोपंतांची काव्यरचना बहुतेक स्वतंत्र अशीच आहे. भारत, रामायण, भागवतादि ग्रंथांत फक्त कथानकापुरताच काय तो मूल संस्कृत ग्रंथांतून आधार घेतला आहे. कवितेंतील अलंकार, उज्ज्वल कल्पना, अनुप्रास व यमकें हीं खुद्द कवीचींच होत. मोरोपंतांचें काव्य 'सर्व संग्रह' व 'काव्यसंग्रह' या मासिक पुस्तकद्वारा जेव्हां प्रथम बाहेर पडलें तेव्हां तो वास्तविक कवि नसून केवळ यमक्या भाषांतरकार होय, त्यांचें काव्य कृत्रिम ह्मणूनच नीरस व क्लिष्ट आहे वगैरे दूषणें बऱ्या मंडळींकडून त्यांस देण्यांत आलीं. त्यांचा विचार पृ० १५७-१६० त टीपेंत संक्षेपतः केला आहे. या आक्षेपांचें सविस्तर खंडण पाहावयाचें असल्यास तें 'निबंधमालें'त व के. मल्हार बाळकृष्ण हंस यांच्या 'मोरोपंतावरील निबंधांत' सांपडेल. पंतांच्या कवितेचा मोठा गुण तिची **प्रौढता** हा होय. लांब समास (परिशिष्ट-ए पहा), संस्कृत शब्दांचा किंवा वाक्यांचा भरणा, तसेंच शुद्ध संस्कृत पद्धतीस अनुसरून केलेली वाक्यरचना व प्रयोग (परिशिष्ट-ए) इत्यादि गोष्टींमुळें पंतांच्या काव्यांत **ओज** किंवा **प्रौढता** फार आली आहे. नुसती भाषाच प्रौढ असते असें नाहीं तर आंतील अर्थही गंभीर व प्रौढ असतो. त्यांच्या काव्यांत अर्थालंकार व शब्दालंकार यांची गर्दी झालेली आढळते. प्रासयमकादि शब्दचमत्कृतीचा कित्ता पंतांनीं वामन पंडितापासून घेतलेला असून त्यांत त्यांनीं आपली पराकाष्ठा केली आहे (परिशिष्टें-ऋ, ह, टीप पृ० ६२ पहा.). लांब यमकें, चमत्कारिक अनुप्रास व साहित्यशास्त्रज्ञांनीं सांगितलेले बहुतेक सर्व अलंकार पंतांच्या काव्यांत, विशेषतः त्यांच्या भारतांत आढळतात (पुरवणी-३ पहा). मधून मधून शब्दावर कोट्या व श्लेष हीं आढळतात; पण त्यांची संख्या त्यांच्या काव्याचे प्रमाणानें फारच कमी (परिशिष्ट-ओ अ पहा). मोरोपंतांची श्लेषावर अभिरुचि असती तर एखादें 'नलोदया' प्रमाणें श्लेषप्रचुर काव्य रचणें त्यांना कठिण नव्हतें. त्यांचीं चित्रविचित्र रामायणादि काव्यें पाहिलीं ह्मणजे महाराष्ट्रभाषा त्यांच्या अगदीं अंकित होती असें वाटतें. अशा कवीला एखादें क्लिष्ट काव्य रचणें ह्मणजे हातांच्या मळाप्रमाणें सोपें झालें असतें. त्यांच्या काव्यांतील पुष्कळ यमकें ठरींव, ह्मणजे पुन्हा पुन्हा तींच तींच आलेलीं असतात, तरी तीं दुरान्वित नसून सहज ओघानेंच आलीं आहेत असें वाचकांस वाटतें (परिशिष्ट 'ह.') शब्द व अर्थ यांच्या अलंकारांची गर्दी झाली आहे तरी त्यामुळें अर्थहानि झालेली फारशी आढळत नाहीं. कोठेंही मूळवर्णनास सोडून अलंकाराच्या ओघांत पंत वाहावले नसून त्यांची शब्दरचना व वर्णनाची हातोटी अशी खुबीदार असते कीं त्यामुळें सहृदय वाचकांची त्यांच्या काव्यांवर मुरकुंडीच पडावी. नवरस जसे कांहीं त्यांच्यापुढें हात जोडून उभे होते असें वाटतें. नवरसांखेरीज 'वात्सल्य' व 'भक्ति' हे रस पंतांच्या काव्यांत प्रमुखत्वानें आढळतात. कोणत्याही रसाचें वर्णन चाललें असतां कवीचें त्याच्यांत अगदीं तादात्म्य दिसून येतें. उत्कृष्ट रसपरिपाकाचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विपुल आहेत. येथें त्यांचा उगीच थोडासा उल्लेख मात्र करितों. ज्यास संस्कृत 'प्रथमो रसः,' 'आद्यरसः' असें ह्मणतात

त्या शृंगाररसाचें वर्णन पंतांच्या काव्यांत वाचलें असतां असें दिसून येईल कीं प्रणयी जनांचीं हृद्गतें जरी कवीला पूर्णपणें अवगत होतीं तरी त्यांनीं कोठेंही फाजिलपणा केलेला नाहीं. शृंगारवर्णन तर अप्रतिम आहे पण अश्लीलत्व त्यांत मुळींच नाहीं. पंतांच्या कवितावधूचा शृंगार इतर कवींच्या शृंगाराप्रमाणें अश्लील नसून तो पतिव्रतेच्या शृंगाराप्रमाणें मर्यादशील आहे. पंतांचें शृंगाररसवर्णन भवभूतीच्या शृंगाररसवर्णनाप्रमाणें खुबीदार, नाजूक व प्रौढ असतें. शृंगारवर्णनाचा कळस करण्यासारख्या प्रसंगींही त्यांनीं आपला मर्यादशील व प्रौढ शृंगारवर्णनाचा क्रम सोडिला नाहीं. हरिवंशांतील भामाकोपशांतवन (अ० २६), प्रद्युम्नप्रभावतीविवाह (अ० ३५), उषानिरुद्धविवाह (अ० ४१), कृष्णविजयांतील कृष्णाची रासक्रीडा (अ० २९-३३), रतिप्रद्युम्नाची ओळख पटणें (अ० ५५), मंत्रभागवतांतील रासक्रीडा (१०-२९-३३-४०७), भारतांतील दुष्यंतशकुंतलाख्यान (आदि.१२), शर्मिष्ठायथातिकथा (आदि. ११), पांडुमाद्रीसमागम (आदि. १५), उर्वशीकृत अर्जुनविलोभन (वन. ३.४७-७२), कीचककृत द्रौपदीप्रमाथ (विराट. १), हे प्रसंग पंतांच्या शृंगारवर्णनाचीं उदाहरणें होत. विप्रलंभ शृंगाराचीं उदाहरणें पाहिजे असल्यास मंत्ररामायणांतील किंवा वनपर्वांतील रामाचा सीताविषयीं विरह व मंत्रभागवतांतील किंवा बृहद्दशमांतील कृष्णदारविरहवर्णन हे प्रसंग पहावे. आतां क्वचित् प्रसंगीं शृंगारांतर्गत बीभत्सवर्णन आढळतें, पण काळाकडे लक्ष दिलें असतां ती गोष्ट क्षम्य असून त्याची अल्पता मोरोपंतांच्या त्या रसिकत्वाचें व सभ्यपणाचें मोठेंच चिन्ह होय (पृ० ६६-६८). पंतांच्या एकंदर काव्यमहोदधींत फाजील शृंगाराचीं वर्णनें किंवा तत्सूचक पदें फारच अल्प आहेत. वीररसवर्णन तर पंतांना उत्कृष्टच साधलें आहे. वीररसाचें वर्णन करितांना पंतांना स्फुरण चढून 'सृ सणणणसणणणणणण' अशी शब्दबाणांची वृष्टि करून ते वाचकांस प्रत्यक्ष समरभूमीच दाखवितात. वीररसाचीं उदाहरणें भारतांत व रामायणांत वाचकांस हवीं तितकीं आढळतील. वनपर्वांतील किरातार्जुनयुद्ध, विराटपर्वांतील अर्जुनप्रगटन, उद्योगपर्वांतील विदुलासंजय कथानक व भार्गवभीष्मयुद्ध, तसेंच भीष्मपर्वापासून गदापर्वापर्यंत सर्व पर्वें, व रामायणांतील रामरावणयुद्ध ह्यांत पंतांनीं वीररसाचा महानदच निर्माण केला आहे. वीररसांत शृंगाररसाचें मिश्र वर्णन पहावयाचें असल्यास कर्ण. ३५.४८-५६, ३१.१४५. ३३.३३ पहा. करुणरसाचीं उदाहरणें पहावयाचीं असल्यास मंत्ररामायणांतील रामलक्ष्मणांस निश्चेष्ट पाहून सीतेनें केलेला शोक, कुशलवाख्यानांतील रामानें सीतेचा त्याग केला तेव्हांचा सीतेचा शोक, हरिश्चंद्राख्यानांतील शोक, तसेंच द्रोणपर्वांत अभिमन्युवधानंतर पांडवांनीं केलेला शोक, वनपर्वांतर्गत नलदमयंतीकथा व यक्षाख्यानांतील शोक, तसाच कुरुक्षेत्रावर कौरवस्त्रियांनीं युद्धानंतर केलेला स्त्रीपर्वांतील शोक, हीं प्रकरणें पहावीं. रौद्राचीं उदाहरणें कर्णपर्वांतील दुःशासनवध, हरिवंश अ. ४८ तील देवदैत्यसमर, व सौप्तिकपर्व यांत सांपडतील. भयानकरस गदापर्वांत व सौप्तिकपर्वांत भरलेला आहे. बाकीचे बीभत्स व अद्भुत हे रस वीर, भयानक, रौद्र, शृंगार यांचे अनुषंगी असून हास्यरसाची छटा तुरळक आढळते. याशिवाय वत्सलरसपरिपाक पाहावयाचा असल्यास कृष्णविजयांतील वैदर्भीची प्रद्युम्नास पाहून झालेली अवस्था व तिचें भाषण (अ. ५५,-२९.-३६), व्रजस्त्रियांची कृ-

ण्णाशीं पुष्कळ वर्षांनंतर झालेली भेट (अ. ८२), नंदवसुदेवाची भेट (अ. ८४), हे भाग पहावेत. सर्वांत भक्तिरसाची भट्टी पंतांना फार चांगली साधली आहे. याचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत सर्वत्र आहेत. केकावली, भीष्मभक्तिभाग्य, कृष्णविजयांतील सुदामचरित्र (अ. ८०,८१), श्रुतदेवबहुलाश्वकथा (अ. ८७), उद्योगपर्वांतील कृष्णाचें विदुरगृहीं भोजन, द्रोणपर्वांतील कृष्णानें अर्जुनाच्या अश्वांची केलेली चाकरी इत्यादि अनेक प्रकरणें या गोष्टीची उत्तम साक्ष देतील. परमार्थसाधन हें पंतांच्या काव्यरचनेच्या मुळाशीं असल्यामुळें त्याच्या काव्यांत भक्तिरसाचा पाक अमृततुल्य मधुर झाला आहे यांत नवल नाहीं. यासंबंधानें लिहितांना पंतांच्या काव्याची योग्यता कालिदास, भारवी, दंडी इत्यादि संस्कृत कविवर्यांच्याही वरची आहे असें एका नामांकित विद्वद्वर्यांचें ह्मणणें आहे. त्यांच्या मतें पंतांची कविता कालिदासाच्या कवितेप्रमाणें प्रसन्न असून भारवीच्या कवितेप्रमाणें ती भारदस्त आहे. तसेंच 'मोरोपंती भारतांतील कांहीं आख्यानें नीट समजलीं ह्मणजे सगळा कालिदास व सगळा भारवी वाचल्याचें श्रेय मिळून आणखीही अधिक लाभ होतो. तो लाभ भक्तिरसाचा व देवाविषयीं आस्तिक्यबुद्धीचा होय. भक्तिरसाचा लाभ कालिदासाच्या काव्यांत फारसा होण्याचा संभव नाहीं. भारवीनें आपल्या काव्यांत भक्तिरसाचा छटा निःसंशय उडविलेला आहे. पण कोठें मोरोपंती भक्तिसागराचा अलोट पूर व कोठें भारवीची भक्तिरसानें मंद मंद वहात जाणारी छोटी सरस्वती.' सारांश ज्या ज्या स्थळीं पंतांनीं ईश्वराविषयीं किंवा ईश्वरभक्ताविषयीं उद्गार काढिले आहेत त्या त्या स्थळीं त्यांची वृत्ति लीन व तदाकार झालेली दृष्टीस पडून त्यांचें काव्य सुरस, आनंदजनक व माधुर्यप्रसादादि गुणगणमंडित झालें आहे. पंतांच्या काव्यरूपी महावस्त्रांत नीतितत्वांचा बोध करणारीं सुभाषितरत्नें जागोजागीं गुंफिलीं असल्यामुळें काव्याची प्रभा द्विगुणित वाढून वाचकांचीं मनें बोधप्रकाशमय होतात. पंतांच्या काव्यांतील सुभाषितसंग्रह एवढा मोठा आहे कीं, तो सर्व एकवटला असतां सरस बोधपर व उन्नतिपर असें शिक्षण दुसऱ्या कोणत्याही पुस्तकाचें फारसें साह्य न घेतां सहज देतां येईल. त्यांच्या सुभाषितांचीं कांहीं निवडक उदाहरणें परिशिष्ट 'ख' मध्यें दिलीं आहेत. मोरोपंत कवि रसिक होते ही गोष्ट त्यांचें काव्य वरवर वाचून पाहाणारांच्या सुद्धां दृष्टीस येईल. त्यांनीं आपल्या काव्यांत रसिकत्वाविषयीं पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केले आहेत (परिशिष्ट 'उ' पहा). त्यांच्या काव्यांतून प्रसंगोचित, खुबीदार व बाणेदार भाषणें, व हृदयंगम वर्णनें यांचा सुकाळ दिसून येतो. विस्तारभयास्तव त्यांचीं उगाच थोडींशीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत. 'वर माग' ह्मणणाऱ्या अश्विनीकुमारांस माद्रीचें पुढील भाषण किती खुबीदार, समयोचित व हृदयंगम आहे तें पहा:—

माद्री हांसोनि ह्मणे 'जाणुनि हृद्रोग, त्यासि अगदानें ।
दूर करा जो ! रोगी न निवे कनकाचियाहि अग-दानें.' ॥ (आदि. १८.९७)

अश्विनीकुमार हे देवांचे वैद्य होते तेव्हां वरील दृष्टांत फारच समर्पक आहे. पुढील उक्ती किती जोरदार व बाणेदार आहेत त्या पहा. भीष्माचें परशुरामाशीं भाषणः—

वधिले क्षत्रिय तेव्हां नव्हता हा भीष्म शांतनव समज, ।
देवासि मागते ते झाले, मरणीं, करूनि नवस, मज. ॥ (उद्योग १३.३८)

सैरंध्री भीमसेनास ह्मणतेः—

निजलां काय मृतापरि ! व्हा जागे सिंहसे उठा, राहो ।
निद्रा, कीर्ति वरा, हो ! ऱ्हीप्रद हा बाहु भृगुकुठारा हो. ॥ (विराट. १.८७)

अर्जुन कृष्णास ह्मणतोः—

वधिले वीर, पळविले, मजशीं कोणी न येति भांडाया, ।
त्यां न वधावें पळतां, चाला, मारूनी काय रांडा या ? ॥ (कर्ण. ३५.६०)

कृष्णानें इंद्रास सत्यभामेकरितां पृथ्वीवर पारिजातक वृक्ष मागितला. तेव्हां इंद्राची उक्तिः.

सुर सुरतरु पाठवितां हा ! ह्मणतिल करुनि आठवा नाकीं, ।
चिडुनि ह्मणेल शचीही स्वपरिग्रह हाहि पाठवा ना कीं ! ॥ (हरि. २७.६५)

भेदक उपहासाचें उदाहरण गदापर्व अ० ५,२९. यांत उत्कृष्ट दिलें आहेः—

जप करिल ज्येष्ठ पिता घेउनि शतपुत्रशोकमणिमाळा, ।
असते नव पुत्र अधिक घडतें विप्रयुक्त कर्म भूपाळा. ॥

खोंचदार व क्रोधावेशयुक्त भाषणाचीं ठळक उदाहरणें पाहणें असल्यास कर्ण. ४०,४५-७३; ४२.२६-४९ पहा. तसेंचः—

दुर्योधनादिकांचीं श्राद्धें जरि वाटलीं मना कार्यें, ।
कां बकहिडिंबकीचककिर्मीरांचीं करूं नये कार्यें ? ॥ (आश्रम. २.१०१)
बाप ह्मणावें याला तरि अगतें अरिस काय बा ! शिंग ? ॥ (आश्र. २.१०५)

कर्णाचें शरसंधानलाघवः—

काडी, जोडी, ओढी, सोडी शर कर्ण, लाघवास्तव तें ।
न दिसे, दिसे शरागनमंडल हतशत्रुबलहि त्याभवतें. ॥ (कर्ण. ३०.७१)

घटोत्कचाची त्वराः—

धर्मानुमतें स्मरतां याया गुरुदास्यपुण्य जनकानें, ।
एके घरीं घ, टोत्कच नमनीं, तो गत्य पुण्यजन कानें. ॥ (वन. ५.२६)

निजलेल्या वीरांना कपटानें मारल्याबद्दल भीम अश्वत्थाम्यावर धांवून गेला तेव्हां ब्रह्मास्त्रापासून त्याला वांचविण्याकरितां कृष्णाची त्वराः—

प्रभुनें प्रतोद घेउनि, भीमाच्या संकटांत अवनातें ।
हय हांकिले कराया न्हीन प्रीतहि मनांत पवनातें. ॥ (ऐषिक. २.२)

दुर्योधनाचें बाणेदार भाषणः—गदा. अ० १०,१४-२३; अ० ९,११-१८; अ० ६, ३६-४१ पहा.

धृतराष्ट्राचा शोकः—

हुरहुर बहु खोटी रे ! उर ! उर न क्षणहि, काळजा ! तडक, ।
अस्रु हो ! निघाचि, न चुका पुत्रप्रस्थानकाळ, जा तडक. ॥ (शल्य. १.२६)

**रामराज्याचें वर्णन:—**

पापानें न वसावया स्थळ दिसे, कोण श्रमाला पुसे ? ।
नाहीं आश्रय यास्तव क्षितितळीं चिंता सचिंता वसे, ॥
विघ्नानें बहु विघ्न होति, रुसली भीति त्रिलोकीं वरी, ।
साकेतीं रघुनाथ सानुजसुहृत् राज्यासि जेव्हां करी. ॥ (कुश. १)

त्या त्या पात्रास शोभतील अशींच भाषणें पंतांनीं त्यांच्याकडून वदविलीं आहेत. एवढेंच नव्हे तर, बऱ्याच प्रसंगीं त्यांनीं स्त्रियांच्या मुखांत स्त्रिया नेहमीं बोलतात अशी भाषा, लहान मुलांच्या तोंडांत बोबडी भाषा व रंगेल पुरुषांच्या भाषणांत रंगेल पदयोजना घातली आहे. सूर्यग्रहणानिमित्त स्यमंतपंचक तीर्थीं यादवांची व पांडवांची मंडळी एकत्र जमली असतां कृष्णस्त्रियांनीं कृष्णभगिनी द्रौपदीस आपल्या स्वयंवरकथा सांगितल्या आहेत. त्यांतील वर्णन फार बहारीनें व स्त्रीस्वभावास पूर्णपणें साजेल असें असून त्यांतील शब्दयोजनाही स्त्रीजनांस अनुरूप अशीच आहे. यासंबंधीं केका १० तील गंगेची उक्ति व पृष्ठ ३३ वरील श्लोक १ हीं पहावीं. तसेंच 'राधाकृष्णसंवाद' व 'गोपीगोडवा' हीं पंतांचीं लघुकाव्येंही या संबंधीं वाचनीय आहेत. लहान मुलांच्या बोबड्या भाषणांचा मासला पहा:- (कृष्णानें शकटासुराचा वध केला याविषयीं वर्तमान गवळ्यांचीं लहान मुलें आपल्या आई-बापांना जाऊन सांगतात:)—

गोपशिशु ह्मणति 'पलिसा, ललतां हलिनेंच झाडिला पाय, ।
गाला उलोनि पलला, सल्व खलें, नवल कलितसां काय ?॥' (हरिवंश)

या भाषणाची पदरचना किती मृदु, साधी व कोमल, ह्मणूनच बालकोचित आहे हें सांगणें नकोच. गोगोपांनीं सांगितलेल्या बकासुरवधाख्यानांत (आदि. ३०.३२), तसेंच कृष्णविजयांत (अ. ७.९) अशीच मधुर शब्दरचना केली आहे. रंगेल भाषणाचा एक छोटासा मासला पहा. कीचक सैरंध्रीला ह्मणतो:—

शृंगाररसतरंगिणि ! तळमळतो मन्मथार्त मत्स्य पहा. । (विराट. १.११७).

याशिवाय आदि १४.१४, वन. ८.७, विराट. १.८९–९०, हरि. ३६.५८;३५,६४; इत्यादि पहा. पंतांच्या अंगीं वाचकांस तल्लीन करून टाकणाऱ्या चमत्कारिक कल्पना प्रसवण्याची शक्ति अजब असून त्यांच्या बहुतेक गीतींचीं उत्तरार्धें अलंकारयुक्त किंवा चमत्कारिक कल्पनामय असतात. ही कल्पना प्रसवण्याची शक्ति उत्कृष्ट कवीचें एक अवश्यक अंग होय ही समजूत पंतांना मान्य होती असें पुढील गीत्यर्धांतील उपमेवरून कळतें:-'बहु कल्पना सुकविला, विजयहि बहुशरपरंपरा व्याला.' ॥ (विराट. ५.२७). कित्येक प्रसंगीं त्यांचा कल्पनाविहंगम स्वप्रतिभाशक्तीच्या जोरावर चिदाकाशांत अत्युच्च भराऱ्या मारून अतिशय उदात्त, उज्वल, व हृदयंगम अशा कल्पनांसह काव्यभूमीवर प्रकट होतो. त्यांच्या बहुतेक उपमा समयोचित व अर्थगंभीर असून मूळ वर्णन वाचकांच्या मनांत चांगलें उतरेल अशाच असतात. प्रसंगोचित वर्णनें किंवा भाषणें यांत सुंदर उपमांची भर ह्मणजे दुधांत साखर याप्रमाणें होय. पंतांच्या काव्यवाचकांस याचा प्रत्यय

वारंवार येतो. येथें स्थलसंकोचास्तव अशा थोड्या सरस कल्पनांचा नुसता निर्देश मात्र केला आहे:—आदि. ५-९३;१२,३१;१८.७६; सभा. २-३६; वन. ५-४;६.४६;७-४६; विराट. १.१७५:५.१५;५ ६६; उद्योग. १०.१८;१०-७८; भीष्म. ६.४६; मंत्ररामायण युद्धकांड २६५,३९३,४३८,४४६,४७८,६४१,७२१,७३२,७४१-७४३,७६९,७८१,७८३, ७८९-७९०,७९५,७९७,८०८,८३४;उत्तरकांड १६,११३,१५८-१५९,१७७,२१२,४२३. पुष्कळ ठिकाणीं पंतांनीं एक एक शब्द मोठ्या मार्मिकतेनें व खुबीनें योजिलेला आढळतो. संस्कृतांत कांहीं सत्कवींच्या काव्यांतून 'पदलालित्य' हा प्रकार आढळतो. पंतांच्या काव्यांत हा प्रकार थोडा बहुत सर्वत्रच आढळतो. तरी त्यांच्या कित्येक स्फुटकाव्यांतून, स्फुट आख्यानांतून व विशेषतः संस्कृत भाषेंत रचिलेल्या त्यांच्या स्फुट काव्यांतून हा आल्हाद-कारक पदलालित्याचा प्रकार प्रमुखत्वानें आढळतो. या संबंधीं 'शिवार्याशतक,' 'राम-स्तुति,' 'पांडुरंगस्तोत्र तृतीय' इत्यादि प्रकरणें वाचावीं. 'मुक्तामाला' व 'कृष्णस्तवराज' यांच्या वाचनानें भाषासौंदर्य व अर्थगांभीर्य हे दोन गुण कळून येतील. कालिदास कवीनें रघुवंशांतील ९ व्या सर्गांत श्लोकाच्या प्रत्येक चतुर्थ चरणांत ज्याप्रमाणें यमकावृत्ति साधली आहे त्याचप्रमाणें पंतांनीं 'विठ्ठलभक्तस्तुति' या प्रकरणांत प्रकार केला आहे. वर निर्दिष्ट केलेलीं किंवा इतर दुसरीं स्फुट प्रकरणें वाचलीं असतां 'माधुर्य' हा गुण पंतांच्या काव्यांत आढळून येईल. पंतांनीं 'महाराष्ट्रभूमींत अठरापर्वांच्या भारती इक्षुदंडाची लावणी करून रसिकजनांच्या मेजवानीचें अपूर्व व अखंड साहित्य करून ठेविलें असल्यामुळें' त्यांत तर माधुर्यगुण अत्यंत उत्कर्षानें वसत आहे. तसाच प्रकार मंत्रभागवतांत—विशेषतः दशम स्कंधांत आढळतो. युधिष्ठिर व जनार्दन यांचीं पुण्यचरित्रें वर्णन करितांना मोरोपंतांस प्रेमाचें भरतें येतें. यास्तव वरील दोन ग्रंथ माधुर्यादि उत्तम काव्यरसांनीं पुष्ट झालेले आढळतात. मराठी व संस्कृत भाषा पंतांच्या अगदीं अंकित असत. त्यांनीं लिहिलेलीं चित्रकाव्यें, त्यांतल्या त्यांत मंत्रमय रामायण, मंत्रमय भागवत, व हरिसंबोधनस्तोत्र हीं वाचलीं असतां त्यांच्या भाषाप्रभुत्वाची उत्तम साक्ष पटेल. त्यांचीं रामायणें हीं 'कवीच्या वाग्देवतेची केवळ स्वतंत्र लीला आहे. होमरच्या महाकाव्यांतील वीर युद्ध आटपल्यानंतर जसे रंगयुद्धांत परस्पर झगडले व नानातऱ्हेच्या कसरती करून त्यांनीं करमणूक करून घेतली, किंवा चितार्‍यानें मुख्य चित्र तयार झाल्यावर जशी भोंवताली नक्षी व वेलबुट्टी काढण्यांत आपली करामत खर्चावी, त्याप्रमाणेंच आमच्या कवीनें भारतादि मोठमोठ्या ग्रंथांनीं आपल्या जन्मभाषेस अलंकृत करून शेवटीं आपल्या उपास्य देवतेच्या प्रीत्यर्थ आपल्या सरस्वतीचा ओघ जलयंत्रोद्गाराप्रमाणें चित्रविचित्रतेनें प्रगट केला आहे.' (नि. मा.) त्यांचीं रामायणें वाचलीं म्हणजे पंत भाषानर्तकीला वाटेल तशी नाचवीत असें दिसून येतें. 'काव्यांतील शब्दांचा ध्वनि अर्थाचा प्रतिध्वनि असावा' असें जें पाश्चात्य पोप कवीनें, आपल्या काव्यविवेचन कवितेंत म्हटलें आहे तें पंतांला संमत होतें असें दिसतें ('परिशिष्ट क्र २' पहा). सारांश पंतांची कविता केवळ शब्दचमत्कारमय, रसहीन व दुर्बोध आहे अशी जी कांहीं लोकांची समजूत आहे ती योग्य नाहीं. संशयरत्नावलि, सन्मणिमाला,

पृथुकोपाख्यान, नामरसायन, केकावली वगैरे छोटीं प्रकरणें वाचलीं असतां देखील पंतांविषयींचा दुर्ग्रह निघून जाईल. भारतभागवतादि मोठे ग्रंथ लक्ष्यपूर्वक वाचले असतां तर पंतांच्या कवितेवर चिरस्थायी प्रेमच जडेल. पंतांच्या कवितेचा मोठा गुण व्याकरण-शुद्धता होय. छंदोभंग, अशुद्धप्रयोग, चुकांचे समास, समास असून संधि नाहीं, ऱ्हस्वदी-र्घांकडे दुर्लक्ष्य इत्यादि प्रकार पंतांच्या काव्यांत अतिशय विरळ असून (परिशिष्ट—ओ' पहा) भाषेच्या टाकटिकीकडे त्यांच्यासारखें लक्ष्य इतर फारच थोड्या महाराष्ट्रकवींनीं दिलें आहे. तसेंच पंतांनीं देशावरील निरनिराळ्या ठिकाणची व क्वचित अस्सल कोंकणची शब्दयोजना आपल्या काव्यांत केलेली आढळते. इलुसी, आखाडा, कानकोंडा, चेंगट, चेव, परसें, बरीक, मुंडासें हे शब्द याचीं थोडीं उदाहरणें होत. तसेंच शुद्ध व सरळ मराठी भाषणसंप्रदायाचे मासले पंतांच्या काव्यांत मुबलक आढळतात (परिशिष्ट—क). कांहीं ठिकाणीं भाषेंतील म्हणीही जशाच्या तशाच त्यांनीं आपल्या कवितेंत ठेऊन दिल्या आहेत. फारशी, अरबी, हिंदुस्थानी ह्या परकी भाषेंतील पुष्कळ शब्दांचा त्यांनीं आपल्या काव्यांत उपयोग केलेला आढळतो (परिशिष्ट–अः पहा).

असो. तर पंतांची कवितामुग्धा इतकी सरस, निर्दोष व रूपयौवनसंपन्न कशामुळें झाली तें वरील अल्प विवेचनावरून वाचकांच्या थोडें तरी लक्ष्यांत येईल. पंतांची प्रतिभाशक्ति ईश्वरदत्त, संस्कृतप्राकृतभाषा त्यांस करतलामलकवत्, काव्यसाहित्यांचा त्यांचा अभ्यास उत्तम, प्रांजळ, एकाग्र, भगवद्भक्तिपरायण व व्यापक बुद्धि, चांगलें व्यावहारिक ज्ञान व उत्कट सहृदयता इतके गुणगण जनकाचे ठिकाणीं असल्यावर कन्या मनमोहिनी होईल यांत नवल काय? तिच्या पायांतील नूपुरांचा झणत्कार व हातांतील सुवर्णकंकणांचा रुणत्कार ऐकूनच रसिकजन आनंदानें डोलू लागतात; मग ती तारुण्यांत येऊन जेव्हां परपुरुषासक्त होऊन बुद्धिपुरःसर कटाक्ष फेंकते, तेव्हां तिच्या अप्रतिम सौंदर्यास भुलून ते भृंगाप्रमाणें तिजभोंवतीं मंजु गुंजारव करावयास लागतात व आपले हृदयबाहु पसरून तिला प्रेमालिंगन द्यावयास सज्ज होतात यांत आश्चर्य कसचें!

एथवर त्यांच्या गुणांचें व कांहीं विशेष गोष्टींचें विवरण झालें. आतां त्यांतील दोषांकडे पाहूं. पंतांच्या कवितेंतील पहिला दोष दुर्बोधता होय. संस्कृताचें अंग नसलेल्या निवळ महाराष्ट्र वाचकांस त्यांचें काव्य कठिण वाटून तें पुष्कळ ठिकाणीं समजणारही नाहीं. संस्कृताच्या धर्तीवर केलेले लांब समास (परिशिष्ट—ए), संस्कृत शब्दांचा, पदांचा व वाक्यांचा भरगच्च प्रयोग (परिशिष्ट–ऐ), तसेंच लांब यमकांची सांखळी (परिशिष्ट—ह), ह्यांमुळें पंतांची कविता थोडीशी क्लिष्ट झाली आहे. दुसरा दोष पंतांची यमकाधीनता. प्रथमार्धांत 'आतेला', 'ते लटिके', 'बोलका नाहीं', 'पाप डसे' इत्यादि शब्द शेवटीं आले कीं 'आ तेला,' 'तेल टिके,' 'बोल कानांहीं,' 'पापडसे' इत्यादि यमक द्वितीयार्धांत पंतांनीं शिरकविलेंच म्हणून समजावें (परिशिष्ट—ह). त्यामुळें कांहीं आर्यांचें पूर्वार्ध कथानुसंधानानें मोठें सुंदर रचिलें असून उत्तरार्ध पहावें तों यमकाकरितां म्हणून दूरान्वित, कृत्रिम व कवितेंत न शोभणाऱ्या अशा ग्राम्य किंवा अप्रकृत अर्थानें युक्त असें आढळतें (परिशिष्ट—ग पहा). पंतांच्या काव्यांत प्रौढ

अर्थांचें मंडन कधीं कधीं जें ग्राम्य दृष्टांतांनीं केलेलें आढळतें तें बहुशः लांब किंवा ठरीव यमक साधण्याकरितां ह्मणून असतें. याचें एकच उदाहरणः—

तो प्रळयकाळघनसा लागे सर्वत्र शक्र वाढाया, ।
सुर ह्मणति फुटाण्यापरि याच्या नग रगडतील दाढा या. ॥ (हरि. ४८.११२).

यांतील पूर्वार्धांतील उपमा मोठी भारदस्त असून खालची फुटाण्याची उपमा ग्राम्य व नीरस होय. असल्या दाखल्यांनीं वाचकांच्या मनाचा विरस होतो. त्यांच्या काव्यांतून क्वचित सत्काव्यांत न शोभणारे असे हलके शब्द व अप्रौढ भाषापद्धति आढळून येते हा तिसरा दोष. थान, (कानांतला) फोड, मिशांवर ताव देणें, नाकास चुना लावणें हे शब्द व वाक्यांश यांचीं उदाहरणें होत. मोरोपंतांचें काव्य जरी अगदीं सोवळ्यांतलें सोंवळें आहे तरी पण क्वचित् अश्लीलशब्दयोजना, फाजील शृंगारिक उपमा व फाजील शृंगारिक वर्णनही त्यांत आढळतें. साधुगीति गी. १८,२३, केका. ७,२८ (तसेंच पृ. ६७–६८तील उदाहरणें पहा.) हीं त्यांचीं उदाहरणें होत. हा चवथा दोष. आणखी 'कालविपर्यास' ह्मणून एक पांचवा दोष पंतांच्या काव्यांत क्वचित् आढळतो. ज्या काळाला जें वर्णन योग्य नाहीं त्या काळीं तें वर्णन केलें असतां हा दोष उत्पन्न होतो. गोपीगोडवा गी. ६१, राधाकृष्णसंवाद गी. १५, कुशलवो. ३.१६ हीं यांचीं उदाहरणें होत. गोपीगोडव्यांत गोपी कृष्णाविषयीं ह्मणतात:—

हरियशचि व्रजहृदया धाम, जगें तोय धाम यादासी; ।
भजुनि हरिजनां पावो हरिला, ती जेवि **नामया दासि** ॥ (६१)

यांत नामदेवाच्या जनीदासीचा उल्लेख केला आहे तो त्या काळीं अयोग्य ह्मणून हा कालविपर्यास दोष आला. आणखीही बारिकसारिक दोष मार्मिक वाचकांस सांपडतील; पण त्यांचा व्याप्ति अत्यल्प अशीच आढळून येईल. मोरोपंतांच्या एकंदर अवाढव्य काव्यरचनेच्या मानानें हे सर्व दोष अत्यल्प असून त्यांतील गुणांचें पारडें अत्यंत जड भरत असल्यामुळें ते दोष त्यांना कमीपणा आणत नसून उलट गालबोटाप्रमाणें त्यांच्या काव्यांस शोभाच देतात.

## ९. मोरोपंतांची इतर कांहीं कवींशीं संक्षिप्त तुलना.

'सुश्लोक वामनाचा, अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची । ओवी मुक्तेश्वराची, किंवा आर्या मयूरपंताची ॥'

**(अ) कालिदास व मोरोपंतः**—कालिदास व मोरोपंत या दोघांनींही आपलीं काव्यें इतिहासपुराणाधारें लिहिलीं. लोकस्थिति, वनशोभा, ऋतुवर्णन, स्वयंवरें इत्यादि गोष्टींसंबंधानें स्वतंत्र, विस्तृत व सुरस वर्णन जसें कालिदासाच्या कवितेंत वाचावयास मिळतें तसें पंतांच्या काव्यांत मिळत नाहीं. त्यांचें लक्ष्य विस्तारपूर्वक वर्णनाकडे फारसें दिसून येत नाहीं. बहुतेक वर्णनसंक्षेपाकडेच त्यांचा कल दिसतो. तरी प्रसंगविशेषीं पंतांनीं मूळ ग्रंथाहून भिन्न असेंही वर्णन-मग तें फारसें विस्तृत कां नसेना-केलेलें आढळतें. भारत, भागवत, हरिवंश, मंत्ररामायण ह्या ग्रंथांत बऱ्याच स्थळीं ज्याला मूळ ग्रंथांत बिलकुल आधार नाहीं, किंवा फारच थोडा आहे, असें वर्णन पंतांनीं क्वचित् विस्तृतपूर्वकही केलें आहे. भागवतांत रुक्मिणीनें आपलें स्वयंवरवृत्त द्रौपदीस एका श्लोकांत सांगितलें असून पंतांनीं त्याचा ९३

गीतींत विस्तार केला आहे. (परिशिष्ट-क पहा) तसेंच कुशलवाख्यानांतही बरेंच विस्तृत वर्णन आहे. त्यांतील कांहीं श्लोक तर कालिदासाच्या श्लोकांचें प्रतिबिंब आहेत. त्यावरून कालिदासाचें काव्य पंतांचें फार आवडतें असावें असें दिसतें. सारांश, शृंगारादि नवरसांच्या तरंगिणींत पंतांनीं प्रसंगविशेषीं अटपट स्नान मात्र केलें असून कालिदासांनीं त्या त्या प्रसंगीं अंगास सुवासिक द्रव्यें लावून इतर मंडळीला बरोबर घेऊन यथेच्छ घटका घटका क्रीडा केलेली आढळते. याचें एक मुख्य कारण असें दिसतें कीं कालिदासादि कवींच्या काव्यरचनेचा उद्देश मुख्यत्वें कीर्तिलाभ करून घेण्याचा असून ईश्वरप्राप्ति व्हावी हा मोरोपंतादि महाराष्ट्रकवींचा मुख्य उद्देश आहे (पृष्ट ८८ टीप पहा). यास्तव त्यांचा कल सृष्टिदेवतेची निरनिराळ्या प्रसंगीं दिसून येणारी शोभा वर्णन करण्याकडे नसून भगवंताचें किंवा त्याच्या भक्तांचे गुणवर्णन करण्याकडेच सर्वस्वी आहे. 'प्रसाद' गुण कालिदासाच्या काव्यांत उत्कर्षानें वसत असून मोरोपंतांच्या काव्यांत 'ओज' किंवा प्रौढता हा गुण मुख्यत्वें आढळतो. 'उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवं दंडिनः पदलालित्यं' अशी संस्कृत कवींत काव्यगुणांची वांटणी केली आहे. पंतांच्या काव्यांत वरील तिन्ही कवींचे गुण उत्कर्षानें वसत असल्यामुळें 'कालिदासाची, भारवीची व दंडींची-मिळून त्रिवेणी एकट्या पंतांच्या काव्यांत एकत्र संगम झालेली उघड आढळते.'

(आ) **तुकाराम व मोरोपंतः**—तुकोबा हे मोठे भगवद्भक्त असल्यामुळें त्यांच्या काव्यांत कवित्वस्फूर्ति जास्त आहे. त्यांचे अभंग साधे सरळ, पण मोठे जोरदार असून, हृदयाला पाझर फोडणारे आहेत. अभंगांतून नीत्युपदेश सणसणीत असून भगवद्भक्तीचा त्यांच्या काव्यांत मूर्तिमंत कळस उभारिला आहे. याशिवाय बाळक्रीडेवर किंवा रुक्मांगदादि चरित्रांवर त्यांचे अभंग थोडे असून बहुतेक अभंगांत त्यांच्या स्वतंत्र व प्रेमळ विचारांचाच भरणा आहे. मोरोपंत उत्तम पंडित होते. तुकोबाचें शिक्षण अगदींच साधारणचें. पंतांनीं भाषा कमाविण्यास फार प्रयत्न केला. तुकोबास ज्या वेळेस जशी स्फूर्ति झाली तशा प्रकारचे अभंग त्यांच्या मुखांतून निघाले. पंतांच्या कवित्वाचा झरा त्यांच्या डोक्यांतून निघाला; तुकोबाच्या कवित्वसागराचा उगम त्यांच्या हृदयांतून झाला. पंतांची कविता पुण्याच्या नखरेदार पण भाविक कुलवधूप्रमाणें असून तुकोबाची कविता एखाद्या साध्याभोळ्या पंढरपुरच्या वारकरिणीप्रमाणें दिसते. एकीच्या कपाळावर रेखीव व कोरून लाविलेला कुंकुमतिलक असून दुसरीनें कपाळभर मळवट भरलेला आहे. सारांश तुकोबाची कविता 'कृताभ्यंगस्नाना कनकमणिभूषाविरहिता धवलवसना' अशी असून पंतांच्या कवितेचा थाटमाट व एकंदर वर्तणूक 'लज्जाव्यालोलदृष्टी, स्मितरुचिरमुखी, भ्रूयुगीं नृत्य, नर्म । व्याहारीं, कोमलांगी, अभिनव मिरवे घर्मरोमांचवर्म. ॥ अशी आहे. अर्थातच भाषेची शुद्धि, व्यवस्थित वाक्यरचना, सुरस नवरसवर्णनें हे प्रकार मोरोपंतांच्या काव्यांत जास्त दृष्टीस पडतात. ब्रह्मानंदीं टाळी लागल्यावर देह संभाळणेंच ज्यांना जड वाटतें ते संतमुकुटमणि अशा बाह्य गोष्टीकडे कसचे लक्ष्य देतात. एकंदरींत तुकारामाची योग्यता तुकारामालाच.

**(इ) रामदास व मोरोपंतः**—रामदासांची सर्व कविता ओवी, श्लोक व अभंग ह्या छंदांत रचिली आहे. त्यांचीं कांहीं पदें, भूपाळ्या व आरत्याही आहेत. त्यांच्या ग्रंथांतून व्यवहारज्ञान व अध्यात्मविद्या यांचें उत्तम विवेचन असून त्यांत त्यांचा हातखंडा होता. पंतांच्या काव्यांत वरील प्रकार इतका दृष्टीस पडत नाहीं. आर्यावृत्त जसें पंतांचें तसें भुजंगप्रयातवृत्त रामदासांचें आवडतें दिसतें. त्यांचें काव्य सोपें व रसाळ असून त्यांत अनुप्रास पुष्कळ ठिकाणीं साधले आहेत. व्याकरणशुद्धतेकडे त्यांनीं फार लक्ष्य दिलें नसून त्यासंबंधीं 'ताल जाती एकीकडे । गाणें माझें भलतीकडे ।। शेंडा मूळ तें नकळे । माझें गाणेंचि मोकळें ।। (आळसपंचक)' अशा प्रकारची त्यांची कविता आहे. भाषा साधी पण जोरदार व अधिकारयुक्त अशी असते. त्यांच्या काव्यांत व्यवहारज्ञान, भक्ति, नीति व तत्वज्ञान ह्यांचा सर्वत्र उपदेश केलेला आढळतो. त्यांच्या काव्यांत अगदीं घरगुती भाषा वापरली असून त्यांत ह्मणींचाही समावेश केलेला आहे. राज्यकारणांत, व्यवहारांत व परमार्थांत कसें वागावें या सर्व गोष्टींचा उपदेश त्यांच्या दासबोधांत उत्तम केला आहे. प्रपंच आणि परमार्थ या दोन गोष्टींचा उत्कृष्ट मिलाफ यांच्या काव्यांत (विशेषतः दासबोधांत) केलेला आढळतो. यांच्या काव्याच्या वाचनानें स्वाभिमान जागृत होऊन 'रुक्मांगद होता नर । आह्मीं काय आहों खर ।।' अशा प्रकारची स्थिति होऊन कर्तव्यजागरूकता उत्पन्न होते. यांचीं अनेक 'पंचकें,' 'मनाचे श्लोक,' 'पंचीकरण,' व 'रामदासी कुबडी' इत्यादि ग्रंथ फार वाचनीय आहेत. कवित्व कसें असावें याविषयीं जरि रामदासांनीं दासबोधांत उत्तम विवेचन केलें आहे तरी त्यांच्या काव्यांत भगवल्लीलावर्णन नसून केवळ व्यावहारिक व आध्यात्मिक विचारच ग्रथित केले असल्यामुळें त्यांच्या काव्यांत मोरोपंत, वामन, मुक्तेश्वर यांच्या काव्याप्रमाणें रसभरित वर्णन आढळत नाहीं. आध्यात्मिक विचारांतही तुकोबाप्रमाणें ते तल्लीन झालेले दिसत नाहींत. त्यांचा उद्देश 'मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा' हा असल्यामुळें त्यांची सर्व काव्यरचना त्याकरितांच निर्माण झालेली आहे. तेव्हां त्यांत काव्यशास्त्रोक्त गुणांची विशेष अपेक्षा करणें योग्य होणार नाहीं. असें आहे ह्मणून त्यांच्या काव्याची योग्यता कमी नाहीं. स्वकर्तव्याची ओळख, स्वाभिमान, व प्रपंच साधून परमार्थलाभ करून घेण्याची अजब हातोटी जशी त्यांच्या काव्यवाचनापासून प्राप्त होते तशी इतरत्र होत नाहीं. सध्याच्या काळाला दासबोधासारख्या ग्रंथांचीं पारायणें होणेंच फार अगत्याचें आहे.

**(ई) वामन व मोरोपंतः**—मोरोपंत जसे उत्तम पुराणिक होते तसेंच वामनपंडित हे मोठे षट्शास्त्रवेत्ते पंडित होते. पंडितांचा भर जसा केवळ अद्वैतप्रतिपादनाकडे आहे तसा पंतांचा नाहीं. पंतांनींही एकादशस्कंधांत (मंत्रभागवत) अद्वैत प्रतिपादन केलें आहे. पण त्यांचा सगुणावतारकथावर्णनाकडे विशेष भर होता ह्मणून त्यांनीं देवाचीं स्तुतिस्तोत्रेंच फार केलीं आहेत. पंडितांनीं ओवी व श्लोक या वृत्तांतच आपल्या काव्यांची रचना केली आहे. त्यांच्या 'यथार्थदीपिका' नामक प्रचंड टीकेंत सांख्य बौद्ध वगैरे मतें खोडलीं असून अद्वैत प्रतिपादन केलें आहे. ह्या टीकेवरून त्यांची जाडी विद्वत्ता व स्वमतप्रतिपादनशैली हीं दृष्टीस पडतात. पंडितांची मुख्य प्रसिद्धि त्यांच्या मधुर श्लोकांवरून आहे. त्यांच्या श्लोकांत

प्रसाद व माधुर्य हे गुण उत्तम नजरेस येतात. शृंगारवर्णनांत वामनाचें पंतापेक्षां तादात्म्य जास्त होत असल्यामुळें रासक्रीडा, रुक्मिणीविलास इत्यादि शृंगारिक काव्यांत पंतांच्या प्रासंगिक शृंगारवर्णनापेक्षां पुष्कळपटीनें जास्त रसोत्पत्ति झाली आहे. भक्तिरस व वीररस यांच्या वर्णनांत जसे पंत तद्रूप होतात तद्वत् अद्वैतप्रतिपादन व शृंगाररस-वर्णन या गोष्टींत पंडित तन्मय होऊन कमाल करितात. पंतांचा शांत पण तेजस्वी स्वभाव जसा त्यांच्या काव्यांत प्रतिबिंबित झाला आहे तसाच वामनाचा रंगेल व आनंदी स्वभाव त्याच्या काव्यांत दृग्गोचर होतो. पंडितांच्या काव्यांत ध्वनिकाव्य मुळींच नाहीं पण पंतांच्या काव्यांत ध्वनिकाव्य बरेंच दृष्टीस पडतें (पृ० १६०-१६१). यमकरचनेचा कित्ता पंतांनीं पंडितांपासून उचललेला दिसतो. तरी या कामांत शिष्यानें गुरूवर ताण केली आहे. पंतांनीं सगुणचरित्रेंच विशेष वर्णन केलीं असल्यामुळें त्यांच्या काव्यांत अद्वैती पंडितांच्या काव्यापेक्षां जास्त सरसत्व व गुरुत्व आलें आहे. पंतांची कविता फार शुद्ध असून त्यांत छंदोभंग, यतिभंग, ऱ्हस्वदीर्घाकडे दुर्लक्ष, अग्राह्य समास व चुकीचे संधि हे प्रकार फार कमी असतात. पण पंडितांच्या काव्यांत असंगति, यमकास्तव शब्दांची ओढाताण, ऱ्हस्व-दीर्घाकडे दुर्लक्ष, छंदोभंगादि व्याकरणदोष 'पैं,' 'अणि' इत्यादि पादपूरणार्थक अव्ययें इत्यादि दोषांची व्याप्ति बरीच मोठी आहे. पंतांच्या काव्यांत ज्याप्रमाणें वर्णनाची संगति, प्रौढ व ठोकदार भाषापद्धति, 'बव्हर्थ, जनमनोहर व स्वल्पाक्षर' असें वर्णन, गांभीर्य, अर्थालंकार व शब्दालंकार यांची गर्दी वगैरे प्रकार आढळतात तसे ते पंडितांच्या काव्यांत दृष्टीस पडत नाहींत. पंतांचें शृंगाररसवर्णन मर्यादशील असतें. पंडित शृंगारर-साच्या ओघांत वाहून कित्येकदा बीभत्सवर्णनरूपी कर्दमांत जातात. भक्तिरसवर्णन जरी पंतांना चांगलें साधलें आहे तरी पंडितांचें अंतःकरण भक्तिरसवर्णनांत कवितेशीं जसें सुलीनतेनें तद्रूप बनून सारासार होतें तसा प्रकार पंतांचा फारसा होत नाहीं. सारांश पंत व पंडित हे दोघेही आपआपल्यापरि श्रेष्ठ आहेत. कांहीं गुणांत एक अधिक आहेत तर दुसऱ्या कांहीं गुणांत दुसरे अधिक वाटतात. तेव्हां एकंदरींत पाहतां दोघेही सारख्याच योग्यतेचे कविश्रेष्ठ आहेत असें ह्मणावयास हरकत वाटत नाहीं.

**(उ) मुक्तेश्वर व मोरोपंतः**—मुक्तेश्वराची वाणी मोरोपंताच्या वाणीपेक्षां अधिक प्रासादिक आहे. काव्यास अत्यवश्यक जी सहृदयता ती पंतापेक्षां मुक्तेश्वरांत जास्त होती. ह्मणूनच माधुर्य व प्रसाद या गुणांत मुक्तेश्वर दोघांत श्रेष्ठ ठरतो. त्यास शृंगारादि सर्व रस उत्कृष्ट साधले असून त्यांच्या वाणींत मार्दव फार आहे. त्यांची वर्णन करण्याची हातोटी इतकी खुबीदार व मनमोहक आहे कीं वाचकांपुढें ते ते प्रसंग प्रत्यक्ष दिसून ते कांहींवेळपर्यंत आपलें स्वत्व विसरतात. अतिशयोक्ति व सृष्टिसौंदर्यवर्णन ह्या गोष्टींत त्यांचा हात धरणारा महाराष्ट्रकवींत क्वचित् सांपडेल. त्यांनीं भारताचीं पहिलीं चार पर्वें केलीं असून पंतांच्या अठराही पर्वांवर आर्या आहेत. या दोघां कवींची पहिल्या चार पर्वांपुरती तुलना केल्यास मोरोपंतांपेक्षां मुक्तेश्वरांच्या काव्यांत ईश्वरीप्रसाद जास्त दृष्टीस पडून त्यांची काव्यप्रतिमा तप्तसुवर्णप्रतिमेप्रमाणें सर्वत्र उज्वल दिसते. मुक्तेश्वरांचीं

भारताचीं चार पर्वें उत्कृष्ट साधलीं असून आदिपर्व तर सर्वोत्कृष्ट आहे. भारतांत पुष्कळ ठिकाणीं त्यांनीं आपल्या पदरच्या कल्पना व मूळांत ज्यांचा मागमूसही नाहीं अशीं अपूर्व वर्णनें रचिलीं आहेत तीं फारच गोड अतएव रसिकांस तल्लीन करून टाकणारीं आहेत. ह्मणूनच पंतांनीं सन्मणिमालेंत मुक्तेश्वराविषयीं लिहितांना पुढील प्रमाणें आनंदोद्गार काढिले आहेत:—

श्रीमुक्तेश्वर कविवर, यातें कोण न शुभेच्छु वंदील ? ।
वंदी लक्ष जयाचे, ज्याचें यश भव्य जेविं मंदील. ॥ ३२ ॥

मुक्तेश्वराची भाषा साधी, गोड व सरळ आहे; पंताची ऐटदार, पांचापेचांनीं भरलेली व खुबीदार अशी आहे. पंतापेक्षां मुक्तेश्वर अधिक सात्विक व भावार्थी दिसतो. प्रास, यमक श्लेष इत्यादि शब्दालंकार मुक्तेश्वराच्या काव्यापेक्षां पंताच्या काव्यांत पुष्कळच अधिक आहेत ह्मणून त्याचें काव्य समजावयास साधारणपणें कठिण आहे. मुक्तेश्वराची भाषा साधी व सोपी असल्यामुळें त्याचें काव्य वाचकांस समजण्यास सुलभ जातें; व ह्मणूनच तें लोकादरास जास्त पात्र झालें आहे. जरा निराळ्या तऱ्हेनें ह्मणावयाचें ह्मणजे मुक्तेश्वराचें काव्य द्राक्षापाकाच्या वर्गांत मोडणारें असून पंताचें काव्य नारिकेलपाकाच्या वर्गांत मोडेल. दोघांचींही काव्यें रुचिपरत्वें लोकांस कमी ज्यास्ती आवडतील, तरी मुक्तेश्वराच्या काव्याचा रसास्वाद सुलभ रीतीनें मिळण्याजोगा असल्यामुळें तिकडेच बहुजनसमूहाची प्रवृत्ति झाल्यास त्यांत नवल नाहीं. परंतु मांडवावर पक्क व मधुर द्राक्षांचे घड लोंबत असले तरी माडावर चढून नारळ काढण्याचे परिश्रम ज्यास करतां येत असतील असे लोक जसे ते नारळ सोलून फोडण्याचे श्रम पत्करून नारळांतील पाणी व खोबरें खाण्यांत आनंद मानतात तद्वत् संस्कृत शब्दांचा ज्यांस परिचय असून समासांची मोडणी व मोरोपंताची पद्धति थोडीशी तरी टाऊक असेल अशा लोकांस पंताच्या काव्यवाचनापासून निःसंशय मोठा आनंद होईल. 'खेड्यांतल्या श्रीमंत पाटलाची शहाणी आणि भावार्थी बायको, आणि शहरांतल्या साधारण कारकुनाची हुशार आणि पक्की वस्ताद बायको त्यांच्यामध्यें जें अंतर असतें, तें मुक्तेश्वर आणि मोरोपंत ह्यांच्या काव्यांत दिसून येतें' असा एका मार्मिक टीकाकारांनीं अभिप्राय दिला आहे त्यांत पुष्कळ तथ्य आहे. ओंवी छंदांत जशी मुक्तेश्वराला उत्कृष्ट कविता करितां येत होती तशी श्लोकवृत्तांत करितां येत नसे. मुक्तेश्वरानें श्लोकवृत्तांत रामायण रचिलें आहे. त्यांत ओंवी छंदांत प्रसन्न व प्रफुल्लित दिसणारी त्यांची कवित्वस्फूर्ति या बिकट छंदोबंधनांत सांपडल्यामुळें कीं काय अत्यंत म्लान झालेली दिसते. त्यांत ऱ्हस्वदीर्घादि चुकया, यमकास्तव शब्दांची ओढाताण, यतिभंगादि इतर छंदःशास्त्रीय व व्याकरणांतील दोष बरेच आढळत असून तें बऱ्याच ठिकाणीं दुर्बोधही झालें आहे. याच कारणास्तव हें काव्य बरेंच नीरस वाटतें. मोरोपंताचा असा प्रकार नाहीं. त्यांना आर्या जशा उत्कृष्ट रचितां येत असत, जवळ जवळ तितक्याच चांगल्या तऱ्हेनें त्यांना भिन्न भिन्न वृत्तांतील श्लोक, अभंग व ओव्या रचितां येत असत. पंतांच्या वाग्देवीला अनेक वृत्तरूपानें व अनेक बंधनें सांभाळून प्रकट होण्याची विलक्षण कसरत झाली असल्यामुळें व लांब संस्कृत समासाच्या बळावर वाटेल तसें आपलें अंग चोरावयास सांपडत असल्यामुळें

कोणत्याही वृत्तांत कोणत्याही विषयावर काव्य रचणें हें त्यांना हस्तोला आपल्या शुंडादंडावर माळ झेलण्याप्रमाणेंच सोपें वाटत असे. अशा रीतीनें अनेकवृत्तांत पंतांनीं प्रौढ, सुरस व विस्तृत काव्यरचना केली असल्यामुळें मुक्तेश्वरांतील व त्यांच्यांतील कवित्वासंबंधीं अंतर अगदीं कमी होऊन बरोबरी होते व महाराष्ट्र काव्यवधू आमच्या कविकुलगुरूचे अनेक गुण पाहून त्यांना माळ घालण्यास सज्ज होते.

## १० उपसंहार

प्रकाश म्हटला म्हणजे तेथें छाया असावयाचीच; त्याप्रमाणें पंतांचे वेळेस त्यांची कविता आवडीनें वाचणारी (वामनसुत) रघुनाथपंत कोळे, पांडुरंगभक्त नारायणभट्ट, अनंत नारायण बाबा, (इतर ठिकाणीं) विठ्ठल गोसावी, सदाशिव गोसावी, काशिनाथबावा पाध्ये रामजोशी इत्यादि मंडळी होती, तद्वत् प्राकृत म्हणून त्यांच्या काव्याची निर्भर्त्सना करणारी मंडळीही होती. त्यांच्या संबधानें पंतांनीं आपल्या काव्यांतून बऱ्याच ठिकाणीं फटकारे दिले असून आपल्या काव्याविषयीं अभिमानोक्ती प्रकट केल्या आहेत (परिशिष्ट-ऊ). एके ठिकाणीं पंत लिहितातः—

भक्तमयूरमनोनट नटतो सामान्य, की बरा नटतो, ।
श्रीरामचि हें जाणे, उरला व्यापूनि सर्वही घटतो. ॥ (राजापुर-२६)

पंतांनीं नामरसायनांत स्वरचित काव्यांपैकीं आपणास जीं उत्तम वाटतात, त्यांची नामावली दिली आहे. महाराष्ट्र वाचकांपैकीं ज्यांना पंतांचे समग्र ग्रंथ किंवा त्यांचे अठरापर्वें भारत वाचण्याची सवड नसेल त्यांनीं निदान तरी काव्यें वाचावीं म्हणून त्यांचीं नांवें पुढें दिलीं आहेतः-'हनुमन्नाटकाची बरोबरी करणारें' मन्त्ररामायण, कृष्णविजय, 'मणिगणीं खचित' प्रल्हादविजय,' 'सुधानंदीरसश' कुशलवचरित्र, संशयरत्नावली, साधुसत्कार, केकावली, नामसुधाचषक, रामनामार्या, आर्यामुक्तामाला व नामरसायन. अशा रीतीनें आपुलें आयुष्य महाराष्ट्रकवितेची अभिवृद्धि करण्याकडे खर्च करून पंत आपल्या वयाच्या ६५ व्या वर्षी शके १७१६ (चैत्र शुद्ध १५) आनंदनाम संवत्सरीं म्हणजे इसवी सन १७९४ त मरण पावले. शेवटीं, पंतांनीं मागितलेला पुढील वर त्यांना मिळावा म्हणून त्या सच्चिदानंद परमेश्वराची अनन्यभावें प्रार्थना करून आह्मी पंतांच्या ह्या अल्पचरित्राची येथेंच इतिश्री करितों:—

बोलूनि डोलवूं हा, डोलवितो जेंवि रसिकांस कार;
मग चिंता काय ? जडा वाटो याची सदैव धिक्कार. ॥ (सन्मनोरथ. २०)
भेटो रसिक, लवहि जो ग्रंथीं चषकांत नूरवि, प्राशी, ।
ऐसा वर दे वरदेश्वरचरणा ! या मयूरविप्राशी. ॥ (नामसुधा. १२०)

# 'केकावली'ची प्रस्तावना.

रामघनमयूर म्हणे निववालचि सुरसिकांसि **केका** हो!
सुबुद्धि म्हणे न सेविति मंद म्हणुनि झुरसि कांशिके! कां हो! ॥ (वन. १३. १०८)
ज्यांच्या वचनीं, चित्तीं, कर्मीं सर्वत्र कुशल भाव वसे, ।
या कृतिस तेचि गातिल सुकृती, वाल्मीकिकृतिस कुशलवसे. ॥ (स्वर्गारोहण. २.५७)

महाराष्ट्रकविश्रेष्ठ **मोरोपंत** यांनीं जीं कित्येक उत्तमोत्तम काव्यें रचिलीं त्यांतील प्रमुखांत या 'केकावलि' काव्याची गणना आहे. त्यांच्या भारतभागवतरामायणादि काव्यांत त्यांनीं मूळ संस्कृतग्रंथांतील वर्णनाचा थोडा बहुत उपयोग केला असून कथानकसूत्र तर सर्वस्वी मुळांतलेंच आहे. पण हें काव्य त्यांनीं अगदीं स्वतंत्र रीतीनें निर्माण केलें आहे. पंतांनीं अगदीं स्वतंत्रपणें अशीं बरींच स्फुट प्रकरणें रचिलीं आहेत तरी त्या सर्वांत 'केकावली'च्या तोडीचें दुसरें काव्य नाहीं. यांत कवीच्या प्रतिभेचा अत्यंत उत्कर्ष झालेला आढळतो. हें काव्य स्तोत्ररूपी असून यांत कवीनें स्वोद्धारार्थ 'दयामृतघन' परमेश्वराची अत्यंत सद्गदित अंतःकरणानें करुणा भाकिली आहे. 'भववनीं विपद्दवपावकानें' कवि मयूराची तनु पोळली असल्यामुळें त्यानें कारुण्यमेघ परमेश्वराजवळ स्वतापशमनार्थ जो करुणस्वरानें टाहो फोडला त्यांत कवीच्या अंतःकरणांतील सर्व वृत्ति क्षुब्ध होऊन सर्व हृद्गतविचार बाहेर पडले आहेत. याच गोष्टीमुळें हें छोटेसें काव्य इतकें रमणीय झालें आहे. मोरोपंतांनीं पुष्कळ काव्यरचना केली आहे ती न करितां त्यांनीं जरी एवढेंच काव्य निर्मिलें असतें तरी ते कवित्वसिंहासनावर आरूढ होऊन त्यांची कीर्ति अजरामर झाली असती. असलें सर्वोत्कृष्ट काव्य रचण्यास कवीच्या मनावर संस्कार कोणचा झाला, व त्यांना कवित्वस्फूर्ति कोठून आली, असा प्रश्न हें काव्य अमळ लक्ष्यपूर्वक वाचलें असतां वाचकांस सुचतो. त्यांतील प्रतिपादित विषय, त्यांत निर्दिष्ट केलेल्या कथा, भक्तिरसाचा अस्खलित ओघ इत्यादि गोष्टींचा सूक्ष्मपणें विचार करणारास त्याचें उत्तर सहज देतां येईल. पंतांनीं आपल्या मोटमोठ्या काव्यांच्या आरंभीं नमनरूपी जें मंगलाचरण केलें आहे त्यावरून व्यास व वाल्मीक ह्या 'पुराण' कवींचा त्यांच्या बाकीच्या काव्यरचनेवरच नव्हे तर 'केकावली'वरही मोठाच संस्कार झाला असें दिसून येईल. ह्या काव्यांत रामायणभारतभागवतांतील कथांचा जो वारंवार उल्लेख केला आहे व व्यासाची जी स्तुति केली आहे त्यावरून ह्या म्हणण्यास विशेष बळकटी येते. तसेंच 'केकावलि' काव्य रचावयाच्या पूर्वी पंतांनीं पंडित जगन्नाथरायाच्या कांहीं **'लहरी'**ही वाचल्या किंवा ऐकल्या असाव्यात असा त्यांतील विषयसाम्य व किंचित् विचारसाम्य यावरून कांहीं जणांचा तर्क आहे. आतां या काव्यांत भक्तिनदीचा जो महापूर गंभीर घोष करितांना

आढळतो त्याचें कारण केवळ 'वाचमर्थोऽनुधावति' अशा योग्यतेच्या 'पुराणकवी'चे ग्रंथच नसून भक्तिमार्गाचा अथवा भागवतधर्माचा खरोखर प्रचार पाडण्यास काया वाचामनेंकरून झटणाऱ्या ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास, तुकाराम यांसारख्या अर्वाचीन संतकवींची प्रेमरसभरित कविता होय. किंबहुना पंतांच्या मनावर पहिल्या, पेक्षां दुसऱ्याच मंडळीचा व त्यांतही साधु तुकारामाच्या अभंगवाणीचा विशेष परिणाम झाला असें म्हणण्यास चिंता नाहीं. 'केकावली' वरील टीपांत अर्थसादृश्याचे जे उतारे दिले आहेत व 'सन्मणिमाला' व इतर स्फुटप्रकरणांत पंतांनीं या संतमंडळीचा जो गौरव केला आहे त्यावरून ह्या विधानाची सत्यता बरीच कळून येईल. हें काव्य इतकें सरस, प्रौढ व चेतोहर बनण्याचें दुसरें कारण कवीनें तें आपल्या उत्तरवयांत व तेंही अगदीं शेवटीं शेवटीं रचिलें हें होय. पंतांनीं स्फुटप्रकरणांपैकीं पुष्कळ प्रकरणें आपल्या उत्तरवयांत रचिलीं असावीं असें त्यांतील भाषापद्धतीवरून व इतर मजकुरावरून वाटतें. त्यापैकींही हें काव्य अलिकडचेंच असावें असें अंतःप्रमाणांवरून कळतें. केका १० तील 'गंगेची उक्ति', केका ११ तील 'अनेक देवांस वारंवार शरण जाणें,' केका ३२, ३३ तील 'साधुजनांची स्तुतिग्रहणपराङ्मुखता व तत्कृत भगवद्गुणवर्णन' यावरून साधुसंतांच्या स्तुतिपर कविता केल्यानंतर 'केकावलि' काव्य रचिलें असा कवीचा गुप्त अभिप्राय व केका ४६, ४७ तील 'स्ववृद्धावस्थेचें कवीनें केलेलें वर्णन व मरणापूर्वी माझा उद्धार करा अशी भगवंतास केलेली प्रार्थना' ह्यावरून कवीनें काशी यात्रा केल्यावर कांहीं दिवसांनीं म्हणूनच अगदीं शेवटीं शेवटीं हें काव्य रचिलें असावें असें वाटतें. 'केकावलि' काव्यांत पंतांच्या एकंदर काव्यांतील बहुतेक गुण ठळकपणें आढळतात. हें काव्य इतकें सुरस उतरलें आहे कीं मोरोपंतांच्या ज्या दोन काव्यांवर संस्कृतांत टीका झाल्या आहेत त्यांत मंत्रभागवत हें एक काव्य असून दुसरें काव्य सदर 'केकावली' हें होय. मुंबईग्रंथसंग्रहालयांत ह्या टीकेची हस्तलिखित प्रत आहे. टीका थोडी लहान पण चांगली आहे. यास्तव त्यांच्या काव्यमुधेची ज्यांना थोडक्यांत चव घ्यावयाची असेल त्यांनीं हें काव्य वाचावें. पंतांचें यमकचातुर्य मात्र हें काव्य श्लोकबद्ध असल्यामुळें फारसें आढळणार नाहीं. तरी तिचा थोडाबहुत मासला यांत पहावयास सांपडेल. आतां या काव्यांतील प्रमुखगुण व विशेष गोष्टी म्हटल्या म्हणजे पुढील होत:—

(१) **भाषाप्रौढी व अर्थप्रौढी.** 'गीर्वाण शब्द पुष्कळ, जनपद भाषाचि दिसतां थोडी' असें पंतांनीं 'मंत्ररामायणा'च्या उपोद्घातांत आपल्या कवितेचें जे वर्णन केलें आहे तें यथार्थ होय असें हें काव्य वाचून समजेल. संस्कृतशब्दप्राचुर्यामुळें व दीर्घ समासांमुळें भाषेला प्रौढत्व आलें आहे. कांहीं केका तर जवळ जवळ सबंध संस्कृतच आहेत व पुष्कळांचीं संस्कृत भाषांतरें अल्प प्रयासानें करितां येतील इतक्या त्या संस्कृतशब्दप्रचुर आहेत. केका ४६ चें संस्कृत भाषांतर टीपेंत दिलें आहे तें पहावें. अर्थाच्या प्रौढतेसंबंधानें कोणच्याही चार केका वाचून पाहिल्या म्हणजे खात्री होईल. लांब समासाचीं कांहीं निवडक उदाहरणें पहा:—'गदारिदरनंदकांबुजधरा'

(केका १), 'कवीश्वरमनःपयोनिधिसुतारतुति' (के० ३२), 'समुज्वलदयासुधासीकर' (के० ३७), 'सुदुस्तरविपन्नदीसेतु' (के० ४२), 'अतिदुःसहस्वगदशत्रु' (के० ४४), 'कृतांतकटकामलध्वजजरा' (के० ४६), 'जगत्त्रयनमस्क्रियाभाजन' (के० ६३), 'मितामिताभिदनदीसदोघ'(के० १०६), 'अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला' (के०११०), 'बृहदुदारलीलाकर' (के० ४३). शिवाय केका १,२,६,१०,१६,१७,१९,२४, ३३,३४,३६,३८,४२,४५,४९,६१,८०;८३,९२,९५ इत्यादि पद्य. तसेंच पंतांनीं आपल्या इतर काव्यांप्रमाणें यांतही परक्या भाषेंतील शब्दांचा उपयोग करून भाषेस जास्त प्रौढता व सघनता आणलेली आढळते. या लहानशा काव्यांत परक्या भाषेंतील सुमारें १२ शब्द आले आहेत. हवाला (के० १५), दावा (के० २१), सोमल (के० १०३) हे तीन आरबी शब्द, मर्द (के० ४३), बरोबरी (के० ६४), दर्द (के० ९७), मिरवणें (के० ५१) हे चार फारशी शब्द व खासदार (के० ७), चाकर (के० ६७), लुचा (के० ७२), धोपटणें (के० ८५), तोटा (के० ९७) हे पांच हिंदुस्थानी भाषेंतील शब्द आहेत.

(२) **अलंकारवैपुल्य.** यांत अर्थालंकार विपुल आहेत. बहुशः प्रत्येक केकेंत एखाददुसरा ठळक अलंकार दृष्टीस पडतो. 'केकावली'काव्यांत पुष्कळच अर्थालंकार आले आहेत. ही गोष्ट पुस्तणी ३ पद्यांवरून कळून येईल. अनुप्रास, श्लेष वगैरे शब्दालंकारांचा भरणा बराच आहे. अनुप्रासाचीं उदाहरणें केका १,२३,३५,४९, ६२,९५,११८,११९ इत्यादि पद्य. केका २१,८४,९२ हीं यमकालंकाराचीं उदाहरणें. २१ या केकेंत नवाक्षरी यमक आहे. केका ११८,११९ त पुष्पयमक आहे. या काव्यांत सुमारें २५ निरनिराळ्या शब्दांवर कवीनें शब्दश्लेषांची व अर्थश्लेषांची योजना केलेली आढळते. त्यांपैकीं बहुतेकांचा उल्लेख टीपांत केला आहे. पुढील शब्दांवर श्लेषयोजना केलेली आहे:—(१) सुदुर्धर, उद्धरा, पतित, (के०५), समुद्रगमि (के० ४३), (२) काढिल्या (के० ७), (३) अमृत (के० ३१,४१,९०. ९१,१०४,१०५), (४) निजात्मजाग्रहविमुक्त (के० ३३), (५) हरिमनोहराकृति (के० ३६), हरि (के० १२१). (६) जडाभि (के० ४३,७६), (७) गदांसवें (के० ४६), (८) वन (के० ४८), (९) नव सुधानवद्या (के० ५१), (१०) सदंड (के० ५४), (११) परस्वा (के० ५७), (१२) रस (के० ५७,५८,१०१), (१३) मल (के० ५८), (१४) वत्स (के० ५८), (१५) ध्रुव (के० ६५), (१६) वरासवें (के० ६८), (१७) मयूर (के० ७०,१२२), (१८) छळ (के० ७५), (१९) अधोगती (के० ७५), (२०) बळी (के० ७६), (२१) संचितें (के० १०५), (२२) राम (के० १२२), (२३) गुरु (के० १२२), (२४) रानट (के० १२२), (२५) कवि (के० १२२). **मोरोपंतांच्या 'केकावलीं'तील श्लोकांचे एकापेक्षां जास्त अर्थ होतात असा पुष्कळ लोकांचा पूर्वी समज होता व अजूनही कित्येक हरदास'**

पुराणीक लोकांचा तसा समज असल्याचें दिसून येतें. परंतु हा समज सर्वस्वी निराधार आहे. कै० रावबहादुर दादोबा पांडुरंग यांनीं पहिल्या व इतर कांहीं केकांच्या चरणांचे दोन दोन अर्थ केले आहेत, त्यावरून ही गैरसमजूत पुष्कळ लोकांच्या मनांत बाणली असावी असें वाटतें. पण ते अर्थ किती ओढून ताणून बसविले आहेत त्याकडे पुष्कळांचें लक्ष गेलें नाहीं. पंडितलोकांची श्लेषप्रीति शेंकडो वर्षांपासून प्रसिद्ध आहे. पंतांच्या काव्यांची जेव्हां चहूंकडे प्रसिद्धि झाली तेव्हां पांडित्याचा एक मोटा आधार जी श्लेषप्रीति ती पंतांच्या काव्यांत असेल असें समजून हरदास, पुराणीक, पंतांच्या काव्यांत श्लेष हुडकूं लागले व एकाक्षरी द्व्यक्षरी कोशांच्या साह्यानें पंतांच्या साध्या कवितेच्या ते चिंधड्या उडवूं लागले. ‘कृष्णानुजा सुभद्रा’ इ०, ‘आर्या आर्यांसि रुचे’ इ०. ह्या साध्या आर्यांचें अनेकार्थत्व कोणत्या प्रकारचें आहे हें ‘निबंधमाला’वाचकांस विश्रुतच आहे. ‘प्रत्यक्षरश्लेषमयप्रबंधविन्यासवैदग्ध्यनिधिर्निबंधम्’ अशा प्रकारच्या श्लेषरचनेस मान डोलविणाऱ्या पंडितांच्या अनुयायांनीं ‘केकावली’ व इतर पंतांच्या कवितेंत अनेक अर्थ धुंडणें यांत आश्चर्य कसचें ?

(३) **खुबीदार शब्दयोजना.** बहुतेक केकांतील बहुतेक शब्द मोठ्या मार्मिकतेनें योजिलेले आढळतात. यांचीं उदाहरणें: सुरभि, जगन्नायकीं (के० ४), कन्यका (के १०), (के० १२), वरद, वत्सल, श्रीकरा (के० १३), करुणार्णवा (के० २०), परम चांगले बहुमर्म, दाते इ० (के० २९), हितकरा दयासागरा (के० ३०), स्वरिपुची, तर्षा, वटिक (के० ३२), सुनय, आम (के० ३८), (के० ३९), प्रभुवरा (के० ४७), बृहदुदारलीलाकरें (के० ४३), (के० ५८), उद्धरें (के० ५९), स्वभक्तसुरपादपा (के० ६१), पराक्रमपटो (के० ६२), प्रसादचतुर (के० ६३), योगमायाधवा (के० ७४), आटला (के० ७६), जगत्त्रयमनोहरा, बलगुणैकरत्नाकरा (के० ८३), अमाधुला (के० ९३), प्रतिक्षण, नवीच, सुकाहि, संन्यासिया (के० १००). नारदा (के० ११२), स्वभक्तसुरपादपा (के० ११३), जगद्गुरुमहेश्वर इ० (के० ११८), के० ११९) इत्यादि. काव्यरसिकांस पंतांची कवितावधू अशाच प्रकारच्या आपल्या अंगच्या गुणांमुळें ‘प्रतिक्षणीं नवीच रुचि देते.’

(४)**केकावलीचा सूचकपणा.** वाचकांस या काव्यांतील पौराणिक दृष्टांत वाचून शेंकडो प्रसंग आठवतात. कित्येक गोष्टी सुचतात व चमत्कृतिजनक व आनंददायी असे भिन्न भिन्न देखावे दिसतात. प्रसिद्ध इंग्रज टीकाकार मेकॉले यानें आंग्लकविश्रेष्ठ मिल्टन याच्या Paradise Lost इत्यादि काव्यांसंबंधीं पुढील वाक्यांत जें म्हटलें आहे तें पंतांच्या ‘केकावली’स चांगलें लागतें:—“The most striking characteristic of the poetry of Milton is the extreme remoteness of the associations by means of which it acts on the reader. Its effect is produced not so much by what it

expresses, as by what it suggests: not so much by the ideas which it directly conveys, as by other ideas which are connected with them. He electrifies the mind through conductors. The works of Milton cannot be comprehended or enjoyed, unless the mind of the reader co-operates with that of the writer."

पंतांच्या 'केकावली'तला हा सूचकपणा चांगला कळण्यास व त्यापासून मनरंजन होण्यास वाचकांस पुराणेतिहासांतील कथांची चांगली माहिती पाहिजे. ह्या छोट्याशा काव्यांत रामायण, भारत, भागवत, ब्रह्मोत्तरखंड, ब्रह्मवैवर्त, इत्यादि पुराणेतिहासिक ग्रंथांतील अनेक कथांचा उल्लेख झाला आहे. त्यांची माहिती झाली तरच त्या त्या केकांचें स्वारस्य वाचकांस कळून येईल. ख्रिस्ती शास्त्रांतील कथांची माहिती नसणारांस मिल्टनचें 'प्यारडाइज लास्ट' (नंदनवन हरपलें) किंवा 'प्यारडाइज़ रीगेन्ड' (नंदनवन पुनः मिळालें) हीं काव्यें जशीं गोड लागणार नाहींत व त्यांतील स्वारस्य त्यांना कळणार नाहीं, त्याचप्रमाणें पुराणेतिहासिक कथांची माहिती नसणाऱ्या वाचकांना 'केकावली'चा बराच भाग आवडणार नाहीं व त्यांतील स्वारस्य त्यांना कळणार नाहीं. केकावलीच्या सूचकपणाचीं उदाहरणें पाहणें असल्यास केका २,५,७,८,१७,१९, २१,२४,३०,३४ ३९,४२,५१,५४,५५,६२,६८,६९,७१ ७४,७६,७७, ८०-८८,९०,९१,१००,१०२ १०५,१०९,११२ ११५ पहा. या कथांसंबंधीं एक गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी आहे, ती ही कीं, या काव्यांत ईश्वराची वत्सलता, भक्तावरील त्याचें प्रेम, त्याची पतितपावनता, साधुपरित्राण, दुष्टजनशासन इत्यादि गुण वर्णन करितांना जेवढे दृष्टांत योजले आहेत तेवढे सर्व प्राचीन पुराणेतिहासिक ग्रंथांतून घेतले आहेत. इतर स्फुट प्रकरणांत अर्वाचीन संतचरित्रांतील कथांचा उल्लेख केला आहे; तसा प्रकार या काव्यांत केला नाहीं.

(५) ईश्वराची ऐकांतिक भक्ति. ह्या काव्यांत तीर्थें व इतर देव यांचा अव्हेर करून पंत सर्वश्रेष्ठ अशा एकाच देवाला अनन्यभावानें शरण जाऊन आपल्या उद्धाराचा सर्व भार त्यांनीं त्याजवरच टाकिला आहे. यांत विष्णु व शंकर अशा दोन देवांचा जरी उल्लेख केलेला आहे तरी ते भिन्न नसून एकरूपच आहेत असें केका ७१ ७२ मध्यें कवीनें फार सरसपणें वर्णिलें आहे. 'जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं नांदणारी, भगवच्चरणकन्यका भागीरथी देखील मला पतिताला पाहून भ्याली, इतर देवांच्या पायांशीं डोकें घासून घासून जरी त्याला घट्टे पडले तरी माझा उद्धार करण्यास ते समर्थ झाले नाहींत, मला आतां आपल्या पायांशिवाय इतर कोणी तारणारा उरला नाहीं, म्हणून मी देवा! तुम्हांला शरण आलों आहें' असें म्हणण्यांत कवीनें दुरिततिमिरनाशाविषयीं तीर्थें व दैवतें यांचें असामर्थ्य सुचवून, मुख्य देवाधिदेव परमेश्वराला अनन्यभावानें शरण जाण्यांत व त्याची ऐकांतिक भक्ति करण्यांतच पतितांचें खरें

चिरंतन कल्याण आहे असें स्पष्ट दर्शविलें आहे. तसेंच केका ३०-३२ त परमेश्वराचा अधिकार साधुसंतांच्या अधिकारापेक्षां सहस्रपटीनें मोठा आहे, यास्तव साधुसंतांचें स्तवन न करितां परमेश्वराचें स्तवन करावें; स्तुति साधुसंतांना शोभत नाहीं व पचत नाहीं, ती परमेश्वरालाच साजते व पचते, म्हणून 'स्तुती करावी परमेश्वराची। करूं नये व्यर्थ कधीं नराची. ॥' असा यथार्थ अभिप्राय कवीनें दर्शविला आहे. इतर कवींनीं आपल्या काव्यांतून व पंतांनींही इतर स्फुट प्रकरणांतून साधुसंतांचें अतिशय महत्त्व वर्णून त्यांना देवापेक्षांही जास्त मान दिलेला आहे. पण ३० व्या केकेंत भगवद्भक्तांना आपली स्तुति आवडत नाहीं, आपली स्तुति करणाऱ्या माणसांना ते 'आह्मी स्तुतीस पात्र नाहीं, तुम्ही भगवंताची स्तुति करा' असें सांगतात म्हणून वर्णन केलें आहे; व हा त्यांचा अभिप्राय यथार्थ, सर्वमान्य होण्याजोगा व वरच्या पायरीचा असा आहे. तसेंच भगवत्स्तुति हाच काव्याचा खरा विषय असें ३२ व्या केकेंत कवीनें स्पष्ट सांगितलें आहे. 'मंत्रभागवता'च्या एका गीतींत पुढील बाणेदार उद्गार आढळतो तोही यासंबंधानें संस्मरणीय होय:—'सुयश न जयांत हरिचें चित्रहि गुणभवन कवन तें अशुचीः। त्यांत सुमति नर न रमति पळही, बहु मानिती तया पशुची. ॥.' पंतांनीं कविता केली ती परमेश्वराचे गुण वर्णन करण्याकरितां नसून स्वतःस यशोलाभ व्हावा म्हणून रचिली ह्या आक्षेपास वर निर्दिष्ट केलेल्या केकांत, वरील गीतींत व पंतांच्या एकंदर कवितेंत उत्तम उत्तर सांपडतें. सारांश गीतेंत परमात्म्यांनीं अर्जुनास 'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु। मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥' या व इतर श्लोकांत जें भक्तीचें सकल रहस्य सांगितलें आहे त्याचाच अनुवाद पंतांनीं ह्या काव्यांत केला आहे.

(६) **भक्तिमार्गाचें प्राधान्य.** या काव्यांत जपतप, दानधर्म, योगयाग इत्यादि मार्गापेक्षां भक्तिमार्गाचें फार महत्त्व वर्णिलें आहे. गीतेप्रमाणेंच यांतही कर्मयोग व ज्ञानयोग यांची पायरी भक्तियोगाच्या खालचीच मानलेली आढळते. कृष्णानें केलेली अर्जुनाची सोतदारी, धर्मराजाच्या यज्ञांत त्यानें ब्राह्मणांच्या पत्रावळी काढणें, 'कंसदासी कुब्जेचा स्वीकार, 'पृथुकतंदुलप्रसृति'स्वीकार, विदुरमंदिरीं कण्या खाणें, शबरीनें दिलेलीं बोरें खाणें, शुक प्रल्हाद नारद यांची भक्ति, इत्यादि गोष्टी भक्तिमार्गाचेंच प्राधान्य दाखवितात. केका ११४ त नारदानें योगयागादि मार्गापेक्षां भक्तिमार्ग श्रेयस्कर असें म्हटलें आहे; व केका ५८ व १०० त भगवत्कथेचें महात्म्य वर्णिलें आहे. या दोन गोष्टींवरून वरील म्हणण्यासच बळकटी येते. भक्तिरसाचा स्वाद ह्या काव्यांत फार चांगला अनुभवास येतो. तो इतका कीं भक्तिरसाचा मकरंद जसा काय ह्या काव्यांतून थबथबत असून रसिकमिलिंदाची वाटच पहात आहे. ईश्वराची पतितपावनता, अत्यंत सदयता, भक्तजनांवरील त्याचें उत्कट प्रेम, क्षमाशीलता व

सर्वसाक्षित्व हे गुण उत्कृष्ट रीतीनें यांत वर्णिलेले आहेत. या सर्वांत विशेष गोष्ट ही कीं, देवाची कृपा सुष्टांप्रमाणें दुष्टांवरही असते. त्यांच्या दुष्टपणाबद्दल त्यांना शासन करून पुनरपि तो त्यांना सद्गतीच देतो, दुर्गति देत नाहीं' हें अतिशय उदात्त तत्व पंतांनीं ह्या काव्यांत केका ८९-९२ त उत्तम रीतीनें प्रतिपादिलें आहे. आमच्या ह्या कवीच्या काव्यांत भक्तिरसाचा पूर प्रसंगविशेषीं इतका उद्दाम झालेला आहे कीं भागवतकार व अर्वाचीन संतमंडळी यांच्या भक्तिनदाप्रमाणें तो मध्यें मध्यें योग्यमर्यादेचें अतिक्रमण करून बराच पुढें गेलेला आढळतो. भक्त व देव यांचा संबंध अतिशय निकट आहे असें अद्वैतमतान्वयें वर्णन करितांना जागोजागीं ईश्वराशीं अति प्रसंग केलेला व त्याजवर कोटी लढविलेल्या आढळतें. या देवभक्तांमधील अतिशय सलगीमुळें कांहीं थोड्या स्थळीं फाजील शृंगाररसाचा थोडासा शिडकावा उडलेला आहे त्याबद्दल केकावलि पृ० ५७ मध्यें विचार केला आहे. एका ठिकाणीं (के० ३९) भक्तीचें वर्णन करितांना कांहींना अतिरिक्त वर्णन झाल्याचा भास होईल, त्या व इतर गोष्टींसंबंधानें येथें वेगळें न लिहितां आह्मी २८ व्या केकेवरील टिपेवरच हवाला देतों. वरील दोष वजा करून पाहिलें असतां ह्या काव्यांत ईश्वराचें स्वरूप फार यथार्थपणानें दाखविलेलें आढळेल. देवाच्या पतितपावनतेसंबंधीं पंतांचा अभिप्राय फार सुसंस्कृत असून ह्यांत त्यांनीं आपलें भक्तिसर्वस्व प्रकट केलें आहे. तसें करितांना कांहीं जागीं परमेश्वराला आपलें आयुष्य देणें वगैरे हास्यास्पद विचार आढळतात. त्यांचा तार्किकदृष्ट्या विचार न करितां काव्यदृष्ट्या विचार करावा ह्मणजे वाचकांना ते फारच गोड लागतील. याविषयीं मेकॉलेनें आपल्या एका निबंधांत पुढील उद्गार काढिला आहे:

"Perhaps no person can be a poet, or can even enjoy poetry, without certain unsoundness of mind, if anything which gives so much pleasure ought to be called unsoundness. Truth, indeed, is essential to poetry, but it is the truth of madness. The reasonings are just: but the premises are false. After the first suppositions have been made, everything ought to be consistent but these first suppositions require a degree of credulity which almost amounts to a partial and temporary derangement of the intellect."

सारांश मनाचें रंजन करणें हा एक कवितेचा मुख्य हेतु आहे. तो साधण्यास कवीला जशा कांहीं कल्पना योजाव्या लागतात, तशा प्रकारचा कांहीं भ्रम वाचणाऱ्याच्याही मनावर कांहीं वेळ असावा लागतो. ह्मणून काव्याचा उपभोग घेण्यास ह्मणजे त्याच्या योगानें चित्तास रंजविण्यास मनुष्यानें आपलें कांहीं ज्ञान कांहीं वेळ विसरलें पाहिजे. (पृ० १३४–१३५. टीप ४. 'काव्यांतील भ्रामक कल्पना व काव्यानंद' हा विषय पहावा.)

उत्कर्ष झालेला आहे. ५३-५८ ह्या सहा केकांत भगवत्कथा व विषयवासना यांचें फार सुंदर वर्णन केलें आहे. त्यांतील रसपरिपाक पहिल्या प्रतीचा उतरला आहे. ५९, ६० यांत कवीनें काव्यचमत्कृति करून आपल्या काव्यनिंदकांस जो टोमणा मारिला आहे, त्यांतील व्याजोक्ति फार खोंचदार आहे. यापुढील पांच केकांत ध्रुवाप्रमाणे मला कृतार्थ करा अशी प्रार्थना करितांना कवीनें जे विचार प्रदर्शित केले आहेत ते बहुमोल आहेत. ६५ व्या केकेंत ध्रुवाची योग्यता व स्वतःचा करंटेपणा यांचें चटकदार वर्णन आहे. पुढील पद्यांतील प्रभुत्व व प्रसाद यांच्या व्याख्या फार चित्ताकर्षक असून त्याचप्रमाणेच पुढल्या म्हणजे ६७ व्या केकेंत दात्यानें दान देतांना कोणकोणत्या गोष्टींचा विचार अवश्य केला पाहिजे, याविषयींचे उद्गार अत्यंत मार्मिक आहेत. ६८,६९ केकांत सत्पात्रीं व असत्पात्रीं केलेल्या वरदानाचीं उदाहरणें वरील विचारांच्या समर्थनार्थ योजिलेलीं आहेत. पुढील दोन केकांत शिवविष्णूंचा अभेद सुंदर रीतीनें वर्णिला आहे. ७३ व्या केकेंत त्यागाची योग्यता वर्णून, ७४, ७५ यांत कवीनें भगवद्दासमाहात्म्याचें सुरस वर्णन केलें आहे. ७६,७७ त वामनावतारांतील कथाभाग आणिला असून त्याच्या पुढील दोन पद्यांत बळीप्रमाणें माझी परीक्षा करूं नका, असें सांगतांना कर्ममार्गापेक्षां भक्तिमार्गाचें प्राधान्य सुचविलें आहे. ८०-८४ त्यांत रामजन्मापासून सीताहरणापर्यंतचा बहुतेक कथाभाग मोठ्या खुबीदार शब्दांनीं कवीनें गोंविला आहे. यांतील बहुतेक पद्यें अर्थपूर्ण आहेत. हीं पद्यें 'केकावलीं'च्या सुरसपणाचीं चांगलीं उदाहरणें आहेत. ८५ व्या केकेंत 'न जें प्रिय, सदोष तें प्रिय सदोषही चांगलें' हा व्यवहारांतला अनुभव सांगून त्यांत व पुढल्या २ केकांत कृष्णावतारांतील कथांनीं त्याचें कवीनें समर्थन केलें आहे. ८८-९८ ह्या अकरा केकांत कवीनें भगवंताचें अनुपम सख्यत्व अत्युत्कृष्ट रीतीनें वर्णिलें आहे. भगवंताच्या ह्या दयागुणाचें वर्णन पंतांना अतिशय उत्तम साधलें आहे. ईश्वर दुष्टांचा संहार त्यांच्या कल्याणास्तवच करितो, हें ८९-९२ ह्या चार केकांत वर्णिलेलें आध्यात्मिक तत्त्व धर्मविचाराच्या अगदीं शेवटच्या पायरीस पोंचलेल्या लोकांस संमत असून ते त्याची गणना पहिल्या प्रतीच्या धर्मतत्त्वांत करितात. ९३ ९४ ह्या केकांत भगवंताचें सदय पितृत्व वर्णितांना पित्याला कोणता पुत्र आवडतो त्याचें सुरस वर्णन आहे. पुढील केकेंतील मातृमहिमा तर सर्व वाचकांस मोहून टाकील, इतका तो सुंदर वठला आहे. ईश्वराची दया मातेच्या दयेपेक्षांही जास्त आहे, ईश्वराची कृपा हीच आमची खरी माता, आमच्या आया ह्या त्या कृपाजननीनें ठेवलेल्या दाया आहेत—हे उदात्त विचार ९६-९७ ह्या केकांत आमच्या ह्या कवीच्या प्रतिभेंतून उतरले आहेत. ९९ व्या केकेंत भगवंताच्या कृतज्ञतेचें सुरेख वर्णन

आहे. १००-१०१ मधील भगवत्कथेचें वर्णन फार बहारीचें आहे. १०३-१०७ ह्या पांच केकांत कथेची मोहिनीशीं तुलना करून कथेला श्रेष्ठत्व दिलें आहे. तो भाग फार वाचण्यासारखा आहे. १०६ तील व्यावहारिक दृष्टांत फार सरस व समर्पक आहे. १०९ व्या केकेंत गंगेचें मुख्य वर्णन केलें आहे. त्यांतील पहिले दोन चरण तर फार सुरेख वठले आहेत. १११-११५ केकांत भगवत्कथेचें माहात्म्य आणखी वर्णिलें आहे. ११२-११५ तील कथामहत्त्वासंबंधी दिलेली नारदाची साक्ष फार महत्त्वाची आहे. केका ११४ यांत 'योगादि साधनांपेक्षां भगवद्गुणवर्णनच अधिक श्रेयस्कर म्हणून मी आपल्या आत्म्याला सांगेन' असा देवर्षि नारदांचा अभिप्राय देऊन भक्तिमार्गाची थोरवी उत्तमरीतीनें सांगितली आहे व त्याच्या पुष्टयर्थ पुढील पद्यांत नारदाच्या पूर्वजन्मींच्या कथेचा उल्लेख केला आहे, तो सरस आहे. केका ११६-११७ यांत सत्संगतीचा महिमा मार्मिक दृष्टांत योजून वर्णिला. त्यांतील वर्णन फार चटकदार उतरलें आहे. या पुढील दोन केकांत पंतांनीं परमेश्वरापाशीं जें वरदान मागितलें आहे तें गरीब धनाढ्य, सर्व जातींच्या, लहानथोर, स्त्रीपुरुष असा सर्व मंडळींनीं नित्य देवापाशीं मागावें, इतकें तें अत्युत्कृष्ट व सर्वसाधारण आहे. केका १२० त भगवन्नामामध्यें आपला मुलगा सदोदित राहो असा वर कवीनें देवाजवळ मागितला आहे. मरणोन्मुखतां मूल रडूं लागलें असतां आई जशी त्याच्या दुःखानें कळवळून त्याला कडेवर घेऊन समजाविते त्याप्रमाणें भववनीं त्रितापानें पोळलेल्या भक्तमयूरावर दयामृताची वृष्टि करावी म्हणून दयाघन परमेश्वराची कळकळीनें प्रार्थना करून नामामृताचा प्रियसखा व गुरु जो दाशरथि राम त्याचें मांगल्यसूचकस्मरणपूर्वक कवीनें या ग्रंथाची इतिश्री केली. वर आम्हीं 'केकावली'तील बहुतेक सुंदर स्थळें थोडक्यांत स्पष्ट करून दाखविण्याचा यत्न केला आहे. हें व पंतांचीं इतर काव्यें वारंवार वाचून सहृदयांस प्रत्येक वेळीं त्यांतील जास्त खुब्या व सुंदर काव्यगुण आढळून येऊन पंतांनीं आपल्या एका काव्यांत काढलेल्या पुढील उद्गाराच्या सत्यतेविषयीं त्यांची पूर्ण खात्री होईल: —

जसे होती देव प्रमुदित शचीनायकवनीं ।
तसे आनंदानें बुधजन मयूरेशकवनीं.

## काव्यवृत्त.

जसें कालिदासाचें आवडतें वृत्त मंदाक्रांता, भवभूतीचें शिखरिणी, भारवीचें वंशस्थ, पुराणकवि व्यास वाल्मीक यांचें अनुष्टुभ्, तसें मोरोपंतांचें आवडतें वृत्त गीतिछंद होय. यालाच पंत आर्या म्हणत. या वृत्ताच्या स्तुतिपर पंतांनीं आपल्या काव्यांतून बऱ्याच ठिकाणीं उल्लेख केला आहे. (परिशिष्ट 'इ' पहा.) याची योजना पंतांच्या पूर्वीं मराठी काव्यांतून फारशी कोणी केली नसून पंतांनींच तिला उदयास आणून तिचा प्रचार पाडला. याविषयीं 'नाममुधाचपकां'त पंतांनीं आठ नऊ आर्या रचिल्या आहेत. त्यांतील एक अशी:—

> प्रकटी प्रथम भगीरथ नृप लोकीं सुरनदी सती आर्या ।
> तति हे,मयूर नाहीं तरि सर्वांला न दीसती आर्या ॥ १११ ॥.

पंतांचे बहुतेक ग्रंथ ह्याच वृत्तांत रचिले आहेत. पंतांची श्लोकबद्ध कविताही बरीच असून ती भिन्न भिन्न वृत्तांत गुंफलेली आहे. 'केकावली' नांवाचीं पंतांचीं दोन काव्यें आहेत. त्यांपैकीं एक आर्याबद्ध असून दुसरें प्रस्तुत काव्य होय. हें पृथ्वीछंदांत रचिलेलें आहे. काव्यनियमास अनुसरून यांतील अंतिम श्लोक मात्र त्यांनीं भिन्न वृत्तांत म्हणजे स्रग्धराछंदांत रचिला आहे. ह्या दोन्ही वृत्तांचीं लक्षणें केकावलींतील प्रथम व अंतिम श्लोकांत संस्कृत वृत्तग्रंथांतून दिलीं आहेत. पृथ्वीछंदाचें लक्षण 'ज सा ज स य ला गज-ग्रह विराम पृथ्वी गुरु' असें वृत्तमणिमालेंत दिलें. ज, स, ज, स, य हे गण व पुढें लघु व गुरु अशीं दोन अक्षरें. चरणांतील आठव्या व त्याच्या पुढील नवव्या म्हणजे शेवटच्या अक्षरावर यति असतो. (कारण गज—दिग्गज आठ असून ग्रह नऊ आहेत.) जसें:—

सदाश्रि तपदा सदाशि वमना विनोदा स्प दा

ज स ज स य ल ग

स्रग्धराछंदाचें लक्षण 'शैलीं शैलीं यतींतें म र भ न य य या जाण या स्रग्धरा ते'. म, र, भ, न व ३ य हे गण व प्रत्येक सातव्या अक्षरावर यति (कारण शैल म्हणजे पर्वत सप्तकुलाचल—हे सात आहेत) असतो. जसें:—

कारुण्यां भोदरा मप्रिये सखेगु रुहीजो मयूरा नटाचा

म र भ न य य य

पृथ्वी हें वृत्त कारुण्यजनक व औत्सुक्यदर्शक समजून कवीनें अत्यंत समीचीन म्हणून ह्या स्तोत्रकाव्यांत योजिलें आहे असें वाटतें. ह्याच वृत्तांत पंतांनीं एक सबंध रामायणही लिहिलें आहे. त्याचें नांव पृथ्वीरामायण असें असून काव्यसंग्रहांत तें छापून प्रसिद्ध झालें आहे.

# केकावलि.



( मंगलाचरण. )

सदाश्रितपदा ! सदाशिवमनोविनोदास्पदा !
स्वदासवशमानसा ! कलिमलांतका ! कामदा ! ।
वदान्यजनसद्गुरो ! प्रशमितामितास्मन्मदा !
गदारिदरनंदकांबुजधरा ! नमस्ते सदा. ॥ १

( पदरजवर्णन. )

पदाब्जरज जें तुझें सकलपावनाधार तें,
अघाचलहि तारिले बहु तुवांचि राधारतें; ।
अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी, पिंगळा,
अशां गति दिली; उरे न तृण भेटतां इंगळा. ॥ २
तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें;
न तें अनृत, वर्णिती बुध जनीं सदाचार जें; ।
असे सतत ऐकते, सतत बोलते, मीच ते
प्रमाण न म्हणों जरी उचित मासिया नीचते. ॥ ३

(स्वोद्धारार्थ प्रार्थना.)

तसाचि उरलों कसा ? पतित मी नसें काय ? कीं
कृपाचि सरली ? असें हि न घडे जगन्नायकीं; ।
नसेन दिसलों कसा ? नयन सर्वसाक्षी रवी;
विषाद धरिला म्हणों ? न सुरभी विषक्षीर वी. ॥ ४

(भगवंताचे पराक्रम.)

व्रजावन करावया बसविलें नखाग्रीं धरा;
सलील तइं मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं धरा; ।
वराहतनु घेउनी उचलिली रदाग्रें धरा;
सुदुर्धर तुम्हां कसा पतित हा ? न कां उद्धरा ? ॥ ५

(भक्तवात्सल्य.)

नतावनधृतव्रत ! ज्वलन तूंचि बाधावनीं;
पदप्रणतसंकटीं प्रजव तूंचि बा ! धावनीं; ।
दया प्रकट दाखवी कवण सांग त्या वारणीं ?
सतीव्यसनवारणीं ? जयजयार्थ त्या वा रणीं ? ॥ ६

सुपात्र न रमाहि यद्रतिसुखास दारा परी,
असा प्रभुहि सेवकां भजसि खासदारापरी; ।
प्रियाकुचतटीं जिहीं न बहुवार पत्रावळी,
तिहीं अमित काढिल्या नृपमखांत पत्रावळी. ॥ ७

(सलगीचें भाषण.)

न पावसि म्हणोनि मी म्हणतसें तुला आळशी;
बरी न असदुक्ति हे, रविसखोत्थिता आळशी; ।
असंख्य जन तर्पिले, क्षुधित एकला जेमनीं
चुकेल, तरि त्यास दे, परि वदान्य लाजे मनीं. ॥ ८

(प्रार्थना.)

'अगा ! प्रणतवत्सला !' म्हणति त्या जनां पावलां,
म्हणोन तुमच्याच मी स्मरतसें सदा पावलां. ।
'करूं बरि कृपा, हरूं व्यसन, दीन हा तापला.'
असें मनि धरा, खरा भरंवसा मला आपला. ॥ ९



( गंगेचें असामर्थ्य. )

मला निरखितां भवच्चरणकन्यका आपगा
म्हणे, 'अगई ! ऐकिलेंहि न कधीं असें पाप' गा ! ।
कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, घे भीतिला;
न घालिन भिडेस मी, जरिहि कार्यलोभी तिला. ॥ १०

( अन्यदेवतांचें असामर्थ्य. )

सदैव नमितां जरी पदललाट केलें किणें,
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें; ।
नतां करुनि मुक्त ही म्हणसि 'मी बुडालों रिणें,'
अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें ! ॥ ११

( भगवद्दर्शनार्थ प्रार्थना. )

पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनी,
द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं; ।
यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली; तरी हा 'वरा'
म्हणे 'अधिक घाच कीं,' अखिल याचकीं हावरा. ॥ १२
असें न म्हणशील तूं वरद वत्सल, श्रीकरा !
परंतु मज भासलें म्हणुनि जोडितों मी करा; ।
दिलें बहु बरें खरें, परि गमे कृपा व्यंग ती,
अलंकृतिमती सती मनिं झुरे, न जों संगती. ॥ १३

कराल पुरती दया, तरि असो दिलें पावलें;
परंतु हरि! एकदां त्वरित दाखवा पावलें; ।
प्रसाद करणें मनीं जरि नसेल, हें आवरा;
जया बहु तयास द्या, मज कशास ? मी हावरा. ॥ १४

( सलगीचें भाषण. )

'दिलें, फिरुनि घेतलें,' अशि अकीर्ति लोकीं न हो;
सुनिर्मल तुझीं पदें कधिं तरी विलोकीन हो ! ।
निजप्रियजनाकडे तरिहि दे हवाला; जशी
पडेल समजाविशी, तशि करोत; कां लाजशी ? ॥ १५

( पश्चात्ताप. )

अहा ! निपट धृष्ट मी, प्रभुवरासि 'कां लाजशी ?'
म्हणें; तुज नसो तशी विकृति, भाविकांला जशी; ।
परंतु अपराध हा गुरु, म्हणोनि शिक्षा करीं;
असेचि धरिली नयच्युतदमार्थ दीक्षा करीं. ॥ १६

( स्वतःचें पातित्य. )

सदैव अपराध हे रचितसें असे कोटि, गा !
स्वयेंहि कथितों, नसे तिळहि लाज, मी कोटिगा; ।
अजांडशतकोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा,
न त्यांत अवकाश या ? स्थळ दिलें तदा कां द्वा ? १७
तुझ्या जिरविले बहु प्रणतमंतु पोटें, पण
त्यजी मदपराध, हें मजकडेचि खोटेपण; ।
दवाग्नि जठरीं अतिक्षुधित, त्यास हें अन्न द्या;
वितृष्ण करिती श्रितां तुमचिया दयासन्नद्या. ॥ १८

( भगवंताचें पतितपावनत्व. )

न होय कवणाहि, तें तुमचियाचि लीलालसें
पदें चरित दाविजे त्रिजगदब्जकीलालसें; ।
मदुद्धरण मात्र कां जड तुम्हां दिसे ? वारिती
स्वकव्यसन मर्त्यही, न करितीच सेवा रिती. १९

( भगवत्कारुण्य. )

दयाब्द वळशील तूं, तरि न चातकां सेवकां
 उणें किमपि; भाविकां उबगशील तूं देव कां? ।
अनन्यगतिका जनां निरखितांचि सोपद्रवा,
 तुझेंचि, करुणार्णवा! मन धरी उमोप द्रवा. ॥ २०

( पापक्षालनार्थ विनंति. )

कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं;
 तयांत अविशुद्ध मी, शलभ जेंवि दावानळीं; ।
व्रणार्तपशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे,
 स्मरादि रिपु मन्मर्नां; अहि न काळ भेका कसे? ॥ २१
तरेन तुमच्या बळें भवमहानदी, नाविका!
 तुम्हीच मग आतरास्तव मला सुदीना विका; ।
असे विदित वामही मज सदाश्रमींचा; करा
 दया, गुण पहा; मवे मज सदा श्रमीं चाकरा. ॥ २२
धना, परिजना, घरीं तुमचिया उणें कायसें?
 न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें; ।
परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती;
 गुणा न म्हणतां उणा अधिक, आदरें सेविती. ॥ २३
दिसें म्हणुनि शाश्वतप्रकृतिरंक मी काय? हो!
 प्रसन्न तुमचे वरें मजवरी प्रभो! पाय हो. ।
क्षण त्यजुनि इंदिराहृदुरोजसंगा, धरा
 शिरीं पद, मिळो सखा सम सुशील गंगाधरा. ॥ २४

( प्रभुस्तुति. )

'प्रभुस्तुति न ठाउकी, परि तिच्या महाकामुका
 मला कृपण मारितो बहु सकाम हाका मुका' ।
म्हणा मनिं असें; कसें प्रथम नीट ये लेंकरा?
 हळूहळु पदु, स्वयें सुपथिं लावियेलें करा. ॥ २५

जनीं तरि असें असे, शिशुहि जे मुखें वर्ण वी,
पिता पिउनि ते भुले, मधुरता सुखें वर्णवी; ।
मना जरि नये, गुरूक्तहि म्हणे कटु भायशा;
दयानिधि ! तुम्हांपुढें जनकथा अशा कायशा ? ॥ २६



'अतर्क्य महिमा तुझा, गुणहि फार, बा ! हे,' विधी
श्रुतिज्ञहि ह्मणे सदा, स्तविल आमुची केंवि धी? ।
तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती;
स्तवार्थ तुझिया तुझ्या सम कवी कधीं जन्मती? ॥ २७
निजस्तुति तुम्हां रुचे; स्तविति त्यां वरें तर्पितां;
नमस्कृतिपरां बरें स्वधन सर्वही अर्पितां; ।
स्वभाव तुमचा असा विदित जाहला याचकां;
करूं स्तव जसा तसा; फळ नव्हे जना याच कां? ॥ २८
'तुम्ही परम चांगले, बहु समर्थ, दाते; असें
सुदीन जन मी, तुम्हा शरण आजि आलों;' असें ।
पुन्हाहि कथितों, बरें श्रवण हें करा यास्तव;
समक्ष किति आपुला सकललोकराया! स्तव? ॥ २९
किती श्रवण झांकिती प्रभुहि, काय ते पोळती ?
पुसाल जरि कोण ते? पदरजीं तुझ्या लोळती; ।
बरें तुजचि सोसवे स्तवन; कृत्तिवासा गरा
न पी, तरि कसें घडे? हितकरा! दयासागरा! ॥ ३०

गमो मधुर हें विष स्तवन, सेवितां माजवी,
करी मलिन सद्यशोमुख, हलाहला लाजवी; ।
हरापरिस तूं बरा, प्रभुवरा! सदा जो पिशी
असा रस समर्पि, त्या अमृत आपुलें ओपिशी. ॥ ३१
कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या पते!
भले न वरिति स्तुतिप्रति, न जोडिती पाप ते; ।
गळां पडति ज्यांचिया तव गुणैकदेशभ्रमें,
तिहीं तुजचि दावितां, भजति, वा! तुला संभ्रमें. ॥ ३२
( कवितामुतासमर्पण. )
म्हणोनि कवितामुता तुज समर्पितों; साजरी
नसे बहुतशी गुणी कनकपीतवासा! जरी, ।
तरी न इतरा वरी, हरि! करीं इला किंकरी;
मयूरहि निजात्मजाग्रहविमुक्त, जैसा करी. ॥ ३३
म्हणोनि कृतमंतुला, न कवितावधूस्वीकृती
कराल, तरि आयका प्रभु! खराच मी दुष्कृती; ।
नमस्कृतिपुरःसर स्वकृति अर्पितों आजि, ती
दिली रविसवें तुह्मां जशि नमोनि सात्राजिती. ॥ ३४
'पिता खळ, परंतु ती गुणवती सती चांगली;
ह्मणोनि मज आपुल्या भजनिं लावणें लागली;' ।
ह्मणाल, तरि तत्सुता कशि! तुह्मासवें भांडगा
अहर्निशिहि भांडला त्रिणव रात्र जो दांडगा. ॥ ३५
निलाहि वरवी म्हणा, उचित होय; तोषाकरें
असेल सजली यथारुचि तयां स्वयोषा करें, ।
जशी पदरजें शिला; परि असे न हे शापिली
धवें, हरिमनोहराकृति सती अग्रें व्यापिली. ॥ ३६
भलें स्मरण जाहलें समयिं; कंसदासी करें
कशी उजरली समुज्ज्वलदयासुधासीकरें? ।
तुम्हा स्वरिपुची तशी बटिक आवडे, मत्कृती
नको, न सजवे, असा बहुत काय मी दुष्कृती? ॥ ३७

जशी पृथुकतंदुलप्रसृति आप्तकामा, तशी
 रुचो कृति; सभाग्य तूं सुनय आप्त कां मातशी? ।
कण्या विदुरमंदिरीं ह्मणति साधु आस्वादिल्या;
 खरें जरि, कशा तुज प्रभुसि आपुल्या स्वा दिल्या? ॥ ३८
जिणें रस पहावया प्रशिथिलीं रदीं चाविलीं,
 सुवासहि कळावया प्रथम नासिकीं लाविलीं, ।
तुम्हासि शबरी तशी बदरिकाफळें दे जुनीं,
 कथा अशि असो, पहा स्वचरितें तुम्ही मेजुनी. ॥ ३९

( शरणागतांविषयीं प्रभूचें कारुण्य. )

प्रभो ! शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे,
 म्हणोनि इतुकेंचि हें स्वहितकृत्य जीवांकडे; ।
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा ! खरें;
 घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें. ॥ ४०
शिवे न तुझिया पदा अदयताख्य दोष क्षण;
 प्रभो ! चुकतसों, तरी करिसि तूंचि संरक्षण; ।
नसेचि शरणागती घडलि सत्य अद्यापि ती;
 रुचे विषय; ज्यां मिळे अमृत, ते न मद्या पिती. ॥ ४१

( 'क्षमस्व' अशी प्रार्थना. )

विपाक न गणोनि म्यां प्रकट आपुल्या घातकें
 कळोनि अमितें बळें विविध जोडिलीं पातकें; ।
'क्षमस्व भगवन्नजामिलसखोऽस्मि' ऐसें तुला
 ह्मणें नमुनियां सुदुस्तरविपन्नदीसेतुला. ॥ ४२

( भगवत्परीक्षेची वेळ. )

नव्हे अनृत, सत्य तें, अचल ऊचलीला करें
 तुवां हरिमदापहें बृहदुदारलीलाकरें; ।
समुद्धरसि एकटा जरि जडासि या कर्दमीं,
 म्हणेन भुवनत्रयीं तरि तुला 'भला मर्द' मी. ॥ ४३

( वैद्याचा दृष्टांत. )

चिकित्सक 'भला भला' म्हणुनि फार वाखाणिला,
जरी बहुजनामयद्रुम समूळही खाणिला, ।
तथापि अतिदुःसहस्वगदशत्रुच्या अत्यया-
विना, न हृदयीं धरी सरुज पामर प्रत्यया. ॥ ४४

( स्वोद्धारार्थ उतावीळपणा. )

म्हणा मज उताविळा; गुणचि घेतला; घाबरें
असो मन असेंचि वा ! भजकबर्हिमेघा! बरें; ।
दिसे क्षणिक सर्व हें भरंवसा घडीचा कसें
धरील मन? आधिनें बहु परिभ्रमें चाकसें. ॥ ४५

कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली;
पुरःसरगदांसवें झगडतां तनू भागली; ।
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा;
न हो जरि उताविळा, स्वरिपु कापितो हा गळा. ॥ ४६

( प्रभुविषयीं काळजी. )

अवश्य करणें खरें प्रणतरक्षण स्वोचित;
उशीर मग कां ? वसो कृपण मीही कां शोचित ? ।
नव्हे प्रभुवरा! तुम्हां उचित एकटें धांवणें;
कृतांत शिवला नसे तंव, दिसे बरें पावणें. ॥ ४७

'कसें तरि करूं तुझें अवन; पुरवूं आळ जी
असेल मनिं; आमुची तुज कशास रे काळजी ?' ।
असें जरि म्हणाल हो प्रियतमा ! जगज्जीवना !
तदाश्रितमृगासि ती सुखसमृद्धि वा जी वना. ॥ ४८

सुखेंचि सुख बाळका प्रकट होय मातेचिया;
तिला घडति जे श्रम, प्रियजनोत्तमा ! तेचि या; ।
म्हणोनि न शिवो पळ क्षणहि कष्ट जीवा ! तुला,
विपज्जलधिसेतुला, सकललोकजीवातुला. ॥ ४९

( 'ध्रुवाप्रमाणें प्रसाद करा' अशी विनंति. )

ध्रुव स्तवनि आवडी धरि, ह्मणोनि अत्यादरें
तुह्मी करुनि दाविली, शिवुनि गल्ल सत्या दरें; ।
तसें मज करा, करांबुज धरा शिरीं, माधरा !
वराभयपरा! पराक्रमपटो ! मना आंवरा. ॥ ६२

करांबुज असो; नसें उचित त्यास मी पामर;
प्रणाम करिती पदाप्रतिहि सन्मुनी सामर; ।
पदाब्जरजही जगत्रयनमस्क्रियाभाजन;
प्रसादचतुरा ! कसा तरि करा बरा हा जन. ॥ ६३

तुह्मी करुनि दाविला ध्रुव कृतार्थ जेंसा दरें,
तसेंचि जरि योजिलें तुमचिया मनें सादरें, ।
असो; विहित तें करा; परि बरोबरी त्यासवें
नसे उचित; तो महाप्रबळ, वंदिजे वासवें. ॥ ६४

किती वय ? कसें तप प्रखर ? काय विश्वास तो ?
ध्रुव ध्रुव खरा; स्तवा उचित होय विश्वास तो; ।
कशी तुळितसां तुह्मी प्रकट मेरुशीं मोहरी ?
प्रसाद करितां उणें अधिक नाठवा, हो ! हरी ! ॥ ६५

( प्रभुत्व व प्रसाद. )

प्रभुत्व तरि हेंच कीं करुनि दे कृपा दान तें,
स्वसाम्य यदुपार्जनें मिरविजे स्वपादानतें; ।
प्रसाद मग काय तो, जरि निवारिना लाघवा !
कसें दशमुखानुजा विसरलां ? अहो राघवा! ॥ ६६

( सत्पात्रीं वरदान. )

असो वरि कसा तरी, विमल भाव ज्याचा, करा
तथावरि दया; पचे वर असाचि द्या चाकरा; ।
वृथाचि गमतें दिलें, बहुहि, जें न दासा जिरे;
पुसोनि अधिकार द्या; सुकर ते सदा साजिरे. ॥ ६७

( कृपार्त्रीं वरदान-वृकासुरकथा. )

प्रसन्न बहु होनसां, परि कराल हो ! बावरें
शिवापरि वरासवें हृदय, हें न हो बा ! वरें; ।
असा वृक कृतघ्न हें न कळलें कसें हो ! हरा ?
भला जगविला तुह्मीं भवमहाहिचा मोहरा. ॥ ६८

( सत्पार्त्रीं वरदान-उपमन्युकथानक. )

भजे मुदृढनिश्चयें द्विजकुमारक क्षीरथी,
तया करिं तुह्मींच या मदनमारक ! क्षीरधी; ।
उदारपण तें वरें सुखवि जें सुपात्रा सदा;
दिलें अमृत पन्नगा, तशि खळीं कृपा तासदा. ॥ ६९

( शंभो ! दया कर. )



अतिप्रिय, सुखप्रद, प्रथम तूं मुदंभोद या
मयूरहृदया; तुझी क्षण विटो न शंभो ! दया; ।
उदारपण वानिलें; अजि ! गुरुपहासा वळें
कसें करिल लेंकरूं ? निपट हें पहा सावळें. ॥ ७०

( हरिहरांचें अभिन्नत्व. )

तुह्मां हरिहरांत ज्या दिसतसे, दिसो; 'वास्तव'
प्रबुद्ध ह्मणती 'नसे तिळहि भेद;' मी यास्तव ।

म्हणे मनिं, 'यथार्थ जें स्वमत वर्णिती शैव तें
न; वैष्णव दुराग्रही; परम मुख्य हीं दैवतें. ॥ ७१
म्हणे क्षण पुरांतक, क्षण मुरांतक; ब्राह्मणा
मला जरि म्हणाल बा ! तरि विशंक लुब्रा ह्मणा; ।
तुह्मा शिव, शिवा तुम्ही भजतसां; शुक व्यास हा
सदर्थ वदले; पुरातन कथा, न नव्या, सहा. ॥ ७२

( व्यासस्तवन. )

तुझाचि अवतार तो सुत पराशराचा; वळे,
तदुक्तिस जन; प्रभो ! जरि निजेमधें चावळे ।
तरि, त्रिभुवनेश्वरा ! तव विशुद्ध नामावली
मुखीं प्रकट होय, जी करि सुखी जना मावली. ॥ ७३

( भगवन्नाममाहात्म्य. )

तुझें कुशळ नाम बा ! हळुहळू मना आकळी;
दुरत्यय असा महा खळहि त्यास भी हा कळी; ।
हरि व्यसन पाप हें; बहु कशास ? कायाधवा-
परि त्वरित भेटवी तुजहि, योगमायाधवा ! ॥ ७४
तुम्हांसमचि हें गुणें; अणु उणें नसे नाम, हा
दिसे अधिकही, तसा गुण तुला असेना महा; ।
सदैव भलत्यासही सुलभ, आणखी गायका
छळी न, न अधोगति क्षणहि दे जगन्नायका ! ॥ ७५

( बळी भक्ताना छळ व त्याची सहनशीलता. )

छळी नृप बळी बळी, तरिच तो नसे आटला;
गमे बहु भला, मला न, सकळांसही वाटला; ।
परीक्षक करी तसें जडहि सोशितें हेमही;
न केवळ विरोचनात्मज तरे पदें, हे मही. ॥ ७६

( भक्तच्छळाची आवश्यकता. )

असा न करितां जरी छळ, तरी प्रभो ! तो भली
सुकीर्ति कशि पावता कविसभा जिणें शोभली ? ।
पदीं उपजती नदी कशि ? कशी त्रिलोकी सती
अशा अतुल मौक्तिकावलिविणें बरी दीसती ? ॥ ७७

( छळ सोमण्याविषयीं कर्त्याचें असामर्थ्य. )

नको छळ; अधीर मी; तशि न कीर्ति हो; चामरें
नृपासि उचितें; वृथा, मिरविलीं जरी पामरें; ।
अकीर्तिच असो, रुचे तुज कशी व्रजीं कांबळी ?
असें न समजा कसें ? वरिल हारिला कां बळी ? ॥ ७८

छळाल कृपणासि कां ? अजि ! दयानिधे ! कांपिती
भटासि भट संगरीं, परि न कातरा दापिती; ।
कराल तिनुकी कृपा बहु; अहो ! शरण्या ! तमीं
बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत मी. ॥ ७९

( रामावतारस्मरण - रामवनवास. )



मुखासि जंव पातलीं 'श्रम,' 'अरण्य' ऐशीं पदें,
निजस्मृतिस जाहलीं विषय तीं तव श्रीपदें; ।

गुरूक्तिस करावया सफळ, जानकीजीवना !
धरासुरतपःफळें त्वरित धांवलीं जीं वना. ॥ ८०

('मांनिप्रमाणें मजवरही दया करा' अशी प्रार्थना.)

तयीं प्रभुवरा ! तसें सदय; कां असे ? आज हो !
विचारुनि पहा वरें निजमनीं महाराज ! हो ! ।
वनोवनिं फिरा पिशापरि; म्हणा अहोरात्र 'हा' !
नसे कुशळ भाषणीं, परि असे ! कृपापात्र हा. ॥ ८१

समागम तुझा घडो म्हणुन जाहले लांकडें
तपोनळिं, तसें मुनि त्यजुनि, जोडिलीं माकडें; ।
अयुक्त बहु ज्या जनास्तव घडे, पडे सांकडें,
तदुक्तिहुनि आमुचें बहुत बोलणें वांकडें ! ॥ ८२

जगत्रयमनोहरा ! बहुगुणकरत्नाकरा !
ह्मणें 'कनकरंकु द्या मज, महा प्रयत्ना करा;' ।
प्रियाहि अशि जाहली तुज कुकार्य आज्ञापिती;
सुधा त्यजुनि कामुक प्रकट अंगनाज्ञा पिती. ॥ ८३

स्वदास समर्थी जंप, तरि न दे वरा, चाकरी
चुके न, परि सार्थक श्रम न देवराचा करी; ।
वदेहि भलतेंचि, तें तिसचि, कोप टाका, पुसा;
असें मृदु, ह्मणोनि वा ! मज न धोपटा कापुसा. ॥ ८४

( आवड गोड–कृष्णावतारकथा. )

न जें प्रिय, सदोष तें; प्रिय सदोषही चांगलें;
स्वतोक पितरां रुचे, जरिहि कर्दमीं रांगलें; ।
तुलाचि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा वरें !
जरी मळविशी रजोमलिनकाय तूं अंबरें. ॥ ८५

तुझे कथिति गोपिका विविध तीस बोभाट, ते
सुखप्रद गुणस्तवापरिस जाहले वाटते; ।
क्षमा न करि एकदा, तरिहि फार खोडी करां;
न देचि भय, ताडनोद्यमसमेत सोडी करां. ॥ ८६

जरी ह्मणसि बांधिलें, तरि न कष्टवीलें; करा
विचार, जशि कष्टवा तशि न कष्टवी लेंकरा; ।
यथेष्ट पुरतें जरी प्रथम दाम, कां सांधिती?
न ती प्रबळ गोपिका; तुज तुझी दया बांधिती. ॥ ८७

( भगवन्निष्ठुरता क्षणिक. न केवळ भक्तकल्याणार्थ असते. )

तुम्हींहि बळि बांधिला. म्हणुनि आमुची माय जी
मनांत सहजा दया, निपट टाकिली काय? जी ! ।
सकोप दिसती गुरु क्षणभरीच; जें तापलें
जल ज्वलनसंगमें, त्यजि न शैत्य तें आपलें. ॥ ८८

( भगवंताची सदयता. )

प्रसिद्ध तुमचे महासदय पाय; जीवांकडे
चुकी, ह्मणुनि होतिल क्षणहि काय जी! वांकडे? ।
न निष्ठुर पिता; ह्मणे मनिं 'न हो प्रजा रोगणी;'
अपथ्यरुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी? ॥ ८९

असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवां मारिले;
न निष्ठुरपणें, कृपा करुनि ते भवीं तारिले; ।
जगज्जनक तूं, मुलें सकळ जीव, यां भातुकें
दयाम्बुनिधि देशि वा! अमृत नेदिजे घातुकें. ॥ ९०

त्वरी प्रगट शांतिला धरि, परंतु मीना बकी
गिळी; तशि तुला रूपे मुक्तबुद्धिहीना बकी; ।
जिणें गरळ पाजिलें, अमृत पाजिलें तीस तां;
खळांसि न दिसो भलेपण, खरे भल्या दीसतां. ॥ ९१

( देवच खरा सदय पिता. )

सदाहि हित नायकों; बहु अपाय केले, करूं;
तरी सकृप बाप तूं ह्मणसि, 'नायके लेंकरूं;' ।
कधीं न करिसी प्रभो! भजकबाळकोपेक्षण;
न तूजवरि ज्यापरी पशुपपाळ कोपे क्षण. ॥ ९२

खरा जनक तूं, जनां इतर कोण हो! देव वी ?
समीहित फळें जगा तव पदाब्ज दे, देववी; ।
अशीच करुणा असो हरि! कधीं न भंगो पिता;
अशा मज असाधुला इतर कोण संगोपिता? ॥ १३

सुविद्य, धन मेळवी, वचन आयके, आवरी
प्रपंच, भर घे शिरीं, करि कृपा पिता त्यावरी; ।
असा जरि नसे, रुचे तरि न तो अभद्र क्षण;
तसा तुजचि आवडे; करिसि तूंचि तद्रक्षण. ॥ १४

( मातृमहिमा. )

पिता जरि विटे, विटो; न जननी कुपुत्रां विटे;
दयामृतरसार्द्र धी न कुलकज्जलें त्या किटे; ।
प्रमादपट झांकिती परि परा गुरूचे थिटे;
ह्मणूनि म्हणती भले 'न रिण जन्मदेचें फिटे' ॥ १५

( भगवत्कृपा हीच खरी माता. )

विटेल जननीहि कीं शत रची निमित्तें विधी;
मळे कलियुगीं श्रुती जशि, खळीं तिची तेंवि धी ।
कदाचित विटेल; बा! तव दया न दीना वरी;
जशी जगदघक्षयीं कर भवन्नदी नावरी. ॥ १६

कृपाचि जननी तुझी, सकल जीव दायाद; या
तिणेंचि उपदेशिल्या करिति सर्व दाया दया; ।
असें उमजतां भले न गुरुभाव तो टाकिती;
मता तुजहि गोपिका, मग जनास तोटा किती? ॥ १७

( देवाची कृतज्ञता. )

भरोनि कुचकुंभ जी विषरसें मुखीं दे बकी,
प्रभो! तिसहि ठेविशी, जशि महासुखीं देवकी; ।
न होति जननी कशा पशुपदार, गाई? लया
न पावतिच तत्सुखें, कृति न कोण गाईल या? ॥ १८



अशी तरि कृतज्ञता हरि! तुझ्याच ठायीं अगा!
सख्या! अणुचि मानिशी, करुनि सुप्रसादा अगा; ।
भुले गुकविरागवधू तव गुणा अनर्घ्यांनगा;
ह्मणेल जन कोण, कीं यश पुनः पुन्हा तें न गा? ॥ ९९

तुम्ही बहु भले, मला उमज होय ऐसें कथा;
कसा रसिक तो? पुन्हा जरि म्हणेल आली कथा; ।
प्रतिक्षण नवीच दे रुचि, शुकाहि संन्यासिया;
न मोहिति भवत्कथा अरसिका अभ्यासि या. ॥ १००

( भगवत्कथाप्रशंसा. )

कथा श्रवणचत्वरीं जरि पुनःपुन्हा ये, रते
महारसिक तद्रसीं, विटति ऐकतां येर ते; ।
विलोकुनि विलासिनी जन पुनःपुन्हा कामुका
करी वश, नव्हे बुळा, विवश घेइना कां मुका! ॥ १०१

कथा सुपुरुषा तुह्मी वश तशी करी, राधिका
जशी तुज, जिला स्वयें ह्मणसि तूं शरीराधिका; ।
तिचें न घडतां, रमाहृदयवल्लभा! सेवन
प्रभो! तुज जसें, तसें मतिस गेह भासे वन. ॥ १०२

(कथा मोहिनीपेक्षां श्रेष्ठ.)

कथा भुवनमोहिनी, अशि न मोहिनी होय ती;
हरो असुरधी; हिणें भुलविले किती हो! यती; ।
नव्हे न ह्मणवे; असो; जरि विमोहिला दक्षहा,
प्रिया वसविली शिरीं, मुनिपथीं कसा दक्ष हा? ॥ १०३

सुरासुरनरोरगां भुलवुनी कथा न त्यजी;
न भेद करि पंक्तिचा; अमृत पाजिती सत्य जी; ।
तिणें जरि सुधारस स्वरतमानसां पाजिला,
वधी अमृत घोटितां, द्रव नयेचि वापा! जिला. ॥ १०४

अभीष्ट वरितात, जे तव कथेसि विश्वासति;
भली असुरवंचनीं, श्रुत असेचि विश्वास ती; ।
कथा कशि सखी तिची! ठकवुनी हरी संचितें,
तरी अमृत दे, असें सदय, दाखवी वंचितें. ॥ १०५

(कथेची वंचना कल्याणार्थ.)

करा श्रवण येवढें, अपटु लोक हांसो भला;
अहो! जरि गिळावया प्रियकुमार घे सोमला, ।
तयासि ठकवूनि दे बहुत शर्करा माय जी,
तिला स्वशिशुवंचनें अदयता शिवे काय! जी! ॥ १०६

ह्मणोनि बहु मोहिनीहुनि भली कथा हे तुजी,
अभीष्ट फल द्यावया नतमनोरथां हेतु जी; ।
ह्मणाल जरि 'मीच त्या, विषम काय दोघींत रे!
जसा जन सितासिताभिधनदीसदोर्घां तरे'. ॥ १०७

अहा! बहु विशुद्ध हे प्रभु! तव स्वरूपाहुनी;
न भिन्नतनु त्या; भले भजति, एकता पाहुनी; ।
परंतु वदतों जनानुभव, नातळो पाप गा!
तशी न यमुना गमे, जशि गमे निलिंपापगा. ॥ १०८

( गंगावर्णन. )

जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं जिचें नांदणें,
तिच्या जळमळें तुळे न शरदिंदुचें चांदणें, ।
प्रजा हरिहरां अशा यदुदरीं अनेका; कवी
भिऊनि ह्मणतील कां 'जशि सुधा तशी काकवी'! ॥१०९

( मोहिनीची यमुनेशीं व गंगेची कथेशीं तुलना. )

तुला स्वयमुनेसवें, कुवलयद्युतिश्यामला !
ह्मणाल जरि मोहिनी निजतनू, अवश्या मला; ।
तुलीन अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला
कथा सुरधुनीसवें, सुजन जींत विश्रामला. ॥ ११०

( कथा अतुला व निरुपमा-भागवतांची व गुरूंची साक्ष. )

शुकादिक पुराण ज्या श्रवण सन्मुखें साग्रही,
ह्मणेल 'अतुला कथा' ह्मणि ह्मणाल, 'तो आग्रही;'
न केवळ मलाचि हे निरुपमा, यशोमंडिता,
गुरूसहि गमे, पुसा स्ववरदा महापंडिता. ॥ १११

( भगवत्कथा मोहिनीपेक्षां श्रेष्ठ- आणखी एक कारण. )

प्रभो ! तुज न मोहिनी भुलवि; मोहिला तोहि ती
त्यजी जन; नव्हे तशी, तुज तुझी कथा मोहिती; ।
निजानुभव तूं पहा; जशि महापथी पारदा,
तुला स्थिरवळें करी, कळविलें तुवां नारदा. ॥ ११२

( प्रभूची स्वकथासक्ति. )

मुरपिंजवळी स्वयें वदसि, 'तत्र तिष्ठामि;' या
तुझ्याचि वचनें म्हणें तुज 'कथावश' स्वामिया ! ।
जसा स्थिर कथेंत तूं, स्थिर करीं तसें या मना;
स्वभक्तसुरपादपा ! सफळ हे असो कामना. ॥ ११३

( भगवद्गुणवर्णनाची नारदाला आवड. )

सुरर्षि म्हणतो, 'तुझें यशचि धन्य; यो गायना
मला; कवि ह्मणोत ते सुखद अन्ययोगायना;' ।
विमुक्तिबहुसाधनें तदितरें गणीनाच तो;
सजूनि वरवल्लकी तव सभांगणीं नाचतो. ॥ ११४

( भगवत्कथामाहात्म्य-देवर्षि नारदाचा अनुभव. )

तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें, यास्तव
प्रजापतिसुतत्व ये, करिति साधु ज्याचा स्तव; ।
स्वनीचपण मागिलें, बहु दया अशी नारदा
स्मरे घडिघडि, प्रभो! भवपयोधिच्या पारदा! ॥ ११५

( सत्संगतिमहिमा. )

तुझें यशचि तारितें, परि न केवळा तारवे;
सहाय असिला असे, तरिच शत्रुला मारवे; ।
न भागवत भेटतां, न घडतांहि सत्संगती,
न अज्ञहृदयें, तशीं तव यशोरसीं रंगती. ॥ ११६

( नौकेचा दृष्टांत. )

बुडे, बुडवि सागरीं तरि, सुकर्णधाराविना;
सहाय नसतां स्वयें परतटासि ती दाविना; ।
सहाय भगवज्जना तव सुकीर्ति जेव्हां करी,
तयींच उतरी भवोदधितटीं जनां लौकरी. ॥ ११७

( वरप्रसादयाचना. )

सुसंगति सदा घडो; सुजनवाक्य कानीं पडो;
कलंक मतिचा झडो; विषय सर्वथा नावडो; ।
सदंघ्रिकमळीं दडो; मुरडितां हटानें अडो;
वियोग घडतां रडो; मन, भवच्चरित्रीं जडो. ॥ ११८
न निश्चय कधीं ढळो; कुजनविघ्नबाधा टळो;
न चित्त भजनीं चळो; मति सदुक्तमार्गीं वळो; ।

स्वतत्त्व हृदया कळो; दुरभिमान सारा गळो;
पुन्हा न मन हें मळो दुरित आत्मबोधें जळो. ॥ ११९
मुखीं हरि ! वसो तुझी कुशलधामनामावली,
क्षणांत पुरवील जी सकल कामना, मावली; ।
कृपा करिशि तूं जगत्रयनिवास दासांवरी,
तशी प्रकट हे निजाश्रितजनां सदा सांवरी. ॥ १२०

(स्वोद्धारार्थ मयूराची दयाघन परमेश्वरास अखेरची प्रार्थना.)

दयामृतघना ! अहो हरि ! वळा मयूराकडे;
रडे शिशु, तयासि घे कळवळोनि माता कडे; ।
असा अतिथि धार्मिकस्तुतपदा ! कदा सांपडे ?
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे. ॥ १२१

(उपसंहार—उपास्यदेवता श्रीरामाचें मांगल्यसूचक सप्रेम स्मरण.)

कारुण्यांभोद राम प्रियसख गुरुही जो मयूरा नटाचा,
होतां तापत्रयार्त त्वरित भववनीं रक्षिता रानटाचा, ।
त्याचें साचें स्वभद्रस्मरण, मग न तें त्या कसें ये कवीस ?
केका, एका सख्यातें स्मरुनि, करि अशा एकशें एकवीस. १२२



# केकावलि.

(पृथ्वीवृत्त.)

सदाश्रितपदा! सदाशिवमनोविनोदास्पदा!

१. के (मूर्ध्नि-डोक्यांतून) कायते (ध्वनति-ध्वनि होतो) इति केका (मयूरवाणी). या ग्रंथास 'केकावलि' हें नाम देण्याचें कारण हेंच दिसतें कीं, मयूराचे वाणीस 'केका' ह्मणतात; या कवीचें नाम मयूर (मोरोपंत) आहे. तेव्हां त्याच्या वाणीस 'केका' हें नाम देऊन त्यांची आवलि (पंक्ति) ज्यांत आहे त्या ग्रंथाला (काव्याला) 'केकावलि' हें नांव दिलें आहे. वर्षाकालीं मयूर हे मेघाची मार्गप्रतीक्षा करितात, व मेघवृष्टि होऊन जळ मुखांत पडावें या हेतूनें आक्रोश करितात. हा मेघमयूरांचा सेव्यसेवकभाव मनांत आणूनच कवीनें ह्या मयूरवाग्रत्नमालारूप स्तोत्रास 'केकावलि' हें नांव दिलें आहे, हें ह्या ग्रंथाच्या उपसंहारात्मक श्लोकावरून ('कारुण्यामोद राम' ८०) स्पष्ट दिसतें. मेघदर्शनानें मयूरास केवढा आनंद होतो हें खालील पंतकृत श्लोकावरून उत्तम दिसून येतें:—'मेघाचें प्रतिबिंब पाहुनि सुखें नाचोंचि लागे, भुले, । मानी सर्व मनोरथद्रुम फळीं ओथंबले आपुले; ॥ ऐसा भक्तमयूरचातकहि जो नेणे दुजीं भावुकें, । तो साक्षाद्धनदर्शनीं किति सुखी? तें प्रेमळां ठाउकें ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला ६—कृष्णविजय—उत्तरार्ध—अ० ५५, श्लो० ५१, पृ० ३९]. ही मेघमयूरांची उपमा कविसंमत असून पंतांची तर अत्यंत आवडती होय हें बहुश्रुत वाचकांस सांगणें नकोच. २. या ग्रंथाचे सर्व श्लोक (अंतिम उपसंहारात्मक श्लोक सोडून) पृथ्वीवृत्तात्मक आहेत. पृथ्वीछंदाचें लक्षण केदारभट्टविरचित 'वृत्तरत्नाकरां'त असें दिलें आहे:—'जसौ जसयला वसुग्रहयतिश्च पृथ्वी गुरुः' [तृतीय अध्याय—९४] ज, स, ज, स, य, लघु, गुरु हे यथानुक्रम गण व अक्षरें; आठव्या अक्षरावर व त्याच्या पुढें नवव्या अक्षरावर यति; व प्रत्येक चरणांत एकंदर अक्षरें १७ अशी ह्या वृत्ताची रचना आहे. अन्यत्रही असेंच लक्षण आढळतें:—'पृथ्वी जसौ जसयला गच्छिन्ना वसुभिर्ग्रहैः' [मंदारमरंदचम्पू—पृ० १६]. या छंदाविषयीं श्रीक्षेमेंद्रकृत 'सुवृत्ततिलक' नामक ग्रंथांत पुढील विवेचन आहे:—'जसजैः सयलैर्गेन युताष्टनवसंहतिः । दशसप्ताक्षरा पृथ्वी कथिता वृत्तवेदिभिः ॥ ३२ ॥' [प्रथमो विन्यासः], 'असमासैः पदैर्भाति पृथ्वी पृथ्वी पृथक्स्थितैः । समासग्रंथिभिः सैव याति संकोचखर्वताम् ॥ २७ ॥' [द्वितीयो विन्यासः], 'साक्षेपक्रोधधिक्कारे परं पृथ्वी भरक्षमा ॥ २१ ॥' [तृतीयो विन्यासः]. ३. सत्+आश्रित+पद, संबोधन=सत् ह्मणजे सात्विक भक्त यांनीं आश्रित (आश्रय केलेलें) असें पद ज्याचें अशा. मंगलदाता तूंच आहेस ह्मणून स्वकल्याणार्थ मीही तुझ्याच पायांचा आश्रय करितों हा अभिप्राय; किंवा, सत् (साधु) जे आश्रित त्यांचें पद ह्मणजे संरक्षण जो तूं अशा; (त्राणे पादे पादचिन्हे व्यवसायापदेशयोः पदम्' इति हैमः) सदाश्रितपदा!=साधुभक्तांच्या रक्षणकर्त्या! ४. सदा-

स्वदासवशमानसा ! कलिमलांतका ! कामदा ! ।

**शिव+मनस्+विनोद+आस्पद, सं०=महादेवाच्या मनाचें क्रीडास्थान अशा. 'आत्माराम असाही महादेव स्वचित्तरंजनार्थ तुझें निरंतर चिंतन करितो; मग आह्मीं जीवांनीं तुझें चिंतन कसें न करावें असा भाव'** (केकादर्श). **पूर्वीं समुद्रमंथनाच्या वेळीं निघालेलें हालाहल नामक विष महादेवानें प्राशन केलें. त्यामुळें शिवाच्या अंगाचा दाह होऊं लागला. तो रामनामानें** (राम हा विष्णूचा अवतार त्रेतायुगांत समुद्रमंथनानंतर झाला) **शांत झाला-ही कथा पदरचना करितांना पंतांच्या लक्ष्यांत असावी-असें वाटतें.** विष्णु व शिव हे परस्परांचे उपासक आहेत. वैकुंठचतुर्दशीला शिव विष्णुपूजा करितात व महाशिवरात्रीला मध्यरात्रीं विष्णु शिवाची पूजा करितात हें सुप्रसिद्ध आहे. शिवविष्णूंची मैत्री वाताग्नि, कृष्णार्जुन, कर्णसुयोधन, रामलक्ष्मण ह्यांच्या मैत्रीप्रमाणेंच पुराणांत प्रसिद्ध आहे. शिवविष्णूंत भेद मुळींच नाहीं व तो तसा मानणाऱ्यास पाप लागतें. शिवविष्णूंचा अभेद पंतांनीं ७१,७२ केकांत वर्णिला आहे. तसेंच 'शिवलीलामृतां'तील पुढील ओंवी पाहावी:—'शिव थोर विष्णु लहान । हरि विशेष हर गौण । ऐसें म्हणति जे त्यांलागून । आणून नरकीं घालावें ॥.'

१. **स्व+दास+वश+मानस, सं०=स्वभक्तांच्या स्वाधीन मन ज्याचें आहे अशा. प्रत्यक्ष शिवानें चिंतन करावें एवढा जरी तुझा अधिकार, तरी तूं भक्ताला वश आहेस हा अभिप्राय.** 'जे अनन्यभावानें तुला शरण येतात, या भवसागरांतून पार उतरविण्यास तुजवांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं असें समजून जे तुझेंच नाम धरून तुझ्या भजनीं लागतात, त्यांसच तूं वश होतोस, आणि त्यांचे मनोरथ पूर्ण करितोस, अशीं तुझींच वचनें प्रमाण आहेत. 'मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः' [भगवद्गीता—अध्याय १२ श्लोक १४], 'नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ । मद्भक्ता यत्र गायंति तत्र तिष्ठामि नारद ! ॥' (यशोदापांडुरंगी टीका). २. **कलि+मल+अंतक, सं०=कलिकालसंबंधानें लागणारा जो मळ (पातक) त्याचा नाश करणारा अशा. 'कलिमदांतका' असाही पाठ आहे. त्याचा अर्थ कलिपुरुषाच्या गर्वाचें खंडन करणाऱ्या, किंवा आपल्या नामप्रतापानें, कलियुगास वाटणारा जो अभिमान (कीं मी आपल्या प्रतापानें सर्व लोकांस पापरत करणार) त्याचें छेदन करणाऱ्या.** ['अजित नाम वदो भलत्या मिषें, । सकळ पातक भस्म करीतसे.'], कलियुगांत लोक पापरत व धर्माचारभ्रष्ट होणार म्हणून पुराणग्रंथांतून वर्णन केलें आहे. 'अध्यात्मरामायणां'तील पुढील श्लोक पहा:—'प्राप्ते कलियुगे घोरे नराः पुण्यविवर्जिताः । दुराचाररताः सर्वे सत्यवार्तापराङ्मुखाः ॥ परापवादनिरताः परद्रव्याभिलाषिणः । परस्त्रीसक्तमनसः परहिंसापरायणाः ॥ देहात्मदृष्टयो मूढा नास्तिकाः पशुबुद्धयः । मातापितृकृतद्वेषाः स्त्रीदेवाः कामकिंकराः । स्त्रियश्च प्रायशो भ्रष्टा भर्त्रवज्ञाननिर्भयाः ॥.' तसेंच भागवताचा १२ वा स्कंध पहा. हाच समज मराठी कवींच्या ग्रंथांतून सर्वत्र आढळतो. पुढील नामदेवाचे अभंग पहा:—'कलियुगाचे मुळें । झालें धर्माचें वाटोळें ॥ पलंगीं बैसवुनि राणी । मातेहातीं आणवी पाणी ॥ स्त्रिये पाटावाची चोळी । माता अखंड चिंध्या गाळी ॥ ऐसा कलियुगाचा महिमा । म्हणे विष्णुदास नामा ॥.' वामन-

वदान्यजनसद्गुरो! प्रशमितामितासन्मदा!
गदारिदरनंदकांबुजधरा! नमस्ते सदा. ॥ १

पंडिताच्या पुढील श्लोकार्धावरून मात्र भागवतकाराच्या मतें कलियुग हें सर्वांत चांगलें युग आहे अशी यथार्थ कल्पना आढळून येते. 'कृतयुगाहुनि उत्तम हा कली । म्हणुनि भागवतीं मुनि हांकली ॥.' पाश्चात्य जुन्या ग्रंथकारांपैकीं पुष्कळांच्या मतें हें युग पापी आहे असें दृष्टीस पडतें. या युगाला ते Iron age, Dark age असें म्हणतात. **कलिमलांतका='कलियुगांत विष्णुनामाच्या कीर्तनानें सर्व पातकें लयास जातात, म्हणून आम्हीं तुझ्या नामाचा आश्रय करावा हें योग्य असा भाव.' (केकादर्श.)** ३. **काम+द, सं०=भक्तांचे मनोरथ पुरविणाऱ्या.** येथें 'काम' म्हणजे ऐहिक राज्यादि भोगेच्छा असा अर्थ कोणी मनांत आणील, अथवा आपले सेवक किंवा याचक यांचे मनोरथ पूर्ण करणारे कर्णादि दाते पुराणप्रसिद्ध आहेतच, मग ह्या 'कामद' विशेषणानें विशेषार्थापत्ति ती कोणती अशी शंका घेईल, तर तसें न व्हावें या हेतूस्तव, कवी पुढलें विशेषण 'वदान्यजनसद्गुरो' देतात. (यशोदापांडुरंगी.)

१. **वदान्य+जन+सद्गुरु, सं०=उदार+जन+उत्तम गुरु, फार श्रेष्ठ=कर्णप्रभृति दातृत्वगुणविख्यात उदारजनांचा स्वामी आचार्य-अशा. इतर दात्यांच्या अंगीं जें उदारत्व आहे तें तुझ्याच कृपेचें फळ होय**-असा भाव. २. **प्रशमित+अमित+असत्+मद, सं०=शांत केला आहे असंख्य दुष्टांचा (शत्रूंचा) गर्व ज्यानें अशा. येथें 'असत्' ह्या शब्दांत अंतर्बाह्य अशा दोन्ही शत्रूंचा अंतर्भाव होतो असें समजावें. साधुजनांस त्रास देणाऱ्या खलांचा व कामादि षड्रिपूंचा संहार तुझ्याच साहाय्यानें होतो.** ३. **गदा+अरि+दर+नंदक+अंबुज+धर, सं०=गदा=कौमोदकी नामक विष्णूची गदा+अरि=चक्र, सुदर्शन+दर=शंख, पांचजन्य+नंदक=तन्नामक खड्ग+अंबुज=लीलार्थ घ्यावयाचें कमलः**-'शंखो लक्ष्मीपतेः पांचजन्यश्चक्रं सुदर्शनम् । कौमोदकी गदा खड्गो नंदकः कौस्तुभो मणिः' ॥ (अमर). **गदा, चक्र, शंख, खड्ग व कमल यांतें धारण करणाऱ्या देवा!. हीं आयुधें हातांत असल्यावर शत्रूंचा नाश करणें सहज आहे असा अर्थ या शब्दयोजनेनें निघतो.** चतुर्भुज भगवंताच्या हस्तांत कवीनें पांच वस्तू दिल्या त्यांची योजना नंदक खड्ग भगवंतांनीं कमरेस बांधून इतर वस्तू चतुर्हस्तांत धारण केल्या अशा रीतीनें कित्येकजण करितात. किंवा प्रसंगविशेषीं प्रभु स्वहस्तांत निरनिराळीं शस्त्रें धारण करितात, एकाच वेळीं सर्व शस्त्रें हातांत धरितात असें समजण्याची जरूरी नाहीं. कारण शार्ङ्ग ह्या विष्णूच्या धनुष्याचा उल्लेख यांत जरी केला नाहीं तथापि भगवान् प्रसंगविशेषीं त्याचाही उपयोग करित असावे. चतुर्भुज भगवंताच्या प्रत्येक हातांत एक एक वस्तु देऊन सर्वांचा निकाल लागावयाचा नाहीं. अथवा ज्याचा महिमा अतर्क्य त्याच्या अनेकशस्त्रधारणाची विशेष मीमांसा करणें हेंच चमत्कारिक दिसतें. **वरील श्लोकांतील आठ विशेषणें पंतांनीं फारच खुबीनें व साभिप्राय योजिलीं आहेत म्हणून येथें 'परिकर' नामक अलंकार समजावा.** याचें लक्षण:-'अलंकारः **परिकरः** साभिप्राये विशेषणे.' **'साभिप्राय विशेषण असतां, 'परिकर' घडे अलंकार । शिव तुमचा ताप हरो जो धरि शिरिं इंदुमय अलंकार**

**॥ ६२ ॥ येथें 'जो धरि शिरिं इंदुमय अलंकार' हें विशेषण शिवाचे ठिकाणीं ताप हरण करण्याचें सामर्थ्य आहे असें सुचवितें. यांत व्यंग्यार्थ वाच्यार्थाचा परिकर (=अंगभूत) आहे म्हणून ह्या अलंकारास परिकर असें नांव आहे.'** (अलंकारविकाश–वामनशास्त्री केमकरकृत पृ० ८१-८३). याचीं उदाहरणें केकावलीच्या प्रस्तावनेंत दिलेलीं आहेत. केकेंतील बहुतेक विशेषणें फार मार्मिकपणें योजिलीं आहेत. या अलंकाराचें आणखी एक उदाहरण **मुक्तेश्वराच्या** आदिपर्वांतून पुढें दिलें आहे:–क्षोभुनि बोले शकुंतला। **पवित्र विश्वामित्रबाळा**। राया! **भूमंडळपाळा!**। तूंचि अविचारें जल्पसी ॥ पद्यांत सहेतुक व खुबी ठेवून विशेषणांची योजना झाली म्हणजे हा **'परिकर'** नामक अलंकार होतो. 'गदारिदरनंदकांबुजधरा' या संबोधनपर विशेषणानें (उपलक्षणानें) वंदनीय वस्तु श्रीविष्णुच आहे असा स्पष्ट बोध होतो व अन्य देवाचा बोध होत नाहीं, म्हणून येथें **अवसर** नामक अलंकार झाला असें मानलें तरी चालेल. याचें लक्षण:–'यत्रार्थान्तरमुत्कृष्टं संभवत्युपलक्षणम् । प्रस्तुतार्थस्य स प्रोक्तो बुधै**रवसरो** यथा ॥.' [वाग्भटालंकार–परिच्छेद ४–श्लोक १२४ पृ० ५६], 'अर्थान्तरमुत्कृष्टं सरसं यदि वोपलक्षणं क्रियते । अर्थस्य तदभिधानप्रसंगतो यत्र सो**ऽवसरः** ॥' [रुद्रटप्रणीत काव्यालंकार–अ० ७ श्लो० १०३, पृ० ९६]. जेथें प्रस्तुत अर्थानें उत्कृष्ट, सरस, उदात्त असें लक्षण किंवा उदाहरण सांगितलें असतें आणि त्याजवरून प्रस्तुत अर्थाचा स्पष्ट बोध होतो तेथें **अवसर** नामक अलंकार होतो. याचें नवीन उदाहरण:–'तें हें अरण्य जेथें दशरथवचनानुपालनव्यसनी। होता राम स्वभुजें मारी राक्षस, नुरे कुणी व्यसनी॥.'

**४. ते (तुला) सदा नमः (नमस्कार असो). कोणताही ग्रंथ आरंभिला असतां तो निर्विघ्न सिद्धीस जावा ह्मणून ग्रंथारंभीं मंगलाचरण करण्याचा कविसंप्रदाय आहे, त्यास अनुसरून पंतांनीं ह्या पहिल्या श्लोकांत देवतानमस्काररूपी मंगलाचरण केलें आहे. यांत दिलेल्या विशेषणावरून नमस्कार्य देवता विष्णु हें उघड होतें. ५. या श्लोकांत अनुप्रासचमत्कार चांगला साधला आहे.** पहिल्या चरणांत 'सदा' व 'दा' या अक्षरांची आवृत्ति झाली आहे. दुसऱ्या व चवथ्या चरणांत 'दा' ची आवृत्ति झाली आहे व तिसऱ्या चरणांत 'मिता' व 'दा' यांची आवृत्ति दोनदोनदां झाली आहे. यमक व अनुप्रास यांनीं पंतांच्या काव्यास फार शोभा आली आहे. इतकें असून तें फारच थोड्या ठिकाणीं क्लिष्ट झालें आहे. येथें 'दा'-काराचा वृत्त्यनुप्रास व 'सदा' व 'मिता' यांचा छेकानुप्रास समजावा. 'एका व्यंजनाची अनेकवार आवृत्ति झाल्यास 'वृत्त्यनुप्रास' व अनेक व्यंजनांची अनेकवार आवृत्ति झाल्यास 'छेकानुप्रास,' तसेंच तात्पर्य मात्र भिन्न असून शब्दाची आवृत्ति झाल्यास 'लाटानुप्रास' असें म्हणावें. [साहित्यदर्पण–दशम परिच्छेद–कारिका ६३३-६३८ अलंकारमीमांसा–पृ० ५१] या अनुप्रासांच्या व्याख्येविषयीं संस्कृत साहित्यशास्त्रकारांचें ऐकमत्य नाहीं. या केकेचा दुसरा वेदांतपर अर्थ कै० दादोबा पांडुरंग यांनीं 'यशोदापांडुरंगींत' दिला आहे तो इष्ट तर पहावा. या व यासारख्याच दुसऱ्या एक दोन स्थळांवरून अर्वाचीन पंडितांची केकावलीच्या अनेकार्थत्वाविषयीं ठाम समजूत होऊन बसली आहे. परंतु यशोदापांडुरंगींत दिलेला अर्थ किती सरळ रीतीनें लागतो हें स्पष्टच आहे. पंडितलोक एकादा संस्कृत श्लोक घेऊन त्याच्या जशा चिंधड्या उड-

पदाब्जरज जें तुझें, सकलपावनाधार तें
अघाचलहि तारिले बहु तुवांचि राधारतें; ।

---

वितान त्यांतलाच हा जवळ जवळ प्रकार आहे. केकावलीचा कांहीं भाग जर व्यर्थी असता तर पंतांनीं त्याचा खास कोठें तरी उल्लेख केला असता. 'मंत्ररामायणां'त उत्तरकांडांत 'रामरक्षा'मंत्र साधल्याचें जसें त्यांनीं उपोद्घातांत (रामायणें भाग ३–पृ० ३९ गीति १०-११) लिहिलें आहे तसा कांहींएक प्रकार येथें दिसून येत नाहीं. शिवाय पंतांच्या एकंदर कवितेवरून त्यांस श्लेषांची आवड फार कमी दिसते. या ग्रंथांत लहान सहान श्लेष आहेत खरे पण संश्लिष्ट चरण एक देखील सांपडणार नाहीं.

१. पद+अब्ज+रज=चरण+कमल+धूलि=चरणकमलधूलि. [अब्ज=कमल, शंख, चंद्र. अप्सु (उदकेषु) जायते तत् अब्जम्=जें पाण्यांत उत्पन्न होतें तें कमळ.] 'पहिल्या केकेंत कवींनीं प्रथमतः भगवंताच्या चरणकमलाचें ध्यान करून स्तुतीस आरंभ केला, ह्मणून आतां त्याच चरणकमलाचें माहात्म्य वर्णित होत्साते कवि पुढल्या दोन केकांस आरंभ करितात. याप्रमाणें आपलें अकिंचन्य, अथवा अत्यंत नम्रीभाव, अथवा तद्भावपूर्वक विज्ञप्ति, प्रकट कर्तव्य असतां थोरांसमोर साक्षात् अभिवाद न करितां त्यांच्या चरणस्पर्शनाची अथवा चरणाप्रत स्वमनोगतार्थ निवेदन करण्याची जनरूढि आहे, कारण तसा साक्षात् अभिवाद केल्यानें अभिवादकाचें किंचित् औद्धत्य इंगित होतें. आपल्या चरणांजवळ माझी हीच विनंति आहे. अशा प्रकारें नम्रतापूर्वक बोलण्याचा लोकव्यवहार प्रसिद्ध आहे.' (यशोदापांडुरंगी.) २. सकल+पावन+आधार=सकलांस पवित्र करणारे जे भागीरथ्यादि पावन पदार्थ त्यांस आश्रयभूत. गंगा विष्णुपदापासून उत्पन्न झाली म्हणून ती पावनकर्त्री; नाहीं तर तिच्याच अंगीं त्या आश्रयाशिवाय पावन करण्याचें सामर्थ्य नाहीं; म्हणून तुझें चरणरज सकल पापीजनांस पवित्र करण्यास समर्थ होय; मग साक्षात् चरणमहिमा काय वर्णावा? भागवतांत भगवंताच्या चरणरजाचा महिमा येणेंप्रमाणें वर्णिला आहे:–'यत्पादपांसुर्बहुजन्मकृच्छ्रतो धृतात्मभिर्योगिभिरप्यगम्यः.' गंगेची उत्पत्तिः—भागवतांत व नारदसंहितेंत येणेंप्रमाणें वर्णिली आहे. एकदां कैलासपर्वतावर शिव गायन करीत असतां तें विष्णूनें ऐकून त्याच्या अंगास घाम सुटला. हीच गंगा होय. विष्णु व गंगा हीं एकमेकांस पाहतांच परस्पर सौंदर्यानें मोहित झालीं व हें पाहून लक्ष्मीच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला व ती गंगेचा छळ करूं लागली. त्यापासून आपलें रक्षण व्हावें म्हणून गंगा विष्णूच्या पायांत जाऊन लपली. पुढें सर्व देवांनीं मिळून गंगेच्या मुक्ततेकरितां लक्ष्मीनारायणांची स्तुति केली. ती ऐकून लक्ष्मीच्या अनुमतानें विष्णूनें गंगेला आपल्या डाव्या पायाच्या आंगठ्यांतून बाहेर येण्यास सांगितलें. यास्तवच गंगेला विष्णुपदी म्हणतात. ३. राधारतें तुवांचि बहु अघाचलहि तारिले–असा अन्वय. अघाचल=अघ+अचल=पाप+पर्वत=पापपर्वत, पर्वततुल्य पापराशी, प्रचंडपापी पर्वतासारख्या पापाच्या ज्यांच्या राशी असे महत्पापी असतांही तारिले, मग क्षुद्र पापी तारिले हें काय सांगावें; असा 'ही' शब्दानें ध्वनितार्थ निघतो. ४. तुवांचि=त्वांचि=तूंच 'तुवां' हीं तृतीयेचीं रूपें कवितेंत मात्र

**येतात. ५. राधा नामक गोपीच्या ठायीं रत (रममाण) अशा.** राधा ही 'हरिवंशांत वर्णिलेली प्रसिद्ध गोपिका. सगळ्या भागवतांत इचें कोठेंही नांव नाहीं. राधयति (आराधना करिते) इति (म्हणून) राधा–'वैष्णवतोषिणी.' हिनें भगवान् श्रीकृष्णाची आराधना केली म्हणून इचें नांव राधा. **या द्वितीय चरणांत विभावना नामक अलंकार झाला आहे.** जेथें कारणाविना कार्य उत्पन्न होतें अथवा जेथें विरुद्ध कारणापासून कार्याची उत्पत्ति होते तेथें हा **विभावना** नामक अलंकार होतो. विरोधक कारणापासून कार्याची उत्पत्ति वर्णिली म्हणजे **विभावना** झाली. प्रस्तुत स्थलीं तूं राधारत अर्थात् परस्त्रीरत हें विरुद्ध कारण. या विरुद्ध कारणापासून अघाचलतारण (बहु अघाचलहि तारिले हें कार्य झालें म्हणून हा **विभावना** अलंकार झाला. याचें लक्षण:–(१)'विरुद्धात्कार्यसंपत्तिर्दृष्टा काचिद्विभावना । शीतांशुकिरणास्तन्वि! हंत! संतापयंति माम् ॥' (काव्यप्रकाश), (२) '**विभावना** विनापि स्यात्कारणं कार्यजन्म चेत् । अप्यलाक्षारसासिक्तं रक्तं तच्चरणद्वयम् ॥' (कुवलयानंद). **'म्हणती विभावना जरि कार्य घडे कारणाविण व्यक्त । लाक्षारसें न सेचित तत्पदयुग परि असेचि आरक्त' ॥ ७७ ॥** येथें लाक्षारससेचनरूप कारण नसूनही रक्तत्वरूप कार्य सांगितलें आहे. रक्तता ही स्वाभाविक असल्यामुळें विरोधाचा परिहार होतो. **'कारण समग्र नसतां कार्य घडे तरि विभावनाचि अगा! । नच तीक्ष्ण कठिण जे त्यां पुष्पशरीं जिंकितो अनंग जगा' ॥ ७८ ॥** येथें जगताचा पराजय हें कार्य साध्य असून त्यास कारणभूत शरांचें अपूर्णत्व म्हणजे तीक्ष्णत्वादि गुणांचा अभाव वर्णिला आहे. **'प्रतिबंधक असतांही कार्य घडे ती विभावना तिसरी । राया! त्वदसि भुजंगम दंश नरेंद्रांचि करि रणावसरीं' ॥ ७९ ॥** येथें नरेंद्र म्हणजे सर्पदंशास प्रतिबंधक अशा मंत्रौषधींनीं शोभणारे विषवैद्य श्रेपार्थानें घेतले आहेत. म्हणून येथें प्रतिबंधक असतांनाच (सर्पदंश हें) कार्य घडलें आहे. **'कार्य अहेतूपासुनि जरि घडतें तरि विभावना तुर्य । शंखापासुनि वीणानिनद निघे नवल! हें सुचातुर्य' ॥ ८० ॥** या उदाहरणांत स्त्रियेचा सुंदर कंठ शंखाच्या रूपानें व तिचें गायन वीणानादाचे रूपानें निश्चित केलें आहे म्हणून हें अकारण (वीणा शब्दास कारण नव्हे) अशा शंखापासून वीणानादरूपी कार्य झालें आहे. **'कार्यापासुनि कारण जन्मे तीही विभावना बा या । त्वत्करसुरतरुपासुनि सुयशोमयसिंधु निपजला राया' ॥ ८२ ॥ 'कार्य विरोधीपासुनि होतां पंचम विभावना होती । शीतकराचे किरणहि त्या सुकुमारीस ताप बहु देती' ॥ ८१ ॥** येथें तापाचे निवारक असल्यामुळें तापाशीं विरुद्ध अशा चंद्रकिरणांनीं संताप होतो असें सांगितलें आहे म्हणून ही **विभावना** (=विरुद्धभावना) होय. (अलंकारविकाश.) याचीं अन्य उदाहरणें:–(१) 'श्रीकृष्ण काळा यमुनाहि काळी, दंडूनि काळा फणि तेंन्हि काळीं । कालिंदिचें जीवन शुद्ध केलें, कथामृताला जन हे भुकेले ॥' (वामन). (२) 'आला प्रकाश नेत्रीं अंधत्वाचा वरें नुरे गंध, । परि भूप पुत्रमोहें केला पहिल्यापरीसही अंध ॥' [वनपर्व–अ० १३ गी० ९३ पृ० २०९], (३) 'श्यामलमूर्ति परी यश प्रसवे हरिहासादिक गौर ।' [मंत्रगर्भसाकी-रामायण–सा० १२ पृ० २४], (४) 'ते राजसुता सीता सेवितसे प्रेमयुक्त कमलाक्षा; । जीचे वनसंचारें, दिसती पद रक्त, जरि नसे लाक्षा ॥.' [मोरोपंत–मंत्ररामायण–अयोध्याकांड ५९.]

## अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी, पिंगळा,

१. **अजामिळ हा कनोज (कान्यकुब्ज) देशांतील एका विद्वान् अग्निहोत्री ब्राह्मणाचा मुलगा. कथासंदर्भः**—याला एका शूद्रस्त्रीलावण्याचा मोह पडला, तिलाही याला पाहून मोह उत्पन्न झाला. मग अजामिळानें स्वकुटुंबपरित्याग करून तिचा स्वीकार करून तिच्या संगतीं विषयसेवनांत बहुतेक आयुष्य घालविलें. तिच्यापासून त्यास दहा मुलें झालीं. त्यांत नारायण या नांवाचा सर्वांहून धाकटा आवडता मुलगा होता. त्यास पुत्रस्नेहानें सहज 'नारायणा! ये' अशी हांक मारिली. अंतसमयीं पुत्राच्या निमित्त ईश्वराचें नांव मुखांतून आलें म्हणून विष्णुदूत यास वैकुंठास नेण्यासाठीं आले. तों यमदूत अगोदरच हा मोठा पातकी असें समजून यास घेऊन चालले होते, पण विष्णुदूतांनीं यास सोडविलें. नंतर यालाही पश्चात्ताप झाला. तेव्हां यानें शूद्र स्त्रीचा त्याग करून अवशिष्ट आयुष्य गंगातीरीं भगवच्चिंतनांत घालविलें. अंतीं त्याला उत्तमलोकप्राप्ति झाली. (काव्यसंग्रहग्रंथमाला ८, वामनपंडितकृत कवितासंग्रह-नामसुधा-पृ० १९५.) २. **अघासुर-कंसाचा अनुचर एक राक्षस. हा बकासुर आणि पूतना (बकी) यांचा भाऊ होय. क० सं०**—कंसानें यास गोकुळांत कृष्ण व बळराम यांच्या नाशार्थ पाठविलें असतां, यानें तेथें जाऊन चार योजनें लांबीचा सर्पदेह धारण केला, व कृष्ण आणि इतर गोप यांच्या गाई चारण्याच्या मार्गांत आपलें शरीर पसरिलें. तसेंच आपलें मुख यानें इतकें विस्तीर्ण केलें होतें कीं, ती मोठी गुहा व गाई चारण्यास योग्य स्थळ आहे असें संपूर्ण गोपांस वाटून, ते तीन गाईंसुद्धां शिरले. हें कृष्णानें पाहून तो त्याच्या मुखांत शिरला व मोठा देह धारण करून त्यानें त्याचें मुख फाडिलें तेणेंकरून हा तात्काळ मरण पावला. ३. **व्रज+वधू=गोकुल+स्त्रिया=गोपिका.** ४. **'पूतना. कंसाची अनुचर राक्षसी. क० सं०**—ही कंसाच्या आज्ञेनें गोकुळांतील बाळकांचा संहार करीत शेवटीं तरुण स्त्रीचें रूप धारण करून, नंदगृहीं प्रवेशली. तें हिचें कपट कोणास न समजल्यामुळें, यशोदा आणि रोहिणी यांनीं तिला ती गोकुळांतीलच असेल असें जाणून, निवारण केलें नाहीं, म्हणून ती कृष्णाजवळ गेली व त्यास मांडीवर घेऊन पाजूं लागली. परंतु तिनें स्तनांत विष भरिलें होतें तें कृष्णास समजून त्यानें विषप्राशन करतां करतां त्यांत तिच्या प्राणांचेंही आकर्षण केलें. त्या वेदनेनें ती मरण पावली.' (भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश.) हरिवंशामध्यें पूतना हा एक पक्षी होता असें म्हटलें आहे. तसेंच कोणी पूतना नांवाचा एक बालग्रह आहे व त्या रोगाची त्या वेळेस गोकुळांत सांथ आली होती असें म्हणतात. सुश्रुतावरून पूतना हा एक बालग्रह आहे असें दिसून येतें. विशेष माहितीस्तव वि० ज्ञा० वि० पु० २२ अंक ९ यांतील श्रीकृष्णलीलामृत हा विषय पाहावा. ५. **पिंगळा-मिथिला नगरींत राहणारी एक वेश्या. क० सं०**—ही आपल्या वेश्याधर्माच्या नियमाप्रमाणें एके दिवशीं सायंकाळीं नित्याप्रमाणें सुंदर वेष करून द्वारांत उभी राहिली, व पुरुषाची मार्गप्रतीक्षा करूं लागली. परंतु त्या दिवशीं तिजकडे मध्यरात्रीपर्यंत कोणीच पुरुष आला नाहीं. असें पाहून तिला विरक्ति उत्पन्न झाली. नंतर तिनें हृदयस्थ जो परमपुरुष परमात्मा, तोच आपला सनातन पति, असें पूर्वपुण्यानें उमजून इतर पुरुषांविषयीं निंदा-

अशां गति दिली; उरे न तृण भेटतां इंगळा. ॥ २

पूर्वक गीत गाईलें. तें असें:—'संतं समीपे रमणं रतिप्रदं वित्तप्रदं नित्यमिमं विहाय। अकामदं दुःखभयादिशोकमोहप्रदं तुच्छमहं भजेऽज्ञा' ॥ (भागवत एकादश स्कंध). यांतील भाव:— 'माझा हृदयस्थ सनातन इत्यादि गुणांनीं युक्त पति मी सोडून अनित्यत्वादि गुणयुक्तांस मी भजतें. तेव्हां मजहून दुसरी अज्ञान स्त्री कोण आहे?' सारांश पुढें तो निंद्य व्यवहार तिनें सोडून दिला व आत्मस्वरूपीं रममाण होऊन कृतार्थ झाली.

१. **मुक्ति. या चार प्रकारच्या आहेत. सलोकता, समीपता, स्वरूपता व सायुज्यता.**
२. **'विंगळा' असाही पाठ आहे. इंगळ किंवा विंगळ म्हणजे अग्नि. संस्कृत शब्द प्राकृत भाषेंत येतांना जे अपभ्रंश होतात त्यांपैकीं 'इंगळा' 'विंगळा' हा शब्द संस्कृत 'अंगार' शब्दाचा अपभ्रंश होय. येथें 'अ'कार व 'र'कार यांचे 'इ'कार व 'ळ'कार झाले. 'इंगळासारखे लाल डोळे' ही उपमा मराठींत नेहमीं योजितात. इंगळा भेटतां तृण न उरे–असा अन्वय. गवत हें अग्नीला भेटलें तर तें उरेल काय? उरणार नाहीं. पाप्याचें पाप हें गवतासारखें आणि ईश्वर अग्नीसारखा तेव्हां त्याच्या पुढें पाप कसें राहील? येथें अजामिळादिकांचा उद्धार विशेष अर्थानें सांगून, अग्निसांनिध्यानें गवत जळतें, अशा सामान्य रीतीनें त्याचें दृढीकरण केलें म्हणून हा अर्थांतरन्यास अलंकार होय.** याचें लक्षण:–'उक्तिर**र्थांतरन्यासः** स्यात्सामान्यविशेषयोः। हनूमानब्धिमतरद्दुष्करं किं महात्मनाम् ॥.' **'सामान्य विशेषांची अर्थांतरन्यास उक्ति ती होय। हनुमंत अंबुधीतें तरला, दुष्कर महात्मया काय' ॥ १२० ॥ 'गुणि वस्तूच्या संगें अल्पहि पावे महत्त्व या लोकीं, । मालेच्या अनुषंगें सूत्रहि शिरिं धरिति लोक अवलोकीं' ॥ १२१ ॥** सामान्य आणि विशेष या दोहों अर्थांचेंही जें वर्णन तो **अर्थांतरन्यास** अलंकार होय. त्यांत एक प्रस्तुत आणि दुसरा अप्रस्तुत असा असतो. यामुळें विशेष अर्थ प्रस्तुत असून त्याबरोबर अप्रस्तुत सामान्य अर्थाचें वर्णन किंवा सामान्य अर्थ प्रस्तुत असून त्याबरोबर अप्रस्तुत विशेषरूप अर्थाचें वर्णन तो **अर्थांतरन्यास** होय. त्यांत पहिल्या प्रकारचें वर्णन उत्तरार्ध आहे आणि दुसरी गीति द्वितीय प्रकारचें उदाहरण आहे.' यांत व 'काव्यलिंग' या अलंकारांत फार साम्य आहे. 'इतकेंच मात्र कीं, प्रतिपादनीय व प्रतिपादक या अर्थांचा सामान्यविशेष संबंध असल्यास **अर्थांतरन्यास** आणि त्याहून अन्य संबंध असल्यास **काव्यलिंग** अशी व्यवस्था समजावी.' (अलंकारविकाश.) सुभाषितें प्रायः ह्याच सदराखालीं येतात. पंतांच्या काव्यांत यांची रेलचेल असल्यामुळें तें फार प्रौढ, उपदेशप्रचुर व सहृदयानंददायी असें उतरलें आहे. पंतांच्या काव्यांतील अर्थांतरन्यास एकत्र करून त्याचें जर एक पुस्तक केलें तर त्यावरून उत्तम नीतिशिक्षण देतां येईल अशी आमची खात्री आहे. ह्याचा संग्रह पंतांच्या काव्यांत किती आहे हें पहाणें असल्यास भारताचें कोणतेंही पान उलटावें म्हणजे खात्री होईल. **'उरे तृण न भेटतां इंगळा' यांत प्रतिवस्तूपमा अलंकार मानला तरी चालेल.** तुजपुढें अघाचल उरणार नाहींत असें म्हणावयाचें त्या ठिकाणीं त्वां अघाचल तारिले असें म्हटलें एवढाच फरक केला म्हणून ही **विलक्षभावा प्रतिवस्तूपमा** झाली. जेथें उपमानवाक्यांत आणि उपमेयवाक्यांत समान-

तुझ्या बहु शोधिले अघनिधी पदांच्या रजें;

धर्म (साधर्म्य) शब्दभेदानें दाखविलेला असतो तेथें **प्रतिवस्तूपमा** अलंकार होतो. 'आकाशांत रवि **शोभतो**, रणांत शूर **साजतो**' यांत शोभणें हा एकच अभिन्न धर्म **शोभतो** व **साजतो** या भिन्न शब्दांनीं दाखविला आहे, म्हणून ही **प्रतिवस्तूपमा** झाली. याचें लक्षण:-(१) 'वाक्ययोरेकसामान्यता प्रतिवस्तूपमा' [वाग्भट्टविरचिता अलंकारकौमुदी], (२) 'उपमानोपमेयार्थौ पृथग्वाक्यद्वये यदि । सामान्येन विनिर्दिष्टौ प्रतिवस्तूपमा मता । साधर्म्यवैधर्म्यभेदात्सा द्वेधा परिकीर्तिता ॥' [मंदारमरंदचंपू-व्यंग्यबिंदु-पृ० १२५], (३) 'वाक्ययोरेकसामान्ये प्रतिवस्तूपमा मता । तापेन भ्राजते सूरः शूरश्चापेन राजते ॥' [कुवलयानंद १७]. याचा भावार्थ:- जेथें 'इव' इत्यादिक शब्द न योजतां वस्तूनें साम्य प्रतिवस्तूनें दाखविलें असतें तेथें **प्रतिवस्तूपमा** होते. जेथें उपमानवाक्यांत आणि उपमेय वाक्यांत एकाच सामान्य धर्माचें कथन शब्दभेदानें (कचित् त्याच शब्दानें) केलें असतें तेथें **प्रतिवस्तूपमा** होते. **'समधर्म एकचि जरी ती प्रतिवस्तूपमा अनेकवचीं । नभिं शोभे रवि तापें, रणिं चापें शूर साजतो कवची ॥ ५२ ॥ जींत प्रतिवस्तूंत (प्रतिवाक्यार्थांत) उपमा (समानधर्म) आहे ती प्रतिवस्तूपमा अशी व्युत्पत्ति'** (अलंकारविकाश). याचीं उदाहरणें:-(१) 'त्या त्या कीर्तिन मुळें भीमापासूनि पावली भंग । मरकतमणिचयमणिपुढें गोमेदाचा फिका पडे रंग. ॥' [आदिपर्व-अध्याय १९ गीति ३१], (२) 'तो त्वदधिक मदधिक मज निंदो, तूं निंदिसी बळें कवणें? । गुरु निंदिल तदधिक खंटे, परि कोणत्या गुणें लवणें? ॥' [कर्णपर्व-अध्याय ४२ गीति ३०], (३) 'श्रमल्या, परि भीम उठे, सुचवी 'व्याकुळ न हो' असें तिजला । गज गांजितां व्रजस्थां सिंहां, गर्हित सिंह कां निजला?' ॥ १६० ॥ [विराटपर्व-अ० १], (४) 'स्पर्शों न देति वारे! स्पर्शींहा मन्मना विवेक मला, । गगनमणिकरांच्या तम केव्हां तरि काय हो! शिवे कमल्या' ॥ १६ ॥ [विराटपर्व-अ० १], (५) 'नररत्न तोचि, तूंचि स्त्रीरत्न उदंड आड नांवानीं । न युद्धिनि न वा नारिनि चित्रें वर्वहि आडनांवांचीं' ॥ ३५ ॥ [वनपर्व-अ० ४]. प्रतिवस्तूपमा वैधर्म्यानेंही होते, जसें-'विद्वानांचे परिश्रम विद्वान् मात्र समजतो, दुःसहप्रसववेदना वंध्या कधींही जाणत नाहीं' या उदाहरणांत 'समजतो' आणि 'जाणत नाहीं' या दोन भिन्न शब्दांनीं वैपरीत्य (वैधर्म्य) दर्शविलें आहे तरी येथें **प्रतिवस्तूपमा** होते. दुसरें उदाहरण:-'पुरुषीं गुण जरि असती प्रसिद्धी त्यांची तरी अपाप घडे । कस्तूरीचा परिमळ कळवाया शपथ वाहणें न पडे' ॥ (मोरोपंत).

१. **'तुमच्या पादरजानें पापी तारले हें मीच म्हणतों असें नाहीं; याला शिष्टजनांची उक्ति प्रमाण आहे असें दर्शवित होत्साता कवि प्रार्थना करितो'** (केकादर्श). **तुझ्या पदाच्या रजें (धूलिकणानें) अघनिधी (पापसमुद्र पापराशि) बहुत शोधिले (शुद्ध केले, निष्पाप केले. किंवा उद्धरण्याकरितां शोधून काढले)-असा अन्वय. ज्या पापराशिजनांला तुझ्या पायांच्या रजांचा स्पर्श झाला ते शुद्ध झाले असें तुझ्या चरणरजांचें माहात्म्य आहे. २. येथें 'शोधणें' म्हणजे 'शुद्ध करणें.' मूल संस्कृत 'शुंध्'-'शौचे,'** या धातूच्या अर्थाप्रमाणें येथें या क्रियापदाचा अर्थ जाणावा.

न तें [1]अनृत, वर्णिति बुध जनीं [2]सदाचार [3]जें; ।
असे [4]संतत ऐकते, सतत बोलते, [5]मीच ते
[6]प्रमाण न म्हणों [7]जरी उचित माझिया [8]नीचते. ॥ ३

---

१. असत्य. [अन् (नाहीं)+ऋत (सत्य). सत्य नाहीं तें.] असत्य नाहीं=तें खरें होय. येथें दोन नकार आहेत. त्यांचा परस्पर लोप झाला आहे असें समजावें. २. सत्+आचार=उत्तम, साधु+वर्तन=चांगला आहे आचार ज्यांचा ते सदाचार, आचारसंपन्न. ३. [असें] 'सदाचार (शिष्टाचारसंपन्न) बुध (ज्ञानी) जें जनीं वर्णिती (लोकांत सांगतात) तें अनृत न' (तें खोटें नव्हे, त्याला मी खोटें म्हणूं शकत नाहीं)-असा अन्वय. ४. 'असे शत, न एक ते' असाही पाठ आहे. त्याचा अर्थ 'असे वर्णन करणारे शतशः आहेत, एकच नाहीं. त्यांनीं तरी एकच वेळ सांगितलें आहे असें नाहीं तर, 'ते सतत बोलते=निरंतर खात्रीनें बोलतच आहेत.' वरच्या केकेंत दिलेला पाठ घेतला ह्मणजे असे-जे या प्रकारचे सतत (निरंतर) ऐकते-ऐकणारे, बोलते-बोलणारे जे कोणी सूतशौनकादि पुराणप्रसिद्ध ज्ञाते असा अर्थ होतो. ५. ते मीच जरी प्रमाण न म्हणों [तरि] माझिया नीचते उचित-असा अन्वय. असें वर्णन करणारे पुरुष, (न प्रमाण) असत्यवादी होते असें जर मी म्हणेन, तर माझ्याकडे नीचपणा मात्र येईल, म्हणून मला त्या शिष्टांचें बोलणें खोटें म्हणतां येत नाहीं. मी खोटें म्हणण्यास सिद्ध असलों तरी तसें म्हणण्यास मोठी अडचण आहे, कां कीं ही गोष्ट माझ्या अनुभवास आली नाहीं. 'प्रमाण न म्हणों जरी' इत्यादि पादांत **सम** नामक अलंकार आहे. जेथें कार्याचें कारणाशीं सारूप्य (सादृश्यसरूपत्व) असतें तेथें **सम** हा अलंकार होतो. 'सारूप्यमपि कार्यस्य कारणेन **समं** विदुः' [कुवलयानंद ९२]. **'वर्णिति जेथें उभया उचित पदार्थां पहा समचि हा रे । केलें स्थळ कुचमंडळ हें सूचित आपणासमचि हारें' ॥९१॥ (सूचित**-१ क्षत पावलेले, २ सुईनें टोंचलेले). **विषम** अलंकाराच्या उलट हा **समा**लंकार होय. **'कार्याचें हेतूशीं जरि समरूपत्व तो सम तसाच। नीचोन्मुख गति तुजला जलजेला इंदिरे! उचित साच' ॥ ९२ ॥ (नीचोन्मुख**=सखल प्रदेश, पक्षीं कुलहीन, **जलजेला**=उदकापासून निघालेल्या लक्ष्मीला.)' (अलंकारविकाश). याचें उदाहरण:-'श्रीकृष्ण रुक्मिणीला, श्रीकृष्णा रुक्मिणी जशी आतां । दमयंतीस नल, नला दमयंती आयकों जनें गातां ॥' (मोरोपंत-वनपर्व). प्रस्तुत स्थळीं 'प्रमाण न म्हणणें' हें कार्य आणि 'माझी नीचता' हें कारण, आणि प्रस्तुत कार्य हें कारणाशीं सरूप आहे असें वर्णन आहे म्हणून **सम** अलंकार झाला. ६. **प्रमाणभूत, खरें.** ७. 'जनीं' असाही पाठभेद आढळतो. ८. **नीचपणास. तुमच्या चरणधूलीनें पुष्कळ पापी तारले असें पुष्कळ ज्ञाते पुरुष म्हणतात. मीच तेवढा जर त्यावर विश्वास ठेवणार नाहीं तर नीच ठरेन-हा भावार्थ.**

तसाचि उरलों कसा? पतित मी नसें काय? कीं
कृपाचि सरली? असें हि न घडे जगन्नायकीं; ।
नसेन दिसलों कसा? नयन सर्वसाक्षी रवी,

---

१. मागील दोन केकांत भगवंतानें इतर महापापी जनांचा उद्धार केला म्हणून कवीनें सांगितलें. आतां स्वपतितत्व मनांत आणून कवी म्हणतात–मी जसा पापी आहें तसाच कसा राहिलों? मी जसा आहें तसाच कसा राहिलों? मी पावन कसा जाहलों नाहीं? २. पापी. मी मुळीं पापीच नाहीं काय? होय मी पतित आहें–असा काक्वर्थ इष्ट आहे. ३. पापी असून मग माझा उद्धार कां नाहीं केला अशी शंका घेऊन कवि म्हणतो:– कीं (किंवा) कृपाचि सरली? माझ्या वेळेस भगवंताच्या मनांतील कृपाच संपली काय? ४. जगन्नायकीं असेंहि न घडे=जो अखिल जगताचा नियंता (जगन्नायक) त्याच्या ठायीं हें (कृपा सरली हें) संभवत नाहीं. ५. जगत् (विश्व)+नायक (नियंता)=विश्वपालक. येथें 'जगन्नायकीं' हें विशेष्य साभिप्राय आहे म्हणून परिकरांकुर नामक अलंकार झाला आहे. 'साभिप्राये विशेष्ये तु भवेत् **परिकरांकुरः**' असें याचें लक्षण कुवलयानंदांत आहे. 'साभिप्राय विशेष्यचि असलें तरि होय परिकरांकुर हो । चारी पुरुषार्थांचा दाता अजि देव मज चतुर्भुज हो ॥ ६३ ॥ येथें 'चतुर्भुज' या विशेष्यांत चारी पुरुषार्थ देण्याचें सामर्थ्य देवांमध्यें आहे असा अभिप्राय गर्भित आहे.' (अलंकारविकास). याचीं अन्य उदाहरणें:–(१) '**जिष्णु**पुढें असुरजनीं कोणी वैरा टिके सरी करिसा।' [विराटपर्व–अध्याय ३ गी० ९], (२) 'श्रीरपण **अनंताचें** अनंत, वर्णील काय कविहीर; ।' [उद्योगपर्व–अध्याय ७ गी० ६३]. जेथें विशेषण साभिप्राय असतें तेथें **परिकर** नामक अलंकार आणि जेथें विशेष्य साभिप्राय असतें तेथें '**परिकरांकुर**' अलंकार होतो–असा या दोहोंत भेद आहे. ६. आतां मी पतित आहें व भगवंताची पतितोद्धरणरूप कृपाही सरली नाहीं, पण मी भगवंतास दिसलोंच नाहीं, मग ते माझा उद्धार कसा करितील? अशी शंका कवि घेऊन आपणच तिचें निरसन करितात. मी भगवंताच्या दृष्टीस पडलों नसेन असें कसें होईल? या केकेंत भगवंतास मी दिसलों नाहीं म्हणावें तर तें अशक्य इत्यादि शंकासमाधानांनीं आपल्या तारणाविषयीं विपुल सामग्री (कारण) सज्ज असतां मी तसाच पतित उरलों हें कार्य दाखविलें आहे, म्हणजे तारणरूप कार्याची अनुत्पत्ति वर्णिली आहे म्हणून येथें विशेषोक्ति अलंकार झाला आहे. याचें लक्षण:–(१) 'कारणसामग्र्ये कार्यानुत्पत्ति**र्विशेषोक्तिः** ।' [अलंकारसर्वस्व–पृ० १२६], (२) '**विशेषोक्ति**रखंडेषु कारणेषु फलावचः ।' [काव्यप्रकाश–पृ० १७८]. अखंडेषु (मिलितेषु) [प्रसिद्धकारणेषु सत्सु] फलावचः (कार्याभाववचनं) **विशेषोक्तिः**], (३) 'प्रसिद्धकारणकलापसामानाधिकरण्येन वर्ण्यमाना कार्यानुत्पत्ति**र्विशेषोक्तिः**' [रसगंगाधर–पृ० ४३७], कारणसामग्री विपुल असूनही जेथें अवश्य कार्याची अनुत्पत्ति वर्णिली आहे तेथें **विशेषोक्ति** अलंकार होतो. हा अलंकार **विभावनेच्या** विरुद्ध आहे. कारण नसतांही कार्याची उत्पत्ति वर्णिली असली म्हणजे

विषाद धरिला म्हणों? न सुरभी विषक्षीर वी. ॥ ४

---

**विभावना** अलंकार होतो. 'विनापि कारणं कार्यस्योत्पत्तिः स्याद्विभावना'–[मंदारमरंदचंपू.] **'कारण पूर्णहि अमतां होय विशेषोक्ति कार्य जरि नोहे । स्मरदीप जळत असतां स्नेह नव्हे क्षीण जो मनीं आहे' ॥ ८३ ॥** (अलंकारविकाश.) **विशेषोक्ती**चीं अन्य उदाहरणें:– (१) 'सहदेवासि म्हणे, 'त्वां कां रे! जीव न दिला? परवश स्त्री । कसि देखिली? सहाता दासीचाहि न विलापरव शस्त्री ॥.' [मोरोपंत–उद्योगपर्व–अ० १२ गी० ११ पृ० २४७], (२) तो दुष्ट आहे खरा, तरी कोणाचा घात म्हणून करीत नाहीं. ७. **सर्वसाक्षी रवी [भगवंताचा] नयन आहे=सृष्टींतील यावत् स्थूल सूक्ष्म पदार्थ पाहणारा असा जो सूर्य तो भगवंताचा नेत्र आहे. सूर्यरूप चक्षूनें पाहाणाऱ्यास कोणताही पदार्थ दिसल्यावांचून राहणार नाहीं; मग मीच कसा दिसणार नाहीं? सूर्यचंद्र हे भगवंताचे नेत्र म्हणून श्रुतिस्मृतींत पुष्कळ ठिकाणीं वर्णन आढळतें.– 'अग्निर्मूर्द्धा चक्षुषी चंद्रसूर्यौ,' 'चंद्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्योऽजायत'** [पुरुषसूक्त.] 'अग्नि हा भगवंताचें मस्तक व सूर्यचंद्र हे नेत्र आहेत.' 'भगवंताच्या अंतःकरणापासून चंद्र आला व सूर्य हा त्याच्या डोळ्यापासून झाला.'

१. **कंटाळा, राग.** आतां अशी शंका येते कीं मी पापी आहें, भगवंताच्या मनांत कृपाही आहे व मी दिसलोंही आहें, पण भगवंतांनीं माझ्याविषयीं मनांत क्रोध धरिला असें म्हणों म्हणजे कदाचित् म्हणावें तर, भगवंतांनीं मनांत कंटाळा किंवा राग धरिला तरी त्यांनीं कोणाचें अकल्याण केलें नाहीं. याविषयीं दृष्टांत कवीनें पुढें दिला आहे. २. **कामधेनु.** 'कामधेनूनें मनांत विषाद जरी धरिला तरी ती विषरूप क्षीर (दुग्ध) वीत नाहीं म्हणजे स्तनद्वारा विष प्रसवत नाहीं. तिजपासून अमृतच प्राप्त होतें, तसें मजविषयीं जरी तुम्ही विषाद (क्रोध) धरिला तरी तुम्ही माझें कल्याणच कराल असा भरंवसा आहे. परंतु हा काळपर्यंत माझ्या उद्धाराविषयीं उपेक्षा झाली म्हणून मी प्रार्थना करितों-असा भाव' (केकादर्श). **भक्तांचे मनोरथ पूर्ण करण्याविषयीं परमेश्वर साक्षात् कामधेनु आहे. तेव्हां त्यानें भक्तांविषयीं मनांत राग जरी धरिला तरी तो दयेच्या ठिकाणीं निर्दयतेचा अवलंब करणार नाहीं.** 'यद्यपि, 'सुरभि' शब्द सामान्य धेनुवाचक आढळतो, तथापि विशेषेंकरून येथें कामधेनुवाचकच घेतला पाहिजे; कारण पाहिजे तसें विकृत दुग्ध देण्याचें सामर्थ्य तिच्याच ठायीं संभवतें; इतर धेनूच्या ठायीं तें सामर्थ्य नसल्यानें तद्व्यतिरिक्त धेनूचें ग्रहण उपमेंत योग्य होणार नाहीं. इतर गाईस अत्यंत विषाद आला तथापि विषाचें दूध देऊं म्हटल्यासही तिच्यानें देववत नाहीं; कामधेनु तसें दूध देण्यास समर्थ असतांही जसें स्वकारुण्यास्तव तें ती देत नाहीं, तसें तदुपम करुणामय भगवानही शरणागतांवर आपलें नैर्घृण्य प्रकट करीत नाहीं, म्हणून येथें कामधेनूच्या उपमेनें भगवंताचें भक्तवात्सल्य विशेषेंकरून प्रस्फुट होतें.' (यशोदापांडुरंगी.) ३. **'दुग्धं क्षीरं पयः समम्' इत्यमरः. दूध.** ४. 'येथें दूध देणाऱ्या अर्थसंबंधानें जरी **'विणें' ह्या क्रियेचा प्रयोग भाषारूढीस प्रचारांत दिसत नाहीं, व तो प्रयोग सांप्रत पशुजननाविष-**

यांत प्रसिद्ध आहे, तरी **'विणें' म्हणजे प्रसवणें–शारीरधर्मानें उत्पन्न करणें,** अशा मूळच्या सामान्य अर्थावर दृष्टि दिली असतां सांप्रतच्या प्रयोगास बाध येतो असें वाटत नाहीं. **तुकोबानें** या क्रियेचा प्रयोग एके ठिकाणीं मनुष्यजननाच्या अर्थी केला आहे:–**'कोड पुरविना बाळाची ।** मग ते कासयाची माउली । जाण कासयासाठीं व्याली ॥'. तसेंच आणखी **'विणें' या धातूचा** शुद्ध 'उत्पन्न करणें' अशा अर्थींही प्रयोग आढळतो:–'तामस अहंकार गगनातें । **गगन व्यालें** पवनातें । तो पवन दहनातें । प्रसवता झाला ॥' (विवेकसिंधु) [यशोदापांडुरंगी]. 'सारांश, **या केकेंत कवीनें प्रथम चरणांत स्वपातित्य, दुसऱ्यांत भगवंताचें कृपालुत्व, तिसऱ्यांत त्याचें सर्वसाक्षित्व, आणि चवथ्यांत त्याची सदयता, हीं अन्वयव्यतिरेकरूपानें वर्णिलीं आहेत असें समजावें'** (५० पां०). **'विषाद धरिला' इत्यादि यांत** भिन्नभिन्न धर्म दाखविले यास्तव **दृष्टांत नामक अलंकार झाला आहे,** विष विणें आणि विषाद धरणें यांत बिंबप्रतिबिंबभाव आहे, म्हणून हा **दृष्टांत** अलंकार होय. **दृष्टांत** अलंकाराचें लक्षण:–(१) 'चेत बिंबप्रतिबिंबत्वं **दृष्टांत**स्तदलंकृतिः । त्वमेव कीर्तिमान् राजन् विधुरेव हि कांतिमान् ॥ ५३ ॥' (कुवलयानंद). **'दृष्टांत अलंकृति जरि बिंबप्रतिबिंबभाव धर्मयुगा । जगिं कीर्तिमंत तूंचि क्षितिनाथा, कांतिमंत इंदुचि गा! ॥ ५३ ॥'** (अलंकारविकाश). जेथें बिंबप्रतिबिंबन्यायानें उपमानोपमेय वाक्यांत भिन्न धर्म दाखविले असतात, तेथें **दृष्टांत** नामक अलंकार होतो. 'हे राजा! तूंच कीर्तिमान् आहेस, चंद्रच कांतिमान् आहे' या उदाहरणांत कीर्ति आणि कांति या भिन्न धर्मांचें वर्णन बिंबप्रतिबिंबन्यायानें केलें आहे, अथवा कीर्ति आणि कांति या भिन्न धर्मांचा बिंबप्रतिबिंबभाव दाखविला आहे. (२) **'अर्थविशेषः पूर्वं** यादृक् न्यस्तो विवक्षितेतरयोः । तादृशमन्यं न्यस्येद्यत्र पुनः सोऽत्र **दृष्टांतः** ॥' [रुद्रटप्रणीत **काव्यालंकार**–अध्याय ८ श्लो० ९४ पृ० ११८]. जेथें प्रस्तुत व अप्रस्तुत अशा अर्थविशेषांमधून ज्या प्रकारचा अर्थविशेष पूर्वी सांगितला आहे त्याच प्रकारचा अर्थविशेष वक्ता जर पुनः सांगेल तर तेथें **दृष्टांत** नामक अलंकार होईल. जेथें प्रकृत अर्थविशेषाच्या बोधासाठीं अप्रकृत अशा अर्थविशेषाचा दाखला दिलेला असतो तेथें **दृष्टांत** अलंकार होतो. या अलंकाराचीं उदाहरणें:–(१) 'असोत लक्षावधि अन्य भूपती, राजन्वती यासि नरेश्वरें क्षिति । नक्षत्र तारे दिसतो जसे हिरे, ज्योतिष्मती होय निशा निशाकरें ॥' [लेलेकृत रघुवंश–सर्ग ६ श्लो० २२ पृ० ७२], (२) 'न कळतां पद अग्निवरी पडे, न करि दाह असें न कधीं घडे । अजितनाम वदो भलत्या मिसें, सकळ पातकें भस्म करीतसे ॥.' [वामनपंडित], (३) 'परकरगतस्वकलत्र स्पर्शेंचि महायशासि वाहविलें । कोण प्राज्ञ म्हणेल, श्वा शिवला जो तसा शिवा हवि तें ॥' [मोरोपंत–मंत्ररामायण, युद्धकांड], प्रस्तुत केकेच्या तिन्ही चरणांत ईश्वराच्या कृपा, सर्वसाक्षित्व आणि दया या धर्मांवर **आक्षेप** घेऊन त्यांचें निराकरण केलें आहे म्हणून हा **धर्माक्षेप** अलंकार समजावा. [दंडी–काव्यादर्श–२ परिच्छेद–श्लो० १२७-१२८ पृ० १६८.] जेथें एखाद्या गोष्टीचें विधान करून पुनः आपणच त्याचा विचारानें निषेध करणें म्हणजे आपणच केलेलें विधान विचारानें खोडून काढणें तेथें **आक्षेप** नामक अलंकार होतो. याचें लक्षण:–**'आक्षेपः स्वयमुक्तस्य प्रतिषेधो**

व्रजावन करावया बसविलें नखाग्रीं धेरा;

---

विचारणात्' [कुवलयानंद]. **'तो आक्षेप निजोक्तिप्रतिषेध करी जरी नर विचारें । चंद्रा दर्शन देईं, अथवा आहे प्रियावदन वा! रे ॥ ७३ ॥'** या उदाहरणांत प्रियस्त्रीचें मुख विद्यमान आहे या कारणानें पूर्वी प्रार्थिलेल्या चंद्रदर्शनाचें निष्फलत्व मनांत आणून 'अथवा' इत्यादि रीतीनें त्याचा निषेध सुचविला आहे म्हणून हा **आक्षेप** अलंकार होय. **'आभास निषेधाचा कोणी बुध त्यासि म्हणति आक्षेप । दूती न मी, परि तिचा प्रलयानलसाच साच तनुताप ॥ ७४ ॥'** कोणी **अलंकारसर्वस्व**कारादि असें म्हणतात कीं, सर्वच प्रकारांचा निषेध कांहीं आक्षेपालंकार होत नाहीं; तर जो निषेध बाधित (खोटा) होत्साता अर्थांतरावर पर्यवसित होऊन कांहीं एक विशेष प्रकारचा अर्थ भासवितो तो निषेध मात्र आक्षेपालंकार होय. जसें वरील दूतीच्या भाषणांत 'दूती न मी' असा निषेध आहे तो खोटा असल्यामुळें केवळ भासरूप असून, समागमप्रवृत्तीस योग्य अशा कपटवचनांच्या निराकरणानें आपण सत्यवादिनी आहें, अशा अर्थावर पर्यवसित होऊन असा विशेष अर्थ मनांत भासवित आहे कीं 'मी दूती म्हणून हें सांगत नाहीं परंतु खरोखरच नायिकेचा ताप फार भयंकर आहे यास्तव आतांच जाऊन तुम्हीं तिला जीवन द्यावें.' **'आक्षेप होय तोही विधि असतां व्यक्त, गुप्तचि निषेध । जा, जासि तरि कांता! जन्म घडो मज तिथेंचि निर्वेध ॥ ७५ ॥'** या उदाहरणांत 'जा' असा विधि व्यक्त असून जाऊं नकोस असा निषेध गुप्त आहे, म्हणजे ज्या ठिकाणीं जाण्याचा पतीचा उद्देश आहे त्या देशांतच मला जन्म होवो अशा प्रार्थनेच्या द्वारें आपल्या मरणाच्या सूचनेनें आच्छादित केला आहे.' (अलंकारविकाश.) याचें अन्य उदाहरण:-(१) 'किंवा तुज गुंतविलें भजकीं, परि ते दयाळ्र या रंकीं । उद्धरत्यासि न सज्जन गुंतविती, गाय कष्टतां पंकीं. ॥ १० ॥' [मोरोपंत-संशयरत्नमाला.] याला इंग्रजी अलंकारशास्त्रांत Prolepsis म्हणतात.

१. **तुम्ही म्हणाल कीं, तूं जड पतित आहेस म्हणून तुझा उद्धार करण्याचा मला विषाद झाला आहे. तर महाराज, तुम्हीं मजपेक्षां अतिशयित जड पदार्थ उचलले आहेत; असें दाखवीत होत्साता कवि भगवंतास म्हणतो:-व्रजावन-व्रज (गोकुल)+अवन (रक्षण)-गोकुळाचें रक्षण. येथें 'व्रज' शब्दाचा अर्थ उपादानलक्षणेनें तत्रस्थ स्त्री, पुरुष व गोधन इतका समजावा.** 'गोमान् गोमी गोकुलं तु गोधनं स्याद्गवां व्रजे' अमर. या उपादानलक्षणेचें स्वरूप **विश्वनाथ** कविराजानें **'साहित्यदर्पणां'**त आणि **मम्मटाचार्यानें 'काव्यप्रकाशां'**त असें केलें आहे:-'मुख्यार्थस्येतराक्षेपो वाक्यार्थेऽन्वयसिद्धये । **स्यादात्मनोऽप्युपादानादेषोपादान**लक्षणा ॥' [परिच्छेद २।१४], 'स्वसिद्धये पराक्षेपः परार्थं **स्वसमर्पणम्** । उपादानं लक्षणं चेत्युक्ता **शुद्धैव** सा द्विधा ॥' [काव्यप्रकाश-द्वितीय उल्लास.] **मुख्यार्थ** जमत नसल्यास मुख्यार्थाचा व लक्ष्यार्थाचा संबंध धरून लक्षणा करावी. **लक्षणेचे मुख्य दोन प्रकार** आहेत. एक **उपादानलक्षणा** व दुसरी **लक्षणलक्षणा.** जेथें वाक्यार्थाच्या **अन्वयसिद्धीकरितां अर्थांतरांत मुख्यार्थाचा स्वीकार होतो तेथें उपादान लक्षणा जाणावी.** त्या **लक्षणेस असें नांव पडण्याचें कारण हींत मुख्यार्थाचें उपादान (स्वीकार) होतें. उपादानलक्षणा व लक्षणलक्षणा या दोहोंत फरक एवढाच कीं पहिलींत लक्ष्यार्थानें मुख्यार्थाचा संबंध असतो**

[1]सलील तइं [2]मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं [3]धरा; ।

---

व दुसरींत तो नसतो. 'कुंताः प्रविशंति,' 'श्वेतो धावति' हीं उपादानलक्षणेचीं उदाहरणें होत. 'कुंताः प्रविशंति' म्हणजे भाले शिरतात, अर्थात् भालेवाले शिपाई शिरतात. यांत लक्ष्यार्थ जो भालेवाले शिपाई यांत मुख्यार्थ जो भाले याचा समावेश होतो, तसेंच 'श्वेतो धावति' म्हणजे पांढरा धांवतो, अर्थात् पांढऱ्या रंगाचा घोडा धांवतो. यांतही 'पांढऱ्या रंगाचा घोडा' ह्या लक्ष्यार्थांत 'पांढरा' हा मुख्यार्थ येतो. 'गंगायां घोषः' हें लक्षणलक्षणेचें उदाहरण. 'गंगेच्या तीरावरचा गांव' या लक्ष्यार्थांत मुख्यार्थ गंगाप्रवाहावरचा गांव हा येत नाहीं. कारण प्रवाहाचा व तीराचा कांहीं एक संबंध नाहीं. **या उपादानलक्षणेस अजहत्स्वार्था** [अ (नाहीं)+जहत् (सोडीत) स्वार्था (स्वार्थ=मुख्यार्थ जी)] **असेंही म्हणतात.** कारण यांत मुख्यार्थ सुटत नाहीं. ह्या केकेंत 'व्रजाचें रक्षण' म्हणजे व्रजस्थित व्रजस्थ जे गवळी त्यांचें रक्षण. मूळ लक्षणेचे भेद दोनः–शुद्धा आणि गौणी. शुद्धेचे दोन–उपादानलक्षणा व लक्षणलक्षणा; या प्रत्येकीचे दोन भेदः–सारोपा व साध्यवसाना; यावरून शुद्धलक्षणेचे चार भेद झाले. गौणी लक्षणेचे दोन भेदः=सारोपा व साध्यवसाना. याप्रमाणें लक्षणा षड्विध आहे. या उपादानलक्षणेचीं अन्य उदाहरणें:—(१) 'राक्षसें घालितां त्या कपिपृतना कास, । देती राक्षस हर्ष बहु होउनि मृत नाकास. ॥ ५८ ॥' [मोरोपंत–दोहारामायण–रामायणें भाग ३–पृ० १०९]. याचें इंग्रेजींत नांव Metonymy.

२. **धरा=पर्वताला; गोवर्धन पर्वतास.** 'महीध्रे शिखरिक्ष्माभृदहार्यधरपर्वताः' इत्यमरः. **कृष्णपिता नंद हा प्रतिवर्षीं इंद्रयाग करीत असे, तो रहित करवून आपलें सामर्थ्य इंद्रास दाखविण्यासाठीं कृष्णानें नवाच गोवर्धनयाग काढिला. त्यावरून इंद्रदेव अत्यंत क्रुद्ध होऊन त्यानें सप्ताहोरात्र भयंकर जलवर्षण चालविलें. यामुळें गाई, गोपगण, यांस खाण्यास मिळेना, आणि वर पावसाचा मारा, तेणेंकरून ते सर्व मृतप्राय होऊन गेले. तेव्हां कृष्णानें गोवर्धनगिरि उपटून काढून तो आपल्या करांगुलीवर धरिला व गोकुळवासी जन व गाई यांचें वृष्टीपासून रक्षण केलें. या कथेकडे कविकटाक्ष आहे.** [मोरोपंत–कृष्णविजय–पूर्वार्ध–अ० २५ पृ० ६६-७१.]

**१. सहज रीतीनें. २. मंदर+आख्य=मंदर आहे आख्या (नाम) ज्याची तो मंदराख्य (नग=पर्वत). नग=अचल, पर्वत. न गच्छतीति नगः=जो हालत चालत नाहीं तो नग. कवि भगवंतास म्हणतात, 'कदाचित् तूं म्हणशील कीं प्रजांचें रक्षण करण्याकरितां मीं एक लहानशी टेंकडी उचलली यांत कांहीं मोठासा पराक्रम केला नाहीं. म्हणून दुसरें उदाहरण देतोंः–तैं=तेव्हां, समुद्रमंथनसमयीं. समुद्रमंथनसमयीं तुम्ही कूर्मावतार (कांसवाचा अवतार) धरून मंदरनामक मंथनदंड केलेला पर्वत आपल्या पाठीवर सहज धरिला, सलील–सहज, लीलेनें अनायासानें. देवदानवयुद्धांत देवांची सर्व संपत्ति दानवांनीं समुद्रांत टाकिली. ती काढण्याकरितां देवांनीं दैत्यांसह समुद्रमंथन आरंभिलें. त्या वेळेस मंदराचलाचा मंथनदंड व वासुकीची दोरी केली. मंदराचल अतिभारानें समुद्राच्या तळीं जाऊं लागला. तेव्हां देवांनीं विष्णूची स्तुति केली. त्या वेळीं त्यानें कूर्मावतार धारण करून आपल्या पाठी-**

वैराहतनु घेउनी, उचलिली रैदाग्रें धैरा;
सुँदुर्धर तुम्हां कसा पतित हा? न कां उँद्धरा? ॥ ९

वर मंदरपर्वतास सांवरून धरिलें. या कथेचा उल्लेख आहे. [मोरोपंत–अवतारमाला–अवतार १२ गीति ६५-६९.] ३. धरिता झाला. 'तुम्हीं' (हें कर्तृपद अध्याहृत समजावें.)

१. वराह+तनु=डुकर+देह=शूकरदेह. कथासंदर्भः—ब्रह्मदेवाच्या नासिकेंतून झालेल्या हिरण्याक्षनामक दैत्याच्या वधार्थ विष्णूनें वराहरूप घेऊन समुद्रांत एकसहस्र वर्षें त्या दैत्याशीं युद्ध केलें व त्यास मारून, त्यानें पाताळीं घालनेली पृथ्वी दाढेच्या अग्रभागानें उचलून पूर्वस्थानीं स्थिर केली. [मोरोपंत–अवतारमाला–अवतार १ गीति १-१२.] २. दंताच्या अग्रभागानें. ३. पृथ्वी. 'क्षमा शांतिः क्षमा धरा' (विश्व). ही एकापेक्षां एकाधिक अशा मोठ्या पर्वतांची गोष्ट तर राहूं द्या, परंतु भूचरांसह साऱ्या पर्वतांस धारण करणारी जी पृथ्वी ती नुसत्या आपल्या दाढेच्या अग्रभागानें उचलून धरिली, इतकें शरणागतांच्या रक्षणाकरितां त्वां साहस केलें; [य० पां०] (मग माझी उपेक्षा कां?) असें कवीला पुढें म्हणावयाचें आहे]. ४. हा पतित तुम्हां सुदुर्धर कसा? कां न उद्धरा?—असा अन्वय. 'हा जो मी (येथें कवि आपल्यास दास्वविनात) पतित–अधःपातोन्मुख–अर्थात् पापी, तुम्हां–तुम्हांस, सुदुर्धर–धरावयास अत्यंत कठीण, अर्थात् अत्यंत अनंगीकार्य, कसा–कोणत्या कारणानें (कसा हें येथें विस्मयान्वित प्रश्नार्थक सर्वनाम जाणावें; उदाहरण–'मी मूर्ख कसा तें सांग,' म्हणजे कोणत्या कारणानें मी मूर्ख तें सांग–असा अर्थ. अशाच अर्थी येथें या 'कसा' सर्वनामाचा प्रयोग जाणावा)' [य० पां०] 'तुम्हीं व्रजरक्षणार्थ पर्वत नखाग्रीं धरिला' इत्यादि मोठमोठे पराक्रम केले असतां, हा पतित त्या न्यायानें तुम्हांस पाहतां उद्धरण्यास कांहींच अशक्य नाहीं, तर तुम्हांस हा सुदुर्धर कसा? अशा प्रश्नालंकारानें येथें 'काव्यार्थापत्ति' नामक अलंकार झाला आहे. 'कैमुत्यन्यायानें काव्यार्थापत्ति अर्थसिद्धि सुखें। कमलांची काय कथा, तो इंदुहि जिंकिसी सखे! स्वमुखें ॥' या उदाहरणांत 'तो' या पदानें ज्यानें कमलांस जिंकिलें तो असा अर्थ विवक्षित आहे. एवंच तो चंद्रहि ज्यानें जिंकिला त्यानें कमलांस जिंकिलें हें काय सांगावयाचें? (एखादें असाध्य कृत्य केल्यानंतर जेथें इतर गोष्ट न बोलतां गृहीत होते त्यास कैमुत्यन्याय म्हणतात,) अशा प्रकारें कैमुत्यन्यायानें किंवा दंडापूपिकान्यायानें कमलजयरूप अर्थाची सिद्धि होते म्हणून ही काव्यार्थापत्ति होय. (नवरात्रांत देवीवर फुलवरा बांधतात त्या प्रसंगीं जसें मंडपींचें लांकूड घेतलें म्हणजे ते अपूप घेतले जातात त्याप्रमाणें एखाद्या गोष्टीची सिद्धि झाली म्हणजे जेथें दुसऱ्या एखाद्या गोष्टीची सिद्धि आपोआप होते तेथें दंडापूपन्याय होतो.) लठ्ठ मनुष्य दिवसा जेवीत नाहीं यावरून रात्रि भोजन होतें तिचें नांव अर्थापत्ति म्हणतात. तंत्रशास्त्रप्रसिद्ध अर्थापत्तीचें निवारण करण्याकरितां काव्य असें विशेषण दिलें आहे.' (अ० वि०.) जेथें कैमुतिकन्यायानें अर्थसिद्धि होते तेथें अर्थापत्ति नामक अलंकार होतो याचीं उदाहरणें:—(१) मोठे मोठे राजे जेथें नम्र होतात तेथें सामान्य जनाची गोष्ट कशाला? (२) तीर वाघाला मारतो मग बिचाऱ्या चिमण्यांची काय कथा? (३) हे स्त्रिये! तुझ्या मुखानें चंद्र जिंकिला मग

कमळाची काय कथा? (४) या हत्यारानें कठीण लांकूड तुटतें मग कोंवळ्या गवताची गोष्ट काय सांगावी? हीं सारीं उदाहरणें यान अलंकाराचीं आहेत. पंतांच्या काव्यांत या अलंकाराचीं उदाहरणें पुष्कळ सांपडतात:—(१) 'तव सेवक मर्यादाविलंघनीं मात्र हो न हे सकती। प्लवग तवांघ्रिप्लवगत, तरले भवसिंधु, हा समुद्र किती? ॥' [मंत्ररामायण–युद्धकांड–गीति २० पृष्ठ ८९], (२) 'जसि जसि समृद्धि अहिनीं तसि तसि चिंतारुजा मनीं वाढे। अमृतरसहि न शके मग तच्छमनीं काय बापुडें काढें? ॥' [मोरोपंत–भारत], (३) 'या दृढ मदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला। मर्त्यांची काय, कथा प्राकृतसा काय कर्ण हा गमला? ॥' [कर्णपर्व]. या अलंकाराचें लक्षण व उदाहरण कुवलयानंदांत सांगितलें आहे:—'कैमुत्येनार्थसंसिद्धिः काव्यार्थापत्तिरिष्यते। स जितस्त्वन्मुखेनेंदुः का वार्ता सरसीरुहाम्. ॥' फिरून कवि मनांत आशंका घेऊन म्हणतात, 'तुम्हीं पीडित शरणागतांच्या रक्षणार्थ इतके उद्योग केले, त्या त्वां माझा उद्धार करूं नये असा कांहीं महापापी मी खचित नसेन.' ५. वरील तर्क जर खरा असेल तर मग माझा उद्धार करण्यास उशीर कां? लवकर धांवा आणि माझें रक्षण करून माझा उद्धार करा—हा भाव. **या केकेंत पहिल्या तीन चरणांत गोवर्धनधारण, मंदरधारण व धरासमुद्धरण असे उत्तरोत्तर व वरचढ पराक्रम वर्णिले आहेत म्हणून हा सार अलंकार जाणावा.** याचें लक्षण:—'उत्तरोत्तरमुत्कर्षो वस्तुनः **सार** उच्यते' [**साहित्यदर्पण ७३१**]. **'उत्कर्ष उत्तरोत्तर वर्णिति तरि म्हणति कवि तया सार। मधु मधुर, सुधा त्याहुनि, कविवरवच तीहुनीहि बहुसार ॥ १०६ ॥' जेथें उत्तरोत्तर उत्कर्षाचें वर्णन केलेलें असतें तेथें सार नामक अलंकार होतो.** एका गुणापेक्षां दुसरा गुण पायरीनें अधिक, दुसऱ्यापेक्षां तिसरा गुण पायरीनें अधिक, असें वर्णन असून सर्व गुणांचें सार शेवटीं सांगितलें असतें म्हणून या अलंकाराला **'सार'** असें म्हणतात. जसें:–(१) संसारामध्यें मनुष्यपण सार आहे, मनुष्यपणांत कुलीनत्व सार आहे, कुलीनत्वांत धार्मिकत्व, आणि धार्मिकत्वांत सदयत्व. (२) मधाहून सुधा गोड आहे, सुधेहून कविवाणी गोड आहे. (३) 'जये धरित्र्याः पुरमेव सारं, पुरे गृहं सद्मनि चैकदेशः। तत्रापि शय्या शयने वरा स्त्री, रत्नोज्वला राज्यसुखस्य सारः' (**बृहत्संहिता–पृ० ४०९**). (४) 'ऐसें असतां भ्राता, तोही स्वज्येष्ठ त्यांतही राजा, । तत्रापि धर्मकोविद, बहु मानी आणि शांततव आज्ञा ॥ २६ ॥ पांडुसमानें त्यानें धर्मज्ञा! मारितोसि पामरसा; । रोदन करील वेगें विसरविला आठवूनि राम रसा. ॥ २७ ॥' (कर्णपर्व–अ० ४१). या अलंकाराला इंग्रजी साहित्यशास्त्रांत *Climax* असें म्हणतात. याचें एक सुरेख उदाहरण:—"It is an *outrage* to *bind* a Roman citizen; to *scourge* him is an *atrocious crime*; *to put him to death* is almost a *parricide*; but to *crucify* him *what shall I call it?*" प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकार **मेकाले** यानें महाकवि **मिल्टन** याच्या कवितेविषयीं जें म्हटलें आहे तें पंतांच्या **केकावली**ला बरोबर लागू पडतें. **मेकालेच्या मतें मिल्टनच्या कवितेचा एक मोठा** गुण हा आहे कीं, 'त्याचा ठसा, त्यांत वर्णिलेल्या गोष्टींपेक्षां, त्या वाचून सुचलेल्या गोष्टींनीं ज्यास्त होतो. वाचकांस त्याची कविता वाचून जे निरनिराळे प्रसंग आढळतात व चमत्कृतिजन्य व आनंददायी देखावे दिसतात त्यांमुळें त्यांच्या मनावर उत्कृष्ट परिणाम होतो.' केकावलीस हीच खुबी

नतावनधृतव्रत ज्वलन तूंचि बाधावनीं;

दृष्टीस पडते. त्यांत जे दृष्टांत दिले आहेत ते वाचून भारतपुराणेतिहासांतील कथा जाणणाऱ्या वाचकांना ते ते प्रसंग ध्यानांत येऊन किती तरी गोष्टी सुचतात व त्यांत त्यांचें मन किती तरी तल्लीन होऊन जातें. या लहानशा काव्यांत ज्यांचा उल्लेख आला आहे अशा बहुतेक कथा या प्रकारच्या आहेत. इतकेंच नव्हे तर पुष्कळ प्रसंगीं एकदोन शब्दांनीं किती तरी गोष्टी सुचविल्या आहेत. याच ठिकाणीं पहाना, पहिला चरण वाचून कृष्णावतारांतील किती तरी गोष्टी आठवतात. या एका ओळींत कृष्णाचें सदयत्व व देवत्व, इंद्राचा पराभव, त्यानें लीलेनें संकट हरण केलें यावरून त्याच्या लीला इत्यादि गोष्टींचें स्मरण झाल्याशिवाय राहात नाहीं. दुसरा व तिसरा चरण वाचून दुष्टांचा संहार करण्यास्तव परमेश्वरानें जे दोन अवतार घेतले, त्या वेळची लोकस्थिति मूर्तिमंत ध्यानांत येते. तसेंच ही स्थिति पाहून कवीचें मागणें किती योग्य आहे हें तेव्हांच ध्यानांत येतें व दृष्टांताची समर्पकता चांगली व्यक्त होते. यांतील सर्व दृष्टांत असेच समर्पक आहेत. पौराणिक कथा माहीत नसणाऱ्या व माहीत असून त्यांवर विचार न करणाऱ्या वाचकांना ह्या काव्यांत फारशी गोडी लागणार नाहीं, पण त्याबद्दल त्यांनीं कवीला दोष देण्यापेक्षां स्वतःलाच दोष लावावा हें बरें दिसतें. पंडितराजराजितिलक **जगन्नाथराय** यांच्या विष्णुलहरींतील पुढील पद्यें या केकेशीं बरीच सदृश असल्यामुळें वाचनीय आहेतः—'सुमहांति जगंति बिभ्रतस्तव यो नाविरभून्मनागपि । स कथं परमात्मदेहिनः परमाणोर्मम धारणे श्रमः ॥१४॥ नितरां विनयेन पृच्छसे सुविचार्योत्तरमत्र यच्छ मे । करितो गिरितोऽप्यहं गुरुस्त्वरितो नोद्धरसे यदद्य माम् ॥ १५ ॥' (भाषांतर) 'धरुनि उदरिं सारीं हीं जगें मोठमोठीं, श्रम तुज नचि झाला अल्पही कल्पकोटीं । त्रिभुवनजनहत्स्था त्या तुला होय ऐसा, नवल! मज अणूच्या धारणीं शीण कैसा ॥ १४ ॥ तुज अति विनयानें पूसतों लोकपाळा! करुनि मनिं विचारा उत्तरा दे कृपाळा । करिहुनि गिरिहूनी थोर मी काय ताता! त्वरित मर्जसि कां तूं उद्धरीनासि आतां ॥ १५ ॥' (वामनशास्त्री केमकरकृत विष्णुलहरीचें पद्यात्मक भाषांतर.)

१. **नत+अवन+धृत+व्रत=नतांचें (शरणागतांचें) अवन (रक्षण) [हेंच] धृत (धारण केलें) व्रत (नियम) ज्यानें अशा भगवंता! "कदाचित् तूं म्हणशील कीं साऱ्या जगास किंवा बहुत जनांस जेव्हां संकट पडतें, तेव्हांच त्यांच्या रक्षणार्थ गोवर्धनधारणादि महत्कृत्यें मला करावीं लागतात, तुजसारखा एखादा दुसरा पीडित होऊन मला शरण आला, तथापि या विश्वचालनाच्या मोठ्या व्यापारांत माझें लक्ष त्याजकडेस पोंचत नाहीं. अशी आशंका घेऊन तिचें निवारण करीत होत्साते कवि म्हणतात."** (य० पां०). २. **अग्नि.** ३. **बाधा+वनीं=दुःख+अरण्यांत=दुःखरूप अथवा संकटरूप अरण्यांत. येथें रूपकालंकार झाला.** यांत बाधा आणि वन, परमेश्वर आणि अग्नि ह्यांचा अभेद वर्णिला आहे म्हणून हा **रूपक** अलंकार होय. 'विषय्यभेदताद्रूप्यरंजनं विषयस्य यत् । रूपकं तत् त्रिधाऽधिक्यन्यूनत्वानुभयोक्तिभिः ॥ १८ ॥' (कुवलयानंद). **'अप्रकृताच्या ऐक्यें तद्रूपत्वेंहि रंजन प्रकृतीं । रूपक तेंचि निरोपिति, गणिती त्या त्रिविध जे बहुज्ञ कृती ॥ १ ॥ अधिकत्व, ऊनता कीं अनुभयता वर्णिली असे उचित । तरि**

तत्तदुपपदांकित भेदत्रय होय रूपकीं खचित ॥ २ ॥ हा साक्षात् शिवचि असे जेणें तीं जाळिलीं क्षणें नगरें । केवळ तृतीय नयनावांचुनि हा शंभु होय आण खरें ॥ ३ ॥ हा शर्वचि समदृष्टि स्वीकारुनि विश्व रक्षितो आर्य । तरुणीमुखेंदु जरि दे आनंद तरी न इंदुचें कार्य ॥ ४ ॥ ही साध्वी अपररमा जन्म सुधासागरीं नसे मात्र । हा वदनचंद्र विलसे सकलंक शशीपरीस अतिमात्र ॥ ५ ॥' अप्रकृत म्हणजे उपमान कमलादिक आणि प्रकृत म्हणजे त्याचें उपमेय किंवा प्रस्तुत वर्णनीय मुखादिक होय. अर्थात् उपमानाच्या रूपानें उपमेयाचे ठिकाणीं जें रंजन म्हणजे चमत्कारोत्पादन तें रूपक होय. यास 'रूपक' हें नांव देण्याचें बीज असें आहे कीं यांत अन्याचे (उपमानाच्या) रूपानें उपमेयास रूपवान् केलेलं असतें. तें रूपक कोठें प्रसिद्ध उपमानाच्या अभेदावर पर्यवसित असतें, आणि कोठें भेद (उपमानोपमेयांचा) दृश्यमान असतांही उपमानाच्या धर्मारोपावर मात्र पर्यवसित असतें. यामुळें रूपक प्रथम दोन प्रकारचें होय. एक अभेदरूपक आणि दुसरें ताद्रूप्यरूपक. त्या दोन्ही प्रकारांतही प्रसिद्ध उपमानाचें (उपमानाच्या पूर्वस्थितीपेक्षां उपमेयतादात्म्यरूप अवस्थेंतील) आधिक्यवर्णन, न्यूनत्ववर्णन आणि अनुभयोक्ति (न्यूनत्व व आधिक्य या दोहींचा अभाव) या तीन कारणांवरून प्रत्येकांत तीन तीन भेद होतात, मिळून एकंदर रूपकाचे प्रकार सहा होत. त्यामध्यें 'हा साक्षात् शिव' इत्यादि तीन अर्धांनीं तिन्हीं अभेदरूपकें आणि तरुणीमुखेंदु इत्यादि तीन अर्धांनीं तिन्हीं ताद्रूप्यरूपकें (यांत उपमानोपमेयांचा भेद असून उपमानधर्माचा मात्र असतो) सांगितलीं आहेत. पहिल्या उदाहरणांत 'जेणें तीं जाळिलीं' या विशेषणानें प्रस्तुत वर्णनीय राजाचे ठिकाणीं प्रसिद्ध उपमान जो शिव त्याच्या (पुरदाहकत्वरूपविशेषणसाम्यामुळें) ऐक्यवर्णनावरून आणि शिवाचे पूर्व अवस्थेपेक्षां वर्णनीय जी राजत्वावस्था तिजमध्यें न्यूनत्व किंवा अधिकत्व वर्णन केलें नसल्यामुळें हें पहिलें अनुभयाभेदरूपक झालें. दुसरे अर्धांत तृतीयनयनाचा अभाव सांगितल्यावरून पूर्वावस्थेपेक्षां न्यूनता प्रदर्शित केली आहे यामुळें हें दुसरें न्यूनाभेदरूपक होय. येथें न्यूनत्ववर्णन देखील ऐक्यास दृढत्व आणतें म्हणून चमत्कारावह आहे. तिसऱ्यांत विषयदृष्टीचा त्याग करून जगद्रक्षकत्व वर्णिलें असल्यामुळें पूर्वस्थितिपेक्षां राजत्वावस्थेंत शिवाचा उत्कर्ष प्रगट होत आहे म्हणून हें तिसरें अधिकाभेदरूपक होय. याचप्रमाणें पुढील ताद्रूप्यरूपकांच्या उदाहरणामध्यें क्रमानें अनुभयताद्रूप्यरूपक, न्यूनताद्रूप्यरूपक, अधिकताद्रूप्यरूपक अशीं नांवें समजावीं.' (अलंकारविकाश.) जेथें उपमान आणि उपमेय यांचा वास्तविक भेद असून हीं प्रत्यक्ष एकत्र आहेत त्यांत भेद नाहीं, असें वर्णन असतें तेथें रूपकालंकार होतो. याचीं उदाहरणें व तींही रसभरित अशीं पंतांच्या काव्यांत विपुल आहेत. (१) 'दुष्यंतसप्तपद्मीं ते स्त्री श्री कण्वभानुशिष्यकरीं । नेली पुत्रसुगंधासह धर्मनयांबुपूर्ण नगरसरीं ॥' [आदिपर्व—अ० १२ गी० ६१ पृ० ७८], (२) 'श्रीसेव्या, सदलिमता! वस राज्यसरीं, न मज्ज, राजीवा! । वत्सा बहु कष्टविलें त्वां, स्वीकारूनि मज्जरा जीवा ॥' [आदिपर्व—अ० ११।७२], (३) 'भूधनु ओढुनि कज्जलविषदिग्ध

पंद्प्रणतसंकटीं प्रेजव तूंचि बा! धांवनीं; ।
दैया प्रकट दाखवी कवण सांग त्यां वारणीं?

कटाक्षशर वरारोहे! । सोडुनि लुटीं तपोधन सौभाग्यश्री तुझी भगारो हे ॥' [आदिपर्व-अ० १२।२०.] (४) 'लेशहि शरदमळ न भा धवळी अमृतांशुचीहि शरदमळनभा । अंबर मिरवुनि रजनी विलासिनी धरि भमौक्तिकें रुचिर जनीं ॥ मंगळसुतिलक अलिकीं कुमुदाक्षीं भरि सुरम्य कज्जल अलि कीं । चंद्रमुखी ते हरिला रुचली, श्रीकांत योगिपनि परि हरिला ॥' (कृष्णविजय-अध्याय २९.) '[हे] नतावनधृतव्रत! तूंचि बाधावनीं ज्वलन' हे शरणागतांचा उद्धार करणाऱ्या देवा! आमचीं दुःखरूप अरण्यें जाळण्यास तूं केवळ अग्निच आहेस. जसा अग्नि (दावाग्नि=वणवा) अरण्यें जाळून फस्त करितो तसा तूं आमचीं दुःखें नाहींशीं कर-हा भावार्थ. किंवा 'बाधावनीं नतावनधृतव्रतज्वलन तूंचि' असा अन्वय केला असतांही चालेल. त्याचा अर्थः-कोणीही पीडित तुला शरण आला असतां त्याचें संकटवन जाळण्याविषयीं म्हणजे त्या संकटाचें समूल उत्पाटन करण्याविषयीं अग्नि तूंच आहेस.

१. पद्+प्रणत+संकटीं=चरण+नम्र झालेले+दुःखप्रसंगीं-शरणागतांच्या संकट-प्रसंगीं. २. अतिवेगवान्. ३. धावन=धावणें; धांवण्यांत. 'पद्प्रणतसंकटीं धावनीं तूंचि प्रजव'=धावनीं=शरणागतभक्त संकटांत पडला असतां धांव घेण्यांत तूं फार त्वरा करितोस म्ह० त्याची संकटापासून मुक्तता त्वरित करितोस. शक्ति, कौशल्य सामर्थ्य, नैपुण्य इत्यादि गुण दाखविणाऱ्या विशेषणांमागून सप्तमी विभक्ति येते-जसें धावनीं प्रजव, शास्त्रांत निपुण, चित्रकलेंत प्रवीण इत्यादि. ४. 'त्या वारणीं (गजेंद्रावर), सतीव्यसनवारणीं, वा जयजयार्थे त्या रणीं कवण दया प्रकट दाखवी सांग?- असा अन्वय. त्या गजेंद्रावर कोणीं दया प्रकट करून दाखविली बरें? 'जेव्हां गजेंद्राचा पाय नक्रानें धरिला, तेव्हां निरुपाय होऊन, त्या गजेंद्रानें तुम्हांला हाक मारिली, त्या वेळेस तुम्हींच धांवून येऊन त्याला मुक्त केलें ना?' (केकादर्श). ५. उघड रीतीनें. 'प्रकट' हें 'दाखवी' याचें क्रियाविशेषण समजावें. ६. दाखविली. अशी दया उघडपणानें कोणीं दाखविली तें सांग. 'दाखवी' 'करी' 'पूजी' 'धरा' इत्यादि रूपांचा उपयोग कवितेंत भूतकाळाचे रूपांच्या स्थानीं फार आढळतो, 'सलील तइं मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं धरा' [केका०५.] ७. त्या=पुराणप्रसिद्ध. तो जो तुम्हीं नक्राच्या दाढेंतून सोडविला त्या. ८. वारण=हत्ती, अर्थसंदर्भानें गजेंद्र. गजेंद्र हा पूर्वीचा द्रविड देशाचा इंद्रद्युम्न नामक राजा होय. हा विष्णुव्रतपरायण असून मलयाचलावर तपश्चर्या करीत असतां तेथें एकदां अगस्त्य ऋषीचा याजकडून नकळत अपमान घडला. तेव्हां मुनीनें 'तूं गज हो' असा शाप दिला व फिरून राजानें प्रार्थना केल्यावरून 'विष्णु तुझा उद्धार करील' असा उच्छाप देऊन समाधान केलें. पुढें हा गजयोनींत जन्म पावून त्रिकूटपर्वतावर भ्रमण करूं लागला. एकदां हा पाणी पिण्यास सरोवरांत उतरला असतां नक्रानें त्याला पकडलें. नंतर त्यानें

सती[1]व्यसनवारणीं ? जय[2]जयार्थ त्या वा[3] रणीं ? ॥ ६

---

श्रीकृष्णाचा धांवा केला तेव्हां भगवंतानें नक्रास मारून गजेंद्रास मुक्त केलें. पुढें ते दोघेही (गजेंद्र व नक्र) शापमुक्त होऊन पूर्वपद पावले.

१ सती (साध्वी, पतिव्रता, अर्थसंदर्भानें द्रौपदी) तिचें [जें] व्यसन (दुःख), संकट), [त्याच्या] वारणीं (निवारण करण्यांत). **द्रौपदीसंकटनिरसनप्रसंगीं.** येथें कवीनें **द्रौपदीवर आलेल्या अनेक संकटांचा उल्लेख करून हें लिहिलें असावें.** त्यांतील कांहीं प्रसंगांचें संक्षिप्त स्पष्टीकरण केलें आहे. पहिला प्रसंग वस्त्रहरणाचा. कौरवांनीं पांडवांस द्यूतांत जिंकून द्रौपदीवस्त्रहरण आरंभिलें असतां, श्रीकृष्णानें तिचा कैवार घेऊन तिला क्षणांत अक्षय्यपणें सहस्त्रावधि वस्त्रें पुरविलीं व तिची लज्जा राखिली. [मोरोपंत–सभापर्व–अध्याय ५ पृ० ३७-५१.] दुसरा प्रसंग सभापर्वांतील कंचुकीबंधनाचा. तिसरा प्रसंग दुर्वासानें केलेल्या सत्त्वपरीक्षेचा. वनवासांत पांडव असतां एकदा दुर्वासऋषि दुर्योधनाच्या सांगण्यावरून पांडवांचें व विशेषतः द्रौपदीचें सत्त्व पाहण्यास आला व भोजन मागूं लागला. संग्रहीं अन्नसामग्री नसल्यामुळें त्यांजवर हें मोठें संकट पडलें. तेव्हां द्रौपदीनें कृष्णस्मरण केल्यावरून भगवंतानें त्या सर्व ऋषिमंडळास यथेच्छ भोजन देऊन तृप्त केलें व अशा रीतीनें द्रौपदीचें संकट दूर करून सत्त्वरक्षण केलें. [मोरोपंत–वनपर्व–अध्याय ८ गीती १३-४९ पृ० १२२-१२६.]
२. **जय अर्जुन,–त्याच्या जयार्थ–त्याला जय मिळावा म्हणून.** भारतीय युद्धांत शेकडों वेळां अर्जुन संकटांत पडला असतां श्रीकृष्णानें त्याला त्यांतून मुक्त केलें. उदाहरणार्थ भीष्माशीं युद्ध करीत असतां एकदां अर्जुनाचा पराभव होऊं लागला व काय करावें हें न सुचून तो घाबरला. तेव्हां अर्जुनास जय मिळवून देण्याकरितां रथचक्र घेऊन कृष्ण भीष्मावर धांवला. [मोरोपंत–भीष्मपर्व–अध्याय १० गी० ८०-११२.] जय, विजय हीं अर्जुनाचीं नांवें सुप्रसिद्ध आहेत व पंतांनीं महाभारतांत 'जय' शब्द अर्जुनासच लाविला आहे. यास प्रमाणः–(१) **'जय**भीमवधाविपर्यी कर्णसुयोधन करीत वकबक रे' (द्रोणपर्व–अ० १२ गी० ९१), (२) **'जय** विनवी, पाय धरी, मागे आज्ञा, अशांत तो धर्म, (कर्णपर्व–अ०४३ गी० १), (३) 'त्वां धर्मभंग केला भीमहि बहु पीडिला असें कळलें; । त्याचा कैवारी **जय** आला यवश नसे कधीं मळलें ॥' (कर्णपर्व–अ० ४४ गी० २३), (४) 'प्रकट महा भैरवसा नाचत गेला **जयाच्युतां** निकट' (कर्णपर्व–अ० ४४ गी० ३०). अर्जुनाचीं नांवें:– अर्जुन, फाल्गुन, जिष्णु, किरीटी, श्वेतवाहन, बीभत्सु, विजय, कृष्ण, सव्यसाची, धनंजय, पार्थ, गुडाकेश, राधावेधी, जय, कपिध्वज इत्यादि. ३. **'वा (अथवा) जयजयार्थ (अर्जुनास जय मिळवून देण्यास्तव) त्या (प्रसिद्ध) रणीं (भारतीय युद्धांत) [दया प्रकट कोण दाखवी?] तुम्हीच असा काकर्थ इष्ट आहे.** भारतीय युद्धांत अनेक प्रसंगीं अर्जुनास जय साधून देण्याकरितां, गजेंद्र आणि द्रौपदी यांच्या संकटसमयीं त्यांस मुक्त करण्याकरितां जसे तुम्ही धांवलां, तसेच मजकरितां धांवून या, अशी मी प्रार्थना करितों–असा भाव.

सुपात्र न रमाहि यद्रतिसुखास दारा परी,

---

१. 'या केकेंत विष्णुरूप भगवंताच्या सुखोपभोगाद्यैश्वर्याचें वर्णन करित होत्साते कवि त्याच भगवंताचा स्वभक्तकार्याविषयीं औत्सुक्यातिशय वर्णितात.' [य० पां०-पृ ४५.] ही केका मोठी सुरस असून हींत भक्तजनांविषयीं भगवंताचें प्रेम फार उत्कृष्ट रीतीनें व्यक्त केलें आहे. पंतांची प्रतिभा ह्या काव्यांत जागोजाग मोठ्या रमणीय व चित्ताकर्षक स्वरूपानें प्रकट झालेली दिसते-ह्या विधानाचें हें एक उत्कृष्ट उदाहरण होय. २. 'रमाहि दारा, परी यद्रतिसुखास सुपात्र न, असा प्रभुहि सेवकां खासदारापरी भजसि'-असा प्रथम दोन चरणांचा अन्वय. लक्ष्मीसारखी रूपयौवनसंपन्न व आवडती स्त्री देखील ज्याच्या प्रेमास सुपात्र (फारशी पात्र, योग्यस्थान, उचितभाजन) झाली नाहीं असा षड्गुणैश्वर्याचा भोक्ता परमेश्वर मोतद्दार होऊन आपल्या सेवकांची (भक्तांची) सेवा करितो. ही भक्तांवर त्याची केवढी दया! येथें 'रमाहि' (=लक्ष्मी देखील) असें म्हणण्याचें कारण असें दिसतें कीं, सर्व कृष्णस्त्रियांत जरी अष्टनायका श्रेष्ठ होत्या तरी त्यांतही रमा (रुक्मिणी) ही कृष्णाची अत्यंत आवडती स्त्री होती. तेव्हां जर कोणत्या स्त्रीच्या संगतीनें प्रभु (कृष्ण) नेहमीं रममाण होता तर तो रमेच्याच संगतीनें होता. कारण रमा स्त्रीरत्न होती. 'स्त्रीणां गुणा यौवनरूपवेषदाक्षिण्यविज्ञानविलासपूर्वाः । स्त्रीरत्नसंज्ञा च गुणान्वितासु स्त्रीव्याधयोऽन्याश्चतुरस्य पुंसः' (बृहत्संहिता). भागवतांत एके ठिकाणीं कृष्णस्त्रिया रुक्मिणीविषयीं पुढीलप्रमाणें उद्गार काढितात:-'गडिनीसीं वैर असें कां जरि म्हणशील तरि असे वैर, । आम्हा वंचुनि पीते तीच मुकुंदाधरामृत स्वैर. ॥ वक्षस्थळींच लुबरी वसती, कांतोर ते निची वसती, । आम्हां उरला सुरला, आपण आकंठ सेविते रस ती. ॥' [मोरोपंत-मंत्रभागवत-दशमस्कंध-गी० ११५९-६०] 'आम्हां सतींस वंचुनि तीसीं रमतो, न तो भला, खोटा, । आम्हींच कुलवतींनीं ऐसा अपराध साहिला मोठा. ॥ [मोरोपंत-कृष्णविजय-उत्तरार्ध-अ० ९० गी० ३७ पृ० ३२७.] ३. यत्+रति+सुखास=ज्याच्या+सुरत+विलासास=ज्याच्या रतिक्रीडेस. ४. विवाहित स्त्री. मूळ संस्कृत शब्द 'दार;' हा पुल्लिंगी आहे; हा समासांत असाच आढळतो. पण इतरत्र याचा प्रयोग दाराः असा नित्यबहुवचनी असतो. याचा अर्थ एक बायको किंवा अनेक बायका असा होतो, तरी रूप नित्यबहुवचनी व पुल्लिंगीच असतें. त्याचें प्राकृतांत दारा असें स्त्रीलिंग रूप झालें आहे. पंतांनीं आपल्या कवितेंतून 'दारा' आणि 'दार' हीं दोन्ही रूपें योजिलेलीं आढळतात. 'दारा' शब्द योजल्याबद्दल पुढील उदाहरणें पहा:-(१) 'त्यजिलें न पदाराधन; तप, दारा, धन मनांत आणून ।' [हरिवंश-अ० ९ गी० ८५], (२) 'पांचाली करि परिवेषणाधिकारा । वाराणस्यधिपतिचीच काय दारा ॥' [कृष्णविजय-उत्तरार्ध-अ० ७५ श्लो० ५ पृ० १८६], (३) 'बहुदाराची मैत्री, जळरेखा कां उगाचि आरडसी? ।' [कृष्णविजय-उत्तरार्ध-अ० ९० गी० १३ पृ० ३२५], (४) 'मी रामाची दारा हरिली तरि काय हे तुझी हानी ।' [मंत्ररामायण-युद्धकांड-गी० १०६ पृ० ९६]. तसेंच 'दार'शब्द योजिल्याबद्दल पुढील उदाहरणें पहा:-(१) 'वांच, शरण चाल, प्रभुला दे प्रभुदार उपायनसे ।' [रामायणें-भाग ३ पंचशती रामायण-साकी २७२ पृ०

**अंसा प्रभुहि सेवकां भजसि खासदारापरी; ।**

---

६४.) (२) 'न होति जननी कशा पशुपदार, गाई? लया ।' [केकावलि–श्लो० ९८], (३) 'वारयोषिति बहु पाहति मुनिदारहि भासुरव्रत तिला जे ।' [वनपर्व–अ० १३ गी० ९६ पृ० २१०], (४) 'ते प्रभुदार प्रभुच्या ध्यानामवमेवनें करुनि सदा ।' [मंत्रभागवत–दशमस्कंध–गी० ११३९], (५) 'देती दुःखांचि धन, सुत, दार, सदन आम; जाति सोडून ।' [मंत्रभागवत–एकादशस्कंध–गी० ४२], [६] 'परदाररता तुजला निजकांतेशींच कां न सुरत रुचे? ।' [रामायणें–भाग १–मंत्ररामायण–सुंदरकांड–गी० १३० पृ० ८६], (७) 'मारुनि रावण त्याचे दार तदस्त्रें करुनि न्हाणून ।' [वनपर्व–अ० ११ गी० ६३], (८) 'गेले सदारनंदन भोजकटीं रामकृष्ण त्यासांतें ।' [हरिवंश–अ० २४ गी० ७४, (९) 'हंसले सपत्नदारहि न म्हणे कोणीहि कीं उगें न हंसा. ।' [सभापर्व–अ० ३ गी० ३४] (सपत्नदार=शत्रुस्त्री द्रौपदी), (१०) 'छळिले दशाननें, परि झाले प्रभुदार काय कातर ते? ।' [विराटपर्व–अ० १ गी० १७१), (प्रभुदार–रामाची बायको सीता)], (११) 'आमंत्रुनि सत्येनें सर्व श्रीकृष्णदार जेवविले ।' [हरिवंश–अ० २९ गी० ६९]. (३) (४) (७) व (११) या उदाहरणांत 'दार' शब्द पुल्लिंगी बहुवचनी असून त्याचा अर्थ अनेक बायका असा होतो. (९) (१०) या उदाहरणांत तो पुल्लिंगी बहुवचनी असून त्याचा अर्थ एक बायको असा होतो.

१. **असा=अशा योग्यतेचा, अशा ऐश्वर्याचा उपभोक्ता.** २. **जगाचा स्वामी परमात्मा श्रीकृष्ण. 'स्वामी असून सेवकांना भजतो असें म्हणण्यांत विरोधालंकार झाला.** एका पदार्थावर एक किंवा दोन विरुद्ध धर्मांचा आरोप करण्यांत आला म्हणजे तेथें **विरोध** अलंकार झाला असें समजावें. येथें स्वामी असून सेवकाची कृति घडली म्हणून **विरोध.** जेथें एका पदार्थावर परस्परविरुद्ध अशा एक किंवा अनेक धर्मांचा आरोप केला असतो तेथें **विरोध** नामक अलंकार होतो. हा शब्दार्थकृत विरोध भासमान असतो, वास्तविक विचार करतां यांत खरोखर विरोध नसतो, विरोधाचा आभास होतो, म्हणून याला **विरोधाभास** असेंहि म्हणतात. **'होय विरोधाभास स्यात असे भास जरि विरोधाचा । हारावांचुनि सुंदरि हारी कुचभार हा तुझा साचा ॥ ७६ ॥' येथें तुझा कुचभार हाररहित असून हारी (हारयुक्त पक्षीं मनोहर) आहे अशा प्रकारें श्लेषमूलक विरोधाभास आहे.** (अलंकारविकास.) '**विरोधः** सोऽविरोधेऽपि विरुद्धत्वेन यद्वचः' [काव्यप्रकाश], 'आपाते हि विरुद्धत्वं यत्र वाक्ये न तत्त्वतः । शब्दार्थकृतमाभाति स **विरोधः** स्मृतो यथा. ॥' [वाग्भटालंकार–४ परिच्छेद पृ० ५५]. या अलंकाराचा उपयोग बाण आणि सुबंधु या कवींनी आपल्या ग्रंथांत पुष्कळ केला आहे. 'पुष्पवत्यपि पवित्रा, कृष्णोऽप्यसुदर्शनः, भग्नोऽपि शत्रुघ्नः, रामो विरामो सनाम,' इत्यादि या अलंकारांचीं उदाहरणें सुप्रसिद्ध आहेत. (१) 'विपरीतचि हें कुरुकुलदीपांनी स्वप्रकाश हारविला' (सभापर्व–अ० ७ गी० ४२) (२) 'सुवर्णालंकृता कन्या हेमालंकारवर्जिता । ती कन्या विधवा होतां रडे दुःखें तिचा पति ॥' येथें विधवा म्हणजे विविधधवा=जारिणी असा अर्थ करावयाचा. या गीत्यर्धांत विरोध अलंकार आहे. ३. **भक्तांना. परमात्म्याचें प्रेम लक्ष्मीपेक्षांही भक्तांवर जास्त**

प्रियाकुचतटीं[1] जिहीं न बहुवार[2] पत्रावळी,[3]

---

आहे असें वर्णन पुष्कळ ठिकाणीं आढळतें. यांत ईश्वराचें आपल्या भक्तजनांवरील प्रेम अत्युत्कर्षानें सूचविलें आहे म्हणून हा प्रेयः नामक अलंकार होय. जेथें प्रीति, भक्ति इत्यादि भावांचा उत्कर्ष वर्णिला असतो तेथें प्रेय (प्रेयः) किंवा भाव अलंकार होतो. याचें अन्य उदाहरणः-'सुखगीतनृत्य तेथें, मजलाही तोचि एक थारा हो, । स्मरला स्मरहर, भरला कंठ, न वदवेचि ते कथा राहो. ॥ ३३ ॥' [मोरोपंत-सभापर्व-अध्याय १ पृ० ५] भगवंताचें स्त्रीवर प्रेम नाहीं हें तिच्याशीं विलास करणें फारसें आवडत नाहीं यावरून सिद्ध झालें. कारण मेघदूतांत एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं:-'विलास हेंचि स्त्रीप्रेमाचें स्पष्ट चिन्ह समजावें ।' [पद्यरत्नावली-साकी ७२]. प्रभुला भक्तप्रेम लक्ष्मीसमागमापेक्षांही जास्त आवडतें या सिद्धांताच्या पुष्ट्यर्थ खालील उदाहरणें पहाः-(१) 'राधा न, रुक्मिणीही, प्रेमाची मोहिनी कळा यास, । गीतसुखास्तव लागे हा नित्य जनीसवें दळायास. ॥' [मोरोपंत-स्फु० प्र०-भा० १-पांडुरंगदंडक-गी० ३ पृ० १३२], (२) 'बंधु अनंत, तनुज विधि, भार्या श्री, त्यांपरीस कोटिगुणें । भक्त प्रिय परम खरे; आतां या किंकरासि काय उणें ? ॥' [कृष्णविजय-उत्तरार्ध-अ० ८७ गी० ३७], (३) 'जेणें रमाधराहुनि शबरीचीं मानिलीं, मधुर बदरें ।' [द्रोणपर्व-अ० १५ गी० ६८], (४) 'सुखद स्पर्शश्रीच्या बहुधा न ह्यांसम स्तनाचा या ।' [द्रोणपर्व-अ० १० गी० ४६] लक्ष्मीस्तनस्पर्शापेक्षां विजयहयस्पर्श जास्त सुखद. ४. मोतद्दार. 'खासदार' हा शब्द हिंदुस्थानी आहे. पंतांच्या ह्या काव्यांत तसेंच एकंदर मराठी कवितेंत परक्या भाषेंतील शब्द पुष्कळ आढळतात. त्यांचा उल्लेख प्रस्तावनेंत केला आहे. [निबंधमाला-अंक ५० पृ० २-५; विविधज्ञानविस्तार पुस्तक १८ अंक ६.] विष्णूनें कृष्णावतारीं स्वभक्त जो अर्जुन त्याचें भारतीय युद्धांत सारथ्य पत्करून मोतद्दारी केली या कथेवर येथें कविकटाक्ष आहे. पंतांनीं व इतर कवींनीं कृष्णाची मोतद्दारी पुष्कळ स्थळीं मोठ्या प्रेमानें वर्णन केली आहे:-(१) 'अर्जुनतुरंगमातें जो स्वकरानें करी खरारा जी, । श्रीकृष्ण काय बहुधा निजपददासासि जो खरा राजी. ।,' (२) 'हरिजन हो ! हरि करितो आंगें तुमची वरीक सेवा जी । भूतले धनंजयाचे केवळ अश्वाय परि कसे वाजी ? ॥' [मोरोपंत-स्फु० प्र०-भाग १-महद्विज्ञापना-गी० १०८ पृ० २९४], (३) 'ज्याच्या श्रीपददास्यें पावे तोखा सदा रमा जाया । हरितो मना नराचा होउनि तो खासदार माजा या. ॥' [द्रोणपर्व-अ० १० गी० ४४]. (४) 'योजितो हयगळां गळसूत्रें, जो रमेसि वरि मंगळसूत्रें । त्याकरें धरित माधव दोरे, पार्थभाग्य किति काय वदों रे. ॥' (वामन).

१. लक्ष्मीच्या स्तनावर. तट-प्रांतभाग. शरीराच्या मोठ्या अवयवाच्या कोणत्याही भागास तट म्हणण्याचा काव्यांत प्रचार पुष्कळ आढळतो. 'जिहीं (ज्या हातांनीं) प्रियाकुचतटीं (लक्ष्मीस्तनप्रदेशावर) पत्रावळी (वेलबुट्ट्या) बहुवार न [काढिल्या] तिहीं (त्या हातांनीं) नृपमखांत (धर्माच्या राजसूय यज्ञांत) अमित (पुष्कळ, असंख्य) पत्रावळी (उष्ट्या पत्रावळी) काढिल्या (सावडून दूर टाकिल्या)-असा अन्वय. ज्या विष्णूच्या हस्तांनीं लक्ष्मीस्तनप्रदेशावर विलास करण्याविषयीं तादृश उत्कंठा नस-

त्यामुळें कंटाळून पुष्कळ वेळां वेलबुट्टी काढिली नाहीं त्याच हस्तांनीं कृष्णावतारीं धर्मराजाच्या राजसूययज्ञांत असंख्य उष्टीं पानें काढिलीं; तेव्हां याला कारण प्रभूचें भक्तांविषयीं प्रेम हेंच होय हें उघड आहे. २. पुष्कळ वेळां. जो लक्ष्मीच्या स्तनांवर क्वचित् प्रसंगीं वेलबुट्टी काढतो तो भक्तांच्या यज्ञांत असंख्य पत्रावळी काढतो असें सांगण्यांत लक्ष्मीविलासाविषयीं तादृश अनौत्सुक्य, अशा नाजुक लीलाकृत्यांत देखील हस्त श्रम पावत असे, इतकी नेहमींची नाजुकता व भक्तांविषयीं अत्युत्कट प्रेम ह्या गोष्टी सुचविल्या आहेत. ३. शृंगारी पुरुष आपल्या स्त्रियांच्या स्तनगल्लभालाद्यवयवांवर (विशेषतः स्तनावर) कस्तूरीकेशरादि सुगंधद्रव्यांनीं मकरपत्राकार वेलबुट्टी काढीत असत असें वर्णन शृंगाररसप्रधान काव्यांत फार आढळतें. ही वेलबुट्टी काढण्याची चाल कामोद्दीपनार्थ असावी. स्तनगलहस्ताद्यवयवांच्या शिरा खाजविल्या असतां गुदगुल्या होतात हें प्रसिद्ध आहे. व त्यावर सुगंधद्रव्यांचें विलेपन केलें असतां त्या नाटून कामोद्दीपन होतें. इतर कामोद्दीपक साधनें वराहमिहिरानें 'बृहत्संहितेंत अशीं दिलीं आहेत:–'हर्म्यपृष्ठमुडुनाथरश्मयः, सोत्पलं मधु, मदालसाप्रिया, । वल्लकी, स्मरकथा, रहः, स्रजो, वर्ग एष मदनस्य वागुरा' (आठल्याची आवृत्ति पृ० ४१६). पुढील संस्कृत पद्यांत ह्या पत्रावलीरचनेचा उल्लेख आहे:–(१) हरेः कुमारोऽपि कुमारविक्रमः । सुरद्विपास्फालनकर्कशांगुलौ। भुजे शचीपत्रविशेषकांकिते स्वनामचिन्हं निचखान सायकम्. ॥ [रघुवंश सर्ग ३ श्लो० ५५] येथें इंद्राच्या बाहूवर शचीच्या स्तनकपोलस्पर्शानें त्यावरील पत्ररचना उमटली असें म्हटलें आहे. (२) कस्तूरीवरपत्रभंगनिकरो भ्रष्टो न गंडस्थले नो लुप्तं सखि! चंदनं स्तनतटे धौतं न नेत्रांजनम् । रागो न स्खलितस्तवाधरपुटे तांबूलसंवर्धिनः किं रुष्टासि गजेंद्रमत्तगमने! किंवा शिशुस्ते पतिः? ॥ [कालिदास–शृंगारतिलक], (३) गात्राणि कालीयकचर्चितानि सपत्रलेखानि मुखांबुजानि । शिरांसि कालागुरुधूपितानि कुर्वंति नार्यः सुरतोत्सवाय ॥ [कालिदास–ऋतुसंहार–हेमंतवर्णन–श्लो० ५], (४) सपत्रलेखेषु विलासिनीनां वक्त्रेषु हेमांबुरुहोपमेषु । रत्नांतरे मौक्तिकसंगरम्यः स्वेदोद्गमो विस्तरतामुपैति. ॥ [ऋतुसंहार–वसंतवर्णन–श्लो० ७], (५) श्याम श्रीकुचकुंकुमपिंजरितमुरो मुरद्विषो जयति । दिनमुखनभ इव कौस्तुभविभाकरो यद्विभूषयति ॥. [गोवर्धनाचार्य–आर्यासप्तशती–११], (६) अक्ष्णोर्निक्षिपदंजनं श्रवणयोस्तापिच्छगुच्छावलिं मूर्ध्नि श्यामसरोजदाम कुचयोः कस्तूरिकापत्रकम् । धूर्तानामभिसारसत्वरहृदां विष्वङ्निकुंजे सखि ध्वान्तं नीलनिचोलचारु सुदृशां प्रत्यङ्गमालिङ्गति. ॥ [जयदेव–गीतगोविंद–सानंदगोविंद–सर्ग ११ श्लोक ३]. तसेंच गंगालहरी–श्लो० ७, ऋतुसंहार–हेमंतवर्णन–श्लो० १३, शिशिरवर्णन–श्लो० ८; अमरुशतक–श्लो० ८७, श्लो० ५४; गीतगोविंद–सुप्रीतपीतांबर–सर्ग १२ श्लो० १०; अनर्घराघव–नांदी श्लोक; कुमारसंभव–सर्ग ३ श्लो० २३; रघुवंश–सर्ग ९ श्लोक २९, सर्ग ६ श्लो० ७२, सर्ग १६ श्लो० ६७; शिशुपालवध–सर्ग ८ श्लोक ५६-५९; ह्यांतही पत्ररचनेसंबंधीं उल्लेख आहेत. महाराष्ट्र कविवर्यांच्या काव्यांतही कोठें कोठें पत्ररचनापर वर्णन आलेलें आहे. पुढील उदाहरणें पहा:–(१) कुचकुंकुमपत्रालि, स्रग्भूषा, अंगराग संभोगीं । हरि आमुचें, तुझेंहि श्रीकौस्तुभचिन्ह हरनियां भोगी ॥

तिहीं अमित काढिल्या नृपमखांत पत्रावळी. ॥ ७

मोरोपंत–कृष्णविजय–उत्तरार्ध–अ० ९० गी० १२] (२) ज्याचें चरणतळ मळे **लक्ष्मीकुचकुंकुमें** असाहि तळमळे । [मोरोपंत–'आर्यागीतिमुक्तामाला'–गी० ४८] (३) वदन रदनमणिरुचिनें हरुनि द्युति पाडणार कुंद रितें । **गतपत्रलेख** जेणें कारण वद जें असेल सुंदरि! तें ॥ [मोरोपंत–हरिवंश–अ० २६ गी० ४५], (४) ऐकूनि हें प्रियमुखें सुखहीनवाणी, केलीं रडोनि वदनें अनिदीनवाणी, । चिंताब्धिमग्नमन भग्नमनोरथानें, **निःकुंकुमें** करि सकज्जलनीर थानें ॥ [वामनपंडितकृत काव्यें–भाग १–रासक्रीडा–३७] स्तनावरील केशराची उटी अश्रुप्रवाहानें धुवून गेली–असा अर्थ. (५) कृष्णाकडे अभिसारिकावेषानें उपभोगार्थ निघालेल्या राधेचें वर्णनः–अभ्यंग चीर तिलकीं मृगनाभि नेत्रीं, मुक्तावली अगरुचंदन गोपगात्रीं । श्रीकुंडलें श्रुतिपुटीं, मणियुक्त नाकीं, **पत्रावली** कुचयुगीं रचना विलोकीं. ॥ [विठ्ठल–विद्वज्जीवन–उल्लास ३ श्लो० ११], (६) **कुच सुकुंकुमचर्चित** चांगले, नयनबिंदु पडों वरि लागले; । [वामनपंडितकृत काव्यें–भाग १–रुक्मिणीविलास–श्लो० २९], (७) कुच निचे घन वर्तुळ देखिले, **मृगमदांकित** सुंदर रेखिले । निरखुनी मग पाहतसे हरी, करिं धरीन अशी मति तो धरी. ॥ २८ ॥ [वामनपंडितकृत काव्यें–भाग २–राधाविलास] (८) कुच **सुकुंकुमचर्चित** देखिले, **मृगमदें** अतिसुंदर रेखिले. ॥ ५३ ॥ [वामनपंडितकृत काव्यें–भाग १–बालक्रीडा–]. स्त्रियांच्या स्तनगल्लाद्यवयवांवर वेलबुट्टी काढण्याची चाल प्राचीन असल्यामुळे कित्येकांस अविश्वसनीय वाटण्याचा संभव आहे. त्यांनीं, **पार्किन** नामक एका युरोपियन गृहस्थानें अबिसीनिया देशांतील स्त्रियांचें केलेलें वर्णन अवश्य वाचावें. महाराष्ट्रकोकिळ–पु० २ अं० ४ यांतील 'चित्रालंकृत स्त्रीजन' हा भाग वाचावा. ह्या केकेंत शृंगार व भक्ति या दोन परस्परविरोधी रसांचें दाट मिश्रण झालें आहे. तें दुग्धांत लवणाप्रमाणें सुदुःसह होय. केका २४ वरील या संबंधाची टीप पहा.

१. **पांडुपुत्र धर्मराज याच्या राजसूय यज्ञांत. पांडवांस इंद्रप्रस्थाचें राज्य मिळाल्यानंतर पित्याच्या आज्ञेवरून त्यांनीं राजसूय यज्ञास प्रारंभ केला. त्या वेळीं कृष्णानें ब्राह्मणपादप्रक्षालन करण्याचें व त्यांचीं उष्टीं सांवडण्याचें काम पत्करलें.** ज्याची भक्ति केल्यानें मोक्षाची प्राप्ति होते व अखिल विश्वाचा जो स्वामी अशा परमात्म्यानें भक्तयज्ञांत उष्टीं काढलीं हा प्रसंग **पंतांसारख्या** आध्यात्मिक शिक्षण देणाऱ्या कवींना भक्तिरसाची नदी उत्पन्न करण्यास फार उपयोगीं पडला आहे. पुढील दोनच उतारे पहाः–(१) करिन ब्राह्मणपादप्रक्षालन, सांवडीन मी उष्टीं, । सर्वहि करीन, देहीं फल हेंचि, न अन्य या वृथापुष्टीं. ॥ [सभापर्व–अ० २ गी० ११], (२) मोक्षद तीर्थपद प्रभु जो सुरपंक्तीमधें सुधा वाढी । कवि म्हणति तो चतुर्भुज विप्रोच्छिष्टेंहि त्या मखीं काढी. ॥ [मंत्रभागवत–दशम स्कंध–गी० ९३७]. २. **उष्टीं पानें.** 'उष्टीं पानें काढिलीं व वेलबुट्टी काढिली' यांत 'काढणें' या धातूचे दोन निराळे अर्थ आले असून ते द्व्यर्थीं 'पत्रावळी' शब्दाशीं संयुक्त झाले आहेत, ही योजना फार सरस झाली आहे. **उष्टीं काढणें म्हणजे सांवडून दूर टाकणें व वेलबुट्टी काढणें म्हणजे लिहिणें, रेखणें.** चित्र, वेलबुट्टी, रांगोळी इ० काढ किंवा लिही असें म्हणण्याचा फार प्रचार आहे. या केकेच्या शेवटील दोन चरणांत 'लक्ष्मीस्तनस्पर्शापेक्षां राजसूय यज्ञांतील ब्राह्मणसेवा फार

**नै पावसि, म्हणोनि मी म्हणतसें तुला आळशी;**

आवडली' असें जें वर्णन आहे त्याशीं पुढील पंतांच्या कवितेंतील स्थळें किती हुबेहुब जमतात तीं पहा:–(१) श्रीवक्षोजयुगाहुनी मुनिपदस्पर्श स्वयें तो भले । जाणों दे सुख, पाणियुग्म विभुचें या कारणें लोभले ॥ (कृष्णविजय–उत्तरार्ध). (२) सवसाहित्य किति वदूं? रावति भुज जेथ साधुसुरतरुचे । ज्या खटपटीपुढें न श्रीचें श्रीशास हीनसुरत रुचे ॥ [ सभापर्व–अ० २ गी० १६]. (३) विटला रमाकुचांच्या स्पर्शासि प्रभु, तुझ्या विटेनाच (पंतकृत 'इष्टकास्तुति' गी० ४) तसेंच प्रभुच्या भक्तवत्सलतेबद्दल पुढील पंतकृत गीति पाहा:–भक्तानां पुरतस्त्वां नर्तयतीत्थं स्वभक्तवत्सलता । न व्यापृतो भवानिव कोऽपि कुटुंबी क्वचित् कुटुंबे स्वे. ॥ [ मोरोपंत–स्फुटप्रकरणें–भाग १–कृष्णस्तवराज–गी ४०]. **'या केकेंत लक्ष्मीस संतुष्ट करण्याचें प्रिय कार्य असतां त्याची उपेक्षा करून स्वभक्तसंतोषार्थ वस्तुतः अत्यंत नीच कार्य असतांही त्याची भगवान् विष्णूनें स्वीकृति केली, असें कवीनें सांगितलें; येणेंकरून लक्ष्मीपेक्षांही स्वभक्ताच्या ठायीं भगवंताचें अत्यंत प्रेमाधिक्य दर्शविलें.** येथें स्वभक्तांच्या ठायीं भगवंताचा जो प्रेमातिशय त्याचें वर्णन इष्ट असून, त्या विशेषाची प्रतिपत्ति व्हावी, ह्मणून लक्ष्मीच्या स्तनावर पत्रावली काढण्याचा जो व्यापार त्याच्या न्यूनत्वाभिमुख्येंकरून निषेधाभास दर्शविला आहे; यास्तव हा **आक्षेप** अलंकाराचा भेद होय.' [ य० पां०–पृ० ४९.]

१. **'मी इतकी करुणा भाकित असतां तुह्मी मजवर दया करीत नाहीं, यामुळें तुम्हांविषयीं माझ्या मनांत भलतीच कल्पना येते ती मी उघड सांगतों,' अशा अर्थानें कवि म्हणतात.** ॥ **न पावसि**=दर्शन देऊन माझा उद्धार करीत नाहींस, प्रसन्न होऊन मला उद्धरीत नाहींस. २. **पावणें=प्रसन्न होणें.** हा शब्द संस्कृत 'आप्' (मिळणें) याच्या 'प्रापन' ह्या रूपापासून मराठींत अपभ्रष्ट झाला आहे. **कवि भगवंताला म्हणतात, 'इतकी करुणा भाकित असतांही जर तुम्ही मला दर्शन देऊन माझा उद्धार करीत नाहीं तर तुम्ही खचित आळसावलां असाल, पूर्वी अनेक भक्तांचा उद्धार केल्यामुळें थकून गेलां असाल.'** ३. **[हे देवा! तूं मला] न पावसि, म्हणोनि मी तुला 'आळशी' म्हणतसें हे (ही) असदुक्ति रविसखोत्थिता आळशी बरी न–असा अन्वय.** ४. ह्या केकेंत कवीनें भगवंतास एकवचनी 'तुला' हा शब्द लावून शिवाय **आळशी** हें निंदाव्यंजक विशेषणही लाविलें आहे. तसेंच पुढल्या १५ व्या केकेंत 'कां लाजशी' असेंही ह्मटलें आहे. यावरून कित्येक विद्वान् गृहस्थांनीं या काव्यांत खरी ईश्वरभक्ति नाहीं ह्मणून ह्मटलें आहे. या संबंधानें पंतांच्या एका मार्मिक वाचकानें काढलेले उद्गार पुढें दिले आहेत:–'नानाप्रकारचीं स्तोत्रें व वर्णनें जीं पंतांनीं केलीं आहेत, त्यांतील कित्येकांत, सार्वभौमराजाजवळ दीनजनांची, कृपाळु आईबापांजवळ लाडक्या मुलांची, सलगीच्या थोर मित्राजवळ दीन लेह्यांची, वर्तणूक कसकशी होत असते हें ईश्वरापाशीं पंतांनीं केलेल्या प्रार्थनेंत व भाषणांत स्पष्ट दिसून येतें. कित्येक काव्यांत स्वोद्धाराविषयीं आतुर होऊन ईश्वर आपणावर लवकर कृपा करीत नाहीं ह्मणून पंतांनीं जे तर्क केले आहेत ते फारच मनोहर उतरले आहेत. हीं स्तुतिस्तोत्ररूप काव्यें म्हणजे मनाचे तरंगच होत. नामरसायन, आर्याकेकावली, श्लोककेकावली, नामार्या, प्रांतप्रार्थना, संश-

**बरी न असदुक्ति[1] हे[2], रविसखोत्थिता[3] आळशी. ।**

यरलमाला इत्यादि लहान लहान पुष्कळ काव्यें पंतांच्या निर्मल व स्वतंत्र कल्पनेनें निर्मिलेलीं आहेत. त्यांत आतुर मनुष्याचा स्वभाव व आणखी कित्येक गोष्टी फार चांगल्या रेखलेल्या आहेत.' [हंसकृत मोरोपंतावरील निबंध–पृ० ११७.] शिवाय यांत भक्तकाजकैवारार्थ भक्तांच्या घरीं पडतील तीं कामें करणाऱ्या पौराणिक सगुण देवाचें स्तवन केलें असल्यामुळें वेद व उपनिषदें ह्यांतील गंभीर प्रार्थना न आल्यास त्याचें आश्चर्य नाहीं. **हे देवा! तुम्ही लवकर येऊन माझा उद्धार करीत नाहीं यास्तव मी तुम्हांला 'आळशी' स्पष्ट म्हणतों. तुम्ही आळशी (स्वकार्यपराङ्मुख) आहां असा दोष देतों. पण देवा! तुम्ही आळशी म्हणून घेऊं नका** असा भाव.

१. **असत्+उक्ति=वाईट+भाषण. 'हे (ही) असदुक्ति (वाईट उक्ति) रविसखोत्थिता (रविसख+उत्थिता=सत्राजितापासून निघालेल्या) आळशी (आळेसारखी) बरी (चांगली) न–असा अन्वय. तुम्ही आळशी आहां–अशी जी माझ्या तोंडावाटे उक्ति निघाली ती बरी नव्हे. भगवंताला आळशी ह्मणून लगेच कवि ह्मणतात देवा, तुह्मी आळशी ह्मणून घेऊं नका. कारण एकदा आळशी ठरलां म्हणजे मग तो आळशीपणा घालविणें तुम्हांला फार जड जाईल. ही असदुक्ति बरी कशी नव्हे म्हणाल तर, सत्राजिताच्या आळेसारखी. त्यानें तुमच्यावर स्यमंतकमणी चोरल्याचें जें बालंट घेतलें तें नाहींसें करण्यास जसे तुम्हांला फार श्रम पडले, त्याप्रमाणेंच हा आळशीपणाचा आरोप दूर करणें फार जड जाईल.** २. संस्कृत 'असौ'पासून प्राकृतांत 'अह' रूप व त्यावरून 'हा' हें सर्वनाम झालें. **ही. 'ही' बद्दल 'हे,' 'जी' बद्दल 'जे,' तसेंच 'ती' बद्दल 'ते' लिहिण्याचा इतर कवींबरोबर पंतांचाही संप्रदाय आहे.** (१) **हे** मानसचाराची वाङ्मुक्तांची सदैव रसिका कीं । नृपहंसा! तव हंसीं, न धरी मन पंकभक्षिल्या काकीं ॥ [मंत्ररामायण–युद्धकांड–७५३]. (२) माजी सत्कृति दूषिली जरि खलें उच्छृंखलें आग्रहें । सेवावीच परंतु नित्य रसिकें **हे** सद्गुणाच्या गृहें. ॥ [मंत्ररामायण–उपसंहार १३]. (३) त्वां त्यजिली **जे** प्रयता अपवादभयें वनांतरीं रामा, ॥ ३५६ ॥ [मंत्ररामायण–उत्तरकांड–पृ० १९९]. (४) सारङ्गाला पलाशद्रुमदलपुटकें सेवितां **ते** न सोडी। [मंत्ररामायण–उपसंहार–११,]. (५) **हे** ममपूर्वजदत्ता, मौक्तिकमालाच्चि होय पृथ्वीची. [मंत्ररामायण–युद्धकांड ७९७].
३. **रविसख (सूर्यमित्र–सत्राजित)+उत्थिता (निघालेली)=सत्राजितापासून निघालेली. येथें 'रविसखोत्थिता' हें संस्कृत भाषेच्या नियमांप्रमाणें स्त्रीलिंगी 'आळ' या शब्दाचें विशेषण समजावें.** हें मोठें विशेषण 'आळ' या लहानशा विशेष्याला तोलण्यासारखें नाहीं. विशेषणाच्या भारानें विशेष्य दडपून जाणार आहे. विशेषण हें विशेष्यास पेलण्यासारखें असलें पाहिजे. विशेषणौचित्यसंबंधानें महाकवि–श्रीक्षेमेंद्राचें वचन असें आहे:–'विशेषणैः समुचितैर्विशेष्योऽर्थः प्रकाशते । गुणाधिकैर्गुणोदारः सुहृद्भिरिव सज्जनः' ॥ २३ ॥ [क्षेमेंद्रकृत औचित्यविचारचर्चा–काव्यमाला–प्रथम गुच्छक–पृ० १४२.] 'रविसख' येथें 'सखिन्' या मूळ शब्दाचा

असंख्य जन तर्पिले[१], क्षुधित ऐकला[२] जेमनीं[३]

'रवि' शब्दाशीं समास असण्यानें 'राजाहःसखिभ्यष्टच्' (कौमुदी–७८८, पाणिनि–५।४।९१) या सूत्रावरून 'रविसख' असा अकारांत शब्द झाला आहे. 'उत्थिता' हें उत्पूर्वक ष्ठा (गतिनिवृत्तौ) या धातूचें क्त प्रत्ययांत कृदन्त. येथें 'उदःस्थास्तंभोः पूर्वस्य' (कौमुदी–११८, पाणिनि–८।४।६१) या सूत्रानें षच्या स्थानीं पूर्वसवर्ण आदेश झाला आहे. **कथासंदर्भः**–यदुकुलोत्पन्न सत्राजितराजास सूर्यप्रसादेंकरून स्यमंतकमणी प्राप्त झाला. तो त्याचा भाऊ प्रसेन यानें घेऊन अरण्यांत मृगयार्थ गमन केलें असतां, त्याला एका सिंहानें मारिलें. त्या सिंहाला उलट ऋक्षराज जांबवानानें मारून त्यानें तो मणि आपल्या गुहेंत नेला. आपला भाऊ मृगयेहून परत येत नाहींसें पाहून सत्राजिताला, त्याला कृष्णानें स्यमंतकमण्यास्तव मारिलें असावें, असा संशय आला आणि त्यानें बंधुवधाचा व मणिहरणाचा असे दोन्ही आरोप कृष्णावर केले. पुढें कृष्णानें आपल्यावरील आरोप दूर करण्यासाठीं ऋक्षराजाच्या गुहेंत जाऊन त्याच्याशीं युद्ध केलें व त्यापासून स्यमंतकमणी घेतला. ऋक्षराज जांबवानानें कृष्ण हा परमेश्वराचा अवतार आहे असें जाणून आपली कन्या जांबवती त्याला विधिपूर्वक अर्पण केली. नंतर कृष्णानें तो मणी परत सत्राजितास आणून दिला; तेव्हां त्यानें आपल्या दोषपरिमार्जनार्थ आपली कन्या सत्यभामा कृष्णास देऊन त्याच्याशीं सख्य केलें. ४. **आळेप्रमाणें. 'आळशी'–आळ+अशी (सारखी), यांत 'अशी' या पदांतील अचा लोप होऊन 'आळशी' हें रूप बनलें. 'आळ' या शब्दाचा अर्थ खोटा आरोप किंवा बालंट असा आहे. कोड किंवा लळा असा जो ह्याचा दुसरा अर्थ आहे तोही पंतांनीं आपल्या कवितेंत योजलेला दिसतो.** पुढील उदाहरणें पहाः–(१) ज्यां सन्मतितें पुरवुनि **आळ** सुखविलें तसें न यमुनेतें । (आदिपर्व–अ० ३२ गी० ५३). (२) आळवि घेउनि, मी शिशु आळवितों, निष्ठुर त्वदुर, वाळीं । **आळ** निवारुनि मातें, आळस टाकुनि, धांव, कुरवाळीं. ॥ २२ ॥ [मोरोपंत–स्फुटप्रकरणें–भाग १–आर्याकेकावली–]. (३) धर्म म्हणे, 'गुरुराया ! पुरवीं माझीहि ही दुजी **आळ** । [सभापर्व–अ० १ गी० ४०]. सत्राजित स्यमंतकमणी नाहींसा झाला तेव्हां संतापून काय म्हणाला त्याचें **पंत** वर्णन करतात. 'पावे संताप सत्राजित बहुत, म्हणे, 'हा मणिग्रीव सेनाहीन स्वच्छंद गेला तरि जरि मृगआदीळ रानीं वसेना, । भ्राता कां हो ! न आला ? हय जवन, नसे काळ आतां, अरीनें प्रायः संहारिला तो वरमणिकरितां क्रूरकर्में हरीनें'. ॥ १२ ॥ [ही कथा **पंतांनीं** कृष्णविजय–उत्तरार्ध–अध्याय ५६ यांत समग्र वर्णिली आहे.]

**१. तृप्त केले. २. एकटा. एकटा दुकटा किंवा एकला दुकला, असे दोन्ही प्रयोग आहेत. अलीकडे मात्र एकला दुकला, हे शब्द फारसे प्रचारांत येत नाहींत. ३. जेवणांत. जेवणाच्या समारंभांत. जेमन=जेवण.** 'जेमनं लेह आहारो निघसो न्याद इत्यपि' इत्यमरः, 'जिमु आदने' म्हणजे भक्षणार्थक जिम् धातूपासून जेमन हा शब्द झाला आहे. **'तुम्ही म्हणाल कीं, 'मीं बहुतांचा उद्धार केला आहे. तुला एकट्याला पावलों नाहीं म्हणून आळशी होईन काय?' यावर कवि दृष्टांतरूपानें उत्तर देतात–[कोणी वदान्यानें]**

चुकेल, तरि त्यास दे, परि वदान्य लाजे मनीं. ॥ ८

---

'असंख्य जन तर्पिले (भोजन देऊन तृप्त केले) [त्यांत] एकला (एकच) क्षुधित (भुकेला) जेमनीं (भोजनांत) चुकेल (जर चुकून राहील) तरि त्यास (त्या क्षुधितास) वदान्य (दाता) दे (अन्न देतो), परि मनीं (मनांत) लाजे (लाजतो). माझ्या मुक्तद्वारांत असंख्य लोक जेवून तृप्त होऊन गेले, असें असतां एकच क्षुधित चुकून कसा राहिला असें त्याच्या मनाला तें सलतें; तसे तुह्मीं असंख्य जन उद्धरिले त्यांच्यामागून माझाही उद्धार कराल; परंतु तुमच्या मनाला अमळ संकोच होईल. तसें न व्हावें ह्मणून लवकर येऊन माझा उद्धार करा अशी मी प्रार्थना करितों.' (केकादर्श–पृ० १३–१४.)

१. कदाचित् चुकेल. येथें हा कादाचित्क्यार्थद्योतक भविष्यकाळाचा प्रयोग समजावा. २. उदार, दाता. साधारण उदारप्रकृति मनुष्यही आपल्या अन्नदानांत एकाददुसरा मनुष्य चुकून उपाशीं राहिला तरी मनांत खजिल होतो, मग 'वदान्यजनसद्गुरु,' (केका १ पहा) जे तुह्मी त्यांना मी एकटा उद्धार झाल्याशिवाय राहिलों तर किती पटीनें वाईट वाटावें बरें? 'स्युर्वदान्यः स्थूललक्ष्यदानशौंडाबहुप्रदे' इत्यमरः. शेवटल्या दोन चरणांत 'दृष्टांत' [केका ४ टीपा पहा] अलंकार झाला आहे. या दृष्टांताच्या द्वारें प्रथमचरणांतील आळशीपणाचें प्रदिपादन केलें आहे ह्मणून काव्यलिंग अलंकार झाला आहे. येथें पहिल्या अर्धांतील वाक्यांत 'कारण' आणि दुसऱ्या अर्धांतील वाक्यांत 'कार्य' असा दोन वाक्यांत कार्यकारणभाव स्वीकारला आहे आणि 'म्हणून' हा शब्द अध्याहृत आहे, यास्तव हा काव्यलिंग अलंकार समजावा, [अलंकारमीमांसा–पृ० ४२.] याचें लक्षण व उदाहरणः–(१) काव्यलिंगं हेतुना स्यात्समर्थव्यसमर्थनम् । वाक्यार्थत्वे पदार्थत्वे हेतोर्द्वैविध्यमिष्यते ॥ जितोऽनया स्मरो नूनं यामालिंगति वल्लभः । कंदर्पमजयद्धिप्रस्त्रिनेत्राक्रांतमानसः ॥ १६४ ॥ [मंदारमरंदचंपू–व्यंग्यविंदु–पृष्ठ १४१] (२) समर्थनीयस्यार्थस्य काव्यलिंगं समर्थनम् । जितोऽसि मंद कंदर्प! मच्चित्तेऽस्ति त्रिलोचनः ॥ [कुवलयानंद], जेथें समर्थनीय अर्थाचें समर्थन (सयुक्तिक प्रतिपादन) केलें असतें तेथें काव्यलिंग अलंकार होतो. यांत कार्यकारणभाव मानिला असून 'म्हणून,' 'कारण,' असा शब्द अध्याहृत असतो. प्रतिपादनीय अर्थ प्रतिपादिती काव्यलिंग तरि बाहें, जितलासि मंदमदना कीं, मच्चित्तीं त्रिनेत्र वसताहे ॥ (अलंकारविकाश). येथें मदनपराजयाचें कठिण कृत्य प्रतिपादावयाचें असल्यामुळें मदनदाहक शिवाची चित्तांत वसति वर्णिली आहे. याचीं उदाहरणें:–(१) या आर्येचा अर्थ हरिपंतच लावतील, ते जाडे पंडित आहेत. (२) ज्याचा संकल्पचि हें अद्भुत ऐसें अतर्क्य विश्व रची । अत्यद्भुत पुर तें कां नोहे, शिल्पी जयास ईश्वरची ॥ २ ॥ [मोरोपंत–बृहद्दशम–उत्तरार्थ–अध्याय ८१ गी० ६५]., (३) गाती अजातरिपुच्या हे सर्व परा सुयोधना! महिम्या । धावी त्यासचि वसुधा निरखूनि परासुयोधनामहि म्या ॥ [उद्योगपर्व–अ० ११ गी० ४२ पहा].

'अगा! प्रणतवत्सला!' म्हणति त्या जनां पावलां;
म्हणोन तुमच्याच मी स्मरतसें सदा पावलां. ।
'करूं बरि कृपा, हरूं व्यसन, दीन हा तापला.'
असें मनिं धरा खरा; भरंवसा मला आपला. ॥ ९

१. अगा हें कारुण्यार्थीं संबुद्धिदर्शक अव्यय होय. मागील केकेंत जें भगवंताचें स्वतःविषयीं औदासीन्य सांगितलें तें अयोग्य, असें आणखी दाखवीत असतां कवि ह्मणतात. येथें अगा हें अव्यय मोठ्या खुबीनें योजिलेलें आहे. मागल्या केकेंत कवीनें भगवंतास आळशी म्हटलें व त्याला लाज वाटावी असेंही सुचविलें. यांत आपल्या ठिकाणीं औद्धत्य आलें अशा शंकेनें जणूं काय तन्निवारणार्थ अगा या करुणशब्दानें संबोधन देऊन भगवंतास कवि प्रार्थितात. २. प्र+नत+वत्सला=प्रणतवत्सला=अत्यंत नम्र झालेल्यांच्या (शरणागतांच्या) ठिकाणीं वत्सल (दयालु) जे तुम्ही त्या. कायावाचामनेंकरून जे प्रणत त्यांजविषयीं कनवाळू अशा देवा! 'वत्सांसाभ्यां कामबलें' [कौमुदी–१९०५, पाणिनि–५।२।९८] या सूत्रानें काम (इच्छा) व बल या अर्थीं वत्स व अंस यांचीं वत्सल व अंसल अशीं रूपें होतात. ३. [जे] 'अगा! प्रणतवत्सला!' [असें तुला] म्हणति त्या जनां पावलां–असा अन्वय. प्रसन्न झालां. त्यांवर कृपा केली. 'हे शरणागतवत्सला!' म्हणून जे कोणी तुला हाका मारितात (असें म्हणून जे कोणी तुला अनन्यभावानें शरण येतात) त्यांवर त्वां कृपा केलीच केली. 'म्हणति' ह्या वर्तमानकाळापुढें 'पावलां' हा भूतकाळ आल्यानें येथें निश्चयरूप अर्थ ध्वनित होतो. ४. असे तुम्ही भक्तवत्सल आहां याकरितां. ५. इतर देवतांचा त्याग करून तुमच्याच. येथें 'च' हें अवधारणाबोधक व व्यावृत्तिवाचक अव्यय होय. मोरोपंतांनीं पूर्वीं सर्व देवांची स्तुति केली तरी त्यांना शांति मिळाली नाहीं, म्हणून शेवटीं ते विष्णुरूप भगवंताची या 'केकावली'नें स्तुति करण्यास उद्युक्त झाले असें दिसतें. मोरोपंतांची उपास्यदेवता राम होती हें लक्ष्यांत ठेविलें म्हणजे याचें फारसें आश्चर्य वाटावयास नको. ६. स्मरण करीत आहें, निरंतर ध्यात आहें, माझी तुमच्याच पादकमळाच्या ठायीं एकनिष्ठ भक्ति आहे. ७. चरणकमलांस. असे आपण शरणागतवत्सल आहां हें जाणून मी तुमचेंच ध्यान निरंतर करितों. भगवच्चरणारविंदास शरण गेल्यानेंच तापत्रयोपशमन हें नैसर्गिक फल प्राप्त होतें, तसें केल्याशिवाय तें होत नाहीं म्हणून भगवंताच्या चरणकमलाचीच प्रार्थना केली आहे. ८. आतां माझी विनंती आपणांस एवढीच आहे कीं, आपण येणार असाल तेव्हां या; पण पुढील गोष्टीचा मात्र विसर पडूं देऊं नका. हा (आपल्याकडे बोट दाखवून कवि म्हणतात, हा मोरोपंत) दीन तापला (त्रिविधतापानें पोळला) [आहे यास्तव याजवर] बरि कृपा (कैवल्यदानापर्यंत कृपा) करूं, [याचें] व्यसन (संकट–कायिक वाचिक मानसिक असें, किंवा आधिभौतिक, आधिदैविक व आध्या-

मला निरखितां भवच्चरणकन्यका आपगा

त्मिक असें त्रिविधतापात्मक संकट) हरूं (दूर करूं); असें [तुम्ही] मनिं (आपल्या मनांत) धरा (वागवा), मला आपला खरा भरंवसा [आहे], ह्या दीन त्रिविधतापानें पोळलेला आहे म्हणून त्याचें संकट हरण करून त्याजवर चांगली कृपा करूं असें आपण मनांत धराल अशी मला आपली फार खात्री आहे. आपल्याशिवाय इतर कोणाचाही मला खरा भरंवसा नाहीं, जो काय आहे तो तुमचाच आहे. तुम्हीच माझें दुःख निवारण्यास समर्थ आहां. ९. भरंवसा=भरवश, भरोसा. [भरवशो महान् प्रत्ययः] १०. आपला भरंवसा आहे असें म्हणण्यांत दुसऱ्या देवता माझें तारण करण्यास असमर्थ आहेत असें ध्वनित केलें आहे.

१. 'इतर देवतांचा त्याग करून तुमच्याच पावलांचें मी स्मरण करीत आहें असें म्हणतोस तर, इतर देवता तुझा उद्धार करणार नाहींत काय, असें जर म्हणाल तर ऐका' (केकादर्श) एका देवतेची गोष्ट सांगतों. 'भवच्चरणकन्यका (गंगा) आपगा-(नदी) मला निरखितां (न्याहाळून पाहातां) म्हणे, 'अगई! असें पाप कधीं न ऐकिलेंहि'-असा अन्वय. तुमच्या चरणाची कन्या म्हणजे तुमच्या पायापासून निघालेली नदी भागीरथी हिच्याकडे जेव्हां मी स्वोद्धाराविषयीं आतुर होऊन गेलों तेव्हां ती मला पाहतांच म्हणाली, 'अगई! असें या पाप्याच्या सारखें पाप कधींच ऐकिलेंही नाहीं मग पाहिलें कोठून?' २. भवत्+चरण+कन्यका=आपल्या पदापासून झालेली मुलगी=हिची उत्पत्ति विष्णूच्या पायांपासून आहे म्हणून हिला 'विष्णुपदी' असेंही म्हणतात. ह्याविषयीं मोरोपंतानें एके ठिकाणीं म्हटलें आहें:-'गंगेचा तेंवि जयश्रीचा प्रभुच्या पदांबुजीं उगम' [अष्टम स्तोत्ररामायण-गीती ५७ उत्तरार्ध]. अशा प्रकारचे उल्लेख पंतांच्या आणि इतर सर्वमान्य मराठी कवींच्या ग्रंथांतून फार आढळतात. कवि आपला उद्धार करण्यास समर्थ झाली नाहीं अशा देवतेची गोष्ट सांगतांना प्रत्यक्ष विष्णुपदापासून झालेली, महादेवानें आपल्या मस्तकीं धारण केलेली आणि त्यामुळें तिन्ही लोकांस पावन करण्यास परम समर्थ अशा भागीरथीचीच गोष्ट सांगतात हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. आपल्या उदकांत नित्य स्नान करणाऱ्या मनुष्यास 'गंगायां स्नाति यो मर्त्यो यावज्जीवं दिने दिने। जीवन्मुक्तः स विज्ञेयो देहान्ते मुक्त एव सः ॥' या स्मृतिवचनानें मोक्ष देण्याचा इतका थोर जिचा अधिकार त्या गंगेनेंच जेथें उद्धारण्याविषयीं हात टेंकले तेथें दुसऱ्या देवतांचा काय पाड? ही गोष्ट गंगेचें उदाहरण निवडून पंतांनीं ध्वनित केली आहे. 'भवच्चरणकन्यका' या पदांत 'परिकर' अलंकार झाला. या केकेवरून पंतांनीं काशीस जाऊन गंगेचें कधीं दर्शन घेतलें होतें कीं काय? असा प्रश्न मार्मिक व जिज्ञासु वाचक विचारतील, त्यांस आम्ही होय म्हणून उत्तर देतों. पंतांनीं आपली कविता काशींतील पंडितांच्या परीक्षणार्थ पाठविली होती असा लोकप्रवाद असून 'गंगाप्रार्थने'च्या शेवटीं [मोरोपंतकृत स्फुटकाव्यें-पृ० ५७] आपल्या 'गंगाप्रार्थना' आर्या काशीस पाठविल्या असें स्वतः पंतांनीं सांगितलें आहे. 'श्रीरामसुतमयूरें, श्रीगंगाप्रार्थनार्थ, यीं आर्या । पाठविल्या काशीप्रति; कीं दीनाच्या जपेचि ती

म्हणे, 'अगई! ऐकिलेंहि न केधीं असें पाप' गा! ।

कार्या ॥' [गंगाप्रार्थना–गी० १७]. शिवाय गंगामाहात्म्यवर्णन पंतांनीं चार पांचदा करून काशींतील सर्व देवतांची स्तुति पृथक् पृथक् केली आहे. यावरून व पुढील केकेवरून 'केकावली' हें काव्य परशुरामपंततात्या गोडबोले आपल्या 'केकादर्शा'च्या प्रस्तावनेंत म्हणतात त्याप्रमाणें कवीनें अगदीं शेवटीं शेवटीं रचिलें असावें असें दिसतें. ३. **लहान मुलगी. 'कन्या' असें न म्हणतां 'कन्यका' असें जें गंगेला म्हटलें आहे त्यांत फार खुबी आहे. सर्व देवतांत श्रेष्ठ असूनही जी आपला उद्धार करण्यास समर्थ झाली नाहीं ती कशाची खरोखर समर्थ असें मनांत आणून कवीनें 'कन्यका' (पोरगी) या शब्दयोजनेनें गंगेच्या सामर्थ्याचें न्यूनत्व दर्शविलें. तसेंच पुढें तिला भय वाटून तिनें जो अभिनय केला आहे तो एखाद्या लहान भित्र्या पोरीलाच साजण्यासारखा आहे.** ४. **नदी.** 'तरंगिणी शैवलिनी तटिनी ह्रदिनी धुनी । स्रोतस्वती द्वीपवती स्रवंती निम्नगापगा ॥' इत्यमरः.

१. **'हें खेद किंवा आश्चर्य (किंवा भय) यांचें द्योतक केवलप्रयोगी अव्यय होय; याचा प्रयोग बहुधा स्त्रिया व मुलें यांच्या भाषणांत होत असतो;** भय वाटलें असतां, अथवा कांहीं चमत्कार पाहिला असतां, निरंतर आईच्या सन्निध राहणारीं मुलें, त्या भयाच्या निवारणार्थ, अथवा तो चमत्कार दाखविण्याकरितां, आपल्या आईसच प्रथम–'अगे आई!' म्हणून हाका मारितात; त्याच संबोधनाचें 'अगई' हें संक्षिप्त रूप होय.' (यशोदापांडुरंगी–पृ० ६३.) **संस्कृत 'अयि' ह्या ममतादर्शक अव्ययापासून 'आई' हें मराठींत रूप झालें.** येथें जी गंगेची समयस्थिति वर्णन केलेली आहे ती स्त्रीस्वभावास फारच अनुरूप आहे. **पंतांनीं आपल्या कवितेंतून बायकांचीं बोलणीं, त्यांचे स्वभाव फारच मार्मिकतेनें व हुबेहुब रेखिले आहेत.** पुढील उदाहरणें पहा:–(१) म्हणति अदित्यादि सत्या, **'या मेल्याचें समूळ तळपट हो'** । [सभापर्व–अ० ५ गी० ८७ पृ० ४६]. (२) सेतु न तो; यत्पतिनें स्वसुता नेली, जशी वृकें एणी, । **त्या लंकेची श्रीभूदेवीनें ओढिली असे वेणी** ॥ [वनपर्व–अ० १२ गी० ११ पृ० १७०]. (३) सीतेवरि जातां तो दे लाज विसाळल्याहि कुत्र्यातें, । **'मेल्या रांड तुझी हो'** ऐसी शापीं हळूच कु त्यातें ॥ [वनपर्व–अ० १२ गी० ५८ पृ० १७८]. (४) धर्मासि म्हणे, 'हूं, या मांडा उकलूनि रम्यतळ पट हो' । कृष्णाहि म्हणे, **'मेल्या अक्षकराचें समूळ तळपट हो'** ॥ [विराटपर्व–अ० ६ गी० ७८ पृ० १३४]. (५) कां केलें सख्य जडा? आतां कां रडसि या जनावाणीं? । ज्याच्या संगीं रमतां **डोळयांचें तें तुटेचिना पाणी** ॥ [कृष्णविजय–उत्तरार्ध–अध्याय ९० गी० १८; पृ० ३२५.] २. **गंगेजवळ स्वोद्धाराविषयीं उत्सुक असे लाखों जीव आजपर्यंत आले असल्यामुळें, असा विलक्षण पापात्मा असलेला आपण आजपर्यंत कधीं ऐकिलाही नाहीं मग पाहणें कोठून? असा निश्चयात्मक अभिप्राय देण्याचा तिला चांगला अधिकार पोंचतो.** ३. **'गा' हें अव्यय कवीनें भगवंताला उद्देशून संबोधनार्थक योजिलें आहे.** कदाचित् तें गंगेनें कवीला उद्देशिलें आहे असें मानिलें तरी चालेल. तथापि भगवंताला संबोधून तें योजिलें आहे असें मानणें अधिक प्रशस्त होय. **'गा' हें अगाचें संक्षिप्त रूप होय.**

# कर श्रवणिं ठेविते,[2] नुघडि[3] नेत्रें, घे[4] भीतिला;

**१. कवि गंगेच्या भयाचीं आणखी चिन्हें स्पष्ट करितात. 'जरी मीं स्वोद्धाराविषयीं प्रार्थना केली तरी तिनें कानावर हात ठेवून तुझी प्रार्थना मी ऐकत नाहीं असें सुचविलें.' कानावर हात ठेवणें=कानांत बोटें घालणें=कान झांकणें=कोणत्या तरी कार्याविषयीं आपणास कांहीं माहिती नसून कर्तव्यही नाहीं असें दर्शविणें.** पूर्वोत्तरपश्चिमदिशांचा शोध करून सीता सांपडत नाहीं म्हणून जेव्हां वानरांनीं रामास सांगितलें तेव्हां दक्षिणदिशा तरी सीतेविषयीं कानावर हात न ठेवो असें तो म्हणाला. 'राम म्हणे कर्णीं कर ठेवूं ती तरि न दक्षिणा आशा । मज फार **दक्षिणे**चीं विप्रा जसि तशीच लागली आशा ॥' वनपर्व–अध्याय ११ गीति ११८ पृ० १६६]. २. **ठेविले.** कोणी कोणी 'ठेवि ते' असा पदच्छेद करून ते (ती) ठेवि (ठेविती झाली) असा अर्थ करितात. **'ठेवि ती' असाही पाठ आहे.** ३. **उघडीत नाहीं. येथें 'उघडणें' या स्वरारंभक धातूच्या योगानें 'न'तील 'अ'ला परसवर्ण आदेश होऊन 'नुघडि' असें रूप झालें.** अशा प्रकारच्या धातूचीं उदाहरणें **पंतां**च्या कवितेंत पुष्कळ आढळतातः–(१) हानि नव्हाला **नुमजे,** केली कलिनें शिरोनि मति मलिना. । (वनपर्व–अ० ४, गी० ९६), (२) क्षण ज्यापुढें **नुरावें** प्रभुबळ **नुमजे** सुकंठ बालिश तें । (वनपर्व–अ० ११ गी० १००), (३) **नुच्चारू** परमर्मा जीभ, नकारा जशी उदारांची । [मोरोपंत–स्फुटकाव्यें–भाग १–सन्मनोरथराजि–गी० ६ पृ० ३०३.] ४. **गंगा नुसती कानावर हात ठेवून राहिली काय? नाहीं. 'नुघडि नेत्रें'–डोळे उघडून मजकडे पाहीना देखील. फार काय सांगावें 'भीतिला घे,' याचें पाप मला डसेल कीं काय म्हणून ती भ्याली. असें जेव्हां पाहिलें तेव्हां मीं आपल्या मनांत निश्चय केला कीं जरी मी कार्यलोभी म्हणजे स्वकार्यसाधनाचा लोभ धरणारा आहें तरी इतःपर तिला मी माझा उद्धार करा म्हणून आग्रह करणार नाहीं.** ५. **'या पाप्याचा उद्धार करण्याचें मनांत आणल्यास संग्रहीं असलेलें सर्व पुण्य खर्चून उलट पाप मात्र लागावयाचें' हा विचार गंगेच्या मनांत येऊन ती भ्याली. साधुजन स्वतपोव्ययानें दुष्टांचीं पातकें दूर करितात. शाप देणें किंवा आशीर्वाद देणें ह्या दोन्ही क्रियांमध्यें तपोव्यय होतो.** स्वर्गांतून ययाति आत्मस्तुतिजन्य पातकानें मृत्युलोकीं पडला असतां त्याच्या नातवांनीं आपलें तप देऊन परत स्वर्गीं पाठविला व कित्येक ऋषी शाप देऊन, पुण्य खर्चलें म्हणून फिरून तप करिण्याकरितां अरण्यांत चालते झाले हें सुप्रसिद्ध आहे. ऋषिलोक यज्ञविध्वंसक राक्षसांस शाप देऊन मारण्यास समर्थ असूनही तपोभंगास्तव तसें करीत नसत, असें **रामायणांत** सांगितलें आहे. लक्षावधि प्राणी गंगेंत **स्नान करून** पापमुक्त होतात पण त्यांचीं पातकें भस्म करण्यांत तिचा पुण्यसंचय संपतो ह्याच्या **पुष्ट्यर्थ** पुढील **पंतां**च्या कवितेंतील उदाहरणें पहाः–(१) ती कां विटेल? वेंची नित्य पतितशतहिता स्वसुतपा जी । (उद्योगपर्व–अ० १३ गी० ५८), (२) जन पापक्षय व्हाया इच्छीना कोण साधुच्या संगा । भंगाया संसर्गें घडलें अघ इच्छिती स्वयें गंगा. ॥ [मोरोपंत–स्फुटकाव्यें–भाग १–सत्संगस्तव–गी० ५ पृ० ३२.]

न घालिन भिडेस मी, जरिहि कार्यलोभी तिला. ॥ १०

१. जरिहि=जरी, यद्यपि. यर्हि, जर्हि, जरी, जर असा अपभ्रंशक्रम दिसतो. 'जर' हा शब्द चालू भाषेंत प्रसिद्धच आहे; तथापि त्याच अर्थी 'जरी' आणि त्याचाच प्रतिवादी 'तरी' ('तर्हि'चा अपभ्रंश) हे काव्यांत आणि जुन्या चालीच्या पत्रव्यवहारांत वारंवार येत असतात. जसें:-'आपणाकडून बहुत दिवसांत पत्र येऊन समाचार कळला नाहीं, तरी असें न करितां वारंवार पत्रीं समाचार घेत असावा.' इत्यादि. चालू मराठींतील 'जरी' हा शब्द 'जर' आणि 'ही' मिळून झाला आहे म्हणून काव्यांतील 'जरिही' आणि चालू 'जरी' हे समानार्थक होत. 'ही' हा शब्द 'अपि'चा अपभ्रंश. संस्कृत 'अपि' 'पि'; प्राकृत आणि कुणबीमराठी 'बी'; व्रज आणि हिंदी 'भी;' आणि मराठी 'ही'. 'यदि' या विशेषपरिचित संस्कृत शब्दाचाही अर्थ 'जर' असा आहे. पण त्याचा अपभ्रंश 'जद्' हा हिंदीमध्यें येतो. 'जर' याशीं त्याचा संबंध दिसत नाहीं. २. 'यद्यपि कार्यलोभीजन स्वकार्यसाधनाकरितां पात्रापात्रविवेचन करण्याचें धोरण ठेवीत नाहींत, ते जो सांपडेल त्यास भीड घालतात, तथापि कवि म्हणतात, मी तसें करणार नाहीं; कारण मला पाहून जी भिते, व माझा त्रास करिते अशा गंगेपासून माझा उद्धार कदापि होणार नाहीं, म्हणून तुझाच भरंवसा मला खरा आहे असें जें मी पूर्वीं बोललों तेंच खरें असा येथील हृद्गतार्थ जाणावा' (यशोदापांडुरंगी-पृ० ६५). ३. येथें कवीला पाहून गंगेची झालेली अवस्था स्वाभाविकरीत्या वर्णिली आहे म्हणून स्वभावोक्ति नामक अलंकार झाला. एकाद्या वस्तूचें अथवा व्यापाराचें जसें असेल तसें सरळ हुबेहुब वर्णन केलें म्हणजे हा अलंकार होतो. याचें लक्षण:-(१) 'सूक्ष्मवस्तुस्वभावयथावद्वर्णनं स्वभावोक्ति' [अलंकारसर्वस्व-पृ० १७७], वस्तुस्वभाववर्णन जरि स्वभावोक्ति होय तरि लोकीं,। चंचलनयनांचल हा अचलश्रुति हरिणसंघ अवलोकी' (अलंकारविकाश). चंचल डोळ्यांच्या व ताठ कानांच्या हरिणसमूहाचें जें वर्णन केलें आहे तें स्वाभाविक असल्यामुळें हा स्वभावोक्ति अलंकार झाला. प्रस्तुत केकेंत गंगा भय पावते, कानावर हात ठेविते, नेत्र न उघडते, 'अगई' इत्यादि बोलते, असें वर्णन असून तें चमत्कृतिजनक आहे म्हणून स्वभावोक्ति होय. याचीं अन्य उदाहरणें:-(१) पृथु नितंब नितंबिनिचा वरी कटितटीं कटिसूत्रचि सांवरी । कनककंकणवृंदहि वाजती मुखिं सुखश्रमबिंदु विराजती ॥ श्रवणिंचे श्रवणीं नग हालती गळति गुंफिलिया शिरिं मालती । घुसळितां कुचकुंभहि हालती अमृत ज्यांतिल घे कमलापती. ॥ [वामन], (२) खलबलजलनिधिमग्ना धेनु उसळल्या अलाबु झाल्या हो । हांसुनि विजय मनिं म्हणे कां गोपसख्या मला बुजाल्या हो?, ॥ (३) गेल्या पळोनि गाई पृष्ठावरि पुच्छभार वाहोनी । राहूनि निश्चल क्षण विजय निवे त्यांकडेचि पाहोनी ॥ [मोरोपंत], (४) ऐसें वदे मग तयास धरावया हे, ते होय हंसगमना पहिलीच आहे । वाजेच ना वलय नूपुरनाद नोहे, तो तद्गतीस निरखूनि कसा न मोहे ॥ [रघुनाथपंडित], (५) ऐसें वदोनि ओष्ठप्रांत जिभेनें पुन:पुन्हा चाटी । अवलंबी अत्युग्रा भीम अतृप्त द्विपारिची धाटी ॥, (६) रिपु शूर दूर तेथुनि तें दारुण कर्म पाहतां पळती । किति पडती किति दडती कितिएकांचीं धृतायुधें गळती. ॥, (७) शल्य सुयोधन वाक्यें कोपें चोळी करें करा डोळे।

**सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें,**

आरक्त करी चावे अधरातें फार तो मनीं पोळे. ॥ [मोरोपंत]. **पंडित जगन्नाथरायाच्या** 'गंगा-लहरीं'त वरील प्रस्तुत केकेंतील विचारांशीं बहुतांशीं जुळणारा व ह्या केकेबरोबर अर्थसादृश्याच्या सदराखालीं देण्यासारखा एक श्लोक आहे. जगन्नाथराय भागीरथीचें स्तवन करीत असतांना म्हण-तातः–चयंते तीर्थानि त्वरितमिह यस्योद्धृतिविधौ करं कर्णे कुर्वत्यपि किल कपालिप्रभृतयः; । इमं तं मामंब! त्वमियमनुकंपार्द्रहृदया पुनाना सर्वेषामघशमनदर्पन्दलयसि. ॥ २८ ॥ अर्थः–'जयाच्या उद्धाराविषयिं बहु तीर्थेंहि पळती, स्वकानीं हस्तातें मग शिवशिवादीक धरिती; । असा मी त्या मातें पुनित करिशी तूं जननिये! जगीं पापघ्नांच्या हरिसि गुरुगर्वास सदये! ॥ [वामनपंडितकृत समश्लोकी टीका]. जगन्नाथरायांनीं 'गंगे! तुजशिवाय मला कोणी त्राता नाहीं' असें म्हणून तिज-वर स्वोद्धाराचा सर्व भार सोंपविला; पंतांनीं प्रत्यक्ष गंगेच्यानेंही माझें तारण होत नाहीं असें कळवून भगवंतावर सर्व भार सोंपविला आहे. तेव्हां यांत आमच्या मतें पंतांनीं जगन्नाथरायावर आपल्या कौशल्याची ताण केली. इतर देवता तारण करण्यास असमर्थ जाणून गंगेस शरण जाण्यापेक्षां ती ज्याच्या चरणकमलापासून उत्पन्न झाली आहे, अतएव ज्याच्यापेक्षां ती पुष्कळच कमी आहे अशा भगवंतालाच शरण जाणें अधिक युक्त असें कोणीही कबूल करील, हाच विचार पंतांनीं 'भवचरणकन्यका' या पदानें सुचविला आहे. शिवाय जगन्नाथरायाच्या विष्णुलहरींतील पद्यांशीं सदृश असे विचार या काव्यांत आलेआहेत. यावरून पंतांनीं गंगालहरी व इतर 'लहरी' वाचल्या असाव्यात असा तर्क करण्यास जागा आहे. पुढें एका केकेवर टीका करितांना पंतांना पंचमहा-काव्यांपैकीं निदान **'रघुवंशा'**ची चांगली ओळख होती असें आम्ही दाखविणार आहोंत.

१. **नेहमीं, निरंतर. 'गंगेशिवाय इतर देवांनीं देखील माझा धिक्कार केल्यामुळें भगवंताशिवाय मला दुसरा कोणी त्राता नाहीं' असें सांगून तो केवढा दयाळु आहे, याचें कवि वर्णन करितात. २. स्थान. 'सदैव पद (ईशचरण) नमितां [मीं] जरी ल-लाट [हें] किणें केलें' असा अन्वय.** 'सदैव नमितां जरि किणें ललाट पद केलें' असा अ-न्वय लाविल्यानें 'नमितां' याच्या कर्त्याचा विलक्षण अध्याहार करावा लागतो. पहिल्या अन्वयांत 'नमितां' आणि 'केलें' या दोन क्रियांचा कर्ता समान असल्यामुळें आणि तो द्वितीय चरणांतील 'मज' या पदानें सूचित असल्यामुळें बराच सरळ आणि साहजिक दिसतो. **'गंगा भ्याली, पण तिच्याशिवाय इतर देवतांनीं तरी तुझा धिक्कार केला नसेल, मग त्यांचें भजन कां करीत नाहींस? असें आपण (ईश्वर) ह्मणाल तर ऐका. इतर देवतांच्या पायांशीं डोकें घांसून जरी त्याला घट्टे पडले तरी त्यांना दया आली नाहीं ह्मणून तुझ्या चरणांवां-चून माझें तारण करणारा मला कोणी दुसरा दिसत नाहीं. तेव्हां तूंच माझा उद्धार कर. सदैव (निरंतर) पद (देवपाद) नमितां (नमन करतां, नमन करून) जरी [मीं] ललाट (कपाळ) [हें] किणें (क्षत) केलें=ईशचरणाला नमस्कार घालून कपा-ळाला किणें पडलें. (कपाळ घांसून जरी त्याला घट्टे पडले). अशा क्षतरूप कार्य-वर्णनानें एक किंवा इतर देवांच्या चरणांवर मस्तकारोपात्मक नमनाचें पौनःपुन्यरूप कारण स्पष्ट अनुमित होतें; दुसरें, इतर देवादिकांचें बाहुल्यही येणेंकरून ध्वनित**

नसे इतर तारिता मज [1]भवत्पदाब्जाविणें; ।
नतां करुनि [2]मुक्त ही [3]म्हणसि 'मी बुडालों [4]रिणें.'
अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें! ॥ ११

होतें; कारण क्षतरूप कार्य एकाच देवाच्या चरणांवर पुनः पुनः मस्तक घांसल्यानें अथवा, बहुत देवांच्या चरणांवर एकएकदां घांसल्यानेंही संभवतें. (य० पां०) हीं दोन्ही अनुमानें कवीस लागू पडतात. कारण पंतांनीं काशी, प्रयाग, गया, पंढरी इत्यादि पुण्यक्षेत्रांची तसेंच गंगा, यमुना, कृष्णा, गोदावरी, राजापुरस्थगंगा इत्यादि तीर्थांची, व विश्वेश्वर, काळभैरव, पांडुरंग, खंडोबा, म्हाळसा, महालक्ष्मी, रेणुका, गजानन, शिव, इत्यादि देवदेवतांची स्तुति केली असून गंगा, कृष्ण, पांडुरंग, गजानन, व शिव ह्यांचीं तर प्रत्येकावर तीन तीन-चार चार प्रकरणें लिहून स्तुति केली आहे. या केकेंत 'ॐ ब्रह्म वा एकमिदमग्र आसीत्', तसेंच 'ॐ एकमेवाद्वितीयं ब्रह्म' ह्या उपनिषदांतील सिद्धांतांचें सार गोविलें असून मुख्य देव सोडून तीर्थयात्रा व अन्यदेवता यांचें पूजन करणें हें अगदींच गौण म्हणून व्यंग्योक्तीनें सुचविलें आहे. ३. किणें=किण=क्षत, चिन्ह, वण, घट्टा. ह्या शब्दाचा पंतांनीं इतरत्र कोठें कोठें उपयोग केलेला आढळतो. पुढील उदाहरण पहा:—'दावी रडोनि झाले जे गंध उगाळितां स्वहात किणी' (विराटपर्व–अ० १ गी० १०६.)

१. भवत् (आपलें)+पद (पाय)+अब्ज (कमल)=आपल्या चरणकमलावांचून. 'या दोन चरणांत किणविधानेंकरून, आणि भगवच्चरणास अब्जोपमा दिली येणेंकरून, कवींनीं इतरांच्या चरणांचें काठिण्य, आणि भगवच्चरणांचें अत्यंत मृदुत्व, येणेंकरून ऊह्यमान जी तारतम्येंकरून भगवंताची अत्यंत कोमल हृदयता ती इंगित केली व तीच पुढें ते स्पष्टार्थानें कथन करितात.' (यशोदापांडुरंगी–पृ० ६७).+किण='व्रणजं चिन्हं च किणः' क्षत, व्रणोत्पन्नचिन्ह. २. मुक्त करुनि=भवबंधनांतून सोडवून. तुझ्या चरणकमलास नम्र होऊन जे तुला अनन्यभावानें शरण जातात त्यांना भवबंधनांतून सोडवून, 'तुम्ही सर्व ऐहिक सुखाचा त्याग करून मला शरण आलां या तुमच्या उपकाराबद्दल मी तुमचा ऋणी आहें' असें आपण म्हणतां. येथें संसाररूपी ऋणांतून भक्तांस मुक्त करणारा परमेश्वर स्वतः आपण त्यांचा ऋणी होतो असें वर्णन आहे. खरें पाहिलें असतां भक्तजन ऋणी झाले पाहिजेत. म्हणून येथें हा 'विरोधाभास' [केका ७, टीपा पहा.] अलंकार झाला. याचीं आंग्लकविकुलगुरु शेक्सपियर याच्या काव्यांतील सुरेख उदाहरणें:- (1) 'A *light* wife doth make a *heavy* husband.' (2) 'My *little* body is weary of this *great* world.' पंतांनीं प्रभूची अशा प्रकारची चमत्कारिक सावकारी पुढील गीतींत फार उत्कृष्ट रीतीनें वर्णिली आहे:–'ऋण तरि मुठिभरि पोहे त्याच्या व्याजांत हेमनगरी ती । मुदलांत मुक्ति देणें हे कोण्या सावकारिची रीती? ॥.' ३. जे कोणी अनन्यभावानें प्रभूला भजतात त्यांची सर्व काळजी तो वाहतो अशाविषयीं गीतेंत प्रत्यक्ष भगवंताचें वचन आहे:–

पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता सुवंशीं जैनी,

'अनन्याश्चिन्तयंतो मां ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥.'= इतर ठिकाणीं चित्त न ठेऊन भजति मला सप्रेम । त्या भक्तांचें चालवितों मी पार्था! योगक्षेम. ॥ (पाळंदेकृत गीतासुधा-अ० ९-२२). ४. हा शब्द संस्कृत 'ऋ' (जाणें) या धातूपासून बनलेल्या 'ऋण' (दुसऱ्याकडे गेलेलें धन) शब्दाचें अपभ्रष्ट रूप होय. ५. **अशा थोर व दयाळू भगवंताला जो मनुष्य शरण जाऊन मोक्षप्राप्ति करून घेत नाहीं, त्याच्या जिण्याला धिक्कार असो.** येथें भगवद्भक्तीशिवाय वांचणें अत्यंत निंद्य होय असा कवीनें अभिप्राय दर्शविला आहे. या केकेंत 'भवत्पद' हें 'अब्ज' असा रूपकसमास आहे. परंतु तारणें ही क्रिया करण्यास अब्ज असमर्थ आहे, ती क्रिया पदच करणार म्हणून हा **परिणाम** अलंकार होय. **जेथें उपमान हें क्रिया करण्यास असमर्थ असून उपमेय हें क्रिया करतें तेथें परिणाम नामक अलंकार होतो.** याचें लक्षणः—(१) 'आरोप्यमाणस्य प्रकृतोपयोगित्वे **परिणामः**' [अलंकार-सर्वस्व-पृ० ४०], (२) '**परिणामः** क्रियार्थश्चेद्विषयी विषयात्मना । प्रसन्नेन दृगब्जेन वीक्षते मदिरेक्षणा ॥' [कुवलयानंद]. '**विषयी क्रियोपयोगी विषयपणें होय तोचि परिणाम। मदिरेक्षणा प्रफुल्लें दृक्कमलें पाहते अविश्राम ॥**' (अलंकारविकाश) विषयी=उपमान-विषय=उपमेय. **प्रस्तुतस्थळीं अब्ज हें उपमान, पद हें उपमेय, व तारणें ही क्रिया पदानेंच करावयाची आहे.** याचीं अन्य उदाहरणें:—(१) तूं पात्र, गाधिजाला **सदुपायन करुनि देह,** नुतितें हो । हरि वारंवार असें, स्वकरेंचि धरूनि, वदे हनु तितें हो. ॥ [आदिपर्व-अ० १२ गी० १९ पृ० ७४], (२) **शिरें पदाऊपरि सत्वहीनें, जाणों फुलें अर्पियलीं अहीनें।** केला असा जो फणि नम्र देवें, हरूनि त्याचा मद वासुदेवें. ॥२७॥ [वामनपंडितकृत कवितासंग्रह-भाग १-हरिविलास-अध्याय ३, पृ० ४२०], (३) श्रीहरीस करिती नमनातें, तत्पदीं करुनि लीन मनातें, **अर्पिती पतिफणाकुसुमातें,** प्रार्थिती भुजगसंयमनातें. ॥ ७ ॥ [वामनपंडितकृत कवितासंग्रह-भाग १-हरिविलास-अध्याय ४ पृ० ४२३], (४) 'पदाब्जरज जें तुझें सकलपावनाधार तें', इत्यादि [केका ४]. (५) अमरीकेशकलापभ्रमरींच्या मंजुगुंजितें मुखर। *गौरीपदकंज करो त्वरित दुरित दूर,* जें अतिप्रखर (अ. वि.).

१. **कुशलत्व, आपआपले विषय ग्रहण करण्याविषयीं इंद्रियांची दक्षता. कदाचित आपण म्हणाल कीं, 'तुला जें द्यावयाचें तें मीं अगोदरच पुष्कळ दिलें आहे, मग तुझें आणखी मागणें काय आहे?** अशी आशंका कवि घेतात. २. **सर्व इंद्रियांच्या ठिकाणीं. सकलेंद्रियीं पटुत्व दिलें—असा अन्वय. नेत्रश्रोत्रादि पंचज्ञानेंद्रियें आणि पाणिपादादि पंचकर्मेंद्रियें अशीं दहा इंद्रियें मनुष्यास दिलीं आहेत.** 'श्रोत्रं, त्वक्, चक्षुषी, जिव्हा, नासिका चैव पंचमी (ज्ञानेंद्रियें) । पायूपस्थं, हस्तपादं, वाक् चैव दशमी स्मृता' (कर्मेंद्रियें) ॥' [मनुस्मृति-अ० २ श्लो० ९०], किंवा कोणी कोणी यांचे १ ज्ञानेंद्रिय, २ कर्मेंद्रिय, ३ अंतरिंद्रिय (मन) असे तीन भेद समजतात. **सर्वेंद्रियें आपआपले विषय ग्रहण करण्याविषयीं समर्थ अशीं केलीं आहेत.** ३. **मनुष्यपणा. इतर पश्वादियोनींपेक्षां श्रेष्ठ जो मनुष्यजन्म तो.** ४. **उत्तम कुळांत.** ५. **कीटकादि नीच योनींत ज-**

**द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं;।**
**यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली; तरी हा 'वरा'**

---

**न्मास न घालतां श्रेष्ठ अशा मानवयोनींतील उत्तम कुळांत जन्म दिला. जनि, जनी= जन्म. 'जनी** सीमंतिनीवध्वोरुत्पत्तौ च जनिर्मता ।' [विश्वकोश], **'जनी सीमंतिनीवध्वोरुत्पत्ता-वोषधीभिदि'** इति मेदिनी.

१. **ब्राह्मणत्व. याचा अर्थ क्षत्रियत्व किंवा वैश्यत्व असाही होईल, परंतु अर्थसंद-र्भानें येथें विप्रत्वच अभिप्रेत आहे.** 'द्विज' शब्दाचे अनेक अर्थ आहेत:–'**द्विजः** स्यात् ब्राह्मणक्षत्रवैश्यदंतांडजेषु ना' [मेदिनी]; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, दांत आणि पक्षी ह्या सर्वांस द्विवार जन्म आहे. तसेंच 'जन्मना जायते शूद्रः संस्कारैर्द्विज उच्यते,' 'जन्मना ब्राह्मणो ज्ञेयः संस्कारैर्द्विज उच्यते.' किंवा 'मातुर्यदग्रे जायंते द्वितीयं मौंजिबंधनात् । ब्राह्मणक्षत्रियविशस्तस्मादेते द्विजाः स्मृताः ॥'; **ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांचें मातेपासून जन्म होऊन पुनः (उपनयन) झाल्यानें दुसरें जन्म होतें म्हणून ते द्विज होत.** दांत, पक्षी यांचें द्विवार जन्म स्पष्टच आहे. २. **भलें=चांगलें, थोर. भक्तिज्ञानवैराग्येंकरून संपन्न असें (द्विजत्व). 'जें जनीं (लोकांत) बहु अलभ्य (दुष्प्राप्य) कीं [तें] भलें द्विजत्वहि दिलें.' या सृष्टींत (कर्मभूमींत) प्राप्त होण्यास फार कठिण असें भक्तिज्ञानयुक्त विप्रत्वहि दिलें.'** 'भागवतांतही [स्कं० ३ अ० २९ श्लो० २८-३३] **कपिलानें** देवहूतीस असेंच उत्तरोत्तर योन्याधिक्य वर्णून दाखविलें आहे, त्यांत ब्राह्मण श्रेष्ठ म्हणून सांगितलें आहे; आणखी त्यांतही जो कोणी समदर्शी मानव त्याचें अत्यंत श्रेष्ठत्व सांगितलें आहे.' (य० पां०) 'वर्णानां ब्राह्मणो गुरुः'=अठरा वर्णांचा राजा ब्राह्मण होय, हें वचनही प्रसिद्ध आहे. तसेंच प्राकृतसंस्कृत कवींनीं जागोजाग इतर देहांपेक्षां या नरदेहाचें महत्त्व वर्णून आपलें अक्षय्य कल्याण करून घेण्याची हीच संधि आहे म्हणून सांगितलें आहे. '**नरजन्मामधिं** नरा! करुनि घे नरनारायण गडी । तरिच सार्थक मानवकुडी ॥' ही रामजोशाची लावणी सर्वांस माहीत आहेच. **पंतांनीं** आपल्या **भगवद्गीतेच्या** प्राकृत भाषांतराच्या प्रस्तावनेंत (गीति १२) म्हटलें आहे:–'मी तों अगाधगीतामृधानदीमाजि घालितोंचि उडी । **नरजन्म पर्व दुर्लभ** जाणुनि घ्यावी कशी न येथ बुडी? ॥. **येथें 'भलें द्विजत्वहि दिलें' असा अन्वय लावून भलें (चांगलें, थोर) हें पद द्विजत्वाचें विशेषण करावें. 'द्वि' शब्दांत क्षत्रिय, वैश्य या वर्णांचाही अंतर्भाव होतो, परंतु येथें ब्राह्मणवर्णाचेंच ग्रहण अभिप्रेत असल्यामुळें क्षत्रिय आणि वैश्य या दोन वर्णांचें निराकरण 'भलें' या विशेषणानें केलें आहे असें समजावें.** द्विजत्वांतही जें उत्तम द्विजत्व तें=भलें द्विजत्व. '**भलें' हें** 'दिलें' या क्रियापदाचें क्रियाविशेषण केलें तथापि प्रशस्त. **द्विजत्व भलें (जसें द्यावयास पाहिजे होतें तसें) दिलें; ब्राह्मणवर्णांत जन्मास घालून द्विजत्व दिलें**–असा अर्थ. ३. **'कीं' हें अव्यय विकल्प, प्रश्न, आधार (कारण), अवधारणा (निश्चय) इत्यादि अर्थ दाखवितें. येथें तें अवधारणार्थीं योजिलें आहे. 'द्विजत्व हें अलभ्य आहेच' असा 'कीं' अव्यय योजिल्यानें अर्थ होतो.** ४. **यशस्+श्रवण+कीर्तनीं=यश+ऐकणें+सांग-**

ह्मणे 'अधिक द्याच कीं' अखिल याचकीं हावरा. ॥ १२

**ण्यांत=(भगवंताचें) यश ऐकण्यांत आणि सांगण्यांत. भगवंताचा महिमा वर्णन करण्याविषयीं आणि ऐकण्याविषयीं आवड दिली. ५ आवड, गोडी. भगवन्नाममहिमा गाण्याविषयीं आणि ऐकण्याविषयीं आवड दिली, ब्राह्मणत्व देऊन नास्तिकबुद्धि दिली नाहीं.** ब्राह्मणाचे जन्मास येऊन नास्तिकमताचा पुरस्कार करणारे व आचरणानें शूद्रातिशूद्राची बरोबरी करणारे ब्राह्मण आज किती तरी सांपडतील! अशांचें द्विजत्व भलें कोण ह्मणेल? ६. **तरी हा अखिल याचकीं हावरा (मोरोपंत) 'अधिक वरा द्याच कीं' म्हणे–असा अन्वय. तरी (मोरोपंत) 'अधिक वरा द्याच' म्हणे कीं, [तस्मात्] अखिल याचकीं हावरा [होय]–असाही अन्वय प्रशस्त. इतकें सारें दिलें असतांही हा (मोरोपंत) आणखी मागतोच आहे, तेव्हां सर्व याचकसमूहांत हा हावरा** (अतृप्त) **दिसतो.**

१. 'खाण्याविषयीं जो अतृप्त असतो त्यास हावरा म्हणतात.' (य० पां०.) **'ज्याला कितीही दिलें तरी पुरेसें होत नाहीं, आणखी हवें हवें म्हणतो, अशा स्वभावाच्या मनुष्यास 'हावरा' म्हणतात.'** (केकादर्श). 'हावरा' हा शब्द **पंतांच्या** काव्यांत बऱ्याच ठिकाणीं योजलेला आढळतोः–(१) केका १४ पद्य, (२) 'श्रीरामनामसद्रसपानीं अति **हावरा** कसा बससी' [नामरसायन–गी० २९ पृ० ३३६]. खाव खाव करणाऱ्या मनुष्याची 'हांव हांव, उच्चारक अशी मुखाची आणि जिव्हेची जी रचना किंवा अवस्था होते, तिजवरून 'हांव हांव' आणि 'हाव' हे अनुकरणवाचक शब्द उत्पन्न झाले आहेत असें दिसतें. **या केकेंत इंद्रियपटुत्वापासून रुचीपर्यंत उत्तरोत्तर पांच वस्तूंचें उत्कर्षाधिक्य वर्णिलें आहे, म्हणून येथें सार (Climax) अलंकार झाला.** मागें ५ व्या केकेंत हाच अलंकार आहे. याचें लक्षणः–(१) 'सैव संसर्गस्योत्कृष्टापकृष्टभावरूपत्वे **सारः'** [रसगंगाधर–पृ० ४६९]. जेथें एखाद्या पदार्थाचे गुण पायरीपायरीनें किंवा क्रमाक्रमानें अधिकाधिक वर्णिले असतात अथवा त्याचा उत्तरोत्तर अपकर्ष वर्णिला असतो तेथें हा अलंकार होतो. याला **'उदार'** असें नांव **'अलंकारसर्वस्वा'**त दिलें आहे. याचीं अन्य उदाहरणेंः–(१) राया! कुलार्थ पुरुष, ग्रामार्थ कुलहि समस्त सोडावें, । ग्रामहि देशार्थ, मही आत्मार्थ बुधें भलेंचि जोडावें. ॥ (सभापर्व–अ० ४ गी० २०). (२) वाहे महीतें स्वशिरीं फणींद्र तो । पाठीवरी कूर्म तयासि वाहतो ॥ त्यालाहि घे सागर मांडियेवरी । थोराचिये थोरिव जाण यापरी ॥ (वामन), (३) पर्वत महान्, गिरीहुनि अंबुधि, मोठें तयाहुनी गगन । ब्रह्म विशाल नभाहुनि, आशा ब्रह्माहुनीहि अतिगहन (अ. वि.) **शेक्सपियरच्या ह्याम्लेट** नाटकांत [अंक २ प्रवेश २] ह्या अलंकाराचें एक **उत्कृष्ट उदाहरण** आहे तें **आमच्या** आंग्लभाषाभिज्ञ वाचकांस त्यांची स्मरणशक्ति ताजी करण्याकरितां येथें सादर करितोः–

What a piece of work is man! how *noble* in reason! how *infinite* in faculty! in form and moving how *express and admirable*! in action how like an *angel*? in apprehension how like a *god*! the beauty of the world! the paragon of annimals?

Hamlet—Act II, Scene II·

असें न म्हणशील तूं वरद वत्सल, श्रीकरा!
परंतु मज भासलें, म्हणुनि जोडितों मी करा; ।

बर्कच्या भाषणांतील पुढील उक्ति ह्या अलंकाराचें सुरेख उदाहरण आहे:—I impeach him in the name of the *commons* of Great Britain in Parliament assembled, whose parliamentary trust he has *abused*. I impeach him in the name of our *holy religion*, which he has *disgraced*. I impeach him in the name of the *English constitution*, which he has *violated and broken*. I impeach him in the name of the *Indian millions*, whom he has *sacrificed* to injustice. I impeach him by the name and by the best rights of *human nature*, which he has *stabbed to the heart*.

Burke's Impeachment of Warren Hastings.

१. 'साऱ्या याचकांमध्यें मी हावरा आहें असें तुम्ही म्हणाल म्हणून त्यां जें मागल्या केकेंत अनुमान केलें होतें, तें वस्तुतः योग्य नाहीं; आणि जरी तुम्हीं मला हावरा म्हटलें तरी त्या माझ्या हावरेपणास हेतु आहे असा स्वाभिप्राय दर्शवित होत्साते कवि म्हणतात.' [य० पां०]. '[हे!] श्रीकरा! तूं वरद वत्सल [होत्साता] असें न म्हणशील, परंतु मज भासलें म्हणुनि मी करा जोडितों'—असा अन्वय. २. भक्तजनास वर देणारा. जो जो ज्या भक्ताचा मनोरथ असेल तो तो त्यास पुरविणारा. [असा तूं] 'वरद' 'वत्सल' आणि, 'श्रीकर' हीं तिन्ही हेतुगर्भ पदें आहेत. यांनीं परमेश्वराच्या अपार सामर्थ्याचा बोध होतो. 'वरदवत्सला!' असाही पाठभेद आढळतो, त्याचा अर्थ—'वर देणाऱ्यांमध्यें अत्यंत दयाळो!' असा करावा. येथें वरद, वत्सल आणि श्रीकरा हीं तीन्हीं विशेष्यें साभिप्राय आहेत म्हणून हा परिकरांकुर अलंकार जाणावा. [मागें केका ४, पृ० १० टीपा पहा.] तूं या तीन गुणांनीं संपन्न आहेस म्हणून मला हावरा म्हणणार नाहींस—असा अभिप्रेतार्थ सुचविला आहे. ३. वत्सल=फार दयालु. कोणी कोणी 'वरद' 'वत्सल!' अशीं दोन संबोधनें करितात. ४. श्री (लक्ष्मी) आहे कराच्या ठायीं ज्याच्या असा तूं. लक्ष्मी ही इतर जनांच्या फक्त कराग्राच्या ठायीं असून भगवंताच्या हस्ताच्या ठायीं सर्वत्र तिचा वास आहे. 'कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती । करमूले तु गोविंदः, प्रभाते करदर्शनम् ॥' हें वचन आबालवृद्धांस परिचित आहे. अथवा श्री—लक्ष्मी, करीं (हातीं—अर्थात् स्वाधीन) आहे ज्याच्या तो (विष्णु) किंवा श्री—कल्याण, त्यातें करा—करणारा अर्थात् स्वभक्तांचें ऐहिक व पारलौकिक कल्याण करणारा असा तूं, त्याचें संबोधन. 'वरद' 'वत्सल' आणि 'श्रीकरा' हीं तीन पदें फार मार्मिक रीतीनें योजिलीं आहेत. अर्थ:—मोठा दाता, अत्यंत दयालु व लक्ष्मी ज्याच्या स्वाधीन आहे असा परमेश्वर मला हावरा, वराविषयीं अतृप्त, असंतुष्ट असें म्हणणार नाहीं. कारण मीं केवढाही मोठा वर मागितला तरी तो देणें त्याच्या पूर्वोक्त वरदत्व, वत्सलत्व आणि श्रीकरत्व या गुणांनीं केवळ सहज आहे. ज्याचे ठायीं देण्याची इच्छा किंवा सामर्थ्य नसतें तोच दुसऱ्याला हावरा म्हणतो. ५. वाटलें, कल्पना आली. तूं तर असें म्ह-

दिलें[1] बहु बरें खरें, परि गमे कृपा व्यंग[2] ती,
अलंकृतिमती[3] सती मनिं झुरे, न जों संगती[4]. ॥ १३

णणार नाहींस, परंतु माझ्या मनांत अशी कल्पना येऊन मीं तुमचा अपराध केला, यास्तव मी तुम्हांला हात जोडतों–अर्थात् नमस्कारपूर्वक तुमची कृतापराधाबद्दल क्षमा मागतों. 'तूं इतका समर्थ आणि दयाळु असून मजसारिख्या दीनास हावरा म्हणशील म्हणून जो भास झाला, तो तुझ्या थोरपणास आणि माझ्या कृतज्ञतेस अयोग्य, म्हणून मी क्षमा मागतों–असा येथील कविहृद्गतार्थ जाणावा.' [ग्र० पां०–पृ० ७५.]

१. मागील केकेंत म्हटल्याप्रमाणें आपण मला इंद्रियपटुत्वादि पुष्कळ व चांगले वर देऊन माझ्यावर कृपा केली, पण ती मला व्यंग (न्यून, उणीशी) वाटते; इतकें केल्यानें माझ्यावर आपली पूर्ण कृपा झाली असें मी समजत नाहीं, भगवत्पददर्शनकृपेवांचून इतर सर्व अर्थ निष्फळ होत असें कवि सुचवितात. आतां झाला कवि पुढील चरणांत दृष्टांत देतात. २. न्यून, अपूर्ण, अपुरी. ३. रत्नमय आणि सुवर्णमय अलंकारांनीं अलंकृत झालेली, अलंकारयुक्त. 'अलंकृति' शब्दास मतुप् प्रत्यय होऊन त्यास स्त्रीलिंगी ङीप् झाला आहे. श्रीमती, धीमती, इत्यादि अशा प्रकारचीं अन्य उदाहरणें होत. जों (जोंपर्यंत) संगती (भेट, पतिसमागम) न (झाली नाहीं,) [तों] अलंकृतिमती (वस्त्रालंकार घालून पत्यागमनाची मार्गप्रतीक्षा करणारी) सती (साध्वी स्त्री) मनिं झुरे. वस्त्रालंकारानें भूषित झालेली पतिव्रता स्त्री जोंपर्यंत आपल्याला पतिसमागम (पतीची भेट) होत नाहीं तोंपर्यंत त्या वस्त्रालंकारांचें सुख न मानतां, पतिविरहजन्यखेदानें झुरत असते. 'आमोपभोगतुल्या प्रीति जगीं स्त्रीजनां नसे दुसरी। पतिच्या संगावांचुनि सर्व स्त्रीच्या वृथा कळाकुसरी' (मोरोपंत–हरिवंश अ० ३५ गी० ६१) त्याप्रमाणेंच कवि म्हणतात, जोंपर्यंत आपल्या पायांचें प्रत्यक्ष कृपादर्शन मला झालें नाहीं तोंवर इंद्रियपटुत्वादि वराचें मला सुख न वाटतां उलट दुःखच होतें. येथें हा दृष्टांत अलंकार झाला आहे. स्वभावतःच स्त्रियांस, आणि विशेषतः आमच्या देशांतील स्त्रियांस, दागिन्यांची केवढी हौस आहे हें सांगणें नकोच. त्या दागिन्यांवर त्यांची काडीमात्र सत्ता नसून, जरी आमच्या एका विनोदी कादंबरीकारमित्रानें ('पण लक्ष्यांत कोण घेतो?' कार) म्हटल्याप्रमाणें त्या आपल्या नवऱ्याच्या संपत्तीचें प्रदर्शन करणाऱ्या तावदानी पेट्या होत, तरी त्यांविषयीं त्यांचें प्रेम कांहीं विलक्षण असतें. स्त्रियांच्या अलंकारांची एक याद [बाबापदमनजीकृत 'शब्दरत्नावली'त पृ० २ एथें] दिली आहे तिजवरून त्यांची हौस स्पष्ट दिसून येईल. ४. समागम, अर्थसंदर्भानें पतिसमागम. येथें 'सती' शब्दाची योजना झाली नसती तर पतिव्यतिरिक्त अन्य पुरुषासक्त विरहिणी नायिकेचा बोध होऊन कवीच्या अभिप्रेत प्रार्थनेस अननुरूप शृंगारवर्णनाचा दोष आला असता, परंतु तो दोष 'सती'शब्दाची योजना करून कवीनें मोठ्या खुबीनें उ-

कराल पुरती दया, तरि असो दिलें पावलें;
परंतु हरि! एकदां त्वरित दाखवा पावलें; ।
प्रसाद करणें मनीं जरि नसेल, हें आवरा;

---

डविला आहे. येथें चतुर्थपादगत दृष्टांतानें 'ती कृपा व्यंग गमे' या समर्थनीय अर्थाचें समर्थन केलें आहे म्हणून हा काव्यलिंग अलंकार होय. [मागें केका ८ टीपा पहा.] आपण केलेली कृपा अपुरी आहे यास्तव ती कृपा चरणकमलें दाखवून पुरती करा असें ध्वनित केलें आहे म्हणून या केकेवर पर्यायोक्तीचीही छाया पडली आहे.

१. पूर्ण. मागल्या केकेंत भगवत्कृपेची नुसती व्यंगता दर्शविली; ती व्यंगता कोणती तें या केकेंत कवि सांगतात. '[जरि] पुरती (पूर्ण, दया कराल तरि दिलें (इंद्रियपटुत्वादि जें आपण पूर्वीं दिलें तें) पावलें असो' (पोंचलें असें असो, तें मीं स्वीकारिलें). जर आपल्या मनांत मजवर पूर्ण कृपा करणें असेल तर आपण दिलेल्या इंद्रियपटुत्वादि सर्व गोष्टींचा मीं संतोषानें स्वीकार केला असें समजा. २. स्वीकारिलें. ३. देवा! एकदां आपलें पाददर्शन मला लौकर होऊं द्या म्हणजे मी कृतार्थ होईन. येथें भगवंतानें पाददर्शन देणें म्हणजे पुरती दया करणें होय. ४. एक वेळ तरी आपलीं पाउलें मला त्वरित दाखवा. ५. लवकर. 'येथें 'एकदां' या पदानें आपले पाय केव्हां तरी दाखवा असें कवि म्हणून गेले, इतक्यांत लागलेंच दुसऱ्या विचारवेगानें आपला धीरपणा सोडून औत्सुक्य दर्शविण्याकरितां पुढीं 'त्वरित' या पदाची योजना केली असावी.' [म० पां०—पृ० ७९.] सत्कर्माचरणाविषयीं अधीरपणा करणें योग्य आहे; 'गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत्' म्हणजे मृत्यूनें आपल्याला धरलें आहे असें समजून (आपला मृत्युकाल त्वरित आला आहे असें मानून) धर्म करावा अशी नीति आहे. ६. पाय. पाददर्शन देऊन पुरती दया करण्यास उशीर लावूं नका. ७. अनुग्रह, पूर्ण कृपा. आपल्या मनांत जर मजवर पूर्ण कृपा करावयाची नसेल, तर आपल्या दिलेल्या पूर्वोक्त सर्व गोष्टी परत घ्या, पूर्ण कृपा करणें नाहीं तर तें मला नको. ८. येथें 'आवरा' (आटोपून घ्या) असें म्हणण्यानें मातेपाशीं बालक जसा कांहीं वस्तु मिळाली नाहीं तर रुसतो, त्याप्रमाणें कवीनें भगवंतापाशीं आपला लडिवाळपणा दाखविला. शिवाय परमात्म्याच्या ज्ञानावांचून नुसत्या आपल्या थोर कुळावर किंवा ब्राह्मणजन्मावरच जे समाधान मानून प्रतिष्ठा मानतात ते अज्ञ व अभागी होत असा ध्वन्यर्थ जाणावा. थोर कुळांत जन्म पावणें हें मनुष्याच्या स्वाधीन नसून आपल्या पराक्रमानें व सदाचारसंपन्नतेनें मान्यता पावणें हें मात्र प्रत्येकास साध्य होण्याजोगें ह्मणूनच भूषणीय आहे, अशी जी आलीकडे प्रवृत्ति होऊं पहात आहे ती चांगली नाहीं असें कोण म्हणेल! 'दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं हि पौरुषम्' हें वचन प्रत्येकानें आपल्या उराशीं बाळगून ठेवावें. भागवतांतही जन्मैश्वर्यादि सर्व गोष्टी अभिमानजनक असल्यामुळें भगवदनुग्रह होण्यास प्रतिबंध करितात म्हणून त्या मला नकोत असें कुंतीनें कृष्णास आपल्या प्रार्थनेंत दर्शविलें

जया बहु तयास द्या, मज कशास? मी हावरा. ॥ १४

आहे:–'जन्मैश्वर्यश्रुतश्रीभिरेधमानमदः पुमान् । नैवार्हत्यभिधातुं वै त्वामकिंचनगोचरम् ॥.' [स्कं० १ अ० ८ श्लो० २६.] **'हें आवरा' या म्हणण्याचें तात्पर्य 'असें कीं इंद्रियपटुत्वादि सर्व धर्म देहसंबंधानें आहेत, देहावांचून ते धर्म राहत नाहींत. ते सर्व आंवरा ह्मणजे देहच आंवरा असें ह्मणण्याप्रमाणें झालें, ह्मणजे देहच मला नको हें तात्पर्य.'** [केकादर्श पृ० २२.] **हावरेपणा हा दोष आहे, असें असतां त्याचा अंगीकार केला आहे आणि देवानें पुष्कळ दिलें असून त्याजपाशीं आणखी मागणें, (त्यानें पुरती** दया करावी असें मागणें,) **यांत जो हावरेपणा आहे तो गुणच आहे, असें ध्वनित केलें आहे म्हणून हा अनुज्ञा अलंकार समजावा.** [अनुज्ञा=जेव्हां दोषयुक्त वस्तूंत गुणाचा भास होतो आणि ती दोषयुक्त वस्तु त्या गुणामुळें इष्ट अशी वाटते, तेव्हां 'अनुज्ञा' नामक अलंकार होतो. याचें लक्षण 'रसगंगाधरां'त दिलें आहे तें:—'उत्कटगुणविशेषलालसया दोषत्वेन प्रसिद्धस्यापि वस्तुनः प्रार्थनमनुज्ञा' [काव्यमाला १२; रसगंगाधर–पृष्ठ ५१०] (२) 'दोषस्याभ्यर्थनानुज्ञा तत्रैव गुणदर्शनात्' [कुवलयानंद]. **'दोषाची इच्छा जरि गुण, त्यांतचि जाणुनी अनुज्ञा ते । आम्हां असोत विपदा हरिकीर्तन ज्यांत होय सुज्ञातें ॥'** (अ. वि.) **दोषामध्यें गुण आहे असें समजून त्या दोषाची इच्छा करणें असें जेथें वर्णन असतें तेथें 'अनुज्ञा' अलंकार होतो. जसें 'विपत्तींत ईश्वरनामस्मरण घडतें म्हणून आम्हांला विपत्ति सदां असो' हें कुंतीचें कृष्णाला मागणें याचेंच उदाहरण होय.** कुंती ह्मणते:–'विपदः संतु नः शश्वत्तत्र तत्र जगद्गुरो । भवतो दर्शनं यत्स्यादपुनर्भवदर्शनं' ( भागवत १.८.२५ ) याचीं अन्य उदाहरणें:–(१) 'भीम म्हणे, 'दादाजी! केली दुर्योधनें दया वाटे, । हे पाय पाहतों मी कैसे? जरि लागतों न या वाटे. ॥ ६७ ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–वनपर्व–अध्याय ५ पृष्ठ ८३], (२) बरा कुणबी केलों । नाहीं तरि दंभें असतों मेलों ॥ १ ॥ भलें केलें देवराया! । नाचे तुका लागे पायां. ॥ २ ॥ विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं. ॥ ३ ॥ सेवा चुकतों संतांची । नागवण हे फुकाची ॥ ४ ॥ गर्व होता ताठा । जातों यमपंथें वाटा ॥ ५ ॥ तुका म्हणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥६॥ [तुकाराम–अभंग १८१], (३) बरें जाले देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली॥१॥ अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार ॥ २ ॥ बरें झालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ ३ ॥ बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥४॥ बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ५ ॥ तुका म्हणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥ ६ ॥ [तुकाराम–अभंग ४४२१], (४) दरिद्रि मी वित्ताच्या लाभें होइन मत्त उदंड । आतांचे परि मग न घडेल प्रभुचें स्मरण अखंड ॥ ६८ ॥ यास्तव करुणानिधिनें दुर्लभ दर्शन देउनि मातें । धन न दिलें हें बरवें केलें दीनजनाच्या तातें. ॥ ६९ ॥ [मोरोपंत–सुदामचरित–साक्या]. हा अलंकार फारसा व्यापक नाहीं.

१. **जया (ज्यास, ज्या पुरुषाला) हें (इंद्रियपटुत्वादिक देणें) बहु (पुष्कळ असें वाटत असेल) तयास (त्याला) द्या, मज कशास? (मला मोरोपंताला, या पाददर्श-**

'दिलें,[1] फिरुनि घेतलें,' अशि अकीर्ति[2] लोकीं न हो[3];
सुनिर्मल[4] तुझीं पदें कधिं तरी[5] विलोकीन, हो![6]।
निजप्रियजनाकडे[7] तरिहि दे हवाला; जशी

**नेच्छु कवीला कशास देतां? कारण हावऱ्याला कितीही दिलें तरी त्याची तृप्ति व्हावयाची नाहीं.)** मी हावरा (आपल्या पाददर्शनाशिवाय नुसत्या त्या गोष्टींनीच मला कांहीं थोरवी वाटत नाहीं, कारण मी अतृप्त याचक आहें हें तुम्हांला ठाऊकच आहे.)

१. **मागल्या केकेंत इंद्रियपटुत्वादि परत घ्या असें मीं तुम्हांवर रुसून म्हटलें, पण तसें करणें तुम्हांस उचित नाहीं अशा अभिप्रायानें कवि आणखी प्रार्थना करितात.** २. **अपकीर्ति, दुर्लौकिक. देवानें भक्तास जें कांहीं दिलें होतें तें त्यानें माघारें घेतलें अशी सर्व जगांत तुमची अपकीर्ति होऊं नये. कारण दानशूर पुरुषानें याचकांस एकदा दान केलेले पदार्थ पुन्हा परत घेणें हें त्याच्या दुर्लौकिकास कारण होतें. 'अ' हा आगम येथें विरोध दाखवितो.** 'अ' आगम ( Prefix ) (१) सादृश्य, (२) अभाव (३) भेद, (४) अल्पता, (५) अप्राशस्त्य, (६) व विरोध इतक्या सहा अर्थांचा बोधक आहे. ह्यांचीं उदाहरणें:—(१) अब्राह्मण (२) अज्ञान (३) अपट (४) अनुदरा (५) अकाल (६) अनीति. ह्या सर्व अर्थांचा समावेश पुढील संस्कृत पद्यांत केला आहे. 'तत्सादृश्यं त्वभावश्च तदन्यत्वं तदल्पता। अप्राशस्त्यं विरोधश्च नञर्थाः षट् प्रकीर्तिताः॥' ३. **होवो. 'भू' होणें या धातूस 'हो' हा आदेश होतो.** ४. **अत्यंत पवित्र. पापरूप मालिन्याचें निरसन होण्यास सुनिर्मल (अत्यंत शुद्ध) पदेंच पाहिजेत, म्हणून हें विशेषण फार समर्पक आहे. 'सुनिर्मल' हें विशेषण साभिप्राय आहे म्हणून परिकर अलंकार येथें झाला आहे. 'पण देवा! तुझीं अत्यंत पवित्र पावलें मला कधीं तरी दिसतील काय?' येथें भगवच्चरणदर्शनाविषयीं कवि आपली उत्कंठा प्रकट करितात. दुसऱ्या चरणांतील 'हो' पुढें पूर्णविराम चिन्ह दिल्यास 'ह्याच वेळेस आपल्या पावलांचें दर्शन देण्याची आपली इच्छा नसल्यास राहूं द्या, पुन्हा केव्हां तरी त्यांचें दर्शन मला घडेल. पुढें मागें आपली मजवर कृपा होऊन मला आपल्या पायांचें दर्शन घाल अशी मला बळकट आशा आहे' असा अर्थ जाणावा.** 'आशायाः परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम्' हें जरी कांहीं अंशीं खरें असलें, तरी पुढें कधीं तरी अभीष्टसिद्धि होईल ही आशा दुःखितांची महौषधि होय. ह्या आशेच्या जोरावर संकटावस्थेंत पडलेले लोक धीरानें काळ कंठतात. 'Hope springs eternal in the human breast, Man never *is*, but always *to be* blest.' ( Pope ) सीताविरहानंतर रामचंद्रानें देखील पुढें मनःप्रियेची गांठ पडेल ह्या आशेवरच कालक्रमणा केली. ह्या संसाररूप दुस्तर सागरांत आशेशिवाय तरून जाणें केवळ अशक्य. ५. **केव्हां तरी, जन्मजन्मांतरीं, या जन्मीं नाहीं तर जन्मांतरीं तरी पाहीन. 'कधिं तरी' या शब्दानें कवीनें आपला धीर प्रकट करून ईश्वरास आपली इच्छा पूर्ण करण्यास अवकाश दिला, असें समजावें.** ६. हो!=अहो! 'हो' हें येथें संबोधनार्थक अव्यय आहे. ७. **निज (आपणास) प्रिय (आव-**

पडेल समजाविशी, तशि करोत; कां लाजशी? ॥ १९

डते) जन (भक्तजन). आपणास आवडते जे भक्तजन त्यांकडे. मजवर पूर्ण कृपा करून मला स्वतः कृतार्थ करावयाचें नसल्यास तें (माझ्या उद्धाराचें काम) भगवद्भक्तांकडे द्या. आपले जे प्रिय साधुभक्त असतील त्यांजकडे तरी माझ्या कामाचा हवाला द्या, हें काम त्यांजकडे सोंपवा, साधुजनांनीं मजवर कृपा करावी अशी त्यांस भीड घाला. ८. कार्याचा भार. 'हवाला' हा शब्द अरबी आहे. पंतांच्या ह्या काव्यांत आलेले परकीय भाषेंतील शब्द 'केकावली'च्या आरंभीं 'केकावलीची प्रस्तावना' यांत दिली आहे. पंतांच्या काव्यमहोदधींत परकी भाषेंतील पुष्कळ शब्द आले आहेत याचा हा दाखला होय. प्रस्तुत काव्य हें पंतांच्या काव्यांतील सर्व गुणांचें व रचनावैचित्र्याचें उत्कृष्ट दर्शक आहे.

१. समजूत. भगवद्भक्तांकडे माझ्या उद्धाराचें काम आपण सोंपविलें म्हणजे मग त्यांच्यानें होईल तशी ते माझी समजूत घालोत, त्याचा बोभाटा तुम्हांकडे येणार नाहीं. २. लाजतां कां? संकोच कां करितां? साधुजनांकडे हवाला देण्यास मग कां लाजतां? हवाला देण्यास लाजूं नका. इतकें स्वल्प मागणें सांगितलें असतां लाजण्याचें कांहीं कारण नाहीं—असा भावार्थ. येथें कवीनें भगवंताशीं लडिवाळपणा करून आपला किंचित् रोषही दाखविला आहे. नामदेव, तुकाराम, एकनाथ आणि इतर भगवद्भक्त यांनीं परमेश्वराशीं प्रसंगविशेषीं लडिवाळपणा करून व असाच राग दाखवून आपलें भक्तिसर्वस्व प्रगट केलें आहे. "मागल्या केकेंत 'तुमच्या मनांत मजवर पूर्ण प्रसाद करावयाचा नसला तर पूर्वोक्त इंद्रियपटुत्वादि जें दिलें तें आटोपून घ्या' म्हणून कवीनें लडिवाळपणानें सांगितलें, तो विध्याभास जाणावा. कारण या केकेंतील पहिल्या चरणांत दिलेलें परत घेतल्यानें तुमची अपकीर्ति न व्हावी' या आशीर्वादात्मक इच्छाप्रदर्शनें करून कवीनें पुन्हा तो विधि लज्जेस कारण होय म्हणून निषिद्ध केला आहे; अत एव हा आशीर्वचनाक्षेप अलंकार होय. या अलंकाराचें लक्षण साहित्यदर्पणांत 'अनिष्टस्य तथार्थस्य विध्याभासः परो मतः' [साहित्यदर्पण—७१५] असें सांगितलें आहे." [य० पां०—पृ० ८३-८४.] विध्याभास आणि आशीर्वचनाक्षेप हे अलंकार एकच होत. या केकेच्या द्वितीय पादांत कवीनें आपली भगवच्चरणदर्शनेच्छा दाखविली आहे, परंतु ती सफळ होत नसल्यामुळें तिच्याबद्दल तिच्यापेक्षां न्यून (कमी) जी साधुसमागमेच्छा ती पुढील चरणांत व्यक्त केली आहे, म्हणजे येथें न्यूनाधिक योग्यतेच्या पदार्थांच्या अदलाबदलीचें वर्णन झालें आहे म्हणून हा परिवृत्ति नामक अलंकार होय. याचें लक्षण आणि उदाहरणः—(१) समाधिकानां न्यूनानां समन्यूनाधिकैः समम् । यदा विनिमयस्तत्र परिवृत्तिरलंकृतिः ॥ प्रीतिं दत्वा सरोजाक्षीं जगृहे कामिनो मनः । तुलसीमंजरीमेकां दत्वा भेजुर्हरेः कृपाम् । दत्वा सुधामुचो वाचः कविर्भेजे कपर्दिकाम्. ॥ १४७ ॥ [मंदारमरंदचंपू—पृ० १३७-१३८], 'न्यूनाधिकवस्तूंचा विनिमय जो ह्मणति त्यास परिवृत्ति । तो एक बाण सोडुनि घेइ कटाक्षेंचि शत्रुसंपत्ति ॥' (अ. वि.) भावार्थः—जेथें सम आणि सम, अधिक आणि न्यून, न्यून आणि अधिक, अशा दोन पदार्थांची अदलाबदल (विनिमय) झाल्याचें वर्णन असतें तेथें परिवृत्ति-

अहा ! निपट धृष्ट मी; प्रभुवरासि 'कां लाजसी ?'
म्हणें, तुज नसो तशी विकृति, भाविकांला जशी. ।

---

**नामक अलंकार होतो.** उदाहरणें:—(१) देउनि सुतरत्न करीं, घेउनि पतिचित्तवित्त ती गेली; । नेत्रोदकें तिघांच्या गंगा गंगातटीं नवी केली. ॥ [मोरोपंत—आदिपर्व—अ० १२ गी० ७०], (२) जाय पुरीप्रति जोडी अपकीर्ति, सुकीर्ति हातची दवडी । मातेप्रति पोर जसें मुद्रा हरवूनि मेळवुनि कवडी. ॥ [विराटपर्व—अ० ३ गी० ६०], (३) स्वामी पुण्य यश विपुल घेउनि हे म्यां तुम्हां धरा विकिली, । उघडील जी कपाट स्वर्गाचें ती जिवीं धरावि किली. ॥ [अश्वमेधपर्व—अ० ६ गी० १९], (४) राज्ञी तूं आठवुनी क्षत्रियधर्मासि शोक हा टाकीं; । या आले यश घ्याया देउनि सर्वस्व लोक हाटा कीं ॥ (ऐषिकपर्व अ० ३ गी० २२) (५) मतलबी लोक आंवळा देऊन कोहळा काढतात. समाचा समानें, अधिकाचा न्यूनानें आणि न्यूनाचा अधिकानें विनिमय झाला असतां **परिवृत्ति** अलंकार होतो 'म्हणजे या अलंकाराने समपरिवृत्ति, अधिकपरिवृत्ति आणि न्यूनपरिवृत्ति असे तीन भेद होतात. प्रस्तुत केकेंत अधिकाचा न्यूनानें विनिमय झाला आहे. असा प्रकार दुसऱ्या उदाहरणांत आहे. पहिल्या उदाहरणांत समाचा समानें विनिमय झाला आणि चवथ्या उदाहरणांत न्यूनाचा अधिकानें विनिमय झाला आहे.

१. **मागल्या श्लोकांत 'कां लाजसी' असें जें आपण भगवंतास म्हटलें तें उद्धटपणाचें भाषण झालें, अशी शंका मनांत घेऊन पुढील सहा केकांत कवि भगवंतास प्रार्थना करितात.** २. केवळ. **मोरोपंतांनीं हा शब्द आपल्या कवितेंत पुष्कळदां योजलेला आढळतो,** 'हानि पट' 'हा निपट' हें पंतांचें यमक तर प्रसिद्ध आहे. 'अभिषेकमह प्रोच्च जो करि **निपट** तो सर्व ।' (दोहारामायण—द्वितीय ८२), 'मनांत सहजा दया **निपट** टाकिली काय भी ।' (केका ८८), वनपर्व—अ० ४ गी० ११२; विराटपर्व—अ० २ गी० ३६). द्रोणपर्व—अ० ९, गी० ८, २१; अश्वमेध—अ० ५ गी० ३७; मसशती—अ० ६ गी० २९ इत्यादि स्थळांवरून 'निपट' शब्द पंतांच्या आवडीचा दिसतो. **अहा ! भगवंतास 'लाजतोस कां' असें म्हणून मीं केवढें दांडगेपणाचें वर्तन केलें ! त्रयोदशभुवनें निर्माण करून तीं आपल्या इच्छामात्रें करून चालविणारा जो ईश्वर त्याला असें म्हणणें म्हणजे अत्यंत धृष्टता होय. यामुळें प्रभुवराला राग आला कीं काय ही शंका मनांत घेऊन कवि पुढें तिचें समाधान करितात.** पंडित जगन्नाथराय यांच्या 'विष्णुलहरी' तील पुढील श्लोक याशीं सदृश म्हणून वाचनीय आहे:— 'अपि शर्वपिता महादिभिर्भजनीयः पुरुषोत्तमोऽपि यः । तमुपालभमानमुद्धतं धिगिमं मां धिगिमां धियं मम' ॥ ३७ याचें भाषांतर:—'ज्यातें विरिंचि शिवमुख्यहि देव सारे । आराधितात पुरुषोत्तम तूं असारे ॥ त्या तूज उद्धतपणें कटु बोलिलों कीं। धिक्कार हा मजहि मन्मतिलाहि लोकीं'॥ ३. **भाविकांला जशी विकृति (मनास वाईट वाटणें) [होते] तशी [विकृति] तुज (प्रभुवराला नसो (नसावी, न होऊ)-असा अन्वय. ४. विकार, मनास वाईट वाटणें. ५. मजसारख्या भोळ्या भक्तांला.** (केका २०.) **मी जो तुझा भोळा भक्त त्या मला जसें वाईट वाटलें तसें तुझ्या मनास न वाटो.**

परंतु अपराध हा गुरु,[1] म्हणोनि शिक्षा करीं;
असेचि धरिली नयच्युतदमार्थ[2] दीक्षा[3] करीं.[4] ॥ १६
सदैव अपराध हे रचितसें[5] असे कोटि,[6] गा![7]
स्वयेंहि कथितों; नसे तिळहि लाज; मी कोटिगा.[8] ।

१. मोठा. 'गुरुस्त्रिलिंग्यां महति दुर्जरालघुनोरपि । पुमान्निषेकादि करे पित्रादौ सुरमंत्रिणि ॥' इति मेदिनी. भगवंताला जरी 'लाजतोस कां' ह्या माझ्या उद्धट भाषणानें वाईट वाटलें नाहीं, तरी हा मजकडून मोठा अपराध घडला खरा–असा अपराध मजकडून पुन्हा होऊं नये म्हणून भगवंतानें मला शिक्षा करावी, मला ती मान्य आहे–असा भाव. २. नय–न्याय–त्यापासून च्युत–भ्रष्ट झाले जे–त्यांच्या दमार्थ–त्यांना शिक्षा करण्यासाठीं. न्यायमार्ग सोडून चालणाऱ्यांस–अपराध्यांस–शिक्षा करणें हेंही भगवंताचें कर्तव्यच आहे. 'तथापि दंडं भगवान् बिभर्ति धर्मस्य गुप्त्यै खलनिग्रहाय' असें भागवतांत आहे. [भागवत–१० स्कं० पू० अ० २६.] गीतेंत भगवंताचें असें वचन आहे:–'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे. ॥' [अ० ४ श्लो० ८.] ३. अधिकारचिन्ह. एखादें व्रत आरंभिलें असतां तें समाप्त होईपर्यंत त्याच्या नियमाचें धारण करणें याला दीक्षा धरणें म्हणतात. यज्ञयाग सुरू केला असतां हस्तांत यज्ञकंकण बांधण्याची चाल आहे. त्या वेळेस कंकण हीच दीक्षा होय. ४. हातांत. आपला मीं अपराध केला म्हणून आपण आपल्या हातांनीं माझें शासन करणें युक्त आहे. 'अपराधी सेवक तरी, दंडावा स्वामिनेंच हें युक्त' [आर्याकेकावली–गी० १९ पृ० २२०]. ५. अशा प्रकारचे कोट्यवधि अपराध मजकडून नेहमीं घडतात, त्यांची क्षमा करावी हेंच भगवंतास उचित आहे म्हणून कवि प्रार्थना करितात. 'अपराध रचणें' असें म्हणण्यांत अपराधांचें बहुविधत्व कवीनें व्यक्त केलें. ६. 'कोटि अपराध रचितसें' इत्यादि लिहितांना पंतांच्या मनांत पंडितराजजगन्नाथविरचित 'करुणालहरी'चा २८ वा श्लोक घोळत असावा असा भास होतो:–'वचनैः परुषैरिह प्रभो यदि रोषं समुपागतोऽसि मे । मुखरं कृतकोटिकल्मषं करुणाब्धे जगतोऽपसारय ॥' [करुणालहरी–२८]. श्लो० ३० हा पाहण्यालायक आहे. 'पतितोऽप्यतिदुर्गतोऽपि सन्नकृतज्ञो निखिलागसां पदम् । भवदीय इतीरयंस्त्वया दयनीयस्त्वपयैव केवलम् ॥' [करुणालहरी–३०]. ७. गा! (अगा! प्रभो!) असे (अशा प्रकारचे) पूर्वोक्त प्रकारचे) हे कोटि अपराध (हे कोटिशः अन्याय) सदैव (निरंतर, नेहमीं, क्षणोक्षणीं, पदोपदीं) रचितसें (करितसें)–असा अन्वय. हे प्रभो! अशा प्रकारचे जे अपराध मी निरंतर करतों ते थोडे थोडके नाहींत, त्यांचे ढीग घातले आहेत, ते कोट्यवधि घडले आहेत. ८. [अपराध रचितों इतकेंच नव्हे तर] स्वयेंहि कथितों; [आणि यांत मला] तिळहि लाज नसे, [अतएव] मी कोटिगा [खरा]–असा अन्वय. मीच अपराध करतों आणि मीच आपल्या मुखानें ते सांगतों आणि पुनः ते अपराध सांगावयास मला तिळभरही लाज वाटत नाहीं. तेव्हां मी मोठाच कोडगा नव्हे तर

अजांडशतकोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा,
न त्यांत [३]अवकाश या? स्थळ दिलें तदा कां दैवा? ॥ १७

---

**काय? मला कोडग्याला लाज कोठची वाटणार? ९. कोडगा, निर्लज्ज. आपल्या अपराधाचें आपणच आपल्या तोंडानें वर्णन करणें हें कोडगेपणाचें लक्षण. "कोटिगा हा शब्द मूळचा कोडगा या शब्दावरून भाषारूढीप्रमाणें वर्णव्यत्ययानें कवीनें साधला आहे असें दिसतें:—'ड'च्या स्थानीं 'ट'चा समयविशेषीं अपभ्रंशेंकरून वर्णव्यत्यय होत असतो.** Max Muller's Lectures on the Science of Language [Vol 1, Grimm's Law. pp. 216-217 पहा.] या नियमावरून कोडगा यावरून कोटगा शब्द साधला आहे. जसें–सोडगा, सोटगा; धोडगा, धोटक; झोडगें, झोट; रोडगा, रोटगा; फोडणें, फुटणें; तोडणें, तुटणें: इत्यादि शब्दांमध्येंही हाच नियम सांपडतो. कोटिगा यांत जो इकार दिसतो तो शुद्ध प्रासाकरितां कवीनें घेतला आहे. व असा इकारागम करण्याची [मराठींत] अनुकूलताही पुष्कळ आहे; मारला, **मारिला**; खाणला, **खाणिला**; तोडला, **तोडिला** असा क्रियापदांच्या रूपांत तर इकारागमाचा नियम आहेच; परंतु ग्रंथभाषेंत जेथें जेथें कवीस इष्ट दिसतें, तेथें तेथें बहुधा सर्व जातींच्या शब्दांस असा आगम करण्याचा त्यांचा स्वेच्छाचार पुष्कळ आढळतो." [य० पां०–पृ० ८९.] 'कोडगा' हा शब्द पंतांच्या काव्यांतून इतरत्रही आढळतो. 'बा **कोडग्या** मनाला विषयांनी काय वाटती गोडी' (आर्याकेका ३३).

**१. अज (ब्रह्मदेव)+अंड(गोल)+शत (शंभर) कोटि=ब्रह्मांडाच्या शंभर कोटि, अनंत ब्रह्मांडें. परमेश्वराच्या पोटांत अनंत ब्रह्मांडें वास करितात या लौकिक समजुतीकडे येथें कवीचें लक्ष्य आहे.** भगवंताच्या पोटांत अनंत ब्रह्मांडें सांठविलीं आहेत असें पुष्कळ कवींनीं वर्णन केलें आहे:–(१) अनंत ब्रह्मांडें। एके रोमीं ऐसीं धेंडें ॥ तो हा गवळीयाचे घरीं। उंबरा चढतां टेंका धरी ॥ [तुकाराम–अभंग १७४०], (२) अनंत ब्रह्मांडें ज्याचे पोटीं। तो हा सांवळा जगजेठी ॥ काळी घोंगडी, काळी काठी। काळा दोरा कंठीं ॥ बोली महाराची थेट मराठी। इ० अमृतराय–दामाजीपंताची रसद, (३) अनंत ब्रह्मांडें उदरीं। हरि हा बाळक नंदा घरीं ॥ [तुकाराम–अभंग ३८०५.] **कथासंदर्भ:**–कृष्णावतारीं कृष्णानें माती खाल्ली कीं काय हें पाहण्याकरितां त्याला तोंड उघडण्यास यशोदेनें सांगितलें. त्या वेळेस तिला त्याच्या तोंडांत सर्व सृष्टि दिसली, ही पौराणिक कथा ही पंक्ति लिहितांना पंतांच्या मनांत असावी. **मार्मिक लोकांस मिल्टनच्या कवितेप्रमाणें पंतांच्या ह्या लहानशा काव्याच्या वाचनानें बहुविध, रमणीय व मनाला सुप्रसन्न करणाऱ्या कल्पना किंवा कथा सुचतात हा ह्या काव्याचा एक विशेष गुण होय. २. बाळगतां, वागवितां.** हा शब्द 'नंद्'=आनंद पावणें' ह्या संस्कृत धातूपासून झाला आहे. ह्याच धातूपासून 'ननांदृ' व त्यापासून 'नणंद' (=आनंद न पावणारी) हे शब्द निघाले. यावरून नणंदाभावजयांतील वैमनस्य शेंकडों वर्षांपासून चालत आलेलें दिसतें. **'नांदवा' हें रूप आज्ञार्थासारखें दिसतें, तथापि येथें, आज्ञार्थ नाहीं; वर्तमानकालच आहे.** किलेक ग्रंथांमध्यें अशा स्थळीं नांदवां, करां, धरां इत्यादि प्रकारें अंत्य स्वर सानुनासिक करण्याचा संप्रदाय आहे, तो केवळ संदेहनिवारणार्थ असावा असें वाटतें. **३. स्थळ,**

तुझ्या जिरविले बहु प्रणतमंतु पोटें, पण
त्यजी मदपराध, हें मजकडेचि खोटेपण; ।

जागा. ज्या उदरीं सर्वदा अजांडशतकोटि नांदवा त्यांत या (माझ्या अपराधांना) अवकाश न? ज्या तुमच्या पोटांत असंख्य ब्रह्मांडांचा व्यापार चालण्यास जागा आहे अशा अफाट उदरांत माझा अपराध मावण्याइतकी जागा नसेल काय? खचितच असेल–हा काक्वर्थ जाणावा. जर जागा नाहीं तर दावाग्नीला (वणव्याला) जागा कशी दिली? ४. दव=वणवा. दावाग्नीला, वणव्याला. कथासंदर्भः–कृष्णावतारीं गोकुळांतील लोकांवर दया करून भगवंतानें बारा गांवें पसरलेला व व्रजवासी जनांस जाळावयास प्रवृत्त झालेला अग्नि गिळून टाकला. अग्नीसारखा जाज्वल्य पदार्थ व तोही अमर्याद पसरलेला जर तुम्हीं गिळून टाकिला, तर माझ्या अपराधाला तुमच्या पोटांत अवश्य स्थळ मिळेल. जो गिळावयाचा पदार्थ नव्हे असा जो दव (वणवा) त्यालाही आपण आपल्या उदरांत जागा दिली आणि माझ्या मात्र अपराधांस आपल्या पोटांत जागा नाहीं असें कसें होईल? असें खचित व्हावयाचें नाहीं; जसें दावानलाला स्थळ दिलें तसें माझ्या अपराधांस स्थळ द्या. माझे अपराध आपल्या पोटांत घाला–असा कवीचा अभिप्रेतार्थ. अपराध पोटांत घालणें म्हणजे त्यांची क्षमा करणें हा लाक्षणिक अर्थ सुप्रसिद्धच आहे.

१. माझ्या अपराधांस तुमच्या पोटांत जागा द्या, कारण अशी जागा देणें हें तुमच्या पोटाचें कामच आहे, अशा अभिप्रायानें कवि भगवंताची प्रार्थना करतात. तुमच्या उदरानें अनेक शरणागतांचे अपराध नाहींसे केले. २. तुझ्या पोटें बहु (पुष्कळ) प्रणतमंतु जिरविले (पचविले, आंत दवडिले, आंत घेतले); पण [तें पोट] मदपराध त्यजी, हें खोटेपण मजकडेचि [आहे]–असा अन्वय. ३. बहु=पुष्कळ, अमित, असंख्य. 'बहु' हें 'मंतु' शब्दाचें अथवा 'प्रणत' शब्दाचें विशेषण केलें तरी चालेल. 'मंतु' शब्दाचें विशेषण केल्यानें 'प्रणतांचे असंख्य अपराध' असा अर्थ होईल. 'प्रणता'चें विशेषण केलें असतां 'शरण आलेल्या असंख्य जनांचे अपराध' असा अर्थ होतो. ४. प्रणत (नम्र जनांचे)+मंतु (अपराध)=शरणागतांचे अपराध. ['आगोऽपराधो मंतुश्च' इत्यमरः । 'मंतुः पुंस्यपराधेऽपि मनुष्येऽपि प्रजापतौ' इति मेदिनी । ]. शरणागतांच्या अपराधांची क्षमा करणें हें तुमच्या पोटाचें कामच होय. अपराध जिरविणें म्हणजे ते नाहींसे करणें. ह्या केकेशीं सदृश असा पंडितराजजगन्नाथकृत 'करुणालहरी'तील पुढील श्लोक पहाः–सुकृतप्रिय मान्यथास्तु ते सुकृतिभ्यः सुखदस्य सुप्रथा । अपि पापमबिभ्रतस्तु मां तव विश्वंभरनाम दुर्लभम् ॥ [करुणालहरी–२७]. ५. पण (परंतु) मदपराध (माझे अपराध) त्यजी (तुमचें पोट टाकितें, आंत घेत नाहीं, माझ्या अपराधांस आंत घेण्यास जागा नाहीं असें तें तुमचें पोट म्हणतें. ६. दोष. आजपर्यंत तुम्हीं हजारों भक्तजनांच्या अपराधांची क्षमा केली असतां माझ्या अपराधांची मात्र क्षमा करीत नाहीं हा अपराध तुमच्या पोटाचा (अर्थात्

देवाग्नि जठरीं अतिक्षुधित, त्यास हें अन्न द्या;
वितृष्ण करिती श्रितां तुमचिया दयासन्नद्या. ॥ १८

तुमचा) नसून माझाच होय. 'अहमेव हि दोषदूषितो भगवंस्त्वां समुपालभे मुधा ॥ रमणीविरहज्वरज्वलन्नमृतांशुं कुमतिर्विनिंदति' ॥ ३३ (विष्णुलहरी) भाषांतर–'अजि अखिलहि दोषीं मीच दोषी दयाळा! । सकळ विफळ तूझा हा उपालंभ केला ॥ सुतनुविरहतापें तप्त होऊनि देहीं । न कळुनि मनिमंदें निंदिजे इंदुतेंही' ॥ (वामनशास्त्री केमकरकृत भाषांतर) खोटा हा शब्द संस्कृत 'कूट' याचा अपभ्रंश आहे. हा कूटसाक्षी, कूटतुला, कूटकाम, कूटयुद्ध, कूटवचन इत्यादि शब्दांत स्पष्ट दिसतो. हजारों लोकांचे अपराध जें पोट जिरवितें तेंच जर एखाद्याचे अपराध टाकूं लागलें तर तो पोटाचा दोष नाहीं. जसें निर्दोष अन्न असतां पोट त्यास आंत सांठवून पचवितें; पण तेंच आंबलेलें असलें तर लागलीच वांतीच्या रूपानें बाहेर टाकतें, हा दोष पोटाचा नसून त्या अन्नाचा. त्याप्रमाणें "माझे अपराधच असे विलक्षण भयंकर आहेत कीं तुझ्या क्षमेस ते पात्रच होऊं शकत नाहींत." [य०पां०–पृ० ९३.]

१. कवि ह्याला एक तोड सुचवितात. व्रजवासी जनांच्या रक्षणार्थ भक्षिलेला दावाग्नि अति भुकेला झाला असेल त्याला माझे अपराधरूपी अन्न द्या; म्हणजे दावाग्नीच्या पोटापाण्याचीही सोय होईल व माझ्या अपराधांचीही सोय लागेल. अग्नीनें माझे अपराध जाळून भस्म करा–हा अर्थ. [तुमच्या] जठरीं (पोटांत) दवाग्नि (गोकुळांत गिळिलेला वणवा) अतिक्षुधित (अत्यंत क्षुधेनें व्यापलेला, फार भुकेलेला) [असेल] पुष्कळ दिवसांपासून भक्षावयास कांहीं न मिळाल्यामुळें फार क्षुधित झाला असेल, त्यास (त्या दवाग्नीला) हें अन्न (मदपराधरूप भक्ष्य, भोजन) द्या (खावयास घाला).
२. [हीं तोड मज अल्पमतीला बरी दिसली ह्मणून आपणांस सांगितली. आश्रितजनांचे मनोरथ पूर्ण करण्याच्या याहूनही चांगल्या शेंकडों तोडी आपणामध्यें भरल्या आहेत–अशा भावानें परमेश्वराचें दयालुत्व रूपकालंकारानें वर्णित होत्साते कवि म्हणतात.] तुमचिया दयासन्नद्या श्रितां वितृष्ण करिती–असा अन्वय. तुमचिया (परमेश्वराच्या) दयासन्नद्या (दया+सत्+नद्या=कृपा+उत्तम, पवित्र+नद्या=तुमच्या दयारूप उत्तम नद्या) श्रितां (आश्रितजनांला, ज्यांनीं तुमचा आश्रय केला आहे त्यांला) [कोणत्या तरी तोडीनें] वितृष्ण (तृष्णारहित, इच्छारहित, तृप्त, संतुष्ट, सफलेच्छ) करिती (करतात, आश्रितजनांचे सकल मनोरथ पूर्ण करून त्यांस संतुष्ट–निरिच्छ–करतात.) [यास्तव माझे अपराध जाळून टाकून, आपली दयानदी मजकडे वळवून मला सफलेच्छ–कृतार्थ–वितृष्ण–संतुष्टमानस–करा–अशी माझी आपणास प्रार्थना आहे. येथें 'वितृष्ण' असा शब्द आला आहे, त्याचा अर्थ अन्य रीतीनें केला तरी चालेल. तृष्णा आणि तृषा हे दोन्ही शब्द 'तृष्' (पिण्याची इच्छा करणें) या धातूपासून आले आहेत. या दोहोंचा प्रथमार्थ पिण्याची इच्छा ह्मणजे तहान हा आहे. यांवरून येथें

**दुःखदाहजनित पीडारूपी जो शोष त्याच्या वारणाचा मोठा ध्यास, हा 'तृषा' शब्दाचा अर्थ घेतल्यास सन्नद्या शब्दाच्या योजनेची उपपत्ति चांगली लागते, ह्मणून दुःखमोचनाची उत्कंठ इच्छा हाच येथें 'तृष्णा' शब्दाचा अर्थ समर्पक दिसतो,** नवीन अर्थप्राप्तीची इच्छा असाच अर्थ घेतला पाहिजे असें नाहीं.] **येथें रूपक योजून परमेश्वराच्या दयेला नदीची उपमा दिली ती फार समर्पक आहे. हा चांगला ह्मणून याची तृष्णा शांत करावी, तो वाईट ह्मणून त्याला आपलें पाणी पिऊं देऊं नये, हा दुजा भाव जसा नदीच्या ठिकाणीं वास करीत नसून तिचें पाणी जसें तीरावरील बऱ्यावाईट लोकांना पिण्याला सारखेंच उपयोगीं पडतें, तद्वत् भगवंताची दया, चांगले वाईट कसेही असोत, त्यांनीं तिचा आश्रय केला ह्मणजे त्यांना कृतार्थ करिते.** बायबलांतील पुढील विचार या केकेंतील चतुर्थ चरणाशीं अत्यंत सदृश आहे:–'God maketh his sun to rise on the evil and on the good, and sendeth rain on the just and on the unjust.' (Matt. V. 45). या ख्रिस्ती शास्त्रांतील विचारांशीं ज्ञानेश्वरींतील पुढील ओंव्या अतिशय समानार्थक आहेत. त्या वाचून उत्कृष्ट वर्णन कोणत्या ग्रंथांत आहे याचा स्थूल मानानें वाचकांस विचार करितां येईल:–जो सर्वां भूतांचे ठायीं। द्वेषातें नेणेचि कहीं। आपपरु जया नाहीं। चैतन्या जैसें ॥ १ ॥ उत्तमातें धरिजे। अधमातें अव्हेरिजे। हें कांहींच नेणिजे। वसुधा जेवीं ॥ २ ॥ कां राजाचें देह चाळूं। रंका परौतें गाळूं। हें न म्हणेचि कृपाळू। प्राण पैं गा॥३॥ गाईची तृषा हरूं। व्याघ्रा विष होऊनि मारूं। ऐसें नेणेचि गा करूं। तोय जैसें ॥ ४ ॥ (अध्याय १२) ३. तुमच्या. 'आपल्या' 'तुमच्या' 'तुझ्या' 'माझ्या' यांच्या ऐवजीं 'आपुलिया,' 'तुमचिया,' 'तुझिया,' 'माझिया,' हे शब्द योजण्याचा कवींचा संप्रदायच आहे:–(१) '**आपुलिया** बळें नाहीं मी बोलत। सखा भगवंत वाचा त्याची।' [तुकाराम–अभंग २१८९], (२) 'शिवे न **तुझिया** पदा अदयताख्य दोष क्षण।' [मोरोपंतकेकावली–केका ४१]' (३) 'धना परिजना घरीं **तुमचिया** उणें कायसें?' [केका २३]. ४. **दया+सत्+नद्या=कृपा+उत्तम+नद्या=दयारूपिणी सन्नद्या. यांत रूपक अलंकार झाला आहे. तृष्णा (तहान) भागविणें हें नदीचें काम होय, तें ईशदया करतें ह्मणून तिला 'सन्नदी' (चांगली नदी) असें ह्मटलें आहे.** देवाची दया किती अपरंपार आहे याविषयीं पुढील इंग्रेजी कवितेचा उतारा वाचनीय आहे. तत्सन्मानार्थक महाराष्ट्र कवितेंतील स्थळें बहुश्रुतांस सांगणें नकोच:–

Could we with ink the ocean fill,
Were the whole world of parchment made,
Were every single stick a quill
Were every man a scribe by birth;

To write the love of God alone,
Would drain the ocean dry;
Nor would the scroll contain the whole,
Though stretched from sky to sky.

न होय [1]कवणाहि, तें तुमचियाचि [2]लीलालसें
पदें चरित [3]दाविजे [4]त्रिजगदब्जकीलालसें; ।
[5]मदुद्धरण मात्र कां जड तुम्हां दिसे? वारिती
[6]स्वकव्यसन मर्त्यही, न करितीच सेवा [7]रिती. ॥ १९

१. लोकहिताकरितां आजपर्यंत आपण मोठमोठीं कृत्यें केलीं, त्यांच्या पुढें माझ्या अपराधांची क्षमा करण्याचें आणि माझा उद्धार करण्याचें काम कांहींच नाहीं. तें कार्य आपल्यासारख्या समर्थास अवघड आहे असें नाहीं–असा अभिप्राय दर्शवित होत्साते कवि ह्मणतात. 'कवणाहि [जें] न होय तें त्रिजगदब्जकीलालसें चरित तुमचियाचि लीलालसें पदें दाविजे'–असा अन्वय. कोणाच्यानेंही जें कार्य व्हावयाचें नाहीं तें तुमचेंच पद (पाऊल) सहज खेळतां खेळतां करून दाखवितें. भगवंताच्या पदाचा महिमा असा असामान्य आहे. २. लीलेनें आलस (मंद) तें लीलालस, खेळून खेळून थकलेलें. 'लीलालसें' हें 'पदें' याचें विशेषण आहे. ३. दाखविलें जातें. ४. त्रिजगदब्जकीलालसें (त्रिजगदब्जकीलालासारखें)=त्रि+जगत्+अब्ज+कीलालसें=तीन+जगें, लोक+कमल [अप्+ज=आप् (पाणी)+ज (झालेलें) पाण्यापासून उत्पन्न झालेलें कमल]+उदकासारखें [कीलाल=उदक] त्रिजगद्रूप अब्जाच्या (कमलाच्या) सभोंवतीं जें कीलाल (आवरणोदक) आहे त्यासारखें, गंगोदकासारखें. त्रिभुवनरूप कमलासभोंवतीं असणाऱ्या जलाप्रमाणें. हें उदक तुमच्या लीलालस पदानें भागीरथीरूपानें आणिलें अशा प्रकारचें (चरित). कथासंदर्भः–वामनावतारीं बळीचा छळ करण्याकरितां वामनरूपी विष्णूनें जेव्हां एक पाय स्वर्गांत ठेवण्यास वर उचलला तेव्हां त्या पायानें ब्रह्मांड फुटून त्याच्या बाहेरचें उदक आंत शिरलें, तीच गंगा. अशी गंगेच्या उद्भवाची एक कथा आहे. कवीच्या म्हणण्याचा अर्थ हा कीं 'वामनावतारीं तुम्हीं सहज आपला पाय वर उचलला तर ब्रह्मांड फुटून गंगा उत्पन्न झाली व अशासारखीं अचाट चरितें तुम्ही अगदीं खेळतां खेळतां करितां, पण तींच अत्यंत परिश्रमानें देखील दुसऱ्या कोणाकडूनही व्हावयाचीं नाहींत.' 'त्रिजगदब्जकीलालसें' याचा संबंध वामनावताराकडे न लावितां अर्थ केला तरी प्रशस्त. त्रिजगत् हें अब्ज (अब्जवत्) आहे ज्याला असें कीलाल (उदक) सें (उदकासारखें,) त्रिजगद्रूप जें अब्ज (कमल) त्यास पाण्यासारखें, कमळाला जसा सर्व आधार पाण्याचा तसा त्रिजगताला सर्व आधार ज्याचा असें 'चरित'. 'त्रिजगदब्जकीलालसें' हें 'चरित' याचें विशेषण समजावें. पंतांच्या 'केकावलीं'त त्यांच्या भारत सोडून इतर प्राकृत ग्रंथांपेक्षां संस्कृत शब्दांचा भरणा जास्त आहे ह्याचें प्रस्तुत सामासिक पद एक उदाहरण होय. दुसऱ्या कोणाकडूनही न होणारें, केवळ कमलाप्रमाणें जगत्रयाला उदकामध्यें तरंगत ठेवण्यासारखें कृत्य तुमच्या पदाकडून करण्यांत येतें. असें असतां माझा उद्धार (मला, संसारसागरांत बुडणाऱ्याला वर उचलून धरण्याचें काम) मात्र तुम्हांला जड वाटतो; जगत्रयापेक्षां माझें ओझें अधिक

## दयाब्द वळशील तूं, तरि न चातकां सेवकां

वाटतें का? ५. माझा उद्धार करणें. आपलें एवढें सामर्थ्य असून माझा उद्धार करणें हें काम तुम्हांला जड (कठीण) कां वाटावें? कठीण वाटत नाहींच; पण तिकडे तुम्ही दुर्लक्ष्य करितां असें मला वाटतें तर मजवर दया करून तेवढी उपेक्षाबुद्धि काढून टाका. ६. स्वक-आपले आश्रितजन पोष्यजन-त्यांचें व्यसन-दुःख, संकट. मर्त्यही (सामान्य लोक सुद्धां) स्वकव्यसन (अंगीकार करून एकदां ज्यांना आपले म्हटलें अशा लोकांचीं संकटें) वारिती (वारितात, टाळतात, दूर करितात) [त्यांची] सेवा (पोष्यजनांनीं केलेली चाकरी) रिती (रिकामी निष्फळ) न करितीच (करितच नाहींत, त्यांची सेवा निष्फळ होऊं देत नाहींत.) स्वकीयांच्या, आश्रितजनांच्या दुःखाचें निवारण हें जें त्यांच्या सेवेचें फळ तें त्यांस देतात. आपल्या सेवकांची सेवा व्यर्थ न घेतां त्यांचे मनोरथ सफळ करतात. ज्यांना एकदां आपलें म्हटलें असे लोक जर रंजले गांजले असले तर त्यांनीं केलेली आपली सेवा आठवून त्यांचे क्लेश निवारण करितात. मग तुम्ही तर सर्वैश्वर्यसंपन्न भगवान् आहां; माझ्यासारख्या आपल्या सेवकांस तारणें हें तर आपलें कर्तव्यच होय. ७. रिकामी, निष्फळ. 'रिती' हा शब्द संस्कृत 'रिक्त' शब्दापासून साधलेला आहे.

१. तूं दयाब्द वळशील, तरि चातकां सेवकां किमपि उणें न. तूं देव भाविकां कां उबगशील? अनन्यगतिका जना सोपद्रवा निरखितांचि, [हे] करुणार्णवा! तुझेंचि मन उमोप द्रवा धरी-असा अन्वय. दया+अब्द-कृपा+मेघ=दयाघन, दयेचा मेघ म्हणजे पाण्याचा जसा मेघ बनलेला असतो, तसा दयेचाच बनलेला मेघ (ईश्वर). परमेश्वराला मेघाची उपमा देणें हें कविजनसंमत आहे. आमच्या मयूरकवीला तर 'दयामृतघना'ची (केका १२१) अत्यंत आवड आहे. या समयीं माझा उद्धार आपण करीत नाहीं तर राहूं द्या; पण आपली कृपा मजवर असूं द्या म्हणजे झालें; अशा अर्थानें कवि प्रार्थना करितात. २. उतरशील, वृष्टि करशील. 'वळणें-त्वरेनें उतरून येणें, कांहीं सुगावा नसतां अकस्मात् [पाऊस] भरून येणें, पडणें. 'वळणें' हा अकर्मक धातु आहे. दयाब्द असा तूं जर वळशील, येशील, वृष्टि करशील, उतरशील. परमेश्वर मेघ; भक्तजन चातक. मेघ वृष्टि करूं लागला म्हणजे जसे चातकांचे सर्व मनोरथ परिपूर्ण होतात, तद्वत् परमेश्वराची कृपा भक्तांवर झाली म्हणजे त्यांचे इच्छित हेतु सफळ होतात. ते परिपूर्ण होण्यास मुळींच विलंब लागत नाहीं. ३. तूं दयारूप उदकाची वृष्टि आम्हां चातकरूप सेवकांवर जर करशील, तर मग आम्हांस कांहीं उणें नाहीं. चातकाला मेघोदकावांचून दुसरी गति नाहीं हा प्राचीन कविसंकेत सुप्रसिद्ध आहे. 'जेथें मेघाचेनि गर्जनें। मयूर उपरमों पाहे गगने। ना नवेनि जीवनें। चातकमनें उल्हासे' (एकनाथी भागवत अध्याय १. ६२) येथें 'दयाब्द' आणि 'चातकां सेवकां' अशा पदांची योजना केल्यामुळें रूपक अलंकार झाला आहे. [मागें केका ६ टीपा पृ० १८,१९ पहा.] ४. भक्तांला, आम्हांसारखे जे भोळे भाविक जन त्यांस.

उणें किमपि; भाविकां [1]उबगशील तूं देव कां? [2]।
[3]अनन्यगतिका जनां निरखितांचि सोपद्रवा,
तुझेंचि, [4]करुणार्णवा! मन धरी [5]उमोप [6]द्रवा. ॥ २०

---

१. त्रासशील, कंटाळशील. 'उबगणें' हा बहुतकरून कंटाळणें-त्रासणें, अशा अर्थीं प्राचीन ग्रंथभाषेंत अकर्मक धातु आढळतो; उदाहरणें-(१) 'उबगलें सासुऱ्यां आतां मज माहेरासि न्या वो (मुकुंदराज-पद), (२) सुवर्णरत्नांचिया राशी। भव्य दक्षिणा देतां ऋषी। उबगोनि सांगितलें धनासी। नेता घेता असेना ॥ [मुक्तेश्वर-सभापर्व-अ० २ ओं० ६ पृ० ८], (३) परि जीवें उबगणें हे स्थिति। न पाहे माय ॥ [ज्ञानेश्वरी-अ० १८ ओं० ५८९ पृ० ४८०]. 'उबगणें' यापासूनच 'उबग' असें नाम असून अर्थ कंटाळा तिटकारा, असा आहे. 'उबग' न मानून विशेष। पचवूनि घालीं मज आतां ॥' [श्रीधर-शिवलीलामृत-अ० १४ ओंवी १२९] चालू भाषेंत कंटाळणें या अर्थीं 'उबगणें' असा धातु आहे. २. 'तूं देव भाविकां कां उबगशील?' याचें उत्तर—उबगणार (कंटाळणार) नाहींस, हें होय. आपला दयालु स्वभाव आपल्याला भक्तांची उपेक्षा करूं देणार नाहीं-असा अर्थ. ३. अन्+अन्य+गति+का=नाहीं+इतर+आश्रय आधार+प्रत्यय=ज्यांना दुसरी गति नाहीं ते अनन्यगतिक, ज्यांना शरण जावयास इतर स्थान नाहीं ते, अनाश्रित. परमेश्वराशिवाय आपल्या पापांची क्षमा करण्यास ज्यांना दुसरें स्थान नाहीं अशा सोपद्रवा (पीडित, स+उपद्रवा) जनां (लोकांना) निरखितांचि (पहातांच) [हे] करुणार्णवा! (हे दयासागरा! ईश्वरा!) तुझेंचि मन उमोप (पुष्कळ) द्रवा (ओलाव्यास) धरी (धरितें). आपल्याशिवाय ज्यांचा कोणी त्राता नाहीं अशा अनाथ गांजलेल्या भक्तांना पाहून परमेश्वराच्या मनाला जर दयेचा पाझर फुटतो तर मग तो परमेश्वर भक्तांना कसा बरें त्रासेल? भक्तांना किंचित् दुःख झालें तरी त्याबद्दल कळवळणारा परमेश्वर त्यांची उपेक्षा कधीं तरी करील काय? -अर्थात् नाहीं हें उत्तर. जे भक्तजन अनन्यभावानें माझी कांस धरितात आणि मला भजतात त्यांची चिंता मी वाहतों म्हणून गीतेंत परमेश्वराचेंच वचन आहे. केका ११ वरील टीप ३ पहा. ४. 'करुणार्णवा!' हें विशेषण साभिप्राय आहे म्हणून येथें परिकर अलंकार जाणावा. [मागें केका १ टीपा पृ० ३ पहा.] ५. पुष्कळ. 'उमोप' हें येथें 'द्रवा' याचें विशेषण न करतां, 'धरी' याचें क्रियाविशेषण करून अन्वय लाविला तरी चालेल. तुझेंचि मन द्रवा उमोप (पुष्कळपणीं, विपुलपणीं) धरी-असा अन्वय. तुला दया फार येते-असा अर्थ. उमोप=उत्+मोप=वर+माप=मापावर=पुष्कळ, असा अर्थ दिसतो. पंतांनीं 'उमोप' हा शब्द कोठें कोठें योजिला आहे. 'धर्मीच्या चित्तवृत्तिप्रति न दुखवितां युक्तिनें घे निरोपा, तो पाय क्षमापतीचे नमि, विनवि, म्हणे, 'शीघ्र येतों, न कोपा.'। गोपाळांचीहि, भीड प्रभु धरि, न कसी बंधुची या उमोपा, ओपा योगाग्निमध्यें तनुहि, परि न हा भक्तिवांचूनि सोपा.' ॥ १६ ॥ [कृष्णविजय- उत्तरार्ध-अ० ५८]. 'उमोप' हा जुना मराठी

केळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं;

**शब्द दिसतो. कुळवाड्यांत 'मोप' या शब्दाचा या अर्थी उपयोग करितात, तो याचाच अपभ्रंश दिसतो. कवितेंत 'अमूप' या शब्दाचा यापेक्षां जास्ती प्रचार आहे.** **६. ओलाव्याला.** प्रभूच्या दयेचा ओलावा तुकारामानें सप्रेम वर्णिला आहे. 'माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हायेली ॥ १ ॥ कुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दुरि जवळूनी ॥ २ ॥ केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ॥ ३ ॥ तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ४ ॥ [तुकारामाची गाथा—अभंग ६५८].

**१. ह्या केकेंत आपण कशानें पीडित आहों, आपणाला कोणत्या शत्रूंचा उपद्रव आहे—हें कवि विशद करून दाखवितात. कळी सुनिर्मळीं नळीं परम उग्र दावा करि, तयांत मी अविशुद्ध, जेंवि दावानळीं शलभ [तंवि आहें]. वनीं पशुच्या शिरावरि व्रणार्थ काकसे स्मरादि रिपु मन्मनीं उभे [आहेत]. भेका अहि काळ कसे न?—असा अन्वय. 'कळी' म्हणजे कलियुगांत लोकांस पापप्रवृत्त करणारी तद्युगसंबंधी देवता.** 'कलियुगाचे मुळें । झाले धर्मांचे वाटोळें ॥' हा नामदेवाचा अभंग सुप्रसिद्धच आहे. 'कलियुगामाजी थोर झालें बंड । नष्ट लोक लंड झाले फार ॥ १ ॥ न धरिती सोय न पुसती कोणा । येतें जैसें मना तैसें चाले ॥ २ ॥ भजनाचा वाग टेको नेदी द्वारा । ऐसिया पामरा तारी कोण ॥ ३ ॥ विश्वास तयांचा बैसना कोठेंहा । श्रुति निंदा पाही जीवीं धरी ॥ ४ ॥ तुका म्हणे केलें कैसें नारायणें । जाणावें हें कोणे तयाविण ॥ ५ ॥' [तुकारामाची गाथा—अभंग ३२९६]. अशासारखीं तुकोबाचीं वचनें आहेत. कलियुगांत अत्यंत अधर्माचरण होईल अशा प्रकारचे उद्गार सर्व ग्रंथांतून आढळतात. मंत्रभागवतांतर्गत द्वादश स्कंधातील पुढील गीति पहा:—'वर्तेल अधर्म जगीं; सत्य, शुचित्व, क्षमा, दया, आयु, । स्मृति, बळ, नुरेल; तूळचि धर्म कुकलिकाळ तो महा वायु ॥ २७ ॥ तेव्हां महत्वकारण वित्तचि, बळ तेंचि धर्मनयहेतु । दांपत्यकारण रुचिच होइल, मोडेल सर्वही सेतु ॥ २८ ॥ वाडवपण तें सूत्रचि, पंडितपण फार बोलणें मात्र । साधुत्वहेतु दंभचि, अधनत्व नर्यां पराभवा पात्र ॥ २९ ॥ वार्ता धर्मनयांची न रुचेलचि, होतिल प्रजा दुष्टा । रुष्टा, लुब्धा, क्षुद्रा, ज्यांची न असेल मति कधीं तुष्टा' ॥ ३० ॥ 'अध्यात्मरामायणां'तही अशा अर्थांचीं वचनें आहेत. [के० १ टीप २ पहा.] परंतु नळराजा हा तर कलियुग लागण्याच्या पुष्कळ पूर्वीं होऊन गेला होता. मग त्यावर कलियुगाचा प्रभाव कसा झाला? बरें पूर्वीं चारही युगांतील देवतांचा व्यापार चालत असे असें मानलें तर कलियुगाच्या नांवानेंच कां एवढे खडे फोडावे? पण भविष्यत्काळाला नांवें ठेवण्याची लोकांची चालच आहे. कृत, त्रेत, द्वापार व कलि या चार युगांवर अधिकार गाजविणारे देव दमयंतीच्या स्वयंवरास गेले होते. **कथासंदर्भः**—दमयंतीनें इंद्रादि देवांस टाकून नळाला वरिलें हें पाहून या चौघांत कलीला फार राग आला व त्यानें त्याबद्दल नळाचा सूड घेण्याचा निश्चय करून पुढें राज्यहानि, स्त्रीपुत्रविरह, परसेवा इत्यादि संकटांत नळाला पाडलें, अशी भारतांत कथा आहे. [मोरोपंत—वनपर्व—अध्याय ४]. २. अत्यंत शुद्ध जो नळराजा त्याचे ठिकाणीं. नळराजाची पवित्रता सुप्रसिद्ध असून पुण्यश्लोकनृपमालिकेंत त्याला लोक मेरुस्थानीं समजतात. 'पुण्यश्लोको

# तयांत अविशुद्ध मी, शलभ जेंवि दावानळीं. ।

**नलो** राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥' हें वचन सुप्रसिद्ध आहे. **प्रथमचरणाचा** अर्थः–नळराजा अत्यंत पवित्र असूनही कलीनें त्याचा अत्यंत छळ केला. ३. **द्वेष, वैर, छळ. 'दावा' हा शब्द अरबी आहे.** ह्या परकी भाषेतील शब्दाचा पंतांनीं आपल्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं उपयोग केला आहेः–(१) **दावा** बहुतांसीं हा भाव कळों दुर्जनासि नेदावा [कृष्णविजय–उत्तरार्ध–अ० ८३ गी० ६८], (२) आला होउनि योगें शररूप व्यालपाळ **दाव्यानें** [कर्णपर्व–अ० ४७ गी० ४१].

१. **त्यांत, तशांत. 'तयांत मी अविशुद्ध, जेंवि शलभ दावानळीं [तेंवि आहें]'–असा अन्वय. "सुनिर्मळीं नळीं कळी परम उग्र दावा करी म्हणजे अतिपवित्र जो नळराजा त्याच्याशीं कळीनें मोठा दावा केला. तयांत म्हणजे त्या कळीच्या दाव्यांत अविशुद्ध म्ह० मलिन जो मी तो असा होईन कीं, शलभ जेंवि दावानळीं म्ह० वणव्यांत जशी टोळाची अवस्था होते तशी कलीचे दाव्यांत माझी अवस्था होईल."** [इंदुप्रकाश–ता० १४ मे १८६६.] **अत्यंत पवित्र नळराजाचा कलीनें जर छळ केला, तर माझ्यासारख्या पापी मनुष्याची काय कथा? मी पापी पडलों तेव्हां कळी माझा अतिशय छळ करील हें सांगणेंच नको. कलीच्या सपाट्यांत मी दावानळीं (वणव्यांत) जसा शलभ (टोळ) तसा भस्म होईन. पतंग जसा मोठ्या अग्नीच्या सपाट्यांत पार जळून जातो त्याप्रमाणेंच कलीच्या सपाट्यांत माझ्यासारख्या पाप्याची अत्यंत दुर्दशा होईल. नळासारख्या पुण्यश्लोकाला जर कलीनें छळलें तर मग माझ्यासारख्या पाप्याला तो छळतो यांत नवल काय? येथें कैमुतिकन्याय होऊन काव्यार्थापत्ति अलंकार झाला,** [मागें पृष्ठें ३९४-३९५ पहा.] २. **पतंग, टोळ. अग्नींत पतंगाची जी अवस्था तीच कलीच्या सपाट्यांत माझी होईल. येथें दावानल आणि कलि, शलभ आणि मी यांत उपमानोपमेयभाव आहे; उपमावाचक 'जेंवि' शब्द आहे म्हणून हा उपमा अलंकार झाला. 'उपमा** यत्र सादृश्यलक्ष्मीरुल्लसति द्वयोः । हंसीव कृष्ण ते कीर्तिः स्वर्गंगामवगाहते' (कुवलयानंद). **'उपमा ती दोघांचा साम्यचमत्कार जेथ रमणीय । हंसीपरि कीर्ति तुझी कृष्णा! सुरसिंधुगाहिनी होय'** ॥ (अलंकारविकाश) **ज्या काव्यांत उपमान (ज्याच्याशीं साम्य वर्णावयाचें तें चंद्र, कमल इत्यादि) आणि उपमेय (ज्यास साम्य वर्णावयाचें तें मुखचरणादि) यांचें सुंदर सादृश्य सहृदय (रसिक) जनांच्या अंतःकरणांस आल्हाद होईल अशा प्रकारें (व्यंग्यार्थाचा बोध होईल अशा रीतीनें मात्र नव्हे) वर्णिलें असतें तेथें उपमालंकार होतो. उपमेयास 'वर्ण्य, प्रकृत व विषय' असे प्रतिशब्द असून त्याच्याच उलट 'अवर्ण्य, अप्रकृत व विषयी' हे शब्द उपमानाचे वाचक आहेत. उपमेंत साधारणतः उपमेय, उपमान, (उपमेयोपमानांतील) साधारण धर्म व उपमावाचक शब्द अशा चारी गोष्टी असतात. ह्या चारी गोष्टी जेथें असतात, तेथें पूर्णोपमा होते.** वरील प्राकृत पद्यात्मक उदाहरणांत 'कीर्ति' **हें उपमेय, 'हंसी' हें उपमान, 'सुरसिंधुगाहिनी' हा साधारण धर्म** व 'परि' हा उपमावाचक शब्द अशा चारी **गोष्टी आल्या**

# तुम्हींच मगें आतरास्तव मला सुदीना विका.

---

**आहे तरी तुम्हीं कृपा केल्यास मी परतीरास पोंचेन अशा अभिप्रायानें स्वतरणोपाय सुचवीत कवि भगवंतास प्रार्थितात. [हे] नाविका! तुमच्या बळें भवमहानदी तरेन; मग आतरास्तव तुम्हीच सुदीना मला विका. मज सदाश्रमींचा वासही विदित असे, दया करा, गुण पहा, मज चाकराश्रमीं सदा सवे [आहे]-असा अन्वय.** २. **संसार-रूप मोठी नदी.** संसाराला नदीची, विशेषतः सागराची उपमा देण्याची सर्व देशांच्या कवितेंतून चाल आहे. 'भवनदी,' 'संसारसागर' इत्यादि शब्द संस्कृतप्राकृतकवितावाचकांच्या अत्यंत परिचयाचे आहेत. **पोप** कवीची पुढील पद्यपंक्ति पहाः—

> On life's vast ocean diversely we sail,
> Reason the card, but passion is the gale.
>
> Essay on Man, Second Epistle—Lls. 107-108.

**लांग्फेलोच्या** जीवितस्तोत्रांत (*Psalm of life*) life's solemn main (संसाररूप दुस्तर सागर) असे शब्द आढळतात; **येथें रूपक अलंकार झाला आहे.** (१) देवानें, वेणूतें विरहीं व-र्णूनि गोपिका निवती; । त्यांहीं केली प्रभुची कीर्ति स्वप्रेमशिशुगळां जिवनी (मंत्रभागवत), (२) त्या सुगुणसागराचा पावेल न अंत सुकविधीटिटवी (द्रोणपर्व), (३) भूप म्हणे विख्यात स्वायुध दहनांत अहित होमुनि हो (द्रोण.) ३. **नावाड्या! हे नाविका!** (नौकेंतून परतीरास नेणाऱ्या मनुष्याला 'नाविक' ह्मणतात) **तुमच्या बळें (तुमच्या कृपासामर्थ्यानें) भवमहानदी (संसाररूप दुस्तर नदी) तरेन (तरण्यास कठीण तरी तुमच्या आश्रयानें तरून जाईन)- परमेश्वरावर भाव ठेवून त्याची कृपा संपादन केली ह्मणजे प्रपंचांत राहून देखील परमार्थसाधन घडतें.** मात्र 'देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥' असा निःसीम भाव असला पाहिजे.

१. **तुम्हीच विका=तुम्ही आपल्या हातानें विका, या तुमच्या माझ्या व्यवहारांत दुसऱ्या कोणाला न घालतां तुम्ही स्वतः मला विकून टाका.** २. **भवमहानदीच्या पार उतरून नेल्यावर. सुखरूपपणें संसारमहानदीच्या पैलतीरावर गेल्यानंतर.** ३. **उतार, नावेंत बसवून परतीरास नेण्याबद्दल नावाड्यास जें द्रव्य द्यावें लागतें तें, नोर.** 'आतरस्तरपण्यां स्यात् द्रोणी काष्ठांबुवाहिनी' इत्यमरः. **संसारनदींतून परमार्थपरतीरावर नेण्याबद्दल जो मीं तुम्हांला उतार दिला पाहिजे तो तुम्ही मला गरीबाला विकून उगवून घ्या.** ४. **अत्यंत दीनाला. येथें 'सु'चा अर्थ 'अत्यंत' एवढाच समजावा. 'सु'चा अर्थ चांगला असा जरी आहे तरी त्याचा उपयोग बऱ्यावाईट गोष्टींचा अतिरेक दाखविण्याकरितां करितात.** ['बलवत्सुष्ठु किमुत स्वत्यतीव च निर्भरे' इत्यमरः.] 'सुकृपण' याचा तरी अर्थ 'चांगला कृपण' असा नसून 'अत्यंत कृपण' असा समजावा. 'चांगला मार' ह्याचा अर्थ 'अतिशय मार' असाच होतो. इंग्रजी भाषेंत देखील 'dearest enemy' (Shak.) चा अर्थ 'आवडता शत्रु' असा नसून 'मोठा दृढ शत्रु' असा होतो.

असे विदित वासही मज सदाश्रमींचा; करा
दया, गुण पहा, सवे मज सदा श्रमीं चाकरा. ॥ २२

---

१. तुला विकत घेतो कोण? कोणाकडे तुला विकावें? अशी आपणास चिंता पडेल तर तिचें निवारण सहज होण्यासारखें आहे. माझ्या अंगीं एक गुण आहे, त्यावरून मला विकत घेण्यास आपणास पुष्कळ ग्राहक सांपडतील. तो गुण कोणता आणि ते ग्राहक कोण यांचा उलगडा कवि उत्तरार्धांत करतात. २. येथें 'ही' शब्दानें माझ्या आंगीं आणखी थोडेबहुत गुण आहेत त्यांत हाही एक गुण आहे असें दर्शविलें आहे. ३. साधूंच्या आश्रमांतला. मज (मला) सदाश्रमींचा (साधूंच्या आश्रमांतला) वास (राहणें) ही विदित (ठाऊक) असे (आहे). मला साधूंच्या आश्रमांत राहून त्यांची मर्जी कशी सांभाळावी, सेवाचाकरी कशी करावी, तेथें कसें वागावें हें मला चांगलें माहीत आहे, म्हणून तुम्ही मला साधूंना विका. मला साधुजनांच्या स्वाधीन करा. 'आश्रमींचा' येथें 'आश्रम' शब्द सप्तम्यंत असून त्यावरून पुढें 'चा' हा संबंधी विशेषणाचा प्रत्यय लागून हें रूप झालें आहे. 'घरींच्यास खावयास मिळत नाहीं व दारींचे मौजा करितात.' अशीं पुष्कळ उदाहरणें आढळतात. वदनींचा [विराटपर्व–अ० ६ गी० ५७], स्वमुखींचे [विराटपर्व–अ० ५ गी० ७२], पदरींचें [द्रोणपर्व–अ० १७ गी० ८५] इत्यादि प्रयोग पंतांच्या काव्यांत आढळतात. ४. कृपा, मेहरबानगी. दया करा–एवढी मला (साधूंच्या घरीं विकण्याची) कृपा मजवर करा. ५. साधूंच्या घरीं राहाण्याचे गुण माझ्या आंगीं आहेत किंवा नाहींत याची परीक्षा करा. ६. सवय. मज (मला) चाकरा (नौकराला, सेवकाला) सदा (नेहमीं) श्रमीं (श्रम करण्याविषयीं, कष्ट करण्याविषयीं) सवे (सवय, अभ्यास) [आहे] माझा स्वभाव कष्टाळू असल्यामुळें साधूंच्या घरीं कष्ट करण्याचें मला कठीण पडणार नाहीं, म्हणून साधूंकडे मला विका अशी प्रार्थना करतों. 'सवे' हा शब्द पंतांनीं बऱ्याच ठिकाणीं योजलेला आढळतो. जसें:–(१) तव चरणधूलिस जशी स्वर्गींच्या गाइला सवे दानीं. [गणपति–प्रार्थना–दूर्वा २१], (२) तंडायाचीच तुला युद्धांत असेल जरि सवे, तंड. [द्रोणपर्व–अ० १६ गी० ५२.] ७. सदा=निरंतर, सर्वदा. ८. श्रमीं=श्रमाच्या ठायीं, श्रमाविषयीं. नवाक्षरी यमक. पद्याच्या चरणाचे शेवटीं जीं एक किंवा अधिक अक्षरें सारखीं जुळलेलीं असतात त्यांस यमक म्हणतात. प्राचीन संस्कृत काव्यग्रंथांतून या अर्थाचीं यमकें नसून इंग्रेजींतील ब्ल्यांक व्हर्स (Blank Verse) प्रमाणें त्यांत प्रकार आढळतो. 'घटकर्परा'दि कांहीं संस्कृत चित्रकाव्यांतून मात्र मराठींतल्या प्रमाणें यमकें आढळतात. संस्कृतांत अक्षरसमूहाच्या आवृत्तीस यमक म्हणतात. उदाहरण:–'फिरविते रविते दधिभीतरीं। मिरविते रवितेज नगांवरी। स्वकरिं ते करि चंचलता मनीं। उपरमे परमेश्वरगायनीं' ॥ (वामन) यांत 'रविते,' 'करिते,' 'परमे' या अक्षरसमूहाची आवृत्ति झाली आहे म्हणून हीं संस्कृतांतील यमकें झालीं. मराठींत यास अनुप्रास म्हणतात. 'री' व 'नीं' हीं मरा-

## धना परिजना घरीं तुमचिया उणें कायसें?

ठींतलीं यमकें होत. हा लांब यमकप्रासांचा प्रचार विशेषतः वामनाच्या काव्यांतून प्रथमतः आढळतो. मोरोपंतांनीं तर हीं यमकें व हे प्रास साधण्याची पराकाष्ठा केली. आर्येच्या द्वितीय व चतुर्थचरणभर पसरलेलीं यमकें त्यांच्या काव्यांत पुष्कळ आढळतात. सात, आठ अक्षरांचीं यमकें तर अतिशयच आहेत. याचीं थोडीं उदाहरणें पुरवणींत पहावीं. या संबंधानें वेदार्थयत्नाचे विद्वान् कर्ते रा० ब० शंकर पांडुरंग पंडित यांचा एल्फिन्स्टन शाळापत्रकांतील पुढील अभिप्राय महत्वाचा आहे:—

"Some centuries afterwards, Waman was the first who introduced the greatest number of Sanskrit metres and words, the first who adorned his verses with long harmonious rhymes, and was the first who imposed upon every one that wished to hear him, the necessity of having at least some elementary knowledge of Sanskrit. Then followed our lofty and learned poet of the eighteenth century. He wrote, as he says himself, in a mystical Kantha (a patch-work of many coloured cloth), and carried to the utmost height the outward ornament of rhyme, the logical accuracy and scientific exactness in use of words, the art of expressing long complicated thoughts within a most wonderfully short compass, by means of compounds or samasas (which is one of the characteristic beauties of Sanskrit, and thence of Marathi); and lastly almost a reverential observance of the rules of grammar and idiom. (*Shanker Pandurang Pandit in the Elphinstone School paper, October* 1863.) 'साधूंच्या घरीं विकून परमार्थतीराला लावल्याबद्दल पैसे वसूल करून घ्या' असें म्हणण्यांत पंतांनीं सत्संगाविषयीं आपली आत्यंतिक अभिरुचि प्रकट केली. संतसमागमाचा महिमाच तसा आहे. तुकारामानें देवापाशीं दान मागतांना 'नलगे मुक्ति, धन संपदा। संतसंग देईं सदा ॥' असेंच मागणें मागितलें आहे. पंतांनीं देखील संतवर्णनविषयपर सन्मणिमाला, ज्ञानदेवस्तव, चांगदेवस्तव, श्रीनाथचरित्र, कबीरस्तव, रामदासगुणवर्णन, वामनपंडितस्तुति, नरसिंहमेहतास्तव, तुकारामस्तुति, तुळसीदासस्तव, माधवदासस्तव, महिपतिस्तुति, इत्यादि स्फुटकाव्यें आणि साधुस्तव, सत्संगस्तव, साधुरीति, साधुसत्कार, सद्वर्णन इत्यादि प्रकरणें साधारणपणें सत्संगमहिमा वर्णन करण्यासाठीं लिहिलीं, यांवरून पंत सत्संगाविषयीं केवढे भुकेले होते हें चांगलें दिसून येतें. ९. मागें १५ व्या केकेंत 'निजप्रियजनाकडे तरिहि दे हवाला' इत्यादि जें कवीनें म्हटलें आहे त्याचीच येथें उत्तरार्धांत स्पष्ट पुनरुक्ति केली आहे.

**१. [अहो महाराज!] तुमचिया घरीं धना परिजना उणें कायसें? मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें लाभ न [असे;] परि प्रभुहि सकल वस्तुला संग्रहीं ठेविती, [आणि] गुणा उणा न म्हणतां अधिक आदरें सेविती—असा अन्वय. 'साधूकडे मला विका असें मीं म्हटलें खरें, पण आपल्या मनांत असें येईल कीं माझे भक्त जे साधु ते दरिद्री आहेत, त्यांजपासून तुझें मोल मला काय मिळावयाचें आहे? तर हें खरेंच आहे,**

न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें. ।
परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती;
गुणा न म्हणतां उणा, अधिक आदरें सेविती. ॥ २३

---

म्हणून त्यांकडे न विकितां तुम्हीच आपणाजवळ मला ठेवून मजपासून चाकरी घेऊन आपला उतार फेडून घ्या, अशा अभिप्रायानें पुन्हा कवि' (केकादर्श) भगवंताला प्रार्थितात. 'तुमचिया (तुमच्या घरीं) धना (द्रव्याला) परिजना (सेवकजनांला, चाकरमाणसांना) कायसें उणें (काय कमी आहे)?' तुमच्या येथें द्रव्याला किंवा चाकरमाणसांला कमी आहे म्हणून तुम्हीं मला चाकरीस ठेवावें अशांतली गोष्ट मुळींच नाहीं. मला चाकरीस ठेवा म्हणून तुम्हांला मी आग्रह करितों पण मला चाकरीस ठेवण्यापासून तुमचा कांहींएक फायदा नाहीं या शंकेवर दृष्टांत दुसऱ्या चरणांत दिला आहे. २. चाकरांना. परिजन=आश्रित, चाकर लोक, परिवार, भृत्यवर्ग.

१. मणि (रत्न)+हेम (सोनें)+भू (पृथ्वी)+पति (स्वामी). ज्यापाशीं रत्नसुवर्णादि द्रव्यांची विपुलता आहे अशा पृथ्वीपति राजास. 'मणिहेमभूपतिस आयसें जोडिल्या लाभ न'–असाही अन्वय. एखाद्या श्रीमंत राजाचा लोखंडानें आश्रय केला तर (लोखंडास जसा लाभ आहे तसा) त्या राजास त्यापासून कांहीं लाभ नाहीं असा अर्थ केला तरी चालेल. २. मिळविलेल्या. ३. लोखंडाच्या तुकड्यानें. 'लोहोऽस्त्री शस्त्रकं तीक्ष्णं पिंडं कालायसायसी' [अमर]. रत्नसुवर्णादिकांची ज्यास समृद्धि आहे अशा राजांस जसा एखाद्या लोखंडाचा तुकडा सांपडला असतां लाभ झाला असें होत नाहीं, तद्वत् असंख्य दासदासींनीं युक्त अशा तुमच्या घरीं मी राहिल्यानें देवा! तुम्हांला काडीएवढा सुद्धां लाभ व्हावयाचा नाहीं. आयसें=आयसानें. येथें 'आयसें' हें तृतीयेचें एकवचन आहे. येथें दृष्टांतालंकार झाला आहे. पृष्ठ १३ पहा. अलंकारांत सादृश्य व भेदः–'दृष्टांतालंकार व अर्थांतरन्यास हे कांहीं अंशी सारखे आहेत. एखादा विशेष प्रकृतार्थ मनांत येण्याकरितां दुसऱ्या विशेष अप्रकृतार्थाचें उदाहरण दिलें असतां दृष्टांत होतो; व प्रकृत सामान्यार्थाचा बोध होण्याकरितां विशेष अप्रकृतार्थ सांगणें किंवा प्रकृत विशेषार्थ मनांत बिंबण्याकरितां अप्रकृत सामान्यार्थ सांगणें ह्यांस अर्थांतरन्यास म्हणतात. अन्योक्ति, दृष्टांत व अर्थांतरन्यास ह्यांच्यामध्यें व उपमा व रूपक यांत भेद ह्याच कीं, दुसऱ्या दोन अलंकारांमध्यें सादृश्य मुख्य असतें, व पहिल्या तीन अलंकारांत तें मुख्य असत नाहीं; तर तें गौण असून दुसऱ्या कार्यास उपयोगी पडतें. अन्योक्तींत प्रकृतार्थ दाखविण्याकरितां सादृश्य सांगितलें असतें; व दृष्टांत व अर्थांतरन्यास ह्यांत प्रकृतार्थ सिद्ध करण्याकडे त्याचें तात्पर्य असतें.' (अनेकविद्यामूलतत्व 'वाक्यांतले अलंकार') ४. समर्थ, श्रीमंत, माझ्यापासून जरी तुम्हांला मुळींच फायदा व्हावयाचा नाहीं तरी मला सोडूं नका. कारण जे श्रीमंत आहेत ते लहान मोठे सर्व पदार्थ–लोखंडाच्या तुकड्यापासून तों सुवर्णाच्या कांबीपर्यंत सर्व लहान मोठ्या वस्तू–संग्रहास ठेवितात. 'न जाणों कोणत्या वेळेस कशाचा उपयोग पडेल' असें समजून किंवा केवळ हौसेखातर ते सर्व वस्तू बाळगतात. ह्यावरून

## दिसें[1] म्हणुनि शाश्वतप्रकृतिरंक मी काय? हो[3]!

पूर्वींच्या काळीं लहान मोठे सर्व पदार्थ एका ठिकाणीं राखून ठेवण्याची चाल श्रीमंत लोकांत होती असें दिसून येतें. तथापि यावरून 'पदार्थसंग्रहालया'ची कल्पना पुष्कळ जुनी असावी असें मानण्यास कांहीं आधार नाहीं. ५. गुणाला. [प्रभु] गुणा (एखाद्या वस्तूंत गुण कमी असला तरी त्याला) उणा (कमी) न म्हणतां [उलट] अधिक आदरें (अत्यंत आवडीनें) सेविती (सेवितात, उपयोगांत आणतात). जे समर्थ आणि शौकी लोक आहेत ते कोणत्याही वस्तूच्या गुणाचा (मग तो गुण कितीही अल्प असेना) अनादर न करितां सर्व वस्तू आपल्या संग्रहास ठेवितात, आणि प्रसंगविशेषीं त्याला आस्थापूर्वक उपयोगांत आणतात. पदार्थ कसाही असो, कितीही लहान असो, त्याचा उपयोग समयविशेषीं फार होतो म्हणून 'तृणेन कार्यं भवतीश्वराणां' या न्यायानें राजे सकल वस्तूंला संग्रहीं ठेवितात. त्याचप्रमाणें आपल्या श्रीमंतांच्या घरांत जरी सेवकांची उणीव नाहीं व मी अतिदरिद्री असल्यामुळें माझ्या संग्रहानें जरी आपणास कांहीं लाभ नाहीं, तरी आपण सर्ववस्तुसंग्राहक प्रभुवर आहां; म्हणून माझा अनादर न करतां मला आपल्या संग्रहीं ठेवा अशी माझी प्रार्थना आहे. जे खरे भक्त आहेत ते ईश्वरसमागमाविषयीं अत्यंत भुकेले असतात. परमेश्वराच्या सन्निध राहून त्याची सेवा करण्याची उत्कट इच्छा खिस्ती बायबलांतही पुढील स्थळीं दावीदानें प्रगट केली आहे:—"One thing have I desired of the Lord, that will I seek often; that I may dwell in the house of the Lord all the days of my life to behold the beauty of the Lord, and to inquire in his temple." Ps. XXV11. 4. भर्तृहरीकृत 'नीतिशतकां'तही थोरांची अशीच गुणग्राहकता सांगितली आहे:—मनसि वचसि काये पुण्यपीयूषपूर्णास्त्रिभुवनमुपकारश्रेणिभिः प्रीणयंतः। परगुणपरमाणुं पर्वतीकृत्य नित्यं निजहृदि विकसंतः संति संतः कियंतः॥ याचें वामनपंडितकृत भाषांतर:—ज्यांचीं देहमनें, तशींच वचनें, पुण्यामृतें ओतिलीं; कीं जेंहि स्वकृतोपकारविभवें सर्वत्र विस्तारिलीं। लोकांचे परमाणुतुल्य गुण जे मेरूपरी वानिती, चित्तीं तोषहि पावती सुजन ते नेणों किती नांदती.॥ ६. 'गुणा उणा अधिक न म्हणतां आदरें सेविती' असाही अन्वय केला तरी चालेल. पदार्थांचे गुण चांगले आहेत किंवा वाईट आहेत, किंवा अमकी वस्तु अधिक उपयोगाची, अमकी कमी उपयोगाची, हें विचारांत न घेतां त्यांचा आस्थापूर्वक संग्रह करतात—असा अर्थ जाणावा. शेवटच्या दोन चरणांत अर्थांतरन्यास अलंकार झाला आहे असें मानल्यास चालेल. पृष्ठ ८ पहा.

१. हो! [अहो महाराज!] मी दिसें म्हणुनि शाश्वतप्रकृतिरंक [आहें] काय? [अहो] प्रभो! तुमचे पाय मजवरी प्रसन्न हो (होवोत). बरें इंदिराबृहदुरोजसंगाक्षण त्यजुनि [माझ्या] शिरीं पद धरा, गंगाधरा सम [आणि] सुशील सखा मिळो—असा अन्वय. दिसें=दिसतों. 'आपण म्हणाल कीं तूं रंक दरिद्री दिसतोस म्हणून आम्हां श्रीमंतांजवळ तूं चाकर शोभणार नाहींस' अशी शंका घेऊन कवि म्हणतात. 'हो! (अहो! महाराज) मी (मोरोपंत) दिसें (वरून दिसतों,) बाह्यात्कारीं रंकसा दिसतों म्हणुनि (यास्तव) शाश्वतप्रकृतिरंक (निरंतर प्रकृतीनें दरिद्री, जन्मदरिद्री) काय?'

प्रसन्न तुमचे बरें मजवरी प्रभो! पाय हो.।
क्षण त्यजुनि इंदिराबृहदुरोजसंगा, धरा

मी बाहेरून दरिद्री दिसलों तरी माझें दारिद्र्य कधींही न जाण्याजोगें असें आहे काय?' नाहीं हें काकर्थी उत्तर. माझा रंकपणा माझ्या आयुष्यास खिळलेला नसून तो जाण्याजोगा आहे. २. शाश्वत, (सदोदित, नेहमीं)+प्रकृतिरंक (प्रकृतीनें–स्वभावतः, रंक–भिकारी; जन्मदरिद्री). जन्मापासून मरेपर्यंत ज्याचें दारिद्र्य नाहींसें होत नाहीं तो. माझें रंकत्व शाश्वत नव्हे, माझें दारिद्र्य तुमचा अनुग्रह होतांच नष्ट होणारें आहे. ३. 'हो' हें संबोधन न मानिलें तरी चालेल. 'कायहो' हें एक पद अव्ययरूप मानलें असतां अधिक गोड लागतें–'कायहो तुम्ही आतां असे निष्ठुर झालां,' 'कायहो तो चमत्कार,' इत्यादि वाक्यांत 'कायहो' हें सारें विस्मयार्थदर्शक अव्यय जाणावें. तसेंच–'तुम्ही आतां असे निष्ठुर झालां कायहो' म्हणजे 'निष्ठुर झालां असें मला वाटतें,' असा ईषत्स्वीकृतीचाहि अर्थ होतो.' (य० पां०–पृ० ११४).

१. 'येथें आपलें दारिद्र्य कशानें नाहींसें होईल तें कवि सांगतात. देवा! तुमचे पाय मात्र मजवर प्रसन्न होऊं द्या बरें म्हणजे मी शाश्वत रंक नाहीं हें तुम्हांस तेव्हांच दिसून येईल. हो=होवोत. २. क्षणभर. ३. लक्ष्मीपुष्टस्तनसंगमाला. 'इंदिरा लोकमाता मा क्षीरोदतनया रमा.' बृहत्–स्थूल, मोठे, पुष्ट; उरोज=स्तन. 'स्तनाचें स्थूलत्व सौंदर्याचें अंग म्हणून या देशांत शृंगाररसप्रधान काव्यांत फार वर्णिलें असतें.' [य० पां० –पृ० ११६]. जयदेव कवीचें 'गीतगोविंद' व भर्तृहरीचें 'शृंगारशतक' पाहिलें असतां वरील म्हणण्याची सत्यता दिसून येईल. 'पुष्पेषोरभिषेकहेमकलशौ हारप्रभा वाहिनी । चक्राव्हौ मदनोन्मदद्विपपतेः कुंभौ रतेः कंदुकौ । कन्दौ बाहुमृणालिकायुगलयोर्लीलालतासत्फले । नव्यौ रत्नसमुद्गकौ वहति सा लावण्यपूर्णौ स्तनौ' (सुभाषितरत्नभाण्डागार पृ० ४२६ श्लोक ७३). 'प्रभूचे पाय मजवर प्रसन्न होवोत म्हणजे रंकपणा जाईल' तो कसा तें कवि सांगतात. देवा! तुम्ही क्षणभर लक्ष्मीच्या स्तनावर ठेवलेला आपला पाय काढून तो माझ्या मस्तकावर ठेवा म्हणजे मला गंगाधराची योग्यता येईल. महादेवाची योग्यता अंगीं येणें यापरता मोठेपणा तो कोणता यावयाचा? कथासंदर्भः–शंकरानें समुद्रमंथनप्रसंगीं निघालेलें हालाहल विष लोककल्याणार्थ भक्षण केलें. त्यामुळें त्याच्या अंगाचा दाह होऊं लागला. त्याचें शमन व्हावें म्हणून त्यानें अंगाला भस्मलेपन केलें, गळ्यांत सर्प धारण करून डोक्यावर अमृतस्रावी चंद्र व शीतलजलवाहिनी गंगा यांस धारण केलें म्हणून शंकराला 'गंगाधर' व 'चंद्रशेखर' म्हणतात. लक्ष्मीच्या स्तनावरील आपला पाय काढून तो माझ्या डोक्यावर ठेवा म्हणजे मला गंगाधरत्व (महादेवाची योग्यता) येईल. कथासंदर्भः–लोकजननी लक्ष्मी आपल्या स्तनानें भगवान् विष्णूच्या पादकमलांचें मर्दन करिते. भगवंताचे चरण अत्यंत कोमल असल्यामुळें लक्ष्मीच्या नाजुक हस्तानें पाय रगडणें सुद्धां प्रभूस दुःसह होईल म्हणून अत्यंत मृदु अशा स्तनानें लक्ष्मी भगवंताचें पादसंवाहन करिते. भगवंताचे पायांशिवाय बाकीचें सर्व शरीर वज्राप्रमाणें कठीण होतें. पाय मात्र

अत्यंत मृदु होते, असें 'अनुशासन'पर्वांत सांगितलें आहे. भगवंताच्या निर्वाणसमयीं व्याधानें कृष्णाला मृग समजून जो बाण मारिला तो पायावर लागला आणि तें प्राणोत्क्रमणास निमित्त झालें ही 'मौसलपर्वां'तील कथा [अध्याय ४] सर्वविश्रुतच आहे. ईश्वराचे चरण अत्यंत कोमळ म्हणून त्यांनीं लक्ष्मीस्तनाचा आश्रय केला असें जसें येथें वर्णन आहे तसेंच तें पंतांच्या काव्यांत पुढील ठिकाणींही आढळतें:-(१) यौ कमलावक्षस्यपि वक्षोजस्पर्शभूरिरक्ततलौ। तौ तव वृंदावनभुवि चंक्रमणं चक्रतुश्चिरं चरणौ॥. [कृष्णस्तवराज-श्लोक ९५ पृ० २४४], (२) ज्याचें चरणतळ मळे लक्ष्मीकुचकुंकुमें, असाहि तळमळे। [आर्यागीतिमुक्तामाला-आ० गी० ४८ पृ० २१३.] कृष्णस्त्रिया आपल्या पतीचे चरण आपल्या स्तनांवर ठेवीत असत असें पुढील अवतरणावरून दिसून येईल:-बहुधा आम्ही स्वकुचीं वाहतसों तेंवि तूं स्वशृंगांहीं। वाहों वांछसि विभुपदसारस जें जुष्ट साधुभृंगांहीं ॥ [कृष्णविजय-अ० ९० गी० २२ पृ० ३४५]. **पंतांच्या केकावलींत व त्यांच्या इतर ग्रंथांतून शृंगाररसाचा अतिरेक कितपत आहे व तो क्षम्य आहे किंवा कसें यासंबंधी अल्पविवेचन:**-कृष्ण आपल्या स्त्रियांच्या उरोजावर चित्रावली काढीत असे (केका ७), कृष्णस्त्रिया आपल्या पतीचे पाय आपल्या स्तनप्रदेशीं धारण करितात (केका २४), कृष्णाला राधिकेचा विरह क्षणभर सहन होत नसे (केका १०२), अशा प्रकारचीं थोडीं वर्णनें या काव्यांत आढळतात. यावरून कित्येकांनीं हें बीभत्स ठरवून कवीला फार दोष दिला आहे. वास्तविकपणें पंतांच्या काव्यांत बीभत्सवर्णन नितांत विरळ आढळतें-एकंदर पंतांच्या ग्रंथसमुद्राचें आलोडन केलें असतां त्यांत हिरे माणकेंच फार सांपडत असून बीभत्सवर्णनरूपी गाळ फारच थोडा आढळतो. याची प्रतीति पाहणें असल्यास पंतांनीं 'हरिवंश' 'कृष्णविजय' वगैरे ग्रंथांत केलेलें रासवर्णन वाचावें म्हणजे पंतांच्या प्रस्तुत काव्यांतलें बीभत्सवर्णन प्राचीन अर्वाचीन अशा अनेक संस्कृत ग्रंथांतल्या बीभत्सवर्णनाच्या मानानें किंवा 'राधाभुजंग', 'राधाविलास' इत्यादि काव्यांचा कर्ता वामनपंडित यांच्या किंवा पंतांच्या काळाला जवळ अशा 'रामजोशी' व 'अनंतफंदी' यांच्या बीभत्सवर्णनाच्या मानानें खंडींत पाव रती सुद्धां नाहीं असें वाचकांस दिसून येईल. या संबंधानें यशोदापांडुरंगीच्या प्रस्तावनेंत दादोबा लिहितात:-"आतां आणखी एक दोष प्रस्तुत काव्यांत आढळतो. तो पूर्वोक्त दोषांपेक्षां (ईश्वराशीं अत्यंत सलगी दाखवून त्याशीं वेळोवेळीं अतिप्रसंग करणें या दोषापेक्षां) अधिक शोचनीय आहे असें विचारशील पुरुषांस वाटल्यावांचून राहाणार नाहीं; आणि वर जी म्यां दयाळू आणि न्यायी अशा परमेश्वराच्या प्रार्थनेंत विनयातिक्रमणरूप दोषांची सूचना केली, त्याच दोषाचें हें परिपक्व फल होय, असें त्यांच्या ध्यानांत येऊन प्रकृत दोषप्रदर्शनांत पूर्वोक्त दोषकथनाचें समर्थनही होईल. एकदां विनयभाव सुटला म्हणजे सलगीस आरंभ होतो, आणि ती सलगी विनोदास पोंचविते; ह्या देशांत, विशेषेंकरून संस्कृत काव्यांत, शृंगाररसाचें प्राधान्य असल्यामुळें त्या विनोदांत हा रस प्रचुर होऊन शेवटीं बीभत्स रसाचाही प्रादुर्भाव होतो. असें असलें तरी इतर लोक व्यवहारवर्णनपर काव्यांत समयविशेषीं समर्याद असल्यास शृंगार आणि बीभत्स हे रस सुसह्य आणि रुचिपरत्वें आल्हादजनकहि व्हावयास शक्य आहेत; परंतु भगवत्स्तुतींत या रसाचें नुसत्या लवणाप्रमाणेंही

अल्प सेवन दुःसह, मग या रसाचे द्रोण भरभरून पिणें हें साहसकर्म भरतखंडनिवासी भक्तजनांनींच करावें; इतरांच्यांनीं होणार नाहीं." येथें गीतगोविंदांतले तीन ओंगळ अर्थांनीं भरलेले उतारे देऊन पुढें दादोबा लिहितात. "यांत पहा हे या शृंगाररसानें कसे द्रोण भरले आहेत. यापेक्षांही प्रौढरीतीनें शृंगाररसान्वित भक्तिप्रेम पाहणें असल्यास श्रीमद्भागवताचा मोठा ग्रंथ आहेच. आणखी याशिवाय पाहाण्याची इच्छा असल्यास ब्रह्मवैवर्तक पुराणांतील कृष्णजन्मखंड पहावें. परंतु वेणीसंहार नाटककारानें तर वैष्णवांसहि मळमळी सुटे असा रस आपल्या नांदीच्या एका श्लोकांत ओतला आहे, त्या श्लोकाचा येथें उपन्यास करण्यासही मला लज्जेनें संकोच वाटतो. मग असा शृंगाररसान्वित भक्तिप्रेम प्रकट करण्याचा जेथें शिष्टसंप्रदाय प्राचीनकाळापासून चालत आला आहे, तेथें आपल्या प्राकृत कवीनें ह्या स्तोत्रांत कोठें सात आठ श्लोकांत या रसाचे एक दोन थेंब ओतले असल्यास (केका ७,१३,२४,३५,३६,३७,८३,१०२) हा त्याजकडेस मोठा दोष न येतां उलटें मला वाटतें कीं हें त्या रसाचें अत्यल्पत्व त्याच्या सदभिरुचीचें मोठें ज्ञापक होतें. इतकें वादळ चालत असतां त्यांत पंतांनीं आपल्या होडीस तो वारा फारसा लागूं न देतां संभाळलें, हें त्यांचें कृत्य मोठें स्तुत्य होय असें विचारी पुरुषांच्या ध्यानास येईल." [य० पां०–पृ० ४१-४३]. दादोबांच्या वरील म्हणण्याच्या सत्यतेविषयीं ज्यांना संशय येईल त्यांनीं प्राचीन अर्वाचीन कवीनीं मोठ्या आवडीनें वर्णिलेल्या कृष्णाच्या बाळक्रीडा (?) वाचाव्या, म्हणजे अत्यंत सोज्वल पुण्यश्लोकाच्या चरित्राला आमचे बीभत्स रसांत गटांगळ्या खाणारे रसिक (?) कवि कसें ओंगळ व मनास वीट आणणारें रूप देतात तें पाहून अत्यंत खेद होईल. 'नागेश' कविकृत 'चंद्रावळी आख्यान' हें ह्याच मासल्याचें होय. विविधज्ञानविस्तारांत आलेलें 'श्रीकृष्णलीलामृत' यासंबंधी वाचनीय आहे. बीभत्स रसाचा आणखी मासला 'विठ्ठला'च्या 'बिल्हण चरित्रांत सांपडेल. पंतांच्या काव्यांत क्वचित् ठिकाणीं अश्लील शब्दयोजना, फाजील शृंगारिक उपमा व वर्णनही आढळतें. त्याचीं उदाहरणें:–(१) सुरतरसांत बुडाला जाणों स्त्रीरत्न शीतनवसर, तो। तप्त मतंगज, रतला; शक्र म्हणे बहु करोनि नवस रतो. (आदि० अ० १२-३१), (२) भीरु! भय त्यजुनि, मिठी घालीं माझ्या गळ्यांत बाहूंनीं। दर्शन अमोघ माझें तुज उचित न हा नकार बाहूनी॥ (आदि १६-१२), (३) सत्य, प्रिय, हित बोलुनि योजुनि अंकीं निवास रमणीतें,। घेउनि देउनि अधरामृत, भोगी रत्न वासरमणी तें॥ (आदि १६-१४), (४) राधाप्राप्त्यर्थ जसा तो स्वकरगतामला यशा शिनळ (वन० ४,२५), (५) ठावें असोनि सर्वेहि पतिच्या खोलींत कोंडवा सून। ऐसें स्वसख्यापाशीं कांगे वदलीस तोंड वासून॥ (उद्योग० १३,२०५), (६) पडल्या एके शिंग्यावरि बहु शिंग्या करूनि हातेणें। जो मंदुरेंत होतो गोंधळ, केला प्रकार हा तेणें (उद्यो० १३-२१७), (७) सुखवि कविसभेसि, जसा जिंकुनि दयितेसि दक्ष काम–रणीं (स्वर्गा २-२७), (८) धर्मार्थ जाय सोडुनि सहसा होतांचि बरि पहाट पती। तत्संगा जसि दयिता, त्वत्संगा सिद्धि तसि पहा टपती (स्वर्गा २-१८), (९) जो घोळशी तुज, जसा सुरतीं अतिकामरस कलत्रास (द्रोण २२-६१), (१०) उत्साहशक्ति योधा श्रम, भर्त्या जेंवि न कळवी रंमणी (द्रोण १४-७९), (११) स्त्रीकुचलीन तरुणसे क्षत्रिय गजकुंभलीन ते गमले (द्रोण २०-७७), (१२) तींत प्रजा जसी तो मखरांत प्रियवधू तसी बसवी (हरिवंश १९-८३), (१३) मणिकन-

शिरीं पद, मिळो सखा सम सुशील गंगाधरा. ॥ २४

कमयी जसि तनु साध्वी व्हाया प्रिया सुख निवेदी (द्रोण ५-९३), (१४) वांछित, घालुनि गांठी छबें त्या रम्यमूर्तिसह, साधी। तव मातेची शंके सुरतगुरुत्वें करूनि सहसा धी (हरि १६-९४), (१५) वरपुरुषसंग बाई! ब्रह्मानंद स्त्रियांसि जाणावा (हरि ३६-९७), (१६) पुरुषवर प्राप्त तिला झाला हें इंगितें तया कळलें। यश जेंवि मृगमदाचें सुरतसुखाचें कधीं नसे मळलें (हरि ३६-९४), (१७) तत्पक्षपवनवेगें उडति खग नभीं त्यजूनि जगतीतें; । स्त्रीनें मत्तविट तमें कांपविनी वर पडोनि मग तीतें (हरिश्चंद्र ५-१०), (१८) पदरें पुसोनि चुंबिति पतिमुख, सुस्नात जें जसें चुंबी (स्त्री० ४-१२), (१९) आयांतें बायांतें म्हणते मज लाविली बळेंच सवें। कां मोडितां तुम्हीच क्षण आतां स्वपतिवेगळे नसवे ॥ पति जवळुनि कां नेता, नेउनि हितबोध करूनि बोलीत। तुमच्याहि असें अंतर पडलें कां गे! क्रियेंत बोलींत (स्त्रीपर्व अ० ४ गी० ५८-५९), (२०) त्वां लालनेंचि दृढहि मन्नीवीग्रंथि नित्य उकलावा। क्षत नखरेंचि करूनि हा कठिनस्तनभार फार सुकलावा॥ (स्त्री० अ० ५ गी० ५२) (२१) लागे अंतीं हगवण, मग वणवासा ज्वर प्रबळ पेटे (शल्य० १-५४)

१. **मित्र.** 'एकक्रियं भवेन्मित्रं समप्राणः सखा मतः.' जे दोघेजण एके ठिकाणीं राहून एकच गोष्ट जोडीनें करतात त्यांना मित्र म्हणावें व जेथें एकाला सुखदुःख झालें कीं लागलाच त्याचा प्रत्यय दुसऱ्याच्या ठिकाणींही येतो व जे एकमेकांवर प्राणापलीकडे प्रेम ठेवतात त्यांना सखा हें नांव योग्य. **माझ्या मस्तकीं पाय ठेविल्यानें गंगाधराला (गंगा धारण करणाऱ्या महादेवाला) सम (स्वतःसारखा, स्वसमान, आपल्यासारखा) [आणि] सुशील (सुस्वभावाचा असा, चांगलें आहे शील–स्वभाव–ज्याचें असा) सखा (मित्र, सोबती) मिळो (मिळूं द्या)–असा अन्वयार्थ करावा. माझ्या मस्तकावर तुम्हीं पाय ठेवला कीं महादेवाची व माझी मैत्री जमली. कारण उघडच आहे. भगवंताच्या पदधारणानें विष्णुपदी गंगेची मस्तकावर स्थापना होऊन कवीचें शील महादेवाप्रमाणेंच झालें व दोघेही परस्पर तुल्य झाले.** येथें कवीनें आपणास भगवंताच्या अनुग्रहानें गंगाधरत्व आलें असें म्हणण्यांत मोठी मार्मिकता प्रकट केली आहे. महादेवाचें रूप पाहिलें म्हणजे अठरा विस्वे दारिद्र्य घरीं भरलें आहे असें वाटावयाचें. शरीराला सर्पाचे वेढे दिले आहेत, गळ्यांत नरमुंडमाळा लोंबत असून अंगाला विभूति चर्चिली आहे व हातांत भिक्षेकरितां नरकपाळ घेतलें आहे, अशा प्रकारचा महादेवाचा प्रपंच पाहिला म्हणजे त्याच्या दारिद्र्याची चांगली कल्पना होते. असें जरी आहे तरी महादेव जन्मदरिद्री नसून त्याचें ऐश्वर्य फार मोठें आहे. वाटेल तेव्हां सर्व विश्वाची संपत्ति पायापाशीं आणण्याचें सामर्थ्य त्याच्यांत आहे. तद्वत् **जरी महादेवाप्रमाणें वरून वरून मी जन्मदरिद्री दिसतों तरी आंतून तसा नाहीं, तुमची कृपा मात्र मजवर झाली पाहिजे–असा कवीचा अभिप्रेतार्थ. या केकेच्या तृतीय चरणांत 'इंदिराबृहदुरोजसंगा' हें बरेंच मोठें समासघटित पद आलें आहे. पंतांच्या कवितेंत अशीं संस्कृत शब्दांनीं भरलेलीं लांब लांब सामासिक पदें वारंवार आढळतात.** मोरोपंताच्या प्राकृत थोरल्या मंत्ररामायणांत सुंदरकांडांत रावणानें मारुतीला तूं कोण, कोणाकडून व कशासाठीं येथें आलास असा प्रश्न विचारला तेव्हां मारुतीनें जें उत्तर दिलें आहे त्यांतील पुष्कळ आर्यांचे सबंध

समासघटित आहेत. त्यांचा प्रारंभ असा:–रविवंशजदशरथनृपसंतानक्षीरसिंधुचंद्राचा । गाधिजमुनिमखनाशनराक्षसमथनक्रियावितंद्राचा ॥ हा **प्राकृतसंस्कृतमिश्रणाचा प्रकार कित्येकांस दोषावह दिसतो, त्याविषयीं हंसांचा अभिप्राय:–"मोरोपंता**ची वाणीच ओजोगुणविशिष्ट आहे. तींत चार चार पांच पांच पदांचे समास अतिशय. कोठें कोठें तर आर्येचे दोन दोन चरण भरून एकेक समास असेंही आढळतें. त्याच्या काव्यांत संस्कृत शब्दांचा भरणा अतिशय; कोठें कोठें आर्येचे चतुर्थांश, आर्यार्धें किंबहुना संपूर्ण आर्याही शुद्ध संस्कृत भाषेतील प्रकृतिप्रत्ययांनीं जोडलेल्या आढळतात. ज्या ठिकाणीं अप्रसिद्ध संस्कृत शब्द न घालतां प्रचारांतील संस्कृत अथवा प्राकृत शब्दांची योजना करितां आली असती अशा ठिकाणींही **पंतानें** यथेच्छ संस्कृत ओतून दिलें आहे. ह्या गोष्टीनें अर्वाचीन विद्वानांपैकीं कितीएकांस नवल वाटतें. व ह्याच कारणामुळें ते **पं**तांस नांवें ठेवितात. परंतु ही त्यांची चुकी आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. कारण प्राकृत भाषाकवितेंत हा विचित्र प्रकार अवलोकन करून इतर भाषांतील लोकांस कदाचित् आश्चर्य वाटलें तर वाटो. पण मराठी भाषाभिज्ञांस ह्याचें आश्चर्य मानतां येत नाहीं व याच कारणामुळें **मोरोपंता**स अरसिक इत्यादि नांवें ठेवितां येत नाहींत. प्राकृत कवितेंत संस्कृत शब्दांचें मिश्रण करून काव्य लिहिण्याचा परिपाठ, आद्यकवि **मु**कुंदराज याजपासून तों **मोरोपंता**च्या पूर्वीपर्यंत जितके कवी झाले त्या सर्वांचा दिसून येतो. त्यांत कोठें कोठें कवीच्या विद्वत्तेप्रमाणें आणि कवितेच्या विषयाच्या महत्वाप्रमाणें भाषामिश्रणांत संस्कृताचें न्यूनाधिक्य आढळून येतें. परंतु तें अगदीं नाहीं असें कोठेंही दिसत नाहीं. यावरून **मोरोपंतानें** काढिलेला मिश्रणाचा प्रकार अपूर्व आहे व यामुळें तो दोषास पात्र आहे असें म्हणतां येत नाहीं. लांब लांब समास पुष्कळ ठिकाणीं घातल्यामुळेंच **पं**ताच्या काव्यांत ओजोगुण आला. लांब लांब समास संस्कृत भाषेखेरीज व्हावयाचे नाहींत, तेव्हां ओजोगुणवृद्ध्यर्थ संस्कृताचें मिश्रण **पं**तांस विशेष करावें लागलें. व त्यापासून ओजोगुणवृद्धिही झाली. असें असतां, हें गीर्वाणमिश्रण कांहीं अर्वाचीन पंडितांच्या दृष्टीनें दोषप्रद झालें हा त्यांचा दृष्टिदोषच समजावयाचा. वस्तुतः **मोरोपंता**ची कविता अथवा प्रबंधरचना वाचीत असतां संस्कृतसमासघटितशब्दसमुदायश्रवणापासून चित्तास अवर्णनीय आनंद होतो. आणि त्या योगें मनाची विस्तीर्णता, उदात्तता व उदारता वाढत जाऊन क्षणभर संसारदु:खाचाही विसर पडतो. असा **पं**ताच्या कवितेचा पाक उतरला आहे असें आम्हांस वाटतें. ज्यापक्षीं सर्वच प्राचीन कवींनीं गीर्वाणशब्दशर्करेचा प्राकृत दुधांत संमिश्रणानें उपयोग केला आहे व **पंतानें** तर तो इतक्या कुशलतेनें केला आहे कीं, त्यापासून गुणवृद्धिच झाली; त्यापक्षीं यासंबंधानें **मोरोपंता**स दूषण देणें अश्लाघ्य होय. आतां **मोरोपंत** प्राचीनांच्या चालीला अनुसरला यामुळेंच त्याच्या संस्कृतमिश्रणास दोष नाहीं, किंवा तें मिश्रणच स्वत: अदोषरूप किंबहुना उलटें गुणसंपन्न आहे, याचा आपण तत्वत: विचार करूं. संस्कृतभाषाभांडारांत अनंत शब्दरत्नें सांठवलीं असून तें भांडार सुखनिरूपद्री झालेलें आहे. त्यांतून पाहिजे तेव्हां सूत्र लावून खणून आणखी नवीं नवीं असंख्य शब्दरत्नें काढितां येतात. ही शक्ति प्राकृत भाषेंतच काय, पण पृथ्वीवरील कोणत्याही भाषेंत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. अशा संस्कृताचा प्राकृताशीं जनकजन्यसंबंध अतिप्रसिद्ध आहे. प्राकृत भाषेंत

मूळचे शब्द फारच थोडे असून, संस्कृतच अतिशय भरलेले आहेत. मुसलमानी अमलांत पारशी, आरबी ह्या भाषांची अतिप्रवृत्ति झाल्यामुळें त्या भाषांतील शब्दही सरासरी संस्कृताइतकेच मराठींत मिश्रित झालेले आढळतात; तरी सत्कवींच्या काव्यांत यावनी शब्द कमी योजिलेले असतात. अशा रीतीनें संस्कृत शब्द हे प्राकृत भाषेची प्रकृतिच बनले आहेत. प्राकृत शब्द मूळचे थोडे असल्यामुळें कारणपरत्वें प्राकृत भाषेस, स्वजननीपासून मदत घ्यावी लागतेच. तशी मदत घेणें गैरवाजवी नसून मदत घेतल्याशिवाय निर्वाहही नाहीं. तेव्हां संस्कृताचें मिश्रण अवश्य असून दोषरूप नाहीं हें सिद्ध आहे. कोणी म्हणेल कीं, भाषा प्राकृत म्हणून लिहावयाची आणि प्राकृत भाषा जाणणाऱ्यांस अगम्य अशी ती संस्कृत करावयाची हा प्रतिज्ञाविरोध नाहीं काय? दुसरें, दुधांत पाणी मिसळून दुग्धांशग्रहणास समर्थ अशा हंसाला मात्र स्वादग्रहणसुगमता ठेवणें आणि इतरांशीं वंचना करणें ही धूर्तता कोठची? अथवा रेशमी वस्त्रास मध्यें मध्यें पशिमन्याचे तुकडे जोडून विचित्र बनविल्यानें कांहीं विशेष शोभा येते काय? शालजोडी, रेशमी वस्त्र अथवा कापसाचें वस्त्र यापेक्षां निरनिराळ्या जातींच्या वस्त्रांचे निरनिराळे तुकडे जोडून केलेली गोदडी अधिक चांगली दिसते काय? याविषयीं **मोरोपंता**च्या कवितेचा बारीक विचार केला म्हणजे वरील आक्षेपाचें सहज निवारण होतें. केवळ दुग्धतुल्य गीर्वाण भाषा आणि पाण्यासारखी प्राकृत भाषा ह्यांच्या मिश्रणानें, दुधाची गोडी व पुष्टि आणि पाण्याची पचनक्षमता ह्या निरनिराळ्या गुणांचा अर्थात् लोप होऊन, रसायनसंयोगानें त्यांत कांहीं अपूर्व निराळेच गुण उत्पन्न झाले. आपली संस्कृत जननी दूध देतां देतां जरठ स्थितीला येऊन पोहोंचली. तिचें दूध अधिक दाट झालें असून त्यास पारठेपणा आल्यामुळें घृतांशही त्यांत अधिक झाला. संस्कृत जननीची संतति तिच्यासारखीच बुद्धिबलानें, भव्य व दृढतम होती यामुळे तिचें दूध त्या संततीस पचत होतें. प्राकृत भाषेची संतति तिच्या दुधाप्रमाणें अल्पबळ, व अल्पकाय असून दिवसानुदिवस ती अशक्त होत चालली आहे. तिला आपल्या मातुश्रीचें नीरतुल्य दुग्ध प्राशन करून पचविण्याचीच योग्यता, तेव्हां तिला संस्कृत जननीचें गुरु दुग्ध बिलकुल पचणार नाही. बरें पचणार नाहीं म्हणून मुळींच देऊं नये म्हटलें तर अशक्त होत चाललेली प्रजा नेहमीं क्षीण होत जाऊन शेवटीं गाढतम अंधकारांत पडून राहील. यास्तव मोठ्या डाक्तराप्रमाणें विचार करून **पंतानें** ही युक्ति काढिली कीं, संस्कृत गुरु दुग्ध आणि प्राकृत पाणी ह्यांचें मिश्रण करून तें प्रजेस देण्याची तजवीज करावी. म्हणजे त्याचें सेवन करून कालांतरानें संस्कृत जननीच्या प्रजेशीं टक्कर मारण्याजोगी प्राकृत प्रजाही तयार होईल. या न्यायानें पाहिलें तर संस्कृतप्राकृताचें मिश्रण सांप्रत कालास उपयोगी आहे. प्राकृत भाषेंत मूळचे शब्द फार थोडे आहेत. त्यांत संस्कृत शब्दांचें मिश्रण न करितां मूळच्याच शब्दांवर काम चालवावें असा हट्ट केला, आणि संस्कृतांतील शब्द प्राकृतांत घेतलेच नाहींत तर, अपूर्ण भाषेमुळें प्रौढ ग्रंथांचा या भाषेंत संग्रह होणार नाहीं. अर्थात् या भाषेंतील लोकांस प्रादेशमात्र जागेंत बसवून ठेविल्यासारखें फल होईल. तेव्हां **मोरोपंतानें** प्राकृत ग्रंथांत संस्कृताचें अतिशय मिश्रण केलें हा प्राकृत लोकांवर मोठाच उपकार केला असें म्हटलें पाहिजे. इतर प्राकृत कवींच्या काव्यांतही संस्कृताचें मिश्रण आहे परंतु तें स्वाभाविक रीतीनें झालें आहे. **मोरोपंता**सारखें हेतुपुरःसर केलेलें तें नाहीं. कोणत्याही गोष्टीची सुधारणा हे-

**'[१]प्रभुस्तुति न ठाउकी, परि तिच्या [२]महाकामुका**
**[३]मला [४]कृपण मारितो बहु [५]सकाम [६]हाका मुका'.।**

---

तुपुरःसर केल्यानें चांगली होते व कर्त्ताही तद्यशास पात्र होतो. हें मनांत आणून, प्राकृतांत संस्कृताचें मिश्रण करून भाषेस प्रौढी, विस्तीर्णता व गांभीर्य आणिल्याबद्दल महाराष्ट्र जनांनीं **मोरोपंता**चेच आभार मानिले पाहिजेत." [हंसकृत मोरोपंतावरील निबंध–पृ० ८५-८६.] हा **हं**सांच्या निबंधांतील उतारा बराच लांब झाला आहे, परंतु मूळ पुस्तक बरेंच दुर्मिळ असल्यामुळें वाचकांच्या सोईसाठीं दिला आहे. मूळ निबंध ज्यांना मिळेल त्यांनीं त्याचें अवश्य वाचन व मनन करावें.

१. [या मोरोपंताला] प्रभुस्तुति ठाउकी न; परि (परंतु) तिच्या महाकामुका मला (देवाला) [हा] कृपण, मुका [आणि] बहु सकाम [होत्साता] हाका मारितो असें [तुम्ही] मनिं म्हणा. लेंकरा [चांगलें भाषण] प्रथम (प्रथमतःच) नीट कसें ये? [म्हणून] स्वयें सुपथिं लावियेलें, [आणि] हळूहळू पटु करा–असा अर्थान्वय करावा. मागल्या २३ व्या केकेंत मला साधूकडे न विकतां आपल्या घरींच चाकरीस ठेवा असें कवीनें म्हटलें. त्यावर मी तुमच्या घरचीं कामें करीन, पण तुमची स्तुति मला करतां येणार नाहीं, अशी पड घेऊन, ती कशी करावी हें तुम्ही मला शिकवा, अशा अभिप्रायानें कवि भगवंताची प्रार्थना करितात. प्रभुस्तुति–स्वामीची प्रशंसा. देवा! मी तुमच्याजवळ चाकर म्हणून राहूं इच्छितों पण माझे स्वामी जे आपण त्या आपली स्तुति कशी करावी हें मला मुळींच ठाऊक नाहीं. २. स्तुतीची मोठी इच्छा करणाऱ्या देवाला. येथें 'तिच्या महाकामुका!' हें भगवंताचें संबोधन मानिलें तरी चालेल. स्तुतिमहाकामुकत्व हा धर्म येथें भगवंतावर कवि स्थापित आहेत. ज्याला स्तुतीची फारच इच्छा आहे अशा स्तुतिप्रिय देवा!–असा अर्थ जाणावा. ३. देवाला. ४. गरीब, स्तुति करण्यास असमर्थ. ५. फार इच्छा आहे असा, फार मागणारा असा. ६. किंकाळया फोडतो. मराठी भाषणसंप्रदायाची तऱ्हाः–'हाका मारणें', 'वरचेवर झेलणें ,' 'उभाउभी भेटणें,' 'पाण्यांत डिखळ विरणें,' 'कडकडून पोटभर भेटणें,' 'मुळमुळ रडणें,' 'जन्मतांच नख लावणें,' 'गाल फुगविणें' इत्यादि थेट मराठी भाषणप्रकार पंताच्या काव्यांत रगड आढळतात. देशादेशावरील चमत्कारिक शब्द, ह्मणी, शुद्ध, सरळ मराठी भाषणसंप्रदायाचे मासले यांना पंताच्या कवितेंत मुबलक जागा मिळाल्यामुळें ती फार मनोहर व अभियुक्त झाली आहे. भाषाशास्त्रज्ञांनीं व शुद्ध, सरळ प्रौढ, ऐटदार, आवेशयुक्त व हृदयंगम अशी भाषा शिकावयास इच्छिणाऱ्या जिज्ञासूंनीं मोरोपंतांच्या काव्याचा मार्मिकपणें अभ्यास करावा. याविषयीं सविस्तरविवेचन प्रस्तावनेंत पाहावें. 'आपल्या प्रभूची स्तुति कशी करावी हें ठाऊक नसतां मी जो भगवान् स्तुतिप्रिय त्या मला हा कृपण–ह्मणजे स्तुति करण्यास शक्तिहीन, त्यांत आणखी मुका–शब्दाचा नीट वर्णोच्चारही ज्याच्यानें स्पष्ट करितां येत नाहीं, असा असून सकाम–म्हणजे ती माझी स्तुति करण्याची मोठी हौस मनांत धरून, उगीच हाका मारितो–म्हणजे मुका असल्यानें उगीच किंकाळया फोडितो, (य० पां०–पृ० १२०) अथवा सकाम म्हणजे सहेतुक स्तुति करतो, याच्या ठायीं नि-

म्हणा मनि असें, कसें प्रथम नीट ये लेंकरा ?

हळूहळू पटु स्वयें सुपथिं लावियेलें करा. ॥ २८

---

**ष्काम भक्ति नाहीं असा हा हाका मारितो. ह्या श्लोकाच्या पूर्वार्धांत भगवंताचें भाषण कवीनें घातलें आहे.**

**१. म्हणाल. असें तुम्ही आपल्या मनांत म्हणाल काय? अशी शंका तुमच्या हृदयांत उद्भवेल काय? २. अशी शंका न घ्यावी पण जर घेतलीच तर त्याचें समाधान पुढीलप्रमाणें कवि करतात. लेंकरा प्रथम नीट कसें ये?--मला लहान मुलाला शिकवल्यासवरल्याशिवाय पहिल्यानेंच कोणतेंही काम नीट (विशेषत चांगलें भाषण) कसें बरें करतां येईल? अर्थात येणार नाहीं-असें उत्तर. येथें प्रश्नालंकार झाला. ३. चतुर, शहाणें, हुशार. ४. चांगल्या मार्गांत, 'स्वयें (स्वतः) सुपथिं (चांगल्या मार्गाला) लावियेलें (लावलेलें) [लेंकरूं] हळूहळु (हलके हलके) पटु (चतुर, शहाणें) करा-असा अन्वय. बाप आपल्या मुलाला ज्याप्रमाणें स्वतः सन्मार्गास लावून शहाणें करितो त्याप्रमाणें तुमची स्तुति करण्यास तुम्हीच मला शिकवा असा कविहृद्गतार्थ जाणावा.** या श्लोकाविषयीं आमच्या संस्कृत वाचकांनीं पंतांच्या 'पांडुरंगस्तोत्रां'तील श्लोक वाचून पहावा:--शिक्षे रंके मयि त्वं प्रभुवर! कुरुषे कवनाभ्यु विनोदं किं वक्तायं कविरिमामिति कुतुकितया श्रोतुकामो वचो मे, । नो चेदुच्चैः कृपालुः करणमियद णुतोऽप्यूनमद्यापि कार्यं कर्तुं कर्ता विलंबं न ॥ गिरिधर ! ते स्याद्गुणस्यातिभारः ॥ १४ ॥ [पांडुरंगस्तोत्र-चतुर्थ-पृ० १५३.] ५. तुकोबांनीही 'हे देवा! तुमची स्तुति कशी करावी हें तुम्हीच मला शिकवा' अशी भगवंताची प्रार्थना केली आहे:- कैसें करूं ध्यान कैसा पाहूं तुज । वर्म दावीं मज याचकासी ॥ १ ॥ कैसी भक्ती करूं सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥ २ ॥ कैसी कीर्ति वाणूं कैसा लक्षा आणूं । जाणूं हा कवण कैसा तुज ॥ ३ ॥ कैसा गाऊं गीतीं कैसा ध्याऊं चित्तीं । कैशी स्थिति मती दावीं मज ॥ ४ ॥ तुका म्हणे जैसें दास केलें देवा । तैसें हें अनुभवा आणीं मज ॥ ५ ॥ [तुकाराम-अभंग ३३०.] **या केकेंत पित्यानें मुलाला नीट येईल असें शिकविणें इत्यादि वाक्यार्थ अप्रस्तुत आहे. देवानें पंतांस शिकविणें हा अर्थ प्रस्तुत आहे. पिता हें उपमान आणि देव हें उपमेय, असें असतां अप्रस्तुत वाक्यार्थाचें वर्णन प्रस्तुतांत केलें आहे म्हणून ललित नामक अलंकार होय. खरोखर जो वृत्तांत सांगावयाचा तो न सांगतां दुसरा एखादा त्याजसारखा अप्रस्तुत वृत्तांत सांगणें, याला 'ललित' असें ह्मणतात. 'वर्णनीय जो प्रकृत अर्थ त्याचें वर्णन न करितां त्याचा प्रतिबिंबरूप जो अप्रकृत अर्थ त्याचें वर्णन करणें, ह्यास 'ललितालंकार' म्हणतात.** 'जसें पाणी निघून गेल्यावर हा पूल बांधण्यास इच्छितो.' ह्या उदाहरणांत योग्य समयीं उद्योग न करितां तो मग करणें ह्या प्रकृत वर्णनीय अर्थाचें वर्णन न करतां त्याचा प्रतिबिंबभूत जो 'पाणी निघून गेल्यावर पूल बांधणें' हा अर्थ ह्याचेंच वर्णन केलें, म्हणून हा 'ललितालंकार झाला.' (लेलेकृत साहित्यशास्त्र-पृ० ७४.) याचें संस्कृत लक्षण:-प्रस्तुतें वर्ण्यमानार्थप्रतिबिंबस्य चेद्यदि । वृत्तांतस्याप्रस्तुतस्य वर्णनं **ललितं** मतम् ॥ का तादृशी कुलवधूः क चार्य

जनीं तरि असें असे, शिशुहि जे मुखें वर्ण वी,
पिता पिउनि ते भुले, मधुरता सुखें वर्णवी ।

दुर्भगः पुमान् । पंगुः शृंगं समुत्तुंगं मेरोरारोढुमिच्छति ॥ १७० ॥ [मंदारमरंदचंपू–पृ० १४२.] **'जरि वर्णनीय अर्थीं वर्ण्यप्रतिबिंब अर्थ कवि वदती । तें ललित; गेलिया जळ बांधाया सेतु इच्छिते सुदती'** ॥ (अ० वि०). याचीं अन्य उदाहरणें:–(१) कोणीं हें तुज कथिलें चक्षु-विषनागपुच्छ तुडवाया । दाटुनि कां करिसी गा! रामाशीं वैर, वंश बुडवाया? ॥ [मोरोपंत–वनपर्व–अ० ११ गी० १३], (२) अवलंबिला तव सुतें भीष्माब्धि तरावयासि हा प्लव गा! । मारुतिभंग घडेल प्रचुर चणकचर्वणोद्धता प्लवगा. ॥ [मोरोपंत–उद्योगपर्व–अ० ४ गी० ३७ पृ० ५७], (३) कृष्ण म्हणे, 'राया! तूं उचित अनुद्धत न उद्धत क्रतुला, । योग्य न दुग्धस्थानीं योजाया प्रियहि शुद्ध तक्र तुला. ॥ [सभापर्व–अ० २ गी० ९], (४) कोठें वंश रवीचा, कोठें मति अल्प जाण ती माझी । मोहें उतरूं पाहें होडींत अपार सागरामाजी' ॥ (रघुवंश–प्रस्तावना–भाषांतर.)

१. **जनीं तरि असें असे (आहे) [कीं] शिशुहि मुखें जे वर्ण वी, ते (वर्ण) पिउनि पिता भुले [आणि] गुरूक्तहि प्रायशा कटु [असें शिशु] म्हणे [आणि तें गुरूक्त त्या शिशूच्या] जरि मना न ये [तरी त्या वर्णांची] मधुरता [लोकांकडूनही] सुखें वर्णवी (वर्णवितो) [अहो!] दयानिधि! तुम्हांपुढें अशा जनकथा कायशा [सांगाव्या?]– असा अन्वय. हे दयाघना! मी जी आपली वेडीवांकडी स्तुति करीन तिचें तुम्ही कौतुक मानून घ्या, अशा अर्थानें लोकव्यवहार दाखवीत कवि म्हणतात. जनीं=लोकांत.** २. **लहान मूल.** ३. **शब्द.** ४. **वितो, उच्चारितो, तोंडाबाहेर काढितो.** 'विणें' या धातूचा पंतांच्या काव्यांत जो प्रयोग आढळतो तो ध्यानांत ठेवण्यासारखा आहे:–(१) विराटपर्व–अ० ५ गी० २२; (२) विराट–अ० ५ गी० २७; (३) विराट–अ० ३ गी० ५१; (४) विराट–अ० २ गी० ६९ इत्यादि स्थळें पहा. **लोकांत तर अशी रीत आहे कीं लहान मूलही जे शब्द तोंडावाटे काढतें त्यांतें श्रवण करून बाप मोहित होतो.** ५. **बाप. 'पा' धातूपासून पितृ (पिता) शब्द निष्पन्न झाला. पालन करितो तो पिता, पाति (रक्षति) इति पिता.** 'रक्षणाच्च पिता नृणाम्' अथवा 'स पिता यस्तु पोषकः.' रक्षणादि कारणांनीं जे पितृत्व पावतात त्यांचा निर्देश भारतांत आणि इतर ग्रथांत आढळतो तो असाः–'शरीरकृत् प्राणदाता यस्य चान्नानि भुंजते । क्रमेणैते त्रयोऽप्युक्ताः पितरो धर्मशासने. ॥ १ ॥ कन्यादातान्नदाता च जन्मदाताभयप्रदः । जन्मदो मंत्रदो ज्येष्ठभ्राता च पितरः स्मृताः ॥' 'जनकश्चोपनेता च यश्च विद्यां प्रयच्छति । अन्नदाता भयत्राता पंचैते पितरः स्मृताः ॥.' ६. **प्राशन करून. ते (वर्ण) पिउनि=ते शब्द सादर श्रवण करून. वर्ण पिणें=शब्द आदरपूर्वक ऐकणें. पिता वर्ण पितो–या वाक्यांत वर्ण हें प्रस्तुत आणि त्याचें प्रतिद्वंद्वि अमृत हें अप्रस्तुत होय. वर्ण ऐकावयाचे आणि अमृत प्राशावयाचें असें असतां, पानयोग्यत्व वर्णांवर आणिलें.** अशा ठिकाणीं इंग्रेजींत *Transferred epithet* हा अलंकार समजतात. **वर्ण व अमृत यांचा अभेद मानून •अप्रस्तुताच्या धर्माचा आरोप**

मना जरि नये, गुरूक्तहि[1] म्हणे कटु प्रायशा;
दैयानिधि[2]! तुम्हांपुढें जनकथा[3] अशा कायशा[4]? ॥ २६

**प्रस्तुतावर केला आहे, म्हणून हा धर्मरूपक** किंवा **ललित अलंकार समजावा.** अप्रस्तुत जें अमृत त्याचें वर्णन प्रस्तुत जे वर्ण त्यांशीं येथें केलें आहे. ७. **भुलतो, मोहित होतो, कौतुक मानितो. ८. वर्णवितो. लोकांत अशी रीत आहे कीं लहान मुलानें कसलेही वेडेवांकडे शब्द तोंडांतून काढले, तरी त्या मुलाच्या बापाला ते ऐकून फार आनंद होतो आणि तो त्याचें मोठे कौतुक मानतो. मुलाच्या बोबड्या शब्दांचें बाप तर स्वतः कौतुक करितोच पण लोकांकडूनही करवितो.** स्वापत्याच्या बोबड्या शब्दांनीं पित्याला जें सुख होतें त्या सुखाच्या योगानें त्या शब्दांची मधुरता तो स्वतः स्तवितो आणि लोकांकडूनही स्तववितो. हा मुलगा मोठा शहाणा, भाग्यशाली निपजेल अशी स्तुति शेजाऱ्यापाजाऱ्यांकरवीं करवितो. **'वर्णवी' हें प्रयोजक क्रियापद जाणावें. कवीचा अभिप्राय असा कीं मी आपली जी वेडीवांकडी स्तुति करीन ती आपण गोड मानून घ्या.** भगवंताला आईबापांचे ठिकाणीं मानून त्यानें आपली वेडीवांकडी स्तुति मान्य करून घ्यावी म्हणून अनेक कवींनीं आणि पंतांनींही आपल्या काव्यांत अनेक ठिकाणीं प्रार्थना केली आहे:—(१) जैसा स्वभाव मायबापांचा। अपत्य बोले जरी बोबडी वाचा । तरी अधिक तयांचा । संतोष आथी. ॥ [ज्ञानेश्वरी—अ० १ ओ० ६४], (२) मज हांसतिल लोक । परि मीं गाईन निःशंक ॥ माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें गा! विठ्ठला! ॥ [तुकाराम—अभंग १०५०], (३) वेडेंवांकडें गाईन । परि मी तुझा म्हणवीन. ॥ [तुकाराम—अभंग २०१५], (४) जरि बोबडें, पित्याचें मोहावें मन तथापि नोकानें, । प्रभु साळ्याभोळ्यांची बहु वात्सल्यें कथा पितो कानें. ॥ [पांडुरंगदंडक ८, पृ० १३२], (५) जरि अप्रगल्भ केवळ, सादर असतो तथापि कवि तोकीं, [पांडुरंगदंडक ६, पृ० १३२], (६) निजबाळवचन म्हणती पितृकर्णा न जेंवि नायकायाचे [गजाननस्तव ४, पृ० १७२].

१ **मुलाच्या बोलण्याला बाप इतका भुलतो, पण बापाचें बोलणें त्याला कोठें आवडतें? 'गुरूक्तहि (बापाचें हितकारकही बोलणें) जरि मुलाच्या मना (मनाला) नये (येत नाहीं) [तरि] [तें] प्रायशा (बहुधा) कटु (कडू) म्हणे (म्हणतो).' बापाचें बोलणें जरि मुलाला कडू वाटलें आणि त्याच्या मनास आलें नाहीं, तरी मुलाचें बोलणें बापाला सदोदित गोडच वाटतें.** 'बापाचें सांगणें, शिकविणें मुलाच्या मनास येत नाहीं, तें कडूसें वाटतें, तरी मुलाचे शब्द ऐकून पिता भुलतो आणि मधुरता वर्णवितो.' [मराठी ज्ञानप्रसारक—वर्ष, सन १८६५, १६ अं० १० पृ० ३१४.] २. **हे दयासागरा! अपरंपार दया ज्याच्या पोटांत भरली आहे अशा भगवंता!** ३. **कवि भगवंताला म्हणतातः—हे करुणानिधे देवा! जी गोष्ट मीं दृष्टांतानें सांगितली तशा लोकांच्या गोष्टी तुमच्या पुढें सांगण्यांत काय अर्थ आहे?** ४. **किती सांगाव्या, कशाला सांगाव्या, तुम्हांला त्या माहीत आहेतच, म्हणून त्या सांगण्याचें प्रयोजन नाहीं—असा अर्थ. 'कायशा' ह्या शब्दाचें यमक जुळावें म्हणून 'प्रायशः' या संस्कृत शब्दाचें 'प्रायशा' असें रूप कवीनें अपभ्रंश करून योजिलें आहे.**

'अतर्क्य महिमा तुझा, गुणहि फार, बा! हे,' विधी
श्रुतिज्ञहि ह्मणे सदा, स्तविल आमुची केंवि धी? ।

१. 'बा! [देवा!] तुझा महिमा अतर्क्य, [आणि तुझे] गुणहि फार.' [असें] श्रुतिज्ञहि विधी सदा म्हणे. [मग] आमुची धी केंवि [तुला] स्तविल? [जरी तुझा यथार्थ स्तव करणें अशक्य आहे] तरी जन (साधुजन) [तुला] यथामति स्तवुनि सन्मती जाहले. तुझिया स्तवार्थ तुझ्या सम कवी कधीं जन्मती?–असा अन्वय. भगवत्स्तव करणें मनुष्याच्या बुद्धीस अशक्य असें दर्शविण्याच्या उद्देशानें कवि म्हणतात. अतर्क्य=तर्क करण्यास अशक्य. तुझा महिमा असा आहे कीं त्याचा विचार करितांना आमची बुद्धि कुंठित होते. ईश्वरमहिमा तर्कांच्याही पलीकडे आहे, तेव्हां तो वाणीनें वर्णन करणें अशक्य. केनोपनिषदांतील पुढील वचनांत वाणी, मन, चक्षु, श्रोत्र, व प्राण यांना स्वविषयग्रहणसामर्थ्य ईश्वरापासून मिळालें असून यांच्या मात्र गति ईश्वराचें अत्यल्प देखील ज्ञान मिळविण्यांत अत्यंत कुंठित होतात हेंच सांगितलें आहे:–'यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते । तदेव ब्रह्म तं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ १ ॥ यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतं । तदेव० २ ॥ यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति । तदेव० ३ ॥ यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदं श्रुतं । तदेव० ४ ॥ यत्प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्राणीयते । तदेव० ५ ॥ २. महिमा, गरिमा, लघिमा, इत्यादि जे इमनिच् प्रत्ययान्त मूळचे संस्कृत शब्द त्यांचा येथें कवींनीं मूळ संस्कृताप्रमाणें पुल्लिंगी प्रयोग केला; परंतु मराठींत क्वचित् हे शब्द स्त्रीलिंगीही मानतात. वामन म्हणतात:–'जो न गाय हरिचे महिमेला, तो असे जितचि या महिं मेला ॥.' महिमा हा शब्द महा (महत्) या विशेषणास इमन् प्रत्यय लागून झाला आहे. हा प्रत्यय भाव किंवा धर्म या अर्थी होतो; जसें–शुक्ल, शुक्लिमन् (पांढरेपणा); पृथु, प्रथिमन् (मोठेपणा); मृदु, म्रदिमन् (मृदुपणा); महत्, महिमन्; गुरु, गरिमन्; इ० ३. गुणहि फार= तुझे गुण अनंत आहेत. तुझे गुण कोणाच्यानेंही मोजवले जाणार नाहींत. 'मतीवीण काय वर्णूं तुझें ध्यान । जेथें पडिलें मौन वेदश्रुतीं ॥' [तुकाराम–अभंग २५४४.] ४. ब्रह्मदेव. ५. वेदवेत्ता (ब्रह्मदेव). कथासंदर्भः—ब्रह्मदेव आपल्या चार मुखांनीं चतुर्वेदांचें नेहमीं पारायण करितो. वेदवेत्ता ब्रह्मदेव देखील भगवंताचा महिमा अवर्ण्य आणि गुण अगण्य असें ह्मणतो. भगवंताच्या महिम्याचें वर्णन वेदांना व वेदवित् ब्रह्मदेव यालाही करवत नाहीं. शंकराचार्यांनींही भगवत्स्तुतींत असेंच म्हटलें आहे:—'यं वर्णयितुं साक्षात् श्रुतिरपि मूकेव मौनमावहति.'=ज्याचें वर्णन करणें अशक्य समजून श्रुति देखील मौन धारण करिते. अर्थः—ज्या प्रभूचें वर्णन करण्यास अध्यात्म विद्येंत अत्यंत निपुण, त्रिमूर्तिपैकीं एक, प्रत्यक्ष भगवंताच्या नाभिकमळापासून जो उत्पन्न झाला असा चतुर्मुखी ब्रह्मदेवही जर समर्थ झाला नाहीं तर मग आमच्या सारख्या अल्पमति, वेदाचें ज्ञान नसणाऱ्या एकमुखी मनुष्यांचा काय पाड? कथासंदर्भः—गोकुळांत भगवंतानें खरोखरच कृष्णरूपानें अवतार घेतला कीं काय म्हणून पहाण्याकरितां एकदा ब्रह्मदेवानें गोकुळांतील

तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती;
स्तवार्थ तुझिया तुझ्या सम कवी कधीं जन्मती? ॥ २७

गाई, वांसरें, गोपाळ चोरून एक वर्षभर सत्यलोकीं नेऊन ठेविलीं. वर्षसमाप्तीनंतर फिरून येऊन पाहातो तों गाई, वत्स, गोपाळ हे सर्व जसेच्या तसेच असून कृष्ण त्यांच्या बरोबर क्रीडा करीत आहे. असें झालें तेव्हां कृष्णानेंच सर्वांचे देह धारण करून सर्व व्यवस्था जेथल्या तेथें ठेविली, अशी ब्रह्मदेवाची खात्री होऊन तो कृष्णाला शरण गेला व त्यानें नेलेल्या सर्व गाई, वत्स, गोपाळ यांस फिरून आणून पोंचविलें. [मोरोपंत–कृष्णविजय–पूर्वार्ध–अ० १२-१४ पृ० ३५-३९.] कृष्णाला शरण जातांनाच 'अतर्क्य महिमा तुझा' म्हणून ब्रह्मदेवानें स्तुति केली. **श्रीमद्भागवतांत** दशमस्कंधाच्या १४ व्या अध्यायांत **ब्रह्मस्तुति** [**वामनपंडितकृत कवितासंग्रह–भाग १–पृ० ३२८-४०४**] नांवाचें एक प्रकरण आहे. त्यावर **वामनानें** श्लोकात्मक टीका केली आहे. यांतील पुढील श्लोकार्थ या संबंधानें वाचण्याजोगे आहेत:–देवाचा महिमा अतर्क्य आहे. (१) 'जो या देवपणीं **अतर्क्य महिमा** जो तर्कवेना कधीं, तेव्हां वर्णवितो अतींद्रिय कसा? बोलेल ऐसें विधी'. ॥ पृ० ३३६,९. 'अस्यापि देव वपुषो मदनुग्रहस्य स्वेच्छामयस्य नतु भूतमयस्य कोऽपि । नेशे महि त्ववसितुं मनसांतरेण साक्षात्तवैव किमुतात्मसुखानुभूतेः ॥' [**श्रीमद्भागवत**–दशमस्कंध–अध्याय १४ श्लोक २]. प्रभूचे गुण अनंत आहेत:–(ब्रह्मदेव म्हणतो)–(२) तूं जो असा त्या तुझिया गुणांला, मोजावया नीलसरोजनीला । होती जगीं सक्त असें न कोणी, अनंत तूझे गुण चक्रपाणी!' ॥ १४६ ॥ (३) 'काळेंकरूनि धरणीरज मोजणारे, होतील मोजितिलही हिमबिंदु सारे । होती समर्थ गणना किरणीं कराया, तूझे न मोजविति सद्गुण देवराया!' ॥ १४७ ॥ 'गुणात्मनस्तेऽपि गुणान्विमातुं हितावतीर्णस्य क ईशिरेऽस्य । कालेन यैर्वा विमिताः सुकल्पैर्भूपांसवः खे मिहिका द्युभासः ॥ ७ ॥ [**श्रीमद्भागवत**–स्कंध १० अ० १४]. Compare:—'Canst thou by searching find out God? Canst thou find out the Almighty unto perfection?' Job. XI. 7. Also Ps XL. 5. "**श्रुतिशब्दाविषयीं** पुढील **विवेचन** मनन करण्याजोगें आहे: जिच्या योगानें धर्म ऐकूं येतो (समजतो) ती श्रुति, असा श्रुति शब्दाचा मूलार्थ आहे. वेदमंत्र म्हणण्याच्या वेळेस पाठकाचे चित्ताची एकाग्रता राहून अर्थानुसंधान राहावें म्हणून पुस्तकावरून पठण करण्याचा निषेध शास्त्रकारांनीं केला आहे. ऐकून म्हणणें यावरून वेदास श्रुति हें नांव पडलें." (व्युत्पत्तिप्रदीप). ६. बुद्धि.

**१. साधुजन, सज्जन, कविजन. २. आपल्या बुद्धीप्रमाणें, यथाबुद्धि. ३. चांगल्या बुद्धीचे. येथें कवीनें भगवत्स्तवनाचें फल सन्मति होणें हें दर्शविलें आहे. भगवंताचें यथार्थ स्तवन करणें केवळ अशक्य समजूनही व्यासवाल्मीकादि कविजन यथाशक्ति परमेश्वराचें स्तवन करून सुबुद्ध झाले. कितीएक साधुजन भगवत्स्तुति करून सन्मति (चांगल्या बुद्धीचे) अशी आख्या पावले, ईश्वरस्तवाच्या योगानें कित्येक साधुजनांची –हे विशाल बुद्धीचे होत–अशी लोकांत प्रसिद्धि झाली. त्यांनीं भगवत्स्तव स्वोद्धाराकरितां केला. यावरून भगवंताचें यथार्थ स्तवन करून त्यास संतुष्ट करण्यास जरी**

**सर्व लोक असमर्थ आहेत, तरी इतरांनीं त्रिविधतापापासून आपली सुटका व्हावी एतदर्थ भगवत्प्रार्थना अवश्य करावी हा फलितार्थ जाणावा.** हाच अर्थ पंतांच्या काव्यांत पुढील स्थळीं आढळतोः–(१) गुरुलघु कविंनीं प्रभुतें नित्य यथामति विशंक वानावें । [भगवद्गीतास्तुति–गीति ८], (२) स्तुति करुनि तुझी तुजला आम्ही अज्ञान काय वा! रिझवूं? गाउनि अमृतगुणातें त्वदयींचे ताप आपुले विझवूं. ॥ [आर्याकेकावली–२६ मो० स्फु० का० पृ० २२१], (३) नाथ! कथंकारं ते महिमानमगाधमिममहो! भ्रमः, । यत्त्वत्तत्वविचारेऽव्याप्यास्ते प्रभुरचंचल भ्रमः ॥ [कृष्णस्तवराज–३३. मोरोपंत–स्फुटकाव्यें–पृ० २३९], (४) आकाशअंत न कळोनिहि अंतरिक्षीं, आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी; । नामप्रतापहि यथामति याच रीती, सीमा न पावति, तथापि मुनींद्र गाती. ॥ ५ ॥ [वामनपंडितकृत कवितासंग्रह–भाग १. नामसुधा–अ० १.] ४. **तुझ्या योग्यतेचे, तुझ्यासारखे. भगवंताच्या गुणांचें यथार्थ वर्णन भगवंताशिवाय इतराच्यानें होणें नाहीं.** असेंच तुकोबानेंही म्हटलें आहेः– 'तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोणी तीहीं त्रिभुवनीं ॥,–[तुकाराम, अभंग ३२५.] पद्य ५. **'सम' या विशेषणानें मागील शब्दाचें सामान्यरूप झालें आहे.** या चरणांत 'प्रभूसारखे थोर प्रभूच' असा अर्थ गर्भित असल्यामुळें यावर **अनन्वय अलंकाराची छाया पडली आहे.** याचें लक्षणः **'एकाचि वस्तुला ती जरि उपमानोपमेयताहि दिसे । ह्मणति अनन्वय तीतें कांतीनें इंदु इंदुसाचि जसें'** ॥ (अ० वि०). **जेव्हां एकाच पदार्थाला उपमानत्व व उपमेयत्व दिलें असतें तेथें अलंकार अनन्वय होतो.** अनन्वय ह्मणजे ज्यांत उपमानोपमेयांत योग्य संबंध नाहीं तो. एका पदार्थाचें दुसऱ्या पदार्थाशीं साम्य करणें योग्य आहे. पण ज्याचें त्याशींच सादृश्य वर्णन करणें हें 'अन्वित' ह्मणजे योग्य नाहीं म्हणून ह्या अलंकारास अनन्वय हें नांव दिलें आहे. याचीं उदाहरणें:—(१)'गगनासि तुल्य गगनचि, सिंधूची होय सिंधुलाची सरी । श्रीरामरावणांचें युद्ध गमे रामरावणांचि परी' ॥ (अ. वि.), (२) असि साधु साधुपतिसीं गांठ पडे ती, जसी अया परिसा । यापरि साचा हाचि प्रेमळ, याच्याचि या जया परिसा (मोरोपंत-उद्योगपर्व), (३) घडे दैवें किंचित् कलुष परिं संतापति मनीं । अशांतें ताराया असति बहुतीर्थें त्रिभुवनीं । जयां प्रायश्चित्तें नसति कुनरां दे गति अशी । समर्था या लोकीं तुजसम अयी! तूंच असशी ॥ (वामनपंडित), (४) श्रीरामरावणसमर होय श्रीरामरावणसमरसा । ते वृष्टि जसे, न करिति तसि शुचि सशकाररावण सम-रसा ॥ (भारती रामायण), (५) झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु, परंतु यासम हा ॥ (विराट (४-७५) ६. **शाहाणे, सुज्ञ लोक.** भगवंताचें यथार्थ स्तवन करण्यास त्याच्याच तोडीचा कवि पाहिजे. हा विचार पंतांच्या पुढील गीतींतही आढळतोः–(१) 'स्वभजनसुमार्ग लावी, प्रभु ने यमभय समस्त विलयातें । दुसरा असेल कोणी जरि कविवर यासम स्तविल यातें, ॥ [चतुर्थस्तोत्ररामायण–गी० ८८ रामायणें–भाग २], (२) 'थोरपण अनंताचें अनंत वर्णील, काय कविहीर?' ईश्वराच्या महिम्याची थोरवी या केकेंत यथार्थ व सुंदर वर्णिली आहे. प्रभूची अत्युच्च पदवी व भक्तांचें क्षुद्रत्व या दोन्ही गोष्टींचें वर्णन जसें असावें तसें आहे. अध्यात्म रामायणांतील एका भक्ताची पुढें दिलेली उक्ति वाचावीः—'मया प्रलपितं किंचित् सर्वज्ञस्य तवाग्रतः क्षंतुमर्हसि देवेश! तवानुग्रहभागहं' (अध्यात्मरामायण उत्तरकांड). **कवीच्या म्हणण्याचा अर्थ हा कीं भगवंताचे गुण अनंत असून ते प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्यानेंही**

निंजस्तुति तुंम्हां रुंचे; स्तविति त्यां वंरें तंर्पितां;
नंमस्कृतिपरां बंरें स्वंधन सर्वही अंर्पितां; ।

यथार्थ वर्णिले जात नाहींत. मग पामर नरानें काय वर्णन करावें? भगवंताची यथार्थ स्तुति करण्यास भगवंताची बुद्धि व शक्ति ज्यांस आहे असे कवि निर्माण झाले पाहिजेत. ते या पृथ्वीवर कधीं होतील ते होवोत पण तोंपर्यंत पापग्रस्त लोकांनीं स्वकल्याणार्थ भगवंताचा यथामति स्तव करून आपली संसारसागरांतून सुटका करून घेणें इष्ट आहे व तसें त्यांनीं अवश्य करावें. या चरणांत सामान्य शब्दांनीं पंतांनीं अर्थगौरव फार सरस दाखविलें आहे. ईश्वराचा महिमा यथार्थ गाणें हें जर श्रुतिज्ञ विधीलाही अशक्य आहे तर अर्थात् आम्हां पामर अल्पमति मानवांना अशक्य आहे हें काय सांगावें? असें वर्णन आहे, म्हणून येथें काव्यार्थापत्ति अलंकार झाला. [मागें केका ५, पृष्ठ १६ टीप ४ पहा.]

१. तुम्हां निजस्तुति रुचे, [जे तुम्हां] स्तविति त्यां वरें तर्पितां; नमस्कृतिपरां बरें सर्वही स्वधन अर्पितां. असा तुमचा स्वभाव याचकां विदित जाहला, [यास्तव आम्ही याचक] जसा तसा स्तव करूं, याच जना फळ कां नव्हे?–असा अन्वय. ह्या केकेंत भगवंताचें स्तुतिप्रियत्व कवि सांगतात. निज+स्तुति=स्वीय+प्रशंसा=आपली स्तुति. २. 'तुम्हां' ही कर्तृपदार्थक चतुर्थी समजावी. 'रुचे' हें क्रियापद सकर्मक असतें तर हा चतुर्थ्यंत शब्द क्रियापदाचा कर्ता झाला असता. [प्रौढबोध व्याकरण कलम ५४७.] ३. आवडते. 'रुचे' हें रूप 'शुद्धभूतकाळीं' किंवा 'रीतिभूतकाळीं' ही कवितेंत योजितात. ४. वरानें, वर देऊन. 'वरें' ही कल्याणार्थी तृतीया होय. ५. तृप्त करितां, तुम्हांला स्तुति आवडत असल्यामुळें जे कोणी तुमची स्तुति करतात त्यांना तुम्ही वर देऊन संतुष्ट करितां. ६. नमस्कारतत्परांस, अनन्यभावानें व सप्रेमांतःकरणानें जे तुम्हांला नुसता नमस्कार करितात त्यांस. 'नमन' हें नवविधाभक्तींपैकीं एक साधन होय. श्रीमद्भागवत एकादशस्कंधांत नवविधा भक्तीचें माहात्म्य फार उत्कृष्ट वर्णिलें आहे. एकनाथ स्वामींनीं तर आपल्या इतर वर्णनाप्रमाणें नवविधाभक्तिमाहात्म्य वर्णन करण्यांत मूळ भागवतावर कडी केली आहे. ज्या कोणाला भक्तिरसाचा सिंधू अलोट नादानें गंभीर गर्जना करित धांवताना पाहाणें असेल त्यानें एकनाथी भागवताचें अवश्य वाचन व मनन करावें. नवविधाभक्ति ह्या होत:– 'श्रवणं, कीर्तनं, विष्णोः स्मरणं, पादसेवनं, अर्चनं, वंदनं, दास्यं, सख्यं, आत्मनिवेदनं' (भागवत). प्रभुनमनस्मरणाचें फळ दुसऱ्या एका ठिकाणीं पंतांनीं पुढीलप्रमाणें वर्णिलें आहे. 'प्रभुनमनस्मरण पुनर्वसु पुष्यचि सर्वकार्यसिद्धिकर ।' [रामायणें–भाग २ रा–द्वितीयस्तोत्ररामायण–गी० ४३, पृ० १२.] नमनाचे प्रकार एकंदर पंधरा आहेत. '१ दंडवत, २ रामराम, ३ मुजरा, ४ सलाम, ५ कुरनिसात, ६ कुरनिस, ७ अभिवंदन ८ आदेश, ९ जयगोपाळ, १० जोहार, ११ आशीर्वाद, १२ जयसीताराम, १३ शिरसाष्टांग, १४ नमस्कार, १५ साष्टांगप्रणाम.' [बाबापदमनजीकृत शब्दरत्नावली.] ७. आत्मधन, चारी मुक्ति. वरें हें स्वधनाचें विशेषण असल्यामुळें 'वरें स्वधन' म्हणजे मोक्ष असा अर्थ घ्यावा. ८. देतां.

स्वभाव तुमचा [1]असा विदि[2]त जाहला [3]याचकां;
करूं स्तव [4]जैसा तसा; फळ [5]नव्हे जना [6]याच कां; ॥ २८
'[7]तुम्ही [8]परम चांगले, बहु [9]समर्थ, [10]दाते; [11]असें

---

**कार काय सांगावें, जे कोणी तुम्हांला नमस्कार मात्र करतात त्यांस आपलें सकल धन देऊन टाकतां. तुमची स्तुति करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें जे कोणी तुम्हांला सप्रेमांतःकरणानें नमस्कार मात्र करतात त्यांसही तुम्ही मुक्त करतां**—असा येथें 'नमस्कृतिपरां' या पदानें ध्वन्यर्थ सुचविला आहे. नमस्काराची तर गोष्ट राहो, नुसती प्रभूची मनांत आठवण केल्यानेंही कार्य होतें. पंत ह्मणतात:—'नलगे नमनें ध्यावें आठा अंगांत करुनि आठवण; । उद्धरिसी दीनांतें देवा! करितां मनांत आठवण ॥' (विश्वेशस्तुति० ७४).

१. **सप्रेमांतःकरणानें नुसता नमस्कार करणाऱ्याला तुम्ही आपलें सर्वस्व देतां असा तुमचा स्वभाव.** २. **माहीत, ठाऊक.** ३. **तुमच्यापाशीं याचना करणाऱ्या आमच्यासारख्या सेवकांस.** ४. **जसा येईल तसा, वेडावांकडा.** ५. **न होय=होत नाहीं किंवा होणार नाहीं.** ६. **कवि आपणाकडे बोट दाखवून ह्मणतात,** 'वेडेंवांकुडें गाईन । परि मी तुझा म्हणवीन ॥' या तुकोबोक्तीप्रमाणें भगवंताची वेडीवांकुडी स्तुति करणाऱ्याला जर मोक्षप्राप्ति होते, तर मग मलाच कां इष्टार्थप्राप्ति होणार नाहीं? **स्तवाचें फळ इतरांप्रमाणें या मला (मोरोपंताला) कां मिळणार नाहीं? अर्थात इतर व्यासशुकादिक याचकांप्रमाणें मलाही फळप्राप्ति अवश्य होईल असें तात्पर्य. येथें प्रथम व द्वितीय चरणांत परिवृत्ति नामक अलंकार झाला आहे.** [मागें केका १५, टीप २ पृ० ४६ पहा.] येथें घेण्याच्या वस्तूपेक्षां देण्याची वस्तु अधिक आहे म्हणून हें **अधिकपरिवृत्ति** नामक अलंकाराचें उदाहरण जाणावें. तसेंच:—(१) 'स्नानीं नरतनु घेउनि, दे दिव्याकृति सुरापगा याला' (स्वर्गारोहणपर्व—मोरोपंत). प्रथम चरणांत देवानें घेण्याची वस्तु स्तुति आणि देण्याची वस्तु तृप्तिप्रद वर आहे. तसेंच द्वितीय चरणांत नमस्कार आणि सर्व स्वधन हीं गृहणीय आणि देय आहेत.

७. **'तुम्ही परम चांगले, बहु समर्थ, दाते [आहां], मी (कवि—मोरोपंत) सुदीन जन असें, [यास्तव] तुम्हां आजि शरण आलों.' असें पुन्हाहि [तुम्हांला] कथितों, यास्तव हें [माझें भाषण] [हे! देवा!] बरें श्रवण करा,[हे] सकललोकराया! [आपुल्या] समक्ष अपुला स्तव किति?—असा अन्वय. मागल्या केकेंत ह्मटल्याप्रमाणें ह्यांत कवि यथाशक्ति भगवंताचा स्तव करितात.** ८. **अत्यंत चांगले, अखंडितश्रीसद्गुणमंडित, सकलगुणालंकृत.** ९. **सर्वशक्तिमान्** (आहां). **अंगीं नुसतें दातृत्व असून उपयोगीं नाहीं, देण्याचें सामर्थ्यही पाहिजे. या दृष्टीनें 'समर्थ' हें पद अत्यंत समर्पक होय. बरें, दातृत्व आणि सामर्थ्य हे दोन्ही गुण असले म्हणजे कार्य झालें असें होत नाहीं तर ज्याला दान द्यावयाचें आहे त्याच्या अंगीं पात्रता असली पाहिजे. तसेंच त्याच्या ठिकाणीं कृतार्थ होण्याची इच्छाही पण पाहिजे. ह्या सर्व गोष्टींचा योग प्रस्तुत प्रसंगीं चांगला जुळून आला आहे.** या केकेचें प्रथमार्ध हृदयंगम झालें आहे. १०. **स्वभक्तमनोरथ परिपूर्ण करणारे, याचकांची इच्छा सफल करणारे.** ११. **आहें.**

सुदीन[1] जन मी, तुम्हा शरण आजि[2] आलों.' असें[3]।
पुन्हाहि[4] कथितों[5], बरें श्रवण हें करा यास्तव[6];
समक्ष[7] किति आपुला सकललोकराया[8]! स्तव? ॥ २९
किती[9] श्रवण झांकिती प्रभुहि; काय ते पोळती?

१. अत्यंतदीन, अति रंक--दयापात्र. २. आज. मी तुम्हांला शरण आलों आहें. देवा! तुम्ही अत्यंत समर्थ आणि वदान्यवर्य आहां व मी अत्यंत दीन असून आपणास शरण आलों आहें. तेव्हां मज शरणागत दीनाची उपेक्षा न करतां मजवर कृपा करा. आपल्यासारख्या दात्याची आणि मजसारख्या दीन रंकाची फार दिवसांनीं गांठ पडली आहे. तेव्हां ही उत्तम संधि वायां न दवडितां माझें दैन्य नाहींसें केल्याचें श्रेय जोडा, माझें पापरूप दैन्य आपण नाहींसें न केल्यास आपल्या वदान्यतेला कमीपणा येईल--असा अभिप्रेतार्थ. ३. अशा रीतीनें. ४. पुन्हा एकवार. याच्या पूर्वींच कवीनें मी आपणास शरण आलों आहें, माझा तुम्हीं उद्धार केला पाहिजे अशी विनंति केली होती, म्हणून येथें 'पुन्हाहि कथितों' असें म्हटलें आहे. येथें 'पुन्हाहि' या शब्दानें कवीनें स्वोद्धाराविषयींची आतुरता प्रकट केली आहे. ५. 'म्हणतों' असाही पाठभेद आहे. सांगतों, निवेदन करितों. फिरून एकवार आपली प्रार्थना करितों. ६. म्हणून, याकरितां. मीं आपली स्थिति एकवार आधींच कळविली, मी दीन आपणास शरण आलों आहें हें जर आपण ऐकिलें नसेल तर तें पुनः सांगतों, यास्तव आतां तरी हें भाषण चांगलें लक्ष्य लावून ऐका. ७. समोर. 'सकललोकराया! ब्रह्मांडनायका! त्रैलोक्याधीशा! समक्ष (आपल्या समोर, आपल्या तोंडावर, आपुला (आपला) स्तव (स्तुति, प्रार्थना) किति (किती करावा? झाला तेवढा पुरे).' ८. सकल (समग्र) लोकांच्या (भुवनांच्या) राया! राजा! (स्वामी); त्रयोदश भुवनांच्या स्वामी! ब्रह्मांडनायकाची मीं स्तुति केली, यापुढें जास्त स्तुति करण्यास केवळ असमर्थ आहें म्हणून मीं केलेल्या स्तुतीनेंच आपण संतुष्ट व्हा. 'सकललोकराया!' हें पद फार खुबीनें योजिलें आहे. म्हणून येथें परिकरांकुर अलंकार झाला. पृष्ठ ११, टीप ४ पहा. मजसारख्या हीनदीनानें सकलैश्वर्यसंपन्न ब्रह्मांडनायक अशा आपणापुढें आपला स्तव किती करावा बरें? केला इतका पुरे झाला असें मला वाटतें. 'सकललोकराया!' या सामासिक पदासारखीं 'वीरराय' 'साधुराय' 'कविराय' अशीं पदें पंतांच्या काव्यांत आढळतात. यांत 'राज' याचें 'राय' असें रूपांतर झालें आहे हें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. ९. किती प्रभुहि श्रवण झांकिती! ते पोळती काय? [ज्यांस स्तुति आवडत नाहीं] ते कोण [असें] जरि पुसाल [तर सांगतों, ऐका]. ते तुझ्या पदरजीं लोळती. तुजचि स्तवन बरें सोसवे! [हे] हितकरा! दयासागरा! कृत्तिवासा गरा न पी, तरि कसें घडे?--असा अन्वय. कित्येक "सामान्य ज्ञानी, माझें महत्व यत्किंचित् जाणणारे जे पुरुष असतात, त्यांसही प्रशंसा आवडत नाहीं, मग मी एवढा ब्रह्मांडनायक स्वस्तु-

तिप्रिय म्हणून आरंभीं विधान करून माझा स्तव करण्यास प्रवृत्त झालास, हें कसें! अशी भगवदाशंका मनांत आणून तिचें निवारण पुढील दहा केकेंत करीत होत्साते प्रथम सामान्यतः स्तवनाचें विगर्हितत्व कवि" प्रतिपादितात. (य० पां०-पृ० १३२.) '
१०. स्तुतीच्या दुःसहत्वामुळें कानावर हात ठेवितात. ११. समर्थ लोक. प्रभु=प्रभवतीति प्रभुः, निग्रहानुग्रहसमर्थ. स्तुतीस योग्य असे सत्पुरुष देखील त्यांची स्तुति केली असतां 'विष्णवे नमः' म्हणून कानावर हात ठेवितात; स्तुति आपणास आवडत नाहीं असें दर्शवितात. १२. पोळतात काय? स्वस्तवन ऐकतांच कानावर हात ठेवतात याचें कारण त्यामुळें त्यांना पोळल्याप्रमाणें जणूं दुःसह वेदना होतात काय? कोणी म्हणेल जणूं काय ते भाजतात. श्रवण जणूं काय पोळती यांत उत्प्रेक्षा अलंकार समजला तरी चालेल. येथें एखाद्याचें स्तवन ऐकून कान पोळत नाहींत-असें असतां, ते जणूं काय पोळतात असें मानिलें आहे. उत्प्रेक्षेचें लक्षण असें:-'अन्यथैव स्थिता वृत्तिश्चेतनस्येतरस्य वा। अन्यथोत्प्रेक्ष्यते यत्र तामुत्प्रेक्षां विदुर्यथा. ॥' [दंडिकृत काव्यादर्श-३-२२१ पृ० २१४]. 'एकावरि इतराचीं सादृश्यें कल्पना सुकवि करिती। म्हणती तीस विचक्षण उत्प्रेक्षा षट्प्रकार ती धरिती ॥ १ ॥ कीं वस्तु, हेतु, फल या रूपांनीं त्रिविधता तिला घडते। त्यांत प्रथमा उक्तानुक्त पदार्था अशी द्विधा होते ॥ २ ॥ हेतु फलोत्प्रेक्षा त्या सिद्धासिद्धाश्रया अशा द्विविध। यापरि मिळोनि सकळा उत्प्रेक्षा वर्णिती सहाच बुध ॥३॥ स्वरूपोत्प्रेक्षा-उक्तपदार्था-'अस्तमयीं तम ये जें त्यावरि तर्कोक्ति होत बाकींच्या। वाटे विरहाग्नीचा मज धूमसमूह चक्रवाकींच्या' ॥ (१). अनुक्तपदार्था-'हें निबिड तिमिर जाणों सर्वांगा लिंपितेंच कीं काय। अजि काय गगन सांबुद कज्जलवृष्टीच करितसे हाय'॥ (२). हेतूत्प्रेक्षा-सिद्धाश्रया व असिद्धाश्रया-'आरक्त तुझे मृदुपद हे सुंदरि सत्य भूमिविन्यासें। त्वन्मुख कांतीच्छेनें कमळाशीं विधु विरोध करि भासे' ॥ (३).-फलोत्प्रेक्षा-सिद्धाश्रया-'पीनकुचे! सुकृशोदरि! कुचभार धरावयासि नियमानें। कटि बांधलीस वळकट काय कथीं प्रगट कनकदामानें'॥ (४). असिद्धाश्रया-'जें सर्व काळहि जलीं वास करी विमळ कमळ सुंदरि! तें। न्हाया त्वच्चरणाशीं ऐक्य गमे प्रायशा तपचि करितें'॥ (५).-(अ. वि.) अप्रकृताच्या धर्माच्या आरोपाची कल्पना अनिश्चितपणें प्रकृतावर बसविली म्हणजे उत्प्रेक्षालंकार होतो. उत्प्रेक्षालंकाराचा तपशील:-ही कल्पना वस्तु किंवा स्वरूप, हेतु (कारण) आणि फल या तिहींच्या ऐक्याच्या आश्रयानें होते म्हणून उत्प्रेक्षा तीन प्रकारची होय. त्यांत कांहींएक पदार्थास दुसऱ्या पदार्थाच्या एकत्वाची कल्पना केली तर स्वरूपोत्प्रेक्षा किंवा वस्तूत्प्रेक्षा होते. तसेंच एखादा पदार्थ कोणत्या कार्यास कारण झाला नसून कारणत्वाची कल्पना केली म्हणजे ती हेतूत्प्रेक्षा. आणि एखादी वस्तु कोणाचें फल नसून त्यावर फलत्वाची कल्पना बसविली म्हणजे ती फलोत्प्रेक्षा होते. स्वरूपोत्प्रेक्षेंत उक्तपदार्थ म्हणजे वर्णनीय पदार्थ सांगितला असला तर ती उक्तपदार्था स्वरूपोत्प्रेक्षा होते. वर्णनीय पदार्थ सांगितला नसला म्हणजे अनुक्तपदार्था स्वरूपोत्प्रेक्षा. हेतूत्प्रेक्षा व फलोत्प्रेक्षा ह्या प्रत्येकीं दोन प्रकारच्या आहेत-सिद्धाश्रया व असिद्धाश्रया. जिचा विषय प्रसिद्ध आहे ती सिद्धाश्रया, व विषय प्रसिद्ध नसला तर असिद्धाश्रया. उत्प्रेक्षेचीं उदाहरणें:-(१) असें बोलूनी नळें रंजवीला। अंजुळी माजी हंस बैस-

पुसाल जरि कोण ते? पदरजीं तुझ्या लोळती. ।
बरें तुजचि सोसते स्तवन; कृत्तिवासा गरा
न पी, तरि कसें घडे? हितकरा! दयासागरा! ॥ ३०

---

वीला ॥ गमे चंपक कुसुमौघहार झेला । पाठवाया युवतीस सिद्ध केला (नवनीत–रघुनाथ पंडितकृत नलाख्यान (पृ० ३८७), (२) परभीति बळोत्साहा बा वाल्या जेंवि हरि सकळ पाला । वाटे यूथपनिधनीं पळ सुटला हरिस भिउनि कळपाला (मोरोपंत–शल्यपर्व). रामानें समुद्रावर बांधलेल्या सेतूवर पंतांच्या उत्प्रेक्षाः–(३) शतयोजन आयत दशयोजन विस्तीर्ण सेतु शंकेतें। दे,गेला बुडवाया कोपाकुळ भूमिबाहु लंकेतें ॥ (४) रामजयश्रीलग्नीं लंका घाली सुनील पाटावें। सेनावऱ्हाडिणीला पायघडी कां असें न वाटावें ॥ (५) कीं पतितपति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे । आली जी लंकाश्री तीचा तो सांजनाश्रुपथ वाटे (मोरोपंतकृत 'भारती रामायण').

१. **विचाराल. ज्यांस निजस्तुति आवडत नाहीं ते कोण म्हणून विचाराल तर सांगतों.** २. **पायांच्या धुळींत भगवंताच्या पदरजाच्या लाभानें कृतकार्य झालेल्या साधुजनांला स्तुति दुःसह वाटते.** भगवंताच्या भक्तांना स्तुति आवडत नाहीं. ३. **भगवंताला तुलाच स्तुति सोसवते तेव्हां तुझी धन्य असा 'बरें' शब्दानें ध्वन्यर्थ निघतो. सर्व साधुजनांनीं झिडकारलेल्या स्तुतीचा स्वीकार तूं बऱ्या रीतीनें (न रागावतां) केलास तेव्हां शाबास तुझी; असेंच करणें आपणांस योग्य. याला दृष्टांत पुढें देतात.** ४. **तुझ्या भक्तांनीं केलेली तुझी स्तुति तुला बरी सोसवते? ही स्तुति तूं सुखानें सोसतोस असें नाहीं, तर स्तुति सोसल्यावांचून आपल्या भक्तांना फलप्राप्ति व्हावयाची नाहीं म्हणून तूं सोसतोस, स्वभक्तकामकल्पद्रुमाला तुला भक्तांसाठीं स्तुती सोसली पाहिजे, स्तुति सोसणें भाग आहे.** ५. **महादेव.** 'भूतेशः खंडपरशुर्गिरीशो गिरिशो मृडः । मृत्युंजयः कृत्तिवासाः पिनाकी प्रमथाधिपः ॥' (अमर). **मूळ शब्द 'कृत्तिवासस्' असून 'कृत्तिवासाः' हें प्रथमेचें एकवचन होय. प्राकृत भाषेंत त्यांतील विसर्ग गाळला आहे. कृत्ति (मृगचर्म) हें आहे वासस् म्हणजे वस्त्र ज्याचें तो कृत्तिवासस्.** शिव मृगचर्म पांघरतो, हें सुप्रसिद्ध आहे. ६. **विषाला. कथासंदर्भः**–समुद्रमंथनप्रसंगीं प्रथम विष निघालें व त्यामुळें सर्वलोकक्षय होऊं लागला त्या वेळेस लोकक्लेशनिवारणार्थ महादेवानें त्याचें प्राशन केलें अशी **भारतांत** कथा आहे. 'अत्युग्रवेगदुःसहविषसंग्रस्त प्रजापति शिवाला । **गेले** शरण यदंघ्रिस्मृतिनें जन भवदवार्तेहि निवाला ॥ १.५२.–हालाहाल गरलाच्या श्रीशंभु करी सलील आचमना । आला तो सुरमणि परमार्थेच्छूच्या न अन्य काच मना ॥ १.६४ (अमृतमथन). **'कृत्तिवासा (मृगचर्मधारी शंकर) गरा (हालाहल विषाला) न पी (न पिता) तरि (तर) कसें घडे (जगाचें हित कसें होतें?).** ७. **हित करणाऱ्या, त्रैलोक्याचें संरक्षण करणाऱ्या. कथासंदर्भः**–सृष्टीचें रक्षण करण्याचें काम विष्णूकडे आहे. [**बाण**प्रणीत कादंबरी–श्लो० १.] ती उत्पन्न करण्याचें व तिचा लय करण्याचें हीं कामें अनुक्रमें **ब्रह्मदेव व शंकर यांजकडे आहेत. केकामाधुर्यः**– येथें सृष्टिसंहार करणाऱ्या महादेवानें तिच्या पाल-

गॅमो मॅधुर हें विॅष स्तवन; सेॅवितां माजवी;

नार्थ हालाहल विष प्राशन केलें ह्या कथेच्या उल्लेख करून जगन्नियमनाकरितांच शंकराला तिचा संहार करावा लागतो, वास्तविक तो करुणामय आहे; तसेंच संहारकर्त्या शंकरानें जर जगत्कल्याणार्थ विषप्राशन केलें तर मग तुमचें काम जगत्पालनाचें आहे तेव्हां तुम्ही भक्तांचें हित करालच कराल. इतक्या गोष्टी कवीनें सुचविल्या, म्हणून **'हितकरा' ह्या हेतुगर्भ पदाच्या योजनेनें परिकरालंकार झाला. ८. दयासमुद्रा! हे दयार्णवा! गरळ दुःसह असतांही केवळ लोककल्याणार्थ जसें महादेवानें त्याचें प्राशन केलें तद्वत् स्वस्तुति जरी तुम्हांला दुःसह वाटली तरी केवळ आमच्या हिताकरितां तिचा आपण स्वीकार करावा–असा कवीचा अभिप्राय. 'कृत्तिवासा गरा इ०' येथें दृष्टांत अलंकार झाला आहे.** याचीं उदाहरणें: (१) 'करिल कसें मांजर जें दुष्कर हरिहनन काज वाघास। न शकति अग्नि विधु; कसा दिनमणिचा करिल काजवा घास'? (आदि०), (२) पडतांचि भीष्म गेले सर्वांचेही पळांत आवांके। नसतां धुरंधर वृषभ वाळ वृषभरें करोनि आ वांके' (द्रोण०) [मागें केका ४, पृ० १३ टीप ४ पहा.], (३) द्रुपद म्हणे 'सत्य वदसि योग्य खल प्राप्तदर्प हा निधना। पावेल कसा चतुरहि न करूनि निधिस्थ सर्पहानि धना' १॥ (उद्योग० १. १५)

**१. हें स्तवन मधुर गमो, [पण] विष [आहे]; [कारण] [हें स्तवनरूप विष] सेवितां माजवी, सद्यशोमुख मलिन करी, हलाहला लाजवी; [हे] प्रभुवरा! [हें स्तवनरूप विष जो [तूं] सदा पिशी [तो] तूं हरापरिस बरा. असा [विष] रस समर्पित्या [तूं] आपलें अमृत ओपिशी–असा अन्वय. स्तवनाच्या अंगीं दोष आहे हें ह्या केकेंत कवि दाखवितात. २. गोड. ३. विषासारखें (मादक आणि मारक म्हणून अपायकारी) स्तवन. हें (प्रस्तुत, सांगितलेलें) विषासारखें स्तवन [लोकांना] मधुर (गोड) गमो (वाटो). सामान्य लोकांना स्तवन हें परिणामीं अपायकारी आहे हें समजत नसून उलट गोड वाटतें, तर तें खुशाल वाटो.** बहुजनसमाजाला स्तुति अत्यंत प्रिय असून पुष्कळदां शहाणे लोकही स्तुतीच्या जाळ्यांत सांपडतात. याविषयीं आंग्ल कवि **स्विफ्ट्** याच्या पुढील पंक्ति पहाव्या:—

'Tis an old maxim in the Schools
That flattery is the food of fools;
Yet now and then your men of wit
Will condescend to take a bit.

श्रेष्ठलोकांपैकीं थोड्यांला जरी स्तुतीचा कंटाळा असतो, तरी बहुतेकांच्या हृदयांत स्तवनप्रियता गुप्तपणें संचार करीत असते. अठराव्या शतकांत होऊन गेलेला आंग्ल कवि **यंग्** यानें पुढीलप्रमाणें आपल्या एका काव्यांत उद्गार काढले आहेत:—

The love of praise, howe'er concealed by art,
Reigns more or less, and glows in every heart.

**४. स्तवन हें कोणाला गोड वाटेल तर वाटो, परंतु तें विष आहे, कां कीं तें सेविलें**

करी मलिन सद्यशोमुख; हालाहला लाजवी; ।

असतां मनुष्याला उन्मत्त करतें. ५. विषपक्षीं-भक्षण केलें असतां, स्तवनपक्षीं-स्वीकारलें असतां. ६. उन्मत्त करितें, माजवितें. स्तुति ऐकून लोक अहंकाराच्या स्वाधीन होतात-मदोन्मत्त होतात. कांहीं विषें भक्षण केलीं असतां रसनेला मधुर लागतात व त्यापासून उन्माद येतो हें सुप्रसिद्ध आहे.

१. मळकट. २. सत् (चांगलें)+यशस् (कीर्ति) हेंच कोणी मुख (तोंड) उत्तम-कीर्तिरूप मुखाला, कीर्तिवान् पुरुषाच्या तोंडाला स्तवनानें काळोखी येते-कमीपणा येतो. एखादा थोर पुरुष स्वकीर्तिश्रवणानें उन्मत्त झाला ह्मणजे त्याची चहुंकडे अपकीर्ति होते. ३. समद्रमंथनप्रसंगीं निघालेल्या हालाहल नामक भयंकर विषाला. 'हालाहलनामक विषरस लयदहनोग्र जन्मला पहिला' ॥ ५२ ॥ [मोरोपंत-मंत्रभागवत-नवमस्कंध-गीति ५२-५९ पहा.] 'पुंसि क्लीबे च काकोलकालकूटहलाहलाः' इत्यमरः । 'हालाहलं हालहलं वदंत्यपि हलाहलम्' इति द्विरूपकोषः । 'हालाहल' या शब्दाचीं अशीं तीन रूपें आहेत. 'हळहळ' असें एक आणखी 'हलाहल' शब्दाचें रूप पंतांच्या 'रामरीति' काव्यांत सांपडतें:—'रम न समजती म्हणविति रसिक म्हणुनि चित्त बहुत हळहळतें । जें तन्निंदक भाषण होतें कर्णांत तप्त हळहळ तें ॥ ६० ॥ [रामरीति-पृ० २३१] 'हलहल' हा शब्द 'हलाहल' या अर्थी एच्. एच्. विल्सन् यांनींही आपल्या संस्कृत-इंग्रजी कोशांत दिला आहे. 'विषाचे नऊ प्रकार आहेत:-१ काकोल, २ कालकूट, ३ हालाहल, ४ सौराष्ट्रिक, ५ शौक्लिकेय, ६ ब्रह्मपुत्र, ७ प्रदीपन, ८ दारद, ९ वत्सनाभ.' (शब्दरत्नार्णव-बाबापद्मनजीकृत.) **कथासंदर्भः**-पूर्वी अमृताच्या प्राप्तीकरितां देवदैत्यांनीं मंदरगिरीचा मंथनदंड व वासुकीनागाचा रज्जु करून क्षीरसागराचें मंथन केलें. प्रथम हालाहल विष निघालें तें लोककल्याणार्थ शंकरांनीं प्राशन केलें. पुढें दुसरीं त्रयोदश रत्नें निघालीं त्यांतच अमृत निघालें. 'वासुकिला नेत्र करुनि, मंदरगिरिला करूनियां मंथा । आदरिला क्षीराब्धिच्या मथनाचा दैत्यसुरवरें पंथा' (अमृतमथन १.३७). पुढील श्रीधर कवीच्या 'पांडवप्रतापां'तील ओंव्यावरून चतुर्दश रत्नें कोणतीं व तीं कोणकोणाला मिळालीं हें समजून येईल; '**कमला, कौस्तुभ, शार्ङ्ग, शंख** । देउनि पूजिला वैकुंठनायक । वशिष्ठासि **कामधेनू** देख । **उच्चैःश्रवा** भास्करातें ॥ १ ॥ **चंद्र** स्वेच्छे विचरे गगनीं । **सुरा** देतां दैत्यांलागुनीं । **ऐरावत, पारिजातक, रंभा** रमणी । सहस्राक्ष आवरी ॥ २ ॥ **विष** पूर्वींच निघालें । तेंहि चतुर्दशांत गणिलें । **अमृत** कुंभ घेउनि ते वेळे, । **धन्वंतरी** निघाला. ॥ ३ ॥ ४. लाजवितें. स्तुतीच्या योगानें हालाहल विषापेक्षांही जास्त भयंकर परिणाम होत असल्यामुळें ती आपल्या प्रखरतेनें हालाहल विषासही खालीं पहायास लावितें. हालाहल विष भयंकर; त्याच्या नुसत्या वासानें मनुष्य तावडतोब मरतो, अशा विषालाही स्तवनविष आपल्या मारक आणि मादक गुणानें लाजवितें. स्तुतीचा नाद एकदां मनुष्याला लागला म्हणजे त्याची अपकीर्ति होऊन सर्वस्वीं हानि होते.

हरापरिस तूं बरा प्रभुवरा! सदा जो पिशी
असा रस समर्पित्या अमृत आपुलें ओपिशी. ॥ ३१

१. शंकरापेक्षां. 'पेक्षां' व 'परिस' (परीस) या अव्ययांमध्यें तुलनेचा अर्थ आहे. येथें प्रभु आणि शंकर यांची तुलना केली असतां विष पचविण्याच्या कामीं प्रभु जास्त आहे असें समजावें. 'हरः स्मरहरो भर्गस्त्र्यंबकस्त्रिपुरांतकः' इत्यमरः. २. प्रभुश्रेष्ठा! सर्व देवांत अत्यंत श्रेष्ठ असा जो तूं त्या! शंकर एकदा मात्र विष प्याले, तूं नेहमीं स्तुतिरूप जलाल विष पितोस म्हणून शंकरापेक्षां तूं बरा असें मी म्हणतों. तुला रोज रोज हें स्तवनविष बरें पचतें, अर्थात् शंकरापेक्षां तुझा अधिकार मोठा होय. येथें कवीनें प्रभुकडे जो बरेपणा दिला आहे तो प्रभु विषप्राशन नेहमीं करणारा आहे म्हणून दिला आहे. महादेव हें नाम शंकरापेक्षां आपणास जास्त अन्वर्थक आहे ह्या उद्देशानें भगवंताला 'प्रभुवरा' असें संबोधन केलें आहे. विष्णु हरापरिस बरा म्हणूनच प्रभुवर. ३. स्तुतिरूप विष. ४. दूध, मोक्ष अथवा देवाचें पेय. ५. असा रस (स्तवनविष) समर्पित्या (समर्पण करणाऱ्याला, देतो त्याला, दात्याला) [तूं] आपुलें (स्वतःच्या मालकीचें) अमृत (प्रसिद्ध सुधानामक देवपेय, किंवा मोक्ष) ओपशी (देतोस). जो भगवंताला स्तवनरूप विष अर्पण करितो त्याची फेड भगवान् सुधा किंवा मोक्ष देऊन करितो. भगवंताचें स्तवन करणारांस सुधा प्राशन करावयास मिळून अमरत्व (देवत्व) प्राप्त होतें असाही अर्थ करावा. ह्यांत 'अमृत' शब्दावर कवीनें श्लेषयोजना केली आहे. पहिल्या अर्थाच्या योजनेंत अपकार करणाऱ्यावर देव उपकार करितो असें सांगून भगवंताचें अपरिमित दयालुत्व सुचविलें आहे. हें पंतांचें काव्य अल्प प्रमाणावर पंतांच्या कवितेंतील गुणदोषांचें उत्तम द्योतक आहे. कवीचें निरंकुशत्व, बेतावाताची श्लेषप्रियता, लांब समास, यमकप्रियता, संस्कृत वाक्यांश व संस्कृत तऱ्हेची वाक्यरचना, परभाषेंतील शब्दयोजना, सरस अनुप्रास, एकंदरींत काव्यालंकारांची आवड, सुभाषितांचा भरणा, प्रौढ व मार्मिक शब्दयोजना, भक्तिरसाचा अपूर्व मेवा वगैरे कित्येक गोष्टींची यांत ओळख पटते. (१) रावबहादुर रानडे मराठी ट्रान्सलेटर असतांना त्यांनीं डिसेंबर १८६४ च्या अखेरपर्यंत प्रसिद्ध झालेल्या मराठी ग्रंथांचें संक्षिप्त विवेचन केलें आहे. त्यांत ते ह्मणतातः–'*Tukaram's* मानसपूजा *and Moropant's* केकावलि *are perhaps the best specimens of their writings.*' (Catalogue of Native publications of the Bombay Presidency upto 31st December 1864 Preface.) (२) प्रसिद्ध 'निबंधमाला'कार कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा अभिप्रायः–'ज्या कोणास मोरोपंताच्या कवित्वगुणांची थोडक्यांत परीक्षा कर्तव्य असेल त्यानें 'केकावली' काव्य पहावें. तें हातीं घेतलें असतां कालिदासाचें गुणसर्वस्व जसें 'मेघदूतां'त आढळणारें आहे, जगन्नाथाच्या वाणीचें रससर्वस्व जशी 'गंगालहरी' प्रकट करते, त्याप्रमाणेंच वरील केकारवही प्रस्तुत कवीच्या गुणांविषयीं निर्णायक होईल' (निबंधमाला अंक ६३ पृ० ६). अमृत ह्या एका शब्दावर ३१,९०,९१,१०४,१०५ अशा पांच केकांत श्लेषयोजना केलेली आढळते. ६. ओपिशी=

## केवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या पैते !

**देशी, देतोस, समर्पण करिशी.** 'ओपणें' हें रूप संस्कृत 'अर्प' (=देणें) पासून झालेलें आहे. 'अर्प हें संस्कृत 'ऋ' (=जाणें) याचें प्रयोजकरूप. प्रभूस नैवेद्य अर्पिणें ह्मणजे आपल्याजवळ आहे त्यास देवाकडे जावविणें. **येथें स्तवनरूप विष वर्णिलें आहे म्हणून रूपक समजावें. विष हें हलाहलाहून अधिक गुणी आहे म्हणून व्यतिरेक अलंकार समजावा. हरापेक्षां प्रभुवर अधिक म्हणून व्यतिरेक अलंकार आहे.** याचें लक्षण:- 'केनचिद्यत्र धर्मेण द्वयोः संसिद्धसाम्ययोः । भवत्येकतराधिक्यं **व्यतिरेकः** स उच्यते ॥' [वाग्भटालंकार-४ परिच्छेद ८४ पृ० ४८.] याचा भावार्थ-**जेथें उपमान आणि उपमेय यांतून एकाचें आधिक्य किंवा न्यूनत्व वर्णिलें असतें तेथें व्यतिरेक अलंकार होतो.** 'व्यतिरेक विशेष जरी **प्रकृताप्रकृतांत वर्णितात कृती, सज्जन उन्नतगिरिपरि परि असती फार कोमलप्रकृति'** (अ. वि.). याचीं अन्य उदाहरणें:-(१) येणें क्षयपात्र अमृतकरहि, [illegible] । आ**पणचि भारवाही बुडतो बुडवी कुळास अघवाही.** ॥ [illegible] ॥ [वनपर्व अ० [illegible]] हा सेनापति घेईल जें जें अर्जुनवधादि मद्यश तें । कैसा विचार? **भुलतें थोरपणें मन. तसें न मद्यशतें.** ॥ ६९ ॥ [उद्योगपर्व-अ० १२]. (३) [illegible] रथातिरथकथा सांगा । **न भल्या दुरुक्ति, देती यापरि हृदयांत न व्यथा सांगा** [illegible] [उद्योगपर्व-अ० १२], (४) ते पांच त्यांत भावा [illegible] अभिमन्यु **तसें न माझ्या जामात्यांसकट मानसा व्याही.** [illegible] पीयूषसमुद्रीं पतन चकोरासि जरि घडे विधिनें । **तदपि अमृतकरचि तया प्रिय सुख त्यां त्याचियाचि संनिधिनें.** ॥ [मंत्रभागवत-दशमस्कंध [illegible]] **पं**[illegible] या **भल्या स्वजननीहुनी वाटती'** (५८), (७)'[illegible] आणि (८)'कथा भुवनमोहिनी अशि न मोहिनी होय ती' ([illegible]) यांतही **व्यतिरेक.** [illegible] देव स्तुति घेतो आणि तदधिक अमृत देतो, असें वर्णन आहे म्हणून [illegible] अधि**कपरिवृत्ति** नामक अलंकार झाला आहे. [मागें केका [illegible]]

१. **कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या पते!** (देवा!) **भले [जन] स्तुतिप्रति न वरिती, ते [जन] पाप न जोडिती. तव गुणैकदेशभ्रमें ज्यांचिया गळां [ती स्तुति] पडति, तिहीं तुजचि दाविता बा! [देवा] तुला संभ्रमें भजति-असा अन्वय.** कवी**श्वर याचा अर्थः**-वेदांत ऋषि आपणास 'कवि,' व वेदसूक्तांस 'काव्य' अथवा 'कविता' म्हणत. ऋग्वेद मंडल १ सूक्त ७२ मंत्र १, मंडल २ सूक्त २३ मंत्र १ ('गणानां त्वा') पहा. म्हणून कवीश्वर म्हणजे शक्तिपुत्र पराशर, रहुगणपुत्र गोतम, घोरपुत्र कण्व, विश्वामित्र, वसिष्ठ, भरद्वाज, भृगु कुत्स, कश्यप इत्यादि वैदिक ऋषि किंवा नारद, व्यास, वाल्मीक्यादि पौराणिक ऋषि असा समजावा. **स्तुति विषासारखी दुःसह असतांही देव तिला गोड मानतो आणि ती देवाचें सेवन करिते अशा अभिप्रायानें स्तुतीस क्षीरोदधिकन्येची उपमा देऊन देवाकडे तिचें पतित्व संबोधून कवि म्हणतात. कवि+ईश्वर (श्रेष्ठ कवि, व्यासवाल्मिकादि)+ मनस+पयोनिधि (क्षीरसमुद्र) सुता (त्याची जी कन्या लक्ष्मी) [तद्रूपा] जी स्तुति,**

**तिच्या पते! येथें कविवरांच्या मनास पंतांनीं क्षीरसमुद्राची उपमा देऊन स्तुतीला लक्ष्मीरूपिणी केली आहे, म्हणून हा रूपकालंकार जाणावा.** याचीं कांहीं उदाहरणें:–कृष्ण कर्णवधानंतर धर्मराजास गौरवितात. (१) 'तुमची आज्ञा देवी निजहस्तगतार्जुनायुधें आजी । कर्णमहिष मारुनियां विजयातें पावली रणामाजी ॥१९॥ (२) त्वां इंद्रें प्रेरितसितवाहाशनिनें वृषाद्रिचें पिष्ट। केलें हें यश देवा! गातील तुझें सदा महाशिष्ट ॥ २० ॥ (३) तूं नरसिंह महात्मा, बीभत्सु तुझा नखप्रकर देवा! । वृषकनककशिपु, महिमा प्रऱ्हाद तुझीच ज्या रुचो सेवा ॥२१॥ (४) तूं रुद्र, तुझें तिसरें लोचन हें बंधुरत्न, वृष काम । तूं राम, कर्ण हा भव, अर्जुन भुजतेज हें तुझें नाम' ॥ २२ ॥ (कर्णपर्व अ० ५०), (५) 'तव यश मानस, सद्गुण पद्म, सुकवि राजहंस, मी अलिसा' (कृष्णप्रार्थना २३), (६) 'दुर्योधन परमेश्वर वाटे, तो वीरभद्र कर्णबळी, । धर्मेहि दक्ष, समर मख' ऋत्विज पांचाळ, होय उग्र कळी' ॥ (कर्ण. १४-७४.) [मागें केका ६, पृ० १८,१९ टीपा पहा.] मनोरूप पयोनिधि हा **अनुभयताद्रूप्य रूपकालंकार** होय. **उपमेंतील सरसता:**–कविश्रेष्ठांच्या मनास सागरोपमा दिली आहे ती फार सरस व समर्पक आहे. समुद्राचें आणि कवींच्या मनाचें अगाधत्व, चंचलत्व, अपारत्व व गंभीरत्व या गुणांत सादृश्य (साधर्म्य) वर्णन करण्याजोगें आहे. सागराच्या ठायीं तरंग आणि मनाच्या ठायीं तर्क यांच्या चांचल्यानें प्रतीयमान होणारें सादृश्य तर फार मनोहर आहे. स्तुतीचें मनोजनकत्व आणि लक्ष्मीचें क्षीराब्धिजनकत्व वर्णून स्तुति आणि लक्ष्मी यांचा उपमेयोपमाभाव साधिला आहे तो तर साहित्यशास्त्रज्ञांस क्षणभर रिझविल्यावांचून राहणारा नाहीं. कवीचें मन कल्पनामय असल्यामुळें तें फार चंचल असतें. सत्कवींच्या मनांचा थांग लागणें किती कठीण आहे हें सत्काव्यवाचकांस सांगणें नकोच. सुरस व विचित्र कल्पना प्रसवण्याची शक्ति सत्कवींच्या प्रतिभारमणीचा एक बहुमोल गुण आहे ही गोष्ट मोरोपंताला चांगली अवगत होती ह्याविषयीं प्रमाण–'बहु कल्पना सुकविसा, विजयहि बहु शरपरंपरा व्याला' (विराट ५-२७). यावरून कवींच्या मनाचें अगाधत्व, अपारत्व व चांचल्य हे गुण प्रकट होतात. आधीच मन–मग तें कोणाचें असेना–चंचल, त्यांत कवीचें मन तर फारच चंचल. एका क्षणांत पृथ्वीवर तर दुसऱ्या क्षणांत स्वर्गांत असावयाचें. ह्याविषयीं महाकवि **शेक्सपीयर** याच्या ग्रंथांतील पुढील उतारा वाचनीय आणि सुसेव्य आहे:—

> The Poet's eye, in a fine frenzy rolling,
> Doth glance from heaven to earth, from earth to heaven ;
> And, as imagination bodies forth
> The forms of things unknown, the poet's pen
> Turns them to shapes, and gives to airy nothing
> A local habitation, and a name :—

या उताऱ्यांतील सहा ओळींचें पद्यात्मक भाषांतर कै० कृष्णाजी परशुराम गाडगीळ यांनीं 'संसारसुख' नामक पुस्तकांत केलें आहे तें असें:–'कवींसि होतां काव्यस्फूर्ति, । प्रसन्न दृष्टीनें देखिती । आकाश तैशी ही क्षिती, । वारंवार सप्रेमें ॥ १ ॥ अमूर्त तरंग जे उठति मनीं, । तयां प्रसादेंकरूनी । मूर्तिमंत करिती कवनीं, । नाम, स्थळही देती त्यां.' ॥ २ ॥ [संसारसुख –काव्य–पृ० २५३.] २. **वल्लभा! स्वामिन्! परमेश्वर कविश्रेष्ठांच्या सुतास्तुतींचा**

भले[1] न[2] वरिति स्तुतिप्रति; न [3]जोडिती [4]पाप ते; ।

**भोक्ता असल्यामुळें त्याला येथें त्या कन्यांचा पति म्हटलें आहे.** भगवंताला 'कवीश्वरमनः-सुतेचा पति' म्हणण्यांत कवीनें आणखी एक गोष्ट सुचविली. कविजनांनीं एक भगवंताचीच मात्र आपल्या काव्यांत स्तुति करावी, इतरांची करूं नये, हा कवीचा इंगितार्थ. ह्या केकेंत 'स्तुतीस परमेश्वरच योग्य' ह्या व्यंग्यरूप अर्थाला प्राधान्य दिलें आहे म्हणून ही उत्तम काव्यांत गणनीय आहे. **काव्याचे प्रकारः**–उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीन आहेत. ज्यांत व्यंग्यार्थाला प्राधान्य असतें तें उत्तम काव्य, ज्यांत व्यंग्यार्थ अप्रधान किंवा गौण असतो त्या काव्यास मध्यम किंवा गुणीभूत-व्यंग्य म्हणतात. ज्यांत व्यंग्य स्पष्ट नसून केवळ शब्द अथवा अर्थ मात्र चमत्कारिक असतात, तें काव्य कनिष्ठ किंवा अव्यंग्य म्हणावें. केकावलींतील पुष्कळ श्लोक व्यंग्य काव्याचीं सुरेख उदाहरणें होत. **कविश्रेष्ठ मोरोपंत यांचा काव्यरचनोद्देशः–ज्ञा**नेश्वरतुकारामादि महाराष्ट्रांतील अर्वाचीन **संतमंडळीनें** भगवद्वर्णनपर मात्र कविता रचावयाची असा जो नियम घालून दिला त्यास अनुस-रूनच **वामन-मोरोपंतांनीं कालिदासाच्या रघुवंश-मेघ**दूतांसारखीं स्वप्रतिभाद्योतक स्वतंत्र प्रकरणें **न** रचितां, भगवत्स्तुतिवर्णनपर अशा **भारत**-रामायणादि प्राचीन ग्रंथांवरच काव्यरचना केली. **पं**तांचीं बहुतेक स्फुटप्रकरणें हीं ईशस्तवनपरच आढळतात. यावरून आपल्या ह्या कवीनें यशः-प्राप्त्यर्थ आपली कविता रचिली नसून केवळ स्वोद्धारार्थच ती रचिली असें स्पष्ट दिसतें. **पंतांनीं** आपल्या काव्यांत जागोजागीं अशा आशयाचे उद्गार काढिले आहेत. त्यांचीं एकक उदाहरणें: भा-रताच्या आरंभीं व शेवटीं पंत म्हणतातः–(१) 'हरि ज्यांचा कैवारी त्या पांडुसुतांस वंदितो भावें; वाटे चरित्र त्यांचें कांहीं आपण तरावया गावें' (आदि.); (२) 'ज्यांच्या गानें व्हावें प्रेमाश्रुस्पिक्त नंदन मयूरें । आर्या समर्पिल्या हरिचरणीं श्रीरामनंदन मयूरें' (स्वर्गारोहण २०,५५). मंत्रमय भागव-ताच्या अखेर पंत लिहितातः (३) 'मंत्रमय स्तुति भावें, भागवता नमुनि देवदेवा. हे; श्रीरामनंदन सेवा ऐसीच देव दे वाहे' ॥ १०९ ॥ रामगीतांतील उद्गारः–(४) 'मयूर ... आयुष्य, नसेचि भरंवसा याचा । झालों जीर्ण तरि मनीं आहे रसिकांत नर ... ' ... (५) 'त्वत्प्रीत्यर्थ तव सगुणमयचि करुनि कवन वेंचितों देहा । उत्साह ... नवेचि तों दे हा' ॥ ६८ ॥ भस्मासुरआख्यानाच्या शेवटीं–(६) 'श्रीशानें ... करुणें मुक्त केला गिरित्र । संसारारातिभीतिप्रति परिहरितें हें हरीचें चरित्र । गातां आकर्णितांहा भवभय शमवी यास्तव स्वादरानें । भावार्थें गाइलें हो सदुदितरत जो त्या मयूरेश्वरानें' ॥ ८२ ॥ अशा अनेक स्थळें शोधकांस पंतांच्या काव्यांत सांपडतील. त्यावरून स्वोद्धार हाच पंतांच्या कवित्व-रचनेचा मुख्य हेतु असून कीर्तिलाभ हा अगदींच गौण हेतु असला पाहिजे हें मार्मिक वाचकांस दिसून येईल.

१. **शहाणे लोक, साधुपुरुष.** २. **वरित नाहींत. अंगीकार करीत नाहींत. ईश्वर आमचा पिता. त्याची स्त्री स्तुति ही आमची माता झाली, तेव्हां तिचा आम्हीं स्वी-कार कसा करावा अशा शंकेनें साधुलोक स्तुतीचा अंगीकार करीत नाहींत.** पुढील सुभाषित वरील विचाराशीं बरेंच समानार्थक आहेः–'अद्यापि दुर्निवारं स्तुतिकन्या वहति कौमारं । सद्भ्यो न रोचते साऽसन्तोप्यस्यै न रोचन्ते ॥' ३. **पापाची सांठवण करीत नाहींत,**

गळां[1] पडति ज्यांचिया तव[3] गुणैकदेशभ्रमें,
तिहीं[4] तुजचि दावितां[5], भजति[6] बा! तुला संभ्रमें[7]. ॥ ३२

स्तुनीचा स्वीकार करून पापांत पडत नाहींत. ४. पातक. भले पुरुष जननीरूपिणी स्तुतीचा अंगीकार करून पापाचें गांठोडें पदरीं बांधीत नाहींत.

१. गळ्यांत. 'गळां' यांत 'आं' हा सप्तमीचा प्रत्यय आहे. हा अकारान्त आणि आकारान्त पुल्लिंगी नामास मात्र लागतो:-(१) पायां पडला. (२) गळां पडला. (३)'अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ । त्याचे गळां माळ असो नसो. [तुकाराम.] (४) पडलों तुझि-याचि गळां कीं येशी तूंचि संकटीं कामा. [मोरोपंत-नामरसायन-५६], (५) विराटपर्व-अ० ३ गी० ११७, (६) उद्योगपर्व-अ० १३ गी० १२१; (७) [एकनाथस्तव-गी० २ पृ० १९.] भले स्वत: स्तुतीचा स्वीकार करीत नाहींत, तथापि एखादे वेळेस ती स्वत: होऊन कोणा सत्पुरुषाच्या गळीं पडते, त्याचें कारण तिसऱ्या चरणांत दिलें आहे. २. 'गळां पडणें' यांत लोकोक्ति अलंकार आहे. 'जरि करिति लोकवादानुकरण कवि म्हणति तीस लोकोक्ति । साही कांहीं महिने गे सखये मिटुनि नेत्रपुटशुक्ति ॥' (अ.वि.) जेथें एखाद्या लोकप्रसिद्ध उक्तीचें अनुकरण केलें असतें तेथें लोकोक्ति अलंकार होतो. गळां पडति-या पदानें स्तुतीचा निर्लज्जारूप दोष आणि गर्ह्याचार सुचविला आहे. ३. तव (भगवंताचा)+गुण (दयाक्षमाशांत्यादि गुण)+एकदेश (कांहीं अंश)+भ्रम (मोह) त्याच्यानें. परमेश्वराचे गुणांचा कांहीं अंश स्तुतीला सत्पुरुषांच्या ठिकाणीं दिसून येऊन त्यामुळें झालेल्या भ्रमानें; भगवद्गुणांपैकीं कांहींचें वास्तव्य साधुपुरुषांत दिसून येऊन हाच माझा पति असा स्तुतीला भ्रम होऊन ती प्रथम त्यांच्या गळ्यांत पडते. समर्पक शब्दयोजना:-आपली स्तुति कोणीं करूं नये, आपण पापराशी असल्यामुळें स्तुतीस केवळ अपात्र असें ज्या साधूंना वाटतें ते नको नको म्हणत असतां इतर लोक त्यांची स्तुति करितात हा अर्थ 'गळां पडति' ह्या पदानें सुचविला आहे. 'दया' क्षमा, शांति । तेथें देवाची वसति॥' असा तुकारामाचा अभंग आहे. ४. त्यांनीं, साधूंनीं. ५. दाखवून दिलें असतां. ६. भजते, तुझी सेवा करिते. ७. मोठ्या आदरानें. संभ्रम=आदर. 'संभ्रम: साध्वसेऽपि स्यात्संवेगादरयोरपि.' 'ती स्तुतिरूप स्वयंवरा कन्या वरातुरा होत्साती कोणाही पुरुषामध्यें तुझ्या गुणांचा यत्किंचित् अंश पाहिला, म्हणजे त्या गुणानें वेडी होऊन त्याच्या गळां पडूं लागते, तेव्हां ते सत्पुरुष तिला सांगतात कीं ज्या आमच्या सौंदर्यौदार्यादि कोणत्याही गुणाला तूं मोहित झाली असशील, तो गुण वस्तुत: आमचा नाहीं, तो गुण पूर्णत्वें ज्या भगवंताच्या ठायीं नांदतो त्याकडे जा, म्हणजे तो तुझा अंगीकार करील; असें जेव्हां ते तीस सांगतात, तेव्हां ती लागलीच तुजकडेस वळून तुला शरण येते. येथें कवीनें स्तुतीचें आतुर्यादि लक्षण साधून तिच्या विगर्हितत्वाचें यथास्थित समर्थन केलें आहे. तसेंच सत्पुरुषाचा स्वस्तुतिविषयक अनादर साधून भगवंताचें सर्वगुणाधिष्ठातृत्वहि साधिलें आहे. आणखी सद्गुणी साधुपुरुष परमेश्वराच्या विभूति आहेत असाही या केकेंत आपला भावार्थ सुचविला आहे.' (य० पां०-पृ० १३९-१४०.) या केकेंतील वर्णन फार सरस आहे.

**प्रत्येक पदांत अर्थसौंदर्य असून त्याचें यांत एकीकरण झालें आहे. म्हणून येथें 'औदार्य' गुण झाला. काव्याचे गुणः**—'औदार्य, समता, कांति, रर्थव्यक्तिः, प्रसन्नता, । समाधिः, श्लेष, ओजो,ऽथ माधुर्य, सुकुमारता ॥ पदानामर्थचारुत्वप्रत्यायकपदांतरैः । मिलितानां यदाधानं तदौदार्यं स्मृतं यथा' ॥ ३ (वाग्भटालंकार तृतीय परिच्छेद). काव्याचे मुख्य गुण दहा. १ औदार्य, २ समता, ३ कांति, ४ अर्थव्यक्ति, ५ प्रसन्नता, ६ समाधि, ७ श्लेष, ८ ओज, ९ माधुर्य व १० सुकुमारता. जेथें प्रत्येक पदांत अर्थसौंदर्य व्यक्त होत असून तें सर्व एकवटून जातें तेथें औदार्यगुण होतो. तसेंच यांतील प्रथमचरणांत 'ओज' नामक गुण झाला आहे. 'ओजः समासभूयस्त्वं.' जेथें मोठमोठे लांब समास असतात तेथें 'ओज' गुण होतो; याची अनुकूल वर्णरचना किंवा वृत्ति 'परुषा' किंवा 'आरभटी' होय. पृथ्वीवृत्त हें [illegible]. केकावलींत मुख्य 'रस' 'भक्ति,' मुख्य 'गुण' 'ओज,' मुख्य 'रीति' 'गौडी' व मुख्य 'वृत्ति' 'परुषा' होय. 'रीति' म्हणजे रसाला अनुकूळ असणारी पदरचना, 'वृत्ति' म्हणजे रसाला अनुकूळ अशी वर्णरचना. **या केकेंत हेतु, काव्यलिंग आणि भ्रांतिमान् असे तीन अलंकार झाले आहेत. भले स्तुतीला वरीत नाहींत, याचा हेतु 'ते पाप न जोडिती' हा सांगितला आहे म्हणून हा हेतुनामक अलंकार होय. जेथें हेतुमानासह (कार्यासह) हेतूचें (कारणाचें) वर्णन केलें असतें तेथें हेतु अलंकार होतो.** याचें लक्षण:—'[illegible] हेतोश्चेद्वर्णनं **हेतु**रुच्यते.' । 'एष ते विद्रुमच्छायो मरुमार्ग इवाधरः । [illegible] पासाकुलितं मनः' ॥ २०० ॥ [मंदारमरंदचंपू—१० [illegible]]. 'कार्यासह हेतूचें **कथन अलंकार हेतु या नांवें, । अभिमान सुंदरीचा छेदाया इंदु हा नभीं उगवे'** [illegible] **स्तुति ही तुमची पत्नी, मग तिचा स्वीकार भले करतील तर पापी होतील. म्हणून ते तिचा स्वीकार करीत नाहींत—या द्वितीयचरणगत अर्थाचें समर्थन प्रथम चरणांतील 'कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या पते!' या संबोधनपदानें केलें आहे म्हणून हा काव्यलिंग नामक अलंकार झाला आहे.** [मागें केका [illegible] पृ० [illegible], टीप पहा], **तृतीय चरणांत भ्रांतिमान् अलंकार झाला** याचें लक्षण:—'वस्तुन्यन्यत्र कुत्रापि तत्तुल्यस्यान्यवस्तुनः । निश्चयो यत्र जायेत **भ्रांतिमान्** स स्मृतो यथा' । (वाग्भटालंकार परिच्छेद ४ श्लो० ७२). **जेथें सादृश्यानें एका वस्तूवर दुसऱ्या एखाद्या वस्तूची प्रतीति होते अथवा जेथें एक पदार्थ पाहून त्यासारख्या दुसऱ्या पदार्थाची भ्रांति वर्णिली असते तेथें भ्रांतिमान् अलंकार होतो. स्मरण, भ्रम, संशय हे जरि कविनें वर्णिले असति रुचिर । तरि होय अलंकारत्रय त्या नामीं जनीं प्रसिद्ध तर** (अ. वि.). **वर्णनीय पदार्थाच्या सादृश्यामुळें जेथें इतरांचें स्मरण, भ्रांति, व संशय कवीनें खुबीदार वर्णिले असतात तेथें क्रमानें स्मृतिमान्, भ्रांतिमान् व संदेह हे तीन अलंकार होतात.** यांचीं क्रमानें उदाहरणें:—'पंकज पाहत असतां कांतामुख येतसे मनीं विमल । **हा मत्तभृंग सुंदरि तुझिया वदनासि जाणतो कमळ ॥ १ ॥** हें कमल कीं सुधाकर हा निर्णय आमुचा नसे ठरला । अति फुल्ल निष्कलंकें तद्वदनें हृदयिं संशयचि भरला' ॥ २ ॥ (अ. वि.) भ्रांतिमानाचीं उदाहरणें:—(१)'सांगद सखड्ग तो कपिकेतुशरच्छिन्न वीरभुज गमला । सहसा खगपतिखंडितभोग तदाननविमुक्त भुजग मला' ॥ (द्रोणपर्व). (२) 'पवनतपनसुत गमले शक्रप्रल्हाद रामरावण वा; । वाटे गगनीं तच्छरसंघर्षजदहन पामरा

म्हणोनि कवितासुता तुज समर्पितों; साजरी
नसे बहु तशी गुणी कनकपीतवासा! जरी, ।

---

वणवा.' ॥ (द्रोण.), (३) 'भीमें झुगारिली रथशक्ति प्रकटावया ठळक लीला; । अशनीच मानिली बहु जननयनांहीं नभीं झळकलीला' ॥ (द्रोण.), (४) 'नीरादानागतमुनिपात्ररवाकर्णनें अजाणानें । तापस गजभ्रमानें वधिला मीं शब्दपाति बाणानें' ॥ [मंत्ररामायण–अयोध्याकांड–गीति ६५,] (५) 'भृंगें विराजित नवीं अरविंदपत्रें । पाहूनि मानुनि तिचींच विशाल नेत्रें ॥ घालीन अंजन अशा मतिनें नदाकीं । आहा! वृथा उतरलों भिजलों विलोकीं' ॥ [रघुनाथपंडित], (६) 'चांपेकळीपरिसही सरलत्व नाकीं । जीचा धरी अधर विद्रुमभावना कीं ॥ भासे मनांत मज बिंबफलभ्रमानें । कीं सत्य चंचुपुट ओढविलें शुकानें' ॥ [रघुनाथपंडित]. **या अलंकारांत उत्पन्न होणारी भ्रांति अज्ञानजन्य नसावी तर प्रतिभोत्थित म्हणजे कवीच्या प्रतिभाशक्तीनें निर्मिलेली असावी. रजताच्या ठिकाणीं शुक्तीची भ्रांति होते ती प्रतिभानिर्मित नव्हे तर अज्ञानजन्य होय. प्रकृत चरणांत ईश्वराच्या कित्येक गुणांच्या साम्यावरून भले हे ईश्वरच होत अशी जी भ्रांति स्तुतीला झाली ती कविप्रतिभोत्थित होय, म्हणून हा भ्रांतिमान् अलंकार जाणावा.** 'तव गुणैकदेशभ्रमें' यांत 'तव' या विभक्त्यंत शब्दाचा उत्तर पदांतील समासांतील 'गुण' शब्दाशीं संबंध आहे म्हणून हें सर्व पद 'त्वद्गुणैकदेशभ्रमें' असें समस्त पाहिजे होतें. परंतु नित्यसापेक्ष शब्दांचा दुसऱ्या पदांशीं समास होतो असा संस्कृत व्याकरणाचा नियम [सापेक्षत्वेऽपि गमकत्वात्समासः] आहे; त्यास अनुसरून तृतीय चरणांतील पद सदोष म्हणतां येत नाहीं. अपेक्षा असतांही अर्थाचा बाध येत नसेल तर असा समास केला तरी चालेल. संस्कृतांत असे प्रयोग पुष्कळ आढळतात. [रघुवंश–सर्ग ६ श्लो० १-२ टीका पहा.]

१. [हे भगवन्!] **म्हणोनि कविसुता तुज समर्पितों. [हे] कनकपीतवासा! [देवा!] [ही] जरी बहु साजरी नसे [आणि] तशी गुणी [नसे], तरी, इतरा न वरी; [हे] हरि! इला किंकरी करीं, जैसा करी (गजेंद्र) [विमुक्त केला, तैसा] निजात्मजाग्रहविमुक्त मयूरही [करीं] असा अन्वय. स्तुतीचा मुख्य भोक्ता ईश्वर, स्तुतिरूप कविता ही कविरूप सागराची कन्या, तिचा अंगीकार भगवंतांनीं करावा अशा अभिप्रायानें कवि भगवंताला प्रार्थितात. स्तुतीचा भोक्ता तूंच आहेस या कारणास्तव** पंतांनीं यापूर्वीं साधुसंतांची स्तुति पुष्कळ वेळां केली. आपली स्तुतिकन्या केवळ परमेश्वरालाच कां अर्पण केली आहे याचें खुबीदार कारण त्यांनीं ३२ व्या केकेंत सांगितलें आहे. २. **कवितारूप माझी कन्या.** वेदांत 'कवि' शब्दाचा अर्थ 'सूक्तें रचणारे' असा होऊन 'वेदसूक्तांस' 'काव्य' अथवा 'कविता' म्हणत. सांप्रत काव्य म्हणजे छंदोबद्ध कविता व ती रचणारा कवि. ३. **अर्पण करितों, तुला देतों, हिचें पाणिग्रहण करावें म्हणून आदरपूर्वक देतों.** ४. सुंदर, अलंकृत, सुरेख. **कनक (सुवर्णाप्रमाणें)+पीत (पिवळें आहे)+वासस् (वस्त्र) ज्याचें अशा भगवंता! कवीनें भगवंताला 'कनकपीतवासा' असें संबोधून त्याचें रूपगुणधनादि सकलैश्वर्य सुचविलें व आपली स्तुतिकन्या साळी भोळी असल्यामुळें भगवंताच्या आश्रयास वास्तविक योग्य नाहीं असाही आपला स्पष्ट अभिप्राय दर्शविला. हे सुवर्णासारखा पी-**

तरी न इतरा वरी; हरि! करीं इला किंकरी;
मयूरहि[2] निजात्मजाग्रहविमुक्त,[3] जैसा करी. ॥ ३३

तांबर धारण करणाऱ्या देवा! माझी कवितारूप कन्या (व्यासवाल्मीकादि कवीश्वरांच्या कवितासुतांप्रमाणें) जरी फार साजरी व गुणवती नाहीं तरी तिचें तुझ्यावरच प्रेम असल्यामुळें दुसऱ्या कोणाला ती वरावयास इच्छित नाहीं. 'येथें कवीनें स्वकाव्यरचनाल्पशक्तित्व सुचवून तद्वारा आपली निरभिमानता दर्शविली.' [य० पां०-पृ० १४१.] पंतांची निरभिमानताः-मोरोपंतांनीं कोणत्याही महाकाव्यास आरंभ करण्यापूर्वी निरभिमानपुरःसर नारदव्यासवाल्मीकादि पुराणकवींचा आशीर्वाद मागितल्याचें दिसून येतें. व यावरून त्यांची निरभिमानता सुतरां व्यक्त होते. पुढील स्थळें पहाः-(१) 'श्रीमत्सद्गुरु नारदवाल्मीकिव्यासशुककवीश मनीं। आणुनि नमितों भावें जे मोहनमाचिया रवी शमनीं' ॥ [भारत.-आदिपर्व-गी० १], (२) 'श्रीनारदवाल्मीकिव्यासपराशरशुकादि सन्मुनि हो! । नमितो हरिगुणकीर्तन मज इतरालाहि हेंचि जन्मुनि हो.' ॥ [ हरिवंश-अ० १ गी० ४]. (३) 'वाल्मीकिव्याससमचि वाचा ज्यांची स्तवी सदा देवा। वाक्तनुमनें नमन या. वाग्मन्यें हेंचि या करो सेवा.' ॥ [मंत्रभागवत-उपोद्धात-गी० १०.] पंतांनीं स्वकल्याणार्थ कविता रचली ती उत्तम झाली असें जरि त्यांना वाटत होतें तरि त्यांनी आपली निरभिमानता जागोजागीं प्रकट केली आहे. याला एक उत्कृष्ट उदाहरण त्यांच्या 'भृगुचरित्रा'च्या शेवटच्या श्लोकांत दिलें आहे. तो श्लोक असाः-'मयूरेश्वरें वर्णिलें हें चरित्र । कराया मनोवाग्वपूंतें पवित्र । [illegible] नमस्कार आहे । कवित्वें न मद्बुद्धि गर्वासि वाहे' ॥ ४७ ॥

१. हिचें प्रेम तुजवर आहे म्हणून हिला (माझ्या कवितारूप कन्येला) आपल्या पायाची दासी करा. किं करोमि इति वदति सा किंकरी, आपली काय आज्ञा आहे असें म्हणून जी नेहमीं सेवेंत सादर असते तिला किंकरी म्हणावें अशी ह्या शब्दाची व्युत्पत्ति आहे. एखाद्या मनुष्याचें जर आपणावर मनापासून प्रेम आहे तर तो कुरूप असला तरी आपणाला सुरूप वाटतो. तद्वत् माझी स्तुतिकन्या बाहेरून सुंदर दिसली नाहीं तरी आपल्यावर तिचें प्रेम असल्यामुळें आपण तिला सुंदर मानून तिचा स्वीकार करा. २. मोरोपंतालाही. ३. निज+आत्मजा+ग्रह+विमुक्त=आपल्या कन्यारूपी ग्रहापासून मोकळा. ग्रह=नक्र. माझ्या कन्येचें पाणिग्रहण करून या कन्यारूपी ग्रहापासून मला मुक्त करा. या सामासिक पदाचा 'निजात्मजेच्या आग्रहापासून विमुक्त (मोकळा)' असाहि छेद करितां येतो ह्मणून या पदाचे पुढें लिहिल्याप्रमाणें दोन अर्थ होतात. हें सभंग श्लेषाचें उदाहरण. श्लेषाचे दोन भेदः-अभंगश्लेष व सभंगश्लेष. ज्यांत एकाच शब्दाचे अनेकार्थ असतात तो अभंगश्लेष, व ज्यांत एका अर्थाचे वेळीं जीं पदें काढिलीं जातात तींच पदें दुसऱ्या अर्थाचे वेळीं काढित नाहींत तर त्यांच्यांत कमीजास्ती करून प्रत्येक अर्थाचे प्रसंगीं निरनिराळीं पदें काढतात त्यास सभंगश्लेष म्हणतात. अभंगश्लेषाचीं उदाहरणेंः-(१) 'आर्येला मानियले बहु पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला । खळचि न मानिति तैसे, बहु दूषणु सज्ज नीच मत्कृतिला' ॥ (सभापर्व ५-११५), (२) 'पितृसुर तृप्तिप्रद,

जगदाल्हादक, **तापहर, सुवृत्त, शुची,** । शशिचें मंडळ, कुळही, तेथ हरिण **अंक,** येथ हा पशुची' (आदिपर्व १७-२१), (३) 'जी चुंबिली **भुजंगें मधुप** म्हणेलचि तिला नमो कळिके' (वनपर्व १२-८८), (४) 'जरि **शुचिमूर्ति, सुवृत्ता,** मान्या **श्रवणोचितें** गुणें मुक्ता । **विद्धा, जडाहि** ते; हे **अगुणाही** तीस करि उणें **मुक्ता'** ॥ (सन्मणिमाला अ० ४), (५) **'शुकभाषणा**-नुकार प्रेमें करितो **मयूर** हें चित्र । श्रवण करितील सज्जन रसिक मनीं धरुनि जिष्णुचें मित्र' (भीष्मभक्तिभाग्य). **सभंगश्लेषाचीं उदाहरणें**:-(१) 'ते शीतळोपचारीं जागी झाली हळूच मग बोले । **नलगे** औषध मजला, परिसुनि जननी बरें म्हणुनि डोले' (रघुनाथ पंडित-नलाख्यान). (२) 'दुसरे दिवशीं प्रभुला वंदिति कपि अंगदादि येऊन । तद्दर्शन तें जाणों त्या **सीतार्तीं** यथेष्ट ये ऊन' ॥ (वनपर्व). (३) **'नंदनवनं** व्रजेति त्वमवोच: सत्यमजकुलोत्तंस! स तु वनमगात्त-मीक्षितुमविचार्य गतोऽस्मि नंदनं हंत!' (मोरोपंत-मुक्तामाला १८) **निबंधमालेंत 'मोरोपंताची कविता'** ह्या निबंधांत **मालाकारांनीं** एक ठिकाणीं असें लिहिलें आहे:-**'निजात्मजेचा आग्रह' आणि 'निजात्मजारूप ग्रह' अशीं दोन प्रकारचीं पदें वरील** समासात **पडण्याजोगीं आहेत. 'किरातार्जुनीय'** सर्ग १ यांतील पुढील श्लोकांत अशा प्रकारचा पदच्छेद आहे:-अवंध्यकोपस्य विहंतुरापदां भवंति वश्या: स्वयमेव देहिन: । अमर्षशून्येन जनस्य जंतुना न जातहार्देन न विद्विषा-'दर:' ॥ ३३ ॥ येथें **'दर:'** किंवा **'आदर:'** अशा पदें टीकेंत दाखविलीं आहेत. [निबंधमाला-अंक ५८ पृ० १३.] **पहिल्या रीतीनें पदच्छेद केल्यास 'मी परमेश्वरासच वरीन, इतर कोणांस वरणार नाहीं म्हणून मला परमेश्वरालाच अर्पण करा' असा जो माझ्या स्तुतिकन्येचा आग्रह त्यांतून मला, तिच्या देवा! तुम्हीं स्वीकार करून मोकळें करा असा अर्थ निघतो. दुसऱ्या रीतीनें पदच्छेद केल्यास कवीनें कन्येला ग्रह म्हटलें आहे असें होतें. कन्येविषयीं उद्गार:**- पित्याला कन्या ही ग्रहाप्रमाणें दु:ख देत असते. ती दुसऱ्यास देऊन मी कधीं मोकळा होईन असें त्यास वाटत असतें अशी लोकांत प्रसिद्धि आहे, त्या रीतीनें येथें कवीनें निजात्मजेवर ग्रहत्वारोप केला आहे. कवि **मोरोपंतांनीं भारतांत** एका ठिकाणीं कन्येसंबंधीं लिहितांना पुढीलप्रमाणें उद्गार काढिला आहे:-'आत्मा पुत्र, सखा स्त्री, कन्या चिंताचि, सर्व काळ जिला । प्रसवोनि वाहति मनीं श्रीमंतहि पितर सर्व काळजिला' ॥ [मोरोपंत-आदिपर्व-अ० ३० गी० २९.] उद्योगपर्वांत असाच उद्गार आढळतो:-'कळतां हिरण्यबाहु क्षितिपाळ म्हणे, **'सुता** असाव्या ही । इच्छा अरिसहि न शिवो न मिळाला मदितरा असा व्याही.' ॥२०१॥ [मोरोपंत-उद्योगपर्व-अ० १३ पृ० ३२१], [कन्येच्या संबंधानें आपल्या कवींची वरीच करडी नजर दिसून येते. या संबंधानें पुढील श्लोक पहा:—'संभवे स्वजनदु:खकारिका संप्रदानसमयेऽर्थहारिका । यौवनेऽपि बहुदोषकारिका दारिका हृदयदारिका पितु: ॥' 'जातेति कन्या महती हि चिंता कस्मै प्रदेयेति महान्वितर्क: । दत्ता सुखं यास्यति वा न वेति कन्यापितृत्वं खलु नाम कष्टम् ॥.' चांगला वर कसा मिळेल, ही चिंता ज्यांना मुली आहेत त्यांना आहेच आहे. या संबंधानें प्रसिद्ध संगीत नाट्याचार्य कै० अण्णा किर्लोस्कर यांच्या संगीत सौभद्रांतील पुढील पदाची आमच्या रसिक वाचकांस आठवण होईलच होईल. 'झाली ज्याची उपवर दुहिता। चैन नसे त्या तापवि चिंता। केंवि मिळे पति कुलीन सुंदर। इत्यादि.'

**४. हत्ती, गजेंद्र. कथासंदर्भः**–मोरोपंतांनीं ह्या कथेचा आपल्या कवितेंतून शेंकडों वेळां उल्लेख केला आहे. केका ६ पृष्ठ २० टीप ८ पहा. या संबंधानें **पंतांच्या** '**कृष्णस्तवराजां**'तील पुढील गीति वाचण्याजोगी आहे:–गजमंबुजं तु शक्रान्नक्राचक्रायुधावता भवता । दत्तमनुक्त्वाप्यभयं पङ्-गेग्राहपीडितेभ्यो नः? ॥ २९ ॥ **करी ह्या शब्दाची व्युत्पत्ति अशी आहे:–संस्कृतांत अकारान्त नामास 'इन्' प्रत्यय लागून 'तें त्यास आहे' अशा अर्थाचीं विशेषणें होतात. हस्त (सोंड) ज्याला आहे तो हस्तिन्=हस्ती=हत्ती; कर (सोंड) ज्याला आहे तो करी;** धन ज्याला आहे तो धनी. **या केकेंत 'रि' या अक्षराची आवृत्ति वारंवार झाली आहे ह्मणून कर्णमधुर वृत्त्यनुप्रास साधिला आहे. अनुप्रासः**–वृत्त्यनुप्रासाचीं उत्कृष्ट उदाहरणें पंतांच्या काव्यांत मुबलक आहेत. पुढील चार उदाहरणें पहा:–(१) '**पर्यंकावरि** [illegible] **पांडुपृथापुत्र पावला पीडा**'। **वैरि विजित विक्षतवपु विमुखत्वें वीरवर** [illegible] (कर्णपर्व [illegible] ३९, गी० ६), (२) '**दुर्गे! देवि! दयावति!** वरदे! परदेवते! सदाचारे!' (दुर्गास्तव [illegible]). [illegible] **पिनाकपाणी परमेश्वर पूतपाणि पद्मानें**' (कर्ण, २२, २३). (४) [illegible] **गौरव कौरव** [illegible] **रव** [illegible] कोनि पळतात' (कर्ण ३७. ३८) **तृतीय चरणांतील 'करीं' हें क्रियापद** 'हला किंकर' करीं **आणि 'मयूरहि निजात्मजाग्रह विमुक्त करीं अशा दोन वाक्यांस प्रकाशित करतें म्हणून हा दीपक अलंकार समजावा.** [illegible] पन्यायानें जसा दाखवितो, तसा 'दीपक' [illegible] 'प्रकृतानामप्रकृतानां चैकसाधारणधर्मान्वयो **दीपकम्**' [illegible] जेव्हां प्रकृताचा **(उपमेयाचा, प्रस्तुताचा) धर्म अप्रकृताला** (उपमानाला, अप्रस्तुताला) दाखवितो **अथवा प्रकाशित करतो, तेव्हां दीपक अलंकार होतो.** [illegible] असतां अन्य ठिकाणच्या पदार्थांस प्रकाशित करतो [illegible] अंतस्थ एका पदानें वाक्यार्थाची संगति बसविते म्हणून [illegible] **दीपक** [illegible] '**प्रकृताप्रकृतांचें जरि वर्णिति धर्मैक्य तेंचि दीपक हो, । दानें शोभे मदगज पराक्रमें नृपवंशदीपक हो, ॥**' (अ. वि.) येथें 'गज' व राजा हे क्रमानें अप्रस्तुत व प्रस्तुत [illegible] 'शोभणें' ह्या एका क्रियेवर अन्वय आहे. उदाहरणें:–(१) [illegible] मग असें वदसी । अचल करींच असावा व्यवहारी [illegible]' ॥ (वनपर्व.) (२) [illegible] म्हणति वाणि वर्णुनि देवा की सुश मानवा वेचे' (द्रोण.), (३) 'दुर्मंत्रें नृप, [illegible] यती, [illegible] पुत्रही लालनें, वेदानध्ययनें द्विजाति, कुल दुष्पुत्रें, खलाराधनें । नासे शील, न पाहतां कृषि, मदें मा, लाज मद्यें फुका, शाठ्यें मित्रपणा, प्रवासगमनें स्नेह, प्रमादें रुका' ॥ (वामन.) **दीपकालंकाराचे प्रकारः**–दीपकालंकाराचे **शुद्ध दीपक, आवृत्तिदीपक, मालादीपक** व **कारकदीपक** असे चार प्रकार मानतात. '**आवृत्तिदीपकचि तें त्रिविध जरी होय दीपकावृत्ति । वर्षतसे घनमाला वर्षतसें रात्रिमान युवचित्तीं ॥ १ ॥** विकसति कदंबकुसुमें कुटजांकुर ही प्रफुल्ल होति रसें । माजति सुतृप्त चातक माजति मेघागमें मयूर तसे' ॥ २ ॥ (अ. वि.) दीपक म्हणजे अनेकांवर अन्वयद्वारें उपकार होण्यासाठीं योजिलें असल्याकारणानें दीपासारखें जें पद किंवा अर्थ अथवा दोन्ही, यांची आवृत्ति म्हणजे पुनरुक्ति असल्यास आवृत्तिदीपक नांवाचा अलंकार होतो. **हें** 'आवृत्तिदीपक तीन प्रकारचें आहे: १ शब्दावृत्तिदीपक,

[1]सरोनि [2]कृतमंतुला, न [3]कवितावधूस्वीकृती
कराल, तरि आयका प्रभु! खराच मी [4]दुष्कृती. ।
[5]नमस्कृतिपुरःसर [6]स्वकृति अर्पितों आजि, ती
दिली [7]रविसखें तुम्हां जशि नमोनि [8]सात्राजिती. ॥ ३४

---

२ अर्थावृत्तिदीपक, व ३ उभयावृत्तिदीपक. तिन्ही प्रकारांचीं उदाहरणें वरील पद्यांत दिलीं आहेत. **'मालादीपक दीपक एकावलि यांसि योग जरि होई । मदनें हृदयिं तिच्या, तद्हृदयें केली स्थिती तुझे ठायीं'** ॥ (अ. वि.) जेथें दीपक व एकावलि या दोन अलंकारांचा एकत्र योग होतो तेथें मालादीपक हा अलंकार जाणावा. **'तें कारकदीपक जरि क्रमिकैकगत क्रिया कवि ग्रथितो; । जातो, पुनरपि येतो पथिक, पहातोहि, तो पुन्हा पुसतो'** (अ. वि.). जेथें एकाच कर्त्याचा अनुक्रमानें अनेक क्रियापदांशीं संबंध असतो तेथें कारकदीपक अलंकार जाणावा. कारकदीपकाचीं उदाहरणें:–(१) 'अरमनृपरिभव करितो, आजि नभातें शरव्रजें भरितो । शोधन करितो, वरितो कीर्ति, अशनिभृदग्किरिपद्या हरि तो' (विराट० ३-८६), (२) 'आतां गोरक्षिलों पशु, सकळहि पण न लगतांहि पळवीतों, । मीं विजय असें तुजचि न सकळांही कौरवांसि कळवीतों' (विराट ३-११५) असेंच विराटपर्व अ० ३ गी० १२० पहा.

१. **माझ्या कविताकन्येचा अंगीकार करण्यास माझ्या अपराधांचा प्रत्यवाय नसावा असें दृष्टांतानें सुचवून कवि भगवंताची प्रार्थना करतात. लक्ष्यांत घेऊन.** २. **कृत** (केलेल्या) मंतुला (अपराधाला). [जर आपण] **कृतमंतुला (मीं केलेल्या अपराधांना)** स्मरून (लक्ष्यांत घेऊन) कवितावधूस्वीकृति **(कवितारूपी कन्येचा स्वीकार) न** कराल (करणार नाहीं) कवितारूप **नवरीचा अंगीकार आपण करणार नाहीं, तरि** (तर) प्रभु ! (हे प्रभो !) आयका (ऐका) **मी आपल्यास एका गोष्टीचें स्मरण देतों** तें ऐका. **मी (मोरोपंत)** दुष्कृती **(पापी, अपराधी) खराच (खरोखरच आहें).** ३. क- **वितारूपी नूतन स्त्रीचा स्वीकार.** 'वधूः स्नुषा, नवोढा स्त्री' इति विश्वः. वधू शब्दाचे (१) पत्नी (२) स्नुषा, सून (३) नारी (४) नवपरिणीता तरुणी असे चार अर्थ आहेत. 'वधूः पत्न्यां स्नुषा-नार्योः+ + नवपरिणीतायाम्' इति हैमः । ४. **दुष्कर्में करणारा, अपराधी, दोषी.** ५. **न-मस्कारपूर्वक.** नमस्कार करणें हा नवविधभक्तींपैकीं एक प्रकार आहे. भक्तीचे नऊ प्रकार केका २८, टीप ६, पृष्ठ ७८ येथें दिले आहेत. ६. **माझी कृति, स्तुतिरूप कविता, माझी कविता. मी अपराधी आहें म्हणून माझी कविताकन्या तुम्हांला हात जोडून तुमच्या पायां पडून अर्पण करितों. असें झाल्यावर तिचा स्वीकार करण्यास तुम्हांला कांहीं चिंता नाहीं. याला उदाहरण चवथ्या चरणांत दिलें आहे. उपमासादृश्यः–** कवींनीं केलेल्या स्तुतींचा पति परमेश्वर आहे अशा प्रकारची (स्तुतीस पतीकडे जाणाऱ्या स्त्रियांची) उपमा ऋग्वेदांतील मण्डल १, सूक्त ९ मंत्र ४ यांत ही आढळते. मंत्राचें भाषांतरः– 'हे इंद्रा! मी तुझ्या ह्या स्तुती गाइल्या आहेत. उत्सुक होऊन वीर्यवंता तुज पतीप्रत वर गेल्या आहेत.' (वेदार्थयत्न अंक २, पृ० ६०) ७. **सूर्याचा मित्र सत्राजित त्यानें.**

रवीचा सखा=रविसख, त्यानें. 'राजाहःसखिभ्यष्टच्' (पाणिनि–५-४-९१, कौमुदी ७८८) यां सूत्रानें 'रविसख' हा षष्ठीतत्पुरुष होय. हें सूत्र मानण्याचें कारण नसतें तर 'रवि आहे सखा ज्याचा असा विग्रह करून हें बहुव्रीहिसमासाचें उदाहरण मानणें अधिक प्रशस्त आणि स्वाभाविक झालें असतें. रघुवंशांत महिषीसख (सर्ग १ श्लो० ४८) सचिवसख (सर्ग ४ श्लो० ८७) अशीं उदाहरणें आहेत तीं वरील सूत्रानुरोधानें षष्ठीतत्पुरुषसमासाचींच आहेत. राजन् अहन् आणि सखिन् या शब्दांला तत्पुरुषसमासांनीं राज, अह आणि सख असे आदेश होतात–असा या सूत्राचा अर्थ आहे; जसें परमराज, उत्तमाह, कृष्णसख. 'सखा मित्रे सहाये ना, वयस्यायां सखी मता' इति मेदिनी. ८. **जशी रविसखें (सत्राजितानें) तुम्हा (प्रभूला) नमुनि (कृतापराधाची क्षमा मागून) सात्राजिती (सत्यभामा) दिली (अर्पण केली) [तशी] [मी] आजि ती स्वकृति (माझा ग्रंथ) नमस्कृतिपुरःसर (नमस्कार करून) अर्पितों (अर्पण करितों) असा अन्वयार्थ. सत्राजित तुमचा अपराधी असून त्यानें जशी आपली कन्या सत्यभामा तुम्हांस नमस्कारपूर्वक अर्पिली, तसा मी अपराधी असून माझी कवितासुता तुम्हांस देतों, सत्यभामेप्रमाणें हिचाही आपण स्वीकार करा. ९. सत्राजिताची कन्या सत्यभामा. कथासंदर्भः**–केका ८, पृष्ठ २९, 'सोविम खोत्थिता' वरील म्हणजे तिसरी टीप पहा. ह्या कथेकडे ह्या व पुढील केकेंत कविकटाक्ष आहे. **सत्राजिताच्या कृतापराधाची क्षमा करून जर देवा! आपण त्याच्या कन्येचें पाणिग्रहण केलें, तर मग मजवरच कां आपण क्रोध कराल? तव्हां माझ्या अपराधांकडे दुर्लक्ष्य करून माझ्या कविताकन्येचा आपण स्वीकार करा–असा कवीचा हृद्गतार्थ. कवि जर कृतमंतु (कृतापराध) आहे तर तो दुष्कृति आहे हें सिद्ध आहे. या सिद्ध गोष्टीचेंच विधान 'मी दुष्कृती खराच; याप्रमाणें केलें आहे म्हणून हा विधि नामक अलंकार होय. जेथें सिद्ध अशा गोष्टीचेंच विधान केलेलें असतें तेथें विधि नामक अलंकार होतो.** याचें लक्षणः–(१) 'सिद्धस्यैव पदार्थस्य विधानं चेत्तदा **विधिः** । समायां शास्त्रगोष्ठीषु विद्वान्विद्वान् भवेत्सखे ॥.' [मंदारमरंदचंपू–१० व्यंग्यार्थदु–पृ० १८९.] **सिद्धपदार्थविधाना विधि म्हणती विबुध सत्य अवलोकीं । पंचमसमुदयसमयीं कोकिल तो कोकिल प्रगट लोकीं ॥** निश्चयानें जाणलेल्या प्रसिद्ध पदार्थाचें विधान करणें हें उपयुक्त नसल्यामुळें बाधित होऊन तें अर्थांतर संग्रहानें अत्यंत सुंदर भासतें म्हणून त्यास विधि अलंकार म्हणतात. वरील उदाहरणांत कोकिलाचे ठायीं कोकिलत्वाचें विधान हें अनुपयुक्त असतां 'अत्यंत मधुर अशा पंचमस्वराच्या उदयानें तो सकल जनांस मनोहर भासतो' या अर्थाचा संग्रह करित आहे आणि हा अर्थ 'पंचमसमुदयसमयीं' या पदानें स्पष्ट केला आहे. याचीं अन्य उदाहरणें:–(१) अहो जे घोडे ते घोडे आणि गाढव तें गाढव. त्यांची बरोबरी कशी होईल? (२) पहा! कसें झालें तरी रत्न तें रत्न आणि कांच ती कांच हें काय सांगावें? (३) कर्ण म्हणतो–'रिपुनृपसर्पसुपर्णा कर्णासहि एक जाणतों मीच' (कर्ण २७-१७). **येथें उपमेय–कवि आणि स्तुति, उपमान–रविसख आणि सात्राजिती, सादृश्यवाचकपद जशी, आणि नमस्कृतिपुरःसर देणें हा धर्म, याप्रमाणें पूर्णोपमा अलंकार झाला आहे.** 'निवाराया पापा हतविनततापा यदुहिता । समर्पी पद्मापा मग धुउनियां पाय दुहिता ॥ जरी केला यत्न प्रभुवेंर न रत्नग्रह करी, । वरी प्रेमें कन्या हृदयिं न तदन्यायहि

## 'पिता खळ, परंतु ती गुणवती सती चांगली;

धरी.' ॥ (कृष्णविजय ५६.) **आपण दुष्कृति यास्तव प्रभूनें स्तुतिरूप कवितावधूचा स्वीकार करणें हा असंभवनीय अर्थ होय. पण नमस्कृतिपुरःसर अर्पणानें त्या असंभवनीय' अर्थाचा संभव केला आहे म्हणून या केकेंत अर्थश्लेष नामक गुण आहे.** याचें लक्षण:– 'श्लेषो विघटमानार्थघटमानत्ववर्णनम्' [चंद्रालोक: १, चतुर्थमयूख.] **जेव्हां असंभावित अशा अर्थाची संभावना युक्तिद्वारा अथवा कांहीं निमित्त योजून दाखविली असते तेव्हां अर्थश्लेष नामक गुण होतो.**

१. **'पिता खळ, परंतु ती सती [सत्यभामा] गुणवती चांगली, म्हणोनि मज [तिला] आपुल्या भजनिं लावणें लागली' [असें, हे देवा! तुम्ही] म्हणाल, तरि जो दांडगा भांडगा त्रिनव रात्र अहर्निशिहि तुम्हासवें भांडला, तत्सुता कशि?–असा अन्वय. 'सत्राजिताचें उदाहरण तूं दाखविलेंस खरें पण ती गोष्ट निराळी होती; सत्राजित जरी दुष्ट होता तरी त्याची मुलगी सत्यभामा गुणवती होती म्हणून मीं तिच्या गुणांवरून तिचा स्वीकार केला' असें कदाचित् आपण म्हणाल अशी शंका घेऊन कवि ह्या केकेंत तिचें निवारण करितात. पिता=सत्राजित. २. दुष्ट, अपराधी.** सत्राजिताच्या अपराधाचें शासन त्याच्या सद्गुणी कन्येस भोगावयास लावणें हें अन्यायाचें होईल म्हणून मीं तिचा त्याग न करितां भार्यात्वानें तिचा स्वीकार केला. **ईश्वरविषयक कल्पना:–** पित्याच्या अपराधाबद्दल त्याच्या संततीस शिक्षा करणें कधींही न्यायाचें होणार नाहीं. हा कृष्णाचा कवीनें दर्शविलेला अभिप्राय किती तरी यथार्थ आहे! 'जे माझा द्वेष करितात त्यांच्या पापांचें शासन मी त्यांनाच करितों असें नाहीं तर त्यांच्या पौत्रप्रपौत्रांना देखील करितों इतका मी क्रोधपूर्ण व मत्सरी आहें यास्तव तुम्ही मूर्तिपूजा करून माझा द्वेष संपादूं नका' ह्या जेहोवाच्या (जेहोवा=यहुदी व खिस्ती शास्त्रांतील परमेश्वर) उक्तीवरून दिसून येणारी खिस्ती लोकांतील व यहुदी लोकांतील परमेश्वराची कल्पना, व नरसिंहावतारीं प्रत्यक्ष वैऱ्याच्या मुलाला प्रिय भक्त मानून त्याचें वचन सत्य करण्याकरितां देव स्तंभांतून प्रकट झाला व कृष्णावतारीं असंख्य खळांचा संहार करून देवानें त्यांजवर 'कृपा करून' त्यांना 'भवीं तारिलें' व अशा रीतीनें आपला द्वेष करणाऱ्यावरही त्यानें प्रीती केली ह्या वर्णनावरून प्रकट होणारी आर्यलोकांतील परमेश्वराची कल्पना, यांत सरस कोणती याचा विचार वाचकांनीं करावा. **३. सद्गुणी. ४. पतिव्रता, साध्वी.** 'सुचरित्रा तु सती साध्वी पतिव्रता' इत्यमरः [सति=अस्ति एकस्मिन् पत्यौ सा सती.] सती हा शब्द 'अस् भुवि' या धातूच्या शतृप्रत्ययान्त विशेषणास स्त्रीलिंगी ई प्रत्यय लागून झाला आहे. पतिव्रतेचें लक्षण:–'आर्तार्ते मुदिते हृष्टा, प्रोषिते मलिना कृशा। मृते म्रीयेत या पत्यौ सा स्त्री ज्ञेया पतिव्रता' ॥ पतीला आनंद किंवा दु:ख झालें असतां जीस अनुक्रमें आनंद किंवा दु:ख होतें, तो प्रवासाला गेला तर जी मलिन वस्त्र धारण करिते व त्याच्या वियोगानें कृश होते, व त्याच्या मृत्यूची वार्ता ऐकून जी आपला प्राणत्याग करिते तिला पतिव्रता ह्मणावें–हा अर्थ. **५. स्वरूपसंपन्न, लावण्यवती. पहिल्या दोन चरणांत भगवंताच्या उक्तीचा अनुवाद केला आहे.**

म्हणोनि मज आपुल्या [1]भजनिं लावणें [2]लागली.' ।
[3]म्हणाल, तरि [4]तत्सुता [5]कैशि? [6]तुम्हासवें भांड[7]गा
[8]अहर्निशिहि भांडला [9]त्रिणव रात्र जो [10]दांडगा. ॥ ३९

---

१. सेवेला. बाप सत्राजित जरि अपराधी होता तरी त्याची मुलगी सत्यभामा ही रूपयौवनसद्गुणसंपन्न असल्यामुळें तिचा मीं अंगीकार केला. २. भाग पडलें, स्वीकार करणें भाग पडलें. ३. कदाचित् आपण म्हणाल परंतु तुझी कन्या तशी नाहीं. तूं अपराधी व तुझी कन्या ही साजरी व बहुतशी गुणी नाहीं, असें तूंच सांगतोस; मग तुझ्या कन्येचा स्वीकार कसा करावा? असें आपण म्हणाल तर मीं आपणाला दुसरें उदाहरण दाखवितों. ४. त्याची=जांबवंताची कन्या. ५. त्या जांबवंताची कन्या जांबवती कशी स्वीकारली? जांबवंत दांडगा व भांडखोर होता आणि त्याची कन्या ही सुंदर गुणवती नव्हती, मग तिचा स्वीकार कसा केला? ६. तुमच्या बरोबर. ७. भांडखोर. जांबवानानें अमर्यादपणें तंटा करून तुमच्याशीं २७ दिवस अहोरात्र मल्लयुद्ध केलें एवढा तो अपराधी, त्याची कन्या जांबवती हीही पण कुरूप, असें असूनही जर तुम्हीं केवळ त्यावर कृपा करून त्याच्या मुलीशीं लग्न लावलें, तर मग त्याच्याहून कमी अपराधी जो मी त्या माझी जांबवतीइतकी वाईट नसणारी कन्या स्वीकारण्यास तुम्हांला काय हरकत असावी? जांबवान् अपराधी असतांही जशी त्याजवर कृपा केलीत तशी मजवरही करून माझ्या कवितारूपी कन्येचा स्वीकार करा. ८. अहर्+निशा=दिवसरात्र=रात्रंदिवस. ९. त्रिनव सत्तावीस. १०. उद्भट, आडदांड. व्युत्पत्तिः–'दंड धातूपासून निघालेल्या शब्दांकडे लक्ष दिले असतां मूळच्या अर्थाचा थोडा थोडा संबंध ठेऊन कशी अर्थांतरें होतात तें ध्यानांत येईल. दंड म्हणजे शिक्षा ती करण्याचें साधन म्हणून काठीला दंड नांव पडलें. त्यापासून दांडा शब्द निघाला. काठीचा उपयोग आडवी बांधून धोतर वगैरे वाळत घालण्यास करितात, त्यामुळें दांडी शब्द झाला. उद्दंड याचा अर्थ उंच आहे दांडा ज्याचा तें म्हणजे उंच छत्री वगैरे. यावरून उद्दंड म्हणजे पुष्कळ असा अर्थ झाला' (व्युत्पत्तिप्रदीप). दांड्यासारखा उंच यावरून दांडगा (उद्भट) शब्द निघाला. सोट शब्दाचा अर्थ तोच आहे. **तिसऱ्या व चवथ्या चरणांत** जांबवानाचें प्रत्यक्ष नांव न घेतां ज्या दांडगेश्वर व भांडखोर मनुष्यानें सत्तावीस दिवस तुमच्याशीं मल्लयुद्ध केलें अशाच्या मुलीलाही तुम्हीं वरिलें असें मोघम म्हटलें आहे. पण या प्रसिद्ध गोष्टीवरून तो जांबवानच होय असा स्पष्ट बोध होतो म्हणून हा **अवसर नामक अलंकार** झाला. यावर **पर्यायोक्ति** अलंकाराची उघड छाया पडली आहे. [मागें केका १ पृ० ४ टीप ३ पहा.] **केका** ३५-३९ **यांत प्रभूनें उत्तरोत्तर हीनगुण वस्तूचें सेवन केल्याबद्दल मोठें सरस वर्णन कवीनें केलें आहे आणि त्यांच्या योग्यतेची तरी माझी कवितासुता खचित आहे, तेव्हां माझ्या कवितावधूचा स्वीकार करण्यास कांहीं हरकत नाहीं असें प्रभूशीं कोटिक्रम लढवून कवीनें सुचविलें आहे. 'केकावलींतील दोषाविषयीं विचारः**–केका ३४–३९, ४८-

४९, ५२-५४,८१-८२,८६-८८,१०३,१०७-११२ इत्यादि केकांत कवींनीं भगवंतावर कोट्या लढविल्या आहेत, केका ८,१५,५५ त देवाला 'आळशी,' 'कां लाजसि' अशा रीतीनें संबोधिलें आहे, केका ३१, ६८,१०३ त महादेवाला कमीपणा दिला आहे किंवा त्यांचा उपहास केला आहे, केका ८३-८४ त श्रीरामचंद्राला दोष दिला असून त्यांच्यावर कामुकत्वाचा आरोप केला आहे, व २,७,२४,१०१-१०२ इत्यादि केकांत भक्तिरसांत दुग्धांत लवणाप्रमाणें अति दुःसह होणाऱ्या शृंगाररसाचें अतिरिक्त वर्णन केलें आहे. ह्या व इतर गोष्टींवरून मोरोपंताला पुष्कळ विद्वानांनीं दूषण दिलें आहे. या टीकाकारांपैकीं कांहींना निबंधमालाकर्ते कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. वरील आक्षेपांसंबंधीं **विद्वन्मुकुटमणि रावबहादुर** (हल्लींचे जस्टिस) **रानडे** यांनीं आपला सविस्तर अभिप्राय दर्शविला आहे. त्यांतील पुढील उतारा वाचनीय समजून येथें दिला आहे:--**रावबहादुर** (हल्लींचे **जस्टिस**) **रानडे यांचा अभिप्राय** (निबंधमालेवरून):--"It (Kekavali) is a hymn addressed to the Deity, and belongs to the devotional class of poetry. The devotional breathings are, however, of a sort which can be understood and relished in this country alone. There is no awe about the Deity, nothing of terror surrounding his glory, no humiliation of spirit on the devotee's part, no dazzling of sight at the awful vision. The relations between the worshipper and the worshipped are exceptionally free; every now and then there is a side-thrust and push at the Deity, which can be understood if not relished, in a country where both the prevailing philosophy and theology place man almost on an equality with God, and advocate either his present unity with or his future absorption in God. This kind of philosophy (*'if wrongly applied'—S. V. P.*) is destructive of all real devotion. As a work of art there is not another equal to it in the language. As a devotional hymn it does not strike harsh to the orthodox ear, but it is disqualified for any higher acceptance by the fault above pointed out." (भाषांतर निबंधमालेवरून.) 'हें काव्य ईश्वराचें स्तोत्र आहे व याची गणना भक्तिपर ग्रंथांत होणारी आहे. या स्तोत्रांत जो ईश्वरविषयक भक्तीच्या उद्गारांचा प्रकार आढळतो तो एतद्देशवासी लोकांखेरीज इतर कोणास समजावयाचा नाहीं व रुचावयाचाही नाहीं. ईश्वराविषयीं भक्ताच्या मनांत ज्या वृत्ति स्वभावतः उत्पन्न व्हाव्या--म्हणजे त्याचें ऐश्वर्य पाहून भयचकित होणें, आपली क्षुद्रता मनांत येऊन अत्यंत नम्र होणें, त्याच्या अगाध महिम्याकडे लक्ष जाऊन आश्चर्यानें थक्क होऊन जाणें, आपल्या पापमग्नतेमुळें धाक वाटणें,—त्या या काव्यांत बिलकुल दृष्टीस पडत नाहींत. उलटा भज्य आणि भजक यांजमधील संबंध यांत अत्यंत निकटतेचा आढळतो. जागोजाग ईश्वराशीं अतिप्रसंग केलेला व त्याच्यावर कोटी लढविलेली, हा प्रकार प्रस्तुत काव्यांत आहे यास्तव या देशांतील तत्वज्ञानाचें व ईश्वरज्ञानाचें स्वरूप जे जाणत असतील,--म्हणजे मनुष्य व देव हे समसमान असून ते एकरूपच होत किंवा पुढें तरी त्यांचा अभेद होणारा आहे--हें ज्यांस माहित असेल त्यांसच प्रस्तुत काव्यांतील भाषणप्रकार अगोदर कळेल; मग तो आवडणें न आवडणें ही तर स्वतंत्र गोष्ट आहे! वरील तत्वज्ञानाचा मार्ग( 'भल-

**तिलाहि बरवी म्हणा, उचित होयँ; तोषाकरें**
**असेल संजली यँथारुचि तँयीं स्वयोषा करें।**

'त्याच रीतीनें ह्या तत्वज्ञानाचा अर्थ करून त्याप्रमाणें वागल्यास'-श्री. वि. प.) हा खऱ्या ईश्वरभक्तीचा केवळ विध्वंसक होय. काव्यरचनेच्या करामतीपुरताच विचार केला, तर याच्या तोडीचें काव्य महाराष्ट्रभाषेंत दुसरें नाहीं. भक्तिपर स्तोत्र या दृष्टीनें पाहिलें, तर जुन्या धर्मातील मतें ज्यांस मान्य आहेत अशा वाचकांस त्यांत कांहीं गैर दिसत नाहीं: पण त्यांच्याहून वरच्या पायरीचे जे असतील,-म्हणजे ज्यांस ईश्वराविषयीं यथार्थ ज्ञान झालें असेल,-त्यांस पूर्वोक्त दोषास्तव तें मान्य होण्याजोगें नाहीं' (निबंधमाला अंक ५४). **अद्वैत तत्त्वज्ञानाचा मार्ग खऱ्या ईश्वरभक्तीचा विध्वंसक आहे काय?:**—यासंबंधीं कै० विष्णुबोवा ब्रह्मचारी यांच्या 'वेदोक्तधर्मप्रकाश' या उपयुक्त ग्रंथांतील पुढील मजकूर विचारणीय आहे. "तुमच्या तोंडानें अहं ब्रह्म (मीच ब्रह्म आहें.) म्हटल्यानें व वाईट कर्मे करणें न सोडल्यानें जीवाची सुटका होत नाहीं: कारण 'अहं ब्रह्म' हें वाचेचें बोलणें नाहीं. 'अहं ब्रह्म' भावना ही तुर्या अवस्था आहे, ती त ज्ञान्याला प्राप्त झाली पाहिजे म्हणजे पापपुण्यांतून सुटका होईल. तुमच्या तोंडानें 'अहं ब्रह्म' बोलला, आणि तुर्या अवस्था पूर्ण प्राप्त झाली नाहीं, अथवा तशा वृत्तीची भावनाही नाही, तर सुटका नाही." 'अद्वैत' व 'द्वैतवाद्यांचा विरोध सध्याप्रमाणें तीव्र असण्याचें विशेष कारण नाहीं. 'अद्वैत'वादी जरी पूर्वीं कधीं काळीं आम्ही परमेश्वराचेच अंश होतों किंवा पुढें कधीं काळीं तद्रूप होऊं असे मानतात तरी तेही 'द्वैत'वाद्याप्रमाणें आम्ही सांप्रत फार भ्रष्ट आहों असेंच समजतात. तेव्हां दोन्ही पक्षांनींही ईश्वराची भक्ति अनुतापवन्हींनें शुद्ध होऊन, व त्याच्या व आपल्या मधील महदंतर ध्यानांत ठेवून, प्रेमळ व एकनिष्ठपणेंच केली पाहिजे.

१. **त्या भांडखोर जांबुवंताच्या कुरूप जांबुवती कन्येला. तिलाहि बरवी म्हणा. [असें म्हणणें] उचित होय, [कारण] तयीं स्वयोषा तोषाकरें करें यथारुचि सजली असेल, पदरजें जशी शिला; परि हे [कवितावधू] हरिमनोहराकृति सती [असे], धवें शापिली, अधें व्यापिली न असे-असा अन्वय. जांबवतीचें पाणिग्रहण केलें तसें माझ्या कवितावधूचें पाणिग्रहण करण्यास प्रत्यवाय नसावा अशा प्रार्थनेचें दृष्टांतानें समर्थन करीत कवि म्हणतात.** २. **चांगली होती असें म्हटलें, वाईट कुरूप असतां रूपवती असें म्हणालां.** ३. **हें म्हणणें आपणास योग्यच आहे. वाईटाचा अंगीकार करून त्यास चांगलें म्हणणें हें थोरांस योग्य आहे या न्यायानें तुम्हीं तिला चांगली असें म्हटलें हें ठीकच झालें.** ४. **तोष+आकरें=आनंद+खाणीनें, खनीनें=आनंदाची खाण अशा तुवां, सुखखनि अशा तुवां.** [आकर=खाण. 'खनिः स्त्रियामाकरः स्यात्' इत्यमर; आकीर्यन्ते धातवोऽत्र आकरः] ५. **सजविली. [येथें सजणें हा धातु सकर्मक समजावा.] रूपवती केली असेल, जी कुरूप होती ती सुरूप केली असेल.** ६. **आपल्या आवडीप्रमाणें. 'यथारुचि' हें येथें क्रियाविशेषण अव्यय जाणावें.** रुचिमनतिक्रम्य यथारुचि हा अव्ययीभाव समास होय. यथामति, यथाशक्ति, यथाबल हीं अन्य उदाहरणें होत. 'यथा' याचे योग्यता, क्रम, साकल्प आणि सादृश्य असे चार अर्थ आहेत. ७. **आपण जांबवतीचें पाणिग्रहण केलें**

जैशी पदरजें शिला; पैरि असे न हे शैापिली

त्या समयीं. ८. आपली स्त्री जांबवती. योषा=स्त्री. ['स्त्री योषिदबला योषा नारी सीमंतिनी वधूः' इत्यमरः. योषा याचें जोषा असें जवर्णघटित रूप आढळतें. योषति योषयति वा (सेवते) सा योषा.] ९. आपल्या हातानें. आपण आपल्या हस्तस्पर्शानें जांबवतीला मानवीरूप देऊन रूपवती केली असेल.

१ वाईट पदार्थ चांगला करण्याचें सामर्थ्य तुमच्या अंगीं आहे याविषयीं दाखला देऊन कवि म्हणतातः-जशी पदरजें शिला [रूपवती स्त्री केली]. पदरजाच्या योगानें जी शिला (धोंड, दगड) होती ती सुंदरी केली. कथासंदर्भः-भगवान् विश्वामित्र ऋषियज्ञसमाप्तीनंतर श्रीरामचंद्र व लक्ष्मण यांना बरोबर घेऊन जनककन्या सीता हिच्या स्वयंवरार्थ जनकानें बोलावल्यावरून मिथिलापुरीस जाण्यास निघाले. वाटेंत त्यांना एक निर्जन अरण्य लागलें. तेथेंच गौतमभार्या अहल्या पतिशापानें शिला होऊन पडली होती. विश्वामित्रानें तिचा शापवृत्तांत रामाला कळवून तिचें शिलात्व भंग करून तिला पूर्वीचें स्त्रीरूप प्राप्त करून देण्यास सांगितलें. त्यावरून श्रीरामचंद्रांनीं शिलेला पदस्पर्श केला. त्याबरोबर अहल्येचा शाप नाहींसा होऊन तिला पूर्वीचें सुंदररूप प्राप्त झालें. अहल्येच्या शापाचें कारणः-अहल्या ही ब्रह्मदेवाची कन्या अतिशय रूपवती होती. इंद्र व गौतम ऋषि तिच्याशीं आपला विवाह व्हावा म्हणून इच्छा करित होते. त्यांत गौतम ऋषीला तिची प्राप्ति झाली. तेव्हां इंद्राला क्रोध येऊन तो पुष्कळ दिवस तिचें पातिव्रत्य भंग करण्यास टपून बसला होता. एकदां गौतम ऋषि स्नानार्थ बाहेर गेला असतां त्याचें रूप घेऊन इंद्र अहल्येकडे गेला व तिला फसवून त्यानें तिच्याशीं समागम केला. समागमानंतर इंद्र स्वर्गास निघून जाणार इतक्यांत स्नान करून गौतम ऋषि तेथें आला व त्यानें तपोबलानें इंद्राचें कपट ओळखलें व त्याला 'तूं सहस्र भगांकित हो' असा शाप दिला. तसाच त्यानें अहल्येस तूं एकहजार वर्षें शिला होऊन निर्जन अरण्यांत राहा असा शाप दिला व रामावतारीं विष्णु तुझा पदस्पर्शानें उद्धार करील असा उःशापही दिला. या पुढची अहल्येच्या उद्धाराची कथा वर सांगितलीच आहे. अहल्योद्धारकथेवरून सुचलेले विचारः-या कथेवरून कित्येक विचार सुचतात. ऋग्वेदांत रहूगणाचा पुत्र गोतम नांवाच्या एका ऋषीचीं एकवीस सूक्तें आहेत. त्यावरून तो 'आधुनिक मनुष्याप्रमाणेंच दीन, अल्पशक्ति, मर्त्य, अल्पज्ञानी, निर्धन, धनेच्छु, देवाविषयीं अतिशयेंकरून भक्तिपरायण आणि दृढनिश्चयी असा होता' असें दिसतें. (वेदार्थयत्न अंक २० पृ० ३५१) गौतमाच्या सूक्तांत पुष्कळ सूक्तांची देवता (उदाहरणार्थ, ऋग्वेदमंडल १ सूक्तें ८०-८४) इंद्र आहे. गौतमाच्या सूक्तांत इंद्राची स्तुति केली तिचा थोडासा मासला येथें दिला आहे. 'इंद्रानें पृथिवीवरील सर्व अवकाश, (आणि) अंतरिक्ष (हीं) भरून टाकिलीं आहेत. त्याणें द्यु लोकांत तेजस्वी नक्षत्रें जडलीं आहेत. हे इंद्रा! तुझ्यासमान कोणीही नाहीं, (पूर्वी) झालेला नाहीं, (आणि) पुढें होणार नाहीं. (तूं) विश्वापेक्षां मोठा आहेस'. (मंडल १ सूक्त ८१ मंत्र ५) 'सर्वज्ञानी (जे) वरुण (आणि) मित्र (ते) आणि इतर देवांसहित अर्यमा (हा) सरळ नीतीचा आम्हांला मार्ग दाखवो' (मंडल १ सूक्त ९० मंत्र १) 'इंद्राची भक्ति आणि उपासना जे जे लोक करितात त्यांस तो सन्मार्गाकडे वळवो' (मंडल १ सूक्त १०४

मंत्र २). वैदिक ऋषींच्या सूक्तांचा वरवर जरी विचार करून पाहिला तरी त्यांत सौंदर्य, प्रसाद, सरळभक्तिभाव, निष्कपट भजन, अनन्यप्रेमयुक्त देवस्तवन, स्वाभाविक वर्णन इत्यादि प्रकार आढळतात. अमानुषचमत्कार करण्याची शक्ति, विलक्षण तपःसामर्थ्य व देवांपेक्षां वरचढ असें पुण्य इत्यादि पौराणिक ऋषींत दिसून येणाऱ्या गोष्टींचा त्यांच्या ठिकाणीं अभाव दिसतो असें वैदिक **पंडितांचें** मत आहे. वेदांत देवांचें वर्तन निष्कलंक असेंच आढळून येतें व इंद्रादि देवांनीं सन्मार्ग दाखवून आपल्या सारख्या दीनमर्त्यांचें कल्याण करावें म्हणून गौतमादिकांनीं त्यांची स्तुति केली आहे. तोच इंद्र पौराणिक ग्रंथांतून अहल्येशीं जारकर्म केल्यामुळें 'सहस्रभगांकित हो' असा गौतम ऋषीपासून शाप पावणारा व यज्ञमंडपांत अश्वाचें रूप धरून जनमेजय भार्या वपुष्टमा हिच्याशीं संभोग करून सत्रास विघ्न आणणारा, त्वष्ट्याचे पुत्र वृत्र व त्रिशिरा यांचा वध करून ब्रह्मवधाचें पातक करणारा (ऋग्वेदांत इंद्रकृत वृत्रवध हें सुंदररूपक आहे), शुक-विश्वामित्रादि तपस्वी तपश्चर्या करित असतां ते इंद्रपद हिरावून घेतील ह्या भीतीनें वसंत, काम व अप्सरा यांना पाठवून त्यांच्या तपास विघ्न करणारा, दुर्वास ऋषीचा अपमान केल्यामुळें त्याच्या शापानें व अहल्येचें पातिव्रत्य भंग केल्यामुळें गौतमऋषीच्या शापानें पदभ्रष्ट होणारा, अनंगरंगांत सदैव दंग होणारा, अतिशय कपटी, परोत्कर्षासहिष्णु असा वर्णिला आहे. तेव्हां वैदिक व पौराणिक काळाच्या इंद्रवर्णनाचा मेळ कसा घालावा? यांतील बीज असें दिसतें कीं वेदांतील ईश्वराचें अतिसूक्ष्म वर्णन मनावर जास्त चांगलें ठसावें म्हणून ते पुराणांतून गोष्टींच्या द्वारा वर्णिलें असावें. पुराणांतील कित्येक गोष्टी ईश्वरी ज्ञानाचीं उत्कृष्ट रूपकें ह्मणून सांगितलेल्या आढळतात. (१) 'ब्रह्मदेवानें आपल्या कन्येशीं गमन केलें' ह्या बाह्यात्कारी निंद्य कथेंतील रूपकाचें मत्स्यपुराणांत स्पष्टीकरण केलें आहे. 'पुराणा'च्या आरंभीं 'ब्रह्मदेवांनीं आपल्या कन्येशीं गमन केलें' ही कथा मत्स्यरूपी भगवंतांनीं मनूस सांगितली. तेव्हां असला घोर अपराध ब्रह्मदेवांनीं कसा केला ह्मणून मनूनें भगवंतांस प्रश्न केला. त्यावर 'सरस्वती ही ब्रह्मदेवाची पत्नीच होय, तिला त्यानें आपल्या आंगापासून उत्पन्न केली ह्मणून तिला लाक्षणिक कन्या असें ह्मटलें. वास्तविक अर्थ ती ब्रह्मदेवाची पत्नी असाच होय. देवांचीं कर्में मनुष्याप्रमाणें इंद्रियांनीं घडत नसून तीं मनुष्याच्या बुद्धिबाहेर आहेत. तीं देवच जाणतात.' असें मत्स्यरूपी देवानें समाधान केलें. पुराणांतील निंद्य गोष्टींचा उल्लेख करितांना ब्रह्मदेवाच्या कन्यागमनाविषयीं प्रथम उल्लेख होतो. तेव्हां वरील समाधान पुराणभक्तांनीं फार ध्यानांत ठेवण्याजोगें आहे हें जाणून ह्या कथेचें मूळ अत्यंत संक्षेपतः पुढें दिलें आहे:—मत्स्यरूपी भगवान् सांगतातः—'सावित्री लोकसृष्ट्यर्थं हृदि कृत्वा समास्थितः। ततः संजपतस्तस्य भित्वा देहमकल्मषं ॥ ३-३० स्त्रीरूपमर्धमकरोदर्धं पुरुषरूपवत्। शतरूपा च सा ख्याता सावित्री च निगद्यते ॥ ३१ दृष्ट्वा तां व्यथितस्तावत्कामबाणार्दितो विभुः। अहोरूपमहोरूपमिति चाह प्रजापतिः ॥ ३३ उपयेमे स धर्मात्मा शतरूपामनिंदिताम्। संबभूव तया सार्धमतिकामातुरो विभुः। सलज्जां चकमे देवः कमलोदरमंदिरे ॥ ४३ यावदब्दशतं दिव्यं यथान्यः प्राकृतो जनः। ततः कालेन महता तस्याः पुत्रो ऽभवन्मनुः' ॥ ४४ मनु शंका विचारितोः—'अहो कष्टतरं चैतदंगजागमनं विभोः। कथं न दोषमगमत् कर्मणानेन पद्मभूः' ॥ ४. १. भगवान् समाधान करितातः—'दिव्येयमादिसृष्टिस्तु रजोगुणसमुद्भवा। अतींद्रि-

येंद्रिया तद्वत् अतींद्रियशरीरिका ॥ ३. यथा भुजंगाः सर्पाणामाकाशं विश्य पक्षिणाम् । विदंति मार्गं दिव्यानां दिव्या एव न मानवाः ॥ ५. अन्यच्च सर्ववेदानामधिष्ठाता चतुर्मुखः । गायत्री ब्रह्मणस्तद्वदंगभूता निगद्यते ॥ ७. अमूर्तं मूर्तिमद्वापि मिथुनं तत्प्रचक्षते । विरिंचिर्यत्र भगवांस्तत्र देवी सरस्वती । भारती यत्र यत्रैव तत्र तत्र प्रजापतिः ॥ ८. वेदराशिः स्मृतो ब्रह्मा सावित्री तदधिष्ठिता । तस्मान्न कश्चिद्दोषः स्यात्सावित्रीगमने विभोः (मत्स्यपुराण अध्याय ३, ४). (२) शंकरांनीं केलेला त्रिपुरांचा नाश (केका ७२ तील कथासंदर्भ पहा) या कथेंतील रूपक हरिवंशांत उत्तम रीतीनें सोडविलेलें आढळतें. तसेंच (३) 'गणपति उंदरावरून पडला तेव्हां त्याला चंद्र हंसला,' (४) 'चंद्रानें गुरुपत्नीशीं गमन केलें,' (५) 'गणेशचतुर्थीला चंद्रदर्शन करूं नये,' (६) 'अगस्त्य ऋषीनें समुद्र प्राशन केला' इत्यादि गोष्टींत सुंदर आध्यात्मिक रूपकें गोंविलीं आहेत. कै० विष्णुबोवा ब्रह्मचारीकृत 'वेदोक्त धर्मप्रकाश' या ग्रंथांत, स्वामी विवेकानंद यांच्या ग्रंथांतून व मासिक पुस्तकांतून, म्याडम ब्लाव्हाट्स्कीच्या '*Isis unveiled*' या उत्तमोत्तम ग्रंथांत, तसेंच ह्या युगांतील गार्गी मिसेस बिझांट हिच्या ग्रंथांतून अशा प्रकारच्या पुष्कळ गोष्टींचीं रूपकें उलगडून दाखविलीं आहेत. या दृष्टीनें अहल्याधर्षणकथेचा विचार केला म्हणजे त्याचें पुढील समाधान सुचतें. (७) 'अहल्या' याचा अर्थ 'नांगरली नाहीं अशी जमीन' असा होतो. ती गौतम ऋषीच्या मालकीची असावी. इंद्र अथवा सूर्य (वेदांत इंद्र व सूर्य यांना एकच मानतात) ही पर्जन्याची देवता. तेव्हां 'इंद्रानें गौतमभार्या अहल्या भोगिली' याचा अर्थ 'इंद्रानें गौतम ऋषीच्या कांहीं कारणामुळें न नांगरलेल्या अशा शेतावर मेघवृष्टि करून तें सुपीक केलें' असा होऊं शकतो. किंवा 'अहल्या' या शब्दाचा 'रात्र' असा अर्थ कोणी कोणी करितात. तो इष्ट मानल्यास पुढीलप्रमाणें अर्थ बसतो. इंद्र अथवा सूर्य उगवला म्हणजे दिवस होतो. दिवस हा रात्रीच्या पाठोपाठ येतो म्हणून इंद्र हा रात्रीचा पाठलाग करितो, यास्तव तो तिचा जार आहे अशी कल्पना बसली असावी. याला एक अप्रत्यक्ष प्रमाण असें आहे कीं ऋग्वेदमंडल १ सूक्त ६९,५ यांत सूर्यरूपी इंद्राला 'उषो न जारो,' 'उषेचा जार' असें म्हटलें आहे. मण्डल १ सूक्त ९२,११ यांत उषेला 'योषा जारस्य' म्ह. 'सूर्यरूप जाराची प्रिया' असें संबोधिलें आहे. मण्डल १ सूक्त ६९,१ यांत 'एखादे स्त्रियेचा जार जसा तिच्या मागून जातो तसा प्रभातकाळीं उषेच्या मागून उगवून आकाशांत चालणारा जो सूर्य' असें म्हटलें आहे. तसेंच वेदांत उषा आणि रात्र यांस परस्पर बहिणी असें म्हणण्याचा प्रचार आहे. याचें कारण रात्र व उषा नेहमीं एकत्र असतात, एकमेकांला सोडित नाहींत हें होय. यावरून इंद्र अथवा सूर्य याला 'रात्र' व 'उषा' या दोघी बहिणींचा जार म्हणत असावेत. तसेंच अहल्या ही प्रजापतीची कन्या असें पुराणांत सांगितलें असून वेदांतही 'रात्र' व 'उषा' ह्या 'द्यु' म्हणजे आकाश याच्या कन्या म्हणून वर्णन केलें आहे. तेव्हां अशाच गोष्टीवरून सूर्यरूपी इंद्राला अहल्यारूपी रात्रीचा जार म्हणत असून त्यावरच अहल्याधर्षणाची कथा रामायणांत रचलेली असावी. अहल्योद्धारकथेंत इंद्राचें नीचत्व व विष्णूचें श्रेष्ठत्व वर्णिलें आहे. याचप्रमाणें पुराणांतील इतर कथांत इंद्रापेक्षां उपेंद्राचेंच माहात्म्य अधिक सांगितलें आहे. प्रत्येक अवतारकथेंत इंद्रादि देव ब्रह्मदेवाला पुढें करून श्री महाविष्णूला क्षीरसागरीं शरण गेले असें निरूपण असतें. वेदांत याच्या उलट प्रकार आढळतो. 'मोठमोठे वृत्रहननादिक पराक्रम इंद्रानें केले व त्याला मरुतांनीं व विष्णूनें

धवें, हरिमनोहराकृति सती अघें व्यापिली. ॥ ३६

भलें स्मरण जाहलें समयिं, कंसदासी करें

---

साहाय केलें' असें ऋग्वेदांत वर्णन आहे. वास्तविक पाहतां वेदांत निरनिराळे देव एकाच प्रभूच्या भिन्न शक्ति ह्मणून त्यांचें स्तवन केलें आहे असें चाणक्ष वैदिक वाचकांस दिसून येईल. पुराणांतील हीं व इतर रूपकें सोडवून त्यांचें सामान्य लोकांस ज्ञान करून देण्याचा व वैदिक व पौराणिक वर्णनांचा मेळ घालण्याचा प्रयत्न एखाद्या अर्वाचीन वैदिक पंडितानें केल्यास त्याचे लोकांवर मोठे उपकार होतील. या कथेस अनुलक्षून पंतांनीं 'अहल्योद्धार' नामक स्वतंत्र दोन रमणीय लघुकाव्यें रचिलीं आहेत. (मोरोपंताचीं स्फुटकाव्यें भाग २ पहा.) २. **परंतु. कवितावधू आणि अहल्या यांत जो विशेष भेद आहे तो कवि येथें दर्शवितात. ३. ही (कवितावधू) सती (साध्वी) [आणि] हरिमनोहराकृति (हरि+मनस्+हर+आकृति=विष्णु+मन+हरणारी+आकार= विष्णूचें मन वश करणारी अशी आकृति जिची आहे) तसेंच अहल्या हरिमनोहराकृति (हरीचें-इंद्राचें मन हरणारी आकृति जिची अशी) होती पण ती सती (साध्वी) नव्हती कारण ती परपुरुषभुक्ता होती. शिलेच्या अंगीं जो एक दोष होता तो माझ्या कवितावधूच्या अंगीं नाहीं असें दर्शवीत होत्साते कवि म्हणतात.** ४. **शाप पावलेली, माझी कन्या साध्वी असल्यामुळें शापग्रस्त नाहीं. अहल्या इंद्रानें उपभुक्त म्हणून शापदग्ध आहे.**

१. **पतीनें, अर्थसंदर्भानें गौतममुनीनें. [धव=पति.** 'धवः पुमान्नरे धूर्ते पत्यौ वृक्षान्तरेऽपि च' इति मेदिनी.] २. **हरिला (इंद्राला, किंवा विष्णूला) मनोहर (मोहक) [आहे] आकृति (स्वरूप) [जीची] ती (अहल्या किंवा कवितावधू). हरि शब्द श्लिष्ट आहे.** अहल्या व कवितावधू दोघीही 'हरिमनोहराकृति' (अहल्या-इंद्राचें मन हरण करणारी व कवितावधू विष्णूचें मन हरण करणारी) खऱ्या पण **इंद्र व विष्णु ह्या दोन हरींत फारच मोठा फरकः**—एक परस्त्रीस जारकर्मानें दूषित करणारा, व दुसरा पापमलानें दूषित होऊन शीलात्वदशा पावलेल्या दुर्दैवी स्त्रीस आपल्या पदरजानें भूषित करून पुण्यश्लोक अशा पंचकन्यामालिकेंत तीस मूर्धाभिषेक करणारा. या संबंधानें पंतांच्या 'अहल्योद्धार' काव्यांतील एक संस्कृत श्लोक वाचनीय समजून पुढें दिला आहे. अहल्या रामाला म्हणते—'त्वां हरिमेव वदामि जगत्पतिमार्यमनार्यमहं न तु शक्रं। त्रात इभो भवतैव सुरेष्वपि सत्सु निहत्य सरस्युरुनक्रं॥ को नु भवंतमृजुं गुरुमाधमपास्य भजेत्तमकारणवक्रं। प्राप्य पिबेदमृतं रसवित् खलु न त्वपहाय तदण्वपि तक्रं' ॥ (अहल्योद्धार ३९). ३. **पापानें. माझी कवितावधू पापानें व्यापिलेली अशी नाहीं. ज्यापेक्षां कवितावधू धवें शापिली, अघें व्यापिली, अशी नाहीं, त्यापेक्षां तिला नीट साजरी करावयास फारसें जड पडावयाचें नाहीं—असा भावार्थ. उत्तरार्धांत उपमा अलंकार असून व्यतिरेकाची स्पष्ट छाया पडली आहे.** ४. **समयिं भलें स्मरण जाहलें; समुज्वलदयासुधासीकरें [तुम्ही] करें कंसदासी कशी उजरली? स्वरिपुची तशी बटिक तुम्हां आवडे [आणि] मत्कृती नको, न सजवे. [अहो देवा!] असा बहुत दुष्कृती मी [आहें] काय?—असा अन्वय. या केकेंत पूर्वोक्त अर्थाचें समर्थन उदाहरणानें**

कशी उजरली समुज्ज्वलदयासुधासीकरें? ।
तुम्हा स्वरिपुची तशी बटिक आवडे, मत्कृती

**करीत होत्साते कवि भगवंतास प्रार्थितात. भलें=चांगलें ५. योग्य समयावर चांगलें स्मरण झालें. येथें स्मरण कशाचें झालें तें कवि सांगतात. ६. योग्य प्रसंगीं, उचित समयीं. समयीं म्हणजे उचितसमयीं असा अर्थ येथें विवक्षित आहे.** इंग्रजींतही In time ह्याचा अर्थ 'योग्य वेळीं' असाच होतो. ७. **कंसाची दासी; अर्थसंदर्भानें सुप्रसिद्ध कुब्जा. कथासंदर्भः**–त्रेतायुगांतील कैकयीची दासी मंथरा शापानें द्वापारयुगांत कंसदासी कुब्जा झाली. हिचें असें नांव पडण्याचें कारण ही तीन ठिकाणीं शरीरानें वक्र होती. कृष्ण आणि बलराम यांस धनुर्यागार्थ कंसानें मथुरेस आणविलें तेव्हां हिनें कृष्णाला अंगराग देऊन संतुष्ट केलें. पुढें ही कृष्णप्रसादानें सरळ व रूपवती झाली. यासंबंधानें 'मंत्रभागवतां' तील पुढील गीति फार वाचनीय आहेत:–'यप्रथमबंधु जीचा देह अशी भेटली पथीं रामा;। ते प्रेमें अनुलेपन देउनि दे तोष माधवा रामा. ॥ १०. ५१७ नरलोकीं सुरलोकीं अतुळ करि तिच्या त्रिवक्र देहातें. । तक्रोचिताहि दीना सकृप सुधाकर न तक्र दे हातें. ॥ ५१८ मोडुनि, पुत्रें घडली, रुचिर रची दृष्टिनेंचि, त्या तनुला। जाणों श्रीपद लावी शुद्ध्यर्थचि, करहि सांत्वना हनुला. ॥ ५१९ कंसवध केल्यानंतर भगवान् कृष्ण हिच्या निःसीम प्रेमास्तव हिच्या ठिकाणीं रत झाले. यास्तव गोपी कुब्जेचा फार राग करित. गोपी परस्पर बोलतात:–'प्रियसखि! लाजे जिव्हा, ज्याची पदधूलि सुर सदा सीमीं। वाहत होते, त्यांसीं त्या मथुरेमाजि सुरत दासीसीं. ॥ ४ ॥ या भाग्यावरुनि गमे, बहुतचि जन्मांतरीं करी सव ती । सवतीस दैव फळलें, हा व्रजसर्वस्व भोगिती सवती ॥ १० ॥ टाणे टोणे शिकतों, तरि सखि देतोंचि तीस उडवून । सखि! कोणालाहि किमपि सुख चिर न मिळेचि सुकृत बुडवून ॥२१॥ कुब्जा राणी हरिला, बहु कुब्जेलाहि आवडेल हरी । लहरीस सिंधु संतत, सिंधुसहि सदैव आवडे लहरी ॥' ३६ ('गोपीगोडवा'–मोरोपंतकृत). पंतांचें 'गोपीगोडवा' हें लहानसें काव्य फार सरस आहे. रसिकांनीं त्यांतील गोडी अवश्य चाखावी.

१. **सरळ केली, कुरूप होती ती सुरूप केली, वक्र होती ती सरळ केली. उजरणें=उजू करणें**=सरळ करणें. 'मी भक्तिवश न चुकलों त्या कुब्जेच्याहि वपुसि **उजराया'** (मोरोपंत–शांतिपर्व), [कृष्णविजय–पूर्वार्ध–अ० ४२ पद्य ३, अ० ४८ पद्य २; हरिवंश–अ० ४९ गी० १३०, या **पद्यांत उजरी या क्रियापदाचा उपयोग पंतांनीं केला आहे.]** २. **समुज्ज्वल+दया+सुधा+सीकरें=अतिस्वच्छ, सुनिर्मल+करुणा+अमृत+बारीक वर्षावानें, लघु वृष्टीनें, अतिनिर्मळ करुणामृताचे कण ज्यापासून उद्भवतात अशा तुवां, अतिस्वच्छ दयासुधेचा सीकर आहे ज्यापासून अशा (देवानें–तुवां). 'समुज्ज्वलदयासुधासीकरें' हें सामासिक पद 'करें' याचें विशेषण केलें तरी चालेल. [सीकर=पाण्याचे कण.** 'शीकरोऽम्बुकणाः स्मृताः' इत्यमरः. सीकर अथवा शीकर असा दंत्यतालव्य शब्द आहे. 'शीकरं सरले वातसृतांबुकणयोः पुमान्.'] ३. **तुम्हा (तुम्हांला) स्वरिपुची (आपल्या शत्रूची–अर्थसंदर्भानें कंसाची) तशी (तशा प्रकारची, आठ ठिकाणीं वांकडी अशी, वेडीविद्री अशी) बटिक (दासी, कंसदासी कुब्जा) आवडे**

नको, न सजवे, असा बहुत काय मी दुष्कृती? ॥ ३७

आवडली, पसंत पडली. तृतीय चरणाचा अर्थ:-देवा! तुम्ही कसे? तर रमाकांत. त्या तुम्हांला यःकश्चित् दासी आवडावी काय? बरें ती दासी तरी कोणाची? तर तुमचा वैरी जो कंस त्याची. तेंही असो. तिच्या रूपलावण्याला प्रसन्न होऊन तिचा तुम्हीं अंगीकार केला असावा असें म्हणावें तरी पंचाइत. कारण ती तर अत्यंत कुरूप-अष्टवक्रा-अशी होती. तेव्हां देवा! तुम्ही केवळ त्या कंसदासी कुब्जेचा तिच्या निर्मल भक्तीस्तवच स्वीकार केला असें सिद्ध होतें. असें जर आहे, तर मग प्रभो! माझ्या भक्ताची, साधारणपणें रूपवती, तुम्हांलाच वरूं इच्छिणारी कुलीन, अशी जी कवितासुता तिचें पाणिग्रहण तुम्हीं कां बरें करूं नये? अवश्य करावें. [illegible] णांतील पदयोजना फारच खुबीदार आहे. ३४-३९ ह्या केकेंत पंतांची प्रतिभा फारच उज्ज्वल झालेली दृष्टीस पडते. गोपी कुब्जाकृष्णांच्या प्रेमाबद्दल चरफडतांना म्हणतात:-(लावणी) 'मी म्हणतें ग बाई! उत्तम कुळींचा कां रतला **बटकी**पाशीं । पांटवधरचा खासदार हा ती कंसाघरची दासी । योग्य जाहला संग म्हणावा काय गडे या दैवासी । कुणि उद्धरिती जन्मा येउनि कुणि आपुलें घर नाशी॥ दासीच्या शिरला घरीं । निति याची काय तरी सरी । दासीचा बंदा हरी । काय मी सांगूं तरी' (रामजोशी-'हरिवांचुन [illegible]'). [illegible] दासी. 'बटिक' शब्द निंदागर्भ आहे व तशा अर्थानें त्याचा येथें उपयोग केला आहे. [illegible] अन्यत्रही पंतांच्या काव्यांत आढळतो. [हरिवंश-अ० १५ गी० २२, आदिपर्व-अ० [illegible]]

५. माझी कृति, माझी कविता‌वधू. पंतांचे आपल्या काव्याविषयीं कांहीं उद्गार:-[illegible] कृष्णविजयपूर्वार्धांतील अंतिम 'सज्जनप्रार्थने'त म्हणतात:-'नसे [illegible] तरि या । वरू चूडारत्नीकृत विधुहि जैसा धुतरिया । [illegible] विहिरा । तयांचा मी; कर्त्या जडहि घडला शोभवि हिरा । २ [illegible] श्रुतिप्रतिभा झरा; विधुमणिचिया सारा ताराप कारण पासरा; [illegible] हरिच्या बरी; सहज तुमच्या दीना हीना प्रसाद समुद्धरी. ॥ ३

१. आपल्यास आवडत नाहीं म्हणून 'नको'. २. माझ्या कवितावधूला सजवत नाहीं म्हणतां, कुब्जा त्रिवक्रा असून तीस आपण सरळ केलें आणि माझ्या कवितेस सुरूप करवत नाहीं म्हणतां हें कसें? [illegible] प्रभु रेणुचि करिल कीं सुमेरूस' [महद्विज्ञापना-१३६]. अशी आपली कीर्ति [illegible] माझ्या कवितासुतेला साजरी करण्याचें काम होत नाहीं असें कसें म्हणतां? 'प्रभुला [illegible] न दुर्घट, भारी गरुडास काय हो चिमणी? [महद्विज्ञापना-११५] या न्यायानें मत्कृतीला सजवणें आपणास अत्यंत सुकर आहे-असा म्हणण्याचा भाव. ३. असा (अशा प्रकारचा) बहुत (मोठा) दुष्कृती (पापी, अपराधी, दोषी) मी (मोरोपंत कवि) आहें काय? तुम्ही माझ्या कवितावधूचा स्वीकार करूं नये असें कोणतें पाप मजकडून घडलें? माझी कवितावधू साधी भोळी आहे म्हणून आपल्यास आवडत नाहीं आणि तिला आपल्याच्यानें नीटही करवत नाहीं असा मीच काय मोठा दोषी आहें तें सांगा. या केकेंत 'स्वरिपुची,'

[1]जशी [2]पृथुकतंदुलप्रसृति [3]आप्तकामा तशी
[4]रुचो [5]कृति; [6]सभाग्य तूं सुनय आप्त कां [7]मातशी ? ।

---

'तशी,' 'वटिक' या फार मार्मिक शब्दांनीं कंसदासीचे दोष दाखविले आणि तसे दोष स्वकृतींत नाहींत असें ध्वनित केलें आहे. ४. या चरणांत **प्रश्न व तृतीय चरणांत परिकर अलंकार झाला आहे.** [केका २१, पृ० ५९ टीप ५ व केका १ पृ० ३-४ पहा.]

१ **जशी पृथुकतंदुलप्रसृति आप्तकामा [रुचली], तशी [माझी] कृति रुचो. तूं सभाग्य सुनय [आणि] आप्त [आहेस, मग] कां मातशी? साधु म्हणति विदुरमंदिरीं कण्या आस्वादिल्या; जरि खरें, [तरी] आपुल्या स्वा तुज प्रभुसि कशा दिल्या?–असा अन्वय. भक्तानें प्रेमभावानें तुला कसाही पदार्थ अर्पिला तरी त्याचा तूं संतोषानें स्वीकार करतोस अशी तुझी कीर्ति आहे अशा आशयानें कवि भगवंताला म्हणतात.** २. **पृथुक+तंदुल+प्रसृति=पोहे+तांदूळ+ओंजळ (मूठ)–पोह्यांच्या कणांनीं भरलेली ओंजळ; सुदाम्यानें भक्तिपूर्वक दिलेल्या पोह्यांची मूठ, पसाभर पोहे.** 'पृथुक' संस्कृत, प्राकृत 'पुहुअ' मराठी 'पोहा' असा अपभ्रंशक्रम. **कथासंदर्भः**–कृष्ण सांदिपनी गुरूच्या येथें शिकत असतां 'श्रीदामा' अथवा 'सुदामा' या नांवाच्या एका ब्राह्मणाशीं त्याचा स्नेह जडला. हा ब्राह्मण तेथेंच शिकत होता. विद्याभ्यास झाल्यावर कृष्ण व सुदामा हे परत घरीं जाऊन गृहस्थाश्रमी बनले. सुदामा फारच दरिद्री असल्यामुळें त्याच्या कुटुंबाचे फार हाल होत. एकदां त्याच्या पत्नीनें द्वारकेस श्रीकृष्ण भगवान् राहतात, ते तुमचे जिवलग स्नेही आहेत, तेव्हां त्यांची भेट घेण्यास जा म्हणजे ते आपलें दारिद्र्य दूर करील अशी विनंति केली त्यावरून दोन मुठी पोहे एका फाटक्याशा वस्त्रांत बांधून सुदामा कृष्णदर्शनास गेला. तेथें भगवंतांनीं त्याचा उत्तम आदरसत्कार करून मोठ्या प्रेमानें त्याचे पोहे खाल्ले. दुसरे दिवशीं कृष्णाचा निरोप घेऊन सुदामा परत नगरास आला तों त्याची नगरी सुवर्णाची झालेली त्याच्या दृष्टीस पडली. नंतर सर्व लोक मोठ्या समारंभानें त्याला सामोरे जाऊन त्यांनीं तें सर्व ऐश्वर्य त्याच्या स्वाधीन केलें. ही कथा पंतांनीं तीन चार ठिकाणीं मोठ्या प्रेमानें वर्णिली आहे. त्यांपैकीं पंताच्या **'पृथुकोपाख्यान'** नामक लघुकाव्यांतील या कथेच्या वर्णनांत एका ठिकाणीं कृष्णाची प्रत्युक्ति अशी आहे:– 'तिळभरि जरि भक्तें अर्पिली वस्तु कांहीं । बहुतचि मज होते प्रेमभावेंचि पाहीं । बहुतहि दिधलें कीं भक्तिहीनें मला जें । अणुचि गमतसे तें, चित्त तोषे न माझें. ॥ ३ ॥ पत्रपुष्पफलतोयहि जो कीं । भक्तिनेंचि मज दे जन लोकीं । तें स्वभक्त्युपहृताखिल सेवीं । मी सुतृप्तहि सुधारस जेवीं ॥ ४ ॥ ३. **आप्त+काम=प्राप्त, पूर्ण+इच्छा=पूर्ण आहे काम ज्याचा असा जो त्याला, पूर्णमनोरथाला. ईश्वरास कशाचीही इच्छा नाहीं. तो नित्यतृप्त, सफलेच्छ आहे म्हणून त्याला 'आप्तकाम' असें विशेषण लावतात. तें फार समर्पक आहे.** ४. **पूर्णकाम असा जो तूं त्या तुला जशी पोह्यांची मूठ आवडली तशी माझी कृति (कवितावधू) तुला रुचो (आवडो).** ५. **कवितारूप कृति.** या प्रथमार्धाशीं पुढील पंतोक्ति पुष्कळच सदृश आहे:–'माझा प्रेमा सुदामा हरिसख दुबळा, शब्दसंदोह जो हे । साधूपाशीं श्रुतीनें

कण्या[1] विदुरमंदिरीं ह्मणति साधु[2] आस्वादिल्या,[3]
खरें जरि,[4] केशा तुज प्रभुसि[5] आपुल्या स्वा[6] दिल्या ? ॥ ३८

---

पदर पसरुनी जोडिले स्वल्प पोहे;॥ या दीनोपायनातें बुधजन भगवान् प्रीतिनें फार गोडी । आणूनि श्रोत्रवक्त्रीं भरिल, बहु दया मानुनी तेही थोडी, (कृष्णविजय, पूर्वार्ध–सज्जनप्रार्थना). ६. **तूं जरी सभाग्य (श्रीमंत, भाग्यशाली आहेस) तरी सुनय (नीतिमान्, विनीत, आणि) आप्त (सखा, हितकर्ता आहेस) तेव्हां कां मातसी (म्यां गरीबानें दिलेल्या वस्तूचा स्वीकार करण्यास कां माजशील ?–माजणार नाहींस–असें या प्रश्नाचें अपेक्षित उत्तर आहे. ७. मातणें=मत्त होणें, माजणें, धिक्कार करणें.**

**१. साधु म्हणतात कीं देवानें विदुराच्या घरीं कण्या भक्षिल्या.** २. **कथासंदर्भः–** भगवान् श्रीकृष्ण विदुराच्या घरीं एकदां गेले तेव्हां विदुर घरीं नगून त्याची पत्नी मात्र होती. कृष्णांनीं 'मला भूक लागली, कांहीं खावयाला दे' म्हणून विदुराच्या बायकोजवळ, म्हटल्यावरून तिनें भगवंतास तांदुळांच्या कण्या खावयास दिल्या. ह्या कथेचा उल्लेख तुकारामादि अर्वाचीन कवींनीं बऱ्याच ठिकाणीं केला आहे. ही कथा भागवत, हरिवंश, भारत यांत आढळत नाहीं. पांडवांकडून कृष्ण हस्तिनापुरास शिष्टाईस गेले तेव्हां ते विदुराच्या घरीं उतरले होते व तेथें त्यांनीं मोठ्या प्रेमानें भोजन केलें अशी कथा मात्र उद्योगपर्वांत वर्णिली आहे. पंतांनी या प्रसंगाचें फार प्रेमळ व सुरस वर्णन केलें आहे. पुढील गीति पहा:–'विदुरप्रेमें जेवि, ब्रह्मादि कवि प्रसन्न यज्ञानें । प्रभु ला तेंवि न करिती व्यासादिक विप्र मन्त्रयज्ञानें. ॥१॥ शतसंख्य बाजवी ज्या जेववितां माय देवकी चिटक्या,। तो नित्यतृप्त भगवान् विदुरगृहीं भोजनांत दे मिटक्या. ॥२॥ आले ढेंकर, दिधल्या मिटक्या बहुसाल मारिले भुरके, । उरके सर्वीभागुनि अशन, परि न ताट चाटणें उरके. ॥३॥ ज्याच्या चरणें स्वरजाकरवि प्रणतांसि मोक्ष देवविला । देव विलासमनुजतनु विदुरप्रेमें यथेष्ट जेवविला.' ॥४॥ [उद्योगपर्व–अ० ७ गी० ७५-७८]. तसेंच 'क्षीर न खाय खळाची प्रभु विदुराच्याच जेवितोचि कण्या । आवडतिच्या सुपाऱ्या रोठ्या भरड्या नव्या जुन्या चिकण्या'॥ ही आर्या तर सुप्रसिद्धच आहे. ३. **आस्वादणें–खाणें, भक्षणें, रुचि घेणें. ४. ही गोष्ट जर खरी असेल तर.** ५. **तसल्या कण्या विदुरानें कशा दिल्या. ६. आपला स्व म्हणजे आत्मा असा जो तूं प्रभु त्या तुला नुसत्या तांदुळांच्या कण्या विदुरानें कशा दिल्या? विदुरानें तुम्हांस कण्या खाऊं घातल्या आणि तुम्हींही त्या प्रेमानें भक्षिल्या हें मोठें आश्चर्य होय. प्रेमभावानें कोणीं कांहीं तुला दिलें तर तें भक्तार्पित म्हणून चांगलें मानून त्याचा स्वीकार करतोस अशीं उदाहरणें आहेत, तर माझ्या कवितावधूचा तूं स्वीकार करावा–असा भाव. ७. स्व=आत्मा, धन. आपुलें निजधन जो तूं त्या तुला.** [स्व=ज्ञाति, आत्मा, धन, **'स्वो** ज्ञात्यात्मनो: **स्वं** निजे धने' इति हेमचंद्रः. असे स्व शब्दाचे अर्थ आहेत.] **या केकेंत 'सभाग्य' 'सुनय' आणि 'आप्त' हीं पदें साभिप्राय विशेषणें आहेत म्हणून हा परिकर अलंकार जाणावा.**

जिणें[1] रस[2] पहावया प्रशिथिलीं[3] रदीं चाविलीं,
सुवासहि[4] कळावया प्रथम नासिकीं लाविलीं; ।
तुम्हासि शबरी[5] तशीं[6] बदरिकाफळें[7] दे,[8] जुनी

---

१. जिणें रस पहावया प्रशिथिलीं रदीं चाविलीं, [आणि] सुवासही कळावया प्रथम नासिकीं लाविलीं, तशीं बदरिकाफळें तुम्हासि शबरी दे अशि जुनी कथा असो, तुम्ही स्वचरितें मेजुनी पहा–असा अन्वय. भक्तार्पित पदार्थ कसाही असला तरी तो भगवंताला फार आवडतो अशा अभिप्रायानें आणखी शबरीचें उदाहरण देऊन स्वप्रार्थनेचें समर्थन करीत होत्साते कवि म्हणतात. जिणें=ज्या शबरीनें, भिल्लिणीनें, अर्थसंदर्भानें श्रमणा नामक शबरजातीय स्त्रीनें. २. [बोरांचा] रस (गोडी) पहाण्याकरितां, बोरांचा रस आंबट, गोड, तुरट पहाण्यासाठीं. ३. शिथिल झालेल्या रदीं (दांतांनीं) फार सईल दांतांनीं (चाविलीं). प्रभु राम भुकेला असेल, त्याला चांगलीं चांगलीं रसाळ बोरें वेंचून अर्पण करावीं असा हेतु मनांत धरून बोरें तोडलीं आणि त्यांची गोडी पाहण्यासाठीं म्हातारपणामुळें फार शिथिल झालेल्या दांतांनीं चाविलीं आणि नंतर रामाला दिलीं. ४. त्या बोरांचा सुवास कळण्याकरितां पहिल्यानें तीं आपल्या नाकाला लावून हुंगिलीं. ५. या बाईचें नांव श्रमणा. ही शबर (भिल्ल) जातीची होती म्हणून शबरी हें जातिवाचक नाम (सामान्यनाम) हल्लीं विशेषनाम झालें आहे. आलीकडे नामदेव (शिंपी), चोखामेळा (महार) इत्यादि विशेषनामें जातिवाचक म्हणजे सामान्यनामें झालीं आहेत. त्याचे उलट शबरीचें उदाहरण आहे, त्याचा उपयोग विशेषनामाप्रमाणें केला आहे. **कथासंदर्भः**–श्रीरामचंद्र सीतेच्या शोधार्थ दंडकारण्यांत फिरत असतां त्यांना एक शबर जातीची मातंगऋषीची शिष्या भेटली. तिनें रामास सीतेचा शोध सांगितला व मोठ्या प्रेमानें रामास प्रथम आपण चोखून रसाळ म्हणून निवडून ठेविलेलीं बोरें खावयास दिलीं व प्रभु रामचंद्रांनी शबरीच्या भक्तीस्तव तीं मोठ्या आवडीनें खाल्लीं. शबरीनें उष्टीं बोरें रामास दिलीं ही कथा वाल्मीकि रामायणांत नसून अध्यात्मरामायण अरण्यकांड सर्ग १० श्लो० ४-१० यांत व पद्मपुराणांत दिली आहे. मोरोपंत व इतर कवि ह्यांनीं ह्या शबरीच्या कथेचा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केला आहे. प्रभूच्या ह्या शबरीवरील कृपेविषयीं पुढील वचनें पहा:–(१) नामनिरत शबरीचीं त्वां उच्छिष्टेंहि भक्षिलीं बदरें ॥ [मोरोपंत–विठ्ठलप्रणिधि–गी० ९ पृ० १३७.] (२) ऐका महिमा आवडिचीं । बोरें खाय भिलटीचीं ॥ १ ॥ थोर प्रेमाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला ॥ २ ॥ पोहे सुदामदेवाचे । फके मारी कोरडेच ॥ ३ ॥ [तुकाराम–अभंग १५७]. (३) 'ज्याच्या चरणरजांहीं श्रीदेवी भूषवी सदा कबरी । शबरी ती बहुमानी, बा गति दे तीस जानकीश बरी' (हरिवंश) अ० ९ (४) 'अमृतममृतफलमदरं बदरं प्रेम्णा बभक्ष चित्रमिदं । तदपि च शबरीदत्तं मत्तं मध्वं न मामियं मुनिवाक्' ६९ (मोरोपंत–मुक्तामाला) 'फलानि च सुपक्कानि मूलानि मधुराणि च । स्वयमास्वाद्य माधुर्यं परीक्ष्य परिभक्ष्य च । पश्चान्निवेदयामास राघवाभ्यां दृढव्रता ॥' इति पाद्मे. [स० ७४.श्लो० १७ टीका पहा. पृ० ५८३,

कथा अशि असो, पहा स्वचरितें तुम्ही मेजुनी. ॥ ३९
प्रभो! शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे

निर्णयसागरांतील रामायणाची आवृत्ति.] ६. **दांतांनीं चावलेलीं आणि नाकानें हुंगलेलीं अशीं.** ७. **बोरें.** संस्कृत 'बदर' शब्दास 'बोर' असा आदेश होतो. ८. **देती झाली.** ९. **प्राचीन, रामावताराची ही जुनी कथा आहे. 'जुनीं' असाही पाठ आढळतो. तेथें जुनीं=जीर्ण (फळें) असा अर्थ घेतला पाहिजे. अर्थसादृश्यः**—या केकेशीं, तसेंच मागील सातव्या केकेशीं पुढील तुकारामाचा अभंग अत्यंत समानार्थक आहे:—भाविकांचें काज अंगें देव करी । काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें ॥ १ ॥ उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्टीचीं । आवडी तयांची मोठी देवा ॥ २ ॥ काय देवा घरीं न मिळेचि अन्न । मागे भाजीपान द्रौपदीसी ॥ ३ ॥ अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें । संकटें बहुतें निवारिलीं ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसा आवडता लडिवाळें । जाणीवेचें काळें तोंड देवा ॥ ५ ॥ या केकेंत सांगितल्याप्रमाणें प्रभूच्या भक्तवत्सलतेच्या अशा कथा पुराणेतिहासग्रंथांत अनंत आहेत.

१. ही जी स्यां उदाहरणार्थ एक कथा सांगितली ती असो (एकीकडे राहो. ती राहूं द्या). २. अशा कथा पुष्कळच आहेत. यास्तव तुमचीं चरित्रें तुम्हीच मोजून पहा. आपल्या मागील चरित्रांची आठवण करून पहा. बोरांपेक्षां तर माझी कविताबद्ध वाईट नाहींना?—असा सांगण्याचा भाव. तेतिसाव्या केकेपासून या केकेपर्यंत आपण यथामति केलेल्या स्तुतीचा स्वीकार करावा अशा आशयानें प्रभूची प्रार्थना केली आहे. या केकेच्या पूर्वार्धांत हेतु अलंकार आहे. [illegible] प्रभो! शरण आलियावरि [तुम्ही] कधीं वांकडे न व्हां [असें आहे] म्हणोनि जीवांकडे स्वहितकृत्य हें (शरण येणें) इतुकेंचि [आहे]. प्रमाद करितां पळ विलंब नसे [हें ही] बापा! खरें [आहे], पांखरें [मुख] उघडिल्याविना मुखीं घनांबु न पडे—असा अन्वय. शरणागतावर प्रभूचा प्रेमा फार असतो आणि त्याजवर अनुग्रह करण्यास प्रभु सदा तत्पर आणि उत्सुक असतो-अशा अभिप्रायानें कवि म्हणतात. ३. जो कोणी तुम्हाला अनन्यभावानें शरण आला त्याविषयीं तुम्ही कधीं वांकडे होत नाहीं. जो कोणी शरण आला त्याचा अंगीकार करण्यास प्रतिकूल होत नाहीं. **प्रभु आणि शरणागतः**—भगवान् शरणागताची उपेक्षा कधींही करीत नाहीं असें तुकोबानें वर्णिलें आहे. "निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुको नये ॥ निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास । पाहों नये वास आणिकांचा ॥ तुका म्हणे ऐसा कोणें उपेक्षिला । नाहीं आयकिला ऐसा कोणी ॥ [तुकाराम—अभंग ९००]. आमच्या प्राकृत कवींचे ईश्वरविषयक प्रेमळ उद्गार पाश्चात्य उदार विचारांशीं किती तरी जुळतात! निष्ठावंत भावाबद्दल ख्रिस्ती शास्त्रांतील पुढील वाक्यें पहा:—'*I will love Thee, O Lord, my strength. The Lord is my rock, and my fortress, and my deliverer; my God, my strength, in whom I will trust; my buckler, and the horn of my salvation, and my high tower* ( Ps. XVIII). या व पुढील केकेंत प्रभूचें अत्यंत क्षमाशीलत्व, शरणागतांचा अंगीकार करण्याचें त्याचें ब्रीद, व त्याची अपार दया, ह्या

म्हणोनि[1] इतुकेंचि हें स्वहितकृत्य जीवांकडे.[2] ।
प्रसाद[3] करितां नसे पळ विलंब बापा![4] खरें,
घनांबु[5] न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें. ॥ ४०

केकावलींत सर्वत्र वर्णिलेल्या प्रभूच्या गुणांचा स्पष्ट निर्देश केला आहे. या संबंधीं केकावलीवरील आपल्या रिपोर्टांत रावबहादूर रानडे म्हणतात. **रा० ब० रानडे यांचा अभिप्रायः**– 'Those attributes of the Deity which have a prominent bearing on the devotional aspect of human faith, his all forgiving temper, his zeal to serve those who seek his help and place their faith in him; bountifulness and extreme condescension, all these are celebrated as they deserve in successive stanzas of this hymn.' **'शरण येणें' हा धातु चमत्कारिक अर्थाचा झाला आह. मुळीं शरण म्हणजे आश्रय. कोणेकापाशीं जाऊन, 'तूं मला आश्रय हो' अर्थात् 'माझें रक्षण कर,' असें म्हणणें.** संस्कृतामध्यें 'त्वां शरणं गतोऽहम्' म्हणजे–'तूं जो शरण म्हणजे आश्रय त्यापाशीं मी आलों' असा अर्थ होतो. **पण चालू मराठी भाषेंत 'शरण' शब्दाचा संबंध कर्त्याकडे आहेसा भास होतो, आणि त्याचा अर्थ– निराश्रित दीन मनुष्य आश्रयासाठीं आलेला–असा झालेला आहे. याच अर्थानें पंतांनीं येथें तो शब्द योजिला आहे.** 'तुम्हा शरण आजि आलों' [केका २९ द्वितीय चरण.]
१. **प्रतिकूल.** वंक, वक्र, वांक, वांकडा हा अपभ्रंशक्रम.

१. यास्तव, आपण शरणागताची उपेक्षा करीत नाहीं हें सत्य आहे म्हणून, शरणागतावर अनुग्रह करण्यास आपण सदा दक्ष असतां यास्तव. २. प्राण्यांकडे. मनुष्यांकडे आपल्या हिताचें कृत्य इतकेंच आहे कीं भगवंताला अनन्यभावानें शरण जावें. ईश्वरपराङ्मुख आणि संसारमग्न अशा मनुष्यांनीं स्वहित साधण्यासाठीं परमेश्वराला शरण जावें इतकेंच त्यांचें कर्तव्य आहे. ३. आम्ही भक्तजन तुम्हाला शरण आल्यावर, तुम्ही प्रसाद करण्यास पळमात्रही (विलंब) उशीर लावीत नाहीं. शरण जाण्याचा मात्र उशीर, आम्ही शरण गेलों कीं आपण लागलेच प्रसाद (कृपा) करतां ही गोष्ट खरी आहे. ४. **हे देवा!** मराठी कवितेंतून हा शब्द 'प्रेम' किंवा 'लडिवाळपणा' दाखविण्यासाठीं योजिलेला आढळतो. ५. **मेघोदक. पावसाचें पाणी. 'आम्ही शरण गेलों नाहीं तर तुम्ही तरी काय कराल?' अशी आशंका धरून कवि म्हणतात. पांखरें (पांखरानें–चातकपक्ष्यानें) उघडिल्याविना ( तोंड उघडल्यावांचून) [त्याच्या] मुखीं (तोंडांत) घनांबु (घनाचें उदक,) न पडे (पडत नाहीं). 'यद्यपि पाऊस सर्वत्र पडतो, आणि चातकाच्या मुखांत पडावें असेंही त्याचें धोरण असतें, तथापि त्या पक्ष्यानें तो पावसाचा थेंब घेण्याला आपलें तोंड तर उघडलें पाहिजे; तसें आपण घनासारिखे दयाळु आहां खरे, परंतु आम्हीं पामरांनीं स्वोद्धारार्थ आपली प्रार्थना तर केली पाहिजे, इतकेंही आम्हीं न केलें, तर आपण काय कराल ? आम्हीच दोषी होऊं. हा एथें दृष्टांत अलंकार जाणावा.** एथें कवीनें हा चातकपक्ष्याचा दृष्टांत फार सौरस्यें-

करून दिला आहे. येणेंकरून भगवत्स्तवनाची स्वकल्याणास आवश्यकता दर्शवून अल्पप्रयासानें महत्फलही प्रकट केलें आहे.' [य० पां०-पृ० १६५]. चतुर्थ चरणांत पांखरानें तोंड उघडल्याविना त्याच्या तोंडांत मेघोदक पडावयाचें नाहीं असें वर्णिलें आहे. **येथें पांखरू पदाचें प्रतिद्वंद्वी पद मोरोपंत कवि आणि घनांबु पदाचें ईशप्रसाद यांचें निगरण आहे म्हणून येथें रूपकातिशयोक्ति अलंकार आहे. 'जरि निगरण विषयाचें करुनि विषयित्व निश्चया करिती। तरि अतिशयोक्ति म्हणती तिस रूपक याहि उपपदा धरिति' ॥ उ०-निघती सुतीक्ष्ण शर हे नीलनवांबुज युगांतुनी पाहे ॥ 'वर्णनीय विषयाचा त्याचे वाचकशब्दानें उल्लेख नसोन उपमानवाचक शब्दानें ग्रहण करणें याचें नांव विषयनिगरण. अशा प्रकारें विषयाचें निगरण करून उपमानाच्या ऐक्यानें त्याचा ऐच्छिक निश्चय केला असतां रूपकातिशयोक्ति अलंकार होतो**. जसें नीलकमल आणि शर (बाण) या शब्दांनीं नेत्र व कटाक्ष यांचें ग्रहण करून कमल व बाण यांशीं त्यांच्या ऐक्याचा निश्चय केला आहे. यास रूपक हें विशेषण देण्याचें कारण रूपकांत दाखविलेल्या सर्व प्रकारांचा हिजमध्येंही संभव आहे असें सादृश्यानें दाखविणें हें होय. त्यामुळें येथें ही अभेदातिशयोक्ति आणि ताद्रूप्यातिशयोक्ति असे दोन प्रकार होतात' (अ० वि०). उदाहरणें:-(१) 'घालूं पाहसि दंष्ट्रा उपटाया अहिमुखांत आंगोळी' (विराट ४-१३), (२) 'हरिच्या पुनः पुन्हा कां काढ्या नाकांत घालिसी शशका। यश काय पक्षिपतिचें येइल हे चार करुनियां मशका?' ॥ (उद्योगपर्व). रूपकातिशयोक्ति हा अलंकार रूपकाचाच एक भेद आहे. त्यांत व ह्यांत भेद इतकाच कीं, रूपकांत उपमान व उपमेय ह्या दोहोंचाहि उल्लेख असतो. रूपकातिशयोक्तींत उपमेयाचा उल्लेख मुळींच नसतो. ह्या अलंकारानें तसेंच रूपकाचें पर्यवसान सादृश्यातिशयाकडे आहे. . . **या चरणांत उद्योगाचें जें तत्त्व प्रतिपादिलें आहे तें अत्यंत महत्त्वाचें आहे. उद्योग** -कोणतेंही कार्य पार पाडण्यास स्वोद्योग पाहिजे, ईश्वरप्रसाद मिळवावयाचा असला तरी स्वोद्योग पाहिजे, स्वोद्योग नसेल तर कार्यसिद्धि व्हावयाची नाहीं, चातकाला जर मेघोदक पाहिजे तर त्यानें तोंड उघडलें पाहिजे. एरवीं तें प्राप्त व्हावयाचें नाहीं. God helps those who help themselves ह्या आशयाचा वरील चरण आहे. संस्कृत वचनेंही अशा अर्थाचीं अनेक आहेत:-(१) दैवं पुरुषकारेण साध्यसिद्धिनिबंधनम्. (२) न स्वयं दैवमादत्ते पुरुषार्थमपेक्षते. (३) उद्यमेन हि सिद्ध्यंति कार्याणि न मनोरथैः। नहि सुप्तस्य सिंहस्य प्रविशंति मुखे मृगाः ॥ (४) उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीर्दैवेन देयमिति कापुरुषा वदंति। पंतांच्या काव्यांत अशीं नीतिमार्गप्रदर्शक वचनें पुष्कळ आढळतात. पंतांचें काव्य हें उदात्त विचारांचें आणि उन्नत नीतितत्त्वांचें मनोहर मंदिर होय असें म्हटलें तरी चालेल. **या केकेंत 'प्रसाद' गुण साधला आहे. काव्याचे गुण प्रमुख्यत्वें तीन आहेत:-माधुर्य, ओज आणि प्रसाद.** ज्या काव्यरचनाविशेषापासून अंतःकरणास द्रव उत्पन्न करणारा आल्हाद उत्पन्न होतो तो माधुर्य होय. हें माधुर्य संभोगशृंगार, करुण, विप्रलंभशृंगार ह्या रसांत अनुक्रमें अधिकाधिक असतें. अंतःकरणाचें दीपन अथवा विस्तार करणारा गुण ओज. हा गुण वीर, बीभत्स आणि रौद्र ह्या रसांत क्रमानें अधिकाधिक असतो. **वाळलेल्या लांकडांस जसा अग्नि लवकर व्यापून टाकतो त्याप्रमाणें शब्द ऐकतांच अर्थबोध होऊन जो तत्काळ चित्ताला व्यापून टा-**

शिवे[1] न तुझिया[2] पदा[3] अदयताख्य[4] दोष क्षण[5];
प्रभो! चुकतसों[6], तरी करिसि तूंचि संरक्षण[7]।

कतो तो प्रसाद गुण समजावा. हा गुण सर्व रसांत सारखाच आढळतो. प्रसाद गुणाला अनुकूल अशी पदरचना अथवा रीति पांचाली होय. दोन तीन पदांपर्यंतच फक्त जेथें समास असतात तेथें ही पांचाली रीति मानतात. ज्या रचनेंत समासयुक्त शब्द मुळींच नसतात व असले तरी क्वचित् असतात, ती वैदर्भी रीति जरि मुख्यत्वें माधुर्यगुणाची व्यंजक आहे तरी ती प्रसाद-गुणाला प्रतिकूल नाहीं. याप्रमाणें माधुर्य, ओज व प्रसाद असे तीन प्रधान काव्यगुण असून वैदर्भी, गौडी व पांचाली ह्या अनुक्रमें त्या त्या गुणाच्या व्यंजक रीति मानल्या आहेत. ७. **पक्ष्यानें, अर्थसंदर्भानें चातकपक्ष्यानें.** 'पांखरूं' हा शब्द संस्कृत 'पक्ष' (पंख) यापासून निघाला आहे. संस्कृत शब्दांतील 'प' किंवा 'क्ष' यास 'ख' आदेश होतो. जसें रक्षा–राख, हर्ष=हरीख, परीक्षा–पारख इत्यादि.

१. स्पर्शे. (प्रास्ताविक):—'माझे मागील अनेक अपराध आठवून तुम्ही माझ्या कवितावधूचा स्वीकार करणार नाहीं आणि माझी उपेक्षा कराल, असें म्यां ३४ व्या केकेंत म्हटलें, ही माझी चूक आहे, यांत तुम्हाकडे निर्दयतादोष येत नाहीं;' असा स्वाभिप्राय व्यक्त करून मागील केकेंतील सिद्धांताचें समर्थन करित होत्साते कवि म्हणतात. 'प्रभो! अदयताख्य दोष तुझिया पदा क्षण न शिवे; [हे प्रभो!] चुकतसों, तरी तूंचि संरक्षण करिसि, अद्यापि ती शरणागती घडलि नसेचि [हेंच] सत्य; विषय रुचे; ज्यां अमृत मिळे, ते मद्या न पिती'–असा अन्वय. २. तुझ्या. 'झाल्या, केल्या, त्याच्या, माझ्या, तुझ्या इत्यादि शब्दांचें संयोगकृत कठोरत्व कमी करण्याकरितां किंवा छंदांच्या अनुरोधानें या शब्दांचीं कवितेंत झालिया, केलिया, त्याचिया, माझिया, तुझिया अशीं रूपें करतात.' [पद्यरत्नावली–मराठी कवितेंतील व्याकरणाचें विशेष.] याजविषयीं आणखी उदाहरणें मागें केका १८, पृ० ५२, टीप ३ पहा. ३. पदाला, पायाला. पायांला शिवत नाहीं मग आंगाला कोठून शिवणार–असें तात्पर्य. यांत 'काव्यार्थापत्ति' अलंकाराची छटा आहे. येथें पायास शिवत नाहीं असें सांगून कवीनें आपली विनयोक्ति दर्शविली. ४. अदयता आहे आख्या (संज्ञा) ज्याची, निर्दयतासंज्ञक दोष (दूषण), ज्याला निर्दयपण असें म्हणतात तें दूषण. ५. क्षणभरहि. ईश्वर अत्यंत सदय आहे, तो निर्दय आहे असा शब्द त्याला कोणाच्यानेंही क्षणमात्र लावितां येणार नाहीं. ६. चुकतों, अपराध करितों. आम्ही मनुष्यें वारंवार अपराध करितों तरी आम्हास दंड न करितां, उलट तूं सर्व अपराध पोटांत घालून आमचें चांगल्या रीतीनें संरक्षणच करितोस. तूं सदय मनानें आमचा प्रतिपाळ करतोस, तेव्हां तुला निर्दय कोण म्हणेल?–आतां तुझ्या दयेचा लाभ आम्हांस होत नाहीं याचें कारण आम्ही तुला अनन्यभावानें शरण येत नाहीं हेंच होय. या केकेंतील पहिल्या दोन चरणांशीं ख्रिस्ती शास्त्रांतील पुढील पद्य अत्यंत समानार्थक आहे.–' *To the Lord our*

नसेचि शॅरणागती घडलि सत्य अद्यापि ती;
रुचे विॅषय; ज्यॅां मिळे अॅमृत, ते न मॅद्या पिती. ॥ ४१

*God belong mercies and forgiveness, though we have rebelled against him.* (Dan IX.9) ७. **पालनपोषण, उद्धार.** भक्ताचें पालन करणें हें प्रभूचें ब्रीद आहे. पंत म्हणतातः–'प्रभु भक्तातें जपतो, तैसा न निजाहि फार देहा.' [नरसिंहमहात्म्य ८].

१. **शरण+आगती=शरण येण्याची क्रिया. शरण=रक्षणकर्ता, रक्षण करण्याला समर्थ. आगति=येणें. रक्षण करण्याला जो समर्थ त्याजकडे 'माझें रक्षण कर' म्हणून नम्रपणानें येणें. जे परमेश्वरास अनन्यभावें शरण येतात त्यांस ईश्वरी दयेचा लाभ सहज होतो.** [गीता–अ० ९ श्लो० २३.] ख्रिस्ती शास्त्रांतील पुढील वचनाशीं हें वचन ताडून पहावीः–'*The sacrifices of God are a broken spirit, a broken and Contrite heart, O God! thou wilt not despise.*' (Ps 51-17.) या अर्थाचीं संतांचीं अनेक वचनें आहेत. स्थलसंकोचास्तव तीं येथें दिलीं नाहींत. **शरण येण्याची क्रिया माझ्या हातून जशी व्हावयास पाहिजे तशी ही वेळपर्यंत घडली नाहीं हें खरें आहे.** भगवन्नामास उद्देशून पंतांनीं म्हटलें आहे:–'जे शरणागत झाले ते नामा! त्वत्पदीं मिठी प्राज्य। कल्पशतींही न मरे ऐसें देसी तयांस साम्राज्य.' ॥ २४ ॥ [नाममाहात्म्य–पृ० ३४८.] तसेंच 'नामरसायन' गी० ७६-७८ पहा. **जे वास्तविक शरणागत आहेत त्यांचा उद्धार प्रभुकृपेनें होतोच होतो असें सांगण्याचें तात्पर्य आहे.** २. **स्त्रीपुत्रधनादि विषय. अजून मी तुला खरोखरी शरणच आलों नाहीं. याला प्रमाण मला मद्याप्रमाणें मोहक असे स्त्रीपुत्रधनादि प्रापंचिक विषय आवडतात. जो परमेश्वराला अनन्यभावें शरण गेला त्याला विषयसुखाचा वीट येऊन संसार असार भासावयास लागतो, तसा प्रकार माझा नाहीं.** ३. **ज्या मनुष्यांला.** ४. **सुधा किंवा मोक्ष. ज्यांला अमृत प्यावयास मिळतें ते मद्याकडे ढुंकून सुद्धां पहात नाहींत.** येथे **अर्थांतरन्यास** नामक अलंकार झाला आहे. [मागें केका २ टीपा, पृ० ८, टीप २ पहा.] याचीं निवडक उदाहरणें:–(१) समयीं विक्रम करणें याहुनि पुरुषा नसे पराभूषा (हरि० ४८-१०८). (२) स्त्री श्रमरहिता भोगें देह बहु करुनि न पुष्ट माजावी (हरि० ४४-४७), (३) कालाची गति उग्रा कोणाहि भविष्य बा परतवेना (हरि० ४४-२७), (४) जें समयाचें भेदक अपवित्र जगांत तें शवापरिस (हरि० ४३-१०), (५) अर्क प्रिय नलिनींस, स्त्रीस रुचिर, शूरमतिस नो कर्क (हरि० ४२-२५), (६) स्त्रीधर्षणें बुडे यश, मानी वपुस न, जपो कलत्रास (हरि० ३७-४५), (७) जो सुप्रजा न, वंध्यचि तो पुरुष; न पुत्र मूर्त अघव्याला (शल्य २-११२). **ज्यांस अमृत (सुधा) मिळतें ते लोक मद्य (आसव) पीत नाहींत ही सामान्योक्ति. हिचें समर्थन–अद्यापि मला प्रसादलाभ झाला नाहीं म्हणून विषय रुचतो, प्रसादलाभ होता तर विषय न रुचता–अशा विशेषोक्तीनें केलें म्हणून अर्थांतरन्यास. मोरोपंती सुभाषितें:–पं**तांच्या काव्यांत या अलंकाराचीं उदाहरणें हीं आकाशांतील तारकासमुदायाप्रमाणें चहूंकडे मुबलक सांपडतात, व त्यामुळें पंतांची कवितावधू नक्षत्रांप्रमाणें शोभायमान

विपाक न गणोनि म्यां, प्रकट आपुल्या घातकें
कळोनि अमितें बळें विविध जोडिलीं पातकें. ।
'क्षमस्व भगवन्नजामिलसखोऽस्मि' ऐसें तुला

---

अशा नक्षया ज्यावर काढल्या आहेत असें वस्त्र परिधान करून आपल्या सहज लावण्यास द्विगुणित शोभा आणित आहे, व अशा रीतीनें वाचकांचीं मनें आपल्याकडे आकर्षण करून घेत आहे असें कोण म्हणणार नाहीं? या अलंकाराचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांतून निवडून देणें म्हणजे वालुकामय प्रदेशांत फिरणाऱ्या पांथास दोन चार वाळूचे कण वेंचून दाखविण्यासारखेंच आहे. तथापि त्यांचीं निवडक उत्कृष्ट उदाहरणें पुरवणींत पहावीं. **ज्यापेक्षां मला धनदारादि-विषय आवडतात त्यापेक्षां ईश्वराचा अनुग्रह मजवर झाला नाहीं व त्याचें कारण प्रभु निर्दय हें नसून मीच वास्तविक रीतीनें प्रभूला शरण गेलों नाहीं हें होय** हा चतुर्थ चरणाचा अर्थ. **'अमृत' शब्दाचे अनेक अर्थ** आहेत, त्यांत सुधा आणि मोक्ष हे प्रसिद्ध होत:— (४) अमृतं यज्ञशेषे स्यात्पीयूषे सलिले धृते । अयाचिते च मोक्षे च ना धन्वन्तरिदेवयोः ॥ [मेदिनी.] न म्रियन्तेऽनेन इति अमृतम्. **व्युत्पत्ति:—जें प्याल्यानें मनुष्य मरत नाहीं तें अमृत.** अमृतप्राशनानें देव अमर झाले हें प्रसिद्ध आहे. ५. **मद्य=दारू.** 'मदिरा कश्यमद्ये च' इत्यमरः। माद्यन्त्यनेन इति मद्यम्. **व्यु०—ज्यानें प्राणी मत्त होतो तें मद्य.**

१. **परिणाम. (प्रास्ताविक):—मागल्या केकेंत दर्शविल्याप्रमाणें स्त्रीपुत्रधनादि वैषयिक सुखावर अजून आपली आसक्ति आहे हा मोठा अपराध होय असें कबूल करून पंत भगवंताची क्षमा भाकितात. 'म्यां (मी) विपाक (परिणाम, मी जीं कर्मे करितों त्यांचा परिणाम) न गणोनि (लक्ष्यांत न आणतां, तुच्छ मानून, तिकडे कानाडोळा करून) प्रकट (स्पष्ट) आपुल्या घातकें (घात करणाऱ्यानें, आपला घात करणारा जो त्यानें) कळोनि (जाणूनबुजून, बुद्ध्या) बळें (मुद्दाम, स्वप्रेरणेनें) विविध (नाना प्रकारचीं) अमितें (असंख्य) पातकें (पापें) जोडिलीं (केलीं, संपादिलीं)' असा अन्वयार्थ. वैषयिक सुखाकडे वृत्ति ठेवल्यानें भयंकर परिणाम होतो हें मनांत न आणतां मी देवा! जाणूनबुजून, कोणाचें न ऐकतां, नानाप्रकारचीं असंख्य पातकें केलीं.** २. **स्पष्ट, निःसंशय. 'कट' हा प्रत्यय वि, नि, सं, प्र आणि उत् या उपसर्गांस लावल्यानें नानार्थक शब्द होतात:**—विकट (भय, भयंकर), निकट (शेजार, जवळ), संकट (विघ्न), प्रकट (उघड), उत्कट (फार, मत्त). ३. **'क्षमस्व' हें 'क्षम्—सहने' या धातूचें आज्ञार्थाचें रूप आहे; क्षमा कर. मी मोठा पापी दंडास पात्र आहें अशी भीति बाळगून उत्तरार्धांत कवि भगवंताला प्रार्थितात.** ४. **भगवन्+अजामिलसखः+अस्मि. 'क्षमस्व भगवन्नजामिलसखोऽस्मि' एवढें लांब पद केवळ संस्कृत आहे.** प्रथमार्धांत प्रसाद गुण असून द्वितीयार्धांत ओज गुण आहे. ओजोगुणाची रीति (रसाला अनुकूल पदरचना) गौडी आहे. जींत चार पदांपेक्षां अधिक पदांचे समास असतात अशा रचनेस गौडी रीति ह्मणतात. हा ओजो गुण व त्याची गौडी रीति

शांत रसाला अनुकूल नाहीं. **पं**तांस आपल्या काव्यांतून लांब लांब समास व लांब लांब संस्कृत वाक्यें घालण्याची फार हौस होती असें त्यांचें काव्य वरवर वाचणारांस सुद्धां दिसून येईल. **लांब संस्कृत वाक्यांचीं थोडीं उदाहरणें**:-(१) 'संश्रितजनकल्पतरोर्जयतितरां यदुशिरोमणेः कृपया' कर्ण० ५०-६८), (२) 'भगवन् सांब नमस्ते शर्व नमस्ते महेश्वर नमस्ते । त्वं प्रभुरसि शिव जगति त्रातुं शरणागतानिह समस्ते' (हरिवंश ५०-३८), (३ 'प्राज्ञस्तोषं जनयेत् तदेव शिव पूजनं' अशा उक्ति (कर्ण० ४१-८२), (४) 'काचस्मृतिरपि तापसि मैवं प्रलपात्र भूभुजः सदसि' (आदि० १२-६३), (५) परिसुनि धर्म वदे 'अयि सति कुंति मनं दर्शा कि ते' नें (आदि० १८-६४), (६) 'ब्रूयात्क्षमी गभीरोऽसीति बत युधिष्ठिरं प्रभुं को न' (सभा० अ० ४ गी० ८५), (७) 'इदमपि धनं जितं ते' शकुनि म्हणे दीप्तपावक पटानें (सभा० ४-५५), (८) भीष्म प्रसन्न गिरे 'वार्ष्णेय! स्वागतं तव' असेंच (भीष्म० ११-२५) याचीं आणखी ठळक उदाहरणें पुरवणींत पहावीं. यामुळें त्यांच्या काव्यास संस्कृत काव्याप्रमाणें प्रौढता आली आहे. आपल्या काव्यांत संस्कृत शब्द, पदें व समास यांचा फार भरणा असल्यामुळें ते उलगडावयास लोकांस प्रयास पडतील व कदाचित् त्यांना तें आवडणारही नाहीं असा **पं**तांना धाक वाटला असावा असें पुढील मंत्र रामायणांतील गीतींवरून दिसून येईल. '**गीर्वाणें शब्द पुष्कळ,** जनपदभाषांचि दिसतां थोडी, । यास्तव गुणज्ञ लोकीं याची ध्यावी हळू हळू गोडी. ॥ १७ ॥ **प्राकृतसंस्कृतमिश्रित,** यास्तव कोणी म्हणेल जरि कंथा। भवशीतभीतिभीत स्वांताला दाविला बरा पंथा ॥ १८ ॥' [रामायणें भाग १–मंत्ररामायण–उपोद्घात–पृ० ४०] **(हे) भगवन्! [हे देवा!] अजामिलसखः (शूद्राप्रमाणें आचरण करणाऱ्या अजामिळ नांवाच्या ब्राह्मणाचा मी सखा–मित्र=अजामिळासारखा महापापी) अस्मि (आहें) क्षमस्व (म्हणून माझ्या अपराधांची क्षमा कर). देवा! शूद्रस्त्रीशीं रममाण होणाऱ्या अजामिळ नामक ब्राह्मणाधमाप्रमाणें मीही पापनिमग्न झालों आहें; तेव्हां जशी तुम्हीं अजामिळावर कृपादृष्टि करून त्याचा उद्धार केलात त्याचप्रमाणें माझ्या अपराधाची मला क्षमा करून माझाही उद्धार करा–हा भावार्थ.** पंतांनीं आपल्यास 'अजामिळसख' म्हटलें आहे ही त्यांची केवळ विनयोक्ति समजावी. तुकोबांनी व इतर भगवद्भक्तांनीं आपल्याविषयीं असेच उद्गार काढिले आहेत. पंतांच्या चरित्रावरून व त्यांच्या पुष्कळ प्रेमळ उक्तींवरून ते फार सदाचारसंपन्न असावे असें दिसतें. त्यांची 'सन्मनो-रथराजि' सारखीं लघुकाव्यें याचीं चांगली साक्ष देतात. उदाहरणार्थ 'सन्मनोरथराजि' तील एकच अर्ध पहा:–'मज अन्यकलत्राचें स्पर्श न विटवू जसें चहाडाचें ॥' **कथासंदर्भः**– केका २ पृ० ७ यांत 'अजामिळ' कोण हें सांगितलें आहे. ५. **मित्र. 'सखा' शब्दाची व्याख्या** पुढीलप्रमाणें केली आहे:–'अत्यागसहनो बंधुः सदैवानुमतः सुहृत् । एकक्रियं भवेन्मित्रं समप्राणः सखा स्मृतः ॥.' पुष्कळ अपराध केले तरी जो ते सहन करितो त्याला '**बंधु**' म्हणावें, नेहमीं ज्याचें आपलें मत एक असतें त्याला '**सुहृत्**' म्हणावें, जे एकाच वेळीं सारखाच उद्योग करितात त्यांला **मित्र** म्हणतात, व ज्याचा आपला एक जीव त्याला **सखा** म्हणतात. मूळ संस्कृत शब्द 'सखि' असून अजामिळ शब्दापुढें येऊन येथें तत्पुरुष समास झाला म्हणून 'राजाहःसखिभ्यष्टच्' या सूत्रान्वयें 'अजामिळसखः' असा सामासिक शब्द झाला. 'अथ मित्रं सखा सुहृत्' इत्यमरः.

म्हणें नमुनियां [1]सुदुस्तरविपन्नदीसेतुला. ॥ ४२

नें[3]व्हे अनृत, सत्य तें, [4]अचल [5]ऊंचलीला करें

१. सु+दुस्तर+विपत्+नदी+सेतुला=तरावयास अत्यंत कठीण अशी जी विपत्तिरूप नदी तिचा सेतु (पूल) जो तूं त्या तुला. भगवन्नाम हें दुःखरूप समुद्रांत सेतूप्रमाणें उपयोगीं पडतें. माझ्या हातून नानाप्रकारचीं असंख्य पातकें घडलीं आहेत व मी केवळ शूद्रस्त्रीशीं रत होणाऱ्या अजामिळाचा सवाच शोभलों म्हणून देवा! तुम्ही मला पापरूप विपत्तींत सेतूप्रमाणें होऊन माझा उद्धार करा एवढी माझी आपणास प्रार्थना आहे. भगवद्भक्तांस पश्चात्ताप झाला म्हणजे त्यांस आपलीं पापें डोंगराएवढीं मोठीं (जरी तीं रेणुप्रमाणें लहान असलीं तरी) दिसूं लागतात त्याचें हें एक प्रमाण आहे. तुकारामाच्याही अशाच प्रकारच्या उक्ति आहेत, त्यांपैकीं एक पुढें देतों:—'मी तों अपराधांची राशी । शिखा अंगुष्ठ तो पाशीं ॥.' 'मोजूं शकेल गगनीं भगणासि कोणी । ऐसा असेल अणु जो गगनासि आणी । मद्दुष्कृतें कवण मोजिल फार काळीं । रामा नव्हेल गणना वदतो त्रिकाळीं ॥ ३५ ॥' (हरिराजकृत 'रामार्या' भाषांतर). व्यंकटेशस्तोत्रकार म्हणतातः—'माझिया अपराधांच्या राशी । भेदोनि गेल्या गगनासी । दयावंता हृषीकेशी । आपुल्या श्रीदासी सत्य करीं ॥.' '*For Thy name's Sake, O Lord, pardon my iniquity ; For it is great.*' ( Ps. XXV. ) ही डेव्हिडाची प्रभूस प्रार्थना. तोच पुढें आपल्या पापांबद्दल म्हणतो:—'*For mine iniquities are gone over mine head : as an heavy burden they are too heavy for me.*' (Ps. 38.) येथें मी आपलाच घातक आहें म्हणून विविध पातकें जोडिलीं असा दुसऱ्या वाक्याचा पहिलें वाक्य हेतु दिला आहे, यास्तव हा हेतु अलंकार जाणावा. चवथ्या चरणांत रूपक आहे. २. (प्रास्ताविक):—'पूर्वीं तुम्ही पुष्कळ पाप्यांचा उद्धार करून आपला पराक्रम गाजविलात, पण मजसारख्या पापकर्दमांत खोल रुतलेल्या मनुष्याचा उद्धार केला नसेल, म्हणून ही परीक्षेची वेळ आहे अशा अभिप्रायानें कवि म्हणतात.' बृहदुदारलीलाकरें हरिमदापहें तुवां करें अचल ऊचलिला तें सत्य, अनृत नव्हे. जरि या जडासि कर्दमीं एकटा समुद्धरसि, तरि मी तुला भुवनत्रयीं भला मर्द म्हणेन—असा अन्वय. ३ असत्य, खोटें. अन् (नाहीं)+ऋत (सत्य)=सत्य नाहीं तें (असत्य). ४. पर्वत. 'अद्रिगोत्रगिरिग्रावाचलशैलशिलोच्चयाः' इत्यमरः. 'चल' (हालचाल) नाहीं तो 'अचल.' अर्थसंदर्भानें गोवर्धनपर्वत. ५. अंगुलीवर धारण केला. कवितेंत शब्दांस ऱ्हस्व किंवा दीर्घ ईकार योजण्याची चाल आहे. या नियमास अनुसरून ऊचलिला, उचलिला, ऊपडिला उपडिला, अशीं रूपें होतात. तात्पर्य येथें ऱ्हस्व 'उ'कारास्तव दीर्घ 'ऊ'कार घातला आहे. संस्कृतांतील शब्द प्राकृतांत येतांना असा नियम आढळतो कीं पुढील संयुक्ताक्षराच्या योगानें मागील स्वरास दीर्घत्व देऊन संयुक्ताक्षरांतील पहिल्या वर्णाचा लोप होतो; जसें पत्तन—पाटण, हस्त—हात, कर्म—काम, उच्चलित=ऊचलित, उष्ण—ऊन, पिष्ट—पीठ इ०. याचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत बरींच *सांपडतातः—(१) माळा ऊचलितां,

तुवां [1]हरिमदापहें [2]बृहदुदारलीलाकरें. ।
[3]समुद्धरसि [4]एकटा जरि [5]जडासि या [6]कर्दमीं,

---

•(उचलली तेव्हां) प्रिय आपणहि रथावरूनियां लवला- [कृष्णविजय -अ० ६७ गी० ४२ उत्तरार्ध.] (२) सज्ज करुनि **ऊचलितां** चापभरें कंप मखि! शिरे अंगीं. [कृष्णविजय–उत्तरार्ध–अ० ७५ गी० ६०.]

१. **हरि (इंद्र)+मद (गर्व)+अपहें (हरण करणाऱ्यानें) इंद्राचा गर्व हरण करणाऱ्या (तुवां): अपह (अप–हन्) म्हणजे नाशक, घातक** (या शब्दांत हन् (मारणें, नाश करणें) या धातूला 'अप' उपसर्ग लागून झाला आहे. वृत्रहा (वृत्रहन्=इंद्र), शोकापह (शोकापहन् =शोकनाशक), तमोपह (सूर्य) इत्यादि अन्य शब्द अशाच प्रकारानें झाले आहेत. हे सर्व कर्तृवाचक नामें आहेत. **येथें कृष्णानें गोवर्धनपर्वत उचलून इंद्राच्या गर्वाचा नाश केला** ह्या कथेकडे लक्ष्य आहे. या कथेची विशेष माहिती केका ५, पृष्ठ १५, टीप २ यांत दिली आहे. **'हरिमदापहें' हें विशेषण अचल उचलण्याचें कारण दाखविणारें आहे म्हणून हा काव्यलिंग अलंकार होय.** [केका ८ पृ० ३० टीप २ पहा.] २. **बृहत् (अतिशय)+उदार (हितकर)+लीला (जगदुत्पत्त्यादि आश्चर्यकारक क्रिया)+आकर (खाण) जो तूं त्या त्वां. सृष्ट्युपत्त्यादि अद्भुत क्रिया ईश्वराकडून घडतात त्या केवळ लीलेनेंच. सृष्ट्युत्पत्त्यादि अद्भुत चमत्कार करणाऱ्या तुम्हीं इंद्राचा गर्व हरण करावा या इच्छेनें एकट्यानें गोवर्धनपर्वत उचलिला ही गोष्ट कांहीं खोटी नव्हे, खरी आहे. 'बृहदुदारलीलाकरें' हें पद अचल उचलिला–या अर्थाचें पोषक आहे म्हणून साभिप्राय आहे, तेव्हां परिकर अलंकार झाला आहे.** परिकराचें एक उदाहरणः–'जो **भूतसुहृत्** कांहीं त्याआधा कळवळोनि कां हा कीं.' (सन्मणिमाला). ३. **उद्धार करशील. गोवर्धनपर्वत उचलून मिळविलेल्या कीर्तीपेक्षां माझा उद्धार केल्यास तुमची जास्त कीर्ति होईल असें कवि या शेवटल्या दोन चरणांत दाखवितात.** ४. **एकाकी, दुसऱ्या कोणाच्या साह्यावांचून.** 'एकदां' असाही दुसरा पाठ **आहे,** त्यांत सौरस्य नाहीं. 'एकदां समुद्धरशील तर तुला मर्द म्हणेन' यांत मर्द म्हणण्याजोगा पराक्रम नाहीं. एकटा म्हणजे असहाय असून जर जडाचा उद्धार करशील तर तुला मी मर्द म्हणेन यांत मर्दपणा आहे. 'एकदां' म्हणजे 'एकदांचा' (एक वेळ नव्हे) असा अर्थ घेतला असता, 'एकदां' हा पाठ स्वीकारार्ह दिसतो. 'जरि या जडाला एकदां म्हणजे (एकदांचा) समुद्धरसि तरि तुला भला मर्द म्हणेन.' 'एकदां' म्हणजे 'एकदांचा' असा अर्थ 'जा **एकदां** निघून,' 'एवढें जर **एकदां** कराल तर तुमचा पराक्रम खरा' इत्यादि वाक्यांत दिसून येतो. आणि तो येथें घेतला तरी चालेल. ५. **जड=मूर्ख; जडपदार्थ.** 'जड' शब्द येथें श्लिष्ट आहे. या शब्दावर पंतांनीं पुष्कळदां श्लेषयोजना केलेली आढळते. **श्लेषालंकाराचा तपशीलः**–'नानार्थसंश्रयः श्लेषो वर्ण्यावर्ण्योभयाश्रितः । सर्वदो माधवः पायात् स योऽगं गामदीधरत्' (कुवलयानंद). **'प्रकृताप्रकृतोभयगत बव्हर्थश्लेष विबुध संमत तो । सुशरण देवो-माधव अचला सुरवाहिनीस जो धरितो ॥ १ ॥ हरिणें** संयुत ऐसा **जलजासम** मुख तुझें सुतेजाळ । **कीलाल** बहुत उसळे, परि शोभे फार **वाहिनीपाळ ॥ २ ॥ अनेकार्थ शब्दांची रचना ती 'श्लेष' अलंकार**

म्हणेन[1] भुवनत्रयीं तरि तुला 'भला मर्द[2]' मी ॥ ४३

**होय.** हा श्लेष तीन प्रकारचा आहे:–१ प्रकृतानेकार्थविषयक, २ अप्रकृतानेकार्थविषयक व ३ प्रकृताप्रकृतानेकार्थविषयक. वरील तिन्ही यांचींच क्रमानें उदाहरणें आहेत. पहिल्या उदाहरणांत स्तवनीयत्वानें प्रकृत अशा शिवविष्णूंचें वर्णन आहे म्हणून तो **प्रकृतश्लेष.** शरण=१ रक्षण, २ रक्षक. देवो माधव=१ देव उमाधव, २ (पक्षीं) माधव (विष्णु) [सुशरण] देवो. अचला=१ गोवर्धन पर्वतास, पृथ्वीस, (पक्षीं)२ स्थिर. सुरवाहिनी=१ देवसेना, २ भागीरथी. दुसऱ्या उदाहरणांत 'जलज' म्हणजे 'कमळ' आणि 'चंद्र' हीं दोन्हींही उपमानेंच असल्यामुळें अप्रकृत असून त्यांचें वर्णन आहे म्हणून तो अप्रकृत श्लेष होय. हरिणें संयुत=१ हरिणानें संयुत, २(हरिनें) सूर्यानें युक्त. तिसऱ्यांत वाहिनीपाळ म्हणजे १ समुद्र आणि २ सेनापति. त्यांत रणांगणामध्यें अस्त्रप्रहारांनीं ज्यांचें कीलाल म्ह. रक्त वर उडत आहे अशा प्रकृत सेनापतीचें तसेंच कीलाल म्हणजे जल त्यांत फार उसळतें त्या अप्रकृत समुद्राचेंही वर्णन आलें आहे म्हणून हा **'प्रकृताप्रकृत श्लेष'** जाणावा'. (अ.वि.) **गोवर्धनपर्वत फार जड असून तो तुम्हीं उचलला म्हणून तुमची कीर्ति झाली, मी (मोरोपंत) देखील जड (मूर्ख, पापी) आहें व कर्दमीं(पापरूपी चिखलांत) रुतलेला आहें, म्हणून ज्याप्रमाणें गोवर्धनधारण तुम्हीं एकट्यानें केलें, त्याचप्रमाणें माझा उद्धार इतर देवांच्या साहाय्याशिवाय जर तुम्ही केलात, तर त्यांत तुमची फार मोठी कीर्ति होईल. पंतांची श्लेषयोजना:–पं**तांना जरि श्लेषचमत्काराची म्हणण्यासारखी गोडी नव्हती, तरी त्यांनीं आपल्या काव्यांत मधून मधून श्लेषयोजना केलेली आढळते. जेथें जेथें श्लेष आले आहेत तेथें तेथें ते सहज रीतीनें येण्याजोगे असून त्यांत ओढाताण मुळींच दिसून येत नाहीं. फिरून कांहीं नेमक्या शब्दांवरच, त्यांनीं श्लेषयोजना केलेली आढळते; हा सर्व प्रकार येथून तेथून साधा, सरळ, सरस आणि हृदयंगम आहे. याचीं कांहीं उदाहरणें पुरवणींत दिलीं आहेत तीं पहावीं १. **चिखलांत. पापरूपी चिखलांत. कर्दम=चिखल.** ['निषद्वरस्तु जम्बालः पङ्कोऽस्त्री शादकर्दमौ' इत्यमरः। चिखलाला पांच शब्द संस्कृतांत आहेत, निषद्वर, जम्बाल, पंक, शाद आणि कर्दम.] **या कर्दमीं--या कर्दमापासून–या भवतापापासून.** येथें 'भवताप' पदाचें निगरण करून त्याचें प्रतिद्वंद्वि जें 'कर्दम' पद त्यानें बोध केला आहे. तसेंच कवि (आपण) पदाचें निगरण करून त्याजबद्दल 'जड'पद ठेविलें आहे, म्हणून **येथें रूपकातिशयोक्ति झाली आहे.**

१. **'भला मर्द' अशी तुझी स्तुति करीन.** २. **हुशार, बहादूर, पराक्रमी.** हा शब्द **फारशी** आहे. **पापरूपी चिखलांतून जड अशा मला जर देवा! तुम्हीं बाहेर काढलें तर मात्र तुम्ही बहादूर खरे, नाहीं तर गोवर्धनधारणादि आपले सर्व पराक्रम मी व्यर्थ समजेन.** 'रामप्रार्थनादशकां'तील पुढील श्लोक पहा:–'तुझ्या प्रतापें आम्हांतें या काळीं जरि पाळिलें। तरी सांभाळिलें सर्व यश नातरि वाळिलें ॥' **तूं जर मला या कर्दमापासून उचलशील, तर तुला मी मर्द म्हणेन, अमुक झालें तर अमुक होईल अशा अर्थाचें हें वर्णन आहे म्हणून हा संभावनालंकार होय. जेथें एखादी गोष्ट सिद्ध करण्यासाठीं 'असें असतें तर असें झालें असतें,' असा तर्क (कल्पना) केला असतो तेथें हा अलं-**

चिकित्सक 'भला भला' म्हणुनि फार वाखाणिला;
जरी बहुजनामयद्रुम समूळही खाणिला, ।
तथापि अतिदु:सहस्वगदशत्रुच्या अत्यया-
विना, न हृदयीं धरी सरुज पामर प्रत्यया. ॥ ४४

---

**कार होतो. 'संभावनं** यदीत्थं स्यादित्यूहोऽन्यस्य सिद्धये । यदि शेषो भवेद्वक्ता कथिताः स्युर्गुणास्तव' (कुवलयानंद). **व्यंग्यार्थसिद्धिकरितां कल्पन संभावना कवि म्हणेल । वक्ता महस्रमुख होइल तरिच विभो! तुझे गुण स्तविल (श्रीनिप्र०).** याची उदाहरणें:—(१) आत्याबाईला मिशा असत्या तर काका म्हटलें असतें. (२) मी जर चतुर्मुख होईन तर विभूला वर्णीन. (३) मी जर पुरंदर (सहस्रनेत्र) असतों तर हे नरहरि! तुझें अंगसौंदर्य पाहतों. (४) तेज तुम्हां असतें तरि उरता हाणोनि न विट लातेला । अति वायुला न पीता तेजस्वी दीप न विटला तेला. ॥ [मोरोपंत—विराटपर्व—अ० १ गी० १०१]

१. **धन्वंतरी, वैद्य. (प्रास्ताविक):—'हजारों पाप्यांचा उद्धार परमेश्वरानें केला असला तरी माझा उद्धार होईपर्यंत मी परमेश्वराचे गुणानुवाद गाणार नाहीं (शाबासकी देणार नाहीं). याबद्दल कवि व्यावहारिक दृष्टांत देऊन स्वोद्धारासाठीं प्रार्थना करतात.' [कोणी] चिकित्सक 'भला भला' म्हणुनि [लोकांनीं जरी] फार वाखाणिला, [आणि त्यानें] जरी बहुजनामयद्रुम समूळही खाणिला, तथापि अतिदु:सहस्वगदशत्रुच्या अत्ययाविना सरुज पामर हृदयीं प्रत्यय न धरी—असा अन्वय.** २. **बहु (पुष्कळ)+जन (लोक)+आमय (रोग, व्याधि, गद)+द्रुम (झाड).** 'रोगव्याधिगदामयाः' इत्यमरः. ३. **मूळासकट, पाळांमूळांसह. 'समूळ' हें क्रियाविशेषण अव्यय समजावें.** 'ही' समुच्चयार्थक अव्यय जाणावें. ४. **खणून काढिला, नाहींसा केला. रोगाचें मूळ खणून काढिलें. पुष्कळ लोकांचे रोग त्यानें जरि निःशेष बरे केले असले.** ५. **अति (अत्यंत)+दु:सह (सहन करण्यास अशक्य)+स्वगद (आपले रोग) [हेच]+शत्रू त्यांच्या.** ६. **नाशावांचून. दुसऱ्याचे सर्व रोग बरे केले असले तरी आपल्या अंगांतील असह्य रोग त्यानें बरे केल्याशिवाय रोग्याला धन्वंतऱ्याच्या हुषारीबद्दल विश्वास येत नाहीं.** ७. **स (सह)+रुज (रोग)—रोगी. रोगपीडित.** [रुज्=रोग, 'स्त्री रुग्रुजाचोपतापः' इत्यमरः]. ८. **साधारण मनुष्य. नीच, बुद्धिमंद.** ९. **विश्वासाला. केकार्थः—एखाद्या वैद्यविद्याविशारद धन्वंतऱ्यानें हजारों लोकांचे दु:सह रोग बरे करून सर्वत्र वाहवा मिळविली असली तरी ज्याप्रमाणें एखाद्या क्षुद्र मनुष्याला आपल्या अंगांतील कठीण रोग त्यानें बरा केल्याशिवाय त्याच्या विद्येची खात्री वाटत नाहीं, त्याप्रमाणें जोंपर्यंत देवा! तुम्ही उद्धार करित नाहीं तोंपर्यंत हजारों पाप्यांचा उद्धार केला असला तरी त्याबद्दल माझी खात्री पटत नाहीं, म्हणून माझा उद्धार करून आपल्या दयालुत्वाविषयीं माझा उडणारा विश्वास स्थिर करा. येथें दृष्टांत अलंकार झाला आहे. प्रकृत विशेषार्थाच्या पुष्टीसाठीं अप्रकृत अर्थाचा दाखला देणें त्यास दृष्टांत म्हणतात.** के० ४ वरील टीपा पहा. उदाहरण:—(१) 'अक्षज्ञ नसोनि भरीं भरला स्वगुणेंनि अर्थ हारविला । पडतां गांठ गतश्री होय शशी दोष काय हा रविला' (उद्योगपर्व). ही केका संस्कृतशब्दप्रचुर आहे.

म्हणा मज उतावळा; गुणचि घेतला; घाबरें
असो मन असेंचि बा! भजकबर्हिमेघा! बरें. ।

१. प्रास्ताविकः—'कांहीं काळानें तुझा उद्धार करूं, इतका अधीर कां झालास?', असें कदाचित् देवा! तुम्ही म्हणाल तर त्यावर माझें काय म्हणणें आहे तें मी आतां सांगतों अशा आशयानें कवि म्हणतात. '[हे देवा!] मज उतावळा [म्हणणार तर] म्हणा. [तुम्ही] माझा गुणचि घेतला. बा! भजकबर्हिमेघा! मन [स्वोद्धाराविषयीं] असेंचि घाबरें असो (असावें) [हें] बरें. हें सर्व क्षणिक दिसे, मन घडीचा भरंवसा कसें धरील? [माझें मन] आधिनें चाकसें बहु परिभ्रमे'—असा अन्वय. २. अधीर. मला तुम्ही उतावळा खुशाल म्हणा. ३. हा तुम्हीं माझा गुणच सांगितला. भगवत्प्राप्तीविषयीं अधीर होणें हा तुम्हीं माझा दोष काढिला असें मी मानीत नाहीं, तर हा तुम्हीं माझा गुणच घेतला असें मी समजतों. 'मीं गुणचि घेतला' असा अन्वय करून त्याचा अर्थ स्वोद्धाराविषयीं उताविळ असणें हा गुण मीं स्वीकारिला आहे असा केल्यास तोही सरस दिसतो. तुकारामादि संतांचीं अशींच वचनें आहेत. (१) क्षणक्षणां जीवा। वाटतसे खंती। आठवितां चित्तीं पाय देवा! ॥ उताविळ मन पंथ अवलोकी। आठवा तें, चुकी काय झाली ॥ [तुकाराम—अभंग १८४१], (२) अल्प माझी मती। म्हणुनि येतों काकुळती ॥ आतां दाखवा दाखवा। मज पाउलें केशवा! ॥ धीर माझ्या मना। नाहीं नाहीं नारायणा! ॥ तुका म्हणे दया। मज करा अभागिया. ॥ [तुकाराम—अभंग ४१८]. (३) 'काय माझा आतां पाहतोसी अंत। येईं बा धांवत देवराया ॥ १ तुजविण होईल जीवासि आकांत। येईं बा धांवत देवराया ॥ २ येरे येरे देवा! नामा तुज बाहत। येईं बा० ॥ ३ (४) बायबलांत ईश्वरभक्त 'डेव्हिड' राजा अनुग्रहविषयीं असाच उताबीळ झाला होता. पुढील प्रार्थना पाहाः—'How long wilt Thou forget me, O Lord? for ever? how long wilt thou hide thy face from me? How long shall I take counsel in my soul, having sorrow in my heart daily? consider and hear me, O Lord my God.' (Psalm XIII) येथें उताविळपणा हा दोष असून गुणच मानिला आहे, म्हणून हा अनुज्ञा अलंकार होय. [मागें केका १४–पृ० ४४, पहा.] गुणचि घेतला=हा गुण मीं मुद्दाम घेतला आहे. उतावीळपणा हा गुण मीं मुद्दाम धारण केला आहे असें कवि म्हणतो—असा अर्थ कोणी कोणी करतात. ४. उतावळें, भगवत्प्राप्तीविषयीं कासावीस. ५. भजक(भक्त)+बर्हि (मोर)+मेघा! (जलदा!)—भजकरूपी मयूरांस आनंदविणाऱ्या मेघा! मयूरास मेघदर्शन झालें म्हणजे फार आनंद होतो त्याप्रमाणेंच परमेश्वराच्या प्राप्तीविषयीं भक्तजन फार उत्कंठित असतात. भक्तमयूरानंदजनक अशा मेघा! स्वोद्धाराविषयीं माझें मन असेंच उताविळ असावें याचें कारण द्वितीयार्धांत दिलें आहे. मेघमयूरोपमा पंतांची फार आवडती आहेः—कवीचें नांव मोरोपंत असल्यामुळें रसिककविसंमत अशी मेघमयूराची उपमा पंतांना अत्यंत प्रिय झाली असावी. परमेश्वरास मेघ ह्मणून स्वतःस मयूर ह्मटल्याचीं उदाहरणें त्यांच्या काव्यांत पुष्कळ आढळतात. 'केकावली' (मयूरवाणी) हें नांव तरी कवीला स्वतःच्या नांवावरूनच सुचलें असावें. तसेंच 'पंतांच्या वडिलांचें नांव रामाजीपंत

## दिसे क्षणिक[1] सर्व[2] हें भरंवसा[3] घडीचा कसें

असून त्यांचा आराध्यदेव राम होता म्हणून 'मयूर' व 'राम' [illegible] स्थळीं श्लेषयोजना केली आहे. याचीं थोडीं उदाहरणें:—(१) '**दयामृतघन** [illegible] लक्ष्मीपती हरी । करी भक्त **मयूरा**नें सुखी हत्ताप [illegible] ॥ (कृ० [illegible]), (२) '**वनद** प्रभुवर, **मोर**चि भक्तगण [illegible] पार नसे' ॥ [illegible] दिली द्विजानन–रस–पाकांतील गोड वेद–वडी । भक्त **मयूरा**ंसि **प्रभुघन** [illegible] दवडी' ॥ ६८ ॥ (गोपीगोडवा), (४) '**राम दयाघन भक्तमयू**र [illegible] दर्शन देउनि जें बहु दुःसह तें तापत्रय हरितो' १०७ [illegible] (५) **राम दयाघन** वनदाता सदुदार दास ते **मोर**' । (साधुस्तव ८), (६) '**भक्तमयूर** [illegible] **करुणाघनें** घनश्यामें । पूरितसंश्रितकामें **श्रीरामें** पुण्यकीर्तिच्या धामें' ३१२ [illegible] (७) '**श्रीराम** सरस **मुदिर,** जे **भक्त** सकळ नर **मोर** । साकेत असें प्रिय तसें प्रमुदित [illegible] (दोहारामायण), (८) '**रामघन** सत्प्रसादामृत जों जों बहु वर्षोनि वर्षतसे । [illegible] **भक्तमयूर** स्वार्या केका करूनि हर्षतसे' ॥ ३७ (विराटपर्व अ० ७) [illegible] बर्हीं नीलकंठो भुजंगभुक्' इत्यमरः।] **व्यु०:—बर्ह (मोराचें पीस) ज्याला आहे तो बर्हीं।** बर्हमस्त्यस्येति बर्हीं. । 'फलबर्हाभ्यामिनच्' [illegible] हे शब्द झाले आहेत). **'भजकबर्हिमेघा!' हें संबोधनपद 'उतावेळा' या दोषास गुण कां मानिलें याचें कारण दाखवितें, म्हणून हा काव्यलिंग अलंकार** जाणावा. [illegible] पृ० ३०, टी० २ पहा.

१. **क्षणभंगुर, क्षणध्वंसी, थोडा वेळ टिकणारें.** [illegible] **सर्व दृश्यमान जगत किंवा मनुष्याचें जीवित हें फार थोडा वेळ टिकणारें आहे:**–[illegible] परिमिति जरी शत वर्षें आहे तरी त्यांपैकीं त्याच्या [illegible] असतात. शिवाय मध्यंतरीं अशीं कित्येक आकस्मिक कारणें [illegible] ष्याला केव्हां मरण येईल याचा कांहीं नेम नसतो. [illegible] अबाढव्य दिसलें तरी निरवधि काळाच्या कितव्या सहस्रांश किंवा [illegible] होईल याचा नेम नसल्यामुळें तेंही क्षणिकच समजलें पाहिजे. [illegible] णजे दुःखपरंपरा मोजण्याचें एक घड्याळच होय. यांत **तु**कारामानें [illegible] जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥' अशी वस्तुस्थिति आहे. म्हणून सांपडेल त्या वेळांत [illegible] **करून** परमार्थसाधन करून घ्यावें. या संबंधानें पुढील उतारे वाचावे:—देहाची क्षणभंगुरता:–(१) तडित्सु शरदभ्रेषु गंधर्वनगरेषु च । स्थैर्यं येन विनिर्णीतं स विश्वसितु विग्रहे ॥ [योगवासिष्ठ] **अर्थ:**–विद्युल्लतेचे ठायीं, शरदृतूंतील अभ्राचे ठिकाणीं व गंधर्वनगराचे ठिकाणीं स्थिरपणाचा **निश्चय** ज्यानें केला असेल तो या क्षणभंगुर देहाचे ठिकाणीं स्थिरपणाचा विश्वास धरो. (२) आ**युर्नश्यति** पश्यतां प्रतिदिनं याति क्षणं यौवनं प्रत्यायांति गताः पुनर्न दिवसाः कालो जगद्भक्षकः **लक्ष्मीस्तोयतरंगभंगचपला** विद्युच्चलं जीवितं तस्मान्मां शरणागतं शरणद त्वं रक्ष रक्षाधुना ॥ [शंकराचार्य]. पाहतां पाहतां आयुष्य प्रत्येक दिवशीं जात आहे; तारुण्य क्षणभंगुर आहे; गेले

दिवस पुन्हा येत नाहींत; काळ जगद्भक्षक आहे; लक्ष्मी पाण्यावरील तरंगांसारखी चंचल आहे; जीवित विजेप्रमाणें क्षणिक आहे; तस्मात् शरणागताचें रक्षण करणारा तूं आहेस आणि मी तुला शरण आलों आहे. याकरितां माझें रक्षण कर. (३) काळ जातो क्षणक्षणा । मूळ येईल मरणा ॥ काय धांवाधांव करीं । जंव तो मृत्यु आहे दुरी ॥ देह आहे जायजणें । भुललासी कवण्या गुणें ॥ मायाजाळीं गुंतलें मन । परि हें दुःखासि कारण ॥ सत्य वाटतें सकळ । परि हें जातां नाहीं वेळ ॥ अंतकाळ येतां येतां । तेथें नये चुकवितां ॥ रामदास सांगे खुण । धरा देवाचे चरण ॥ (४) ओले मातीचा भरंवसा । काय मानिसी माणसा ॥ [रामदास], (५) तनका नहीं भरोंसा वे । देखें कालनमामा वे ॥ ये तो दोदिनकी जिनगानी । मत करना मगरोरी ॥ माया दोलत कुच नहिं तेरी । ये तो धूप छावकी फेरी ॥ तुटेगी अगबतकी जब दोरी । पलख नहिं सबुरी ॥ [कबीर]. (६) देह तंव असे भोगाचे अधीन । त्याचें सुख क्षीण क्षणभंगुर । अविनाश जोडी देवापाशीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥ क्षणभंगुर हा येथील पसारा । आलिया आकारा अवघें नासे ॥ तुका म्हणे येथें सकळ विश्रांती । आठवावा चित्तीं नारायण ॥ [तुकाराम–अभंग १८७९.]

(७) Out, out, *brief candle!*
*Life is but a walking shadow;* a poor player,
That struts and frets his hour upon the stage,
And then is heard no more: it is a tale
Told by an idiot, full of sound and fury,
Signifying nothing.

*Macbeth–Shakspeare.*

(८) And like the baseless fabric of this vision,
The cloud-capped towers the gorgeous palaces,
The solemn temples, the great globe itself,
Yea, all which it inherits shall dissolve;
And, like this insubstantial pageant faded,
Leave not a rack behind. *We are such stuff*
*As dreams are made of, and our little life*
*Is rounded with a sleep.*

*Tempest—Shakspeare.*

(९) *Life is a lightening of breath,*
Fame, but a thunder-clap at death.

*James Montogomery.*

(१०) Vanity of Vanities, saith the Preacher, vanity of vanities; *all is vanity. Bible, Ecclesiastes 1. 2.*

(११) '*Man that is born of a woman is of few days, and full of trouble.* He cometh forth like a flower and is cut down: he fleeth also as a shadow, and continueth not.' (*Job* XIV)

(१२) '*Man is like vanity: his days are as a shadow that passeth away.*' (*Ps*CXLIV)

धरील मन? आधिनें बहु परिभ्रमे चाकसें. ॥ ४९
कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली;

३. घटकेचा. 'मन घडीचा भरंवसा कसें धरील!' धरणार नाहीं-हें उत्तर. जेथें क्षणाचा भरंवसा धरवत नाहीं तेथें घटकेचा भरंवसा कसा धरवेल? अर्थात धरवणार नाहीं. असा येथें प्रश्नालंकार जाणावा.

१. दुःखानें. 'आधिनें चाकसें बहु परिभ्रमे'-हें मन काळजीनें-सर्व नाशवंत आहे तेव्हां माझें कसें होईल, माझा उद्धार होईल किंवा नाहीं-या मानसिक व्यथेनें चाकाप्रमाणें अतिशय भ्रमण पावतें, किंवा शारीरिक पीडांनीं ग्रस्त होतें. म्हणून मी स्वोद्धाराविषयीं अधीर झालों आहें. हा माझ्यांत दोष नसून गुणच होय. यास्तव देवा! माझा आपण क्षणाचाही विलंब न लावतां उद्धार करा. Compare:—

Thus mortals blind and weak below,
Pursue the phantom bliss in vain;
The world's a wilderness of woe,
And life's a pilgrimage of pain.

*James Montgomery.*

२. येथें मनास चाकाची उपमा दिली आहे. यांत 'सें' हा प्रत्यय उपमाबोधक होय 'मन' हें उपमेय, 'चाक' उपमान, 'परिभ्रमण' हा साधारण धर्म, अशा चाऱ्ही गोष्टी उपस्थित आहेत म्हणून ही पूर्णोपमा झाली. केका २४, पृ० ५७, टीप २ पहा. ३. प्रास्ताविकः-स्वोद्धाराविषयीं इतका उताविळ होण्याचें आणखी एक कारण कवि प्रकट करतात. कृतांत (यम) त्याचें कटक (सैन्य) त्याचा अमलध्वज (पांढरें निशाण) तद्रूप जी जरा (वार्धक्य); मृत्युसैन्याचें पांढरें निशाण जें म्हातारपण अथवा त्यामुळें केंसांस आलेली पांढुरकी ती दिसूं लागली; ह्मणजे म्हातारपणामुळें आलेली केंसांची पांढुरकी ही मृत्यु जवळ आला आहे हें सुचवूं लागली. सैन्याचें निशाण दिसूं लागलें म्हणजे सेनानायक जवळ आला असें जसें अनुमान करितां येतें, तद्वत केंस पांढरे झाले ह्या गोष्टीवरून मृत्यु समीप येत आहे असें कळतें. येथें जरेला कृतांतकटकाचा शुभ्रध्वज म्हटलें आहे. जरावर्णनः-(१) 'पुरे करा या मौजा तेथुनि फौजा आल्याच रवाना। यमदूतांची ढाल बिनीवर बाल सफेती देखाना.' (रामजोशी 'दो दिवसांचा' ही लावणी)।, (२) एकनाथी भागवतांतील पुढील छोटासा उतारा यासंबंधीं फार वाचनीय आहे:-त्या तारुण्याची नवाळी। देऊनि फेडितां काळ गिळी। मग जरा जर्जरित मेळीं। मरणकाळीं पातली. ॥ ९.२६४ धवल चामरेंसि आले जाण। जरा मृत्यूचें प्रस्थान। मागूनि यावया आपण। वेळा निरीक्षण करीतसे. ॥ २६५. सर्वांगीं कंपायमान। तो आला मृत्युव्यजन। मान कांपे तो जाण। डोल्हारा पूर्ण मृत्यूचा. ॥ २६६. दांत पाडूनि सपाट। काळें मोकळी केली वाट। मृत्युसेनेचा घडघडाट। वेगीं उद्भट रिघावया. ॥ २६७. पाठी झाली दुणी। तेचि मृत्यूची निशाणी। दोनी कानीं खिळे

पुर:सरगदांसवें झगडतां तनू भागली. ।
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा;
न हों जरि उताविळा, स्वरिपु कापितो हा गळा. ॥ ४६

देऊन । सुबुद्ध करुनि बांधिला. ॥ २६८. येतिया मृत्यूसि पुढारें । नयन तेज धांवे सामोरें । मग न्याहाळिती ना अक्षरें । अंजनोपचारें शिणतांही. ॥ २६९. कालिदासाच्या 'रघुवंश' नामक प्रसिद्ध काव्यांत दशरथराजाच्या कानाजवळ कैकयीच्या भीतिस्तव जरा श्वेतवर्ण धारण करून आली व तिनें 'तूं रामाला राज्याभिषेक कर' अशी त्याला कानगोष्ट सांगितली, असें वर्णन आहे:– "तं कर्णमूलमागत्य रामे श्रीर्न्यस्यतामिति । कैकेयीशंकयेवाह पलितछद्मना जरा ॥' [सर्ग १२ श्लोक २]. याचें पद्यात्मक भाषांतर:–(साकी)"कैकेयीच्या भयें जरा जणुं लागुनिया कानांसीं। पलितव्याजें वदे नृपाला 'राज्य देई रामासी' ॥" (लेले ह्यांचा रघुवंश १२–२). तसेंच तुकारामाचा पुढील अभंगही अर्थसादृश्यास्तव वाचनीय आहे:–जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी । मृत्यूचिये भेटी जवळी आली ॥ १ ॥ आतां माझ्या मना होई सावधान । हे पुण्याची जाण कार्यसिद्धि ॥ २ ॥ शेवटील घडी बुडतां न लगे वेळ । साधावा तो काळ जवळी आला ॥ ३ ॥ तुका म्हणे चिंतीं कुळींची देवता । वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥ ४ ॥.

१. पुर:सर (अग्रगामी) गदांसवें (रोगांबरोबर). पक्षीं–पुर:सर (अग्रेसर) आहेत गदा (शस्त्रविशेष) ज्यांस ते पुर:सरगद (असे जे सैनिक) त्यांसवें (त्या बिनीवाल्या रोगांबरोबर) झगडतां (युद्ध करतां करतां) तनू (माझें शरीर) भागली (थकलें). मृत्यूपूर्वीं गद (रोग) होतात, म्हणून गदांना मृत्युसैन्याचे अग्रगामी म्हटलें आहे. २. झगडतांना, युद्ध करतांना. ३. शरीर. ४. थकली, श्रम पावली. म्हातारपणांत होणाऱ्या रोगांनीं माझें शरीर जर्जर झालें. कविविषयक:—हें वृद्धावस्थेचें वर्णन कवीच्या स्वत:च्या वृद्धावस्थेचें दिसतें. कवि 'अशक्त, निर्धन, कोपी' असून किडकिडीत आंगाचे व मोठ्या पोटाचे होते व त्यांनी 'केकावली' हें काव्य देवादिकांच्या बहुतेक यात्रा आटपल्यावर म्हातारपणीं रचिलें. तेव्हां म्हातारपण येऊन शरीर रोगग्रस्त झालें, केंस पांढरे होणें वगैरे वृद्धावस्थेचीं इतर चिन्हेंही प्राप्त झालीं, व तीं मृत्यु जवळ आला असें सुचवूं लागलीं, तरी भगवत्प्रसादप्राप्ति झाली नाहीं म्हणून कांहीं सुचेनासें झालें, अशा वेळीं कवीनें कासावीस होऊन आपल्यावर देवानें कृपा करावी म्हणून काकुळती करावी हें साहजिक आहे. ५. साहाय्य करणारा. ६. तुझ्याशिवाय. ७. बळानें, सामर्थ्यानें. ८. अधिक, समर्थ. या वेळेस माझें साहाय्य करणारा तुजवांचून दुसरा कोणी बळवान् नाहीं. ९. माझा शत्रु, काळरूप शत्रु. १०. प्राण घेतो. 'गळा कापितो' (नाश करतो). ही 'लोकोक्ति' समजावी. जेथें लोकप्रवादाचें अनुकरण होतें तेथें 'लोकोक्ति' नामक अलंकार होतो. केका ३२ पृ० ८९ टीप २ पहा. उदाहरण:–(१) 'कर्ण म्हणे:–सन्माता तोकीं सुख व्हावया असु खरचिती। किंवा नेत्रें झांकुनि व्हाया सुख आपणा असुख रचिती ?॥' [उद्योगपर्व–अ० ११ गी० २०]. केसांना पांढरेपण आलें, रोगानें शरीर जर्जर झालें, यावरून माझा मृत्यु जवळ आला आहे

अवश्य[1] करणें खरें प्रणतरक्षण[2] स्वोचित[3];

---

असें मला कळतें. ह्या वेळेस तुजवांचून माझें साहाय्य करणारा दुसरा कोणी बलिष्ठ वीर दिसत नाहीं, तर अजूनही जर मी स्वोद्धाराविषयीं अधीर झालों नाहीं तर मग मी मृत्युमुखीं पडलोंच ह्मणून समजावें. काळानें माझा गळा कापल्यावर म्हणजे मी मृत्युमुखीं पडल्यावर मग माझा उद्धार कसा होणार? यास्तव सत्वर धांवत येऊन मृत्यु येण्यापूर्वीं मजवर प्रसन्न होऊन माझा उद्धार करा. मृत्यु केव्हां येईल याचा मुळींच नेम नाहीं—असा श्लोकार्थ. 'या केकेंत कवीनें आपल्या वार्धक्यावस्थेचें प्रतिरूपक फार सुंदर रीतीनें दाखविलें आहे. यमराजाच्या सेनेच्या शुभ्र पताकांचें प्रथम दर्शन आणि वार्धक्यावस्थेंत शुभ्र केसांचें प्रथम दर्शन या उपमानोपमेय धर्मांची कल्पना, तसेंच सेनेच्या आणि त्या सेनेच्या अग्रगामित्वाचें साधर्म्य व त्यांत अग्रगामी नायकांनी शूर, व त्या शूरांत तनूचा पराभव, आणि कृतांताचें वर्चस्व, या सर्व उपमानोपमेयांचें साधर्म्य फार सुंदर रीतीनें दर्शविलें आहे. हा येथें रूपक अलंकार जाणावा यांत जरारूप विषय उपमेय आणि कृतांतकटकामलध्वजत्व जें विषयी उपमान, या उभयतांचा अभेद वर्णिला आहे. म्हणून प्रथम चरणांतील रूपकाचा अभेदरूपक प्रकार जाणावा. द्वितीय चरणांत अग्रगामी गदांबरोबर तनूचें द्वंद्वयुद्धरूप विषय्युपमान. आणि तनूचें जर्जरीभूतत्व विषयोपमेय, या उभयतांचें ताद्रूप्य दिसतें म्हणून हा ताद्रूप्यरूपक प्रकार जाणावा. यांत आणखी तनूच्या भागण्यानें उपमानाचें आधिक्य वर्णन होऊन तेणेंकरून तनूच्या जर्जरीभूतत्वोपमेयाचें आधिक्य दिसून येतें म्हणून हा अधिकाभेदरूपक उपप्रकार जाणावा.' [य० पां०–पृ० १८७–१८८] या केकेचें संस्कृत भाषांतर [illegible] शिवराम गोळे यांनीं केलें आहे तें असें:—'कृतान्तकटकामलध्वजजरा [illegible] प्रमथिता तनूः क्राम्यति । सहाय इह मे कुतस्त्वदपरः प्रभावाधिको न [illegible] कालपाशावशः ॥.' (द्वितीयसंस्कृतपुस्तक.) या केकेंतील स्वभावोक्ति फार सुरेख साधली आहे.

१. प्रास्ताविकः—मागल्या केकेंत कवीनें आपण स्वोद्धाराविषयीं अधीर कां ते सांगितलें, यांत 'आपणावर हा आणीबाणीचा प्रसंग आहे, तेव्हां कृपा करण्याची त्वरा करावी' म्हणून कवि भगवंतास प्रार्थितात. अन्वयः—स्वोचित प्रणतरक्षण अवश्य करणें खरें, मग उशीर कां? कृपण मीहि शोचित कां बसों? [हे] प्रभुवरा! तुम्हां एकटें धांवणें उचित नव्हे, [यास्तव] कृतांत शिवला नसे तंव पावणें बरें दिसे. अवश्य—जरूर. अवश्य करणें खरें=अवश्य केलें तर पाहिजे, केल्यावांचून सुटका तर होत नाहीं. २. प्रणत+रक्षण=शरणागताचें संरक्षण. (प्र+नत=प्रणत=शरण आलेला.) ३. आपल्या प्रभुत्वास उचित (योग्य). आपल्या दीनवत्सल, पतितपावन ह्या ब्रीदास योग्य जें शरणागताचें रक्षण म्हणजे तापत्रयापासून त्याची सोडवणूक ही केव्हां तरी तुम्हांला केलीच पाहिजे, मग उशीर कां करितां? 'पंत' 'विश्वेशस्तुतीं'त म्हणतातः—'तुज साधु पतितपावन ऐसें म्हणतात, पतितपावनता।.हे प्रत्ययास येऊ, मज जाणुनि पादपतित पाव नता'॥१८॥

[1]उशीर मग कां? बसों [2]कृपण मीही कां [3]शोचित?।
नव्हे [4]प्रभुवरा! तुम्हां उचित एकटें धांवणें;
[5]कृतांत शिंविला नसे तंव, दिसे बरें पांवणें. ॥ ४७

. तुम्हांकडून मदुद्धरणाविषयीं इतका विलंब कां व्हावा? २. दीन,अनाथ. कद्रू हा अर्थ येथें अपेक्षित नाहीं. म्यां अनाथानें तरी तुमची वाट पाहात व कोणी मला तारणारा नाहीं, तूंही प्रसन्न होत नाहींस असा शोक करीत कां बसावें? तुम्ही माझें तारण करण्याविषयीं उशीर करूं नका म्हणजे मलाही शोक करीत बसावें लागणार नाहीं.–असा भावार्थ. ३. खेद करीत. 'शुच'धातु संस्कृतांत शोकार्थक आहे. यापासून शोचणें (शोक करणें) हा धातु झाला आहे. ४. प्रभुश्रेष्ठा! राजाधिराज! 'आयत्या वेळेस धांवत येऊन मी तुझा उद्धार करीन' असें देवा! तुम्ही म्हणाल अशी शंका घेऊन कवि म्हणतात. पृथ्वीवरील सर्व राजांमध्यें तसेंच स्वर्गीय देवांमध्यें श्रेष्ठ जे तुम्ही त्या तुम्हांला कोणी बरोबर न घेतां एकटें धांवणें योग्य नाहीं. प्रभुवर आणि धांवणें या दोन्ही शब्दांनीं व्यधिकरण दाखविलें आहे. प्रभुवर शब्दानें धांवणें अनुचित असें दर्शविलें आहे. कवि कळवळून म्हणतातः–हे देवा! गजेंद्राला मुक्त करण्यासाठीं आपण एकटे धांवत धांवत गेलां, तसे प्रसंग येऊन ठेपल्यावर तुम्ही धांवत–उड्या टाकीत–याल, पण प्रभुवरानें एकट्यानें धांवत येणें अनुचित होय. ५. यम. 'कृतांतो यमुनाभ्राता शमनो यमराड् यमः' इत्यमरः. शेवटच्या चरणाचा अर्थः–जोंपर्यंत मी मृत्युमुखीं पडलों नाहीं, (यमाचा फांस जोंवर माझ्या गळ्यांत पडला नाहीं) तोंवर माझें रक्षण करणें हें बरें दिसतें. जर विलंब कराल तर तुमचें येणें माझ्या उपयोगीं पडणार नाहीं इतका मृत्यु माझ्या संनिध आला आहे. अथवा, काळानें मला स्पर्श केल्यावर मग तुम्ही गडबडीनें एकाकी धांवत यावें त्यापेक्षां अगोदर सावकाशीनें इतर भक्तमंडळीसह आलां म्हणजे तुम्हांला श्रम होणार नाहींत. वैदिक प्रार्थनाः–'म्हातारपण येण्यापूर्वी आम्हांवर प्रसन्न हो' अशी प्रार्थना ऋग्वेदांत पराशर ऋषीनें अग्नीला केली आहे. पराशर ऋषि अग्नीची स्तुति करितातः–'हे अग्नि! वडिलांपासून चालत आलेला [जो तुझा] आमचा स्नेह [तो तूं] विसरूं नकोस, तर विद्वान्, [आणि] बुद्धिमान् [असा जो तूं तो] आमचें पाठबळ हो. असें धुकें [पदार्थांच्या] रूपाला [नाहींसें करून टाकितें तसें] वृद्धपण रूपाला नाहींसें करून टाकितें. [तर] त्या दुर्भाग्यापूर्वीच [तूं आम्हांवर] प्रसन्न हो.' (ऋग्वेद, मंडल १, सूक्त ७१, मंत्र १०). या मंत्रावरील रा० ब० शं. पां. पंडितांची टीका अनेक गोष्टींस्तव विचारणीय आहे असें समजून येथें दिली आहेः–'ही प्रार्थना पराशर ऋषीनें केली आहे, यास्तव याचा विचार मन लावून करणें अवश्य आहे. कारण ज्या पराशराविषयीं महाभारतांत, पुराणांत आणि तसल्याच वेदोत्तरकालिक ग्रंथांत अद्भुत चमत्कार वर्णिले आहेत, आणि जो असंख्य वर्षें तप करित बसला होता, म्हणून सांगितलें आहे, त्याचें खरें स्वरूप या मंत्रावरून दिसून येतें. जशी आम्हां कलियुगांतील बापड्या मर्त्यांस म्हातारपणाची भीति असते,

## ‘कसें[1] तरि करूं तुझें [2]अवन; [3]पूरवूं [4]आळ जी

तशीच पराशराला होती, त्याला पाहिजे तितकीं वर्षें तप करित जगावें अशी शक्ति नव्हती, आणि अग्नीच्या देवत्वावर त्याचें ब्रह्मवर्चस्व नसे हें उघड दिसून येतें’ (वेदार्थयत्न अंक १७ पृ० १४५-१४६). ६. **‘शिवणें’ या क्रियेच्या योगानें कृतांताचें सांनिध्य कवीनें स्पष्ट दाखवून भगवंताच्या सत्वरागमनाची आवश्यकता सुव्यक्त केली आहे.** ७. **पावणें प्रसन्न होणें, जवळ येऊन साहाय्य करणें. या पामराचें** आपणापाशीं इतकेंच विनय**पूर्वक आणि प्रार्थनापुरःसर मागणें आहे कीं काळानें मला पकडिलें नाहीं तों आपण येऊन माझा उद्धार करावा.**

१. अन्वयः–**‘तुझें अवन कसें तरि करूं, जी मनिं आळ असेल [ती] पूरवूं. आमची काळजी तुज रे! कशास? हो प्रियतमा! जगज्जीवना! असें जरि [तुम्ही] म्हणाल [तर] जी वना सुखसमृद्धि ती तदाश्रितमृगासि [ही होय].** २. **प्रास्ताविकः–माझ्याकरितां तुम्हां प्रभुवराला आयत्या वेळीं एकटेंच धांवत येण्याचे श्रम पडूं नयेत असें माझ्या मनांत आहे, पण देवा! यावर तुमचें म्हणणें पडेल कीं ‘कोणत्या तरी रीतीनें आम्ही तुझें रक्षण करूं, तुझा उद्धार करूं मग तसें करण्यांत आम्ही एकटे येऊं अथवा दुकटे येऊं अथवा आम्हांला धांवावें लागो किंवा सावकाश चालावें लागो, त्याची तुला काळजी नको’ अशी आशंका देव घेतील असें पहिल्या दोन चरणांत दर्शवून पुढील दोन चरणांत तिचें कवि समाधान करतात. अवन=रक्षण.** ३. **तृप्त करूं. येथें ‘पूरवूं’ शब्दांत ऱ्हस्व उकाराचे जागीं दीर्घ ऊकाराची योजना कवीनें वृत्तसुखास्तव केली आहे. पंतांच्या निरंकुशत्वाविषयीं अल्प विचारः**—वृत्तसुखास्तव कवीनें आपलें निरंकुशत्व जागोजागीं गाजविलेलें आढळतें. ऱ्हस्वास्तव दीर्घ, दीर्घास्तव ऱ्हस्व, युक्ताचा लोप, समास असून संधि नाहीं, ‘प’स्तव ‘ख’, ‘ह’स्तव ‘ट’, ‘अ’स्तव ‘ज’ इत्यादि पुष्कळ प्रकारांनीं निरंकुशत्व पंतांच्या काव्यांत आढळतें. इतर कवींच्या काव्यांतून जशी जागोजाग व्याकरणाची ओढाताण, निरंकुशत्व गाजवितांना केलेले भाषेचे खून, [illegible] वृत्त जमविण्याकरितां दडपून दिलेले ‘गा!’, ‘बा!’, निधानें, पै, [illegible] शब्द किंवा शब्दांश आढळून त्या मानानें सरसत्व फार कमी असतें तसें पंतांचें नाहीं. त्यांच्या विस्तृत काव्यरचनेच्या मानानें त्यांचें निरंकुशत्व फारच कमी आढळून त्यामुळें अर्थहानि किंवा रसहानि झालेली अत्यल्प अशीच आढळेल. पंतांच्या सरस्वतीचा प्रकार इतर कवींच्या पेक्षां फारच भिन्न आढळतो. इतरांच्या तरंगिणीचा प्रवाह बेताचाच असून त्यांच्यांत दगडधोंडे, शेवाळ हेच फार, म्हणून खळखळही फार. पण पंतांच्या सरस्वतीचा प्रवाह सिंधुब्रह्मपुत्रांप्रमाणें अलोट असूनही तिच्यांत दगडधोंडे फार कमी आढळतात व म्हणूनच तिचा ध्वनि समुद्राप्रमाणें शांतगंभीर दिसतो. अशा किरकोळ कवींची आमच्या कविराजराजितिलकाशीं बरोबरी करणें किंवा एकाच वेळीं दोघांचींही नांवें घेणें म्हणजे भवभूतीनें म्हटल्याप्रमाणें सामान्य कुंभकाराची योग्यता विश्वनिर्माणकर्त्या ब्रह्मदेवाबरोबर समजण्यासारखें होय. पंतांच्या निरंकुशत्वाचीं कांहीं निवडक उदाहरणें पुरवणींत दिलीं आहेत तीं पहावीं. ४. **इच्छा, लळा,**

असेल मनिं; आमुची तुज कशास रे[3] काळजी?' ।

**हट्ट. माझा उद्धार करावा हा जो कवीचा हट्ट तो.** 'खोटा आरोप' असा जो 'आळ' शब्दाचा दुसरा अर्थ आहे त्याचाही पंतांनीं ८ व्या केकेंत उपयोग केला आहे.

१. **आमची. परमेश्वराची काळजी (परमेश्वराला धांवतांना श्रम होतील ही काळजी).** २. **मोरोपंत कवीला.** ३. ह्या संबोधनानें देवाची व भक्ताची अत्यंत सलगी दाखविलेली आहे. **देवभक्तांची सलगीः**—'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' ह्याचा अनुवाद करणाऱ्या महाराष्ट्र भक्तमंडळाच्या काव्यांत देवभक्तांची फार सलगी वर्णिली आहे ती कित्येकांच्या मतें दूषणीय आहे. या संबंधानें 'निबंधमाले'त चर्चा केली आहे. त्यांतील महत्वाचे मुद्दे सारांशरूपानें येथें घेतले आहेत. **(१) निबंधमालाकारांचा अभिप्रायः**—'केकावलीच्या संबंधानें आमच्या महाराष्ट्रकवीवर असा टपका आहे कीं त्यानें सर्व विश्वाचा नायक जो परमेश्वर त्याच्यापुढें भयभीत होऊन जावयाचें व आपल्या अपरिमित क्षुद्रत्वास्तव वर मान करण्याचेंही धैर्य न होऊन त्यानें पुरतें बही काढूं नये, तें सर्व गुंडाळून ठेवून त्यानें परमात्म्याशीं खुशाल हवी तितकी सलगी किंबहुना हास्यविनोदही केला आहे.' यासंबंधानें कवीच्या तर्फें कांहीं गोष्टी सांगता येतील असें सांगून शास्त्रीबोवांनीं वरील आक्षेपास उत्तर दिलें आहे. त्या गोष्टी अशाः—(१) 'कवीस मागील काळाचा फायदा घ्यावयाचा होता.' ज्या काळीं पंतांनीं 'केकावलि' रचिली त्या काळच्या आचारविचारांचें प्रतिबिंब त्यांत वठल्यास तो दोष कविप्रतिभादर्शाचा नसून त्या काळच्या आचारविचारांचा ह्मटला पाहिजे. (२) 'कवीची ईश्वराच्या विषयींची समजूत व अलिकडच्या लोकांपैकीं कांहींची समजूत ह्या परस्पर भिन्न आहेत. तेव्हां कवीचें वर्णन त्यांस न आवडल्यास त्यांत कवीचा दोष नाहीं.' इंग्रेजी चितान्यानें व एखाद्या जुन्या हिंदु चितान्यानें जर स्त्रीपुरुषांच्या जोडप्यांचीं चित्रें काढलीं तर त्यांत त्यांच्या स्त्रीपुरुषविषयक समजुती भिन्न असल्यामुळें मोठा फरक पडेल. पण त्यांची परीक्षा त्यांच्या त्यांच्या लोकांच्या रुचीप्रमाणें केली पाहिजे. तद्वत् 'आमच्या कवीच्या हृदयांत ईश्वराचें स्वरूप ज्या रीतीचें लहानपणापासून ठसलें होतें त्या रीतीचीच त्याची तजवीर त्याच्या काव्यांत उठली.' अलिकडच्या काळांतील लोकांस आवडे अशा प्रकारच्या चित्राची त्याजपासून अपेक्षा करणें हें योग्य होणार नाहीं. (३) 'मनुष्य हा ईश्वरापुढें अत्यंत क्षुद्र हें खरें; पण तसेंच हेंही खरें आहे कीं, त्याचा उत्पन्नकर्ता व जनकही तोच. तेव्हां कवीनें देवापुढें कितीही 'लुब्रे'पणा केला असला, तरी त्याचा अपराध ह्मटला ह्मणजे बापापाशीं मुलानें अल्लडपणा केल्याप्रमाणेंच होय. हा पुत्रजनकभाव कवीनें प्रस्तुत काव्यांतील कित्येक पद्यांत सुरस रीतीनें वर्णिला आहे'. (४) 'काव्याची परीक्षा जी करावयाची ती रसिकजन त्यांतील सिद्धांतांच्या खरेखोटेपणावर तादृश करीत नसतात. केवळ अपसिद्धांतांचें ज्यांत प्रतिपादन केलें आहे, व ज्यांत सत्याचा लवलेशही नाहीं, असें काव्य केवळ अमोलिक असूं शकेल; आणि ज्यांत सात गाळण्यांतून काढलेलें निवळ सत्य ओतप्रोत भरलेलें आहे असलेंही काव्य कोणी कवडीला सुद्धां विचारूं नये अशा वसुलाचें असेल'. प्रत्यक्ष भर्तृहरीनें व्याकरणावर कारिका रचल्या आहेत त्यांत रस अगदींच अल्प आहे. 'तीच मोठमोठ्या काव्यांची व नाटकांची गोष्ट पहा; त्यांतील बहुधा सर्वांचीं कथानकें केवळ कल्पित असतात पण इतकें असूनही कवित्व-

## असें जैरि म्हणाल हो प्रियैतमा! जैगज्जीवना!

रसानें वरील ग्रंथ जसे काय उचंबळत असतात! असत्यता ही मनोरंजकतेस स्वभावत: मुळींच विरुद्ध नसून उलटी तीस पुष्कळ अंशीं अनुकूलही आहे. तर ह्या कवीचीं धर्मविषयक मतें अलिकडच्या मतांहून कितीही भिन्न असलीं, किंवा वादविषयक काव्यांत त्यानें ईश्वराचें वर्णन कोणत्याही पद्धतीनें केलें असलें, तरी कवित्वदृष्टया हे सर्व विचार केवळ बाह्य होत'. (५) 'प्रस्तुत काव्याविषयीं (केकावलीविषयीं) मत प्रगट करितांना आणखी एक मोठा विचार मनांत आणणें अवश्य आहे. मूर्तिपूजेच्या धर्मापेक्षां अमूर्तदेवाची उपासना ही कितीही उत्कृष्ट असली, तरी पहिल्या धर्मांतील काव्याची परीक्षा कर्तव्य असतां हा दुसरा उंचप्रतीचा धर्म विशेष उपयोगीं पडणारा आहे असें नाहीं'. **(२) 'यशोदापांडुरंगी' च्या कर्त्यांचा अभिप्राय:**—(या काव्यांत पंतांनीं परमेश्वराशीं अत्यंत सलगी केली आहे त्याचा विचार त्या काळच्या समजुतीकडे लक्ष्य देऊन केला पाहिजे असें प्रतिपादन करित असतां दादोबा ह्मणतात) 'ज्या देशांत व ज्या लोकांत रसभरित ह्मणून प्रसिद्ध काव्यें असतात, त्यांच्या गुणांचें यथायोग्य परीक्षण करण्यास, आणि त्यांची रुचि घेण्यास त्याच देशाचे डोळे आणि जीभ असली पाहिजे. इतर लोकांच्यानीं तसें यथान्याय परीक्षण होणें केवळ अशक्य असें माझें ह्मणणें नाहीं. कदाचित ते विद्वान्बुद्धीचे परीक्षक असल्यास योग्य परीक्षा करूं शकतील. परंतु त्यांच्या मनांत तो तद्देशीय सुज्ञास आनंद होईल, त्याच मानाचा आनंद अन्यदेशीय विद्वानांस होणार नाहीं. याचीं कारणें बहुत आणि सूक्ष्म आहेत. ज्या लोकांत वंशपरंपरेनें ज्यांचा सहवास असतो, त्यांचा पूर्वापर व्यवहार, रीतिभाति, विद्या, ज्ञान, आचार या सर्व गोष्टींच्या संघट्टनानें त्यांचीं मनें तद्देशीय रंगलेलीं असतात, ह्मणून त्यांच्या काव्यानें जे हर्षशोकादि विकार त्यांच्या मनांवर होतील, तसे विकार अशा संघट्टनाच्या अभावामुळें ज्यांचीं मनें तशीं रंगलेलीं नसतात त्यांजवर होणार नाहींत. अशा विचारानें पाहिलें असतां हें स्तोत्र (केकावलि) श्रेष्ठ आणि रसिक काव्यांत गणिलें पाहिजे. तसेंच या काव्यांत पंतांनीं देवाला एकेरी शब्दांनीं संबोधिलें आहे त्यासंबंधीं पुढील सुभाषित वाचनीय आहे. 'ताते सुतानां सुरतेऽङ्गनानां । स्तुतौ कवीनां, समरे भटानां । त्वंकारयुक्ता हि गिर: प्रयुक्ता: । रसाधिकाश्चारुतरा भवंति' ॥ बापाशीं मुलगा लाडिकपणानें बोलत असतां, रतिप्रसंगीं स्त्रिया प्रियकराशीं विनोद करित असतां, योद्ध्याच्या समरप्रसंगीं, 'तूं' या एकेरी शब्दानें बोललेलीं भाषणें पुष्कळ रस (वत्सल, शृंगार व वीर) उत्पन्न करून रमणीय दिसतात.

१. **कांहीं प्रतींत 'ह्मणि' असा पाठभेद आढळतो.** २. **अत्यंत आवडल्या देवा!. 'तर' व 'ईयस्' हे प्रत्यय आधिक्य दाखवितात; तसेंच 'तम' व 'इष्ट' हे प्रत्यय आत्यंतिक भाव दर्शवितात.** ३. **जगाच्या प्राणा! जगाला आधारभूत जो तूं त्या!. 'प्रियतमा' व 'जगज्जीवना' या दोन संबोधन पदांनीं कवीनें भगवंताविषयीं अत्यंत प्रेमभाव प्रकट केला आहे. तसेंच हीं दोन्हीं पदें साभिप्राय आहेत म्हणून परिकरांकुर अलंकार जाणावा.** याचें एक सुरेख उदाहरण:–सीता रामाला म्हणते–'दोषज्ञसेव्य सुचरित्रसुधैकसिंधो । सर्वैकवंद्य! नृपसत्तम! दीनबंधो! । कां त्यागिलें मज वनीं करुणांबुवाहा! त्वद्विप्रयोग बहु दारुण राघवा! हा' ॥ (कुशलवोपाख्यान ४-५५). केका ४ पृ० ११ पहा.

तदाश्रितमृगासि ती सुखसमृद्धि बा! जी वना. ॥ ४८

सुखेंचि सुख बाळका प्रकट होय मातेचिया;

तिला घडति जे श्रम, प्रियजनोत्तमा! तेचि यां; ।

---

१. आम्ही कसा तरी तुझा उद्धार करूं, मग त्यांत आम्हांला धांवण्याचे श्रम पडले तरी हरकत नाहीं, त्याची काळजी तुला नको असें देवा! आपण जर म्हणाल तर त्यावर माझें पुढीलप्रमाणें उत्तर आहे. तत्+आश्रितमृगांसि=त्याच्या आश्रयास राहणाऱ्या मृगादि पशूंना. 'मृग' शब्दानें येथें फक्त हरिण न घेतां एकंदर पशुवर्ग समजावा. २. उदकतृणादि सुख देणाऱ्या वस्तूंची विपुलता. अरण्याला जी उदकतृणच्छायादिकांची विपुलता असते तीच त्या अरण्याला आश्रय करून राहणाऱ्या हरिणादि पशूंस असते. जर वन उदक तृणादिकेंकरून टवटवीत असेल, तर त्या वनांत राहणारे पशुही टवटवीत असतील; अर्थात ती टवटवी जर त्या वनाला नाहीं; तर मृगांलाही नाहीं, येथें काव्यार्थापत्ति जाणावी. येथें 'वन' शब्द श्लिष्ट दिसतो. 'वन' शब्दाचे अरण्य व जल असे दोन अर्थ होतात. 'वनं सलिलकाननें' इत्यमरः. 'वन' शब्दाचा जल किंवा जलसंचय (तडाग) असा अर्थ घेतल्यास जी सुखसमृद्धि जलसंचयास असते तीच त्या तडागाचा आश्रय करणाऱ्या पशूंसही असेल; म्हणजे तडागांत पाणी जर विपुल व निर्विकारी असेल तरच त्याच्या उदकानें तृषा शांत करणाऱ्या पशूंची तृषा शांत होईल व त्यांना रोग जडणार नाहीं. तळ्यांतच पाणी कमी, तर पशूंना तें यथेच्छ प्यावयास कोठून मिळणार? अर्थात् मिळणार नाहीं. तसेंच देवाला क्षेम नाहीं, तर भक्तांचें क्षेम कुठून असणार? देवभक्तांचा संबंध इतका परस्पर निगडित आहे कीं एकाचें जें सुख, तेंच दुसऱ्याचें सुख, व एकाचें जें दुःख तेंच दुसऱ्याचें दुःख. हें देव-भक्तांचें नातें माय-लेंकरांच्या नात्यानें पुढील केकेंत कवि स्पष्ट करितात. ३. अरण्याला, उदकाला. शेवटच्या चरणांत अर्थांतरन्यासालंकार झाला आहे. केका २ पृ० ८ पहा. ४. मातेचिया सुखेंचि बाळका सुख प्रकट होय, [हे] प्रियजनोत्तमा! [देवा!] तिला जे श्रम घडति तेचि या [बाळका घडतात]. म्हणोनि [हे] जीवा! विपजलधिसेतुला सकललोकजीवातुला तुला पळ क्षणहि कष्ट न शिवों–असा अन्वय. आश्रयाला जें सुखदुःख तेंच आश्रिताला होय असा आशय मागच्या केकेंत दर्शविला, तो दुसऱ्या दृष्टांतानें दृढ करीत कवि भगवंतास आळवितात. मातेचिया (मातेच्या, आईच्या) सुखेंचि (सुखानेंच, कुशलानेंच) बाळका (बाळकाला, मुलाला) सुख होय [हें] प्रकट (स्पष्ट) [आहे]. आई जर सुखी तरच तिच्या मुलाला सुख मिळतें. ५. मातेच्या. 'मातेचिया' ह्या तऱ्हेचें षष्ठीचें जुनें रूप जुन्या मराठी ग्रंथांतून फार आढळतें. ६. त्या मातेला. ७. व्या०:–'घडति' हें क्रियापद काकाक्षिगोलकन्यायानें पुनः 'या' शब्दाकडे योजिलें पाहिजे. **काकाक्षिगोलकन्यायः**–कावळ्याला एकच डोळा असतो व त्याला आपलें बुबुळ दोन्ही बाजूंनीं फिरवितां येत असल्यामुळें दोन्ही बाजूंच्या वस्तु त्याला पाहातां येतात. यावरून वाक्यांत एकाच शब्दाचा दोन अथवा अधिक स्थळीं उपयोग होतो तेथें हा

न्याय होतो. प्रस्तुत स्थळीं 'घडति' हें क्रियापद 'तिला' या शब्दाकडे लागत असून पुन्हा 'या' कडे त्याचा संबंध पोंचतो म्हणून येथें 'काकाक्षिगोलक' न्यायाचा उपयोग झाला. ८. कष्ट, दुःख. ९. **प्रियजनांमध्यें (आवडत्या माणसांमध्यें) उत्तम (सर्वांत आवडता) जो तूं परमेश्वर त्या! प्राणसख्या!** १०. **या बालकाला. हे प्राणसख्या! आईला जे श्रम होतात तेच तिच्या बालकालाही होतात. लहान मुलाच्या मातेची प्रकृति जर बरी असली तर बालकाचीही प्रकृति बरी असते. तिची प्रकृति बिघडली तर त्या पोराचीही बिघडते. म्हणून मातेच्या शारीरिक स्वास्थ्याकडे लक्ष्य पोंचविलें म्हणजे मुलाच्या स्वास्थ्याकडे निराळें लक्ष्य द्यावयास नको.** याचविषयीं **तुकारामाचा** एक अभंग आहे:– 'माता सुखी तरी बाळकासी सुख । नाहीं तरी दुःख सर्वकाळ ॥.' **मातेची योग्यता**:–मातेच्या शरीरस्वास्थ्यावर बालकाचें सुखदुःख अवलंबून असतें एवढेंच नव्हे, तर तिच्या मानसिक शक्तीवर म्हणजे तिच्या बुद्धिवैभवावरच पुष्कळांशीं मुलाची बुद्धि अवलंबून असते. मूल पुढें चांगलें किंवा वाईट निपजणें ह्याची सर्व जबाबदारी आईवर असते, असें **फ्रान्सचा** बादशाह **नेपोलियन** याचें म्हणणें असे. मातेची योग्यता एवढी मोठी आहे कीं प्रत्यक्ष मुलांचा बाप जरी दुर्गुणी असला तरी माता जर सद्गुणी व सुशील असेल, तर तिच्या वर्तनाचा परिणाम मुलांवर होऊन तीं मुलें सद्गुणीच निपजतात. मनुष्य कितीही विद्वान् व श्रीमंत असो त्याला जर सुमातेच्या हातानें शिक्षण मिळालें नसेल, तर त्याच्या विद्येचा व लक्ष्मीचा त्याच्या वर्तनावर व्हावा तितका हितकर परिणाम होत नाहीं. यासंबंधानें 'बव्हर्थ जनमनोहर स्वल्पाक्षर मधुर सत्य बोलणारे' अर्वाचीन इंग्रज ग्रंथकार **स्माइल्स्**साहेब यांच्या ग्रंथांतून घेतलेला पुढील छोटासा उतारा वाचनीय आहे:—

'No mere educational advantages, no surroundings of wealth or comfort, will recompense for the want of good mothers. It is they who mainly direct the influences of Home, which is the seminary not only of the social affections but of the ideas and maxims which govern the world. Nations are gathered out of nurseries, and the leading strings of children become in the hands of good mothers the reins of moral government.

ऋतुध्वज राजाची महाबुद्धिमती व पतिव्रता राणी मदालसा हिनें आपल्या विक्रान्त, सुबाहु, शत्रुमर्दन व अलर्क ह्या पुत्रांस त्यांच्या जन्मापासून बोध करून त्यांना उत्कृष्ट ज्ञानसंपन्न केलें ही कथा मार्कंडेयपुराणांत (२५–३६) सविस्तर सांगितली आहे. त्याचप्रमाणें 'विदुला' राणीनें 'संजय नांवाच्या आपल्या पुत्राला तो रणांगणांतून पळून आला असतां खरमरीत उपदेश करून पुन्हा युद्धार्थ परत पाठविला या (उद्योग० अ० १०) प्रसंगाचें स्मरण आमच्या भारतीय वाचकांस होईलच. त्याचा थोडासा चुटपुटता मासला येथें दिला आहे:–'विदुला म्हणे 'अहारे! क्लीबा! मंदा कसा पळालास । कां वांचलासि अयशस्कर ऐसा तूं न कां गळालास. ॥ ३५ ॥ अरि हरिल राज्य मग तूं वरिशिल वृत्यर्थ काय माधुकरी । सुखकर सुकर्म टाकुनि असुखकर कुकर्म कोण साधु करी ॥ ३६ ॥ मचौवन, संजय हें निजनामहि बुडविलें तुवां दगडें । झगडे यशोर्थ अरिरथ चक्रांहीं स्पष्ट लोष्टसा रगडे ॥ ३७ ॥ अधमा! तुवां मरावें क्षणहि न बुडवूनि मान वांचावें । काळा! यासम अन्यहि जे असतिल त्यांहि मानवां चावें ॥ ४१ ॥ निजलासि

म्हणोनि न शिवो पळ क्षणहि कष्ट जीवा! तुला,
विपज्जलधिसेतुला, सकललोकजीवातुला. ॥ ४९

काय? उठ रे, जय पावतसे सदा समरशील, । उत्साह टाकितां तूं दैन्यें सांगन सदास मरशील ॥ ४५ ॥ कुंतिभोज राजाची कन्या, व पांडवांची माता देवी पृथा हिनें अज्ञातवास संपल्यावर कृष्णाबरोबर आपल्या पुत्रांस जो निरोप पाठविला तोहि वीरश्रीयुक्त आहे. त्याचा परिणाम पांडवांच्या मनावर केवढा झाला त्याची साक्ष भारती युद्ध देतच आहे. मदालसा, विदुला, पृथा व ध्रुवमाता सुनीति, ह्यांसारख्या सुमाता पूर्वीं ह्या आर्यावर्तांत पुष्कळ होत्या. वरील विवेचनावरून सुशिक्षणसंपन्न मातांची योग्यता व उपयुक्तता केवढी मोठी आहे हें दिसून येईल.

१. असा नियम आहे म्हणोन. २. स्पर्श करो. ३. पळ आणि क्षण या उभयशब्दांचा अर्थ एकच आहे म्हणून अतिशयार्थीं ही वीप्सा जाणावी. तुला श्रम अगदीं न होवोत–हा त्यांतला भाव. शब्दांची अशा प्रकारें द्विरुक्ति झाली असतां तेथें इंग्रजींत *Tautology* हा अलंकार मानतात. ४. जिवलगा! प्राणसख्या! ५. विपत्तिरूप समुद्रांत सेतु (पूल) त्याला. ह्या कष्टमय संसारांत परमेश्वराचा आश्रय केल्यानें मनुष्याचा उद्धार होतो म्हणून त्याला संकटसागरांत पुलाप्रमाणें आधारभूत म्हटलें आहे. ६. सर्व लोकांना जीवातु (जीवनदाता) जो परमेश्वर त्या तुला. ('जीवातुरस्त्रियां भक्ते जीविते जीवनौषधे' इति मेदिनी.) परमेश्वर 'भूर्भुवःस्वः' इ० सकल भुवनांला चैतन्यरूपें करून सजीव करितो ह्मणून त्याला सकललोकजीवातु असें ह्मटलें आहे. 'यतो वा इमानि भूतानि जायंते, येन जातानि जीवंति' असें श्रुतिप्रमाणही आहे. देवभक्तांचा संबंध मायलेंकरांच्या संबंधाप्रमाणें आहे असें सांगितलें. तेव्हां देवाचें जें सुखदुःख तेंच भक्ताचें सुखदुःख असें झालें. तेव्हां देवाला जर कष्ट झाले तर भक्तांना सुख कोठून होणार? ह्या अर्थानें कवि ह्मणतात 'देवा! तुझ्या साहाय्यानें आम्ही संसार–रूप विपत्तींतून पार पडतों, तूं सकल जगाचा प्राणदाता आहेस, तुझ्या सुखावर आमचे सर्व व्यापार अवलंबून आहेत, तेव्हां तुला जर श्रम झाले तर आम्हांलाही अपायच होणार म्हणून तुम्ही नेहमीं सुखी असा म्हणजे आम्हांला सुखाची मुळींच वाण पडणार नाहीं. हा श्लोकार्थ. हा भक्तांचा प्रेमोत्कर्ष चिंतनीय आहे. चतुर्थ चरणांत अर्थप्रास किंवा अनुप्रासालंकार झाला असून रूपकही आहे. अर्थप्रासाचीं उदाहरणें:–(१) 'गाजत, वाजत, साजत आज तया जतन करुनि आणा हो' (विराटपर्व), (२) 'पंक प्रक्षाळाया प्रार्थावें प्रथम पूत तोयास' (वामनस्तुति), (३) 'जो परमहित, परम हित परमहि–तरि कर्णधार यदुपकृती । बहु जीवांवरि, पावे तो त्या कौरवसभेसि यदुप कृती' (उद्योग० अ० ७), (४) 'खलदुर्जय बलजलधिच्छलरहिताचार जलदसा दाता । नलसम शुचि शलपूर्वज हलभृदनुजलोक पावला ताता' ॥ (द्रोण० अ० १३) केका ३३ पृ० ९४ पहा. रूपकाचें एक उदाहरणः–(१) 'शरणागततारक तूं जरि एकमुख, द्विबाहु, शिव साचा । बा! त्वत्प्रताप हरितो तम सर्वहि जैंवि नाथ दिवसाचा' ॥ (ब्रह्मोत्तरखंड अ० २ गी० २८).

असोत[1] तुज आमुचीं[2] सकल भावुकायुर्बळें[3];
जगोनि बहु काय म्यां सुकृत[4] जोडिलें दुर्बळें?।

---

१. आमुचीं सकल भावुकायुर्बळें तुज [देवा] असोत, म्यां दुर्बळें बहु जगोनि काय सुकृत जोडिलें! प्रियसख्या! [देवा!] बहुत काळ सुखी असें; मायातमीं जना सुपथ दाखवीं, [हे] सत्तमा! यांत मी मुदित [होय]–असा अन्वय. प्रास्ताविकः—भगवंताला यत्किंचित्‌ही कष्ट पडूं नयेत इतकेंच नव्हे, तर त्यानें सर्वकाळ सुखी असावें आणि आपल्या सर्व आयुष्याच्या अर्पणानें त्यानें दीर्घायु व्हावें असा स्वधिकारपूर्वक प्रेमभाव दाखवीत कवि प्रार्थितात. २. आमचीं. आम्हां भक्तजनांचीं. ३. भावुक (भक्त)+आयुः (जीवित)+बळें=भक्तांचीं आयुष्यें. 'सकळ भाविकायुर्बळें' असाही पाठ आढळतो. त्याचा अर्थ 'भाविक जनांचीं सगळीं आयुष्यें असा करावा. 'आयुष्याचें बळ, आयुष्याची दोरी, आयुष्याची मर्यादा' ह्या सर्वांचा अर्थ एकच आहे. देवा! तुला कष्ट पडूं नयेत इतकीच आम्हांस काळजी आहे असें नाहीं, तर तूं निरंतर सुखी असावें असेंही आम्ही इच्छितों. यास्तव आम्हां सर्व निष्ठावंत भक्तांचीं अवशिष्ट आयुष्यें तुला असोत असें मी ह्मणतों' असा प्रथम चरणाचा अर्थ. भक्तीची पराकाष्ठाः- भगवंताला आयुष्य अर्पिण्यांत पंतांनी येथें आपल्या भक्तीची पराकाष्ठा दर्शविली. आपलें आयुष्य दुसऱ्याला देणें हें प्रेमाचें मोठें लक्षण समजलें जातें. पौराणिककालांतील रुरुप्रमद्वारा (आदिपर्व–अ० ३ श्लो० २६-४२) व अर्वाचीन इतिहासांतील बाबर–हुमायून यांच्या गोष्टी वाचकांनीं लक्षांत आणाव्या. जो कोणी अत्यंत प्रिय लग असतो त्याला 'माझें सारें आयुष्य तुला असो' असा आशीर्वाद देण्याचा संप्रदाय फार आहे. हें 'आशी' नामक अलंकाराचें उदाहरण जाणावें. जेथें अभीष्टवस्तुप्राप्ति होवो असें आशीर्वादात्मक वर्णन असतें तेथें आशी अलंकार होतो. याचें सोदाहरण लक्षणः—'आशीर्नामाभिलषिते वस्तुन्याशंसनं यथा। पातु वः परमं ज्योतिरवाङ्मनसगोचरम्‌ ॥ ३५७ ॥' [दंडिकृत काव्यादर्श–द्वितीय परिच्छेद.] 'पतीची परम आवडती हो' 'तुला चक्रवर्ती पुत्र होवो' 'हे राजा! तुला मार्कंडेय ऋषीचें आयुष्य असो' हीं आशी अलंकाराचीं उदाहरणें समजावीं. केका ११८,११९ यांतही हाच अलंकार आहे. ४. सत्कर्म, पुण्य. 'म्यां दुर्बळें बहु जगोनि काय सुकृत जोडिलें?'–म्यां पामरानें इतके दिवस जगून कोणतें पुण्य आचरिलें? कोणतें परमार्थसाधन केलें? कोणतेंच केलें नाहीं हें उत्तर. (येथे 'प्रश्नालंकार झाला.) तेव्हां पुढें तरी मी काय सत्कर्म आचरणार हें यावरून दिसतेंच आहे. म्हणून मजसारख्या दुर्बळांचीं आयुष्यें तुजसारख्या पुण्यश्लोकास असावींत म्हणजे त्यांचें सार्थक होईल. काव्यांतील भ्रामक कल्पना व काव्यानंदः— मनुष्याचें आयुष्य नियमित असल्यामुळें त्याच्या हातून फारशीं सत्कर्में होऊं शकत नाहींत, तद्वत्‌ ईश्वराचेंही आयुष्य कदाचित्‌ त्याच्या सत्कर्माचरणास पुरणार नाहीं अशी शंका घेऊन कवीनें आम्हां सर्व दुर्बळांचीं आयुष्यें तुला असोत असें म्हटलें आहे. हा विचार वास्तविक पाहातां खुळेपणाचा आहे. पण असले प्रेममदिरेच्या भरांत सुचलेले खुळे विचार उत्तम कवित्वाचे पोषक

अंसें प्रियेसख्या ! सुखी बहुतकाळ; मायातमीं
जना सुपथ दाखवीं; मुदित सत्तमा ! यांत मी. ॥ ९०

आहेत. 'केकावलीची प्रस्तावना' हा निबंध पहा. 'दिक्कालातीत जो भगवान् त्यास आपुलें आयुष्य मनुष्यानें अर्पण करून दीर्घायु इच्छिणें हें केवळ जरी असमंजस दिसतें, तथापि गंगेस गंगेच्या पाण्यानें अर्घ्यप्रदान करण्याप्रमाणें येथें हें कवीचें आयुरर्पण सप्रेम पूजन जाणावें.' [य० पां०] सकललोकजीवातु परमेष्ठीला मानवी आयुष्य देणें हें हास्यास्पद व भ्रममूलक आहे. असें असतां मोरोपंतांनीं हा वेडगळ प्रकार कसा केला? असा प्रश्न कांहींजण कदाचित् करतील. त्याला उत्तर असें आहे कीं काव्याचा प्रधान हेतु मनोरंजन हा साधण्यास कवीला ज्या कांहीं कल्पना योजाव्या लागतात त्यांचा भ्रम वाचणाऱ्यांच्या मनांवरही असावा लागतो. यास्तव काव्यवाचनापासून मनाला आनंद व्हावा अशी इच्छा असल्यास मनुष्यानें आपलें कांहीं ज्ञान घटकाभर विसरलें पाहिजे. कवीची प्रतिभा ही मदिरेप्रमाणें आहे. तिच्या रंगांत कवि असतां जे कित्येक वेडगळ दिसणारे विचार तो बोलतो त्यांची रुचि घेण्यास त्याच्या वाचकांनींही कांहीं वेळ गुंगलें पाहिजे. कर्णानें पृथ्वी उचलली, रावणाला दहा तोंडें होतीं, रामावतारीं वानर व अस्वलें हीं बोलत, सुग्रीव व वाळी हे सूर्य व इंद्र यांचें वीर्य एका वानरीच्या ग्रीवेवर व केशावर पडून उत्पन्न झाले, शिळा सागरावर तरल्या, एका पुण्यश्लोकाच्या पदस्पर्शानें शिळेची सुंदरी झाली, धर्मपक्ष्यांनीं जैमिनीस ज्ञान सांगितलें, नवऱ्याला मांडव्यऋषीनें सूर्योदयापूर्वीं मरशील असा शाप दिला ह्मणून एका पतिव्रतेनें सूर्योदयच बंद केला, शेषाच्या मस्तकावर पृथिवी आहे, वगैरे पौराणिक गोष्टींच्या वाचनापासून आनंद होण्यास वाचकांनीं कांहीं काळपर्यंत आपलें भौतिकशास्त्रांचें ज्ञान विसरलें पाहिजे. ५. **दीनानें.**

१. **अस, राहा.** २. **प्राणसख्या ! देवा ! तुम्ही सदोदित सुखी असा. मग आम्हाला कष्ट झाले तरी हरकत नाहीं. कारण आम्ही जगून फुकट आयुष्याचे दिवस मात्र वेंचणार, तेंच तुम्ही जगलांत तर अज्ञानरूप अंधकारांत भटकणाऱ्या पतितांस पुण्यमार्गाचा उजेड दाखवून त्यांचें कल्याण तरी कराल–असा भावार्थ.** ३. **माया+तमीं=अज्ञान+अंधकारांत=मायारूप अंधकारांत. माया=अज्ञान. अज्ञानरूप अंधकारांत भटकत फिरणाऱ्या लोकांस–पाप्यांस–उत्तम मार्ग जो भगवत्प्राप्तीचा मार्ग तो दाखीव. अंधारांत रस्ता चुकून भलत्याच वाटेनें जाऊन खांचखळग्यांत कांटेझुडपांत पडणाऱ्या वाटसरूला रस्त्यावर आणणें जसें चांगल्या मनुष्याचें काम आहे तद्वतच अज्ञानांधकारांत पुण्यमार्ग सोडून पापमार्गानें जाणाऱ्या पतितांस फिरून पुण्यमार्ग दाखविणें, देवा ! तुमचें काम आहे तें तुम्ही करा, त्यांत मला आनंद आहे. ईश्वरी कृपा व सन्मार्गदर्शनः**—ईश्वरी कृपेशिवाय पतितास सन्मार्ग दिसणें नाहीं. ऋग्वेदांतील पुढील प्रार्थना पहाः— (मंडल १ सूक्त ९० ऋ० १) 'ऋजुनीति नो वरुणो मित्रो नयतु विद्वान्। अर्यमा देवैः सजोषाः ॥ (मंडल १ सूक्त १०४ ऋ० २) ओ त्ये नर इन्द्रमूतये गुर्नू चित्तान्सद्यः अध्वनः जगम्यात् ॥ यांचें भाषांतर पृ० १०१ यांत दिलें आहे. बायबलांतील पुढील प्रार्थना पहाः–' *Shew me Thy ways, O Lord; teach me Thy paths. Lead me in Thy truth, and teach me.'* (Ps. XXV.)

'भले परिशिले सुरासुरनरीं तसे लक्ष मी'
म्हणोत म्हणणार बा! तुज असा नसेल क्षमी. ।

४. उत्तम मार्ग, पुण्यमार्ग, भगवत्प्राप्तीचा मार्ग. ५. आनंदित, संतुष्ट. या गोष्टींत मला मोठा संतोष आहे. येथें मुदित 'होय' अथवा 'आहें' या क्रियापदाचा अध्याहार जाणावा. ६. परमपुण्यशीला प्रभो! ७. या तुझ्या सन्मार्गप्रदर्शक कर्मांत. "मजसारख्या दुर्बळांचीं आयुष्यें घेऊन तुम्हीं लोकांना सन्मार्ग दाखवावा ही गोष्ट मला फार पसंत आहे. सारांश मजसारखे दुर्बळ कष्टी असले तर असोत. परंतु तुजसारखा पुण्यात्मा निरंतर सुखी असून त्वां जगाचा उद्धार करावा यांतच मला सुख आहे; अर्थात् इतरांचा उद्धार केल्यावर माझी उपेक्षा कदापि होणार नाहीं असा येथें कवीचा हृद्गतार्थ दिसतो." [य० पां०-पृ० २०१.] हें कवीचें भाषण फार लडिवाळपणाचें आहे तरी तें लोकरीतीस पूर्णपणें अनुसरून आहे.

१. अन्वयः-'मी सुरासुरनरीं तसे भले लक्ष परिशिले' [असें] म्हणणार म्हणोत, बा! तुज असा क्षमी नसेल [तूं] उरीं भृगुपदाहती मिरवितासि, ती तव नवसुधानवद्या यशःकथा कवी अद्यापि पिती'. केकासंगतिः-ज्यांस स्वहित समजत नाहीं अशा अज्ञानांधकारांत चांचपणाऱ्या मनुष्यांस सन्मार्गास लावावें म्हणून कवीनें वर प्रार्थना केली; परंतु इतकी क्षमाशीलता आपल्या अंगीं नाहीं असें भगवान् कदाचित् म्हणतील अशी शंका घेऊन त्यापेक्षांही जास्त क्षमा भगवंताच्या अंगीं आहे असें दाखवीत होत्साते कवि भगवंताचें सोदाहरण क्षमाशीलत्व वर्णितात. मी सुरासुरनरीं (देवदैत्यमानवकोटींत) तसे भले (तसे क्षमावंत साधु) लक्ष (लक्षावधि) परिशिले (ऐकिले) [असें] ह्मणणार (ह्मणणारे) ह्मणोत. देवासुरमानवांत पुष्कळ क्षमाशील लोक होऊन गेले असें कांहीं लोक ह्मणतील तर खुशाल ह्मणोत, पण माझ्या मतें देवा! [तुमच्या] क्षमेची कोणाच्यानेंही बरोबरी करवणार नाहीं. २. सुर (देव)+असुर (दैत्य)+नर (मानवप्राणी) यांच्यांत. देवांत शंकरासारखे, असुरांत प्रऱ्हादबलीसारखे, व मनुष्यांत व्यासवाल्मीक्येकनाथतुकारामांसारखे पुष्कळ क्षमाशील लोक होऊन गेले; पण ते देवा! तुजसारखे क्षमाशील नव्हते. व्युत्पत्तिः-देवांनीं सुरेचें (मद्याचें) ग्रहण केलें म्हणून त्यांना 'सुर' व दैत्यांनीं ती घेतली नाहीं ह्मणून त्यांना 'असुर' म्हणतात. याला प्रमाण वाल्मीकीरामायणांतील पुढील वचन आहेः-'सुराप्रतिग्रहाद्देवाः सुरा इत्यभिविश्रुताः । अप्रतिग्रहणात्तस्या दैतेयाश्चासुरास्तथा ॥.' [वा० रा०-स० ४६ श्लो० ३६-३८.] समुद्रमंथनकथेंत देवांना अमृत व दैत्यांना सुरा मिळाली असें सांगितलें आहे. (पृ० ८४ टीप ३ पहा). याशीं वरील कथेचा विरोध दिसतो. सुरा ह्मणजे मद्यच कीं काय हा प्रश्न चिंतनीय आहे. याचा ऊहापोह झाला पाहिजे. 'सुर' व 'असुर' शब्दांवर वैदिक विवेचनः-विद्वन्मणी कै० रा० ब० शंकर पांडुरंग पंडित यांनीं ऋग्वेदमंडल १ सूक्त २४ मंत्र १४ (याचा प्रारंभः-अव ते हेळो वरुण) यावर लिहितांना मंत्रांतील 'असुर' शब्दावर टीप दिली आहे. ती फार उपयुक्त जाणून

उरीं[1] भृगुपदाहती[2] मिरवितोसि[3], अद्यापि ती,

सारांशरूपानें आमच्या बहुश्रुत वाचकांची स्मरणशक्ति ताजी करण्याकरितां येथें दिली आहेः- ''यांत 'असुर' हा एक मोठा चमत्कारिक शब्द आला आहे. याचेंच आह्मी 'देवाः' असें भाषांतर केलें आहे. साधारण संस्कृतांत 'असुर' शब्दाचा अर्थ देव असा होत नसून देवशत्रु दैत्य असा होतो. पारसिकांच्या धर्मांत हिंदूंच्या देवास 'देव' असें म्हणतात पण त्यांच्या भाषेंत त्याचा अर्थ भूत, दैत्य असा होतो. पारशी लोक आपल्या स्वतःच्या देवांस 'असुर' ('अहुर') म्हणतात. यावरून आम्ही वेदाच्या आलीकडील संस्कृतांत आमचे देव खेरीज करून जे इतर देव त्यांस 'असुर' असें म्हणतों आणि आमच्या देवांस ते 'देव' (=दैत्य) ह्मणतात असें झालें. दुसरी 'असुर' शब्दाविषयीं अशी चमत्कारिक गोष्ट लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे कीं, ऋग्वेदांत आणि इतर वेदांत 'सुर' शब्द मुळींच येत नाहीं. तो मागाहून 'असुर' शब्दापासून पुढील रीतीनें उत्पन्न झाला. प्रथम 'असुर' असें सर्व देवांस आपण म्हणत होतों. नंतर तो शब्द दुसऱ्या लोकांच्या (पारसिकादिकांच्या) देवांस अथवा वाईट देवांस म्हणजे दैत्यादिकांस तुच्छनार्थी लावूं लागलों, आणि त्याहून जे भिन्न म्हणजे आमचे (चांगले) देव त्यांस नांव पाहिजे तें 'असुर' यापासूनच आम्ही काढिलें. 'असुर' (=जिवंत असणारे) याची खरी व्युत्पत्ति 'अस्' धातूपासून असलेली आम्ही क्षणभर विसरून 'असुर' शब्दांत जो 'अ' आहे तो 'न' या अर्थीं आहे असें गैर समजून 'सुर' शब्द निर्माण केला आणि 'असुर' म्हणजे वाईट देव नव्हेत ते 'सुर' असें समजून 'सुर' हें नांव आम्हीं आपल्या देवांस लाविलें. याप्रमाणें दुसरीं उदाहरणेंः-'अदिति' शब्दावरून 'दिति' आणि तिचे पुत्र ते 'दैत्य' हे आपण निर्माण केले; तसाच 'विधवा' शब्दापासून (हा शब्द वि-धवा असा आहे असें गैर समजून) 'धव' म्हणजे नवरा आम्हीं निर्माण केला आहे, आणि त्यानंतर 'मा-धव', 'रमा-धव', 'उमा-धव' हे शब्द प्रचारांत आले.'' ३. **लक्षावधि** ४. **या ठिकाणीं देवाप्रमाणें क्षमाशील कोणी नाहीं असें वर्णिलें आहे म्हणून येथें असम अलंकार झाला आहे. जेथें उपमाच नाहीं असें वर्णन असतें, तेथें असम नामक अलंकार होतो.** 'सर्वथैवोपमानिषेधोऽसमाख्योऽलंकारः' [रसगंगाधर-पृ० २१०]. **'उपमानिषेध होउनि निरुपम उपमेय होय तरि असम। ललनामुखसौंदर्या उपमा नाहीं, तसेंच तद्धाम' ॥ (श्रीविप०). याचीं उदाहरणेंः**—(१) हे राजा! जो तुझी बरोबरी करतो असा पुरुष आज नाहीं, झाला नाहीं व होणार नाहीं. (२) 'कीं मजवरि प्रसाद श्रीमद्गुरुचा जगीं असामान्य.' [उद्योगपर्व-अ० ११ गी० ९३]. ५. **क्षमाशील.**

१. **छातीवर, वक्षस्थलावर.** २. **भृगुनामक ऋषीच्या पदाची (पायाची) आहति (ताडण)=भृगूचा लत्ताप्रहार. कथासंदर्भः**-भृगुऋषीनें क्षमागुणपरीक्षणार्थ भगवंताच्या उरांत लात मारली ही कथा भागवत-दशमस्कंध-अ० ८९ श्लो० १-१४ त पुढीलप्रमाणें दिली आहेः- **'सर्व देवांत श्रेष्ठ कोण असा ऋषिमंडळींत एकदां प्रश्न निघाल्यावरून त्या विचाराचे निर्णयार्थ ऋषींनीं ब्रह्मपुत्र भृगूस पाठविलें. भृगु प्रथम ब्रह्मदेवाच्या सभेस गेला, तेथें त्यानें नमस्कारपूर्वक पित्याची स्तुति न केल्यामुळें ब्रह्मदेव त्याजवर रुष्ट झाले. पित्याची स्तुति करून तेथून. तो कैला-**

सास गेला. तेथें त्याला बंधूच्या नात्यानें शिव आलिंगन देण्यास उठला असतां 'तूं उन्मार्गवृत्ति आहेस म्हणून मी तुझ्या आलिंगनाचा स्वीकार करीत नाहीं' असें ऋषि महादेवाला बोलला. त्यावर शिव क्रुद्ध होऊन त्याला त्रिशुलानें मारण्यास उद्युक्त झाला. हें पाहून भृगूनें स्तुति करून शिवाचा क्रोध शांत केला व नंतर तो त्रिमूर्तींपैकीं उरलेल्या देवाकडे वैकुंठास गेला. तेथें विष्णु लक्ष्मीच्या मांडीवर मस्तक ठेवून निजला होता, त्याच्या वक्षस्थलावर भृगूनें लात मारली. त्या काळीं विष्णूनें खालीं उतरून त्या मुनीस नमस्कार केला, आणि ह्मणाला, 'भगवन्! आपण आलां हें मीं जाणलें नाहीं, या अपराधाची मला क्षमा असावी. कारण मुनिश्रेष्ठा! तुमचे चरण अत्यंत कोमल असल्यामुळें त्यांस माझ्या कठीण हृदयावर आघात घडल्यानें दुःख झालें असेल.' असें बोलून देव स्वहस्तानें त्या ब्राह्मणाचे चरण रगडीत बसले. आणि त्याची अशी प्रार्थना करिते झाले कीं, 'तुम्ही आपल्या पादोदकानें मला व माझ्या स्वरूपांत असणाऱ्या सर्व लोकपालांस पवित्र करावें; कारण तुमचें चरणोदक सर्व तीर्थांसही पवित्र करण्याची शक्ति देणारें आहे. तसेंच हे ऐश्वर्यसंपन्न ब्राह्मणा! मीही तुमच्या अनुग्रहानेंच लक्ष्मीस मुख्य प्रीतिपात्र झालों असून आज तुमच्या चरणताडनानें माझें अनिष्ट दूर झाल्यामुळें ही लक्ष्मी माझ्या वक्षस्थलीं निरंतर वास करील.' नंतर भृगुऋषीनें ऋषिसभेस परत येऊन हा वृत्तान्त सांगितला. तेव्हां सर्व देवांत विष्णूच श्रेष्ठ आहे असा सर्व ऋषींनीं निश्चय केला. ज्या ठिकाणीं भृगुऋषीनें लात मारली त्या लातेच्या चिन्हाला **'श्रीवत्स'** व विष्णूला **श्रीवत्सलांछन** असें ह्मणतात. **मो**रोपंतादि महाराष्ट्रकवींनीं ह्या भृगुपदलांछनाबद्दल विष्णूचा पुष्कळ ठिकाणीं गौरव केला आहे. **वामना**नें पुढील उताऱ्यावरून प्रकृत केकेंत वर्णिलेल्या विष्णूच्या क्षमागुणाचें दृढीकरण होईल:—मूढ मूर्ति हरि! या भुजगाची। शांति माउलिच तूं त्रिजगाची। तूं क्षमा तदपराध कराया। योग्य सिद्धसुरसाधकराया॥ ॥ १२ ॥ ताडिलेंच भृगुनें तुज लातें। श्लाघ्य होय हृदयीं तुजला तें। गानि या अमृत आचरणातें। भक्त जे शरण या चरणांतें ॥१३॥ उरीं भृगूची हरि लात सोसी। ऐसी क्षमेचीच सदा असोसी। क्षमा धरू वृत्ति अशी मनाची। प्रार्थी हरीतें मति वामनाची ॥ ४० ॥ [हरिविलास–अध्याय ६ पृ० ४३३-४३४]. या कथेचें वर्णन **पंतां**च्या ग्रंथांत [कृष्णविजय–उत्तरार्ध–अध्याय ८९ गी० १–२५ ] आहे. तसेंच **पंतां**नीं **'भृगुचरित्र'** म्हणून एक लहानसें स्वतंत्र प्रकरण लिहिलें आहे. **भृगुपदलांछनाविषयीं 'वेदार्थयत्नकार' रा० ब० शंकर पांडुरंग पंडित यांचे विचार:—**'या ऋग्वेदांतील ऋचेंतील प्रार्थना किती नम्र आणि किती भाविक आहे पहा. रक्षण करणारे देव 'महाराज' म्हणजे मोठ्या शक्तीचे व अधिकाराचे राजे होत; आणि ज्याचें रक्षण करावयाचें तो दीन दास, दीनवाण्या स्थितींत आहे असें उपासक मंत्रवक्ता म्हणतो. हा जो देवभजकभाव त्याला, आणि देवाधिदेव विष्णूच्या छातीवर ब्राह्मणानें लाथ मारिली आणि तेणेंकरून जें क्षत पडलें तो एक अलंकारच आहे असें समजून विष्णूनें तें क्षत बिरुद करून बाळगिलें आणि तो आपल्यावर ब्राह्मणाचा प्रसाद झाला असें मानिलें. या अघोर पातकरूपी कथेला किती अंतर आहे पहा!' (अंक ३ पृष्ठ १२९) 'ऋग्वेदांत विष्णूविषयीं जें सांगितलें आहे त्यांत आणि पुराणांत वगैरे त्याजविषयीं सांगितलेल्या कथांत पुष्कळ अंतर आहे. विष्णूस अजून (वैदिककाळांत) बायकोची, मुलांची आणि संसार करण्याची जरूर

१कवी तवयशःकथा २नवसुधानवद्या ३पिती. ॥ ९१

लागली नव्हती. तो ब्राह्मणांकडून लाथा मारून घेऊन त्यांतच आपला मान आहे असें मानून घेण्यास शिकला नव्हता.' (वेदार्थयत्न अंक ३ पृष्ठ १८०) '**भृगुः-हे** प्रख्यात महापुरातन महर्षि होत. पूर्वीं या जगांत अग्नि नव्हता, तो भृगूंसाठीं मातरिश्व्यानें म्हणजे वायूनें पृथ्वीवर आणिला (ऋ. १.६०.१), भृगूंनीं अग्नीला प्रथम यजमानाच्या घरीं स्थापिलें. यावरून भृगूनें अग्निभक्तीचा प्रचार प्रथम स्थापिला असें समजल्यास चालेल; किंवा भृगूंनीं अग्नि पृथ्वीवर आणिला हें केवळ रूपक आहे असें मानल्यास त्याला ऋ ३.५.१० यांत आधार आहे. या मंत्राचा (भृगुभ्यःपरिमातरिश्वा गुहासन्तं हव्यवाहं समीधे) अर्थ सायणाचार्य 'लपून राहिलेला जो अग्नि त्याला मातरिश्व्यानें भृगूंपासून ह्मणजे सूर्यकिरणांपासून पेटविलें' असा करितात. यावरून भृगु ह्मणजे सूर्यकिरण असा अर्थ आला असून त्यामुळें जेथें जेथें भृगूंनीं पृथ्वीवर यज्ञकर्मासाठीं ह्मणून अग्नि प्रथम आणिला किंवा पेटविला असें सांगितलें आहे, तेथें तेथें सूर्यकिरणांनीं अग्नीस प्रथम पृथ्वीवर आणिलें असा गूढार्थ समजतां येईल, आणि मातरिश्व्यानें अग्नि भृगूंसाठीं पेटविला ह्मणजे सूर्यकिरणापासून पृथ्वीवर प्रगट होणारा जो अग्नि त्याला वाढवून वायूनें विस्तृत केलें असा अर्थ. भृगु हे अतिप्राचीन ऋषि होत असें वेदमंत्र रचले गेले तेव्हांही मानित असत. सगळ्या ऋग्वेदसंहितेंत भृगूंनीं केलेलीं सूक्तें नाहींत.' (वेदार्थयत्न पु० १ अंक १४ पृ० ८४) **भृगुपदलांछनकथेंत गूढ रूपक असावें** असें वाटतें. भृगु हा ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांपैकीं एक असून त्याला ख्यातीं पत्नीपासून धाता व विधाता असे दोन पुत्र व श्रीनामक एक कन्या होती. त्यांपैकीं कन्या नारायणाला दिली. तीच लक्ष्मी होय असें मार्कंडेयपुराण अ० ५२ यांत सांगितलें आहे. ३. **भूषण म्हणून मिरवितोस (धारण करितोस).** 'मिरविणें' हा शब्द फारसी आहे. **देवा! सर्वकाळ तुम्ही भृगुपदलांछन भूषण म्हणून वक्षस्थलावर धारण करितां. यापेक्षां तुमच्या क्षमागुणाची महती ती कोणती सांगावी. भृगूचा अत्यंत असहनीय असा अपराध पोटांत घालून त्यानें मारलेल्या लातेची खूण वक्षस्थलावर भूषण म्हणून धारण करितां, तेव्हां तुमच्या क्षमागुणाची बरोबरी इतर कोण करणार आहे?**

१. **ज्ञानी, पंडित.** 'संख्यावान् पंडितः कविः' **इत्यमरः** २. **नव (नवीन) सुधेप्रमाणें (अमृताप्रमाणें) अनवद्या (स्तुत्या, स्वच्छा) अशी जी तव (तुझी) यशाची (कीर्तीची) कथा (गोष्ट) ती कवि (ज्ञाते पुरुष) पिती (पितात, आनंदानें ऐकतात). नूतन अमृताप्रमाणें सरस व निर्दोष अशी भगवंताची कीर्ति ज्ञाते पुरुष प्रेमानें गातात-हा** भावार्थ. **येथें 'सुधा' शब्द श्लिष्ट आहे. सुधा=(१) अमृत, (२) चुना. अमृताचा रंग पांढरा असा कविसंकेत आहे, तेव्हां भगवंताची कीर्ति ही नवसुधेप्रमाणें पांढरी, स्वच्छ, अनिंदित अशी आहे असें कवीचें म्हणणें.** 'सुधा' शब्दाचे अनेक अर्थ कोशांत आढळतात:-'सुधा लेपोऽमृतं स्नुही' **इत्यमरः**. 'सुधा प्रासादभाक् द्रव्यं सुधा विद्युत्सुधामृतम् । सुधा हि भोजनं ज्ञेयं सुधा धात्री सुधा स्नुही ॥' **(मंजरीकोश.) अनवद्या=स्तुत्या; अन्+अ+वद्य=न+न+उच्चारण्यास योग्य, बोलण्यास उचित=जी बोलण्यास अनुचित नव्हे**

'[1]भवन्मतिस [2]आवडे जरि, [3]धनादिकां लागिं [4]ते
मदीय [5]गुणकीर्तनश्रवण कां तरि [6]त्यागिते? ।'
[7]असेंहि म्हणशील [8]बा! जरि, तरी तुझी मावली
तुज त्यजुनि [9]पाजितां, कशि [10]दुधाकडे धांवली? ॥ ९२

---

ती स्तुत्य, प्रशस्य. येथें दोन नकार आहेत त्यांपासून निषेधार्थाचा परस्पर लोप झाला आहे. 'द्वौ नञौ प्रकृतार्थं गमयतः' (Two negatives make one affirmative.) असा वचनाधार सुप्रसिद्ध आहे. केकेचा भावार्थः—कवीनें भगवंताच्या क्षमागुणाची प्रशंसा करून मजसारख्या सर्व पाप्यांच्या पातकांची क्षमा करून त्यांचा उद्धार करा अशी प्रार्थना केली आहे. ३. पितात. पिणें ही क्रिया रसाच्या ठिकाणीं संभवते, पण लौकिक रीतीस अनुसरून ती कथेच्या संबंधानें वर्णिली आहे म्हणून हा समाधि नामक गुण होय. हा 'समाधि' नामक काव्यालंकारापासून अगदींच भिन्न समजावा. दंडिकृत काव्यादर्शांत या गुणाचें सोदाहरण लक्षण दिलें आहेः—'अन्यधर्मस्ततोऽन्यत्र लोकसीमानिरोधिना । सम्यगाधीयते यत्र स समाधिः स्मृतो यथा ॥ ९३ ॥ कुमुदानि निमीलन्ति कमलान्युन्मिषन्ति च । इति नेत्रक्रियाध्यासाल्लब्धा तद्वाचिनी श्रुतिः' ॥९४॥ [काव्यादर्श—१ परिच्छेद—पृ० ८३]. यशाला सुधेची उपमा दिली आहे म्हणून 'पिती' असें म्हटलें आहे.

१. अन्वयः—'जरि भवन्मतिस आवडे तरि ते[मति]धनादिकांलागिं मदीयगुणकीर्तनश्रवण कां त्यागिते'? बा! [देवा!] जरि असेंहि [तूं] म्हणशील, तरी तुझी मावली तुज पाजितां त्यजुनि दुधाकडे कशि धांवली? प्रास्तविकः—'तुला मी फार आवडतों असें तूं बोलण्यांत नेहमीं दाखवितोस पण मजपेक्षां तुला विषय फार आवडतात. असें तुम्ही म्हणाल तर हा दोष मजकडे लावूं नका, अशा अभिप्रायानें कवि म्हणतात. भवत्+मतिस=तुझ्या+बुद्धीला=तुझ्या मतीला, 'बुद्धिर्मनीषा धिषणा धीः प्रज्ञा शेमुषी मतिः' इत्यमरः. व्या०:—भवत् हें संस्कृतांत सर्वनाम होय. त्यांतील 'त्'ला 'यरोऽनुनासिकेऽजनुनासिको वा' या सूत्रानें न् आदेश झाला आहे. व्यंजनापुढें त्या वर्गातील अनुनासिक व्यंजन आल्यास पहिल्याच्या जागीं सवर्ण अनुनासिक व्यंजन होतें, जसें तद्+नयन=तन्नयन, तद्+मन=तन्मन. २. आवडतो. ३. द्रव्यादि ऐहिक विषयांसाठीं, येथें 'आदिक' यामध्यें स्त्रीपुत्रादिकांचा समावेश करावयास हरकत नाहीं. ४. ती तुझी मति. प्राकृत कवितेंत 'ती, ही' यांच्या जागीं 'ते, हे' हीं रूपें घालण्याचा सांप्रदाय फार आहे. पुरवणींतील 'कवींचें निरंकुशत्व' हें सदर पाहा. ५. मदीय (माझे) गुणांचें कीर्तन (वर्णन करणें) व श्रवण (ऐकणें). ईश्वराच्या दयादाक्षिण्यादि गुणांचें वर्णन व श्रवण. 'जर तुला मी खरोखरीच आवडत असतों तर तुझी मती माझे गुण वर्णन करण्याचें किंवा ते ऐकण्याचें सोडून स्त्रीपुत्रधनादि विषयांकडे कां धांव घेती? ज्या अर्थी तुझ्या बुद्धीची ओढ विषयांकडे जास्त धांवते त्या अर्थी मी तुला आवडतों हें म्हणणें लाघवी (खोटें) आहे' हें देवाचें कवीला म्हणणें. ६. त्याग करते, टाकती. ७. वर सांगितलेलें. वरील ईश्वराच्या आक्षेपावर कवि

अनावर पिशाचिका विषयवासना सत्य, जी

**उत्तर देतात. ८. बापा!. 'बा' या शब्दानें कवीनें आपलें ईश्वरविषयक प्रेम व्यक्त केलें. देवा! वरच्या सारखा आक्षेप जर तुम्ही काढाल तर माझें एक आपणास विचारणें आहे. ९. आई, माता, अर्थसंदर्भानें यशोदा. १०. स्तनपान करवीत असतां, पाजीत असतां. ११. दूध उतूं जात होतें तिकडे. कथासंदर्भः**–एके प्रसंगीं यशोदा चुलीवर दूध तापत ठेवून कृष्णाला स्तनपान करवित असतां, दुधाला कढ येऊन तें उतून जाण्याच्या बेतांत आलेलें तिनें पाहिलें. तेव्हां कृष्णाचें पिणें पुरतें झालें नव्हतें तरी त्याला तेथें तसाच टाकून ती लगबगीनें दूध उतूं जात होतें तें सांभाळण्याकरितां दुधाच्या भांड्याकडे धांवली. **कवीचा अभिप्रायः–यावरून कवि म्हणतात 'देवा! तुझी साक्षात् आई यशोदा तुजसारखें नवसासायासानेंही न मिळणारें प्रियबालकरत्न मांडीवर स्तनपान करीत असतां त्याला एकीकडे सारून यत्किंचित् दुधाच्या लोभानें धांवली हें जर खरें आहे, तर मग तूं आम्हां भक्तजनांला अगदींच अप्राप्त असतां, आमच्या सारख्या लोकांना दुधापेक्षां शतपटीनें अधिक मोहक असे धनदारादि प्रपंचपाश सुटत नाहींत यांत काय नवल आहे?' पुढील केकेची संगतिः**–म्हणून हा केवळ आमचाच दोष नाहीं, हा 'अनावर पिशाच्चिका जी विषयवासना' तिचा खेळ आहे. याच कारणास्तव पुढील केकेंत कवि देवाला विषयवासनारूपी पिशाच्चिका कवीच्या अंगांतून काढून टाकण्यास विनवितो. दुसऱ्या एका स्फुट संस्कृत काव्यांत पंतांनीं यशोदा कृष्णाला टाकून दुधाकडे धांवली म्हणून खेदोद्गार काढले आहेत ते रसिक वाचकांस आवडतील असें समजून पुढें दिले आहेतः—'हा! हत! हंत! पिबंतं त्वाममृतनिधिं द्रुतं निरस्य भुवि। याता माता बहुमतदुग्धा मुग्धाः खलु स्त्रियो जात्या. ॥ ६० ॥ मुग्धे! दुग्धे किमधिकमंब! त्वं बत! सुवंचितासीति। ज्ञापयितुमेवमेव त्वं गोरसभाजनेऽकरोः कोपम्॥ ६१ ॥ [कृष्णस्तवराज–पृ० २४१.] या प्रसंगाचें वर्णन **पंत**विरचित 'कृष्णविजय–पूर्वार्ध' अध्याय ९ यांत पहा. [आर्यागीति–५-८, पृ० २७] **येथें अनुमान नामक अलंकार झाला आहे.** 'जेथें विच्छित्तीच्या साह्यानें साधनापासून साध्याचें ज्ञान अनुमित होतें तेथें अनुमान अलंकार जाणावा.' **(मी जर तुला आवडतों तर धनादि विषयासाठीं माझ्या गुणांचें कीर्तन तुझ्या मनानें कां टाकिलें असतें? पण ज्याअर्थी तूं माझ्या गुणांचें कीर्तन करीत नाहींस त्याअर्थी तुझ्या मनाला मी आवडत नाहीं, असें अनुमान सिद्ध होतें, म्हणून हा अनुमान अलंकार जाणावा)** अथानुमानम्– 'अनुमानं तदुक्तं यत्साध्यसाधनयोर्वचः' ३२ 'यत्र पतत्यबलानां दृष्टिर्नियताः पतन्ति तत्र शराः। तच्चापरोपितशरो धावत्यासां पुरः स्मरो मन्ये॥' इति निदर्शनम्. (साहित्यकौमुदी १० वा परिच्छेद.) याचीं उदाहरणें:–(१) 'हे सखे! तुझ्या सबाष्प निःश्वासावरून तुझ्या हृदयांत कामाग्नि पेटला आहे असें समजतें.' (२) 'गोपींच्या दृष्टी कृष्णमुखज्योत्स्ना अहोरात्र पितात तेव्हां त्या चकोरीच असल्या पाहिजेत.'

**१. आवरण्यास अशक्य, दुर्निवार. 'विषयवासना [ही] अनावर पिशाचिका सत्य [आहे], जी असें कृत्य करवि, जी भुलविते, [जी] कधीं न त्यजी; म्हणोन तुज आपल्या विनवितों:–'गा! [देवा!] हिला काढ, मग तूं जरी आपणा–'गाढ गा'–[असें]**

असें करवि कृत्य, जी भुलविते, कधीं न त्यजी;।
म्हणोन तुज जाणत्या विनवितों, 'इला काढ गा !
करीन मग, तूं जरी म्हणसि आपणा गाढ गा.' ॥ ९३

म्हणसि, [तर, तसें] करीन'–असा अन्वय. प्रस्तावनाः–यांत विषयवासनेची निर्भर्त्सना करीत कवि ईश्वराला आपला उद्धार करावा म्हणून आणखी प्रार्थितात. २. पिशाची, डाकिनी. भूतप्रेतादि योनींची उत्पत्तिः–दहा मरीच्यादिक ऋषींना देव, महर्षि इत्यादिकांस उत्पन्न केल्यावर यक्ष, राक्षस, पिशाच, गंधर्व, अप्सरा, असुर, नाग, सर्प, पक्षी इ० उत्पन्न केले असें सांगितलें आहे. [मनुस्मृति–अ० १ श्लो० ३७.] विष्णुपुराणांत (अंश १ अध्याय ५) ब्रह्मदेवाच्या क्रोधापासून भुतें उत्पन्न झालीं असें सांगितलें आहे. ३. पुत्र, दारा, धनादि सुखाकडे प्रवृत्ति. पहिल्या दोन चरणांचा अर्थः–विषयवासनारूप जखीण खरोखरीच दुर्निवार आहे. ही विषयेच्छा प्राणिमात्रांस मोह पाडून त्यांचें ईश्वराकडचें लक्ष्य काढून तें ऐहिक उपभोगांत आसक्त करिते. तिनें झपाटलेला मनुष्य तिच्या तावडींतून सुटणें फार कठीण. मनुष्याचें मन स्त्रीपुत्रादि प्रपंचांत रमलें म्हणजे तें परमेश्वराकडे रममाण होणें अत्यंत दुष्कर असतें. सामान्यतः 'विषय' या शब्दाचा अर्थ स्त्रीपुत्रधनादि प्रपंचाचा पसारा असा होतो तरी बहुतकरून त्याचा अर्थ 'स्त्रीविषयक आसक्ति' असा करितात. स्त्रीविषयक आसक्ति सर्वांत प्रबळ आहे हें कारण उघडच आहे.

१. हीच विषयेच्छा ईश्वराकडचें लक्ष्य काढून ऐहिक भोगांकडे लावण्याचें कृत्य करिते. २. मोह पाडते, भुरळ घालते. ३. सोडते. एकदां अंगांत संचरली म्हणजे मग तेथून कितीही प्रयास केले तरी सहसा निघत नाहीं. ४. भूतवैद्याला, पंचाक्षऱ्याला. तृतीयचरणार्थः–ह्या विषयवासनेचा असा लोंचट व दुष्ट स्वभाव आहे म्हणून ह्या पिशाचिकेचा पंचाक्षरी जो तूं त्या तुला, माझ्या अंगाला झोंबलेल्या ह्या डाकिणीला पंचाक्षरी विद्येच्या बलानें झाडून टाक असें विनवितों (प्रार्थितों). ईश्वरकृपेवांचून मनुष्याची विषयावरील आसक्ति सुटणें अत्यंत दुष्कर म्हणून त्यानें आम्हां मनुष्यांवर कृपा करावी–असा कवीचा अभिप्रेतार्थ. केकासौंदर्यः–कवीनें येथें भगवंताला 'जाणता' असें म्हणून पिशाचिकानिवारणार्थ जो प्रार्थनाप्रकार योजिला आहे तो सहृदयवाचकांस सरस वाटणारा आहे. 'जाणता' या पदानें भगवंताचें पिशाचबाधानिवारक सामर्थ्य उत्तम ध्वनित केलें आहे. या संबंधानें शिवलीलामृतांतील पुढील छोटा उतारा वाचनीय आहे. पिशाचिका व पंचाक्षरी कोण?–दाशार्ह राजा गर्गमुनीला म्हणतोः–'पंचभूतांची झाडणी करून । सावध केलें मजलागून । चारी देह निरसून । केलें पालन गुरुराया ॥१२५॥ पंचविस तत्वांचा मेळ । त्यांत सांपडलों बहुत काळ । क्रोधमहिषासुर सबळ । कामवेताळ धुसधुसी ॥१२६॥ आशा मनसा तृष्णा कल्पना । भ्रांति भुली इच्छा वासना । या जखिणी यक्षिणी नाना । विटंबित मज होत्या ॥१२७॥ ऐसा हा अवघा मायामेळ । तुवां निरसिला तत्काळ । धन्य पंचाक्षरी मंत्र निर्मळ । गुरुदयाळ धन्य तूं' ॥ १२८ ॥ (शिवलीलामृत, अध्याय १) ५. हिला. विषयवासनारूपी पिशाचिकेला. ६. काढून

[1]तुझ्या [2]गुणकथा [3]महासुरभि, त्यांत ही रास[5]भी
शिरे वि[6]षयवासना, जसि [7]शुंका [8]अहीरास भी, ।

---

**टाक. दुष्टवासनेपासून आपणास सोडवावें म्हणून ऋग्वेदांत घोरपुत्र कण्वांनीं मरुतांची प्रार्थना केली आहे.** '(मो षु णः परापरा) हे मरुतांनो ! अतिप्रबळ आणि मारावयास कठिण अशी जी निर्ऋति ती आह्मांस कधींही न मारून टाको; ती आमच्या दुष्टवासनेसहित नष्ट होवो.' निर्ऋति देवतेचें काम दुष्टवासना उत्पन्न करणें हें होय. म्हणून दुष्टवासनेसहित तिचा नाश होवो अशी प्रार्थना केली आहे. (१.३८.६) **'काढ गा' या ठिकाणीं 'गाढ गा' असाही पाठ आढळतो आणि तो यमकास अनुकूल आहे. 'गाढ' याचा 'गाड'=गाडून टाक**–असा अर्थ करावा. **पिशाचाला मांत्रिक गाडून (पुरून) टाकतात हें सर्वश्रुत आहेच. पंतांचा पाठ कोणता असावा हें सांगणें बरेंच कठीण आहे.** ७. **अगा देवा!** ८ **बाधा नाहींशी झाल्यावर तुझ्या मनाप्रमाणें मी सप्रेमांतः-करणानें व एकनिष्ठपणे तुझें भजनपूजन व गुणवर्णन करीन. येथें अभेदरूपकालंकार झाला आहे.** विषयवासना उपमेय आणि पिशाचिका उपमान यांचें साधर्म्य येथें अभेदरूपानें (विषयवासना व पिशाचिका ही एकच आहेत दोन नव्हेत अशा रीतीनें) वर्णिलें आहे. ९. **गायन कर, गुण वर्णन कर. काव्ययमकः**–यमकांतील एकाक्षरी पदें भिन्नार्थकच असावी लागतात. या नियमाला अनुसरून ८६ व्या केकेत 'हो' हें एकाक्षरी पद 'होवो, अहो!' अशा दोन अर्थी योजिलें आहे. तसेंच यात 'गा'चा अर्थ तृतीय चरणांत 'अगा' असा होत असून चतुर्थ चरणांत 'गायन कर' असा होतो. ह्या यमकांतील एकाक्षरी पदें **पंतांच्या काव्यांत कधी कधी** एकार्थ असलेलीही आढळतात, उदाहरणें–वनपर्व अ० ४ गी० १०४,११९,१२१,२८६ पहा.

१. [हे देवा!] **तुझ्या गुणकथा महासुरभि; त्यांत ही विषयवासना रासभी शिरे** [ही रासभी] जशि शुका अहीरास भी तशी इतरास न भी, **सदंडही इस हाकिती तथापि बहु लाथळी, मग अदंड मी हा किती?–असा अन्वय. प्रस्तावनाः–मागील केकेंत विषयवासनेला पिशाची म्हणून तिची निर्भर्त्सना केली. या व पुढील तीन केकांत विषयवासनेला गाढवी कल्पून तिचें दुष्टत्व वर्णिलें आहे व तिचा नाश करण्याविषयीं भगवंताची पंतांनीं प्रार्थना केली आहे. २. दया, क्षमा, शांति वगैरे भगवंताचे गुण वर्णन करणाऱ्या पौराणिक कथा (गोष्टी). ३. मोठ्या कामधेनु.** अगदीं पहिली कामधेनु ही समुद्रमंथनापासून झालेल्या चवदा रत्नांपैकीं एक होय, ती वशिष्ठाला दिली होती. कामधेनूपासून इष्टवस्तुलाभ होतो, हें वसिष्ठाच्या नंदिनीच्या गोष्टीवरून सर्वश्रुतच आहे. **कामधेनु ह्या सुरभि, परमेश्वराच्या गुणकथा ह्या महासुरभि कारण त्यांचा अधिकार कामधेनूपेक्षां मोठा आहे. कामधेनूपासून इष्टलाभ होतो तरी भगवत्पदप्राप्ति होत नाहीं; गुणकथांमुळें ती होते. ह्मणून ही उपमा फार समर्पक आहे. ४. प्रथम चरणार्थः–भगवत्कथा कामधेनूंत विषयेच्छागाढवी शिरून त्यांची बरोबरी करण्याचा प्रयत्न करिते. भगवद्गुणवर्णन चाललें असतां लोकांचें लक्ष्य विषयवासनेकडे जाऊन भगवन्नामाकडे त्यांचें दुर्लक्ष्य होतें. ५. गाढवीः** 'चक्रीवंतस्तु बालेया रासभा गर्दभाः

तशी न ईतरास भी; इस सेदंडही हाकिती;
तथापि बहु [3]लाथळी; मग अँदंड मी हा कीर्ती ॥ ९४

•खराः' इत्यमरः. उपमेची समर्पकताः—मनुष्याच्या विषयवासनेला पशूची, त्यांतही गाढवीची उपमा देऊन अप्रत्यक्षपणें मनुष्याला गर्दभ म्हटल्याबद्दल ज्यांना वाईट वाटेल त्यांनीं एकनाथस्वामींच्या पुढील भागवती ओव्यांकडे जरा नजर पुरवावी. त्यांनीं तर ब्रह्मज्ञान नसणाऱ्या मनुष्यांस श्वानसूकरादि पशूंपेक्षांहि हीन मानिलें आहे. 'साधीना देहीं ब्रह्मज्ञान । तो श्वानसूकरा प्रमाण । अथवा त्याहोनि हीन । ते विवंचना परियेसी ॥३५९॥ पशूसि हाणितल्या लाता । द्वेष न धरी सर्वथा । मनुष्यासि तूं म्हणतां । जीवघाता प्रवर्ते ॥ ३६० ॥ पशूसि लोभ नाहीं संग्रहता । एक आहार होय भक्षिता । मग उरलिया अर्था । त्यागी सर्वथा तत्काळ ॥ ३६१ ॥ मनुष्याचें लोभिष्ठपण । गांठीं असल्या कोटीधन । पोटा न खाय आपण । मग त्यागितां प्राण त्यजील ॥ ३६२ ॥ सायंप्रातर चिंता । पशूंसि नाहीं सर्वथा । मनुष्याची चिंता पाहतां । जन्मशतां न राहे ॥ ३६३ ॥ अमितधनें असतां गांठीं । तरी चिंता अनिवार मोठी । नाथिलेंचि भय घे पोटीं । अविश्वासी सृष्टी नरदेहा ॥३६४॥ काम क्रोध सलोभता । चिंता निंदा अतिगर्वता । हें मनुष्याचेनि माथां । पशूंसि सर्वथा असेना॥३६८॥ पशूंसि ऋतुकाळीं गमन । मग स्त्रियेशीं नातळे आपण । पुरुषासि नित्य स्त्रीसेवन । गरोदरहि जाण न सोडी ॥ ३६७ ॥ न साधितां आत्मज्ञान । केवळ जे विषयी जन । ते श्वान शूकरांपरिस हीन । माणुसपण त्यां नाहीं ॥ ३६९ ॥ (अध्याय ९) ६. **येथें गुणकथा आणि महासुरभि, विषयवासना आणि रासभी, यांत अभेद आहे म्हणून हा अभेदरूपक अलंकार समजावा. ७. शुकाचार्यांस. कथासंदर्भः**-पराशरसत्यवतीपुत्र व्यासांस शुकीचें रूप धारण केलेल्या एका अप्सरेपासून झालेला पुत्र. हे आजन्म ब्रह्मनिष्ठ असून परमभागवत होते. एकदां यांचें उग्र तप पाहून इंद्राला भय वाटलें व त्यानें यांची तपश्चर्या भग करण्याकरिता वसंत व काम या प्रबल आयुधांना बरोबर देऊन रंभेला पाठविलें, पण यांच्या निःसीम विषयपराङ्मुखतेपुढें तिचें कांहीं न चालून ती यांना शेवटीं शरण गेली. यानेंच परिक्षिति राजास 'भागवत' सांगितलें. शुकाचा अधिकार व्यासापेक्षांही मोठा होता असे भागवत प्रथमस्कंधांतील कथेवरून दिसून येतें. ८. **गवळ्यास. ही विषयवासना गाढवी जशी शुक हाच कोणी अहीर (गवळी) त्यास मागें एकदां भ्याली तशी इतरास भीत नाहीं. एका शुकाचार्यानें मात्र विषयवासना खरोखरी जिंकली.**

**१. इतर लोकांना, विश्वामित्रादि मुनिजनांला.** २. **दंडधारी लोक. 'सदंड' हा शब्द श्लेषयुक्त आहे. ह्याचे येथें दोन अर्थ होतात. हातांत काठी असणारे व ज्यांनीं विषयवासनेचा त्याग केल्याचा अथवा इंद्रियनिग्रह केल्याचा दर्शक असा जो दंड तो धारण केला आहे असे संन्यासी, योगी, तपस्वी. त्रिदंडीः**–'कोणास शाप न देणें हा वाग्दंड, काम्यकर्म न करणें हा कर्मदंड व कदापि ग्राम्यविषयांचें चिंतन न करणें हा मनोदंड असे तीन दंड धारण करणाऱ्या योग्यालाच त्रिदंडी यति ह्मणतात. 'वाग्दंडः कर्मदंडश्च मनोदंडश्च ते त्रयः । यस्यैते नियता दण्डाः स त्रिदंडी महायतिः' ॥ (मार्कंडेयपुराण अ० ४१ अलर्कदत्तात्रेयसंवाद). **एक अर्थः–ह्या विषयवासनारूपी गाढवीला हांकून देण्या**

**करितां लोक हातांत दंड (काठी) घेऊन तिला मारतात, तरी ही त्यांच्या का-ठ्यांना न जुमानतां त्यांना लाथा मारते व आपल्या जागेवरून हालत नाहीं. अशी सदंडांचीं दशा! मग कवि म्हणतात, मी तर अदंड म्हणजे माझ्या हातांत काठी नाहीं, तेव्हां ही माझें थोडीच ऐकायला बसली आहे!** (येथें **काव्यार्थापत्ति** अलंकार झाला). **दुसरा अर्थ-सदंडाला म्हणजे सर्वसंगपरित्याग क-रून असणाऱ्या संन्यासिजनाला जर ही गाढवीसारखी द्वाड विषयवासना आवरत नाहीं, तर मग स्त्रीपुत्रधनदारादि संसारपाशांत गुरफटलेल्या गृहस्थाश्रमी लोकांना आवरत नाहीं, यांत काय नवल आहे? ३. लाथा मारते. जनांला मोह पाडून त्यांच्या गळीं पुनः पुनः पडते. ४. ज्याच्या हातांत काठी नाहीं तो, किंवा ज्यानें चतुर्थाश्रमाची दीक्षा घेतली नाहीं असा संसारी मनुष्य, गृहस्थाश्रमी पुरुष. विषय-वासनेची दुर्निवारता:**-विषयवासनेचा मुख्य व रूढार्थ जो स्त्रीविषयक आसक्ति ती किती दुर्निवार आहे, मोठमोठे तपस्वी तिच्यापुढें कसे नम्र झाले, देवांत श्रेष्ठ अशा देवांची सुद्धा तिच्यामुळें कशी त्रेधा उडाली हें पुराण श्रवण करणारास सुविदित आहेच. एकनाथी भागवतांतील पुढील संक्षिप्त उतारा पहा:-(काम आपला प्रताप नरनारायणांस सांगतो) 'मज कामाचेनि घायें। ब्रह्मा कन्येमि धरूं जाये। पराशरा केलें काये। भोगिली पाहे दिवा दुर्गंधा॥ ११७॥ ज्यातें योगी वंदिती मुकुटीं। जो तापसांमाजी धूर्जटी। तो शिव लागे मोहिनीपाठीं। फिटोनि लंगोटी वीर्य द्रवलें॥ ११८॥ विष्णु वृंदेच्या स्मशानीं। धरणें बैसे विषयग्लानि। अहल्येची काहणी। वेदीं पुराणीं वर्णिजे॥ ११९॥ नारद नायके माझी गोष्टी। त्यासि जन्मले पुत्र साठी। माझी साहों शके काठी। ऐसा बळिया सृष्टीं असेना॥ १२०॥ जो ब्रह्मचाऱ्यांमाजी राजा। हनुमंत मिरवी पैजा। तयास्तव मकरध्वजा। संगेंविण वो जन्मविला म्यां॥ १२१॥ कलंकिया केला चंद्र। भगांकित केला इंद्र। कपाटीं घातला षण्मुख वीर। जो लाडका कुमर महेशाचा॥१२२॥ मज जाळिलें महेशें। त्यासि म्यां अनंगें केलें पिसें। नवल धारिष्ट तुझ्या ऐसें। पाहतां न दिसे तिहीं लोकीं॥ १२४॥ (अ० ४) (कामबाणाचा दरारा) ज्या बाणाचा पिसारा। लागतांचि पैं भेदरा। तापसीं घेतला पुरा। सोडूनि घरदारा पळाले॥ २२७॥ (अ० ६). एवढ्याकरितां सं-न्याशांनीं काष्ठाच्या सुद्धां स्त्रीस नुसत्या पायानें देखील स्पर्श करूं नये असें श्रीमद्भागवत एका-दशस्कंध यांत सांगितलें आहे:-'पदापि युवतीं भिक्षुर्न स्पृशेद्दारवीमपि। स्पृशन्करीवत्बध्येत क-रिण्या अंगसंगत:'॥(अ० ८ श्लो० १३) तसेंच 'काशीखंड' अ० ७ पहा. ५. **कवि मोरोपंत**. ६. **व्या०:**-'कोणत्याही कार्याविषयीं असामर्थ्य दाखवायाचें असतां **किती** या शब्दाचा प्रयोग व्यवहारी भाषणांत फार आढळतो.' [य० पां०-पृ० २१२.] अशा आशयाचीं उदाहरणें **पंतांच्या** काव्यांत पुष्कळ आहेत. (१) किति कुरुबळ? भस्म करिल जग पाशुपतश हा निमेषांत. [उद्योगपर्व-अ० १४ गी० १० पृ० ३३०.] **केकामाधुर्य:**-या केकेंत कवीनें भगवत्कथेला कामधेनूची उपमा देऊन आपल्या उपासकांचा उद्धार करण्याचें तिचें सामर्थ्य सुंदर रीतीनें दर्शविलें आहे. विषयवासनेला गाढवी व भगवत्कथेला कामधेनु ह्मणून त्या दोघींत असलेलें अल्प साधर्म्य व अत्यंत वैधर्म्य हें चांगलें दाखविलें आहे. तसेंच भगवत्प्राप्तीस विषयवासना विघ्नकारिणी असूनही ती दुर्निवार अ-सल्यामुळें संसारत्याग केलेल्या तपस्व्यांना सुद्धां कधीं कधीं तिचा मोह पडतो व शुक्राचार्यांसा-

खरासुर[1] जसा, तशी विषयवासना[2] हे[3] खरी[4];
हिचा वध करावया तुंजचि[5] शक्ति आहे खरी[6]; ।
बकी[7] सुमति[8], ताटका[9] लघु[10], न हे भली[11]; लाजशी[12]

---

रिखे इंद्रियनिग्रही पुरुष नितांत विरळा होत, ह्या गोष्टीही कवीनें सुंदर रीतीनें वर्णिल्या आहेत. **या केकेंत अभेदरूपक, काव्यार्थापत्ति** आणि **श्लेष असे तीन अलंकार कवीनें योजिले आहेत. ह्मणून ही केका फारच सरस झाली आहे.**

**१. अन्वयः**–जसा खरासुर तशी हे विषयवासना खरी [फार बळकट आहे]. **हिचा वध करावया [हे देवा!] तुजचि खरी शक्ति आहे; बकी सुमति, ताटका लघु, [पण] हे भली न, उगाचि लाजशी, जशी व्रजवनांत लीला तशि ही एक [लीला होय]. प्रस्तावनाः**–**मागील केकेंत विषयवासना ही सामान्य गाढवी असें वर्णिलें आहे. हींत ही दैत्यरूपी गाढवी आहे असें सांगतात. कथासंदर्भः**–कृष्णावतारीं धेनुकासुर नांवाचा राक्षस कंसाच्या पदरीं होता. रामकृष्णांचा नाश करण्याची कंसाजवळ प्रतिज्ञा करून गाढवाचें रूप धरून तो गोकुळांत आला. पुढें कृष्णाच्या हातून तो मरण पावला. ही कथा **भागवतांत** दशमस्कंधाच्या पंधराव्या अध्यायांत वर्णिली आहे. [कृष्णविजय–पूर्वार्ध–अ० १५. 'खर' नांवाचा एक रावणपक्षपाती राक्षस रामावतारीं रामाच्या हातून मरण पावला. पण ह्या केकेंतला 'खर' हा कृष्णावतारांतला समजावा. २. विषयवासना मनुष्याचा नाश करणारी आहे असें गीतेंत वर्णिलें आहे. [गीता–अ० २ श्लो० ६२-६३.] **३. ही प्रथमार्धाचा अर्थः**–**खरासुर जसा प्रतापी होता तशीच ही विषयवासना खरी ही पराक्रमी आहे. खरासुराचा शेवटीं जसा तुह्मांलाच वध करावा लागला, तसा ह्या विषयवासनेचा नाश केला पाहिजे. तो तुमच्याशिवाय इतरांकडून होणें शक्य नसल्यामुळें तुह्मांलाच करावा लागेल, तो तुह्मी करा. ४. गाढवी किंवा खरासुराची बहीण खरी. जशी बकाची बहिण बकी ह्मणून सांगितलें आहे.** ५. **तुला मात्र, भगवंतालाच**. ६. **खरोखर**. ७. **पूतना. कथासंदर्भः**–केका २ पृ० ७ टी० ४ पहा. ८. **चांगल्या बुद्धीची. बकी ही सुमति होय. कां कीं ती मातेच्या वेषानें तुह्मांला स्तनपान देण्यासाठीं आली.** ९. **कथासंदर्भः**–**ताटका** ही सुकेतु नामक यक्षाची कन्या पूर्वीं उत्तम रूपसंपन्न होती. अगस्त्य ऋषींच्या शापामुळें हिला मोठें विक्राळ रूप प्राप्त झालें. ही मोठी बलसंपन्न असून जंभपुत्र सुंद याची स्त्री होती. हिला त्यापासून मारीच आणि सुबाहु असे दोन पुत्र झाले. भगवान् विश्वामित्र ऋषि अयोध्येहून स्वयज्ञसंरक्षणार्थ रामलक्ष्मणांला बरोबर घेऊन आपल्या आश्रमाकडे जात असतां मार्गांत त्यांची व हिची गांठ पडली. तेव्हां विश्वामित्राच्या आज्ञेवरून रामानें हिचा वध केला. या सर्व प्रसंगाचें वर्णन कालिदासानें आपल्या रघुवंश काव्याच्या अकराव्या सर्गांत बहारीचें केलें आहे. रामशरानें ताटका मृत्युमुखीं पडली या प्रसंगाचेंच वर्णन पहाः–'जेव्हां दुःसह **रामकामविशिखें वेगें हृदीं ताडिली, । गंधाढ्यें तंव रक्तचंदनरसें होवोनि लिप्ता** भली; ॥ गेली सत्वर **जीवितेशसदनालागोनि रात्रिंचरी, ।** अत्यार्ती अभिसारिकेपरि बहु ती होउनि घाबरी ॥' १९ (**'लेलेकृत** रघुवंशाचें भाषांतर पृ० १४३). १०. **लहान, अल्पशक्ति.** ११. **बरी. ही विषयवासनारूपिणी**

[१]उगाचि, तशि एक ही [२]व्रजवनांत लीला जशी. ॥ ९९

[३]कसें [४]तरि असो [५]मग; [६]स्वपणरक्षणाकारणें

खरी भली नव्हे, ही सुमति नव्हे, व लघुही नव्हे, म्हणून ही वध्य आहेच आहे. १२. लाजतां. केकेचा स्पष्टार्थः–कवि भगवंताला म्हणतातः–ही विषयवासना राक्षसी खरासुरासारखीच प्रबल आहे व तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाच्या हातून मरण पावणार नाहीं, म्हणून तुम्हीच हिला मारा.यावर तुम्ही शंका घ्याल कीं विषयवासना ही राक्षसी खरी, पण ती स्त्रीजाति आहे म्हणून मी हिचा वध करणार नाहीं. तर देवा! ही आपली शंका व्यर्थ आहे, कारण आजपर्यंत दुष्ट राक्षसींचा आपण वध केला नाहीं असें नाहीं. रामावतारीं ताटकेचा व कृष्णावतारीं पूतनेचा आपण वध केला त्या स्त्रियाच होत्या. त्यांचा वध करावयास जर आपणास संकोच वाटला नाहीं, तर मग ह्या विषयवासनाराक्षसीचा वध करण्यास कां संकोचतां? पूतनाताटकादि राक्षसींच्या वधापेक्षां हिचा वध करणें अधिक प्रशस्त आणि आवश्यक आहे. कारण त्या जरी दुष्ट होत्या, तरी हिचा दुष्टपणा सर्वांत जास्त आहे. पूतनेनें गोकुळांतील कित्येक स्त्रियांचीं मुलें मारिलीं व ताटकेनें कित्येक ऋषींच्या यज्ञांचा विध्वंस केला हा काय तो त्यांचा उपद्रव, पण ह्या विषयवासनाराक्षसीचा तर सर्व लोकत्रयाला सर्वकाळ उपद्रव आहे. तेव्हां ह्या दुष्टतम राक्षसीचा वध करण्यास बिलकुल संकोच धरूं नका. हिचा वध करणें आपणास अत्यंत सहज आहे. कृष्णावतारीं गोकुलांत खेळतां खेळतां ज्याप्रमाणें तुम्ही अनेक दुष्ट राक्षसांचा संहार केला त्याप्रमाणें सहज रीतीनें ह्या विषयवासनाराक्षसीचा संहार करून तिच्या त्रासापासून मलाच नव्हे तर एकंदर लोकत्रयास सोडवा.

१. उगेच, कारणाशिवाय. २. गोकुळांतील वनांत, गोकुळांतील अरण्यांत जशा अनेक लीला केल्या तशी ही एक लीलाच होईल. त्या लीलेंत खर मारला, या लीलेंत खरी मारिली इतकेंच. गोकुळांत कित्येक दुष्ट राक्षसराक्षसींचा जसा आपण सहज लीलेनें नाश केला, त्याचप्रमाणें हिचा नाश करावयास तुम्हाला श्रम करणें नको. प्रसादगुणः–या केकेंत अनेक कथासंदर्भांचा निर्देश असून शब्द ऐकतांच अर्थबोध होतो ह्मणून हा प्रसादगुण समजावा. चतुर्थ चरणांत थोडक्यांत पुष्कळ अर्थ आणिला आहे म्हणून ह्यांत अर्थप्रौढीही पुष्कळ आहे. ३. केकान्वयः–मग कसें तरि असो, स्वपणरक्षणाकारणें तों शरणागतव्यसन स्वयें वारणें अवश्य; हें तुम्हां मुख्य विहित [होय, यास्तव] हो! [देवा!] न पुसतां निजोक्ति खरी करा. तो खर अधिक [दुष्ट] काय? हो! खरी संहरा. प्रस्तावनाः–आपल्या भक्तांचें संकट दूर करणें हें तुमचें आद्यकर्तव्य आहे अशा अभिप्रायानें कवि म्हणतात. ४, ५. 'मग कसें तरि असो.' मग त्याचें कांहींतरी कारण असो. आपल्या भक्तांचें संकट वारणें हें तुम्हाला अवश्य आहे. मग तसें करण्यास आमची भीड कारण होवो किंवा तुम्हा स्वतःलाच तशी अवश्यकता वाटो. त्या कारणांचा मी विचार

अवश्य[1] शरणागतव्यसन[2] तों[3] स्वयें[4] वारणें[5]
तुम्हां विहित[6] मुख्य हें[7]; न पुसतां[8] करा हो! खरी
निजोक्ति[9]; खर[10] काय तो अधिक? संहरा हो! खरी[11]. ॥५६

---

करीत नाहीं. या दोन चरणांत कार्य (हेतुमान्) आणि कारण (हेतु) यांचें कथन केलें आहे म्हणून हा हेतु नामक अलंकार समजावा. [मागें केका ३२ पृ०९० पहा.]
६. स्व (आपल्या)+पण (पणाचें, प्रतिज्ञेचें)+रक्षणा (संरक्षण करण्या) कारणें (करितां) ='भक्तांचीं संकटें मी दूर करीन' अशी जी तुमची प्रतिज्ञा ती खरी ठरावी म्हणून.

१. जरूर. २. शरण+आगत+व्यसन=शरण आलेल्यांचें व्यसन म्हणजे संकट. ३. तर. ४. स्वतः, जातीनें, अंगानें. ५. निवारण करणें, दूर करणें. प्रथमार्धाचा अर्थः- देवा! आमच्या भिडेमुळें म्हणा किंवा तुम्हालाच तसें वाटतें म्हणून म्हणा पण तुम्हाला भक्तांचीं संकटें तर दूर केलींच पाहिजेत. कारण भक्तांचीं संकटें दूर करून त्यांचा सर्वस्वीं योगक्षेम चालविण्याविषयीं तर तुम्हीं विडाच उचलिला आहे. तेव्हां कांहीं झालें तरी आपल्या प्रतिज्ञेचें रक्षण हें तुम्हाला केलेंच पाहिजे. [याविषयीं तुकारामाचा एक अभंग आहे तो पहावा:—पडतां जड भारी । दासीं आठवावा हरि ॥ मग तो होऊं नेदी सीण । आड घाली सुदर्शन ॥ हरिनामाच्या चिंतनें । वारा वाटा पळती विघ्नें ॥ [तुकाराम-अभंग १६४४.] रामदासाचाही ह्याच अर्थाचा एक श्लोक आहे:—सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा, उडी घालितो संकटीं स्वामि तैसा । हरीभक्तिचा धाव घाली निशाणीं, नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ ६. योग्य, उचित. ७. भक्तांचें संकट दूर करणें हें. ८. पुसणें विचार करणें. [केका ६७ चरण ४ पहा.] ९. निज+उक्ति=आपलें भाषण. 'न पुसतां (करूं न करूं असा विचार न करितां) निजोक्ति (आपलें भाषण, भक्तांचें संकट दूर करण्याविषयींचें आपलें प्रतिज्ञावचन) खरी (सत्य) करा हो'=मनांत कांहीं विचार न आणतां भक्तदुरितनिवारणाची आपली प्रतिज्ञा खरी करून दाखवा. १०. प्रसिद्ध. तो खर ह्या खरीपेक्षां काय अधिक आणि ही खरी काय कमी समजतां? तो खर जसा वध्य तशी ही खरीही वध्य आहे, यास्तव हिचा संहार करा. ११. खरी शब्दावर येथें कवीनें श्लेषयोजना केली आहे. गाढवी अथवा विषयवासनारूपिणी राक्षसी. द्वितीयार्धाचा अर्थः- आपल्या भक्तांना विषयवासनागाढवीच्या जाचापासून सोडविणें हें तुमचें आद्यकर्तव्य होय. तिकडे लक्ष्य देऊन भक्तपरित्राणाविषयींची तुमची प्रतिज्ञा तुम्ही खरी करून दाखवा. ती खरी करावयाची म्हणजे तुम्हांला ह्या विषयवासनाराक्षसीला मारून तिच्यापासून आमची सुटका केली पाहिजे. ती तुम्ही करा. कारण ह्या विषयवासनेपासून आम्हाला फार त्रास होतो. गोकुळांतील लोकांना खरासुरापासून कांहीं इतका त्रास झाला नाहीं.

खरी करितसे कशी तव जनींहि सत्ता पहा;
हिचा वध न निंद्य बा! प्रबळ मूर्त संताप हा. ।
'कथासुरभिचा रस स्वहित, पुष्कळ, स्वादुही,'

---

१. केकान्वयः-खरी तव जनींहि कशी सत्ता करितसे पहा, बा! [देवा!] हिचा वध निंद्य न,हा प्रबल मूर्त सत्ताप [होय]. 'कथासुरभिचा रस स्वहित पुष्कळ [आणि] स्वादुही [आहे] [पण] मला निजधना त्यजुनि, परस्वा कां दुही!' [असें ही द्वाड गाढवी साधुजनाला] म्हणे. प्रस्तावनाः-यांत विषयवासनारूपिणी खरीच्या दुष्टत्वाचें वर्णन करून तिच्या वधाविषयीं आणखी एक कारण दाखवून कवि भगवंताची प्रार्थना करतात. २. भगवज्जनाच्या ठायींही. ३. अधिकार. प्रथमचरणाचा अर्थः-ही विषयवासना गाढवी इतर पापी जनांवर आपला अधिकार चालविते यांत आश्चर्य नाहीं, परंतु तुमच्या जनांवर म्हणजे भगवद्भक्तांवर देखील ही आपला अधिकार चालविते. अजामिळपिंगळा यांच्या सारख्या पाप्यांनाच विषयवासनेची पीडा होते असें नाहीं, तर नारदपराशरविश्वामित्रासारख्या तपस्विवरभगवद्भक्तांचीही तिच्यामुळें त्रेधा उडते. ज्यांच्यावर भगवंताचा थोडा बहुत प्रसाद झाला आहे अशा भगवद्भक्तांची देखील जर विषयवासनेमुळें गाळण उडते, तर जे अज्ञान किंवा जाणून बुजून पापनिमग्न झाले आहेत त्यांचा कितपत निभाव लागेल हें स्पष्टच आहे! ४. अवलोकन करा, विचार करा. ५. गर्हणीय. हिला मारण्याबद्दल कोणी तुमची निंदा करणार नाहीं, तर स्तुतिच करितील. तुम्हांला प्रिय अशा तुमच्या भक्तांलाही ह्या विषयवासनेची जर गांजणूक आहे तर तिला मारून त्यांना दुःखमुक्त करणें हें तुमचें प्रशंसनीय कार्य आहे. ज्यांत तुमच्या भक्तांचें कल्याण तें प्रत्येक कृत्य तुम्हांला भूषणीयच होईल, दूषणीय कदापि होणार नाहीं. ६. मूर्तिमान्, प्रत्यक्ष. ७. साधुजनाचा ताप. सन्+ताप=साधु+उपद्रव=ही गाढवी नव्हे तर साधुजनांना एक मोठी पीडाच आहे. ८. 'मूर्त सत्ताप हा' हें अभेदरूपक होय. ९. 'रस' हा शब्द श्लिष्ट आहे. ह्याचे दुग्ध व भक्तिरस असे दोन अर्थ येथें संभवतात. कथेचा रस म्हटला म्हणजे कथेंत उत्पन्न होणारे नवविध रस. 'रसो गंधरसे जले। शृंगारादौ विषे वीर्ये तिक्तादौ द्रवरागयोः' 'शृंगारादौ विषे वीर्ये गुणे रागे द्रवे रसः' इत्यमरः. 'रस' शब्द शृंगारादि रसाला; विषाला; तेजाला; गोड, कडू या गुणांला; प्रीतीला व जलदुग्धादि द्रवांना लावतात. 'रसाविषयीं अल्प विवेचनः-साहित्यकौमुदींत रसाचें लक्षण असें सांगितलें आहेः-'कारण्यान्यथ कार्याणि सहकारीणि यानि च। रत्यादेः स्थायिनो लोके तानि चेन्नाट्यकाव्ययोः ॥ ४ ॥ विभावा अनुभावास्तत्कथ्यन्ते व्यभिचारिणः । व्यक्तः स तैर्विभावाद्यैः स्थायीभावः स्मृतो रसः' ॥ ५ ॥ ( ४ परिच्छेद ). सर्व काव्यांत मनोविकारांचेंच वर्णन केलें असतें ह्मणून मनोविकार उत्पन्न होण्याचें जें साहित्य तेंच रसाचें असतें. कारणें, कार्यें व साह्यकारी हीं तीन मिळून मनोविकार उत्पन्न होण्याची सामग्री होय. हीच रसाची सामग्री होते तेव्हां प्रधान मनोविकार,

कारणें, कार्यें व त्यांचे सहकारी मनोविकार ह्यांस काव्यशास्त्रांत अनुक्रमें स्थायीभाव, विभाव, अनुभाव, व व्यभिचारी अथवा संचारी भाव ह्मणतात. जे भाव ( मनोविकार ) पुष्कळ काळपर्यंत चित्तांत घोळत असतात, इतर भावांनीं नाश न पावतां त्यांस आपल्यांतच मिळवून घेतात व जे विभाव, अनुभाव व व्यभिचारी भाव यानें पुष्ट होऊन रसरूप होतात त्यांस **स्थायीभाव** ह्मणावें. **विभाव** ह्मणजे रत्यादि मनोविकारांचीं कारणें. ह्याचे आलंबन व उद्दीपन असे दोन प्रकार आहेत. ज्याच्या आश्रयानें मनोविकार उत्पन्न होतो तो आलंबनविभाव. जे उत्पन्न झालेल्या मनोविकारांस वाढवितात ते पदार्थ उद्दीपन विभावांत गणतात. मनोविकारांचीं कार्यें ज्या चिन्हांनीं किंवा क्रियांनीं स्पष्ट होतात ते **अनुभाव** होत. याचे कायिक, मानसिक, आहार्य व सात्विक असे चार भेद आहेत. मुख्य मनोविकारास वाढविणाऱ्या इतर मनोविकारांस **व्यभिचारी भाव** ह्मणतात. हे व्यभिचारी भाव तेहेतीस मानतात. वरील सर्व गोष्टी लक्ष्यांत घेऊन **रसाची व्याख्या** साहित्यशास्त्रज्ञांनीं अशी केली आहे:—‘विभाव, अनुभाव, व व्यभिचारी भाव ह्यांच्या साह्यानें वृद्धिंगत झालेला जो स्थायीभाव त्यास रस ह्मणावें.’ दृश्य काव्य ह्मणजे नाटकें ह्यांच्या अवलोकनानें व श्राव्य काव्य ह्मणजे भारतादिक ह्यांच्या वाचनानें किंवा श्रवणानें प्रेक्षकांस आणि वाचक श्रोत्यांस जो विलक्षण आनंद होतो त्यास रस ह्मणावें अशीही रसाची स्थूल व्याख्या काव्यशास्त्रज्ञ करितात. हे रस नऊ ( कोणी शांत रस वगळून रसांची संख्या आठ मानतात. ) आहेत:—‘शृंगारहास्यकरुणरौद्रवीरभयानकाः । बीभत्साद्भुतशांताख्याः काव्ये नवरसाः स्मृताः ॥ ( अलंकारशेखर २० वी मरीचि ). शृंगार, हास्य, करुण रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत, शांत हे नवरस. यांचे स्थायिभावः—‘रतिर्हासश्च शोकश्च क्रोधोत्साहौ भयं तथा । जुगुप्सा विस्मयो भावः निर्वेदः स्थायिनो नव’ ॥ वरील रसांचे रति, हास, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा, विस्मय व निर्वेद हे नऊ अनुक्रमें स्थायीभाव समजावे. कोणी कोणी वत्सल, भक्ति, व प्रेयान् हे नवीन रस सुचवितात. भक्तिरसास कोणी देवताविषयक रतिभावांत गणतात. **केकावलींतील मुख्य रस**:—शांत (किंवा भक्ति) रस हाच ‘केकावलींत’ मुख्य आहे. शांतरसांत देवताविषयक रति अत्युत्कट झाली म्हणजे अलीकडे त्याला भक्तिरस असें म्हणतात. केकावलींत भक्तिरसाची जणूं काय भागीरथीच वाहत आहे असें रसज्ञास वाटेल. शांतरसाचा स्थायीभाव विषयसुखाविषयीं किंवा प्रपंचाविषयीं तिरस्कारबुद्धि ( निर्वेद ) हा होय. पुण्य तीर्थक्षेत्रें, साधुसमागम, भगवत्कथाश्रवण, संतचरित्रश्रवण, कामादि षड्रिपूंचा त्रास, देहाची क्षणभंगुरता, वृद्धावस्था इत्यादिक निर्वेदाचीं कारणें किंवा विभाव समजावे. प्रेमाश्रु वाहणें, कंठ सद्गदित होणें व अष्टसात्विकभाव दाटून व भक्तानें गहिंवरून प्रभूस शरण जाणें ह्या क्रिया अनुभाव होत. स्मरण, धैर्य, चिंता, हर्ष, उताविळपणा, चांचल्य, इत्यादि सहकारी मनोविकार हेच व्यभिचारी भाव होतात व अशा रीतीनें निर्वेदाची पूर्णता होते. केकावलींत मुख्यत्वें जरी शांतरसाचा परिपाक फार चांगला उतरला आहे, तथापि त्यांत कांहीं स्थळीं रसाभास झाला असून कांहीं स्थळीं रससंकरही झालेला आढळतो. एकंदरीनें विचार केला असतां ‘केकावली’ हें काव्य पंतांच्या काव्यांपैकीं अत्युत्कृष्ट ठरतें. एवढेंच नव्हे तर एकंदर महाराष्ट्रकाव्यरत्नाकरांत देखील ‘केकावली’सारखीं काव्यरत्नें थोडींच आहेत. **सुरभिपक्षीं रस म्हणजे दूध, कथापक्षीं**

म्हणे, 'त्यजुनि कां मला निजधना, परस्वा दुहीं ?' ॥ ५७
कथासुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती;

---

भक्तिरस. १०. आपल्यास हितकर. ११. गोड, मधुर. द्वितीयार्धाचा अर्थः–भगवत्कथारूपिणी कामधेनूचें दूध आरोग्यकारक, पुष्कळ व गोड असें जरी आहे तरी विषयवासना गाढवी, 'मी तुमच्या सत्तेची आहें म्हणून कामधेनूला टाकून मलाच दुहा,' असें म्हणते.

१. 'म्हणे' या क्रियापदाचा कर्ता 'खरी' समजावा. २. 'कीं' असें पाठांतर आहे. ३. आपल्या सत्तेच्या द्रव्याला–वस्तूला. ४. येथें 'पर' शब्द श्लिष्ट आहे. पर (दुसऱ्याचें)+स्व(द्रव्य)=दुसऱ्याचें द्रव्य, दुसऱ्याच्या द्रव्याला–वस्तूला. 'कामधेनू ह्या परपुरुषाच्या (ईश्वराच्या, पक्षीं इतर पुरुषाच्या) आहेत; त्या किती जरी चांगल्या असल्या तरी त्यांच्या दुग्धाचा स्वीकार न करितां मी जी तुमच्या सत्तेची आहें, त्या माझ्या दुधाचाच तुम्ही आस्वाद घ्या' असें विषयवासना खरी आग्रहानें सांगते. केकामाधुर्यः– येथें कवीनें विषयवासनाखरीच्या मुखांत कथासुरभींचा रस सेवन न करितां माझाच सेवन करा असें मागतांना मोठें समर्पक कारण योजिलें आहे. लौकिक व्यवहार असा आहे कीं एखादी वस्तु किती जरी बहुमोल व बहुगुणी असली, तरी ती जर परक्याची असेल, तर लोक तिची परवा न करितां आपल्या सत्तेच्या अल्पमोली व अल्पगुणी वस्तूचाच आदर करितात. गरीब प्रामाणिक शेतकरी आपल्या सत्तेच्या कांबळीला श्रीमंताच्या शालजोडीपेक्षां, आपल्या अंगावरील फाटक्या रकट्याला राजवस्त्रापेक्षां, आपल्या जेवणाच्या थाळीला व पाणी पिण्याच्या गाडग्याला श्रीमंताच्या रत्नखचित सुवर्णपात्रांपेक्षां व निजायाच्या तरटाला पराच्या गाद्या आंथरलेल्या छप्परपलंगापेक्षांही जास्त समजतो. तसेंच सद्गुणी लोक अंगच्या सुवर्णानें अंगावर घातलेल्या सुवर्णरत्नालंकारांनाही लाजविणाऱ्या अशा दुसऱ्याच्या मदनमंजरी सुंदरीकडे न पाहतां आपल्या स्वतःच्या साध्याभोळ्या स्त्रीच्या ठिकाणींच रत असतात. म्हणूनच **खरी म्हणते कीं–माझ्यांत जरी कामधेनूसारखे गुण नसले तरी मी तुमच्या सत्तेची आहें हें ध्यानांत आणून तुम्ही तिचा त्याग करून माझाच स्वीकार करा. कवि म्हणतातः–देवा! अशा वरकांतीं सयुक्तिक दिसणाऱ्या विचारसरणीनें ही विषयवासना खरी आम्हांस मोह पाडून आमचें मन भगवत्कथारूपिणी कामधेनूपासून परावृत्त करिते, अशी हिची आम्हांला गांजणूक आहे म्हणून नाश करून हिच्या तडाक्यांतून आम्हांला सोडवा. ५. दुहतां–दोहन करतां. ६. या कथासुरभि स्वजननीहुनी भल्या वाटती, [या] शिशूंसि जरठांसही निरखितां रसें दाटती, भलते [त्यांस] सदा दुहोत, तरि लेशही न आटती, स्ववत्समल भक्षिती परि सर्वथा न बाटती–असा अन्वय. प्रास्ताविकः– भगवत्कथा ह्या कामधेनूपेक्षांही श्रेष्ठ असें दर्शवीत होत्साते कवि त्यांचा स्तव करितात. ७. कामधेनु.** भगवत्कथेला दिलेली कामधेनूची उपमा फार सरस आहे व पंतांनीं सत्पुरुषकथेला अन्यत्र हीच उपमा दिलेली आढळतेः–सत्पुरुषकथा अद्भुत रसदा, म्हणतों हिलाच सुरभी मी.॥

शिशूंसि जरठांसही निरेखितां रसें दाटती; ।
देहोत भलते सदा, तरि न लेशही आटती;

[द्रोणपर्व-अ० १२ गी० १६०.] ८. चांगल्या. प्रथमचरणार्थः—या भगवत्कथारूपी कामधेनू आमच्या मातेपेक्षां आम्हांला जास्त स्नेहार्द्र अशा वाटतात. ९. आमच्या जन्म देणाऱ्या मातांपेक्षां. व्यु०:—जीपासून प्राणि उत्पन्न होतात ती—माता.

१. वृद्धांस, वयातीतांस. द्वितीयचरणार्थः—मातांपेक्षां जास्त चांगल्या वाटण्याचें कारण ह्या लहान मुलांस व वृद्धांस अशा दोघांनाही पाहून पान्हावतात. आमच्या आया लहान मुलांस स्तनास लावून मात्र दुग्धें करून दाटतात (पान्हावतात). पण या भगवत्कथा कामधेनु तर लहान मुलें, तरुण मुलगे व म्हातारेकोतारे अशा सर्वांना केवळ पाहूनच पान्हावतात. तेव्हां ह्या आमच्या मातांपेक्षां अधिक स्नेहाळ म्हटल्या पाहिजेत. भावार्थः—भगवत्कथांस बाल, तरुण, वृद्ध अशी सर्वश्रिकांची मातां सारखींच प्रिय वाटतात व त्यांच्या योगानें सर्व प्रकारच्या माणसांचा उद्धार होतो. २. पाहून. ३. दुग्धानें; पक्षीं, भक्तिरसानें. ४. परिपूर्ण भरितात. ५. दोहन करणें हें आटण्यास कारण होय, परंतु कितीही दोहिल्या तरी त्या सामान्यधेनूप्रमाणें आटत नाहींत. त्यांची पूर्व अवस्था कायमच आहे—असें वर्णन आहे म्हणून हा पूर्वरूप नामक अलंकार होय. [मंदारमरंदचंपू—पृ० १४४.] ६. ओळखीचे अनोळखीचे असे कोणीही तृतीयचरणार्थः—परिचित अपरिचित कोणीही या भगवत्कथाकामधेनूचें दूध काढो. त्या पान्हा चोरित नाहींत. धेनु भलत्यास दोहूं देत नाहींत. पण ह्या कथासुरभि ओळखी अनोळखी अशा दोघांसही दूध काढूं देतात. साधारण धेनु फक्त दिवसांतून दोन तिनदांच दूध देतात, पण ह्या कथासुरभींचें दुग्ध सदा (दिवसभर सारखें) काढीत बसलें तरी तें आटत नाहीं. भगवत्कथा स्त्रिया, शूद्र, विद्वान, मूढ, ब्राह्मण, चांडाल अशा सर्वांचा सारखाच उद्धार करितेः—भगवंताची कथा कोणत्याही जातीच्या मनुष्यानें—मग तो मनुष्य वर्णगुरु ब्राह्मण असो किंवा वर्णाधम शूद्रातिशूद्र असो—ऐकिल्या तर तो पापविमुक्त होतो; तसेंच त्या दिवसरात्र सारख्या ऐकत बसलो तरी आपणाला त्यांचा कंटाळा यावयाचा नाहीं; कारण एक तर भगवद्गुणकथा असंख्य आहेत, व दुसरें त्याच त्याच कथा फिरून फिरून ऐकल्या असतां रसिक श्रोत्यांला त्यांचा त्रास न येतां उलट त्यांपासून नवी नवी गोडी प्राप्त होते. केका १०० व १०१ यांत हेंच सांगितलें आहे. भगवत्कथेत विशेष तो हाच आहे कीं आब्राह्मणचांडालांनीं तिचें पारायण केलें तरी ती त्या सर्वांना सारख्याच रीतीनें पापनिर्मुक्त करिते. वेद, शास्त्रें, व उपनिषदें इत्यादि ग्रंथ स्त्रीशूद्रांनीं वाचूं नयेत, वाचल्यास त्यांना मोठें पाप लागतें असा पुष्कळ ग्रंथांत निषेध केला आहे. कांहीं वैदिक सूक्तें स्त्रियांनीं रचिलीं असून गार्गीवाचक्नवी, सुलभामैत्रेयी, वडवाप्रातिथेयी अशा कांहीं स्त्रिया उत्तम ब्रह्मनिष्ठ म्हणून नांवाजल्या गेल्या तेव्हां वरील निषेध अमळ चमत्कारिक दिसतो. आर्यसमाजाचे वंद्य संस्थापक स्वामी दयानंद सरस्वती ह्यांनीं मात्र स्त्रीशूद्रांना वेदपठण करण्यास हरकत नाहीं असें आपलें मत दिलें. स्त्रीशूद्रांनीं वेदपठण करूं नये ह्या मताचा ज्ञानदेव, एकनाथ,

तुकाराम, रामदास, वामन वगैरे अर्वाचीन संतांनीं स्पष्ट किंवा गुप्त उपहास केल्याचें आढळतें. व्यासांनीं अठरा पुराणें, व भारतरामायण हीं ऐतिह्यें वरील अडचण ध्यानांत आणूनच रचिलीं असावीत असें दिसतें. ज्ञानेश्वरीच्या अखेर अखेर ज्ञानेश्वरराय लिहितात:—'एवं सकळ सांख्यसिंधु । श्रीभगवद्गीता प्रबंधु । हा औदार्यें आगळा वेदु । मूर्त जाण ॥ १४५६. वेद संपन्न होय ठाईं । परि कृपण ऐसा आन नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥ ५७॥ येरां भवव्यथा ठेलियां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां । अनवसर मांडूनियां । राहिला आहे ॥ ५८ ॥ तरी मज पाहतां ते मागील उणें । फेडावया गीतापणें । वेद वेठला भलतेणें । सेव्य होआवया ॥५९॥ उत्तम अधम ऐसें । सेवितां कवणातेंही न पुसे । कैवल्यदानें सरिसें । निववीत जगा ॥ ६४ ॥ यालागीं मागिली कुटी । भ्याला वेद गीतेच्या पोटीं । रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ॥ ६५ ॥ म्हणोनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता । श्रीकृष्णें पंडुसुता । उपदेशिली ॥ ६६ ॥ (अध्याय १८ श्लोक ६६ वरील टीका) वेद सर्वांनीं वाचूं नये असा निषेध असल्यामुळें तो सर्वांस उपयोगीं पडत नाहीं. ह्या स्वत:च्या कमीपणाला लाजून व कारुण्यानंदेला भिऊन तो पुढें गीतारूपानें प्रकट झाला—हें वरील ओव्यांचें तात्पर्य. सारांश, वेदरूपी कामधेनु ही सर्वांना दुग्ध देत नाहीं, फक्त द्विजवत्साकरितांच ती दुग्ध देते. पण गीताभागवतरामायणादिग्रंथ ही कामधेनु सर्वांना सारखीच उपयोगीं पडते. ब्राह्मणानें हरिकथा श्रवण केली तर त्याला जास्त पुण्य लागतें व शूद्रानें श्रवण केली तर त्याला कमी लागतें, किंवा उलट पाप लागतें अशांतला प्रकार मुळींच नाहीं. कोणत्याही जातीचे मनुष्यानें भगवत्कथेचें मनन कितीही वेळ केलें तरी ती इष्टफलप्रदाना ( पापविमोचना ) विषयीं कधींही असमर्थ होत नाहीं. एवढेंच नव्हे तर आम्रफलाप्रमाणें भगवत्कथा जितकी जितकी जास्त चाखावी तितका तितका रस जास्त सुटतो व ती प्रतिक्षणीं शुकादि तपस्विवरांला सुद्धां नवीच रुचि देते. (केका १०० पहा). **भलते=कोणत्याही जातीचे,** असाहि अर्थ संभवतो. **भगवद्भक्त आणि वर्णविचार:**—भगवद्भक्ताची जात कोणतीही असो, तो ईश्वराला सारखाच प्रिय होतो व लोकांनींही त्याच्या हलक्या जातीकडे न पाहतां त्याच्या अधिकाराकडे पाहून त्याची सेवा करावी अशाविषयीं वेद, उपनिषदें, पुराणें वगैरे संस्कृत ग्रंथांतून व ज्ञानेश्वरी, दासबोध वगैरे अर्वाचीन साधूंच्या ग्रंथांतून पुष्कळ वचनें आढळतात. ज्ञानदेव, रामदास, तुकाराम, नामदेव, रोहिदास, चोखामेळा वगैरे संतमंडळी जातिभेद मानीत नव्हती हें सुप्रसिद्ध आहे. एकनाथ महाराजांच्या येथें जेवला ही गोष्ट पुष्कळांना ठाऊक असेल. यासंबंधी पुढील वचनें पहा:—
(१) "ब्राह्मण म्हणजे केवळ ब्राह्मणाचा मुलगा अथवा ऋषि म्हणजे ऋषीचा मुलगा नव्हे, ब्राह्मणाच्या कुळांत जन्म घेतल्यानेंच ब्राह्मण किंवा ऋषीच्या कुळांत जन्म घेतल्यानेंच ऋषि होत नाहीं. ऋषींमध्यें प्रमुख ऋषि जे वशिष्ठ ते मूळचे ऋषि नव्हते, त्यांना मागाहून वरुणानें ऋषि केलें असें ऋग्वेदमंडल ७ सूक्त ८८ मंत्र ४ ('वसिष्ठं ह वरुणो नाव्याधादृषिं चकार'—वरुणानें वशिष्ठाला म्हणजे मंत्रकर्त्याला आपल्या नावेंत बसविलें आणि ऋषि केलें) यांत स्वत: वशिष्ठानें सांगितलें आहे. यापेक्षांही दुसरें चांगलें प्रमाण ऋग्वेदमंडल १० सूक्त १२५ मंत्र ५ यांत आहे. या मंत्रांत आकाशवाणी ('वागाम्भृणी') म्हणजे प्रत्यक्ष ईश्वराची वाच

बोलत आहे. ती म्हणते 'अहम् एव स्वयम् इदं वदामि जुष्टं देवेभिः उत मानुषेभिः । यं कामये तं तं उग्रं कृणोमि तं ब्रह्माणं तं ऋषिं तं सुमेधाम्'. अर्थः– 'हें माझें स्वतःचें वचन आहे, [आणि] तें देवांस आणि मनुष्यांस संमत आहे, [कीं] जो मला आवडतो त्याला [मी] बलवान् करितों, जो मला आवडतो त्याला [मी] ब्राह्मण करितों, [जो मला आवडतो] त्याला [मी] ऋषि [करितों] [आणि जो मला आवडतो] त्याला [मी] बुद्धिमान् [करितों].' (वेदार्थयत्न अंक ६ पृ० ३४२ टीप] (२) 'वज्रसूचिकोपनिषदां'त 'ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार वर्णांत ब्राह्मण प्रधान मानिला आहे, पण ब्राह्मण कोणाला म्हणावें? जीव, देह, जाति, ज्ञान, कर्म, व धार्मिक यांपैकीं कोणाला ब्राह्मण म्हणावें?' या प्रश्नांचा पृथक् पृथक् विचार करून वरीलपैकीं एकाही वस्तूंत ब्राह्मण्य नाहीं असें ठरविलें, व शेवटीं 'जो अद्वितीय, जातिगुणक्रियाहीन, षड्ऊर्मिरहित, सत्यज्ञानानन्दानन्तस्वरूप, अशेषभूतांतर्यामि, निर्विकल्प, अशेषकल्पाधार, अप्रमेय, अनुभवैकवेद्य, अपरोक्षतया भासमान अशा आत्म्याला जाणतो तोच ब्राह्मण समजावा' असा सिद्धांत केला. (३) महाभारतांतर्गत वनपर्वांत नहुषयुधिष्ठिरसंवादांत सर्पदेहधारी नहुषानें ब्राह्मण कोणास म्हणावें? असा धर्मराजास प्रश्न केला. तेव्हां 'सत्य, दान, क्षमा, अहिंसा, तप, उत्तम शील व दया हे गुण ज्यांत असतील त्यास ब्राह्मण म्हणावें' ('तोचि ब्राह्मण जेथें क्षांति, दया, दान, सत्य, तप, शील.–मोरोपंत) असें धर्मानें उत्तर दिलें. त्यावर 'शूद्रकुळांत उत्पन्न झालेल्या मनुष्याच्या अंगांत जर सत्य, दान, क्षमादि वर सांगितलेले गुण असतील तर तो ब्राह्मण होईल किंवा नाहीं?' असा नहुषानें फिरून धर्मास प्रश्न केला. तेव्हां 'जीं शूद्राच्या ठायीं लक्षणें असावीं तीं नसून सत्यादिक लक्षणें जर त्याचे ठिकाणीं असतील तर तो ब्राह्मण समजावा, व उलट ब्राह्मणकुलोत्पन्न असून कामक्रोधादिक शूद्रांचीं चिन्हें त्याच्या अंगांत असतील तर तो शूद्र समजावा. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे जातीनें होत नसून कर्मानेंच होतात. ब्राह्मणादि जाति ईश्वरनिर्मित नसून मनुष्य, पशु, पक्षी वगैरे जाति मात्र ईश्वरानें उत्पन्न केल्या असें समजावें' असा युधिष्ठिरानें आपला अभिप्राय सांगितला (वनपर्व अ० १८० पहा) (४) 'न शूद्रा भगवद्भक्ता विप्रा भागवताः स्मृताः । सर्ववर्णेषु ते शूद्रा अभक्ता वै जनार्दने ॥' (पुराण), (५) कृष्ण अर्जुनास म्हणतातः–'अगा कुळाचिया चोखटपणा नलगा । आभिजात्य झणीं श्लाघा । व्युत्पत्तीचा वाउगा । सोस कां वहावा ॥ ४३१ ॥ कणेंवीण सोपटें । कणसें लागलीं घनदाटें, । काय करावें गोमटें । वोस नगर ॥ ३३ ॥ तैसें सकळ तें वैभव । अथवा कुळजाति गौरव । जैसें शरीर आहे सावेव । परि जीवचि नाहीं ॥ ३५ ॥ तैसें माझिये भक्तीविण । जळो तें जियालेंपण । अगा! पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ॥ ३६ ॥ तैसें भक्तिहीनाचें जिणें । जो स्वप्नींहि परि सुकृत नेणे । तेणें संसारदुःखासीं भाणे । वोगरिले ॥ ४० ॥ म्हणोनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें । वरि देहाचेनि नांवें । पशूचेंहि लाभो ॥ ४१ ॥ म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा! अकारण । एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ॥ ४५६ ॥ (ज्ञानेश्वरी अ० ९ श्लो० ३१,३२ वरील टीका) (६) ज्यासि आवडि हरिनामाची । तोचि एक बहू शुचि ॥ १ ॥ जपतो हरिनाम बीज । तोचि वर्णांमाचि द्विज ॥ २ ॥ तुका म्हणे वर्णधर्म । अवघे आहे समब्रह्म ॥ ३ ॥ (७) नामधारकासि नाहीं वर्णावर्ण । लोखंड प्रमाण नाना जात ॥१॥

शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार । परिसीं संस्कार सकळही हेम ॥ २ ॥ महापुरीं जैसें जातसे उदक । मध्यें ते तारक नाव जैसी ॥ ३ ॥ तये नावेसंगें ब्राह्मण तरती । केंवि ते बुडती अनामिक ॥ ४ ॥ नाना काष्ठजात पडतां हुताशनीं । ते जात होऊनि एकरूप ॥ ७ ॥ तेथें निवडेना धुरे कीं चंदन । तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं ॥ ५ ॥ नामामृतें झालें मुळींचें स्मरण । सहज साधन तुका म्हणे ॥ ६ ॥ (८) ब्राह्मण तो याती अंत्यज असतां । मानावा तत्वता निश्चयेसीं ॥ १ रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥ २ ॥ शांति क्षमा दया अलंकार अंगीं। अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ ३ ॥ तुका म्हणे गेल्या षडऊर्मी अंगें । सांडुनियां मग ब्रह्मचि तो ॥४॥ (९) ब्राह्मण तरि एक नरहरि सोनार । ज्यासाठीं शंकर माथां राहे ॥ १ ॥ ब्राह्मण तरि एक सजना कसाई । चक्रधारी गृहीं मांस विकी ॥ २ ॥ तुका म्हणे ब्रह्म जाणे तो ब्राह्मण। येरातें नमन करा परतें ॥ ३ ॥ (१०) ब्राह्मण ते कोण म्हणावें कोणासी । सांगावें आम्हांसी कृपानिधी ॥ १ ॥ वेदाचें वचन आठउनी मनीं ! बोलावी ते वाणी सत्यंजय ॥ २ ॥ असत्य बोलतां पूर्वजां दूषण । पहा विचारून श्रुतीमध्यें ॥ ३ ॥ अंघोळी ती धोत्रें लेतां आभरण। काय इतर जन न करिती ॥४॥ टिळे माळा मुद्रा नित्य करी स्नान । नव्हती ब्राह्मण निश्चयेसीं ॥ ५ ॥ बाबाजीसद्गुरुदास तुका म्हणे । पुढील कारण सांगों आतां ॥ ६ ॥ (११) सोनियाचें श्वान भाळींचा मुगुट । एकचि कनक मोलें घेता ॥ १ ॥ दुध तापविलें सोनियाचे भांडीं । मातिचिये हांडीं स्वाद एक ॥ २ ॥ ऊंसाचा परिपाक शूद्रें गुळ केला । ब्राह्मणीं रांधिला स्वाद एक ॥ ३ ॥ गाईचि जाती असती नानावर्ण । दुधा शुभ्रपण सारिखेंचि ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसा भावार्थ कारण । जाती थोर, हीन नाहीं देवा ॥ ५ ॥ (१२) उत्तम त्या याती । देवा शरण अनन्यगती ॥ १ ॥ नाहीं दुजा ठाव । कांहीं उत्तम मध्यम भाव ॥ २ ॥ उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ति अंगीं दिसे॥ ३ ॥ भाविक विश्वासी । तुका म्हणे नमन त्यांसी ॥ ४ ॥ (१३) अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड। काय त्यासी रांड प्रसवली ॥ १ ॥ वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळयाती ॥ २ ॥ ऐसा हा निवाडा झालासे पुराणीं। नव्हे माझी वाणी पदरची ॥ ३ ॥ तुका म्हणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी ॥ ४ ॥ (१४) पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास घेती जन्म ॥ १ ॥ कर्म, धर्म त्याचें झाला नारायण, त्याचेनि पावन तिन्ही लोक ॥ ५ ॥ वर्णअभिमानें कोण झाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥ ३ ॥ अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयांचीं पुराणें भाट झाली ॥ ४ ॥ यातायाती धर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥ ५ ॥ तुका म्हणे तुम्हीं विचारावे ग्रंथ। तारिले पतित नेणों किती ॥ ६ ॥ (१५) 'हृदया स्मर त्यांसि, असो श्रीभगवद्भक्त जाति भलती बा' (सन्मणिमाला–गी० १७ पृ० १३), (१६) 'परिस अयाचा उद्धवी सद्भाव, तसाचि भक्त यातीस' (तुकारामस्तुति–गी० ३१ पृ० २७). त्याचप्रमाणें श्रीमद्भागवत एकादशस्कंध, शेखमहंमदकृत 'योगसंग्राम' एकनाथीभागवत वगैरे ग्रंथांत हेंच तत्व प्रतिपादिलें आहे. तसेंच इतर अर्वाचीन संतांचींही याविषयीं पुष्कळ वचनें आहेत तीं त्यांच्या ग्रंथांत शोधक वाचकांस सांपडतील. ७. **तिळमात्र देखील.**

[१]स्ववत्समल भक्षिती परि न सर्वथा [२]बाटती. ॥ ९८

१. (धेनूपक्षीं) आपल्या वासराच्या शरीरावरील अथवा मूत्रादि अंतर्मळ. गाई आपल्या वासराचें अंग चाटून साफ करितात, तसेंच त्या वासराचा मूत्रादिमल देखील खातात, त्यास अनुलक्षून हें वर्णन आहे. (कथापक्षीं) आपल्या भक्तांचें पाप. येथें वत्स व मल हे दोन शब्द श्लिष्ट आहेत. २. अपवित्र होतात. जरि कथासुरभि (भगवत्कथा-कामधेनु) स्ववत्समल (आपल्या भक्तांचीं पापें) भक्षिति (नाहींशीं करितात) तरि सर्वथा (कधींही) न बाटती (दूषित होत नाहींत). भगवंताची कथा श्रवण केल्यानें श्रोत्यांचीं पापें लयास जातात. परंतु त्यामुळें ती कथा मात्र दूषित होत नाहीं. उलट-पक्षीं, धेनु आपल्या वांसरांचा मळ भक्षितात म्हणून त्यांचीं तोंडें तेवढीं अपवित्र मानतात. येथें दुसऱ्या चरणांत तुल्ययोगिता अलंकार झाला आहे. कारण शिशु आणि जरठ यांच्या ठिकाणीं कथासुरभिची वृत्ति तुल्य (समान) आहे असें वर्णिलें आहे. 'नियतानां सकृद्धर्मः सा पुनस्तुल्ययोगिता' (साहित्यकौमुदी पृ० १५२,१०), यावर व्याख्यान:- 'औपम्यस्य गम्यत्वे पदार्थगतत्वेन प्रस्तुतानामप्रस्तुतानां वा समानधर्माभिसंबंधे तुल्ययोगिता' (अलंकार-सर्वस्व पृ० ७०) 'प्रस्तुत वस्तूंचें जरि धर्मीं एकत्व कथन कवि करिती। अथवा अप्रकृतांचें, बुध म्हणती तुल्ययोगिता तरि ती' ॥ १ ॥ हा चंद्र चकोरकुळें न ल्हासवि तेंवि तीं कुमुदमुकुलें । परि संकोचवि कमलें तैशा व्यभिचारिणामुखें विमलें ॥ २ ॥ त्वत्तनुची मृदुता जरि अनुभविली तरि गमे न कोणास । त्या मालतीशशिकलाकदलीचाही कठोरता खास' ॥३॥ (अ. वि.) वर्णनीय (प्रस्तुत) अथवा अप्रस्तुत अशा पदार्थांचा जेव्हां गुणरूप अथवा क्रियारूप अशा एकाच धर्मावर अन्वय होतो तेथें तुल्ययोगिता अलंकार होतो. 'अहितहितीं समवर्तन तरि दुसरी तुल्ययोगिता म्हणती । भूपा देसि सदा तूं शत्रुस मित्रासही पराभूती ॥' (पराभूती=१ उत्कृष्ट संपत्ति, २ पराभव). वरील तुल्ययोगिता श्लेषमूलक आहे. याचें उदाहरण:-'जो वृक्षासि प्रतिपाळी । का जो घाव घालीत मुळीं । दोहींसी तो सममेळीं पुष्पीं फळीं संतुष्ट' (एक. भाग ७,४०२) केका १८ पृ० ५२ यांतील ज्ञानेश्वरांच्या ओव्याही ह्याच अलंकारांचीं उदाहरणें होत. 'उत्तम गुणवंतासह वर्णिति समता करूनि तिसरीच । यम, वरुण, धनद, शक्रहि, तूंहि नृपा लोकपाल सम पांच ॥' येथें प्रस्तुत जो राजा त्याचें इंद्रादिकाशीं लोकपालत्वगुणास्तव साम्य दाखविलें म्हणून हा तुल्ययोगितेचा तिसरा प्रकार. याचें उदाहरण:—'समागम मृगाक्षींचे चपलांचे विलासही । क्षणद्वय न राहाती धनारब्ध जरी स्वयें ॥' यांत निंदा गर्भित आहे. तुल्ययोगितेच्या या प्रकारास अन्यत्र 'सिद्धि' असेंही म्हटलें आहे. तुल्ययोगितेचीं आणखीं उदाहरणें:—१ 'चंद्रासि लागति कळा उपराग येतो । गंगेसि भंग बहु पाणउतार होतो । जें होय चूर्ण तरि मौक्तिक तें कशाला । नाहीं समान नलराजमहायशाला ॥' ॥ (रघुनाथपंडित) २ 'बहु लाजवीत होतां करिकेसरिकीरकेकिहरिणा सीं । हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं' (मोरोपंत-भारतीरामायण). बाटण्यास हेतु असून बाटणें हें कार्य झालें नाहीं म्हणून चतुर्थ चरणांत विशेषोक्ति अलंकार जाणावा. [केका ४ पृ० ११-१२ पहा.]

कथांसि[1] उपमा दिली सुरभिची, दिसे नीट[2] ती;
परंतु बहु मंद[3] मी, म्हणुनि सच्छ्रुती[4] वीटती; ।
कथा निरुपमा[5] तयांप्रति पशूपमा[6] शुद्ध तें[7]
नव्हेचि; न विचारिलें बुधजनासि[8] म्यां उद्धतें. ॥ ५९

१. केकान्वयः–कथांसि सुरभिची उपमा दिली ती [मला] नीट दिसे, परंतु मी बहु मंद म्हणुनि सच्छ्रुती वीटती, कथा निरुपमा, तयांप्रति पशूपमा तें शुद्ध नव्हेचि, म्यां उद्धतें बुधजनासि न विचारिलें. प्रास्ताविकः–कथेला कामधेनूचीही उपमा साजत नाहीं, ती निरुपम आहे. म्हणून तिला कामधेनूची उपमा देण्यांत आपल्याकडून प्रमाद झाला असें कवि दर्शवितात. २. ठीक, योग्य. मीं कथेला जी कामधेनूची उपमा दिली ती माझ्या मतें ठीक दिसते. ३. मूर्ख. 'मंदोऽतीक्ष्णे च मूर्खे च स्वैरे चाभाग्यरोगिणोः । अल्पे च त्रिषु पुंसि स्यात् हस्तिजात्यंतरे शनौ ॥' (मेदिनी). प्रथमार्धाचा अर्थः–मी आपणाकडून योग्य अशीच उपमा कथेला दिली, परंतु मी जडबुद्धीचा असल्याकारणानें माझी उपमा अयोग्य ठरून ती ऐकून, साधूंचे कान विटतील म्हणजे कंटाळतील. त्यांना ही उपमा गौण वाटेल. ४. सत्+(साधूंचे)+श्रुति (कान)=साधूंचे कान. व्यु०:–ज्यांनीं ऐकूं येतें त्या श्रुती (कान). कानाला श्रुति म्हणण्याचें कारण केका २७ पृ० ७६ टी० ५ यांत दिलें आहे. ५. निर् (नाहीं) उपमा (साम्य) ज्यांला अशा. कथेला कोणाचीही उपमा शोभण्यासारखी नाहीं. स्वतः ईश्वर निरुपम तेव्हां त्याची गुणकथाही निरुपमच. हरिकथेचें माहात्म्य तुकोबांनीं आपल्या अनेक अभंगांत उत्कृष्ट रीतीनें वर्णिलें आहे. पुढील दोनच चुटके पहाः–(१) कथा हें भूषण जनांमध्यें सार । तरले अपार बहुत येणें ॥ १ ॥ नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥ २ ॥ देव त्याची माथां वंदी पायधूळी । दीप झाला कुळीं वंशाचिये ॥ ३ ॥ त्याची निंदा करी त्याची कुष्टवाणी । मुख संवदणी रजकाची ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम ध्यावें ॥ ५ ॥ (२) कथा दुःख हरी कथा मुक्त करी । कथा याचि बरी विठोबाची ॥ १ ॥ कथा पाप नाशी उद्धरिले दोषी । समाधि कथेसी मूढजना ॥ २ ॥ कथा तप, ध्यान, कथा अनुष्ठान । अमृत हें पान हरिकथा ॥३॥ कथा मंत्र, जप, कथा हरी ताप। कथाकाळीं कांप कळिकाळासी ॥ ४ ॥ तुका म्हणे कथा देवाचेंही ध्यान । समाधि लागोन उभा तेथें ॥ ५ ॥ ६. पशु+उपमा=धेनु+साम्य=कामधेनूची उपमा. कामधेनू देवांचे मनोरथ पूर्ण करणारी असली तरी ती पशूच; तेव्हां भगवत्कथेला पशूपमा दिली हे मीं योग्य केलें नाहीं. ७. कथांला पशूपमा दिली हें कृत्य. ८. पंडित लोकांस. कथेला पशूची उपमा दिली ही माझ्याकडून चूक झाली. धेनूची उपमा मीं कथेस देऊं नये व असें करतांना मीं पंडितांचा सल्ला घ्यावयाचा होता. पंत व त्यांचे कवितादूषकः–मोरोपंतांच्या वेळेस त्यांच्या कवितेस क्षुल्लक गोष्टीवरून नांवें ठेवणाऱ्या पंडितांस अनुलक्षून व्याजोक्तीनें त्यांनीं हें लिहिलें असावें. कारण लगेच पुढें खुबीनें त्यांनीं आपल्या उपमेचें नम्रतापूर्वक मंडण केलें आहे.

पंतांच्या वेळेस त्यांच्या 'सत्कृती'ला नांवें ठेवणारी पंडित मंडळी पुष्कळ होती. त्यांस पंतांनीं आपल्या काव्यांतून मधून मधून फटकारे दिलेले आढळतात. याविषयीं विशेष मजकुर प्रस्तावनेंत पहावा. कै० माधव चंद्रोबा ह्यांनीं 'सर्वसंग्रह' मासिकपुस्तकद्वारा पंतांच्या काव्यांचा उद्धार करण्याचें आरंभिल्यापासून पंतांच्या काव्यांवर बऱ्याच विद्वानांनीं निरनिराळ्या गोष्टींसंबंधानें आक्षेप घेतले आहेत. कांहींच्या मतें अनुप्रास, यमकें इत्यादि अलंकारांचा थाटमाट तेवढा त्यांच्या काव्यांत दृष्टीस पडतो, खरें कवित्व त्यांत मुळींच नसतें; कांहींजण मोरोपंतांनीं नेमकीं अक्षरें साधून आपलीं रामायणें व कांहीं इतर काव्यें रचिलीं व अशा रीतीनें त्यांनीं आपल्या बुद्धीचा अपव्यय केला म्हणून कवीवर रुसले; कित्येक मोरोपंतांनीं व्यासवाल्मीकादि कवींच्या काव्यांची नक्कल केली, त्यांच्या कल्पना सर्व व्यासवाल्मीकांच्या ग्रंथांतल्या अतएव उष्ट्या म्हणून त्याजवर रागावले; कांहींजणांनीं मोरोपंत केवळ भाषांतरकार, त्यांच्या काव्यांत सत्कवीत असणारे काव्यगुण दिसून येत नाहींत, खरें कवित्व अंगीं असतें तर त्यांनीं पुराणग्रंथांचें केवळ अर्थ-वाहकत्व न पत्करतां कालिदास, भवभूतीप्रमाणें त्यांनीं स्वतंत्र ग्रंथरचना खचित केली असती, म्हणून त्यांची कविता रसिक वाचकांच्या आदरास पात्र नाहीं असें ठरविलें; कांहींजण पंतांच्या काव्यांत भक्तिरस तेवढा असून तोही पंढरपूरच्या वारकऱ्यांच्या [illegible] मासल्याचा आडदांड व बेपर्वाईचा असतो म्हणून नाकें मुरडतात; व कांहीं कांहीं तर मोरोपंतांना अनेक प्रांतांतील भाषांचें ज्ञान चांगलें होतें व मराठी व संस्कृत या [illegible] त्यांचा हातखंडा होता पण त्यांनीं त्यांचा चांगला उपयोग केला नसून पुष्कळ संस्कृत शब्द, सबंध संस्कृत वाक्यें, लांब समास व परक्या भाषेंतले शब्द या सर्वांचा आपल्या काव्यांत गोंधळ करून निरनिराळ्या उंच व हलक्या कापडांचे तुकडे एकत्र करून शिवलेल्या एखाद्या भिकाऱ्याच्या गोधडीप्रमाणें त्यांनीं आपली कविता विरूप, नीरस व क्लिष्ट मात्र केली म्हणून [illegible] तिरस्कार करितात. वरील टीकाकारांपैकीं एकदोघांचे अभिप्राय वाचून मोरोपंतांच्या भक्तांना करमणूक होईल व मोठमोठी मंडळी चांगला शोध न करितां कधीं कधीं विलक्षण विचार (विकार?) कसे प्रकट करितात तें दिसून येईल. म्हणून ते संक्षेपानें पुढें दिले आहेत:—(1)

'*Moropant is decidedly the degenerate poet of the degenerate Sanskrit age*, when the Brahmins betray a great want of invention, arrangement and originality, when whatever is old is admired immoderately and when unable to write original treaties in any department, but actuated by the desire of writing, they reproduce the sentiments of the old Sanskrit poets in Marathi, for the good of the ignorant as they allege. *Read Moropant as much as you like, you will find nothing new, but the stale thoughts in elaborate, grandy, artificial style, and loaded with ornaments which cannot but disgust a reader of taste.*' (Elphinstone School-paper, December 1863) यांतील सारांश:—संस्कृत कविता ज्या काळीं अगदीं नीचस्थितीस जाऊन पोंचली त्या काळच्या हलक्या कवींपैकीं अगदीं हलका कवि मोरोपंत हा होय. त्या कालच्या ब्राह्मण लोकांत कल्पनाशक्ति, रचनाचातुर्य व स्वतंत्र स्फूर्ति हे गुण मुळींच आढळत नसून लोकांत प्रत्येक जुन्या

गोष्टीची अतिशय स्तुति मात्र होत होती. व कोणत्याहि विषयावर स्वतंत्र ग्रंथ रचण्याचें सामर्थ्य मंडळीच्या अंगांत नसल्यामुळें ते जुन्या संस्कृत कवींच्या ग्रंथांचीच मराठींत हुबेहुब नकल करीत असत. याला उदाहरण मोरोपंतानें. त्याचे ग्रंथ पुन्हां पुन्हां किती वेळ जरी वाचले तरी त्यांत नवीन कांहीं आढळत नसून जुन्या कवींचे शिळे विचार भपकेदार व कृत्रिम रीतीनें दर्शविलेले मात्र आढळतात. ते वाचून खऱ्या रसिकांस त्याच्या काव्याचा तिटकारा मात्र येतो.. (2) '*Moropant has undoubtedly great command of the Marathi language, which he sometimes prostitutes by indulging in such poetical conceits as acrostics, and by writing without the use of the labial letters, introducing the conjunction* परंतु *(but) into every line, and by commencing each line of his verse by the last word of the preceding line. He is the lord of the Arya metre, in which he copiously writes, with power and ease, drawing his ideas from the Ramayan, Mahabharata and Bhagwat, so often mentioned as the sources of Maratha excitement and but seldom improved upon either in thought or feeling. One of his books held in most estimation is the Mayur Kekavali, Trampeting of the Peacock, so called from his own name.*' (Dr. Wilson in the introduction, to Dr. Molesworth's Marathi into English Dictionary.) याचा सारांश:-'मोरोपंताला मराठी भाषा उत्तम अवगत होती. परंतु त्यानें तिचा कांहीं ठिकाणीं 'निरोष्ठ्र' 'परंतु' इत्यादि नियमित अक्षरें साधून काव्यरचना करण्यांत अपव्यय केला आहे. आर्या छंदांत त्यानें पुष्कळ काव्यरचना केली व त्यांत कविता करणें त्याला चांगलें साधलें होतें. रामायण, भारत, भागवत या ग्रंथांतील विचार घेऊनच त्यानें काव्यरचना केली आहे. तरी त्यापेक्षां विशेष चांगलें वर्णन किंवा चांगले विचार त्याच्या काव्यांत आढळत नाहींत. केकावलि हें त्याचें काव्य लोकांच्या फार आदरास पात्र झालें आहे.' 'पोवाडे' प्रसिद्ध करणाऱ्या आकर्थ साहेबांनीं 'एल्फिन्स्टन कॉलेज युनियन' पुढें दिलेल्या 'मराठी कवि'वरील आपल्या (?) व्याख्यानांत वरच्यासारखेच उद्गार काढिले आहेत. कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर मोरोपंताला कवि समजत नसत हें त्यांच्या सुप्रसिद्ध चिरंजीवांनींच प्रसिद्ध केलें आहे. या कवीवरील इतर आक्षेपकांचे अभिप्रायही ह्या पुस्तकांत मागें दिले आहेत. **मोरोपंतांवरील आक्षेप वाचून सुचलेले दोन विचारः—**मोरोपंतांची कविता ज्यांनीं सूक्ष्मदृष्टीनें पाहिली असेल त्यांना वरील आक्षेप वाचून हसूं येईल व कदाचित् थोडासा रागही येईल. संस्कृतज्ञ वाचकांनीं पंतांचीं 'मुक्तामाला' व 'कृष्णस्तवराज'हीं दोनच लघु संस्कृत काव्यें जरी वाचिलीं तरी त्यांना त्यांत कल्पकता, रचनाचातुर्य, प्रसाद, व सहृदय कवित्व हे गुण आढळतील. प्राकृत लघु काव्यांपैकीं आर्याकेकावली, श्लोककेकावली, नामरसायन, संशयरत्नावली, मुरलीपंचक, नामसुधापंचक, रामरीति, सत्संगस्तव, सन्मनोरथराजि, विठ्ठलविज्ञापना व विश्वेशस्तुति ह्यांपैकीं एखाददुसरें पंतांचें काव्य वाचलें असतांही वाचकांस स्वतंत्र स्फूर्ति, कल्पकता, प्रेमल प्रसाद, प्रौढ व मार्मिक शब्दयोजना इत्यादि उत्तमकाव्यास मंडित करणारे गुणगण त्यांत खचित आढळून शिवाय त्यांत उत्कट भक्तिप्रेमहि आढळेल.

मग भारत, मंत्रभागवत, मंत्ररामायण, हरिवंश, कृष्णविजय, इत्यादि त्यांचीं मोठीं प्रकरणें वाचल्यावर 'रुचिरस्वरवर्णपदा' व 'रसभाववती' अतएव 'जगन्मनोहारिणी' अशा सुवर्णालंकृत तरुणीच्या दर्शनाचा भास करून देणाऱ्या प्रासादिक काव्यामृताचा त्यांना यथेष्ट आस्वाद घेण्यास सांपडल्यास त्यांत नवल काय? भारतभागवतादि मोरोपंतांचीं मोठीं काव्यें वाचणारांस 'आधींच सोन्याचें, त्यांत जडावाचें। लेणें श्रीमंताचें, शोभिवंत॥' या सुप्रसिद्ध कविवचनाची पदोपदीं आठवण येईल. भारत, मंत्ररामायण, हरिवंश, कृष्णविजय यांतील कांहीं प्रकरणें व पृथुकोपाख्यान, नारदाभ्युदय, भीष्मभक्तिभाग्य, कुशलवोपाख्यान, व अंबरीषाख्यान हीं आख्यानें वाचणारांस कालिदासाच्या उपमा, भारवीचें अर्थगौरव व समयविशेषीं दंडीचें पदलालित्य या तिन्ही गंगा एकत्र होऊन पंतांच्या काव्यांत त्रिवेणीसंगम झालेला आढळेल. कै० विठोबा अण्णा कऱ्हाडकर, परशुरामपंत गोडबोले, भास्कर दामोदर पाळंदे, दादोबा पांडुरंग, मल्हार बाळकृष्ण हंस, विष्णुशास्त्री चिपळूणकर, शंकर पांडुरंग पंडित, जनार्दन बाळाजी मोडक, हरि माधव पंडित, वामन दाजी ओक, बापूसाहेब पटवर्धन कुरुंदवाडकर इत्यादि रसिकवर्यांस ज्यांच्या कवितावधूनें जन्मभर चटका लावून आपल्या भक्तमालिकेंत गोंविलें त्या कवींच्या काव्यसौंदर्यास वरीलसारख्या पोकळ टीकांनीं तिळभरही कमीपणा येत नसून उलट त्या गालबोटाप्रमाणें रसिकांचीं मनें काव्यवधूच्या सौंदर्याकडे वेधण्यास मात्र कारण होतात. हा प्रतिकूळ टीकाकारांचा पंतांवर उपकारच समजावयाचा. यांचमुळें मयूरकवींची आवड महाराष्ट्रांत अलीकडे जास्त जास्त वाढूं लागली आहे. त्यावरून ते लवकरच महाराष्ट्रकविवर्यांकरितां मांडलेल्या सिंहासनांपैकीं एका प्रमुख सिंहासनावर आरूढ होतील असा रंग दिसत आहे. या केकेवरून आणखी एक विशेष गोष्ट समजते ती ही. '**पंतांनीं श्लोककेकावलींत कौतुकानें अनेक प्रकारचे उद्गार प्रकट करून चमत्कार केला आहे व व्यंग्यानें इष्टार्थ इंगित केला आहे.' याचें ही केका एक सुरेख उदाहरण आहे**:—पंतांचे सहृदय टीकाकार कै० हंस लिहितात. 'काव्यप्रकाशादि साहित्यशास्त्रोक्त लक्षणाप्रमाणें श्लोककेकावलि हें उत्तम म्हणजे ध्वनिकाव्य आहे. यांत वाच्यार्थास प्रधानता नसून व्यंग्यार्थास प्रधानत्व आहे. त्याप्रमाणें व्यंग्यानें इष्टार्थाची पुष्टि करण्याकरितां सहाव्या प्रमाणांतील केकांत पंतानें स्वल्पता दाखवून महाजनांचें भय मानितो असें लिहिलें आहे. तो खरोखरच मंदमति, अपंडित, अकुशल होता किंवा महाजनांचें भय आपण अज्ञान म्हणून बाळगीत होता असें त्याच्या या केकांवरून दिसत नाहीं. जो खरोखर पंडितांचें भय बाळगील तो आपल्या कवितेंत समजून उमजून दोष ठेवून त्याविषयीं आपण पंडितांचें भय बाळगतों म्हणून कशाला लिहून ठेवील? त्यानें जेथें भयाचा उल्लेख केला आहे तीं स्थलें दोषाचीं आहेत काय? अथवा तेथें दोष आहे असें तो समजत होता काय? जर दोष आहे असें त्यास वाटलें असतें तर दोषाची दुरुस्ती त्याला करितां येत नव्हती काय? तेव्हां त्यानें बुधजनांचें महत्व आणि भय जें प्रदर्शित केलें आहे, तें आपण अपंडित, अकुशल यास्तव चुकीला पात्र आहों अशा हेतूनें केलेलें नाहीं व त्या वाक्यांतील वाच्यार्थावर प्रधानत्वही नाहीं हें बारीक विचारानें मनांत येतें. वर्णनीय वस्तूचें (भगवत्कथांचें) अतिशय महत्व दाखविण्याच्या मुख्य उद्देशानें तिचें वर्णन करीत असतां जें जें म्हणून उपमान

असेंहि[1] उपदेशिती गुरु[2] रहस्य मंदा[3] 'रुचे

अत्युत्कृष्ट असें त्यानें स्वमतीनें निवडून काढिलें तें तें न्यूनच आहे असें वाटूं लागलें असा भाव दाखविला. असें होतां होतां अखेरीस भगवत्कथांचें अनिर्वाच्य महत्व इंगित होण्याकरितां पंतानें चमत्कार केला. मीं स्वमतानें काढिलेलें उपमान उपमेयाशीं लावून पाहतां मला मंदाला बरें दिसतें, परंतु हें ज्ञात्या जनाला मान्य होण्याजोगें नाहीं. मीं जर पंडितांस विचारिलें असतें तर याहून उत्तम उपमान त्यांनीं मला दाखविलें असतें! मीं त्यांजला विचारिलें नाहीं हें माझें औद्धत्य आणि यामुळें भगवत्कथांस सम्यक् उपमान प्राप्त झालें नाहीं!! इत्यादि तर्क फारच उत्कृष्ट रीतीनें वर्णनीय वस्तूचें महत्व मात्र इंगित करितात.' [मोरोपंतावरील निबंध–पृ० ६८-७३.] ९. **'उद्धतें' हें साभिप्राय विशेषण आहे, म्हणून हा 'परिकर' अलंकार समजावा. या केकेचा अर्थ** हंसकृत निबंधांत दिला आहे तो असा:—**'भगवत्कथांला कामधेनूची उपमा दिली ती चांगली दिसते; परंतु मी मंदमति आहें; यास्तव ती मला जरी चांगली दिसली तरी ती विद्वज्जन अथवा साधुजन ह्यांच्या कानास गोड लागणार नाहीं. ते ही उपमा पाहून नाक मुरडतील. कां तर, भगवत्कथा निरुपमा आहेत; त्यांजला जगत्रयांत उपमानच नाहीं, इतकी ज्यांची महती, त्या कथांना पशूची (कामधेनूची) उपमा मीं योजिली! हर हर! हें कांहीं बरोबर झालें नाहीं!! म्यां उद्धतानें पंडितजनांलाही या संबंधानें विचारिलें नाहीं! विचारिलें असतें तर मीं योजिलेल्या उपमानापेक्षां उत्तम सम्यक् उपमान त्यांनीं मला सांगितलें असतें!' केकासौंदर्य:**—'भगवत्कथांची महती अनिर्वाच्य आहे हा अर्थ कवीनें व्यंग्यानें सूचविला असून, ह्या पद्यांत व्यंग्यार्थासच प्रधानत्व आहे. वाच्यार्थापासून, कवि मंदमति, अविद्वान् आहे; त्याला उपमादि योजना माहीत नाहींत; पंडितांला विचारून तो कविता करीत असतो इत्यादि गोष्टी दिसतात. पण हा कवितेचा अर्थ नाहीं हें कोणीही कबूल करील. प्रबंधरचना पहातांना स्पष्टच आहे कीं, वरपासून भगवत्कथांचें महत्वच कवि वर्णन करीत आला आहे आणि तोच ओघ ह्या केकेंतही उघडच दिसतो. तेव्हां अशा ठिकाणीं कवीच्या बुद्धीचें व विद्येचें वर्णन असण्याचा अगदींच संभव नाहीं. तें वर्णन, इष्टार्थ जो भगवत्कथामहत्व या गोष्टीस पुष्ट करण्यापुरतेंच कवीनें घातलें आहे. भगवत्कथामहत्ववर्णनाच्या संबंधानें, नैषधकारांच्या डोक्यावर बसणारा पंडित असला तरी तो **मोरोपंता**सारखीच आपणाकडे लघुता घेऊन, तें वर्णन करील, तेव्हांच काव्यचमत्कृतीनें इष्टार्थसिद्धि होईल. वरील पद्यांत पंतानें स्वलघुता दाखविली आहे, ह्यावरून तो पंडित नव्हता असें कालत्रयीं म्हणतां यावयाचें नाहीं व असें म्हणणाऱ्यास पंताच्या कवितेचा अर्थ समजला नाहीं असेंच म्हटलें पाहिजे.' [मोरोपंतावरील हंसकृत निबंध–पृ० ६८-७०.]

१. **अन्वय:–'निजस्तव जसा तसा रुचे, वंदारुचे अगुण न घे' असेंही रहस्य गुरु मंदा उपदेशिती; म्हणोनि (हे देवा!) निगमस्तुता तुला भलतसें वानितों, परंतु मी हृदयीं महाजनभयास मानितों. प्रास्ताविक:—कथेला कामधेनूची उपमा देऊं नये तर खरीच. पण दिली, त्याला एक कारण आहे. तें कोणतें हें या केकेंत कवि सांगतात.** २. **थोर पुरुष; साधु; उपदेशक.** ३. **अज्ञान मनुष्याला, मूर्खाला. केकार्थाचा अर्थ:–**

निजस्तव³ जैसा तसा, अगुण² घे न वंदारुचे;³ ।
ह्मणोनि निगमस्तुता⁴ भलतसें तुला वानितों;

ज्ञाते पुरुष अज्ञान भाविकांना अशी गुप्त गोष्ट सांगतात कीं तुम्हांला भगवंताची स्तुति जशी करतां येईल तशी तुम्ही करा; भक्तानें केलेली वेडीवांकडी स्तुति देखील ईश्वराला आवडते व तो आपली स्तुति करणाराचे दोष काढीत नाहीं; ते जशी आपली स्तुति करितील तशी तो आवडवून घेतो. पाठभेदः-कांहीं पोथींत 'रहस्य मंदा'चे ठिकाणीं 'हरीस वंदा' असा पाठ आढळतो. पाठभेदाचा अर्थः—ज्ञाते पुरुष हरीला (देवाला) वंदा (त्याची येईल तशी स्तुति करा) असेंही उपदेशिती (असें सांगतात). केकासंगतिः—मागल्या २५ व्या केकेंत 'आपल्या स्वामीची-देवाची-स्तुति कशी करावी हें माहीत नसून हा मला उगीच हाका मारीत सुटला आहे' अशी भगवंताची आशंका कल्पून 'तुमची स्तुति कशी करावी हें तुम्हीच मला शिकवा' असें कवीनें म्हटलें आहे. ह्या केकेंत थोर पुरुषांच्या मतें भक्तांनीं यथामति केलेलें स्तवन परमेश्वरास प्रिय होतें म्हणून मला तुमच्या कथेला जी उत्कृष्ट उपमा सुचली ती (कामधेनूची उपमा) देऊन तुमचें मी यथामति स्तवन करीत आहें, त्याचा तुम्ही सादर स्वीकार कराल व मजवर रागावणार नाहीं अशी मला खात्री वाटते, असें कवि ह्मणतात. आपण केलेली स्तुति प्रभूचा कृपाप्रसाद होण्यास समर्थ होणार नाहीं अशी आशंका सर्वकाळच्या कवींस येते. ऋग्वेदांतील रहूगणाचा पुत्र गोतमऋषि अग्निप्रार्थना करितांना ह्मणतोः- '[हे अग्नि], कोणती उपासना तुझें मन वळवील? कोणती स्तुति तुला अत्यंत आनंदकारक [होईल?] अथवा यज्ञांनीं तुझ्या कौशल्याप्रत कोण पावला आहे? अथवा कोणत्या बुद्धीनें [आम्ही] तुला हवि अर्पण करावें?' (ऋग्वेदमंडल १ सूक्त ७६ मंत्र १.)

१. जसा येईल तसा. २. दोष, कमीपणा. ३. वंदन करणाऱ्याचे, स्तुतिपाठकाचे. 'वंदारुरभिवादके' इत्यमरः. ४. निगम (वेद)+स्तुत (स्तविलेला)=वेदस्तुता (वेदांनीं स्तविलेल्या) परमेश्वराला. वेद हे परमेश्वराच्या श्वासापासून उत्पन्न झालेले असून ते सदोदित परमेश्वराचें स्तवन करितात म्हणून देवाला 'निगमस्तुत' (वेदांनीं स्तविलेला) असें म्हणतात. वेदांतील देवस्तुतीचा मासलाः—(१) (सनः पितेव) 'हे अग्नि! जसा पिता पुत्राला सुगम असतो तसा तूं आम्हांप्रत हो; आमच्या कल्याणास्तव आम्हांबरोबर रहा.' (ऋ० मं. १ सू० १ मं० ९) (२) (तमित्सखित्व) 'त्या इंद्रालाच मैत्रीसाठीं आम्ही प्रार्थितों, त्यालाच धनासाठीं [आणि] त्यालाच शौर्यसंपन्नपुत्रासाठीं [प्रार्थितों]. ह्मणून तो शक्तिमान् इंद्र द्रव्य देऊन आम्हांस साह्य करो.' (ऋ० १-१०-६) (३) (आश्रुत्कर्ण) 'ज्याचे कान ऐकतात अशा, हे इंद्रा! आमची ही हाक ऐक; ह्या माझ्या स्तुति आतांच स्वीकारून घे. हे इंद्रा! ह्या माझ्या स्तोत्राला तूं [आपल्या मित्रापेक्षांही जिवलग कर.' (१-१०-९) (४) (संमाग्ने वर्चसा) 'हे अग्नि! मला तेज दे, मला संतति दे, मला आयुष्य दे, आणि मग ऋषींसहित मला देव जाणोत, आणि इंद्र जाणो.' (१-२३-२४).' (५) (अव ते हेळो)' 'हे वरुणा! तुझी अवकृपा न व्हावी म्हणून आम्ही नम-

स्कारांनीं प्रार्थितों, यजनें करून प्रार्थितों, [आणि] हवींच्या योगानें प्रार्थितों. हे देवा! हे बुद्धिमंता राजा [वरुणा]! [आम्हीं] केलेल्या पापांची [आम्हांपासून] सुटका करून त्यांची आम्हांला क्षमा कर.' (१.२४,१४) (६) (त्वं भुवः प्रतिमानं) '[हे इंद्रा!] तूं [या] विस्तीर्ण भूमीचें प्रतिमान होस. [तूं] महावीर ज्यांत राहतात त्या उच्च [स्वर्गाचा] प्रभु होस. [तूं] आपल्या मोठेपणानें सर्वहि अंतरिक्ष भरून टाकिलें आहेस. तुझ्यासारखा दुसरा कोणी नाहीं [हें] अगदीं सत्य [आहे]. (न यस्य) ज्याच्या मोठेपणाचा अंत द्यावापृथिवींस लागला नाहीं [आणि] अंतरिक्षास [ही] लागला नाहीं;...ज्याच्या [बळाचा अंत मिळाला] नाहीं, [तो] [तूं] एकटा [हे इंद्रा!], सकलवस्तु अनुक्रमेंकरून निर्माण करिता झालास' (१.५२.१३-१४).' (७) (नहि नु) 'आम्हांस किती झालें तरी इंद्राविषयीं ज्ञान होत नाहीं...(१.८०.१५) (८) (उपो पु शृणुही) [गौतम ऋषि स्तवन करितो] 'हे मघवन्! [तूं] येऊन [आमच्या] प्रार्थना मन लावून ऐकून घे. [तूं आम्हांविषयीं] उदासीन [होऊं] नको. [तूं] ज्यापेक्षां आम्हांला वाच दिली आहेस त्यापेक्षां [आम्ही] तुझ्याजवळ याचना करणारच करणार.' (१.८२.१) (यस्याजस्रं शवसा) 'ज्याचा स्तवनीय महिमा [आणि] प्रताप भूलोकाला आणि द्यु लोकाला दोहोंकडूनही नित्य व्यापून राहत असतो, तो [इन्द्र] [आमच्या] कर्मांच्या योगेंकरून तृप्त [होऊन] [आम्हांला] तारो. [तो] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होवो.' (९) (न यस्य देवा) 'ज्याच्या बळाचा अंत द्युलोकामध्यें देवांना [लागलेला] नाहीं, मर्त्य मनुष्यांस [लागलेला] नाहीं आणि उदकांनाही लागलेला नाहीं तो [इंद्र] [आपल्या] तेजानें पृथिवी आणि द्युलोक यांस व्यापून टाकणारा [होय]. [तो] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होवो. (१.१००.१४-१५)' (१०) (त्वं नो अस्या) 'हे इंद्रा! नाहींशी करावयास कठीण अशी जी ही [दरिद्रावस्था], तिजपासून तूं आम्हांला [तार]; हे वज्रधरा! तूं आम्हांला पापापासून सुद्धां तार. तूं आम्हांला रथ आणि घोडे यांहीं भरलेली विपुल संपत्ति दे, कीं जेणेंकरून आम्हांला अन्न, कीर्ति आणि प्रशंसा ह्यांचा लाभ होईल.' (११) (मा सा ते) 'तर हे धनसंपन्न [इंद्रा!] तुझी कृपा आम्हांला न सोडो; अन्नसंपत्ति आमच्या पदरीं राहोत. हे मघवन्! उदार [असा जो] तूं, [तो] आम्हांला गाई मिळवून दे, [मग आम्ही तुला पुष्कळ द्रव्यें देऊन कुटुंबाच्या मनुष्यांसहित तुझ्या भजनांत परायण होऊं.' [ १. १२१. १८ ] (१२) (द्वा सुपर्णा सयुजा) 'एकमेकांचे जिवलग मित्र [असे] दोघे पक्षी एकाच वृक्षाचा आश्रय करितात. त्यांतून एक त्या वृक्षाचीं जीं गोड फळें [तीं] भक्षण करितो. [आणि] दुसरा [तीं] भक्षण न करितां त्यांजकडेस पाहात राहतो.' जीव आणि परमात्मा हे दोन पक्षी, देह वृक्ष, कर्मफळें हीं फळें असें रूपक सोडवावें. (१.१६४.२०) (१३) (यस्मिन् वृक्षे मध्वदः सुपर्णा) 'ज्या वृक्षाचे ठायीं गोड फळें खाणारे पक्षी आश्रय करितात आणि जेथून ते सकळ विश्वांवर पिलें घालतात, त्याचेंच फळ सर्वांपेक्षां गोड असें म्हणतात. त्या पित्याला जो जाणत नाहीं त्याला तें फळ मिळत नाहीं? वृक्ष म्हणजे परमात्मा, पक्षी म्हणजे इंद्रियें, गोड फळें म्हणजे ज्ञान, आश्रय करितात म्हणजे झोंपेच्या वेळीं आपआपल्या विषयांपासून निवृत्त होतात, पिलें घालतात म्हणजे संसारापासून 'परमात्म्याचें ज्ञान इत्यादि समजून

परंतु हृदयीं महाजनभयास मी मानितों. ॥ ६०

---

रूपक सोडवावें. (१४) (चित्रं देवानामुदगादनीकं) 'देवांचें सुंदर मुख, [आणि] मित्राचें, वरुणाचें, आणि अग्नीचें चक्षु, [आणि] जंगमाचा व स्थावरांचा जीव असा जो सूर्य तो पहा हा उगवला आहे [आणि] द्युलोक, पृथ्वी [आणि] अंतरिक्ष यांस [तेजानें] भरून टाकित आहे.'(१.११५.१) (१५) (नकिरिन्द्र त्वदुत्तरो) 'हे इंद्रा! तुजहून अधिक श्रेष्ठ कोणी नाहीं, हे वृत्रघ्ना! अधिक मोठा कोणी नाहीं. तुझ्यासारखाही कोणी नाहीं.' (४.३०.१) (१६) (तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात्) 'जो [सविता] आमच्या बुद्धींना प्रेरूं शकतो त्या देदीप्यमान सवित्याचें श्रेष्ठ तेज आम्ही ध्यातों.' हा मंत्र जगद्विख्यात गायत्री मंत्र होय. (३.६२.१०)

**५. जसें येईल तसें. केकेच्या द्वितीयार्धाचा अर्थः– परमेश्वराची भक्तिपूर्वक स्तुति–मग ती स्वसामर्थ्यानुरूप वेडीवांकडी कशीही केलेली असो–ती त्याला प्रिय आहे असें गुरुजन सांगतात, त्या आधारावर देवा! मी तुम्हांला 'भलतसें' (यथामति) वानितों (तुमची स्तुति करितों) हें जरी खरें आहे तरी माझ्या मनांत पंडित लोक मला नांवें ठेवतील ही शंका येऊन मला तुमचें यथामति स्तवन करण्यास शंका वाटते.**

**१. विद्वान्, नैयायिक, वैयाकरण, साहित्यशास्त्रज्ञ, शब्दशास्त्रवेत्ते व अर्थवादी पंडित यांचें भय. पंडितलोक माझ्या पदयोजनेस कोणता दोष लावतील न कळे, हें भय मी मनांत मानितों. (बाळगतों.)** कृष्णविजयपूर्वार्धाच्या शेवटीं 'महाजनप्रार्थनेंत' सज्जन रसिकांचें अभय घेऊन पंतांनीं काव्यरचना केली असा उल्लेख आहे. 'मोरोपंताच्या ग्रंथांवरून पाहतां तो आपणास पंडित समजत असे किंवा त्या पदावर चढण्याविषयीं त्यांना हाव होती असाही प्रकार बिलकुल नजरेस येत नाहीं. तो आपली पदवी ओळखून तीत संतुष्ट होता असें दिसतें. आपलें कवित्व कोणत्या तोलाचें आहे हें पक्केपणीं जाणून तो त्याविषयीं योग्य अभिमान बाळगित असे व दूषकांच्या आक्षेपांची पर्वा करित नसे, हें त्याच्या कांहीं उल्लेखावरून दिसतें' (निबंधमाला अंक ७) या व मागील केकेंत पंतांनीं व्यंग्योक्तीनें विद्वत्तेचा ताठा बाळगून इतरांस तुच्छ मानणाऱ्या पंडितंमन्य 'बुधजनांचा' किंवा 'महाजनांचा' उपहास केला आहे. **माझ्या कृतींत दोष पडूं नये म्हणून मी फार जपतों असें व्यंग्य आहे, तें न सांगतां, त्याचें कारण जें 'महाजनभय' तें मी मानितों असें पर्यायानें वर्णिलें आहे म्हणून ही पर्यायोक्ति जाणावी. 'तें पर्यायोक्त जरी कथिलें व्यंग्य प्रकारभेदानें । हें त्यांसि नमन, केलें राहुवधूच्या कुचां विफळ ज्यानें'** ॥ (अ. वि.) **जो व्यंग्यार्थ कवीस बोलावयाचा आहे त्याचें प्रकारांतरानें म्हणजे वळसा घेऊन मुळच्या रूपापेक्षांही विशेष सुंदर असें वर्णन करणें यास 'पर्यायोक्त' अलंकार म्हणतात.** वरच्या उदाहरणांत 'विष्णूला नमस्कार असो!' असें न म्हणतां 'ज्यानें राहूस्त्रियांचे स्तन विफळ केले त्याला (अर्थात् विष्णूला) नमस्कार असो' असें म्हटलें आहे. पर्यायोक्ताचा एक दुसरा प्रकार आहे त्यांत इष्टार्थाची सिद्धि कोणत्या तरी गोष्टीचें मिष करून केली असते. **'पर्यायोक्त तयासहि म्हणति मिषें इष्टसिद्धता जेथें' । जातें मी आम्रलता अवलोकाया, तुम्ही बसा**

म्हणें[1]–'स्व[2]कृतिच्या उणें किमपि एक वर्णी[3] न हो[4];
असें तुज कधीं बरें वि[5]गतशंक वर्णीन हो[6] !'–।

---

**येथें'** ॥ (अ. वि.) मोरोपंताच्या काव्यांत **पर्यायोक्तीचीं उदाहरणें** पुष्कळच सांपडतात त्यांतील थोडीं येथें दिलीं आहेत:–(१) जें सासुरा मुली पितृगमनिं करिति तेहि काननौके तें ॥ (वन० ६-६६) (२) भूप म्हणे 'सति! जातों निर्लज्ज, कृतघ्न तुज विकायाला । राक्षस, पिशाच येतिल मजपाशीं कठिणपण शिकायाला' ॥ (हरिश्चंद्राख्यान अ० २ गी० ३८) (३) तो हा वैदर्भि! जेणें प्रथमचि तुजला लागला बोल खावा ॥ (कृष्णविजय ५५.३९) (४) त्या संज्ञप्तीं अश्वीं शिरला विघ्नार्थ तत्क्षणीं योगी । जो गीष्पतिचा शिष्य, त्रिदशांचा नाथ, तो तितें भोगी ॥ (हरिवंश ४४-३७) '५ (पर्यायोक्तीचें थोरलें व सुरेख उदाहरण) 'जो रथयूथप यूथपवीराधिकलक्षणप्रभावास । ज्याच्या विसरत मोसित नव्हतासि पल क्षण प्रभावास ॥ ४७ ॥ इंद्रा उपेंद्रसा जो आश्रय दुर्योधना महातेजा । पुरुपहि विसरत होते पक्ष्में चाळावया पहाते जा ॥ ४८ ॥ ज्याच्या दिग्विजयीं सुरनर मानवले सुयुद्धयशांनीं । दाता नित्य ब्राह्मणपूजक शुचिशीलरक्षक ज्ञानी ॥ ४९ ॥ जो सहज–कवच–कुंडल–मंडित पंडितजनीं असामान्य । सूत म्हणति परि कैसा होईल तशा कुळीं असा मान्य? ॥ ५० ॥ भवदवन करित होता बहुभास्वर थावरूनि हात रणीं । वाटे जणो उतरला वसुधा स्वरथावरूनि हा तरणी ॥ ५१ ॥ राधा धात्री त्याची रविपासुनि मदुदरांत तो आला । ज्येष्ठ भ्राता तुमचा कर्ण तुम्ही सर्व उदक द्या त्याला ॥ ५२ ॥ (स्त्रीपर्व).

**१. अन्वयः–'स्वकृतीच्या एक वर्णीं किमपि उणें न हो, असें विगतशंक तुजहो! [देवा!] कधीं बरें वर्णीन' [असें मी] म्हणें; अशि आवडी असेचि, अत्यादर कां न करिशि? [हे] स्वभक्तसुरपादपा हरि! सत्या दर नसेचि' प्रास्ताविकः–'सुंदर आणि सम्यगर्थवान् अशा शब्दांनीं तुझा स्तव करावा अशी मला इच्छा नाहीं असें त्वां •समजूं नये; तशी इच्छा मला आहे, परंतु तीही पूर्ण करणारा तूंच म्हणून स्वाभिप्राय प्रगट करित होत्साते कवि प्रार्थितात.'** (य० पां०–पृ०२३०.) **म्हणें=म्हणतों. २. स्व (निज)+कृतिच्या (कवितारूप करणीच्या)=भगवत्स्तुत्यात्मक कवितेच्या. ३. अक्षरीं. वर्ण शब्दाचे रंग, जाति, व अक्षर असे तीन मुख्य अर्थ आहेत. ४. होवो. ५. गेलेली आहे शंका ज्याची असा, निःशंक होत्साता. ६. अहो! प्रथमार्धाचा अर्थः–देवा! सध्यां मी न अडखळतां बिनचुक असें तुझें स्तवन करण्यास समर्थ नाहीं, म्हणून असें तुझें स्तवन करण्याची इच्छा माझ्या मनांत होत नाहीं असें आपण समजूं नका. तर मीं केलेल्या तुमच्या स्तुतींत एकही अक्षर उणें नसावें असें मी फार इच्छितों. पण तुमच्या कृपेशिवाय ही माझी इच्छा सफळ होणें नाहीं यास्तव माझ्यावर एवढी कृपा कराच, असें कवि द्वितीयार्धांत म्हणतो.**

असेचि अशि आवडी, करिसि कां न अत्यादर?
स्वभक्तसुरपादपा! हरि! नसेचि सत्या दर. ॥ ६१
ध्रुव स्तवनिं आवडी धरि, म्हणोनि अत्यादरें

---

१. आवड, इच्छा. एक अक्षर उणें पडूं नये अशा प्रकारें आपलें स्तवन करण्याची माझी फार इच्छा आहे. २. प्रेमानें स्वीकार. अशी जर माझी मनापासून इच्छा आहे तर ती तूं देवा पूर्ण कां करीत नाहींस? ख्रिस्ती शास्त्रांतील पुढील पंक्ति या केकेशीं बरीच सदृश आहे:–'Thou shalt open my lips, O Lord; and my mouth shall shew thy praise.' (Ps. 51) ३. स्व (आपल्या)+भक्त (भक्ताचा)+सुरपादप (देववृक्ष, कल्पतरु) जो तूं त्या! आपल्या भक्तांचें इच्छित पूर्ण करणाऱ्या देवा! भक्तकामकल्पद्रुमा! खुबीदार शब्दयोजना:—'स्वभक्तसुरपादपा' हा शब्द येथें मोठ्या खुबीनें योजिला आहे. भक्तांचे मनोरथ पूर्ण करणाऱ्या देवाला कवीची इच्छा पूर्ण करणें कठीण नाहीं. तेव्हां माझ्याकडे आपण कृपादृष्टीनें पहा म्हणजे यथार्थपणें आपली स्तुति करण्याचें सामर्थ्य माझ्यांत येईल असें कवीचें म्हणणें. येथें परिकरांकुर हा अलंकार झाला. जेथें विशेष्य साभिप्राय म्हणजे सहेतुक असतें तेथें परिकरांकुर होतो. [केका ४ पृ० ११ पहा.] ४. देवा! जो पापहरण करितो तो हरि. व्यु०:–हर व हरि हे दोन्ही शब्द 'हृ (हर)' ह्या एकाच धातूपासून निघाले आहेत. 'हरिमी सर्व प्रलयीं यास्तव हरि नाम हे व्यथा' सुकवी (मोरोपंत) अशी याची दुहेरी व्युत्पत्ति आहे. ५. सत्याला, खऱ्याला. खरें सांगावयास काय भीति आहे! द्वितीयार्धाचा अर्थ:–आपण कृपा कराल तर माझे मनोरथ सहज पूर्ण होतील व एक अक्षर उणें पडूं नये अशा प्रकारची आपली स्तुति करितां येईल. पण असें असून माझ्या आवडीचा तुम्ही आदर करीत नाहीं हें खरें आहे. मग खरें बोलावयास भीति कोणाची? येथें 'नसेचि सत्या दर' या सामान्यानें विशेषार्थाचें समर्थन केलें आहे म्हणून हें अर्थांतरन्यास नामक अलंकाराचें उदाहरण होय. केका २ पृ० ८ पहा. ६. भीति. 'दर' शब्दाचे (१) शंख (२) भीति (३) अल्प असे तीन अर्थ होतात. ह्या तिन्ही अर्थीं हा शब्द पंतांनीं आपल्या काव्यांत योजिलेला आढळतो. उदाहरणें:–(१) न धरी बा दर, हा दर सादर दे वाजवूं पुन्हां नीट (विराट अ० गी०–) (२) भ्यालीस भीरु! भय कां भेटे त्यालाचि कांप दर जा ये (विराट अ०–गी०–) ७. अन्वय:–ध्रुव स्तवनिं आवडी धरि, म्हणोनि तुम्हीं दरें गल्ल शिवुनी अत्यादरें सत्या करुनि दाविली, तसें मज करा, शिरीं करांबुज धरा, [हे] मावरा! वराभयपरा! पराक्रमपटो! मना आंवरा. प्रास्ताविक:—तुझ्या आवडीचा अत्यादर मीं कोणत्या प्रकारें करावा असें विचाराल तर 'तो ध्रुवाप्रमाणें करावा' असें कवि सांगतात. कथासंदर्भ:–ध्रुव हा उत्तानपादराजास सुनीति भार्येपासून झालेला महाभगवद्भक्त पुत्र. ह्याच्या बापाला सुनीति व सुरुचि अशा दोन स्त्रिया होत्या. त्यांत ध्रुवाची माता सुनीति ही वरिष्ठ असून राजाची नावडती होती. सुरुचीनें एकदां सवतीमत्सरानें ध्रुवास राजाच्या मांडीवरून खालीं ढकलून

**तुम्ही करुनि दाविली, शिवुनि गल्ल[१] सत्या दरें[२].।**
**तसें मज करा, कँरांबुज[३] धरा शिरीं मॅावरा[४]!**

दिलें. यावरून ध्रुवाला फार वाईट वाटून तो रडत रडत आपल्या मातेजवळ गेला. मातेनें आपल्यावर ईश्वराची कृपा नाहीं म्हणून तुला असें दुःख झालें असें सांगून त्याचें समाधान करण्याचा यत्न केला. पण त्यामुळें ईश्वराची आराधना करून त्यास प्रसन्न करण्याचें ध्रुवाच्या मनांत आलें व तो अरण्यांत निघून गेला. तेथें त्याला नारदानें मंत्र सांगून जप कर म्हणजे तुला ईश्वर भेटेल असें सांगितलें. शेवटीं ध्रुवाची भक्ति पाहून ईश्वर त्याला प्रसन्न झाले व 'काय पाहिजे तें माग' असें म्हणाले. ईश्वराची गांठ पडली तेव्हां ध्रुवाला देवाची स्तुति करण्याची इच्छा झाली, पण काय बोलावें, कशी स्तुति करावी, हें त्याला कळेना म्हणून भगवान् विष्णूंनीं त्याच्या गालास आपल्या हातांतील शंख लावून आपलें स्तवन करण्याचें ध्रुवाला सामर्थ्य दिलें; व शेवटीं अढळपद देऊन आपण गुप्त झाले. अन्यत्र पंत हेंच मागणें देवाला मागतात:—'त्वं चेदद्य प्रसादं ध्रुव इव कुरुषे देव! बालो मयीह स्तोतुं त्वामेव कामं निपुणतरकविः श्राव्यभव्यप्रबंधः। कः स्तोता तात! जातस्तव जगति विनानुग्रहाद्विप्रदेवेष्वन्येष्वप्यब्जयोनिः प्रभुरपि भवतोऽनुग्रहादेव सुज्ञः॥ [मोरोपंतकृत स्फुटकाव्यें, पांडुरंगस्तोत्र—१६]. पंतांनीं एक सुरस साकीबद्ध 'ध्रुवचरित्र' लिहिलें आहे. त्यांतील पुढील साक्यांवरून या केकेंतील कथासंदर्भ विशेष स्पष्ट होईल:—'ध्रुवमतिजाड्य ब्रह्ममयदरें स्पर्शुनि गाल हरी तें। वात्सल्य असें परिसुनि जनहो हर्षुनि गाल हरीतें॥ ५८॥ जागविली निजली होती त्या बाळाची जी वाचा। बोध दिला ऐसा लाजाया ज्या महिमा जीवाच्या॥ ५९॥ परमानुग्रह करुनि शिकविलें प्रभुनें भाषण मग तें। किति वर्णावें अमृत कसें हो त्या सूक्तिपुढें तगतें॥ ६२॥ ८. **स्तवनाविषयीं ९. अभिरुचि.**

१. गाल. २. शंखानें. **अन्वयार्थः—ध्रुव स्तवनिं (स्तुति करण्याविषयीं) आवडी (आवड, उत्कट इच्छा, अभिरुचि) धरि (धरिता झाला) म्हणोनि (म्हणून) तुम्हीं दरें (शंखानें) गल्ल शिवुनि (गालास स्पर्श करून) अत्यादरें (मोठ्या आदरानें [ती आवड] सत्या (खरी) करून दाविली (करून दाखविली). प्रथमार्धाचा अर्थः—ध्रुवानें परमेश्वराचें स्तवन करण्याविषयीं पोटांत अत्युत्कट इच्छा बाळगली म्हणून भगवंतांनीं त्याच्या गालाला आपला शंख लावून मोठ्या आदरानें त्याची ती आवड पूर्ण केली, त्याच्या आवडीचें फळ त्याला दिलें. जसें ध्रुवाच्या गालाला शंखाचा स्पर्श करून तुम्हीं त्याला आपली स्तुति करण्याविषयीं समर्थ केलें तसेंच मलाही आपली स्तुति करण्यास सामर्थ्य द्या.** ही मागणी पंतांनीं आपल्या कवितेंत आणखी एक ठिकाणीं केलेली आढळते. 'स्तोतुमनसमकरोः किल गल्ले स्पृष्ट्वा ध्रुवं ध्रुवं दरतः। तद्वन्मामादरतः कुरु पुरुकरुणार्य! निजनुतौ निपुणम्॥ १८॥' [कृष्णस्तवराज—पृ० २३८.] **३. करकमल. व्यु०:—अंबु (उदक)+ज (झालेलें)—उदकापासून झालेलें. ह्मणजे कमल. ४. मा (लक्ष्मी)+वरा! (वल्लभा!)= लक्ष्मीच्या पते!** 'इंदिरा लोकमाता मा क्षीरोदतनया रमा' **इत्यमरः. अन्वयार्थः—'[हे] मावर! (लक्ष्मीपते) वराभयपरा! (वर आणि अभय देण्याविषयीं तत्पर) अशा देवा! [शंख राहूं द्या] शिरीं (डोक्यावर) करांबुज (करकमळ) धरा. देवा! तुम्ही लक्ष्मीपति अर्थात्**

वर[1]ाभयपरा! पर[2]ाक्रमपटो! मना आंवर[3]ा. ॥ ६२

कर[4]ांबुज अस[5]ो. नसें उचित त्यास मी पा[6]मर;

प्र[7]णाम करिती पद[8]ाप्रतिहि सन्[9]मुनी सा[10]मर; ।

पद[11]ाब्जरजही जग[12]त्रयनमस्क्रियाभाजन;

---

सर्वैश्वर्यसंपन्न, तसेंच भक्तांना इच्छित आणि अभय देण्याविषयीं अत्यंत तत्पर आहां. तेव्हां 'माझें मागणें तें किती, दाता लक्ष्मीचा पति' अशी स्थिति असल्यामुळें ध्रुवाप्रमाणें कृतार्थ करण्यास माझ्या गालाला तुम्ही शंखच लावला पाहिजे असें नाहीं तर माझ्या डोक्यावर तुम्ही नुसता आपला वरदहस्त ठेवा म्हणजे तेवढ्यानेंच मी कृतार्थ होईन.

१. वर आणि अभय देण्याविषयीं समर्थ अशा! २. पराक्रम करण्याविषयीं समर्थ अशा देवा! ३. दमन करा. 'मन आंवरा' याचे दोन अर्थ संभवतात. एक माझ्या अनिवार मनाला आटोपा. दुसरा माझ्या उद्धत प्रार्थनेवरून आपणाला क्रोध येऊं देऊं नका. खुबीदार शब्दयोजनाः–'सुंदर व यथार्थ अशा पदरचनेनेच तुझा स्तव करावा म्हणून जो माझ्या मनांत तरंग उठला आहे तो तरी आंवरा. तो आंवरण्याची शक्ति प्रभूच्या ठायीं आहे हें कवीनें 'पराक्रमपटो' या विशेषणानें येथें स्पष्ट सुचविलें आहे. येथे कवीनें शेवटीं 'मना आंवरा' या आपल्या अभिप्रायानें सुंदर पदरचनेनेच [illegible] इच्छा तिचें किंचित् वैयर्थ्यही इंगित केलें आहे असें मला वाटतें. (ये० पा०-पृ० २३.) ४. करांबुज असो, त्यास मी पामर उचित नसें, सामर सन्मुनी पदाप्रतिहि प्रणाम करिती, [हे देवा! तुमचें] पदाब्जरजही जगत्रयनमस्क्रियाभाजन [आहे]. [हे] प्रसादचतुरा! कसा तरि हा जन बरा करा. प्रास्ताविकः–आपल्या मस्तकावर वरदहस्त ठेवा अशी प्रार्थना केली, परंतु तितकी प्रसादपात्रता आपल्या आंगीं नाहीं असें सुचवीत होत्साते कवि म्हणतात. व्य०:–'अंबुजा'प्रमाणें कर तो करांबुज. येथे उपमा आहे म्हणून हा उपमित समास. ५. राहूं द्या. येथें आपल्या पूर्वोक्त भाषणाचा निषेध केला आहे म्हणून हा आक्षेप अलंकार होय. [कें० ४ पृ० १३–१४. पहा.] ६. नीच, प्राकृत. मी नीच करांबुजाला योग्य नाहीं. प्रथमचरणार्थः– प्रथम माझ्या डोक्यावर आपला वरदहस्त ठेवा असें मीं म्हटलें खरें, परंतु तुम्हीं माझ्या डोक्यावर आपला हात ठेवावा एवढी माझी नीचाची योग्यता नाहीं, तर पदांबुज माझ्या शिरीं ठेवा अशा अभिप्रायानें कवि पुढें म्हणतात. ७. नमस्कार, वंदन. ८. पायालाही. ९. नारदसनकसनंदनादि महर्षि. १०. स+अमर=देवांसुद्धां. द्वितीय चरणार्थः–आपल्या पायाची एवढी योग्यता आहे कीं इंद्रादि देवांसुद्धां नारदादि ऋषी त्याला नमस्कार करून आपल्याला पावन करून घेतात. तेव्हां तें चरणकमलच माझ्या डोक्यावर ठेवा, म्हणजे तेवढ्यानेंच मी विगतपाप होऊन कृतार्थ होईन. केका २४ यांत कवीनें अशीच प्रार्थना केली आहे. ११. पदकमलाचा रजःकणही, आपल्या पायाच्या धुळीचा कणही. १२. जगत्+त्रय (स्वर्ग,

प्रसादचतुरा! कैसा तरि करा बैरा हा जन. ॥ ६३

**मृत्यु, पाताल असे तीन लोक) त्याची म्हणजे जगत्रयांनीं कर्तव्य जी नमस्क्रिया (नमस्कार) ती जगत्रयनमस्क्रिया, त्याला भाजन–पात्र. तीन लोकः–'द्यू', 'अंतरिक्ष' व 'पृथ्वी'** असे तीन लोक वेदांत सांगितले आहेत. जेथें सूर्यचंद्रादि प्रकाशगोल आहेत तो **'द्यू'** लोक सर्वांत उंच आहे. जेथें वातावरणांत मेघ असतात तो अंतरिक्ष लोक त्याच्या खालीं असून सर्वांत खालीं आपली पृथ्वी आहे. या तीन लोकांनाच 'स्वः' 'भुवः' व 'भूः' असें अनुक्रमानें म्हणतात. पूर्वी अंतरिक्ष हें जलमय आहे असें समजत. पाताळ लोकाचा उल्लेख वेदांत मुळींच नाहीं. 'भूः' 'भुवः,' व 'स्वः' याशिवाय 'द्यू'लोकावर 'महः', 'जनः' व 'तपः असे तीन लोक असून त्यांच्या पेक्षांही वरचा 'सत्यं' म्हणून सातवा लोक मानतात. **तृतीयचरणार्थः–भगवंताच्या पायाची गोष्ट घटकाभर राहूं द्या. त्याच्या पायाच्या धूलिकणासही जगत्रयानें नमस्कार करावा अशी त्याची योग्यता आहे. धूलिकणाची जर ही योग्यता, तर पदकमलाची जास्ती व करकमलाची त्याहूनही जास्ती. म्हणून तुमच्या पायाचा एखादा धूलिकण जरी माझ्या मस्तकावर ठेवाल तरी मी कृतार्थ होईन.**

१. **प्रसाद करण्याविषयीं चतुर जे तुम्ही त्या! अनुग्रहकुशला! खुबीदार शब्दयोजनाः**–येथें 'प्रसादचतुरा!' हें संबोधनपद फार खुबीदार आहे. प्रथम माझ्या मस्तकावर कर ठेवा अशी प्रार्थना केली, नंतर इतक्या मानास आपण पात्र नाहीं असें समजून पदाप्रति प्रणाम करतों असें म्हटलें. पण हे दोन्ही उपाय देवाला आवडत नसतील अशी आशंका धरून पंतांनीं 'प्रसादचतुरा' असें पद योजिलें. **चतुर्थ चरणाचा अर्थः–देवा! तूं चतुर आहेस, तूं हवी ती तोड शोधून काढ आणि मला पावन कर. जो चतुर आहे तो कोणत्या ना कोणत्या तरी उपायांनीं स्वभक्तांचे मनोरथ पूर्ण करीलच–असें तात्पर्य.** २. **कोणत्या तरी प्रकारानें (=कसा तरी). देवा! तुम्ही प्रसाद करण्याविषयीं चतुर आहां, तुम्हाला मीं मंदानें सुचवावें असें कांहीं नाहीं, म्हणून तुम्ही कोणत्या तरी प्रकारानें (तुमच्या मनास योग्य दिसेल त्या वरीलपैकीं किंवा दुसरा एखादा योग्य दिसेल त्या उपायानें) माझें कल्याण करा हा कवीचा हृद्गतार्थ.** 'पांडुरंगस्तोत्रां'तील पुढील श्लोक या केकेसंबंधानें वाचनीय समजून येथें दिला आहेः-'प्रऱ्हादध्रुवनारदर्षिशुकभीष्मव्यासदाल्भ्यादि जे । ते ज्ञानी सुकृती तयांसि दिधलें तें तों न मातें दिजे ॥ वेश्याजामिळपूतनाघदनुजव्याधादिकां जें दिलें । तें द्यावें फल त्याहुनी बहुत मीं दुष्कर्म संपादिलें' ॥ १२ ॥ ३. **कृतार्थ, गतपाप.** पंतांनीं भगवंताच्या पदाब्जरजाचें दुसऱ्याही केकेंत वर्णन केलें आहे. भगवंताच्या रजाचें माहात्म्य भागवतांत पुढील प्रकारें सुंदर वर्णिलें आहेः–यत्पादपांसुर्बहुजन्मकृच्छ्रतो धृतात्मभिर्योगिभिरप्यगम्यः. [दशमस्कंध.] तसेंच शंकराचार्यांनीं **'सौंदर्यलहरीं'**त भगवतीच्या चरणकमलाचें माहात्म्य पुढीलप्रमाणें केलें आहेः–तनीयांसं पांसुं तव चरणपंकेरुहभवं, विरिंचिः संचिन्वन् विरचयति लोकानविकलम् । वहत्येनं शौरिः कथमपि सहस्रेण शिरसा, हरः संक्षुभ्यैनं भजति भसितोद्धूलनविधिम्' ॥ २ ॥' येथें **'सारालंकारमिश्रित प्रौढोक्ति अलंकार जाणावा.'** [य० पां०–पृ० २३८.]

तुम्हीं[1] करुनि दाविला[2] ध्रुव कृतार्थ[3] जैसा दरें[4],
तसेंचि जरि योजिलें तुमचिया मनें सादरें, ।
असो[5]; विहित[6] तें करा; परि[7] बरोबरी[8] त्यासवें[9]
नसे उचित; तो महाप्रबळ[10], वंदिजे वासवें[11]. ॥ ६४

१. अन्वयः-तुह्मीं दरें जैसा ध्रुव कृतार्थ करुनि दाविला, तसेंचि तुमचिया सादरें मनें जरि योजिलें [तरी] असो; विहित तें करा, परि त्यासवें बरोबरी उचित नसे, तो (ध्रुव) महाप्रबळ, वासवें वंदिजे. प्रास्ताविकः-मला कृतार्थ करावयाला मीं आपणाला तीन चार उपाय सुचविले तरी आपल्या मनांतून मला ध्रुवाप्रमाणेंच कृतार्थ करणें असेल तर एक वेळ तुह्मास पुनः सांगतों कीं तसें करण्यास आपण मुखत्यार आहांत पण तितकी माझी योग्यता नाहीं, अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करितात. २. दाखविला. 'दाखविणें' ह्या अर्थी 'दावणें' हा शब्द कुळंबी वगैरे खालच्या प्रतीच्या लोकांतून हल्ली योजलेला आढळतो. ३. कृतकार्य. देवांनीं ध्रुवाला भगवत्स्तुती करण्याचें सामर्थ्य देऊन अढळ पदीं नेऊन बसविलें. ४. दयायुक्त, आदरयुक्त. प्रीतियुक्त. प्रथमार्धाचा अर्थः-तुम्हीं ध्रुवाच्या गालाला शंख लावून त्याला जसें स्वस्तुति करण्याचें सामर्थ्य दिलें व त्याला संसृतिबंधांतून मुक्त करून अविनाश पद दिलें, तशा प्रकारची मजवर कृपा करावी म्हणून जर आपण दयायुक्त अंतःकरणानें योजना केली असेल तर असो. ५. तसें होवो. मजवर आपण कृपा करा. ६. योग्य. तृतीयचरणार्थः-तुम्हांला जें योग्य दिसेल, ज्यांत माझें हित आहे असें आपणांस वाटत असेल ती गोष्ट आपण खुशाल करा. ७. परंतु. ८. हा फारशी शब्द आहे. 'सुरतरु करिल बरोबरि न प्रभुपदरेणूपर कारासी'। (हरिवंश अ० १५ गी० १५.) ९. त्याबरोबर, त्याशीं. परंतु ध्रुवाच्या योग्यतेशीं माझी तुलना करणें कदापि योग्य होणार नाहीं. ध्रुवाची परमेश्वराच्या ठिकाणीं असलेली अनुपमेय भक्ति व त्याचा अधिकार हीं फार मोठीं; तेव्हां त्याच्या वैराग्यादि सामर्थ्याशीं माझ्या अल्प सामर्थ्याची तुलना करणें अत्यंत अनुचित होईल. म्हणून आपण मजवर ध्रुवाप्रमाणें अनुग्रह करावा इतकी माझी योग्यता नाहीं. आम्हां दोघांत जमीनअस्मानाचें, मेरुमोहरीएवढ्या प्रमाणाचें अंतर आहे. १०. अतिशय शक्तिमान्. भक्तिज्ञानवैराग्यादि शक्तींनीं परिपूर्ण. ११. इंद्रानें. व्यु०:- वसूनि (द्रव्याणि) संति अस्य स वासवः=ज्याचें भांडार विपुल आहे तो वासव. चतुर्थचरणार्थः-देवा! ध्रुव षड्गुणैश्वर्यसंपन्न व भक्तिज्ञानवैराग्यादि शक्तींनीं परिपूर्ण असा असल्यामुळें सर्वशक्तिमान् इंद्र देखील त्याला पूज्य मानून वंदन करितो. प्रत्यक्ष देवेंद्रानें वंदन करावें एवढा मोठा ज्याचा अधिकार त्याच्याशीं बरोबरी करणें देवा! मला कसें बरें शोभेल? विचारसादृश्यः-ह्या संबंधानें तुलना करण्याजोगा तुकारामाचा एक अभंग आहे. तो हाः-नाहीं साजत हा मोठा । मज अळंकार खोटा ॥१॥ असें तुमचा रजरेण । संतापायींची वाहाण ॥ २ ॥ नाहीं स्वरूपीं ओळखी । भक्तिभाव करीं देखीं ॥ ३ ॥ नाहीं शून्याकारीं । क्षर

## किती वय? कसें तप प्रखर? काय विश्वास तो?

ओळखी अक्षरीं ॥ ४ ॥ नाहीं विवेक या ठायीं । आत्मा अनात्मा तें कांहीं ॥ ५ ॥ कांहीं नव्हे तुका । पायां पडेन हें ऐका ॥ ६ ॥ **केकासौंदर्यः**–मी अल्पशक्ति असूनही जर तुम्ही मला ध्रुवाप्रमाणें जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडवून अक्षय शांतिपद देत असलां तर अशी ह्या दीनावर महत्कृपा करण्यास आपण मुखत्यार आहां असा येथें कवीच्या त्दयांतील आशय दिसतो. **ध्रुवाविषयीं चार शब्दः**–वेद, ब्राह्मण व पुराणग्रंथ यांतील पुष्कळ प्राचीन कथांची उत्पत्ति आकाशांतील चमत्कारापासून आहे. (१) ऐतरेय ब्राह्मण, तैत्तिरीय ब्राह्मण व महाभारत यांत सांगितलेली 'मृगाच्या पाठीस लागून त्याच्या पोटांत त्रिकांड बाण मारणाऱ्या रुद्रव्याधाची कथा,' (२) 'दक्षकन्या स्वाहा हिनें साहा वेळां सहा ऋषिपत्न्यांचीं रूपें धरून अग्नीशीं समागम केला व वीर्य सप्तर्षींच्या सुवर्णकुंडांत टाकिलें. त्यापासून कार्तिकस्वामी झाला. पुढें त्या ऋषिपत्न्या नक्षत्रमंडळांत सहा कृत्तिका होऊन राहिल्या.' ही महाभारतांतील कथा, (३) वाल्मीकिरामायणांत सांगितलेली 'खालीं तोंड करून आकाशांत लोंबकळणाऱ्या त्रिशंकुराजाची गोष्ट,' (४) तैत्तिरीय संहितेंतील 'प्रजापतीनें चंद्रास आपल्या ३३ कन्या (२७ नक्षत्रें व ६ कृत्तिका) दिल्या. त्यांतील रोहिणीवर मात्र त्याची अत्यंत प्रीति होती. म्हणून चंद्रास क्षयरोग झाला' असें वर्णन, (५) 'गुरुपत्नी तारा हिचें हरण चंद्रानें केलें आणि तिला त्यापासून बुध पुत्र झाला' हें पौराणिक कथानक, (६) 'मंगळ हा पृथ्वीचा व शनि हा सूर्याचा पुत्र ही समजूत,' इत्यादि कथांचा उगम आकाशांतील ज्योतींचे आकार, त्यांची स्थिति व गति यांपासूनच आहे. वरील कथांप्रमाणें ध्रुवाख्यानाच्या मुळाशीं देखील ज्योतिषशास्त्रांतील 'सर्व तारांच्या मध्यें खुंटासारखा असणारा सर्वांचा नायक' जो ध्रुव तारा तोच आहे. 'ध्रुवाला भगवंतांनीं अढळपद देऊन नक्षत्रें व ग्रह तुला प्रदक्षिणा करितील असा आशीर्वाद दिला. म्हणूनच ध्रुवाला सप्तर्षि प्रदक्षिणा करितात. त्याच्या पत्नीचें नांव भ्रमी. तिजपासून त्याला कल्प व वत्सर असे दोन पुत्र झाले.' हें पौराणिक वर्णन ध्रुवताऱ्याच्या वर्णनाशीं चांगलें जुळतें. तसेंच 'परमेश्वरांनीं देवाला मेरूच्या शिखरावर अढळ पद दिलें व त्याच्या भोंवतीं पुष्कळ प्रकाशगोल फिरतात' एवढें वर्णन योगशास्त्रांतही योजिलेलें आढळतें. योगीजन कपाळाचे मध्यभागीं जेथें गंधाचा टिळा लावलेला असतो त्या जागेच्या आंत मेरूचें (पाठीच्या कण्याचें) शिखर आहे असें मानून तेथें कल्पावयाचा नीलवर्ण वायुरूप बिंदु हाच ध्रुव असें मानतात.

**१. अन्वयः–किती वय? तप प्रखर कसें? तो विश्वास काय? ध्रुव ध्रुव खरा, तो (ध्रुव) विश्वास स्तवा उचित होय. तुम्ही प्रकट मेरूशीं मोहरी कशी तुळितसां? हो! हरी! [तुम्ही] प्रसाद करितां अधिक उणें नाठवा. प्रास्ताविकः–यांत कवि ध्रुवाच्या योग्यतेचें वर्णन करून त्या मानानें आपण त्याच्यासारख्या कृपेस पात्र नाहीं असें सुचवितात. व्या०ः**–किती, कसें हे शब्द जवळ जवळ आले आहेत म्हणून ते ध्रुवाच्या व कवीच्या योग्यतेंत असलेलें महदंतर (मोठें–जमीनअस्मानाचें अंतर) सुचवितात. **'द्वौ कशब्दौ महदंतरं सूचयतः'** किंवा **'द्वौ कशब्दौ प्रयुज्येते अत्यंतासंभवे सदा [रघुवंश–सर्ग १ श्लो० २**

ध्रुव ध्रुव खरा; स्तवा उचित होय विश्वास तो; ।

टीका ] **ध्रुवाचें सामर्थ्य काय सांगावें? त्याचें वय पाहिलें तर केवळ पांच वर्षांचें. २. तीव्र; वय अल्प होतें पण त्याची तपश्चर्या किती तीव्र होती! ३. गुरुनारद याच्या वचनावर किंवा परमेश्वराच्या ठिकाणीं केवढा दृढविश्वास! क०सं०:**-ध्रुव अरण्यांत भगवदाराधना करण्यास गेला तेव्हां त्याला तेथें नारदमुनींनीं त्याच्या कानांत एक गुरुमंत्र सांगितला व याचा जप कर म्हणजे कांहीं कालानंतर तुला परमेश्वराचें दर्शन होईल असें सांगितलें. या गुरुनारदाच्या बोलण्यावर ध्रुवानें पूर्ण विश्वास ठेवून मंत्रजप केला व भगवद्दर्शन करून घेऊन सायुज्यता मुक्ति मिळविली. **प्रथमचरणाचा अर्थः**-ध्रुव जरी वयानें लहान होता तरी त्याच्या वयाच्या मानानें त्याची तपश्चर्या फार कडकडीत होती व त्याचा गुरुवचनावर एकनिष्ठ विश्वास होता.

१. **ध्रुव हा भक्त.** २. निश्चयी. ध्रुव खरोखरीच ध्रुव (निश्चयी). येथें 'ध्रुव' **शब्दावर कवीनें श्लेष केला आहे.** ध्रुव म्हणजे शाश्वत किंवा नित्य कवि. म्हणतात:- **ध्रुव हा ध्रुव (शाश्वत, अचल, मनोवृत्तिचांचल्यरहित,** निश्चयवान्). **नांवास खरोखरीच योग्य होता. क०सं०:**-'देव कसा आहे, तो कोठें असतो,' असें [illegible] मातेला विचारून ध्रुव भगवत्प्राप्ति करून घेण्याकरितां [illegible] गेला. ही बातमी उत्तानपाद राजाला कळली तेव्हां तो घाबरला व '[illegible] ध्रुव गेला? [illegible] राज्य-ओझें' असें म्हणत तो त्याच्या पाठीमागें गेला. '[illegible] स्वाधीन करितो, तूं मागें फिर' असें त्यानें ध्रुवाला सांगितलें व [illegible] केला, पण ध्रुवाचा निश्चय फिरला नाहीं व तो वनांत गेला. तेथें उग्र तप करून त्यानें भगवत्कृपा संपादन केली. म्हणून ध्रुवाला 'येथें खरा' म्हणजे निश्चयाची केवळ मूर्तिच असें म्हटलें आहे. **ध्रुव हा ध्रुव खरा, या वाक्यांत निरुक्ति नामक अलंकार** झाला आहे. ध्रुव हा ध्रुव म्हणजे शाश्वत, अढळ, स्थिर, **खरा असा अर्थ विवक्षित** आहे, म्हणून तेथें निरुक्ति अलंकार झाला आहे. **'योगवशें नामांचा कल्पिति** अन्यार्थ तरि निरुक्ति घडे । यापरिच्या चरितांहीं तूं दोषाकर असें गमे उघडें ' ॥ (अ. वि.) योगवशें=अवयवार्थानें. **'हेतुस्तव, नामाची अन्वर्थकता निरुक्ति ती होते। सीतारत्न निघालें पृथ्वींतुनि तरिच रत्नगर्भा ते'** ॥ (श्री. वि. प.) **नामाच्या अवयवार्थानें अन्यार्थाची कल्पना केली असल्यास किंवा कांहीं कारणास्तव नामाची अन्वर्थता दाखविली असली म्हणजे निरुक्ति होते.** 'त्याच गुणांनीं तूं **दोषाकर** आहेस असें वाटतें'-या उदाहरणांत दोषाकर (दोषांची खाण; पक्षीं, रात्रीं प्रकाशमान होणारा चंद्र) शब्दाच्या अर्थाची अन्य कल्पना केली आहे. याचें सलक्षण उदाहरण:- **अथ निरुक्तिः**- हेतुना येन केनापि योगेनान्वर्थता यदि । नाम्नां चेत्कल्प्यते यत्र **निरुक्तिस्तत्र कीर्तिता.** ॥ यद्गर्भात्कन्यकारत्नं लेभे जनकभूपतिः । तस्मादस्या भुवो नाम रत्नगर्भेति **सार्थकम्** ॥ १९९ ॥ [ मंदारमरंदचंपू-पृ० १४९. ] ३. **स्तवनास, स्तुतीस.** ४. **जगास. सर्वविश्वानें ध्रुवस्तवन करावें अशी जी ध्रुवाची योग्यता तिला तो पात्र (योग्य) आहे. द्वितीयचरणाचा अर्थः-पांच वर्षांचा बालक असून सद्गुरु नारद**

कशी तुळितसां तुझी प्रकट मेरुशीं मोहरी?

यांच्या वचनावर किंवा भगवंताच्या ठायीं त्याची केवढी दृढ निष्ठा, आणि केवढें उग्र त्याचें तप, म्हणून सारें विश्व जी ध्रुवाची स्तुति करितें त्याला तो अत्यंत पात्र आहे. व्या०:- पहिल्या चरणांतील 'तो'चा संबंध विश्वासाकडे आणि दुसऱ्या चरणांतील 'तो'चा संबंध ध्रुवाकडे.

१. तुलना करितां, तोलतां. ध्रुवाची आणि आपली तुलना (घटना) अत्यंत अयोग्य आहे- ध्रुवाशीं आपलें सादृश्य बिलकुल नाहीं असें दर्शविलें आहे म्हणून हा विषम अलंकार होय. (अथ विषमम्—घटनानर्हयोर्यत्र घटना विषमं मतम् । क्वेयं कनकवर्णाङ्गी सुन्दरी कामिनीमणिः । क्व पतिस्तादृशो वक्रः कीदृशी घटना विधेः? ॥१२१॥ इष्टार्थोद्यमनाद्यत्र नेष्टानाप्तिश्च केवलम् । अनिष्टस्याप्यवाप्तिश्चेदपरं विषमं मतम् ॥ पाञ्चाली-सङ्गमोदकाङ्क्षया रङ्गमन्दिरम् । प्रविष्टः कीचकस्तत्र सद्यो मर्दनमन्वभूत् ॥ १२३ ॥ [मंदार-मरंदचंपू-पृ० १३२.] 'तें विषम वर्णिती बुध जेथें संबंध अननुरूपांचा । कोठें ही मृदुलांगी कोठें तो प्रखर ताप मदनाचा ॥ कार्य विरूप घडे जरि तरि दुसरें विषम तज्ज्ञ म्हणतात । श्यामा ही तरवारी प्रसवे अति शुभ्र कीर्ति जगतांत ॥ २ ॥ इष्टार्थव्यापारें घडे अनिष्टहि तिजें विषम होय । भक्ष्यार्थ सर्पपेटीकें मूषक शिरतां तयाचि अहि खाय' ॥ ३. (अ. वि.) हा अलंकार समाच्या उलट आहे. पहिल्या व दुसऱ्या 'सम' अलंकाराच्या प्रकारांविरुद्ध विषमाचे अनुक्रमें पहिला व दुसरा हे प्रकार आहेत. 'जेथें परस्परांशीं अननुरूप म्हणजे अयोग्य अशा गोष्टींचा संबंध वर्णिला असतो, कारणाच्या गुणाचे क्रमाविरुद्ध कार्याची उत्पत्ति वर्णिली असते, किंवा इष्टार्थास उद्देशून कांहीं कृत्य करणारास त्यापासून इष्ट अर्थाची प्राप्ति न होतां उलट अनिष्ट अर्थ प्राप्त होतो असें वर्णन असतें तेथें विषम अलंकार होतो.' विषमालंकाराचा दुसरा प्रकार विभावनेच्या पांचव्या प्रकाराशीं फार सदृश दिसतो. परंतु 'कार्य व कारण यांजमध्यें एक निवार्य आणि दुसरें निवारक असा विरोध असल्यास पांचवी विभावना; आणि तसें नसून केवळ कार्यकारणांत गुणवैषम्य असल्यास विषम होतो' असा दोहोंत भेद आहे. विषमालंकाराचीं उदाहरणें:- (१) 'क्लीब म्हणुनि पाठविलें मन माराया प्रियेस हाकेला । तों तें तेथेंचि रते पाणिनिनें सत्य घात हा केला' ॥ (अ. वि.) (२) 'मदनशत्रुशरासन हें महा । मदनमूर्तिच केवळ राम हा ॥ करिल सज्ज कसा धनु आपण । अहह!! दारुण! तात तुझा पण' ॥ (वामनपंडित), (३) 'देवी म्हणे सखि! धरणि! कांत पडुनि धूळिउपरि मळला गे; । त्या देवा लागावे रज, नवनव ज्यासि सुपरिमळ लागे' ॥ (मोरोपंत—हरिश्चंद्राख्यान), (४) 'ज्यावरि करीत होत्या बहुतचि दाया दया, सदा सत्व । जीचें साध्वी शतमत, तीचा दायाद यासि दासत्व ॥ रविनें न निरखिली जे स्पर्शेलि वातें विशंक न व्यजनें । अवलोकिली पुरीं ती ओढुनि नेतां असंख्य नव्यजनें' ॥ (हरिश्चंद्राख्यान), (५) 'चित्तीं म्हणे नृप—अहा चवरी ती झाडणीच कीं केली। मोळविक्यानें काष्टें फोडाया असिलता वनीं नेली' (आदिपर्व), (६) 'ती मृदुलप्रकृति कैसी दुःसहशोकज्वरासि साहेल? । राहेल साधु

[1]प्रसाद करितां उणें अधिक [2]नाठवा, [3]हो! हरी! ॥ ६९

---

कैशी? कोणाच्या आननासि पाहेल' ॥ (ऐषिकपर्व). दुर्योधन गदायुद्धांत भग्नोरु होऊन भूमिवर पडला तेव्हां अश्वत्थामा शोक करितो—(७) 'त्याम कृपाद जपति, होते बहु जपत त्या सदा ज्ञाती । गेली कोठें गा ती शक्राचीशी तुझी मदाशक्ती ॥ त्यागावी कस्तूरी, पुष्कळ त्या धूळि लागली अंगा' ॥ (गदापर्व), (८) मृत झाणे काय पुरुषसि? ज्याते न कधींहि पादतळ मळलें । तें राजरत्न तैसें जैसें धूळीत याद नळमळलें । ज्याच्या आंगीं असुन छिपवत नि समर्थ लोकेश । जो परशतनियमनपटु, नियमी कष्टें करूनि तो केश ॥ (गदापर्व) २. उघड उघड; धडधडीत. ३. मेरुपर्वताशीं. 'सप्त महाद्वीपें, सप्त महासमुद्र, मानसोत्तर आणि लोकालोक पर्वत, इत्यादि ज्याच्या सभोंवतीं वर्तुळाकार स्थितीनें स्थित आहेत, असा सर्वांचा पर्वत. याची उंची ८४००० योजनें असून हा सर्वकाळ सर्व द्वीपाधिकांच्या उत्तरेस आहे. याच्या मस्तकावर ध्रुवमंडळ असून सूर्यचंद्रादिक मंडलें याच्या सभोंवतीं पृथिवीच्या वर वर्तुळाकार गतीनें फिरतात. मेरु हा पृथिवीचा केंद्र आहे.' (भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश.) **४. मोहरीचा दाणा. ध्रुवाची योग्यता एवढी मोठी असून त्यावर जसा तुम्हीं प्रसाद केला तसाच मजवर करणार असाल तर तुम्ही राईचा पर्वत करणार किंवा मोहरीच्या दाण्याची मेरूशीं बरोबरी करणार असें दिसतें. सर्व पृथ्वीचें मापन करण्याच्या योग्यतेचा जो मेरुपर्वत त्याच्या बरोबर तुम्ही धडधडीत मोहरीचा दाणा कसा बरें तोलतां? कोठें मेरु आणि कोठें मोहरी, कांहीं तरी सादृश्य? कांहींच नाहीं. केकामाधुर्य:**—येथें राईचा पर्वत करणें किंवा सूक्ष्म पदार्थाचा स्थूल पदार्थ निमिषार्धांत करणें हें भगवंताचें सामर्थ्य आहे. त्याला वाटलें तर तसें करण्याची 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं' शक्ति त्याच्यांत आहे असें कवीनें ध्वनित केलें आहे. **व्या०:**—राई आणि गिरि किंवा मोहरी आणि मेरु अशा शब्दांचा प्रयोग अतिशय लघुत्व आणि अतिशय गुरुत्व दाखविण्यासाठीं करण्याचा प्रचार संस्कृतांत आणि मराठींतच आहे असें नाहीं, तर इंग्रजी भाषेंतही आहे. राईचा पर्वत करणें=To make a mountain of a molehill. 'तिलं ताल पश्यति,' 'परमाणून् पर्वतीकरोति' असे प्रयोग आढळतात, हें आमच्या अनेकभाषाभिज्ञ वाचकांस सांगणें नकोच. **कवीची नम्रता:**—या केकेंत कवीनें आपणास मोहरी म्हणून आपली नम्रता उत्तम रीतीनें दाखविली आहे.

**१. अनुग्रह. चतुर्थचरणार्थ:— भक्तांवर अनुग्रह करितांना तुम्ही उणेपणा, अधिकपणा लक्षांत आणित नाहीं, तर ज्यावर अनुग्रह करितां, त्याची योग्यता वगैरे कांहींएक न पाहतां त्यावर योग्यतेपेक्षां पुष्कळ अधिक अशी कृपा करितां. भक्तांवर अनुग्रह करितांना तुम्ही पात्रापात्रविचार करीत नाहीं. सर्वांवर सारखा प्रसाद करितां. २. आठवीत नाहीं. पात्रापात्रविचार व ख्रिस्तीधर्म:**—ईश्वर कृपा करितांना पात्रापात्रविचार करीत नाहीं हें तत्व ख्रिस्तीधर्मासही संमत आहेसें दिसतें. म्याथ्युभक्तानें लिहिलेल्या ख्रिस्तलीलामृताच्या विसाव्या अध्यायांत 'द्राक्षमळ्याचा धनी व मळ्यांत काम करणारे मजूर' ह्या० दाखल्यांतही हेंच प्रमेय ख्रिस्तानें आपल्या शिष्याच्या

प्रभुत्व तरि हेंच कीं करुनि दे कृपा दान तें,
स्वसाम्य यदुपार्जनें मिरविजे स्वपादानतें, ।

मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला आहे. ३. **अहो! या चतुर्थ चरणांत तुल्ययोगिता नामक अलंकार झाला आहे.** याचें लक्षण व स्पष्टीकरण केका ५८ पृ० १५६ यांत केलें आहे. **तुल्ययोगितेचीं** आणखीं **उदाहरणें**:- ( १ ) विटली न वामनातें श्री, अन्याही सती न दीनातें । [ मुकतां सिंधु, मराशीं लावील कसें महानदी नातें ॥ ] ( वनपर्व अ० ४ गी० २२१ ), ( २ ) स्वपतिगळां पहिली श्री जों, साध्वी स्त्रीहि तों बळेंचि पडे; । [ ते सती न सोडे व्यर्थ विना प्रेम वोंवळें चिपडे ॥ ] ( वनपर्व अ० ४ गी० २९८ ), (३) [ भस्म कराया घेउनि गेला तो दैवहतक लंकेला । ] रक्षा स्वकीर्तिला रविकुळदीपा त्याहि गतकलंकेला (वनपर्व अ० ११ गी० १२८), (४) [ निजबंधुवधक्षोभें वीर नृपति सात्यकीसवें भांडे ।] त्याच्या नेत्रांतुनि जळ पळ पळ रक्तौघ तनुंतुनी मांडे ॥ ( कर्णपर्व अ० ९ गी० १० ).

१. **अन्वयः– प्रभुत्व तरि हेंच कीं कृपा करुनि तें दान दे, यदुपार्जनें स्वपादानतें स्वसाम्य मिरविजे, जरि [ प्रसाद ] लाघवा निवारिना मग तो प्रसाद काय? अहो! राघवा! दशमुखानुजा कसें विसरलां? प्रास्ताविकः–मागल्या केकेंत भक्तजनांवर अनुग्रह करितांना प्रभु अधिक उणें पाहत नाहीं असा जो कवीनें आपला अभिप्राय दर्शविला, त्याचेंच यांत ते समर्थन करितात. प्रथमार्धाचा अन्वयार्थः–** प्रभुत्व ( स्वामित्व ) तरि हेंच ( ह्यालाच ह्मणावें ) कीं कृपा करूनि तें दान दे ( भक्तांवर दया करून तें प्रभुत्व असें देणें देतें कीं ) यदुपार्जनें ( ज्या दानाच्या प्राप्तीनें ) स्वपादानतें ( =आपल्या पायांच्या ठिकाणीं पूर्णत्वानें नम्र झालेल्यानें–शरणागत भक्तानें ) स्वसाम्य ( आपली बरोबरी ) मिरविजे ( मिरवावी ). **प्रभु त्यालाच म्हणावें कीं जो आपणास शरण आलेल्या दीन भक्ताला असें दान देतो कीं त्याच्या योगानें तो दीन भक्त लोकांत प्रभूची योग्यता किंवा बरोबरी पावतो; आपल्या आश्रितजनांला स्वतःच्या योग्यतेस चढविणाऱ्यासच प्रभु हें नांव शोभतें. इतर केवळ नांवाचेच प्रभु. कविहृद्गतार्थ व केकासौंदर्यः–** देवा! तुम्ही मात्र आपल्यास अनन्यभावानें शरण येणाऱ्या भक्तजनांवर कृपा करून त्यांना आपल्या अगदीं बरोबरीचे करून सोडतां ह्मणून प्रभु ही पदवी तुम्हांलाच शोभते–असा कवीचा हृद्गतार्थ. येथें आमच्या मार्मिक वाचकांस कृष्णदर्शनास येणाऱ्या भक्त सुदाम्यावर अनुग्रह करून देवानें त्याला आपल्या बरोबरीची संपत्ति देऊन त्याला आपल्या बरोबरीचें करून सोडलें या श्रीकृष्णलीलामृतांतील कथातरंगाची अवश्य आठवण होईल. तसेंच प्रभूचे एकनिष्ठ भक्त मरणोत्तर सायुज्यमुक्ति पावून प्रभुस्वरूपांत मिसळून जातात, हीही गोष्ट ह्यासंबंधीं ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. २. **दया, अनुग्रह.** ३. **स्व (आपलें)+साम्य (बरोबरी)=आपली बरोबरी. ४. यत्+उपार्जनें. ज्याच्या+लाभानें. ५. मिरविलें जातें=भूषण म्हणून धारण केलें जातें.** ६. **स्व+ पाद+आनतें=आपल्या पायीं नम्र होणाऱ्यानें, शरणागत भक्तानें.**

प्रसाद मग काय तो? जरि निवारिना लाघवा[1]?
कसें देशमुखानुजा[2] विसरलां? अहो! राघवा[3]! ॥ ६६

---

१. लघुपणाला, कमीपणाला. तृतीयचरणार्थः–जो शरणागताचा कमीपणा दूर करून त्याची योग्यता वाढवीत नाहीं तो कशाचा प्रसाद? म्हणजे त्याला प्रसाद म्हणणें योग्य होणार नाहीं. सुंदर व समर्पक व्याख्याः–ह्या केकेंत पंतांनीं प्रभुत्व व प्रसाद ह्यांच्या ज्या व्याख्या दिल्या आहेत त्या किती तरी सुंदर आहेत? अशा प्रकारच्या समर्पक व्याख्या पंतांच्या काव्यांत बऱ्याच ठिकाणीं आढळतात व त्यामुळें त्यांचें रमणीयत्व आणि आकर्षकत्व हीं फारच वाढलीं आहेत. पुढील थोडींत उदाहरणें पहाः–(१) धर्मन्यायोचित जें तेंचि सुभाषण मनासि उद्भव दे। [विराट०–४ गी० ५३], (२) बापा! प्रजा अशी जी पितरांसि भवार्णवांत सुतरी ती [आदि०–अ० २३ गी० ११], (३) शोकीं पडल्या चित्ता दे बोधकरासि तो सखा लोकीं [कृष्णविजय–उत्तरार्ध–अ० ८२ गी० २६], (४) ती दया त्वदर्थी गोधी कोपाचा नित्य जी [रामायण], (५) उदारपण तें भलें सुखवि जें सुपात्रा सदा [केका ६९]. २. रावणाच्या धाकट्या बंधूला (बिभीषणाला). ऐतिहासिकः–ब्रह्ममानसपुत्र पुलस्त्य ऋषीला विश्रवा नामक पुत्र होता. त्याला देववर्णिनी व कैकसी अशा दोन स्त्रिया होत्या. पहिलीपासून त्याला वैश्रवण (कुबेर) झाला व दुसरीपासून रावण, कुंभकर्ण, शूर्पणखा व बिभीषण अशा चार अपत्यें अनुक्रमें झालीं. रावणाला जन्मतःच दहा शिरें होतीं. चार भावंडांमध्यें बिभीषण तेवढा सत्वगुणी होता. रावणानें सीताहरण केलें तें याला न आवडून यानें त्याला पुष्कळ बोध केला. तो रावणास न आवडून त्यानें याची पुष्कळ निर्भर्त्सना केली. तेव्हां हा चार प्रधानांस बरोबर घेऊन रामास शरण गेला. रामानें याचें अंतःकरण ओळखून त्यास आश्रय दिला व रावणास मारून लंकाराज्याचा तुला अभिषेक करीन असें अभिवचनही दिलें. पुढें रावणवधानंतर रामानें लक्ष्मणाकडून याला लंकाराज्याभिषेक करविला. रामाची याजवर इतकी कृपा होती कीं तो त्याला आपल्या बंधूप्रमाणें समजत. आपल्या शरणागताचें दैन्य दूर करून त्याला प्रभूनें आपल्या योग्यतेस चढविलें याचें उदाहरण चवथ्या चरणांत दिलें आहे. ३. रघुकुलोत्पन्ना रामचंद्रा! ऐतिहासिकः–'रघु हा इक्ष्वाकुकुलोत्पन्न ऐलविल दिलीपाचा पौत्र व दीर्घबाहु राजाचा पुत्र. हा सूर्यवंशांत इतका प्रख्यात होऊन गेला कीं, सूर्यवंश हें नांव बरेंच मागें पडून रघुवंश असें नांव चालू झालें. यास अजनांवाचा एक पुत्र होता' (भारत. प्रा. ऐ. कोश). कविकुलगुरु कालिदास ह्यानें आपल्या प्रसिद्ध रघुवंशकाव्यांत रघु हा दिलीपराजास सुदक्षिणा भार्येपासून नंदिनीनामक वशिष्ठधेनूच्या प्रसादानें झालेला पुत्र होय असें वर्णिलें आहे. रघूच्या वंशांत झालेले राजे ते राघव. परंतु हें नांव दाशरथिरामाविषयीं योजण्याची विशेष रूढी आहे. चतुर्थचरणार्थः–देवा! रामावतारीं आपल्यास बिभीषण शरण आला तेव्हां तो शत्रूचा बंधु, ही गोष्ट लक्षांत न घेतां आपण त्यावर प्रसाद करून त्याला आपला बंधु मानून त्याला आपल्या योग्यतेस चढविलें ही गोष्ट आपण कशी विसरलां? बिभीषणावर प्रसाद करून जसें तुम्हीं त्याला आपल्या यो-

असो वरि कसा तरी, विमल भाव ज्याचा, करा

ग्यतेस चढविलें व 'प्रभुत्व' पदाचें सार्थक्य केलें, तद्वतच माझ्यावर अनुग्रह करण्याची आपली इच्छा असल्यास तसें करण्यास आपण समर्थ आहांत. अर्थसादृश्यः–, मोरोपंतकृत मुक्तामालेंतील पुढील श्लोक यासंबंधी वाचनीय आहे:–'जीवेत्याशीरुचिता दातुं नमतेऽविचार्य दत्ताश्रीः । न मनाक् पात्रविचारो नमनात्सर्वस्वदानमाश्चर्यम्' ९०. अर्थः–तुला अभय असो एवढा आशीर्वाद बिभीषणाला पुरे होता पण रामानें विचार न करितां त्याला लंकेचें राज्य दिलें. यांत पात्रापात्रविचार झाला नसून फक्त नमनावरून एवढें सर्वस्वदान रामानें केलें हें आश्चर्य. या केकेच्या प्रथम दोन चरणांत प्रभुत्वाची व्याख्या केली आहे. तिसऱ्या चरणांत प्रसादाचें लाघवनिवारकत्व निषेधरूपानें सांगितलें आहे. आणि चवथ्या चरणांत स्वसाम्य देणारा प्रसाद कोणावर केला याचें उदाहरण दिलें आहे म्हणून यांत अर्थांतरन्यास नामक अलंकार झाला आहे. तिसऱ्या चरणांत विनोक्ति नामक अलंकार आहे. 'विना संबंधिना येन केनचिद्वर्ण्यवस्तुनः । अरम्यता रम्यता वा विनोक्तिरिति कथ्यते ॥ नाङ्गभापि नानुरी सौदर्यं नव मानिनी। व्यर्थमेवेति जानीहि सरसं दयितं विना ॥ ९८ ॥ विनाकुरस्वरं काकः माकन्दं मकरंदिनम् । गाढरव गाढं गंतारः कोकिलं मन्वते जनाः' ॥ ९९ ॥ (मंदारमरंदचंपू). याचें लक्षण:–'प्रस्तुत कांहीं वांचुनि दूषित वदती विनोक्ति तरि तीच । विद्या हृदयंगमही विनयावांचूनि संतत रितीच ॥ १ ॥ तें जरि कोणावांचुनि रमणीय विनोक्ति तीहि तरि साची । पिशुनजनावांचुनियां राजेंद्रा शोभते सभा तुमची' ॥ २ ॥ एखाद्या गोष्टीवांचून प्रस्तुत रम्य किंवा हीन होतें असें जेथें वर्णिलें असतें तेथें विनोक्ति अलंकार होतो. विनोक्तींत बहुधा विनाशब्दाचा उपयोग केला असतो तरी क्वचित् त्यावांचूनही विनोक्ति होते. या केकेंत समान प्रकार आहे.

१. अन्वयः–वरि कसा तरी असो (पण) ज्याचा भाव विमल (आहे) तयावरि दया करा. (हे प्रभो) पचे असाचि वर चाकरा द्या, (कारण) जें दासा न जिरे (तें) बहुहि दिलें (तरी) वृथाचि गमतें. अधिकार पुसोनि (वर) द्या, ते (वर) सुकर (आणि) सदा साजिरे (होत). प्रास्ताविकः–ध्रुवाची व बिभीषणाची योग्यता माझ्या आंगांत नाहीं म्हणून देवा! माझ्या योग्यतेप्रमाणें मला वर द्या, त्यांतच माझें कल्याण आहे असें कवि सांगतात. २. निर्मळ. 'असो वरि...दया' याचा अर्थः–तुमचा भक्त वरून दिसण्यांत कसाही असला तरी त्याची भक्ति जर निर्मळ व अंतःकरणापासून आहे तर त्यावर तुम्ही दया करतां. देव भक्ताची परीक्षा बाह्योपकरणांवरून करीत नसून अंतरंगाच्या निर्मळ स्वरूपावरून करितो. ३. एकनिष्ठभक्ति. भक्ति व भावः–हरिकथेचें श्रवण किंवा कीर्तन करणें, भगवन्नामस्मरण करणें, देवदर्शन घेणें, देवपूजा करणें, इत्यादि प्रकारांपैकीं एक किंवा अधिक प्रकारांचें अवलंबन करणारा मनुष्य ईश्वराची भक्ति करितो असें होईल. परंतु ती भक्ति निर्मळ, निष्कपट, एकनिष्ठ व जिव्हाळ्याची असल्याशिवाय ती भावाच्या पायरीस पोंचणार नाहीं. संतमंडळींनीं भक्तिभावांत हा फरक पुष्कळ ठिकाणीं आपल्या ग्रंथांतून केलेला

तयावरि दया; पचे वर, असाचि द्या चाकरा. ।
वृथाचि गमतें दिलें, बहुहि, जें न दासा जिरे;
पुसोनि अधिकार द्या; सुकर ते सदा साजिरे. ॥ ६७

---

आढळतो. तथापि कांहीं ठिकाणीं त्यांनीं 'भक्ति' हा शब्द 'एकनिष्ठभक्ति' किंवा 'भाव' या अर्थींही योजिला आहे. 'भक्ति' ही दांभिक असूं शकेल पण 'भाव' हा निष्कपट व [illegible]चाच असला पाहिजे. ईश्वरप्राप्ति होण्यास भक्तिभाव या [illegible] पाहिजे. 'अघटितविधिनें घटित नेमिलें मानिचें मारया [illegible] स्वामीचें सुंदर पद यासंबंधी वाचनीय आहे. [illegible] चांडालब्राह्मण यांपैकीं कोणीही [illegible] सेवकाचा झाला ॥' हा तुकारामाचा अभंग सुप्रसिद्ध आहे. अ[illegible] भक्तांस स्वस्वरूपरहस्य सांगतांना तुम्ही हें [illegible] जास्त कां असेना)–सांगूं नका असें सांगितलें आहे. [illegible] कथितं तवानघ । मद्भक्तिहीनाय [illegible] मायण–बालकांड–सर्ग १ श्लो० [illegible] त्यांतील एक वाक्य वरच्या संस्कृत [illegible] is holy unto the dogs, neither cast ye your [illegible] trample them under their feet, and turn again [illegible] Mat. VII [illegible] यावरून ईश्वराची मनःपूर्वक भक्ति केल्याशिवाय [illegible] आमच्या ग्रंथांतून भक्तीचें माहात्म्य ज्ञानापेक्षां [illegible] तर मिळविलेलें सर्व ज्ञान व्यर्थ होतें. 'भक्तिविना [illegible] दानफलातें पावे कैसा स्तनगना–दानें ?' (मोरोपंत). [illegible] लक्ष्यपूर्वक परिशीलन करणारास सांगणें नकोच. [illegible] होणें नाहीं हाच सिद्धांत ठरविलेला आढळतो.

१. पचेल, भक्ताला त्यापासून फायदा होईल, बाधणार नाहीं. पचे ...चाकरा:–कवि म्हणतात तुम्ही आपल्या सेवकांस वर देणें तो पचे असा द्या. न पचेल असा देऊं नका. २. सेवकास, हा हिंदुस्थानी शब्द आहे. ३. व्यर्थच. ४. वाटतें. ५. जिरतें, पचतें. तृतीयचरणार्थः–परमेश्वर सुप्रसन्न झाला असतां त्यानें आपल्या सेवकास थोडेंच देणें द्यावें. जें देणें भक्तास जिरत नाहीं तें पुष्कळ जरि असलें तरि तें मला (कवीला) अनुपयोगीच वाटतें. ज्या देण्यापासून भक्ताचा फायदा न होतां उलट तोटाच होण्याचा संभव आहे असें मोठेंही देणें परमेश्वरानें भक्ताला देऊं नये. ज्या वराचा भक्ताला योग्य उपयोग करून घेतां येईल तोच वर देणें त्याला योग्य. ६. विचारून. ७. पात्रता, योग्यता. ज्या मनुष्याला वर द्यावयाचा तो देण्यापूर्वीं त्याची दानपात्रता पाहिली पाहिजे. भलत्याला भलताच वर देणें योग्य होणार नाहीं. तर

प्रसन्न बहु होतसां, परि कराल हो! बावरें
शिवापरि वरासवें हृदय, हें न हो बा! वरें; ।

ज्याला वर द्यावयाचा त्याची पात्रता किती आहे याचा अगोदर विचार केला पाहिजे. ८. करायास योग्य, सोईचे. [पात्रतेचा विचार करून दान दिलें असतां] ते (वर) सुकर (देण्याघेण्याच्या सोईचे) [व] सदा (नेहमीं, निरंतर) साजिरे (अनुभविण्याच्या सोईचे, हितकारक) [होतात]. पात्रापात्रविचार करून दिलेले वर देण्याघेण्याच्या सोईचे व दात्यास व याचकास हितावह असे होतात. माझ्या योग्यतेप्रमाणें मला वर द्या हें कवीचें भगवंताला सविनय मागणें. ९. सुंदर, हितकारक. दानाचा पात्रापात्रविचारः– 'योग्यं योग्याय दातव्यम्' या म्हणीप्रमाणें प्रत्येक मनुष्याची योग्यता पाहून त्याला दान दिलें असतां त्यापासून त्याचें हित होतें, योग्यतेपेक्षां मोठा वर दिला तर त्यापासून अनर्थ होण्याची भीति असते. कवीनें ह्या आपल्या विधानाचें समर्थन पुढल्याच केकेंत केलें आहे. पौराणिक इतिहासाचें बरवर अवलोकन करणाऱ्या वाचकांस मुद्दां ह्याच्या वरील म्हणण्याची सत्यता कळून येईल. रावण, कुंभकर्ण, बिभीषण, भस्मासुर, प्रल्हाद, बलि इत्यादिकांचीं उदाहरणें कव्युक्तिपोषक आहेत. (१) 'पात्रापात्रविचारोऽस्ति धेनुपन्नगयोरिव । तृणात्संजायते क्षीरं क्षीरात्संजायते विषं' (सुभाषित). गाईला गवत घातलें तर दुग्धोत्पत्ति होते व सपाला दूध घातलें तरी त्याचें विष होतें असा पात्रापात्रविचार करावा. (२) 'मन विवेका करिती पाहुनि अधिकार जी दया साजे, । ऐसे प्रसाद त्यांचे देती अन्योन्य न [illegible] ७० (सद्ग्रोदय–मोरोपंत.) (३) देती प्राकृतहि प्रभु द्रविण कीं दातृत्व [illegible] सर्वदा असें प्रभुवरा पशुनरीं म्यावरीं ॥ जें देणें शुचि, नित्य, दुर्लभ, सुखाधार, स्वयें वाढतें । मातें मोक्षरूपादि वित्त, न धन, स्वामी! दिलें वाढ तें ॥ (पृथुकोपाख्यान–[illegible] ७). व्यु०:– साजिरा (सुंदर). 'सज्ज' यावरून साज, साजणें, आणि त्यावरून 'साजिरा' म्हणजे शोभणारा, सुंदर अशी 'साजिरा'शब्दाची व्युत्पत्ति दिसते. या केकेच्या तृतीय चरणांत विनोक्ति अलंकार आहे. जें दासाला जिरत नाहीं तें व्यर्थ दिलें, म्हणजे पचण्याचा गुण असल्याशिवाय दान शोभत नाहीं असा भाव आहे म्हणून हा विनोक्ति अलंकार होय.

१. अन्वयः– [हे देवा!] [तुह्मी] बहु प्रसन्न होतसां, परि वरासवें शिवापरि हृदय बावरें कराल हो! हें [बावरें होणें] बा! [देवा!] वरें न हो (होवो); वृक असा कृतघ्न हें हरा कसें हो! न कळलें? तुम्हीं [देवा!] भवमहाहिचा मोहरा भला जगविला. प्रास्ताविकः–अधिकार पाहून वर द्या असें जें कवींनीं मागल्या केकेंत म्हटलें त्याचें कारण ते यांत सांगतात. प्रसन्न बहु होतसांः–[देवा!] तुम्ही एखाद्यावर प्रसन्न होऊं लागलां म्हणजे फारच होतां, मग मागेंपुढें कांहीं पाहात नाहीं. २. वेडें, भांबावल्यासारखें. ३. महादेवाप्रमाणें. शिवः–ब्रह्माविष्णुशिव ह्या त्रिमूर्तींपैकीं ब्रह्मा हा विश्वस्रष्टा, विष्णु विश्वपोषक व शिव हा विश्वसंहारक होय. शिव हें नांव ऋग्वेदांत आढळत नाहीं

असा वृक कृतघ्न हें न कळलें कसें हो! हरा?

---

पण त्यांत रुद्राचें वर्णन आहे. ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांची (उदाहरणार्थ सूक्त ४३, ११४) देवता रुद्र आहे व सूक्त ११४ मंत्र ७ (मा नो महान्तमुत) यांत रुद्रानें मारूं नये अशी प्रार्थना केली आहे. त्यावरून रुद्र अथवा शिव हा विश्वसंहर्ता होय, ह्या पौराणिक वर्णनांतील बीज अत्यंत प्राचीन अशा ऋग्वेदाच्या मंत्रांत आहे हें दिसून येईल. ब्रह्माविष्णूप्रमाणें शिवाचें (शिव–मंगल, अर्थात मंगलस्वरूपी परमेश्वर) सर्व पौराणिक वर्णनही अध्यात्मपर आहे. ४. **वर द्यावयास लागल्याबरोबर. वररूपी मद्यानें असा अर्थ कांहीं जण करितात. तोही चिंतनीय आहे. तसा अर्थ स्वीकारल्यास वरासवें हा शब्द श्लिष्ट मानावा. प्रथमार्धाचा अर्थ: देवा! तुह्मी भक्तांवर फार लवकर प्रसन्न होतां. त्याप्रमाणें मजवर प्रसन्न होऊन मला कदाचित शिवाप्रमाणें भलताच न झेंपेल असा वर द्यावयास लागाल. शिव भक्तांवर प्रसन्न होऊन त्यांना वर द्यावयास लागले म्हणजे ते किती देऊं काय देऊं असे त्यांस होऊन त्यांचें मन वेडें होऊन जातें त्याप्रमाणें देवा! आपलें मन वरामुळें बावरें होऊं देऊं नका.** शिवाप्रमाणें विष्णुहि भक्तांवर लवकर प्रसन्न होतो असें सांगून कवीनें शिवविष्णूमधील अभेदाचें दृढीकरण केलें. शिव आशुतोष आहे म्हणजे भक्तांवर सत्वर प्रसन्न होतो तसाच तो क्रुद्धहि लवकर होतो. याविषयीं भागवतांतील पुढील वचन पहा:—शापप्रसादयोरीशा ब्रह्मविष्णुशिवादयः । सद्यः शापप्रसादोऽङ्गः शिवो ब्रह्मा न चाच्युतः ॥ १४ ॥ योऽल्पाभ्यां गुणदोषाभ्यामाशु तुष्यति कुप्यति ॥ १५ ॥ (भागवत, दशम अ० ८८ श्लो० १४, १५) ५. **वरानें.**

१. **वृकासुर, ह्याचेंच पुढें भस्मासुर असें नांव पडलें. कथासंदर्भः**– वृकासुर हा शकुनी असुराचा पुत्र. त्रिमूर्तींत शिव शीघ्र प्रसन्न होतो असें नारदाचें वचन ऐकून ह्यानें शिवाची आराधना करणें आरंभिलें. ह्याच्या सेवेनें शिव प्रसन्न होऊन त्यानें ह्याला 'ज्याच्या मस्तकावर तूं हात ठेवशील त्याचें भस्म होईल' असा वर दिला. त्या योगानें त्यानें स्वर्गमृत्युपाताळांत फार धुमाकुळ माजविला. पुढें एकदां पार्वतीचें सुंदर रूप पाहून त्याला तिचा अभिलाष उत्पन्न झाला व शिवाला मारून आपण तिचें हरण करावें म्हणून हा शिवावरच उलटून त्याच्या मस्तकीं हात ठेवण्यास धांवला. ह्या संकटप्रसंगीं शिवानें विष्णूचें स्मरण केलें. त्या वेळीं विष्णूनें 'मोहिनी'रूप धरून व भस्मासुरास आपल्या मोहक भाषणानें संतुष्ट करून नृत्य करावयास लागले. मोहिनीरूपदर्शनानें व तिच्या स्मितहास्ययुक्त कटाक्षप्रेरणानें भस्मासुर वेडावून जाऊन तिच्या बरोबर तोही नाचूं गाऊं लागला. ती जसे हावभाव करी तसे तोही करी. असें होतां होतां मोहिनीनें आपल्या मस्तकावर हात ठेवलेला पाहून ह्यानेंही आपल्या डोक्यावर हात ठेविला व त्याचें भस्म झालें. भागवत दशम अ० ८८ यांतील कथा किंचित् भिन्न आहे. त्यांत विष्णूनें बटुरूप धारण करून वृकासुरास मोह पाडला व वरप्रत्ययार्थ स्वमस्तकावर हस्तक ठेवून त्याचें भस्म करविलें असें सांगितलें आहे. **भस्मासुरकथेचें तात्पर्यः–'भस्मासुर राक्षसाची उत्पत्ति, स्थिति व लय सर्व भस्मरूप आहेत. म्हणजे**

भला जगविला तुम्ही भवमहाहिचा मोहरा. ॥ ६८

भजे सुदृढनिश्चयें द्विजकुमारक क्षीरधी,

भस्मासुर राक्षस मुळींच नाहीं. परंतु जे कपट करितात, विश्वासघात करितात, प्रजेला पीडा देतात, ज्यानें आपल्याला नामरूप दिलें त्या ईश्वराचे वेदप्रतिपाद्यधर्मकथितनियम मोडतात, व ज्यांना भूतदया नाहीं असे लोकच भस्मासुर. ते लोक ज्या मनुष्यदेहाच्या योगानें आत्मज्ञान होऊन तरावें, त्याच मनुष्यदेहीं पतन पावतात. जसा भस्मासुर राक्षसाला चांगल्या कामाकरितां मिळालेला वर त्यानें वाईट कामाकडे खर्च केल्यामुळें त्याच वरानें तो नाश पावला, त्याचप्रमाणें बहुत सुकृतांच्या योगानें तरणोपायार्थ मिळालेला मनुष्यदेह जे भस्मासुरानें केलेल्या दुष्ट कृत्यांसारख्या दुष्ट कृत्यांत खर्च करितात, ते अज्ञानरूप मायेनें व्याप्त होऊन त्याच अमोल मनुष्यदेहाच्या योगानें आपल्या जीवात्म्याला पुनः पुनः डुकरें, कुत्रीं व बकरीं वगैरे जीवांच्या योनींत घालून जन्ममरणाचे फेरे खावयास लावतात.' (वेदोक्तधर्मप्रकाश–विष्णुबावा ब्रह्मचारीकृत). पंतांनीं भागवतांतील कथेच्या आधारानें एक स्वतंत्र 'भस्मासुराख्यान' रचिलें आहे. त्यांत ४२ श्लोक आहेत. २. कृतोपकार विसरून आपल्या हितकर्त्यांस अपकार करणारा. ३. महादेवाला. तृतीयचरणार्थः–देवा! वृकासुराला वर दिला असतां, तो आपलाच घात करण्यास कदाचित् प्रवृत्त होईल हें महादेवाला कसें समजलें नाहीं? ही गोष्ट सर्व त्रिभुवनाचे मनोरथ जाणणाऱ्या महादेवाला कळली नाहीं हें मोठेंच आश्चर्य!

१. भव+महा+अहिचा=संसार+मोठा+सर्पाचा=संसाररूपी मोठ्या सर्पाचा; प्रपंचावर कवीनें येथें सर्पाची कल्पना करून महादेवाला सर्पविषहारक मणि असें मानलें आहे. चतुर्थचरणार्थः–तो वृकासुर महादेवालाच जाळून भस्म करणार होता पण तुम्हीं मोठ्या युक्तीनें शंकराचे प्राण वांचविले. महादेवावरचें प्राणसंकट टाळिलें हा तुम्हीं जगावर मोठाच उपकार केला; कारण महादेवाच्या कृपेमुळें पुष्कळ लोक संसारसर्पाच्या उग्र विषापासून मुक्त होऊन कैवल्यपदास पोंचले. २. विषहारक मणि. ज्यानें हलाहलासारखें अत्युग्र विष पचविलें तो मोहरा खराच. व्या०:–येथें 'भवमहाहिचा' ह्याची 'कर्मणि षष्ठी' समजावी. माझ्या योग्यतेप्रमाणें मला वर देऊन मला कृतार्थ करा असा कवीचा आशय आहे. तृतीय चरणांत दृष्टांत, आणि चतुर्थ चरणांत रूपक अलंकार झाला आहे. ३. अन्वयः– [देवा!] क्षीरधी द्विजकुमारक सुदृढ निश्चयें [तुम्हाला] भजे, [हे] मदनमारक! तुम्हीच तया करीं क्षीरधी द्या; जें सुपात्रा सदा सुखवि तें उदारपण बरें [होय]; पन्नगा अमृत दिलें तशि खळीं कृपा त्रासदा [होते]. प्रास्ताविकः–यांत विष्णु आणि शिव एकरूप अशी भावना करून शिवाचें औदार्य तेंच विष्णूचें होय व महादेवाचें औदार्यही सत्पात्रीं होत असे, अशा अभिप्रायानें कवि म्हणतात. ४. सु (अत्यंत) दृढ (अढळ) निश्चयें (निश्चयानें)=मनाच्या खऱ्या निर्धारानें. ५. ब्राह्मणपुत्र, व्याघ्रपाद नांवाच्या मुनीचा पुत्र उपमन्यु. 'दंतविप्रांडजा द्विजाः' इत्यमरः. 'द्विज'शब्दाचे (१) दांत (२) ब्राह्मण (३) पक्षी

तया करिं तुम्हीच द्या मदनमारक! क्षीरधी; ।

असे तीन अर्थ होतात. **व्यु०:**–'कुमार'शब्दाला क्षुद्रार्थी **क** प्रत्यय लागून कुमारक= लहान मुलगा, अथवा गरीब मुलगा अशा अर्थानें हा शब्द झाला आहे. **कथासंदर्भः**– उपमन्यु हा वसिष्ठकुलोत्पन्न व्याघ्रपाद नामक ऋषीचा ज्येष्ठपुत्र होय. हा लहानपणीं एकदां दुसऱ्या एका समवयस्क ऋषिपुत्राबरोबर खेळत खेळत त्याच्या घरीं गेला. तेथें त्या मुलाच्या मातेनें आपल्या पुत्राबरोबर यालाही क्षीरपान करविलें. घरीं आल्यावर हा आपल्या मातेजवळ गोरस मागूं लागला. तेव्हां तिनें गरीबीस्तव नित्यनेमाप्रमाणें पीठ पाण्यांत कालवून त्याला दिलें. पण तें न घेतां अमक्याच्या आश्रमांत मी दूध प्यालों तसें दूध मला दे असें तो म्हणूं लागला. हें पुत्राचें भाषण ऐकून माता फार खिन्न झाली व 'तसें गोरसपान करण्याचें तुझ्या नशीबीं नाहीं, कारण तुझें तसें पूर्वसुकृत नाहीं' असें म्हणाली. तेवढ्यावरून यानें वनांत जाऊन शंकराची आराधना केली. याची उत्कट भक्ति पाहून शंकर इंद्ररूपानें वर देण्यास याजवळ आले व याला वर मागण्यास सांगितलें. त्यावर 'शंकराशिवाय इतर देवतांपासून वर मागण्याची माझी इच्छा नाहीं, शंकरांनी मला लहान वर दिला तरि तो इंद्रा! मला तुझ्या मोठ्या वराच्या ज्ञानपद योग्यतेचा वाटतो. म्हणून मला शंकराच्याच दर्शनाची इच्छा आहे, तूं स्वस्थानाप्रत जा.' असें यानें इंद्ररूपधारी शंकराला म्हटलें. असा याचा 'सुदृढ निश्चय' पाहून शंकर प्रसन्न झाले व त्यांनी याला कल्पपर्यंत आयुष्य तसेंच समग्र क्षीरसागराचें आधिपत्य हे वर दिले. याची कथा **महाभारतां**तील अनुशासननामक पर्वांत आहे. ज्ञानेश्वरींत एका ठिकाणीं ज्ञानोबाराय लिहितात:–'मागां दूध दे म्हणितलियासाठीं । आपुलिया क्षीराब्धिची करूनि वाटी । उपमन्यूपुढें धूर्जटी । ठेविली जैसी ।' (ज्ञानेश्वरी १० १७.)

**६. क्षीर (दुधाच्या ठिकाणीं) धीः (बुद्धि) यस्य (ज्याची) सः (तो) क्षीरधीः– दुग्धप्राप्तीविषयीं ज्याला इच्छा झाली आहे असा.**

**१. त्याच्या हातांत, त्याच्या स्वाधीन. २. मदनांतका! शंकरा! कथासंदर्भः**– एकदां हिमाचलावर शिव ध्यान करीत बसले असून त्यांच्या पार्वती त्यांची सेवा करीत असतां तेथें शंकरपार्वतींचें ऐक्य करावें ह्या हेतूनें इंद्र, देवांच्या आज्ञेवरून वसंतासह काम आला व त्यानें आपले पुष्पबाण शंकरपार्वतीवर मारण्याचें सुरू केलें. मदनबाणाच्या अनिवार माऱ्यामुळें पार्वती कामातुर होऊन शंकराला बिलगूं लागली व प्रत्यक्ष शंकराच्या मनाचीही चलबिचल व्हावयास लागली. असें एकाएकीं होण्याचें कारण काय हें पहाण्याकरितां शंकरानें आपले डोळे उघडले. तों वसंतासह काम त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां आपल्या तपास यानेंच विघ्न केलें असें जाणून शंकरानें आपला भालप्रदेशस्थ तृतीयनेत्र उघडून त्याचें भस्म केलें. **शिव व मदनदाह-गूढ रूपक**—शिवाविषयीं पुष्कळ रूपकें आहेत. त्यांत ज्ञानी पुरुष हाच शिव किंवा शंकर असें पुराणांतून कांहीं स्थळीं वर्णिलें आहे. अन्यस्थळीं आत्म्याला, किंवा परमात्म्यालाही शिव म्हटलें आहे. 'जीव अथवा अंतरात्मा याच्यांत अनेक वासना व कल्पना असतात. तो आपल्या स्वरूपस्थितीकडे लक्ष्य देत नाहीं म्हणून त्या वासना अबोधरूपी अज्ञान राहतें त्या अज्ञानांत बीजांत अनुद्भूत वृक्ष तशा राहातात व पुनः

उदारपण तें बरें, सुखवि जें सुपात्रा सदा;

---

**पुन:** जन्ममरण व स्वर्गनरक अशा रूपानें उद्भूत होतात. परंतु जीवानें अथवा अंतरात्म्यानें आपल्या आकाशस्वरूपाची स्थिति धारण करून स्वस्वरूपाकडे लक्ष्य लाविलें म्हणजे त्याच्यांत वासना व कल्पना राहण्याचें कारण जें अबोधरूपी अमंगल अज्ञान तें नष्ट होऊन, त्याचेंच मंगळपण म्हणजे शुद्धपण त्याच्याच प्रतीतीस येतें, म्हणून त्यालाच शिव (शिव= मंगल) म्हणावें असें शिवाचें लक्षण आहे.' (वेदोक्त धर्मप्रकाश) शिवाच्या (सांबाच्या) पिंडीच्या पूजेंत योगमार्गांतील गूढ रहस्य आहे. **(शंकराच्या पूजेचा विचार.)** 'सांबावर, म्हणजे भ्रूमध्यस्थानीं, अर्धचंद्राकृति मनोमय कल्पून, तिच्या मध्यभागीं शुद्ध स्फटिकासारखा एक बिंदु कल्पावा, आणि आपलें मन त्याजवर स्थिर करावें, म्हणजे दृढ अभ्यासानें समाधी होते. परंतु ती कल्पना कशी करावी हें ध्यानांत येण्याकरितां दगडाची अर्धचंद्राकृति शाळुंका करावी, आणि तिच्या मध्यभागीं बाण स्थापावा, आणि पाण्याची अभिषेकधार धरून, त्या धारेकडे पाहून त्याप्रमाणें मनाची संकल्परूपी धार मनोमय कल्पिलेल्या अर्धचंद्राकृति शाळुंकेतील बिंदूवर स्थिर करावी, व शाळुंकेतील बाणाला पिंडी अथवा लिंग नांव आहे असें समजावें. याचप्रमाणें विष्णु, गजानन, देवी, सूर्य यांच्या लिंगरूपी म्हणजे बिंदुरूपी धारणा समजाव्या. लिंग म्हणजे चिन्ह, किंवा भजनीय आकृति.' (वेदोक्त धर्म.) **(कामदाहांतील रूपक)** शंकर हें नांव भक्तिज्ञानवैराग्यसंपन्न पुरुषाला पुराणांतून कांहीं स्थळीं लाविलेलें आढळतें असें वर सांगितलेंच आहे. ज्ञानी पुरुष विचारानें कामविकार शमवितो तथापि तो वासनारूपानें स्वप्नावस्थेंत उद्भूत होऊन त्याच्या मनःक्षोभाला कारण होतो. अशा रीतीनें काम ज्ञान्याच्या लिंगशरीराला स्वप्नावस्थेंत त्रास देऊं लागतो तेव्हां ज्ञानी किंवा योगी अग्निचक्राचे ठिकाणीं अर्थात् भ्रूमध्यस्थानीं ध्यान करून कामविकाराचा नाश करितो. हेंच शिवानें आपल्या मस्तकावरील तृतीय नेत्रांतील अग्नीच्या योगानें कामदाह केला ह्या कथेंतील तात्पर्य. ३. **क्षीरसमुद्र. प्रथमार्धाचा अर्थः—हे मदनांतका! सदाशिवा! व्याघ्रपादऋषिपुत्र उपमन्यूनें दुग्धप्राप्तीच्या इच्छेनें तुमची एकनिष्ठ सेवा केली; त्यावर प्रसन्न होऊन तुम्हींच त्याला दुग्धसमुद्र दिलात हें तुमचें औदार्य फारच सुपात्रीं झालें. वृकासुराला जो तुम्हीं वर दिला तो अस्थानीं झाला. उलट पक्षीं उपमन्यूला दिलेला वर फारच सुपात्रीं झाला.**

१. **औदार्य. तृतीयचरणार्थः—तेंच औदार्य श्रेष्ठ कीं जें सत्पात्रीं झालेलें असून त्यापासून त्या माणसाला सदोदित सुख प्राप्त होतें. सत्पात्रीं औदार्यः—**ही पंक्ति किती तरी अर्थपूर्ण आहे! आमचीं सर्व पुराणें व भारतरामायणादि ग्रंथ ह्यांत गोंवलेल्या सत्याचें उत्तम समर्थन करतात. दैत्यदानवांना दिलेल्या वरांपासून कल्याणापेक्षां त्यांचें अकल्याणच जास्ती झालें. कोणत्याही मनुष्यावर औदार्यबुद्धीनें कृपा करण्यापूर्वीं दोन गोष्टी लक्ष्यांत ठेवल्या पाहिजेत. एक तर ज्या मनुष्याला दान द्यावयाचें तो सत्पात्र आहे कीं नाहीं हें पहावयाचें. दुसरी गोष्ट त्या देण्यापासून त्याला नेहमीं सुख होईल किंवा नाहीं तें पहावयाचें. कदाचित् त्याला कांहीं वेळ त्यापासून सुख होईल पण नेहमीं जर सुख झालें नाहीं तर तें औदार्य विशेष चांगलें असें म्हणतां येणार नाहीं.

दिलें अमृत पन्नगा, तशि खळीं कृपा त्रासदा. ॥ ६९
अतिप्रिय, सुखप्रद, प्रथम तूं मुदंभोद या
मयूरहृदया; तुझी क्षण विटो न शंभो! दया; ।

---

१. दूध. चतुर्थचरणार्थः—सर्पाला दूध जरी पाजलें तरी जसा तो आपलें दुष्टत्व टाकीत नाहीं त्याप्रमाणें खळावर (दुष्ट मनुष्यावर) केवढी जरी कृपा केली तरी ती त्रास देणारीच होते. पंतांनीं 'नामसुधाचषकां'त, असाच उद्गार काढिला आहे:- 'दुग्धप्रदासि निर्विष होइल मुख काय काद्रवेयाचें?' [नामसुधाचषक—गी० ८६ पृ० ३२०.] अमक्या मनुष्यानें आपल्याला दूध पाजलें म्हणून त्याला आपण चावूं नये असा विचार जसा सर्पाच्या डोक्यांत कधीं येत नाहीं त्याप्रमाणें दुष्ट मनुष्यांवर कितीही उपकार केले तरी ते आपल्या जातीवर जाऊन उपकार करणाऱ्यावर शस्त्र उपसण्यास कधीं मागें पुढें पाहावयाचे नाहींत. म्हणून दुष्टावर केलेली कृपा त्रास देणारी होते, यास्तव तसें कधीं करूं नये. २. सर्पाला. व्यु०:- सर्प पायांनीं चालत नसून पोटानें सरपटत जातो म्हणून त्याला पन्नग म्हणतात. [पन्नं पतितं यथा तथा गच्छतीति पन्नगः.] ३. अन्वयः- [हे] मुदंभोद! तूं प्रथम या मयूरहृदया सुखप्रद [आणि] अतिप्रिय [आहेस], शंभो! तुझी दया [या मयूराला] क्षण न विटो; [त्यां] उदारपण वानिलें; अजि! [महाराज!] पहा. हें निपट साबळें लेंकरूं बळें गुरुपहासा कसें करील? प्रास्ताविकः— मागल्या दोन केकांत शिवाच्या सत्पात्रीं दानाचें एक व असत्पात्रीं दानाचें एक अशीं दोन उदाहरणें दिलीं आहेत, त्यावरून शिवास राग आला असेल अशी कल्पना करून कवि या केकांत त्याचें समाधान करितात. ४. सुख देणारा. ५. अगोदरच. ६. मुद् (आनंद)+अंभोद (मेघ. अंभस्-जल, द–देणारा) आनंदरूप जल देणारा मेघ. प्रथमचरणाचा अन्वयार्थः- तूं मुदंभोद (आनंदरूपी जल देणारा मेघ) या मयूरहृदया (मोराच्या अंतःकरणास, पक्षीं, मोरोपंतकवीच्या अंतःकरणास) प्रथम (प्रथमपासून, अगोदरच) अतिप्रिय (अत्यंत प्रियकर) सुखप्रद (सुख देणारा) [आहेस.]' येथें 'मुदंभोद' हें संबोधन मानलें तरी प्रशस्तच. स्वभक्तांस स्वर्गसुखापासून मोक्षापर्यंत सर्व सुखें प्राप्त करून देणाऱ्या आनंदघना शंभो! आपण या मयूराच्या हृदयाला पहिल्यापासूनच सुख देणारे म्हणून अत्यंत प्रियकर असे आहांत. श्लेषः— येथें 'मयूर'शब्दावर कवीनें श्लेष योजिला आहे. हा श्लेष पंतांच्या काव्यांतून शेंकडों प्रसंगीं योजिलेला आढळतो. मेघ पाहून मोराचें मन आनंदित होऊन तो नाचूं लागतो, ह्या सृष्टिचमत्कारापासून कवींनीं देवभक्तसंबंध दाखविण्यास ही मेघमयूरांची उपमा फार समर्पक म्हणून योजिलेली दिसते. ७. मोराच्या अंतःकरणास; पक्षीं, भक्त मोरोपंत याच्या अंतःकरणास. ८. महादेवा! '[हे] शंभो! तुझी दया (कृपा) क्षण (क्षणभर देखील) न विटो (कंटाळो)'=माझ्यावरील तुझी दया क्षणभर देखील कमी न होवो.

उदारपण वानिलें; अजि! गुरूपहासा बळें
कसें करिल लेंकरूं? निपट हें पहा सांबळें. ॥ ७०
तुह्मां हरिहरांत ज्या दिसतसे, दिसो; 'वास्तव'

---

१. स्तविलें, वर्णिलें. देवा! मीं वर्मेंकर्में काढून तुमची निंदा केली असें समजून आपण मजवर रागावत असाल, पण मीं तसें केलें नसून उलट तुमच्या औदार्याची स्तुतिच केली; उदारत्वाची प्रशंसा केली असें स्पष्ट सांगून कवीनें आपलें उत्कट प्रेम आणि ईश्वरनिंदाभय हीं व्यक्त केलीं आहेत. २. अहो महाराज! ३. गुरु+उपहासा=जन्मदाता पिता किंवा इतर वडील माणसें यांच्या उपहासाला म्हणजे निंदेला. ४. बुद्धिपूर्वक, जाणूनबुजून, मुद्दाम. 'लेंकरूं गुरूपहासा बळें कसें करील?'=लहान मूल वडिलांची निंदा जाणूनबुजून कशी बरें करील? करणार नाहीं—हें उत्तर. मीं माझ्या मतें तर आपली स्तुतिच केली. पण तसें करण्यांत, चुकून आपली निंदा घडली असल्यास मला क्षमा असावी—हा कवीचा आशय. ५. केवळ, अगदीं निस्तुक, खरोखरच. ६. भोळें, अज्ञान. देवा! मीं खरोखरीच भोळेपणानें आपली स्तुति केली, त्यांत आपली निंदा झाली असल्यास ती चुकून झाली असें समजावें. अज्ञान लेंकरूं जाणूनबुजून वडिलांची निंदा कदापि करणार नाहीं, साहजिक बोलण्यांत तसा भास झाला तरी त्याची क्षमा वडिलांनीं केली पाहिजे. ७. प्रास्ताविकः—तुमचा प्रसाद प्राप्त व्हावा म्हणून मी तुमची केका-स्वरानें प्रार्थना करीत असतां, तुमच्या देखत शिवाची निंदा मजकडून कशी बरें होईल? तुम्ही व शिव एकच आहां म्हणून शिवाची निंदा ती तुमची निंदा होणार नाहीं काय? व तुमची निंदा तर माझ्याकडून कदापि होणें नाहीं. अशा अभिप्रायानें कवि शिवविष्णूंचा अभेद यांत वर्णन करितात. अन्वयः—ज्या (ज्याला) तुम्हां हरि-हरांत (विष्णुशंकर या दोघांत) [भेद] दिसतसे (दिसतो) [त्या] दिसो; प्रबुद्ध (ज्ञाते, तत्वज्ञ) 'वास्तव (वास्तविक) तिळहि (थोडा देखील) भेद नसे' [असें] म्हणती (म्हणतात), यास्तव (म्हणून) मी (मोरोपंत) मनिं (मनांत) म्हणें (म्हणतों) जें शैव (शिवोपासक) स्वमत (आपलें मत, शिव मात्र खरा देव, विष्णु खोटा; किंवा 'शिव थोर विष्णु लहान' असें शैवमत) वर्णिती (वर्णन करितात) तें यथार्थ (योग्य आणि खरें) न (नाहीं), [तसेंच] वैष्णव (विष्णूपासक) दुराग्रही (अतिशय आग्रही, खोटा आग्रह धरणारे, विष्णु तेवढा खरा देव, शिव खोटा, अथवा 'हरि विशेष हर गौण' असें म्हणणारे म्हणून दुराग्रही) [आहेत]; हीं (हरिहरात्मक) दैवतें (देव) परम मुख्य (प्रमुख) [आहेत]. ८. हरि—विष्णु, हर—शंकर, या दोघांत. 'हरि' शब्दाची व्युत्पत्तिः—'हरिवंश' भविष्यपर्वे, अ० ८८ श्लो० ४५ यांत पुढीलप्रमाणें दिली आहे. 'हरसि प्राणिनो देव! ततो हरिरिति स्मृतः' । शं करोसि सदा देव! ततः शंकरतां गतः॥ ९. ज्याला. तुह्मां ...भेदः—तुम्हां विष्णुशिवांत ज्याला भेद दिसत असेल त्याला तो खुशाल दिसो, पण जे सुज्ञ लोक आहेत ते तुम्हां दोघांत तिळमात्रही भेद नाहीं असें म्हणतात. ज्याला

प्रबुद्ध[1] ह्मणती 'नसे तिळेंहि[2] भेद;' मी यांस्तव[3] ।

---

हरिहरांत भेदभाव दिसत असेल तो अप्रबुद्ध किंवा मूढ असें म्हणण्याचें तात्पर्य. १०. खरोखर, वास्तविक.

१. शहाणे तत्त्वज्ञ लोक. २. अल्प देखील, तिळमात्र. तत्त्वज्ञांच्या मतें हरिहरांत मुळींच भेद नसून ते एकरूपच आहेत. हरिहरांचें अभिन्नत्वः–जगताचा पति परमेश्वर पूर्वीपासून व्यापक असून तो रजोगुणात्मक ब्रह्मदेवरूपानें सृष्टीची उत्पत्ति, सत्वगुणात्मक विष्णुरूपानें तिचें पालन व तमोगुणात्मक रुद्ररूपानें संहार करितो. असा स्वतःसिद्ध जो भगवान् त्याच्या सत्व, रज, तम ह्या तीन अवस्था आहेत. वास्तविक परमेश्वर एकच आहे असें मार्कंडेय पुराण अ० ४६ यांत सांगितलें आहे. भागवत चतुर्थस्कंध अध्याय ७ श्लो० ५०–५४ यांत देखील भगवंतांनीं त्रिमूर्तीचें ऐक्यच वर्णिलें आहे. पुराणांत शिव विष्णूला शरण गेला, तसेच विष्णूनें शिवाची आराधना केली या संबंधानें लिहितांना भारतावरील टीकाकार नीलकंठ चतुर्धर ह्यांनीं हरिवंश, भविष्यपर्व अ० ७३ वर टीका करितांना असें लिहिलें आहे. 'कांहीं पुराणांत शिव हा जीव व विष्णु हा ईश्वर असें वर्णिलें असून कांहींत विष्णु हा जीव व शिव हा ईश्वर असें सांगितलें आहे. तरी सर्वांचा रोख जीवेशांचा अभेद वर्णन करण्याकडेच आहे. अनेक देवता ह्या समष्टि जीवाचे अवयव असून त्याचें परब्रह्माशीं, पाणी ज्याप्रमाणें पाण्यांत मिसळतें, किंवा अग्नि अग्नींत लीन होऊन जातो त्याप्रमाणें, ऐक्य आहे. म्हणून वरवर पाहणारास जरी पुराणांतील शिवविष्णूंच्या वर्णनांत विरुद्धार्थ मजकूर दिसला तरी तत्वतः विचार करण्यास त्यांत विरोधाचा गंध सुद्धां आढळणार नाहीं.' (हरिवंश टीका). हरिहरांतील अभेदाविषयीं पुढील वचनें पहा:—(१) 'अनादिनिधनं देवे हरिशंकरसंज्ञिते । संसारसागरे मग्नाः भेदं कुर्वंति पापिनः ॥' [बृहन्नारदीय.] (२) 'उभयोरेका प्रकृतिः प्रत्ययभेदाच्च भिन्नवद्भाति । कलयति कश्चिन्मूढो हरिहरभेदं विना शास्त्रम् ॥' विठ्ठलभक्त तुकारामाचा अभिप्रायही असाच आहे:–(३) 'हरिहरां भेद । नाहीं करूं नये वाद ॥ १ एक एकाचे हृदयीं । गोडी साखरेचे ठायीं ॥ २॥ भेदकाशीं नाड । एक वेलांटीच आड ॥ ३ उजवें वामांग । तुका म्हणे एकचि अंग ॥४॥' [अभंग ९९.] (४) देव सारिखे सारिखे, शिव आणि विष्णू सखे ॥ १ एक बैसे नंदीवरी । एक बैसे गरुडावरी ॥ २ एक ओढी व्याघ्रांबर । एका कासे पीतांबर ॥ ३ एका गळां रुंडमाळा । एका वैजयंती माळा ॥ ४ तुका ह्मणे एक । भेद नाहीं दोघे एक ॥५ (५) 'द्विजराजशिरोमणेर्भिदां द्विजराजध्वजशालिनश्च यः । कलयेन्मनसापि पात्यतेऽन्तकभृत्यैः खलु तद्द्विजावलिः ॥ जो मनुष्य चंद्रमौली महादेव व गरुडध्वज विष्णु या दोघांत मनानें भेद कल्पितो त्याची दंतपंक्ती यमदूत पाडतात. कोणा कवीनें पुढील संस्कृत श्लोकांत हरिहरांचा जवळचा संबंध मोठ्या सरस रीतीनें वर्णिला आहे. यावरून जुन्या कवींची श्लेषप्रियता चांगली कळून येते. (६) 'जान्हवी मूर्ध्नि पादे वा कालः कंठे वपुष्यथ । कामारिं कामतातं वा कंचिद्देवं भजाम्यहम् ॥ ज्याच्या मस्तकावर किंवा पायाशीं गंगा आहे, ज्याचा कंठ किंवा सर्व शरीर काळें आहे, जो कामशत्रू किंवा कामपिता आहे, अशा देवाला (शंकराला किंवा विष्णूला) मी भजतों (७) 'गवीशपत्रो नगजार्तिहारी कुमारतातः शशिखंडमौलिः । लंकेशसंपूजितपादपद्मः पायादनादिः परमेश्वरो नः ॥' गवीशपत्र, नगजार्तिहारी, कुमारतात, शशिखंडमौली, लंकेशसं-

म्हणें मनिं, ‘यथार्थ जें स्वमत वर्णिती शैव[१] तें
न; वैष्णव[२] दुराग्रही[३]; परम मुख्य हीं दैवतें.’ ॥ ७१

पूजितपादपद्म, असा अनादि परमेश्वर आमचें संरक्षण करो. पहिलीं पांच विशेषणें जशींच्या तशींच घेतलीं तर शंकराला लागतात, पण तीं अनादि घेतलीं (म्हणजे त्यांतून आद्याक्षर काढून घेतलें) तर तीं विष्णूला लागतात. या श्लोकांत कवीनें शिव व विष्णु अशा दोघांही देवांचा आशीर्वाद मागितला आहे. यांतील विशेषणांचें स्पष्टीकरण असें:—गवीशपत्रः-गवीश म्हणजे वृषभ (नंदी) वाहन आहे ज्याचें असा शंकर: (आद्याक्षराचा लोप करून) वीश म्हणजे पक्षिपति गरुड पत्र (वाहन) आहे ज्याचें असा विष्णु. नगजार्तिहारी–नगजा–पार्वती तिची आर्ति–दुःख तें हारी–हरण करणारा, पार्वतीचें दुःख हरण करणारा; पक्षीं, गजाची आर्ति हरणारा–गजेंद्रपीडा हरण करणारा विष्णु (गजार्तिहारी). कुमारतातः–कुमार–कार्तिकेय त्याचा तात शंकर; पक्षीं, मार–मदन त्याचा तात विष्णु. शशिखंडमौलिः–शशिखंड–चंद्रबिंब ज्याच्या डोक्यावर आहे तो शंकर; पक्षीं, शिखंड–मयूरपिच्छें डोक्यावर आहेत ज्याच्या तो विष्णु. लंकेशसंपूजितपादपद्मः लंकेशानें पूजित आहे पादकमल ज्याचें असा शंकर; पक्षीं, क–ब्रह्मा, ईश–शिव यांनीं पूजित आहे पादकमल ज्याचें तो विष्णु; परमेश्वर–शंकर, पक्षीं रमेश्वर विष्णु. अनादि–ज्याला, आदि नाहीं तो; पक्षीं, आद्याक्षररहित असा परमेश्वर अर्थात् रमेश्वर विष्णु. पंतांच्या ‘हरिवंशांत हरिहरांचा अभेद पुढीलप्रमाणें वर्णिला आहे. (८) हरिहर हे सर्वोत्तम एकचि बा! यांत लव नसे भेद। वेद प्रमाण येथें याचि ज्ञानें नृपा! मरे खेद. ॥ ज्वलनीं ज्वलन, जळीं जळ, तेंवि हर हरीन हरि हरीं आण। देहद्वय धरि योगी जैसें तैसेंचि हे तुझी आण. ॥ हरि तो हर, हर तो हरि एकचि परपुरुष नित्य नव दोन। हृदयीं तत्व धरावें मंदापासीं कदापि न वदोन ॥’ [अ० ४९ गी० ४-५-७] ब्रह्मदेवानें एकदां स्वप्नांत हरिहररूपें पाहिलीं त्याचें वर्णनः–पीतांबरधर दरकर चक्रगदापाणि देखिला मग। चर्मत्रिशूळ पट्टिशधर हरि जो अर्पिता चतुर्वर्ग ॥ ४२. ११७ गरुडध्वज हर भगवान् वृषभध्वज हरि विलोकिला व्यक्त। कथिलें रहस्य तुज कीं कथिसिल तूं त्यांसि जे भले भक्त ॥ ११८ (हरिवंश-मोरोपंत) शंकर कृष्णाला म्हणतातः–‘मी हा तूं, तूं हा मी शब्दें अर्थें करूनि, कांहींच। तुज मज अंतर कृष्णा! वा वंध्यपत्य तेंवि नाहींच. ॥’ [अ० ५० गी० ६२], ‘आम्हांत भेद करि जो या होय न पात्र मदुपदेशाला। त्या हा स्वभक्तिरूपा चिंतामणिचा न यदुप दे शाला ॥’ [अ. ५० गी. ७४]. शंकर मार्कंडेयास म्हणतातः–‘सुब्रह्मण्यांसि सर्वालोकांसह लोकपाळ जे सर्व। वंदिति पूजिति हे किति सदुपासक विधि मुकुंद मी शर्व. ॥ १७३ ॥ देखति अणुहि न साधु ज्ञाते आम्हां तिघांत जे भेद ॥ १७४ ॥’ [ मंत्रभागवत–द्वादशस्कंध ] एवंच शैववैष्णवांतील विरोध भारत, भागवत व पुराणें यांच्या दृष्टीनें गर्हणीय आहे. थोडीं प्रक्षिप्त वचनें तेवढीं अनुकूळ दिसतात. ३. **म्हणून याकरितां.**

**१. शिवभक्त. २. विष्णुभक्त. ३. हट्टी. द्वितीयार्धाचा अर्थः— शिव मात्र खरा देव, शिवाची उपासना मात्र खरी उपासना, विष्णूची भक्ति करणें पाप आहे, अशा प्रकारचीं जीं शिवोपासकाचीं मतें तीं खरीं नाहींत. त्याप्रमाणें शिवाची पूजा**

म्हणें[1] क्षण[2] पुरांतक[3], क्षण मुरांतक[4]; ब्राह्मणा

**करणें महत्पाप असून विष्णूची उपासना मात्र खऱ्या देवाची उपासना, अशा प्रकारचीं वैष्णवांचीं मतें दुराग्रहाचीं होत. विष्णुशिवात्मक दोन्ही देव मुख्यच आहेत असें मी मनांत समजतों. शैववैष्णवांतील विरोधः—** शैववैष्णवांचें परस्परांशी पराकाष्ठेचें हाडवैर होतें व अजूनही क्वचित् दृष्टीस पडतें. भाविक वैष्णवाच्या दृष्टीस शिवलिंग पडलें असतां, तसेंच भाविक शैवाच्या दृष्टीस विष्णुमूर्ति पडली असतां त्यांना फार संताप येतो व ते दृष्टिजन्यपापनिवारणार्थ स्नान करितात. मुक्तेश्वरानें सभापर्वांत या दुराग्रही वैष्णवांचें व शैवांचें थोडक्यांत दृष्टांतरूपानें सरस वर्णन केलें आहे:— 'शैव कौरव एक पर्णी । हस्त मेळवूनियां हस्तीं । क्षुद्रबुद्धी अवलोकिती । कृष्णद्वेषी दुरात्मे ॥ ७४ ॥ काशीविश्वेश्वराचें लिंग । सुवर्णकमळीं पूजिलें सांग । जें देखतां पावती भंग । महापातकें पापांचे ॥ ७५ ॥ ते नूतन पाखांडी वैष्णवा । देखतांची संताप उपजे जीवा । जेविं कां पुरवितांना देवा । हिरोनि नेला तस्करीं ॥ ७६ ॥ नातरी बिंदुमाधवप्रतिमा । शंगारिली देखोनि, अधमा । केशकपाळीं जंगमा । शिरच्छेदनासारिखें ॥ ७७ ॥' [सभापर्व–अध्याय १०]. यासंबंधी पुढील पुराणवचन ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. 'पुरुषोत्तममाश्रित्य शिवनिंदारता द्विजाः । कलौ युगे भविष्यंति तेषां त्राता न माधवः' ॥ (सौरपुराण अ० ४–२२). हा शैववैष्णवांच्या विरोधाचें वर्णन मूळपुराणांतही आढळतें:— 'विष्णुदर्शनमात्रेण शिवद्रोहः प्रजायते । शिवद्रोहान्न संदेहो नरकं यांति दारुणम् ॥' (पद्मपुराण). याविषयीं एकनाथस्वामी भागवतांत लिहितात. 'वैष्णवांसी शिवरात्री विरुद्ध । हें बोलणें अति अबद्ध । सकळपुराणीं अविरुद्ध । व्यासें विशुद्ध बोलिला ॥ १२५५ । शिव श्याम तमोगुणी । तो शुद्ध झाला विष्णूच्या ध्यानीं । विष्णु श्याम शिवचिंतनीं । विनटले गुणीं येरयेरा–५६, शिव धवळधाम गोक्षीर । विष्णु घनश्याम अतिसुंदर । बाप ध्यानाचा बडिवार । येरें येर व्यापिला–५७. मुदलीं दोहींमाजी ऐक्य शुद्ध । मग उपासकांसि कां विरुद्ध । हा कवीचा सिद्धांत. (ए. भा. अ० ११.) **४. देव. हीं विष्णुशिवात्मक दोन्ही दैवतें मुख्यच आहेत. यांत गौणता (कमीपणा) कोणाकडेही नाहीं.** मुक्तेश्वराप्रमाणेंच शैववैष्णवांतील विरोध मोरोपंतांला मुळींच संमत नव्हता. त्यांची उपास्यदेवता श्रीराम होती तरी इतर देवतांविषयीं विरोध त्यांच्या ठिकाणीं किमपिही वसत नव्हता. त्यांनीं बहुतेक देवांविषयीं स्तुतिपर स्फुट प्रकरणें रचलीं आहेत. त्यांत खंडोबा, म्हाळसा, रेणुका, सिद्धेश्वर, महालक्ष्मी, कालभैरव अशांचाही समावेश केलेला आढळतो. हरिहरांत भेद नाहीं अशा प्रकारचे उद्गार पंतांनीं पुष्कळदां काढिले आहेत. पुढील उदाहरण पहाः— 'श्रीहरिहरनामें होरें सर्व तुम्ही एक, गुह्य हें संतीं । कथिलें, यास्तव भलतें माझ्या ह्या आननीं नसो अंतीं ॥' [प्रांतप्रार्थना–गी० ९ स्फुटकाव्यें', भाग १, पृ० २७५.]

**१. म्हणतों. २. क्षणभर, एक वेळ. प्रास्ताविकः—हरिहरांविषयीं आपली अभिन्नबुद्धि दाखवितांना कवि म्हणतो. ३. त्रिपुरांतक महादेव. कथासंदर्भः—** तारकासुर नामक असुरास तारकाक्ष, विद्युन्माली, व कमललोचन असे तिघे पुत्र होते. त्यांनीं घोर तप आचरून शिवास व ब्रह्मदेवास प्रसन्न केलें व अंतरिक्षगामी तीन पुरें मिळविलीं. पुढें

वरानें प्रमत्त होऊन त्यांनीं त्रिलोकास त्रास देण्याचें आरंभिलें. त्यांच्या त्रासामुळें सर्व त्रिभुवन जर्जर झालें. तेव्हां देवांनीं विष्णूस पुढें करून महादेवाची आराधना केली. शंकरानें त्यांस आश्वासन देऊन रथसामग्री सिद्ध करण्यास सांगितलें. त्या वेळेस पृथ्वी रथ, चंद्रसूर्य रथचक्रें, मंदरपर्वत अक्ष, चतुर्वेद रथाश्व, ब्रह्मदेव सारथी, षट्शास्त्रें रथाचे दोर, कनकाद्रि धनुष्य, शेष धनुष्याची दोरी, विष्णु शर, अशा प्रकारची रथसामग्री देवांनीं सिद्ध केली. नंतर त्या रथावर बसून महादेवानें बहुतकाळपर्यंत घनघोर युद्ध केलें व शेवटीं पाशुपतास्त्राची स्थापना करून विष्णुबाण मोडून दैत्यांसुद्धां त्रिपुरांचा नाश केला. तेव्हांपासून **त्रिपुरांतक** किंवा नुसतेंच **पुरांतक** असें नांव महादेवास पडलें. **त्रिपुरवधकथेंतील गूढ रूपकः**—हरिवंश हा ग्रंथ महाभारताची पुरवणी होय. त्यांतील भविष्यपर्व अ० १३३ यांत जनमेजयानें वैशंपायनाला त्रिपुरवधांतील तत्त्व विचारिलें व वैशंपायनानें तें त्याला अलंकारिक भाषेनें सांगितलें ही कथा आहे. त्याचें स्पष्टीकरण सुप्रसिद्ध टीकाकार नीलकंठ चतुर्धर यांनीं त्या अध्यायाच्या टीकेंत उत्तम रीतीनें केलें आहे. त्यांतील महत्वाचा सारांश मोरोपंतांनीं आपल्या हरिवंशांत चांगल्या तऱ्हेनें दिला आहे. त्यांतील सार आमच्या तत्वबुभुक्षु वाचकांच्या सोईकरितां येथें देतों:—'जनमेजय भूप पुसे वैशंपायन मुने! मला सांगे । त्र्यक्षापासुनि कैसा त्रिपुरवध ज्ञानसिंधु तूं आंगें. ॥१॥ श्रवण, मनन, आणि निदिध्यासन हीं तीन अक्षसम ज्याला । दर्शनसाधनविद्वान् जो म्हणति त्र्यक्ष जाणते त्याला. ॥२॥ जें स्थूल, सूक्ष्म, कारण, देहत्रय हें पुरत्रय स्पष्ट । याचा उच्छेद कसा झाला तें कथुनि तूं हरी कष्ट. ॥३॥ (वैशंपायन सांगतात) शंकर म्हणजे बोध, श्रवणमनन तीन साधनें शूळ । कामक्रोधादि असुर, देव शमादि, श्रुतीच या मूळ. ॥४॥ जागृतस्वप्नसुषुप्त्यत्यभिमानी विश्वतैजसप्राज्ञ । यांहीं भोग्य पुरत्रय मायागुणरचित जाणती प्राज्ञ. ॥५॥ उठलें न आकाशीं म्हणजे जें प्रकट कारणीं झालें । प्राकार ज्यासि कांचनमय अन्नमयाकडेचि हें आलें. ॥६॥ मणिहीं परमविराजित, मणि म्हणजे इंद्रियें असें जाणा । पिंडाला नगराची शोभा योग्या असेल ती आणा. ॥७॥ कर्में करुनि पुरत्रय साधित; यज्ञादि कर्म जाणावें । गंधर्वपुर नसें तें म्हणजे मिथ्या असेंचि बाणावें. ॥८॥ वाहति पुरासि वाजी म्हणजे ते इंद्रियाश्व समजावे । या सुरहस्यज्ञानें हृदयगुहेंतील सर्व तम जावें. ॥९॥ त्या अश्वांहीं असुर ग्रासिति अंबर सुवेग ते म्हणजे । जें ब्रह्म कारण तया झांकिति कामादि विजयकृतपण जे. ॥१०॥ समलंकृत कनकप्रभ भवनें त्रिपुरस्थ निर्मिलीं यत्नें । म्हणजे मनःप्रवेशस्थानें हीं वर्णिलीं वधूरत्नें. ॥११॥ बहु आयुधें पुरीं त्या स्रक्चंदनकामिनीकटाक्ष असे । कामाचे उद्दीपक अर्थ बुधमनांत भाव हाचि ठसे. ॥१२॥ ऐशा त्रिपुरांत वसे असुरेश्वर; सूर्यनाभ अध्यक्ष । तैसाचि चंद्रनाभहि, यांसि म्हणति चक्षु, मन, असे दक्ष. ॥१३॥ अन्यहि बहु दानव त्या त्रिपुरीं मदमत्सरादि ते कथिले । पथ मोडिले पुरातन यांहीं प्राणी सुरादि बहु मथिले'. ॥१४॥ त्रिपुरासुरांनीं देवांस पीडा केली. तेव्हां ते ब्रह्मदेवास अथवा ईश्वरास शरण गेले, ईश्वरानें शंकरावांचून इतरांस दानव अवध्य आहेत म्हणून त्यास शरण जा असें देवांस सांगितलें. त्यावरून ते शंकरास शरण गेले. 'शंकर म्हणजे सुखकर कथिला प्रणतांसि ईश्वरें बोध । गेले शरण तयातें तत्वाचा लागले करूं शोध. ॥ १५॥ ते शंकरासि गेले शरण सकळ देव उग्र तप तपले । जप

लेशहि न विसरले, यमनियमांतें सदैवही जपले. ॥ १६ ॥ त्या सुरतपःप्रभावें जे दानवदार सर्वही भ्याले । बहु कामादिपरिग्रह तृष्णादिक दीन तेधवां झाले. ॥ १७ ॥ केवळ दुर्बळ होतां क्षीण न उरलीच शक्ति कांहींच । ते पावले अदर्शन झाले दानव समस्त नाहींच. ॥ १८ ॥ तें गुप्त अंतरिक्षीं झाले मायाबळें असुरभूप । हृदयाकाशीं बसले होउनियां लीन वासनारूप. ॥ १९ ॥ परिपाककाळ येतां योगाच्या देवशत्रु बाधाया । बसले जपत सुदारुण मायावी ते स्वकार्य साधाया. ॥ २० ॥ ऐसे होतां गेले सुर शरण हरालयासि योगाच्या । विजयी झाल्या असतां क्षीणा त्या वासना कुभोगाच्या. ॥ २१ ॥ अधिकारी संसारी होउनि उद्विग्न निर्गुणस्थानीं । ज्या प्राप्त होय हृदयाकाशीं तेथेंचि लागले ध्यानीं. ॥ २२ ॥ सिद्ध महादेव प्रभु झाला ते सुर भयांत ताराया । अभिमत उपासकांतें होय अविद्याभ्रमासि वाराया. ॥ २३ ॥ त्रिपुरांसी युद्ध करी त्र्यक्ष सस्मरधनु धरूनि अतिसत्व । विद्वान् प्रणवीं योजुनि चित्त करी कोशभंग हें तत्व. ॥ २४ ॥ त्र्यक्षें शरसंधानें दैत्य सकल भिन्नदेह ते केले । स्थूलाध्यास उडविनां ध्यानें कामादि नष्टतनु ठेले. ॥ २५ ॥ रात्रींत प्रबळ असुर होउनि देवांसि जिंकिती शूर । कामादि बळि स्वप्नीं, होति शमादिक तयांपुढें चूर. ॥ २६ ॥ कीं शुक्रें आप्यायित केले ते दैत्य सर्वही हव्यें । पाखंडमार्ग सेवुनि कामादि प्रसरती बळें नव्यें. ॥ २७ ॥ दिव्यरथस्थित शंकर गर्जुनि दैत्यांसि संगरीं दापी । सूक्ष्म शरीर अधिष्ठुनि योगी मर्दी स्मरादि जे पापी. ॥ २८ ॥ देवांनीं मिळोनी बहु तो शंकर वृषध्वज स्तविला । योगजधर्मसमुच्छ्रित म्हणति वृषध्वज म्हणोनि या कविला. ॥ २९ ॥ असुरांहीं नानाविधशस्त्रांहीं सरथ पाडिला रुद्र । योगी सूक्ष्मशरीरीं तो विघ्नें पीडिला, असा क्षुद्र. ॥ ३० ॥ स्फूर्ति होतां गर्वें जो सुस्थित झालों असें मनीं मानी । त्या योग्यातें सूक्ष्मीं देहाला प्राप्त होतसे हानी. ॥ ३१ ॥ शंकर तेव्हां कुंठितगति होय शकट जसें पथीं मग्न । कीं त्या लयांधकारामध्यें योगींद्र जाहला मग्न. ॥ ३२ ॥ ऐसें होतां विघ्न, प्रकटे वृषरूप विष्णु रक्षाया । कीं तो शंकर भजला होता श्रितरक्षणैक दक्षा या. ॥ ३३ ॥ हा धर्म तमोमग्ना जीवातें उद्धरावया दक्ष । येणेंचि समुद्धरिले स्वाश्रित पावोनि संकटीं लक्ष'. ॥ ३४ ॥ धर्मानें चेतोरथ उद्धरून, लिंगभूमी जिंकून, योग्याला सत्त्व नांवाच्या प्रदेशांत नेलें. तेथेंही असुर त्रास देऊं लागले. 'तेव्हां रुद्र धनुष्यीं अग्नि स्थापूनि दिव्य शर जोडी । त्या दैत्याच्या तिसऱ्या नगरीं ब्रह्मास्त्रयुक्त मग सोडी. ॥ ३५ ॥ अग्नि महावाक्य, धनु प्रणव, चिदाभास होय दिव्य शर, । ब्रह्मास्त्र चरमवृत्तिहि, पुर मूळाज्ञान, म्हणति सुज्ञ वर. ॥ ३६ ॥ कल्याणकरें जीवें असुरपुरें जागृदादि जीं तीन । सद्विद्यास्त्रें केलीं भस्म असें वर्णिती सुधी जीन. ॥ ३७ ॥ या त्रिपुराच्या दाहीं सद्धर्मचि मुख्य कारण स्पष्ट । स्तुति शंकरादि करिती ह्याचि महाविष्णु चुकवितो कष्ट. ॥ ३८ ॥ ज्ञानेश्वरींत ज्ञानोबारायांनी १७ व्या अध्यायाच्या प्रारंभीं ह्या रूपकाचा अमळ निराळ्या तऱ्हेनें उल्लेख केला आहे. तो असा:—'विश्वविकासित मुद्रा । जया सोडवी तुझी योगनिद्रा । तथा नमोजी गणेंद्रा । श्रीगुरुराया! ॥ १ ॥ त्रिगुण त्रिपुरीं वेढिला । जीवत्व दुर्गीं आडिला । तो आत्मशंभूनें सोडविला । तुझिया स्मृती' ॥ २ ॥ यांत सत्व, रज, तम ह्या त्रिगुणासच त्रिपुरें ह्मटलें आहे. त्रिगुणांनीं त्रासलेला जीवात्मा सद्गुरुस्मरणानें शिवानें किंवा आत्मशंभूनें सोडविला हा भावार्थ. **४. मुरदैत्याचा नाश करणारा. (विष्णु.)** **कथासंदर्भः—** मुर हा कश्यपाला दनूनामक पत्नीपासून झालेला पुत्र. ह्यानें देवांनीं युद्धांत

मला जरि म्हणाल बा ! तरि विशंक; लुब्रा म्हणा; ।

दैत्यांचा नाश केला हें पाहून पुष्कळ वर्षें ब्रह्मदेवाची आराधना करून एक वर मागून घेतला. तो असा कीं ज्याला ज्याला मी युद्धांत आपल्या करतलानें स्पर्श करीन तो अमर असला तरी मरावा. पुढें ह्यानें अमरावतीला जाऊन इंद्राला, व यमपुरीस जाऊन यमाला जिंकिलें. यमाच्या सांगण्यावरून हा क्षीरसागरनिवासी विष्णूस जिंकण्यास गेला. विष्णूनें तूं मला जिंकण्यास आलास पण तुझें उर भीतीनें धडधडतें तेव्हां अशा भित्र्याशीं मी युद्ध करित नाहीं असा याचा धिक्कार केला. तेव्हां यानें 'छे! ऊर कोठें धडधडतें आहे' असें म्हणून आपल्या हृदयावर जोरानें हात मारिला. त्याबरोबर तो जमिनीवर आदळला. अशा रीतीनें त्याचा वर त्यालाच बाधला. नंतर विष्णूनें आपलें चक्र सोडून त्याचें शिरकमळ छेदिलें. (वामनपुराण अ० ६० ). ५. **ब्राह्मणः**-'ब्रह्म' याचा मूळ अर्थ 'स्तोत्र', 'ब्रह्म करणारा' ह्मणजे 'स्तोत्र रचणारा' तो ब्रह्मा असा शब्द वेदांत अनेक ठिकाणीं आढळतो. "जो स्तोत्र गातो, जो इंद्रादि देवांचें स्तोत्र रचितो त्यास 'ब्रह्मा' अथवा 'ब्राह्मण' असें ह्मणत. त्यांचा अर्थ आतांप्रमाणें एक जातीचा पुरुष असा होत नसे. जो जो 'ब्रह्म' रची, मग तो कोणत्याही वर्गाचा मनुष्य असो त्यास 'ब्रह्मा' अथवा 'ब्राह्मण' ह्मणत असत. नंतर ब्रह्मकर्त्यांची हळूहळू जात झाली." (वेदार्थयत्न अंक १५ सूक्त ६२ मंडल १ मंत्र १३ वर टीप). भगवद्गीतेंत ब्राह्मणाचे गुण पुढील प्रमाणें सांगितले आहेत;=('शमो दमः' इ०) 'तप क्षमा दम शम शौचास्तिक्य अवक्रता। ज्ञान विज्ञान या झाल्या विप्रवर्णासह क्रिया' ॥ (गीतेवरील वामनी समश्लोकी १८.४२ ) स्मृतिवचन असें आहे-जन्मना जायते शूद्रः संस्काराद्विज उच्यते । वेदाध्ययनतो विप्रो ब्रह्म जानाति ब्राह्मणः' ॥ ब्राह्मण श्रेष्ठ कां? याविषयीं यजुर्वेदाचें वचनः='ब्रह्मजिज्ञानमित्याह तस्मात् ब्राह्मणो मुख्यो मुख्यो भवति य एवं वेद ब्रह्मवादिनो वदंति' । (हिरण्यकेशीशाखासंहिता, पांचवें अष्टक दुसरा अध्याय, सातवा अनुवाक.)

१. शंकारहित, खुशाल. **अन्वयार्थः-[मी तुह्मांस] क्षण (एकदां) पुरांतक (त्रिपुरांचा नाश करणारा-शिव) [व] क्षण (एकदां) मुरांतक (मुरदैत्यास मारणारा-विष्णु) [असें] ह्मणें (ह्मणतों); [याबद्दल] मला ब्राह्मणा (ब्राह्मणाला) बा ! (देवा !) जरि [तुह्मी] लुब्रा (तोंडपुजा) ह्मणाल (ह्मणणार असाल) तरि विशंक (खुशाल) ह्मणा; [पण खरा प्रकार असा आहे कीं] शिव तुह्मा (विष्णूला) [भजतो] तुह्मी (विष्णु) शिवा (शंकराला) भजतसां (भजतां) [हें मीच ह्मणतों असें नाहीं तर] हा सदर्थ (खरा अर्थ) शुक व्यास वदले (शुकाचार्य वेदव्यासासारख्या ज्ञात्यांनीं अशा प्रकारचें वर्णन पुराणांतून केलें आहे); [या] पुरातन कथा (जुन्या गोष्टी, पौराणिक कथा); नव्या (नवीन) न (नाहींत); [ह्मणून] सहा (सहन करा, माझें ह्मणणें न रागावतां ऐकून घ्या). प्रथमार्धाचा अर्थः-मी तुम्हांला एक वेळ पुरांतक शंकरा! म्हणून हाक मारितों, लगेच मुरांतक विष्णो! म्हणून आळवितों, यावरून मला जर आपण लुब्रा (तोंडपुजा, तोंडासारखें वरून बोलणारा) म्हणत असाल तर विशंक (खुशाल) म्हणा, पण मला तुम्ही वास्तविक दोघेही**

तुम्हा शिव, शिवा तुम्ही [1]भजतसां; [2]शुक, [3]व्यास हा
[4]सैंदर्थ वदले; [5]पुरातन कथा, न नव्या, [6]सहा. ॥ ७२
[7]तुझाचि [8]अवतार तो सुत पराशराचा; वळे,

---

एकरूपच वाटतां. २. तोंडपुजा. तोंडासारखें गोड बोलणारा. 'ब्राह्मणांची, विशेषतः भटांची याचकवृत्ति असते तेव्हां त्यांपैकीं पुष्कळ तोंडासारखे गोड बोलणारे असतात यावर तर पंतांचा कटाक्ष नसेलना? खात्रीपूर्वक कांहींच सांगवत नाहीं. 'लुब्रग हा शब्द हिंदुस्थानी आहे. 'कनककशिपुपरिस अधिक असमि असें तो झणे नया लुबरीं' (हरिवंश ४८.२०९.)

१. भक्ती करितां, पूजितां. तृतीयचरणार्थः–मुरांतक विष्णो! आपणास शिव पूजितो व आपण शिवाची पूजा करितां. हे मीच म्हणतों असें नाहीं तर व्यास व शुकाचार्य यांसारखे तुमचे भक्तही हेंच सत्य वर्णन करितात. कथासंदर्भः–शिव आपणास विष्णुभक्त म्हणवून घेतो व विष्णु आपणास शिवभक्त म्हणवितो. याविषयीं केका [illegible] 'मदंशिव-मनोविनोदास्पदा' यावरील टीप वाचावी. 'हरिवंशांत व्यासकृत वैशंपायन जनमेजयास 'शिव विष्णुसंबंध सांगतांना पुढील उद्गार काढितो:–'[illegible]' भजती अन्योन्यातें लीलेनें दास जीव नागाचा. [illegible] २. कथासंदर्भः–शुक हा कृष्णद्वैपायन व्यासास शुकीचें रूप [illegible] पुत्र होय. हा जन्मापासून ब्रह्मनिष्ठ होता. [illegible] ३. व्यास शब्दाचा अर्थः–वेदविस्तार करणाऱ्यांस व्यास म्हणतात. [illegible] मोडून ते सुव्यवस्थित करावें हें होय. देवी भागवता [illegible] होतो. कृष्णद्वैपायन हा अठ्ठाविसावा व्यास असून [illegible] आहे. (देवीभागवत स्कंध १ अध्याय ८.) [illegible] पाराशर व्यास उद्दिष्ट आहे. कथासंदर्भः–[illegible] झालेला पुत्र. ह्यानें अठरा पुराणें, भारत, भागवत हे ग्रंथ रचिले. ४. खरा अर्थ. ५. जुन्या पुरातन कथा–पुराणें. ६. सहन करा. शिवाला विष्णु व विष्णूला शिव म्हटल्याचा राग मानूं नका. चतुर्थचरणार्थः–शिव व विष्णु हे एकच आहेत, हे एकमेकांची भक्ति करितात ह्या गोष्टी जुन्या व पुराणांतील आहेत, नवीन नाहींत. ह्मणून माझ्या वर्णनाचा राग मानूं नका. ७. प्रास्ताविकः-मागल्या केकेंत हरिहरांत भेद नाहीं याबद्दल व्यासवचनाचा आधार दिला. यांत कवि व्यासाची प्रशंसा करून भगवन्नाममाहात्म्य वर्णन करण्यास सरसावतात. अन्वयः–तो पराशराचा सुत तुझाचि अवतार; जन तदुक्तिस वळे; प्रभो! त्रिभुवनेश्वरा! [तो] जरि निजेमध्यें चावळे तरि जी जना सुखी करि, ती तव विशुद्ध नामावली मावली [व्यासाच्या] मुखीं प्रकट होय. ८. व्यास हा भगवंताचाच अवतार आहे. तेव्हां त्यानें सांगितलें तें भगवंतानें सांगितल्याप्रमाणेंच आहे. व्यास भगवंताचाच अवतार याविषयीं वचनें:–(१) 'अवतरला जीवांवरि परम कराया अनुग्रह व्यास। ज्याच्या भगवान् घेतो पावक होउनि अनुग्र हव्यास. ॥'

[1]तदुक्तिस जन; प्रभो! जरि [2]निजेमधें [3]चावळे ।
तरि, [4]त्रिभुवनेश्वरा! तव [5]विशुद्ध [6]नामावली
[7]मुखीं प्रकट होय, जी करि सुखी [8]जना [9]मावली. ॥ ७३
[10]तुझें कुशळ नाम [11]बा! हळुहळू मना [12]आकळी;

---

[हरिवंश–अ० ९ गी० २२], (२) 'व्यासा! बा! साक्षात् तूं नारायण, जडजनासि ताराया । अवतरलासि दयार्णव बोधें अज्ञान सर्व साराया. ॥' [महद्विज्ञापना–८५]. (३) 'गरुडध्वजांश भगवान् व्यास द्वापरयुगांत अवतरला । यद्ग्रंथसेतुसंश्रित जन करुनि भवार्णवासि लव तरला. ॥' (मंत्रभागवत स्कं० १ गी०४). (४) 'ऐसा भगवान् व्यास ब्राह्मणरूपें मुकुंद अवतरला । जन ज्याच्या उपदेशें निजहित जाणुनि सुखेंचि भव तरला'. ॥ (आदि० अ० ८ गी० ४५). इतर पुराणांतही व्यास हा नारायणाचा अवतार आहे याविषयीं प्रमाणें सांपडतात. ९. **कथासंदर्भः–पराशर हा** मैत्रावरुणि वसिष्ठाचा नातु व शक्तिऋषीचा पुत्र. याच्या मातेचें नांव अदृश्यंति. ह्याच्या बापास राक्षसानें मारिलें; त्याचा सूड घ्यावा म्हणून ह्यानें राक्षससत्र आरंभून पुष्कळ राक्षसांचा संहार केला; शेवटीं पुलस्त्यऋषीच्या भिडेस्तव ह्यानें सत्रसमाप्ति केली. सत्यवतीला कौमार्यावस्थेंत ह्याच्याच पासून व्यास झाला.

१. **त्याच्या वचनास. व्यासवचनास जन (लोक) वळे (वळतात, अनुसरतात), अर्थांत त्याचें वचन प्रमाण मानून त्याप्रमाणें लोक वागतात.** २. **निद्रेमध्यें.** ३. **बरळला, भलभलतें बोलूं लागला.** ४. **स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ ह्या तीन भुवनांचा स्वामी जो तूं त्या!** ५. **अत्यंत पवित्र.** ६. **नाममालिका.** ७. **व्यासाच्या मुखांत. त्रैलोक्यपते! देवा! त्या व्यासाची योग्यता काय सांगावी! तो जरी निद्रेंत बरळला–बोलला तरी त्याच्या मुखांतून अत्यंत पवित्र अशीं भगवंताचीं नांवेंच निघतात. असावध स्थितींत सुद्धां ज्याच्या तोंडांतून भगवन्नामघोष ऐकूं येतो, त्याची योग्यता काय वर्णावी!** ज्यांना तुर्या अवस्था प्राप्त होऊन ब्रह्मसाक्षात्कार झाला त्यांनीं निद्रेंत सुद्धां साहजिक रीतीनें भगवन्नाम घेणें यांत नवल काय? ८. **लोकांना.** ९. **आई, माता. भगवन्नामश्रवण किंवा कीर्तन लोकांस मातेप्रमाणें अखंड सुख देतें. संसाराच्या तापत्रयापासून त्यांची सुटका होऊन त्यांस ब्रह्मानंदप्राप्ति होते.** १०. **प्रास्ताविकः–यांत व पुढील केकेंत कवि भगवन्नाममाहात्म्य वर्णितात.** ११. **देवा! बापा! पाठभेदः**–'तुझें कुशल नाम जो नर हळूहळू आकळी' असाही पाठभेद '**यशोदापांडुरंगी**' व '**सर्वसंग्रह**' यांत आढळतो, परंतु तो विशेष प्रशस्त नाहीं. १२. **आकळितें, वश करितें, स्थिर करितें. अन्वयार्थः–तुझें (भगवंताचें) कुशळ (कल्याणकारक किंवा चतुर) नाम (नांव) मना (मनाला) हळुहळू (युक्तीनें, सावकाश) आकळी (आकळितें, आकलन करितें). दुरत्यय (दुर्जय) असा (अशा प्रकारचा) महाखळहि (अत्यंत दुष्ट असाही) हा कळी त्यासि (त्या नामास) भी (भितो). हें (नाम) व्यसन (कलिकृतदुःख) [व] पाप (कलीनें घडविलेलें पातक) हरि (हरण करितें). बहु कशास (फार काय सांगावें) [हें नाम] योगमायाधवा (योगमायेच्या स्वामी देवा! कायाधवा-**

दुर्[१]त्यय असा महा खे[२]ळहि त्यास भी हा क[३]ळी; ।
हरि व्यसन[४] पाप हें; बहु[५] कशास? कायाधवा[६]-

---

परी (प्रऱ्हादाप्रमाणें) तुजहि (तुला देखील) (त्वरित लवकर) भेटवी (भेट करून देतें). प्रथमचरणार्थः—मन जरी अत्यंत दुर्निवार आहे तरी भगवंताचें नाम त्याला युक्तीनें स्ववश करितें. भगवन्नाम घेणाऱ्या मनुष्याच्या मनाचें आकलन हळुहळू होत जाऊन कांहीं काळानें त्याला परमेश्वराचें एकाग्रतेनें चिंतन करितां येतें. भागवत एकादश-स्कंधांत कृष्ण उद्धवास मनोनिग्रह कसा करावा तो सांगतातः—'वश मन होय विवरिसी विश्वाच्या उद्धवासि आणि लया । तत्वंपदार्थशोधन कीं मद्भजनचि वशासि आणि या ॥ ४२३ ॥' [मंत्रभागवत—एकादशस्कंध].

१. दुर्जेय, ज्याचा नाश होणें कठीण, अत्यंत प्रबळ. २. अतिशय दुष्ट. ३. कलिकाळ, कलियुगांत लोकांस पापप्रवर्तक करणारी देवता. (पृ० ५६ टीप १ पहा.) कळी जरी अत्यंत दुष्ट व दुर्जेय असा आहे तरी भगवंताच्या नामास तो भितो. भगवन्नामापुढें कलीचें कांहीं सुद्धां चालत नाहीं. केवढेंही उग्र पिशाच असलें तरी तें असें नरहरिमंत्र म्हटल्या असतां थरथर कांपतें व पछाडलेल्या मनुष्यास सोडून दूर पळतें, त्याचप्रमाणें कळी भगवन्नाम घेणाऱ्याच्या वाऱ्यास सुद्धां उभा राहत नाहीं इतका तो त्यास भितो. ४. दुःख (कलिकृत) नामप्रभावानें कलीनें घडविलेलें पातक व दुःख नाहींसें होतें. पण तें नामस्मरण अंतःकरणापासून असेल तरच कार्य करतें. याविषयीं पुढील एका आंग्लकवीचें अवतरण वाचनीय आहे:—

I often say my prayers; but do I ever pray?
And do the wishes of my heart go with the words I say?
I may as well kneel down and worship gods of stone;
As offer to the living God a prayer of words alone.
For words without the heart the Lord will never hear
Nor will He to those lips attend whose prayers are not sincere.

(JOHN Barton.)

कृष्ण उद्धवास म्हणतातः—'बा! रे! वारें नामें अघ अभ्रचि, नाम शुद्ध वारें च । मन्नामकीर्तन सुतरि पापाचा उतरि उद्धवा! रेंच ॥ ४२५ ॥' [मंत्रभागवत—एकादशस्कंध]. महाराष्ट्र कविवर्य साधु तुकाराम म्हणतातः—'तुटे भवरोग । संचित क्रियमाण भोग ॥ १ ॥ ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥ २ ॥ वसों न सके पाप । पळे त्रिविध तो ताप ॥ ३ ॥ तुका म्हणे माया । होय दासी लागे पायां ॥ ४ ॥' भागवताच्या षष्ठ स्कंधांत भगवन्नाममहिमा सविस्तर वर्णिला आहे. त्याचा छोटासा मासला पंतांच्या 'मंत्रभागवतां'तून पुढें दिला आहे:—'भगवन्नामोच्चारें सकळेंहि अघें सवासनें जळती । मळती न नामधारक, पळती यमदूत, विघ्न हीं टळती. ॥३॥ गणपतिस विघ्न तैसें भगवन्नामासि दोष कांपति, तें । माहात्म्य ऐकिल्यावरि गणिजेल यमोग्र शेष कां पतितें? ॥४॥, [मंत्रभागवत—स्कंध ६ गी० ३-४]. वामन पंडितांनीं ह्या प्रकरणाच्या आधारानें 'नामसुधा' रचिली आहे. ५. फार कशाला? ६. कयाधूचा पुत्र तो कायाधव.

परि त्वरित भेटवी तुजहि, योगेमायाधवा! ॥ ७४
तुम्हांसमचि हें गुणें; अणु उणें नसे नाम; हा

**कायाधवापरि=प्रल्हादाप्रमाणें. कथासंदर्भः**—हिरण्यकशिपूस कयाधूपासून चार पुत्र झाले. त्या सर्वांत ज्येष्ठ प्रल्हाद. ह्याची माता कयाधू ही जंभासुराची कन्या. हा जन्मतःच भगवन्निष्ठ परमभागवत होता. भगवन्नामग्रहणास्तव पित्यानें याचा फार छल केला. शेवटीं विष्णूला ह्याच्या कैवारास्तव स्तंभांतून प्रकट होऊन ह्याच्या पित्याचा वध करावा लागला. मोरोपंतांनीं विष्णुपुराणांतील कथेच्या आधारावर 'प्रल्हादविजय' नांवाचें एक सुरस आख्यान रचिलें आहे.

१. **द्वितीयार्धाचा अर्थः— भगवन्नाम आश्रितांचें दुःख व पातक तर नाहींसें करितेंच. फार कशाला, तें प्रल्हादाप्रमाणें ईश्वराची गांठ देखील लवकर घालून देतें. भगवन्नामस्मरणानें कयाधूपुत्र प्रल्हादास जसें देवाचें सत्वर दर्शन झालें तद्वत् इतरांसही तें होतें.** २. **योगमाया (प्रकृति)+धवा (पतीला). योगमायेचा पति ईश्वर त्याला, योगमाया जी मूलप्रकृति तिचा स्वामी त्याला. योगमायाः**—'चिदानंदमयब्रह्मप्रतिबिंबसमन्विता । तमोरजःसत्वगुणा प्रकृतिर्द्विविधा च सा ॥ १५ ॥ सत्वशुद्ध्यविशुद्धिभ्यां मायाऽविद्ये च ते मते । मायाबिंबो वशीकृत्य तां स्यात्सर्वज्ञ ईश्वरः ॥१६॥ अविद्यावशगस्त्वन्यस्तद्वैचित्र्यादनेकधा । सा कारणशरीरं स्यात् प्राज्ञस्तत्राभिमानवान् ॥ १७ ॥ (तत्वविवेक) मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरं । अस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥ २३ ॥ मायाधीनश्चिदाभासः श्रुतो मायी महेश्वरः । अंतर्यामी च सर्वज्ञो जगद्योनिः स एवहि ॥ ५७ ॥ (चित्रदीप) (पंचदशी.) 'जीमध्यें सच्चिदानंद ब्रह्माचें प्रतिबिंब आहे व जीमध्यें सत्व, रज व तम हे तिन्ही गुण माफक्या मानानें आहेत तिला प्रकृति असें ह्मणतात. तिचे दोन प्रकार आहेत. जीमध्यें शुद्ध सत्वगुण अधिक असून तो इतर दोन गुणांनीं गढूळ झालेला नसतो तिला माया म्हणतात, जीमध्यें तो गुण इतर दोन गुणांनीं गढूळ झालेला असतो, तिला अविद्या म्हणतात. मायेमध्यें प्रतिबिंबित जो चैतन्य आत्मा त्यानें मायेस स्वाधीन ठेविलें आहे. तोच सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् ईश्वर होय. माया हीच प्रकृति म्हणजे जगाचें उपादान कारण होय. आणि ही मायोपाधि ज्यानें धारण केली तोच परमेश्वर जगाचें निमित्त कारण होय. आणि याच्याच अंशरूपानें सर्व जग व्यापून गेलें आहे. माया ज्याचे स्वाधीन आहे त्यालाच श्रुतीमध्यें मायी, अंतर्यामी, महेश्वर, सर्वज्ञ व जगद्योनि अशीं नांवें दिलीं आहेत. अविद्येमध्यें प्रतिबिंबित जो चिदात्मा तोच जीव. तो परतंत्र आहे. या जीवास स्थूल, सूक्ष्म आणि कारण हीं तीन शरीरें आहेत. वर सांगितलेली अविद्या हीच याचें कारण शरीर आहे आणि त्याच्या अभिमानी जीवास प्राज्ञ म्हणतात. ३. **प्रास्ताविकः—यांत कवि नामाचा महिमा परमेश्वराच्या महिम्यापेक्षांही जास्त असें वर्णितात. हें (नाम) गुणें (गुणानें) तुम्हांसमचि (तुझ्या बरोबरीचें, तुझ्या योग्यतेचें) [आहे], परमेश्वराची व नामाची योग्यता सारखीच होय.** 'म्हणतां तुम्हीच हरिचें हरिहूनि उणें वदों नका यश तें' (वामनचरित्र २००) ४. **कोणत्याही पदार्थाचा अतिसूक्ष्म भाग. 'नाम (भगवन्नाम) अणु (लेशमात्रही, किंमपिही) उणें (कमी) नसे (नाहीं)'=भगवंतापेक्षां नामाची योग्यता रतिभर देखील कमी नाहीं.**

दिसे[1] अधिकही, तसा गुण तुला असेना महा; ।
सदैव[2] भलत्यासही[3] सुलभ[4]; आणखी गायका[5]
छळी[6] न, न अधोगति[7] क्षणहि दे जगन्नायका! ॥ ७९

---

१. किंबहुना हा गुण अधिकही दिसे, तसा महा (गुण) तुला असेना=नामाचे ठिकाणीं हा एक गुण (ज्याचें वर्णन उत्तरार्धांत केलें आहे तो) अधिक दिसतो तेवढा मोठा गुण तुझ्यांत नाहीं. २. सदोदित. ३. पाहिजे त्याला देखील. अनधिकाऱ्याला सुद्धां. ४. सुखें करून प्राप्त. भगवन्नामस्मरण करण्यास वर्णगुरु ब्राह्मणापासून वर्णाधम चांडाळापर्यंत सर्वांस सारखाच अधिकार आहे. हा ब्राह्मण, हा शूद्र, हा भेद नामाच्या ठिकाणीं नाहीं. भगवंताचें नांव पाहिजे त्या जातीच्या मनुष्यानें पाहिजे तेव्हां घ्यावें. त्याला आडकाठी नाहीं. तसा ईश्वर सदैव भलत्यास सुलभ नाहीं. भगवन्नाम व ईश्वरप्राप्तीचीं इतर साधनें:–ईश्वरप्राप्तीचीं योग, याग, दान, स्वाध्याय, यज्ञ, संन्यास, व्रत, तप इत्यादि पुष्कळ साधनें आहेत. तीं फार दुष्कर असून सर्व जातीच्या लोकांना त्यांचें अवलंबन करण्याचा अधिकार नाहीं. पण भगवन्नामाचें तसें नाहीं. तें पाहिजे त्या जातीच्या मनुष्यानें घेतलें तरी तो पापविमुक्त होतो. तसेंच यज्ञयागादि क्रिया फक्त ठरीव वेळेस मात्र करितां येतात तसा प्रकार नामाचा नाहीं. तें पाहिजे तेव्हां, पाहिजे त्या मिषानें घेतलें तरी 'सकल पातक भस्म करितें.' म्हणून वर कवीनें नामाची योग्यता ईश्वरापेक्षांही कांकणभर जास्त अशी वर्णिली आहे. योगयागतपश्चर्यादि साधनांपेक्षां ईश्वर भक्तीनें लवकर प्रसन्न होतो. योगसाधनानें ईश्वरप्राप्ति करून घेणाऱ्या पाठीमागें पुष्कळ विघ्नें लागतात. त्यांचें वर्णन 'मंत्रभागवत' एकादशस्कंधांत एके ठिकाणीं केलें आहे तें असें:–'वश करूनि इंद्रियें मन लावी जो श्वास जिणोनि मद्धयानीं। त्यानें काय करावें सावध असतां स्मरादि वध्यांनीं? ॥ ३५७ ॥ तेव्हां विघ्न कराया अणिमामहिमादि सिद्धि ज्या आठ। अन्याहि पंचदश वा योग्याची पुरवितात त्या पाठ. ॥ ३५८ ॥ बाधाविणें सिद्धि करिती माझ्या प्राप्तींत अंतरायातें। प्रथमचि विदित असावें त्यानें अहितत्व सनरायातें ॥ ३५९ ॥' ५. जो तुझें नाम गातो त्यास. भगवन्नामाचें कीर्तन करणाऱ्यास. ६. दुःख देत. [हें नाम] आणखी (शिवाय) गायका (नामसंकीर्तन करणाऱ्या मनुष्यास, ईश्वराचें भजन करणाऱ्यास) छळी न (छळीत नाहीं, दुःख देत नाहीं.) येथें 'छळ' शब्दावर श्लेष आहे. नामपक्षीं, छळणें म्हणजे दुःख देणें, ईश्वरपक्षीं, छळणें म्हणजे कपट करणें. ईश्वर आपल्या भक्तांचा आपल्यावरील दृढ विश्वास पहाण्याकरितां छल करितो. वामनावतारीं भक्तराजबळीशीं देवानें कपट करून त्यास कांहीं काळपर्यंत पाताळांत घातलें, या गोष्टीकडे या केकेंत कवीचें लक्ष्य आहे. ७. दुर्गति; पक्षीं, पाताळगति. हाही शब्द श्लिष्ट आहे. नामपक्षीं, अधोगति म्हणजे दुर्गति, व वामनपक्षीं, पाताळवास. पंतांनीं इतरत्रही ह्या शब्दावर श्लेषयोजना केलेली आढळते. 'मुक्तीहुनी शतगुणें बळिराज्याची अधोगतिहि सुगति'। (वामनचरित्र १९४) नाम आपल्या भजकांस दुःख देत नाहीं एवढेंच नव्हे तर त्यांस सद्गति देतें. उलट पक्षीं ईश्वर आपल्या भजकांस छळून (कपटानें फसवून) त्यांस अधोगति

[१]छळी [२]नृप [३]बळी [४]बळी, तरिच तो नसे [५]आटला;

---

(पाताळवास) देतो, तेव्हां ईश्वरापेक्षां त्याच्या नांवांत स्वभक्तोद्धारकत्व गुण विशेष रीतीनें वसतो हें स्पष्ट झालें. ८ क्षणभर देखील. केकासौंदर्यः–ईश्वरानें बलीस सावर्णी मन्वंतर येईपर्यंत अधोगति दिली म्हणजे त्यास पाताळांत राहावयास सांगितलें, पण भगवन्नाम आपल्या भक्तांस क्षणभर देखील अधोगति (दुर्गति) देत नाहीं, मग एक सबंध मन्वंतर संपेपर्यंत कोठून देणार? ९. जगत्पते! खुबीदार शब्दयोजनाः–पंतांनीं 'जगन्नायका!' हें विशेषण ईश्वरास लाजविण्यासाठीं घातलें असावें. ईश्वर सर्व जगाचा स्वामी असून आपल्या भक्तास छळतो व अधोगति देतो. तेव्हा यापेक्षां त्याला कमीपणा आणणारी गोष्ट कोणती राहिली? येथें व्यतिरेक अलंकार झाला आहे. याचें लक्षण वगैरे के० ३१ पृ० ८६ यांत दिलें आहे. व्यतिरेक अलंकाराचीं आणखी उदाहरणें:–(१) 'शर जेवि किरण भंवते, जें कौरवकटक तोचि परिवेष; । रविच कविमतें अर्जुन तेजें रूपेंहि, भिन्न परि वेष'॥ (द्रोण० १०-३७) (२) 'वज्राहुनि कठिण हृदय, शोकघनाहत तरी नगे न चिरे। [बा दग्धपक्षवळ मी, संपाति द्विज तसा जगेनचि रे]'॥ (कर्ण० ६.१५) (३) 'प्रभुशर सदय प्रभुहुनि कां मारुनि भूमिवल्लभ द्रवती। कन्यार्थिवीरहस्तीं दिधल्या सुरकन्यका सुभद्रवती'॥ (कृष्ण. ८३. १९८) (४) 'स्नेहकर तापहर करि धरुनी सुविशुद्ध देह लीला जो। तेणें यदुसंततिला कां दीपवती न देहली लाजो?'॥ (गदा० २.२३).

१. प्रास्ताविकः–ईश्वरानें केलेला छळ बळीनें मोठ्या धैर्यानें सोसला याबद्दल कवि यांत बळीची प्रशंसा करितात. अन्वयः–बळी नृप बळी [होता] तरिच तो छळीं आटला नसे; [तो] मला [च] बहु भला न गमे [तर] सकळांसही वाटला; जडहि हेमही परीक्षक करी तसें सोशितें; परंतु केवळ विरोचनात्मज न तरे [तर] हे मही[ही] तरे. २. नृ (मनुष्य)+प (पालक, स्वामी)=सर्व मनुष्यांचें पालन करणारा–राजा. ३. कथासंदर्भः–बळी हा प्रल्हादाचा नातू व विरोचन दैत्याचा पुत्र होय. ह्यानें इंद्रपदप्राप्तीकरितां शंभर यज्ञ करण्याचा निश्चय करून नव्याण्णव संपविले व शंभरावा सुरू करून तो कांहीं काळानें संपवावा, तों त्याला विघ्न करण्याकरितां देवेंद्राच्या प्रार्थनेवरून विष्णूनें अदितीच्या पोटीं जन्म घेतला व वामनरूपानें बळिराजा यज्ञ करीत होता तेथें जाऊन त्रिपादभूमीचें दान मागितलें. हें वामनाचें कपट बलीच्या लक्ष्यांत येऊनही त्यानें आपला गुरु शुक्राचार्य नको नको म्हणत असतां त्रिपादभूमिदानाचें उदक वामनाच्या हातावर सोडिलें. तेव्हां बटुरूप धारण करणाऱ्या वामनानें आपलें शरीर वाढवून एक पाय पृथ्वीवर ठेवून दुसऱ्यानें आकाश व्यापिलें. पाय वर केला त्याच्या भारानें अण्डकटाह फुटून भागीरथी खालीं म्हणजे पृथ्वीवर आली. दोन पावलांची अशा प्रकारें व्यवस्था लावल्यावर तिसरें पाऊल वामनानें बलीच्या मस्तकावर स्थापिलें व त्यास पाताळीं घातलें. बलीच्या भक्तीस भुलून वामनानें तूं सावर्णी मन्वंतरांत इंद्र होशील म्हणून त्याला वर दिला व आपण स्वतः त्याचा द्वारपाळ होऊन राहिला. वामनावताराचें बीजः–वामनावतारीं विष्णूनें तीन पावलांनीं सर्व भुवनांचें आक्रमण केलें ह्या पौराणिक कथेचें बीज ऋग्वेदांतील विष्णूच्या वर्णनांत आहे असें पुष्कळ वैदिक पंडितांचें मत आहे. विष्णु म्हणजे सूर्यरूपीच देवता. सूर्य उगवतो तेव्हां त्याचें पहिलें पाऊल पडलें. असें समजायाचें; तसेंच तो मध्यान्हीं आकाशमंडळाच्या मध्यभागीं येतो

गमे बहु भला[1] मला न, सकळांसही वाटला; ।
परीक्षक[2] करी, तसें जडहि[3] सोशितें हेमें[4]ही;

तेव्हां त्याचें दुसरें पाऊल पडतें व तो संध्याकाळीं मावळतो तेव्हां त्यानें तिसरें पाऊल पडतें म्हणून समजावें. हीं तीन पाउलें टाकलीं म्हणजे विष्णु अथवा सूर्यरूपी देवता सकलभुवनांचें आक्रमण संपवितो. ऋग्वेदांतील विष्णुसूक्तांत (उदाहरणार्थ मं० १ सू० २२ अतो देवा अवन्तु) जें विष्णूचें वर्णन केलें आहे तें सर्व सूर्यदेवतेला उत्तम रीतीनें लागू पडतें. नित्य सूर्य मध्यान्ह-समयीं आकाशशिखरावर चढतो त्यालाच विद्वज्जन विष्णूचें परम पद (तद्विष्णोःपरमं पदं) म्हणतात. सायणाचार्य पहिलें पद पृथ्वी, दुसरें पद अंतरिक्ष व तिसरें पद द्युलोक, असें मानतात. विष्णूला त्रिविक्रम (त्रि–तीन, विक्रम–पाऊल, अर्थात तीन पावलांचा देव, सूर्यरूपी विष्णु) याच कारणास्तव म्हणतात. ४. **बळकट, धैर्यशाली. प्रथम चरणार्थः–बळिराजा खरोखर धैर्यशाली होता, म्हणूनच तो वामनानें केलेल्या छळांत हरला नाहीं.** बळीच्या एक गोमण्याविषयीं प्रत्यक्ष भगवंतांनीं पुढील उद्गार काढले आहेत:–'अत्यद्भुत म्हणे या दुसरा अन कोण सत्य न त्यजिता ? । यानें शुचिसत्त्वबळें हारविलें मज अशाहि अर्थाजना. ॥१५१॥ हा बळि सत्वें समधिक या प्रल्हादापितामहापरिस । बा उतरला बहुकष्ट प्राणांस कसा, तरि पितामहा परिस. ॥१५२॥ प्रल्हादाला होता गुरूचा, माझाहि आश्रय पहा, या बळिला एवढि नव्हता मत्कृत अत्यद्भुत च्छळ सहाया.' ॥१५३॥ (वामनचरित्र–मोरोपंत) **खुबीदार शब्दयोजनाः–**आटणें, हा धातूच्या प्रयोगानें कवीनें छलनतापाचें अत्यंत प्रखरत्व सुचविलें. बळीशिवाय इतर कोणी असता तर तो त्या छळाच्या आंचेत खचित शुष्क झाला असता–असें कवीचें म्हणणें. ५. **शुष्क झाला, हरला.**

१. **सहनशील. द्वितीय चरणार्थः–तो बळिराजा मलाच भला वाटला असें नाहीं, तर सर्व लोकांसही भला वाटला. मीच काय पण ज्यानें ज्यानें बळिराजाची गोष्ट ऐकिली त्यानें त्यानें मान डोलवली.** २. **सुवर्णाची परीक्षा करणारा कारागीर, सोनार.** ३. **वजनांत जड असेंही; पक्षीं, मूर्खही.** येथें 'जड' हा शब्द श्लिष्ट आहे. **तृतीय चरणार्थः– सोन्यासारखा जड पदार्थही, सोन्याची परीक्षा करणारा कारागीर जसें त्याला तावील, घांसील, तोडील, वांकवील, त्याप्रमाणें तापतो, घांसला जातो, तुटतो, वांकतो. सारांश परीक्षक त्याचा जितका छळ करील तितका तो निमूटपणें सहन करितो.** ४. **सुवर्णही.** सुवर्णाची परीक्षा त्याला अग्नींत टाकून तापविल्याशिवाय होत नाहीं. हा उद्गार कालिदासानें रघुवंश–सर्ग १ श्लो० १० यांत (१) ('हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा') काढिला आहे. तसेंच 'भावप्रकाशां'त म्हटलें आहे कीं:– (२) 'दाहेऽतिरक्तमथ यच्च सितं छिदायां काश्मीरकांति च विभाति निकापपट्टे । स्निग्धं च गौरवमुपेति च यत् तुलायां जानीत देवकनकं मृदुरक्तपीतम्. ॥' (३) एका रसिक कवीनें सुवर्णाच्या तोंडांत सुवर्णकाराविषयीं पुढील हृदयंगम उक्ति घातली आहे:– 'हे हेमकार! परदुःखविचारमूढ! । किं मां मुहुः क्षिपसि वारशतानि वन्हौ ॥ दग्धे पुनर्मयि भवंति गुणातिरेकाः । लाभः परं खलु मुखे तव भस्मपातः' ॥ (४) '[साध्वि] गुणकरच्चि ताउन दाहच्छेदादिसहन हेमा जें'. (हरिश्चंद्र ३.७४) भारत-भागवतादि ग्रंथ वाचणारांस, असें दिसून येईल

न केवळ विरोचनात्मज[1] तरे पदें, हे मही[2]. ॥ ७६
असा[3] न करितां जरी छल, तरी प्रभो! तो भली

का परमेश्वरानें आपल्या भक्तांना कसास लावण्याकरितां त्यांचा छळ केला व त्यांच्यावर नाना-प्रकारचीं संकटें आणलीं; व अशाही संकटांतून जे नीटपणें पार पडले त्यांना त्यानें अत्युच्च पदवीस चढविलें. प्रल्हाद, बलि, मयूरध्वज, हंसध्वज, भद्रायु, जेहोवाभक्त जॉब, हरिश्चंद्र, श्रियाळ, इत्यादि भगवद्भक्तांच्या चरित्रांत हेंच रहस्य आढळतें. भक्त भद्रायुनृप कसास उतरला तेव्हां त्याला शंकर म्हणतात:— 'भावपरीक्षेकरितां केला छळ परि कसी उतरलास । मी भक्तांस स्वपदीं करितां सुस्थिर सदा सुतरलास.' (ब्रह्मोत्तरखंड १४. ३७). परमेश्वर भक्तांचा छळ त्यांच्या कल्याणार्थ करितो म्हणून सद्भक्तांनी लोकांनीं आपल्यावर येणाऱ्या संकटास्तव परमेश्वराला दोष न लावितां त्यांना आपल्या सत्वास जागावें. छळापासून किंवा संकटांपासून अंतीं त्यांचें हितच होतें. पुढील वचनें यासंबंधानें वाचनीय आहेत:— (१) 'बहुतेज प्रकट करी शुचिसत्वगुण च्छळीं, हिरा जसा' । (भारत) (२) 'हीरातें जेंवि घनीं परीक्षितां अग्निमाजि हेमातें । तूंतें छळीं मिळाली अत्यंत प्रीति आजि हे मातें.' ॥ (स्वर्गारोहण) (३) 'छळितो परंतु सयश वाढवितो, ज्यासि नाडितो दहन । तें पहिल्याहुनि पावे पुष्कळ संपत्ति मालतीगहन. ॥ ४४ छळ साहतां सुकृतें पाप जळे होय भद्र बहु मोठें । हें मृदुयलें घडतां चतुरें व्हावें जनांत कां ओठें.' ॥ ४५ (सदयोदय) (४) 'ज्या शाणघर्षणादिक संस्कार, चढे गुणासि तोचि मणी.' (हरिश्चंद्राख्यान ५. २३) (५) 'तापल्यावांचून नव्हे अलंकार । पिटूनीयां सार उरलें तें.' (तुकाराम). (६) 'For, whom the Lord loveth he correcteth; even as a father the Son in whom he delighteth.' (Prov. 3. 12.) (७) 'Blessed is the man that endureth temptation: for when he is tried he shall receive the crown of life, which the Lord hath promised to them that love him.' (James 1. 12.)

१. **विरोचनसुत बळी. चतुर्थ चरणाचा अर्थः— बळीचा छळ देवानें केला खरा, पण त्यामुळें त्याचाच उद्धार झाला असें नाहीं तर पृथ्वीही तरली. बळीच्या परीक्षणांत आश्चर्य हे झालें कीं त्यांत दाता जो बळी त्याचा उद्धार होऊन देय वस्तु जी पृथ्वी तीही तरली. येथें बळीच्या उद्धाराबरोबर प्रसंगतः पृथ्वीचा उद्धार झाला असें वर्णन केलें म्हणून येथें अनुषंग नामक अलंकार झाला आहे. 'एक-**स्मिन्क्रियमाणे तज्जातीयस्य प्रसंगतः सिद्धिरनुषंगः' [अलंकारसर्वस्व—पृ० १३७.] **२. पृथ्वी. 'पृथ्वी' या शब्दानें 'पृथ्वीवरील प्राणी' असा अर्थ उपादानलक्षणेनें घेतला पाहिजे.** ह्या लक्षणेला इंग्रजींत Metonymy म्हणतात. **३. प्रास्ताविकः— तुम्हीं बळीचा छल केला तो उगीच केला नसून त्यापासून त्याचें व जगाचें कल्याण व्हावें असा तुमचा हेतु होता अशा अभिप्रायानें कवि म्हणतात. ४. अन्वयार्थः— प्रभो! (देवा)! [तुम्ही बळीचा] असा (अशा प्रकारचा) छळ न करितां तरी (तर) जिणें (ज्या कीर्तीनें) कविसभा (ज्ञानी लोकांची मंडळी) शोभली (शोभा पावली) [अशी] भली (सुंदर, निर्मळ) सुकीर्ति (सयश, सत्कीर्ति) तो (बळीराजा) कशि पा-**

सुकीर्ति कशि पावता[1] कविसभा[2] [3]जिणें शोभली? ।
पदीं[4] उपजती नदी[5] कशि? कशी त्रिलोकी[6] सती
अशा[7] अतुल मौक्तिकावलिविणें[8] बरी[9] [10]दीसती? ॥ ७७

वता (कशी मिळविता)? [तशीच] पदीं (तुमच्या पायापासून) नदी (भागीरथी) कशी उपजती (उपजली असती)? अशा अतुल (अप्रतिम) मौक्तिकावलिविणें (मोत्यांच्या माळेवांचून) त्रिलोकी सती (स्वर्ग मृत्यु पाताळ हे तिन्ही लोक हीच साध्वी स्त्री) कशी बरी (चांगली) दीसती (दिसली असती)? 'असा न करितां........नदी कशि?' याचा अर्थः- देवा! तुम्ही बळीचा असा छळ केला नसता तर त्याची कीर्ति वाढली नसती, व्यासशुकसनकादि कविजनांना त्याचें यश गावयास मिळालें नसतें व त्रैलोक्याला भूषविणारी भागीरथी तुमच्या पायापासून उत्पन्न झाली नसती. तेव्हां तुम्ही बळीचा छळ केला म्हणून तुम्हांस दोष देण्यास काडीमात्र जागा नाहीं. तुम्हीं केलें तें योग्यच केलें. 'प्रल्हादवंशजीं छळ करि कल्याणार्थ कनकपट तो कीं, । करितो अहितपदार्थ त्यजावया स्पष्ट जन कपट तो कीं.' (वामनचरित्र १९०) ह्याचें उत्तरार्ध १०६ व्या केकेशींहि समानार्थक आहे. ५. चांगली. सुंदर, निर्दोष.

१. मिळविता, प्राप्त करून घेता. २. ज्ञानी जनांची मंडळी. ३. ज्या बळीच्या सत्कीर्तीनें. ४. पायाचे ठिकाणीं, पायापासून. ५. भागीरथी. तुम्हीं बळीचा छळ केला नसता, तर तुमच्या पायापासून गंगेची उत्पत्ति कशी झाली असती? अर्थात झाली नसती. ६. स्वर्ग, मृत्यु, आणि पाताळ यांचा समुदाय तो त्रिलोकी. त्रिलोकी हीच कोणी सती म्हणजे साध्वी स्त्री. ७. अनुपम. ८. मौक्तिक (मोतीं)+आवलि (पंक्ति)=मोत्यांची माळ; तिजविण-मोत्यांच्या माळेवांचून. 'कशी त्रिलोकी... दीसती' याचा अर्थः- साध्वी स्त्रीच्या गळ्यांत मोत्यांची सुंदर माळ असल्यानें तिला जशी शोभा येते तद्वत् भागीरथी उत्पन्न झाल्यामुळे स्वर्गमृत्युपाताळ अशा तिन्ही लोकांना अप्रतिम शोभा आली. भागीरथी ही मोत्यांच्या माळप्रमाणें त्रिभुवनास भूषणरूप झाली. ९. सुंदर, कल्याणकारिणी. १०. दिसली असती. केकामाधुर्यः- 'सारांश जर वामन त्या बळीच्या निष्ठेची अशी परीक्षा न करिता, तर त्या बळीची सत्कीर्ति झाली नसती, आणि त्रैलोक्यास पावन करणारी अशी भागीरथीही उत्पन्न न होती. तात्पर्य हेंच कीं भगवान् समयविशेषीं आपल्या भक्तांची परीक्षा पहाण्याकरितां त्यांचा जो छळ करितो त्यांतही जगाचें कल्याण करण्याचा त्याचा उद्देश असतो. येथें त्रिलोकांच्या संबंधानें आवलि या शब्दप्रयोगानें स्वर्गास शोभविणारी मंदाकिनी, पाताळास शोभविणारी भोगावती व पृथ्वीस शोभविणारी भागीरथी अशा गंगेच्या त्रिविधरूपांचें ग्रहण ध्वनित होतें. यांत त्रिलोकीस स्त्रीत्व कल्पून भागीरथीच्या त्रिविध रूपावर मौक्तिकाच्या तिपदरी हाराची कल्पना करून उपमान उपमेयाचें अभेदरूपानें वर्णन केलें आहे; म्हणून येथें हा रूपकालंकार जाणावा.' [य० पां०-पृ० २७४.].

नको[1] छळ; अधीर[2] मी; तशि[3] न कीर्ति हो[4]; चामरें[5]
नृपासि उचितें; वृथा[6], मिरविलीं[7] जरी पामरें[8]; ।
अकीर्तिच[9] असो, रुचे तुज कशी व्रजीं[10] कांबळी[11]?
असें[12] न समजा कसें? वरिल हारिला[13] कां बळी[14] ॥ ७८

---

१. प्रास्ताविकः– बळीसारखा छळ करून मग माझ्यावर कृपा करावी असें जर तुमच्या मनांत येत असेल तर देवा! तसा छळ सोसण्याचें माझे आंगीं सामर्थ्य नाहीं व त्या छळापासून मिळणारी कीर्तिही मला नको. बळीराजा परम समर्थ होता म्हणूनच वामनावतारीं त्यानें तुमचा असा भयंकर छळ सोसला आणि तशी सुकीर्तिही मिळविली. मी केवळ असमर्थ आहें म्हणून माझी तरी परीक्षा घेऊं नका व त्यापासून मिळणारी कीर्तिही मला देऊं नका. ज्याची कीर्ति त्यालाच शोभते. बळीची योग्यता मला पामराला कोठली? अशा आशयानें कवि परमेश्वराला प्रार्थितात. २. सहनशील नाहीं असा. बळीसारखें धैर्य माझ्यांत नाहीं. ३. अलौकिक. छळाशिवाय अलौकिक कीर्ति कशी मिळेल असें म्हणाल तर देवा! तशी माझी कीर्ति व्हावयास नको. ४. होवो. ५. चवऱ्या. चमरी नांवाच्या मृगांच्या केंसाच्या ह्या चवऱ्या करितात म्हणून त्यांस चामरें म्हणतात. नृपांसि उचितें=चवऱ्या ह्या राजांलाच शोभतात. ६. व्यर्थ. ७. फिरवून घेतलीं, वारून घेतलीं. ८. गरीबानें, दरिद्र्यानें. दरिद्र्यानें जरि आपल्या मस्तकावरून चवऱ्या वारून घेतल्या तरि त्या त्याला भूषणास्पद न होतां उलट दूषणास्पद होतात, तद्वत् बळीची कीर्ति बळीलाच योग्य, मला योग्य होणार नाहीं. ९. अपकीर्तिच. बळीची योग्यता मीं नको म्हटली म्हणून जरी माझी अपकीर्ति झाली तरी होवो. मी अपकीर्तिच पतकरतों. १०. गोकुळांत. तुला गोकुळांत कांबळी कशी आवडली? पीतांबर नेसून शालजोडी पांघरण्याची तुमची योग्यता असतां केवळ आपले संवगडी गोपाळ यांच्या सारखाच आपलाही वेष असावा अशा हेतूनें तुम्हीं गोकुळांत घोंगडी पांघरावयास घेतली. असें करण्यांत जशी तुह्मीं मानापमानाची चाड धरिली नाहीं त्याप्रमाणें मीही अपकीर्तीची पर्वा करित नाहीं. घोंगडी पांघरण्यानें वास्तविक जशी तुमची योग्यता कमी झाली नाहीं, त्याप्रमाणें बळीची कीर्ति मला नको म्हटलें म्हणून माझी अपकीर्ति होत नाहीं. ११. घोंगडी. सरस उपमाः–येथें अपकीर्तीला जी कांबळीची उपमा दिली आहे ती मूल्यहीनतेस्तव व कृष्णत्वास्तव फार सरस आहे. हास्य व कीर्ति यांचा रंग पांढरा, आकाश व पाप यांचा रंग काळा, प्रेम व क्रोध यांचा रंग तांबडा असे रंगांविषयीं कवींचे संकेत आहेत. १२. ही गोष्ट तुमच्या ध्यानांत कशी येत नाहीं? १३. पराजयास, अपजयाला. १४. पराक्रमी पुरुष पराजयाला कां पतकरील? पतकरणार नाहींत. कोणीही मनुष्य अंगांत शक्ति असून पड खाणार नाहीं. अशक्त, बलहीन मनुष्यच हार घेतील. मी बलहीन आहें म्हणूनच हार घेतों. सुकीर्ति सोडून अपकीर्तीची इच्छा कां करितोस असें देवा!

[1]छळाल [2]कृपणासी कां? [3]अजि! [4]दयानिधे! कांपिती
[5]भटासि भट [6]संगरीं, परि न [7]कातरा दापिती; ।
कराल तितुकी कृपा बहु; अहो! [8]शरण्या! [9]तमीं

**आपण म्हणाल तर त्यांत माझा कांहीं दोष नाहीं. मी समर्थ असून अपजय पतकरित नाहीं, तर बलहीन म्हणूनच पतकरितों. बळीची योग्यता माझ्या अंगांत नाहीं म्हणून केवळ निरुपायास्तव मी अपकीर्ति स्वीकारितों.** 'चामरें...पामरें' ही सामान्योक्ति दृष्टांतरूपानें यांत सांगितली आहे. **ह्यांत अर्थांतरन्यास आणि दृष्टांत असे दोन अलंकार झाले. सुभाषितः-**'चामरें नृपासि उचितें; वृथा मिरविलें तरी पामरें' हें उत्तम सुभाषित होय.

१. **प्रास्ताविकः-छळ सोसण्यास मी असमर्थ आहें त्या पक्षीं तुम्ही माझा छळ करणार नाहीं अशा अभिप्रायानें कवि म्हणतात.** अन्वयः 'अजि! दयानिधे! [तुह्मी] कृपणासि कां छळाल? संगरीं भट भटासि कांपिती परि कातरा न दापिती; [छळा वांचून] कराल तितकी कृपा बहु; अहो शरण्या! मी शरणागत अरण्यांत तमीं बुडोनि श्रमतसें.' २. दीनाला, गरीबाला. ३. अहो! ४. दयासागरा! **अहो दयासागरा देवा! तुम्ही मला दीनाला कशाला छळाल? छळणार नाहीं हेंच खरें.** ५. **योद्ध्यास.** ६. **युद्धांत. शूर पुरुष लढाईंत आपल्या बरोबरीच्या शूरास मारितात. ते भित्र्यांना दटावित देखील नाहींत मग मारण्याची गोष्ट लांबच.** 'शक्तीनें समर्थ व त्याच्या निग्रहाची परीक्षा पाहणारे तुम्हांला समर्थ. तेव्हां त्याला जो छळ तुम्ही केला तो त्यासच योग्य, मजसारखा दीन नरा छळास पात्र नाहीं. असा सामान्य न्याय मनावर कटाक्ष ठेवून **कांपिती भटासि...दापिती ही येथें कवीची दृष्टांतोक्ति जाणावी.**' [म० पा० - पृ० २७९.] ७. **भ्याडांस, भित्र्यांना. प्रत्येक वीरानें आपल्या बरोबरीच्या वीराशीं लढावें असा धर्मयुद्धाचा एक नियम आहे.** ८. ज्याला शरण जातात तो शरण्य; हे रक्षण**स्थाना! मजवर तुम्हीं कितीही थोडी कृपा केली तरी ती मला फारच होय.** ९. **अंधकारांत. 'मज दीनावर छळावांचून जितकी कृपा कराल तितकी मला पुष्कळ होईल' असें कवीनें म्हटलें, तें आपलें दैन्य कवि येथें वर्णितात.** 'छळ न करितां कराल प्रभुजी! जी तीच मज दया मोठी। अपमान श्रम नसतां जें थोडें स्वल्प तेंचि धन कोटी॥ ४७ असतां अघहर गंगाह्रद शिखिकुंडीं शिरेल कोण कवी? । आरोग्य शर्करा दे तरि कटुकीचा न घे रसज्ञ चवी.' ४८ ॥ (दत्तदयोदय). **देवा! हा मी तुमचा शरणागत या संसाररूपी अरण्यांत आणखी अज्ञानरूप अंधकारांत बुडून श्रम पावत आहें. मी वाट चुकून ह्या संसाररूप निर्जन वनांत आलों. तशांत येथें अज्ञानरूप अंधकार तर खूपच पडला आहे म्हणून मला मोक्षरूपी मार्ग दिसत नाहीं, व अंधारांत चालतांना मध्यें कामक्रोधादि खांच खळगे लागतात त्यांत मी पडतों. मला स्वतःच्या साह्यानें ह्या गाढ अंधकार पडलेल्या रानांतून बाहेर निघतां येत नाहीं. म्हणून मी आपणास शरण आलों आहें. मला आपण भक्तिज्ञानाचा सुप्रकाश दाखवून ह्या संसारारण्यांतून बाहेर काढा.**

बुडोनि शरणागत [1]श्रमतसें [2]अरण्यांत [3]मी. ॥ ७९

[4]मुखासि [5]जंव [6]पातलीं 'श्रम,' '[7]अरण्य' ऐशीं [8]पदें,

[9]निजस्मृतिस जाहलीं [10]विषयें तीं [11]तंव [12]श्रीपदें; ।

---

१. **दुःख पावतों.** २. 'यांत कवीनें भगवंताचें दयालुत्व आणि भक्तवात्सल्य दर्शवून आपलें बलहीनत्व आणि भगवत्परीक्षणानर्हत्व ध्वनित केलें. **हा दृष्टांतालंकार होय.**' [य० पां०—पृ० २७९.] ३. **कवि मोरोपंत. यांत 'तम' पदानें अज्ञान आणि 'अरण्य' शब्दानें भव यांचें ग्रहण करणें इष्ट आहे. अज्ञान आणि भव यांचें निगरण (गिळणें) केलें म्हणून रूपकातिशयोक्ति अलंकार झाला.** ४. **प्रास्ताविकः—मागल्या केकेच्या शेवटीं 'श्रमतसें अरण्यांत मी, असें कवीनें म्हटलें. तेवढ्यावरूनच कवीला रामावताराची कथा आठवून ती ते ह्या व पुढील चार केकेंत वर्णितात.** श्रम व अरण्य एवढे दोन शब्द तोंडांतून बाहेर निघाल्याबरोबर भगवंताला रामावतारीं पित्राज्ञापालनास्तव जो चौदा वर्षें सीतेसह वनवास भोगावा लागला व त्यांना जे श्रम झाले त्या सर्वांची कवीला आठवण झाली. यावरून सर्व वेगांत मनाचा वेग अत्यंत श्रेष्ठ आहे असें वाचकांस दिसून येईल. मनाच्या वेगाविषयीं कौपर नामक इंग्रेजी कवीचें पुढील पद्य वाचनीय आहेः—

'How swift is a glance of the mind,
When compared with the speed of its flight,
The tempest itself lags behind,
And the swift-winged arrows of light.' (Cowper)

५. **जेव्हां.** ६. **पोंचलीं. मुखास पातलीं=तोंडाशीं येऊन पोंचलीं, तोंडांतून बाहेर निघालीं.** ७. **व्यु०**—'अरण्य' यांतील 'अ'चा लोप होऊन मराठींत 'रान' झालें. ८. **शब्द.** ९. **आपल्या आठवणीस, माझ्या स्मरणास.** १०. **स्थान, आश्रय.** ११. **तुझीं, रामचंद्राचीं.** 'तंव' (त्या काळीं, तेव्हां) असाही एक पाठ आहे व तो प्रशस्त आहे. **पाठभेदः—** 'जंव' शब्दामागून 'तंव' (तेव्हां) शब्द येणें योग्य आहे. **अन्वयार्थः— जंव (ज्या काळीं) श्रम अरण्य ऐशीं पदें ('श्रम' 'अरण्य' हे शब्द) मुखासि पातलीं (तोंडाशीं आलीं, तोंडांतून निघालीं) [तंव] (त्या काळीं) गुरूक्तीस (बापाच्या वचनास) सफल करावया (खरें करण्यास) जीं (पावलें) त्वरित (लगबगीनें) धांवलीं. तीं (प्रसिद्ध) तव श्रीपदें (शोभायमान, किंवा कल्याणकारक पावलें) निजस्मृतीस (आपल्या, अर्थात् माझ्या स्मरणास, आठवणीस) विषय (स्थान, आश्रय) जाहलीं (झालीं).' प्रथमार्धाचा अर्थः—'श्रम' 'अरण्य' असे शब्द माझ्या तोंडांतून निघतांच देवा! मला तुमच्या सुंदर चरणांची आठवण झाली.** १२. **श्री—मंगलरूप, कल्याणदायक, पदें—पावलें=भगवंताचीं मंगलदायक पावलें.**

## गुरूक्तिस करावया सफळ, जानकीजीवना !

---

**१. गुरु–पिता, त्याच्या उक्तीस–वचनास=पित्याच्या वचनास. २. फलयुक्त, सार्थ, खरी. रामास वनवासास पाठवितों असें रामपिता दशरथ यानें कैकेयीस दिलेलें वचन खरें करण्याकरितां राम वनांत गेले. कथासंदर्भः**–इक्ष्वाकुकुलोत्पन्न दशरथराजास कौसल्या, सुमित्रा व कैकेयी अशा तीन मुख्य स्त्रिया होत्या. बहुतकाळपर्यंत राजास संतति झाली नाहीं म्हणून त्यानें कुलगुरु वशिष्ठाच्या सूचनेवरून ऋष्यशृंगाला ऋत्विज करून पुत्रकामेष्टी यज्ञ केला. यज्ञसमाप्तीचे वेळीं अग्निकुंडांतून प्राजापत्य पुरुष निघून त्यानें राजास पायसपात्र दिलें. त्याच्या प्राशनानें तिघीही राण्या गर्भवती होऊन त्यांना योग्य काळीं पुत्र झाले. ज्येष्ठ राणी कौसल्येला श्रीविष्णूच्या अंशानें चैत्रशुद्ध नवमीस सुमुहूर्तावर राम झाला. त्याचप्रमाणें सुमित्रेस लक्ष्मण व शत्रुघ्न व कैकेयीस भरत असे पुत्र झाले. लक्ष्मण हा शेषाचा अंश होता. ह्या चारी बंधूंचे व्रतबंध झाल्यावर त्यांना वसिष्ठानें सांग वेदोपवेद शिकविले. नंतर कांहीं दिवसांनीं विश्वामित्रऋषीनें स्वयज्ञसंरक्षणार्थ दशरथापासून रामलक्ष्मणांस मागून घेतलें. अयोध्येहून ऋषींच्या आश्रमाकडे जात असतांना मार्गांत रामानें ताटिका नामक राक्षसीचा वध केला (के० ५५ पृ० २४६ टी० पहा). पुढें आश्रमास गेल्यावर रामलक्ष्मणांच्या साह्यानें राक्षसांचा उपद्रव नाहींसा होऊन विश्वामित्रांचा यज्ञ निर्विघ्नपणें सिद्धीस गेला. त्यानंतर ऋषि रामलक्ष्मणांना बरोबर घेऊन जनकाच्या बोलावण्यावरून सीतेच्या स्वयंवराकरितां मिथिलेस जाण्यास निघाले. मार्गांत रामानें शिलारूप प्राप्त झालेल्या गौतमभार्येस पदस्पर्श करून स्त्रीरूप दिलें (के० ३६ पृ० १०४ टी० २ पहा). मिथिलेस गेल्यावर शिवधनूचा भंग करून रामानें सीतेचें पाणिग्रहण केलें. त्यानंतर सर्व मंडळी अयोध्येस परत आल्यावर कांहीं दिवसांनीं दशरथानें रामास यौवराज्याभिषेक करण्याचें ठरविलें. पण मध्यंतरीं कैकेयीची दासी मंथरा हिनें भरताला सिंहासनावर बसवून रामाला वनवासाला पाठविण्याविषयीं राजाचें मन वळवावें म्हणून कैकेयीला सल्ला दिला. त्यावरून कैकयीनें पूर्वीं देवदैत्यांच्या युद्धप्रसंगीं आपणांस राजानें दोन वर दिले होते, त्यांपैकीं एका वरानें त्यानें रामाला चौदा वर्षें वनवासास पाठवावें व दुसऱ्या वरानें भरताला राज्याभिषेक करावा असें मागितलें. हे कठोर भाषण ऐकून राजाला मरणप्राय दुःख झालें. पण पूर्वी देऊं केलेले वर आता देत नाहीं असें त्या सत्यप्रतिज्ञ राजास तर ह्मणवेना. तसेंच सर्व अयोध्येचें प्रेमस्थान अशा रामानें वनवास करावा हेंही त्यास बरें वाटेना. अशा स्थितींत पित्याला पाहून पित्याचें भाषण सत्य करण्याकरितां पितृभक्त राम वनवासास जाण्यास निघाले. तेव्हां प्रियपत्नी सीता व बंधु लक्ष्मण हेही त्याजबरोबर जाण्यास निघाले. अरण्यवासास जाण्यांत रामाचा दुसराही एक हेतु होता. रावणादि राक्षसांनीं देवांना व ऋषींना अतिशय त्रासवून सोडलें होतें. त्यांच्या त्रासांतून देवमुनींना सोडवावें, तसेंच आपल्या दर्शनाकरितां हजारों वर्षांपासून तीव्र तप करणाऱ्या महर्षींस भेट द्यावी हा त्यांतील गुप्त हेतु होता (केका ८० पहा). अयोध्येहून निघाल्यावर राम शृंगवेरपुरांत गुहास भेटून, भागीरथी उतरून भरद्वाजाच्या आश्रमांत गेले. पुढें ते कांहीं दिवस चित्रकूटपर्वतावर राहिले. येथेंच त्यांना भरताकडून पितृमरणवार्ता कळली. तेथून ते अत्रि,

शरभंग, सुतीक्ष्ण, अगस्त्य इत्यादिक ऋषींस भेटून पंचवटींत येऊन राहिले. वनवासांत लक्ष्मणानें आपल्या ज्येष्ठबंधूची व त्याच्या स्त्रीची सेवा अत्यंत एकनिष्ठपणानें केली. तो त्यांना खाण्याकरितां रोज कंदमूलफळें अरण्यांतून आणून देई व रात्रीं ते निजले म्हणजे थोडा वेळ आपण विश्रांति घेई (केका ८४ पहा). पंचवटींत राहत असतांनाच रामाच्या सांगण्यावरून लक्ष्मणानें शूर्पणखेची विटंबना केली व रामानें खरादि राक्षसांचा संहार केला. रावणास रामाविषयीं समग्र वर्तमान शूर्पणखेकडून कळलें. तेव्हां त्यानें मारीच राक्षसास सुवर्णमृगाचें रूप धरून सीता बसली होती तेथें जाण्यास सांगितलें. सीतेच्या दृष्टीस तो सुवर्णमृग पडतांच त्याला मारून त्याच्या चर्माची कंचुकी करून ती आपण अंगांत घालावी अशी तिला इच्छा झाली व तिनें रामाला सुवर्णमृग मारून आणण्यास आर्जवानें व आग्रहपूर्वक सांगितलें. प्रिय स्त्रीची हौस पुरविण्याकरितां राम लक्ष्मणास सीतेच्या संरक्षणाकरितां ठेवून मृगाच्या पाठीमागें गेले. (केका ८३ पहा). रामानें मृगाचा पाठलाग करून शेवटीं त्याला बाणानें मारिलें. त्या मायावी मृगानें मरतांना आपलें मूळस्वरूप प्रकट करून 'हा तात!' असे रामाच्या शब्दाप्रमाणें शब्द काढले. सीतेला ते शब्द रामाचे वाटून तिनें लक्ष्मणास आपल्या पतीच्या साह्यार्थ जाण्यास सांगितलें. 'हे शब्द मायावी राक्षसाचे आहेत, रामचंद्राला त्रैलोक्यांत कोणापासून भीति नाहीं, तूं स्वस्थ अस' असें लक्ष्मणानें सीतेला सांगितलें. पण त्यानें तिच्या मनाची खात्री न होतां उलट ती त्याला 'तुला माझा अभिलाष उत्पन्न झाला आहे म्हणूनच रामचंद्र संकटांत पडले असतां त्यांच्या साह्यार्थ तूं जात नाहींस असें दिसतें' अशा प्रकारचे हृदयक्षोभ करणारे शब्द बोलली. त्यामुळें लक्ष्मणाचें मन फार खिन्न झालें व तो सीतेला पर्णकुटींत एकटी सोडून आपण राम गेला होता तिकडे चालता झाला. (केका ८४ पहा). मागें रावणानें भिक्षुरूपानें येऊन सीतेचें हरण केलें. मायावी मृगास मारून राम परत आले तेव्हां पंचवटींतील आश्रमांत सीता दिसली नाहीं ह्मणून ते लक्ष्मणासह तिच्या शोधार्थ निघाले. मार्गांत त्यांना मरणोन्मुख स्थितींत असलेला दशरथमित्र जटायुपक्षी भेटला. त्याजपासून रावणानें सीतेचें हरण केलें हें वर्तमान ऐकून राम सीतावियोगास्तव रात्रंदिवस शोक करित करित व सीताभ्रमानें वेड्याप्रमाणें वृक्षपाषाणांस आलिंगन देत देत (केका ८१ पहा) क्रौंचारण्याच्या बाजूनें मातंग ऋषीच्या आश्रमांत गेले. तेथें मातंगमुनीची शिष्या शबरी हिनें उष्टीं व वाळकीं बोरें देऊन रामाचें आतिथ्य केलें (केका ३९ पृ० १०९ टीप ५ पहा). नंतर राम पंपासरोवरावरून ऋष्यमूक पर्वताकडे गेले. तेथें त्यांनीं वानरराज सुग्रीवाशीं सख्य करून वाळीचा वध केला. पुढें सुग्रीवानें सीतेचा शोध करण्याकरितां वानर पाठविले, त्यांत दक्षिण दिशेकडे गेलेल्या मारुतीस मोठ्या प्रयासानें लंकेंत सीतेचा शोध लागला (केका ८२ पहा). नंतर सुमुहूर्तावर राम लंकेस जाण्यास निघून समुद्रतीरीं येऊन पोहोंचला. याच वेळेस बिभीषण रावणाचा त्याग करून रामास शरण आला. रामानें त्यास अभय देऊन रावणवधानंतर लंकाराज्य देण्याचें त्यास अभिवचन दिलें (केका ६६ पहा). नंतर रामानें नलवानरहस्तें समुद्रावर सेतु बांधवून सुवेलपर्वताजवळ सैन्य नेलें. पुढें अंगदाला रावणाकडे सामार्थ पाठविलें पण साम होईना. तेव्हां अखेर रामरावणांचें घनघोर युद्ध झालें व त्यांत रावणाचा पराजय झाला. तेव्हां बिभीषणाला लंकेच्या गादीवर बसवून रामचंद्र परत अयोध्येस आले.

**३. सीतापते! रामचंद्रा! जानकीच्या प्राणवल्लभा!**

धरासुरतपःफळें[1] त्वरित[2] धांवलीं जीं वैना.[3] ॥ ८०

तेयीं[4] प्रभुवरा![5] तसे सदय;[6] कां असे? आज[7] हो!

---

१. धरा (पृथ्वी)+सुर (देव)+तपः (तपश्चर्या)+फळें=पृथ्वीवरील देव ब्राह्मण **त्यांच्या तपश्चर्येचीं फळें.** ब्राह्मणांस पृथ्वीवरील देव (भूदेव) असें म्हणतात. २. **त्वरेनें. द्वितीयार्धाचा अर्थः–जीं प्रभूचीं पावलें पित्याचें वचन सत्य करण्याकरितां अरण्याकडे धांवलीं तीं पावलें मला आठवलीं. (पुन्हा कवि म्हणतातः–) मला वाटतें तीं पावलें नाहीं धांवलीं तर तीं धरासुरतपःफळें धांवलीं. अरण्याकडे जीं धांवलीं तीं रामाचीं पावलें नव्हत, तर तेथें तपश्चर्या करणाऱ्या ऋषींच्या तपांचीं मूर्तिमंत फळेंच धांवलीं. भावार्थः–** ऋषींच्या तपःसामर्थ्यानेंच त्यांच्या परित्राणार्थ व दुष्टांच्या विनाशार्थ' भगवंताचा लवकर अवतार होऊन त्यांनीं दंडकारण्यांत लवकर धांव घेतली. येथें भगवंताच्या पायांवर ऋषींच्या तपःफलांचा आरोप केल्यामुळें पावलें फळेंच धांवलीं असें म्हटलें आहे. वास्तविक फळें धांवण्यास स्वतः असमर्थ आहेत पण त्यांनीं पावलांचें रूप धारण करून तीं धांवलीं. म्हणून **येथें हा परिणाम अलंकार झाला.** [illegible] पहा. ३. **दंडकारण्याकडे.** हें अरण्य गोदावरी व नर्मदा या दोन नद्यांच्या मध्यें असून याचा विस्तार मोठा आहे. इक्ष्वाकुवंशांतील दंडक राजाचें हें राज्य होतें व शुक्राच्या शापानें तें पुढें अरण्य बनलें. (रामायण–अरण्यकांड–१ अध्याय–१ [illegible]) महाभारतांत असें म्हटलें आहे कीं, दंडकराजानें तापसी लोकांना तप करण्यास एकांत स्थान मिळावें म्हणून हें वन केलें. **४. तेव्हां. अन्वयार्थः–प्रभुवरा! ( देवश्रेष्ठा! ) तयीं (सीतेला रावणानें हरण केलें त्या प्रसंगीं) तसे (त्या प्रकारचे) सदय (कृपाळु) [झालां]; हो! (अहो!) आज (ह्या प्रसंगीं) असे (ह्या प्रकारचे) [निर्दय] कां? (काय म्हणून?); हो! (अहो!) महाराज (देवा!) निजमनीं ( आपल्या मनांत) विचारून पहा बरें (विचार करून तर पहा खरे ) [देवा! तेव्हां तुम्ही] पिशापरि (वेड्याप्रमाणें) वनोवनीं फिरा [व] अहोरात्र (रात्रंदिवस) 'हा!' (हाय! हाय! खेदसूचक शब्द) रडणा (म्हणत होतां) हा (मोरोपंत) भाषणीं (बोलण्यांत, प्रभुस्तवन करण्यांत) कुशल (चतुर) नसे (नाहीं) परि कृपापात्र (भगवत्प्रसादास योग्य) असा (आहे). प्रास्ताविकः– रावणानें सीता हरण केली तेव्हां सीतेला शोधण्याकरितां तुम्हीं आपल्या पावलांस श्रम दिले. यावरून सीतेविषयीं तुम्हांला दया आली असें दिसतें; मग मजविषयींच आपणांस ती कां येत नाहीं अशा अभिप्रायानें कवि यांत रामावतारकथा वर्णन करितात. ५. प्रभुश्रेष्ठा! सर्व देवांत वरिष्ठ अशा! ६. दयायुक्त, कृपाळू. प्रथमार्धाचा अर्थः–सीता पर्णकुटींतून नाहींशी झाली तेव्हां देवा तुम्हांस तिची फार दया आली व तिची काय अवस्था झाली असेल हा विचार मनांत येऊन तुम्हांस फार वाईट वाटलें. मग सांप्रत माझ्यावर आपली अवकृपा कां? सीतेप्रमाणें मजविषयींही सदय व्हा. राजाधिराज! याचा आपण स्वतःच विचार करा. ७. सांप्रत.**

विचारुनि पहा बरें निजमनीं महाराज! हो!।
वनोवनिं फिरा पिशापरि; म्हणा अहोरात्र 'हा!'

१. **राजाधिराज! देवाधिदेवा!** २. येथें पहिल्या दोन चरणांतील 'हो' हें यमक एकार्थीच योजिलें आहे. असा प्रकार पंतांच्या काव्यांत क्वचित् आढळतो. केका ५३ पृ० टीप ९ पृ० १४३ पहा. ३. **रानोरान. प्रास्ताविकः–सीतेचा शोध करितांना भगवंतांनीं सदयता कोणती प्रकट केली ती कवि तृतीय चरणांत सांगतात.** ४. **व्या०:–** येथें 'फिरा' व 'म्हणा' हीं जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें होत. काव्यांत यांचा उपयोग भूतकाळीं फार आढळतो. हल्लीं मराठींत गद्यांत या मूळच्या वर्तमानकाळच्या रूपांचा उपयोग होत नाहीं. ५. **वेड्यासारखे. रामाचें अरण्यांत पिशाचवत् हिंडणें व शोक करणें यांतील रहस्यः–**'श्रीरामचंद्र हे सीतेच्या शोधार्थ अरण्यांत फिरत असतां त्यांचे भक्त जे वृक्षपाषाणरूपें धारण करून बसले होते त्यांना भेट द्यावी ह्या हेतूनें, व जितकी सृष्टिरूपानें पंचभूतात्मक प्रकृति आहे, तीच प्रकृति माता आहे, व मी त्या भूगोलादिक अनंत गोलरूपी सीतामय सृष्टिरूप प्रकृतीला अंतर्यामित्वेंकरून एका आकर्षणशक्तीनें आकर्षण करून धरणारा पुरुष व समष्टीरूप ईश्वर आहें, त्या आम्ही उभयतांनीं एकरूपी असतां अवतारशरीरें जगत्कार्यार्थ इच्छामात्रेंकरून धरिलीं आहेत, ही भावना प्रकट करण्याकरितां, हे सीते! हे सीते! याप्रमाणें शोकमुद्रा प्रकट करून, वृक्षपाषाणादिकांना आलिंगन देऊं लागले. श्रीराम हे जगदुद्धारार्थ सीताशुद्धीचें निमित्त दाखवून फिरत आहेत, वास्तविकपणें ते पूर्णज्ञानी असून त्यांना कामक्रोधमोहादि विकारांचा बाधा नव्हता हें पार्वतीनें सीतारूप घेऊन केलेल्या रामाच्या परीक्षेवरून स्पष्ट झालें.' (वेदोक्तधर्मप्रकाश.) **तृतीयचरणार्थः–देवा! रामावतारीं जेव्हां सीता नाहींशी झाली तेव्हां तिची आपणास करुणा येऊन तिचा शोक करीत आपण वेड्यासारखे रानोरान फिरत होतां. हें सदयतेवांचून झालें काय?** ६. **रात्रंदिवस. व्या०:–**येथें 'रात्रि' शब्दाचें 'रात्र' असें रूप झालें आहे. ७. **हाय!** भारतीय रामायणांत व मंत्ररामायणांत सीतेकरितां रामानें केलेला शोक पंतांनीं फार सुरस वर्णिला आहे. मुक्तामालेंतील पंतकृत तत्संबंधीं वर्णनही तसेंच हृदयंगम आहे. पुढील संक्षिप्त उतारे पहाः– 'सा कुत्र पत्रशाले! मालेवाद्यैव या मया निहिता । लब्धा मिथिलाजानेर्जाने न्यासापहारिणो त्वाहम् ॥ ५२ ॥ कासारकुंदकदलीकरिकेसरिकृष्णसारकेकिपिकैः । अलिचंपकबंधूकैः शून्ये बत! सुंदरी विभज्य हता ॥५४॥ मृग! यामीक्षणविजितः शक्ष्यसि नोदीक्षितुं बत त्रपया । मृगयामि क्व नु तां वदमित्रमहं ते वनेचरो रामः ॥ ५७ ॥ लीनासि किमेकांते कां ते कांते व्यलंघयं वाचम् । विरहज्वरविपदयि ते दयिते दयितेऽतिदुःसहाधीरे ॥ ५८ ॥ कानन! तदासि नंदनमधुना, पितृकाननं सुविस्पष्टम् । अहमपि हरिरभवं तामृते त्विदानीं श्रियं महाभूतः' ॥ ६२ ॥ (मुक्तामाला) **सारांश–'हे पर्णशाले! जी (रत्न)मालेप्रमाणें आजच मी तुजपाशीं ठेवून गेलों, आणि जी मला जनकापासून प्राप्त झाली ती कोठें आहे? ती हरण केल्याबद्दल मी तुला न्यासापहारिणी (चोर) समजतों. ५२ सरोवर, कुंदकळ्या, कदलीस्तंभ, हत्ती, सिंह, काळवीट, मोर, कोकिळ, भ्रमर, चांपेकळी,**

नसे कुशळ भाषणीं[१] परि असे कृपापात्र[२] हा. ॥ ८१

समागम[३] तुझा[४] घडो, म्हणून जाहले[५] लांकडें[६]

---

आणि बंधुकपुष्प या सर्वांनीं सुंदरीस (सीतेस) शून्यठिकाणीं पाहून मुखकमलदंतादिकांचें हरण केलें असावें. ५४ हे मृगा! सीतेच्या शोधार्थ मी येथें भटकतों आहें. तं तिच्या डोळ्यांनीं जिंकिला जाऊन तुझ्यानें लज्जेस्तव वर मानही करवणार नाहीं. अरे! मी सध्यां तुजसारख्या वनेचर झाल्यामुळें तुझा स्नेही झालों आहें; तर सांग बरें मी तिला कोठें शोधूं तो! ५७ हे कांते! तूं एकीकडे कोठें दडून बसली आहेस काय? अगे! असा मी तुझा कोणता शब्द मोडला? हे दयाशीले प्रिये! तुझा विरहज्वर मला अत्यंत दुःसह होत आहे. ५८ हे दंडकारण्या! माझी प्रिया तुजसहवर्तमान असतां तूं नंदनवनाप्रमाणें मला आनंददायक होतेस; पण आतां केवळ स्मशानाप्रमाणें उदास झालें आहेस. मीही त्या वेळीं इंद्राप्रमाणें सुख भोगित होतों; आणि आतां तो श्री नाहींशी झाल्यामुळें स्मशानांतील महाभूतांप्रमाणें झालों आहें.' (नि. मा.) 'कोठें जनकसुते! तूं गेलीस? धरासुते! प्रिये! जाये! । न करीं विनोद: झाला [illegible] अत्यंत [illegible] ये. ॥ ७५॥ राज्यश्री हरुनि, वनीं कैकेयीनें वनासि पाठविलें; । [illegible] मनांत आठविलें ॥७९॥ मज राजकन्यके! तूं वरूनियां पावलीस न सुखातें. । [illegible] मी स्वदुःखातें?॥८०॥ हा कमलाक्षि! तनूदरि! सुंदरि! [illegible] प्रिये! [illegible]! । विधुमुखि! पिकगर्वापह, अमृताहुनि गोडसे, स्वयें वद: ये. ॥ ८२ (मंत्ररामायण अरण्यकांड.) 'हा सीते! तुजवांचुनि सर्वहि मज तापहेतु, हा सीते! । हा सीते! [illegible] हा सीते! ॥७५॥ हा सीते! हा न जगत्प्राण, खरा बाध वायु हा सीते!। हा सीते [illegible] वायु हा सीते! ॥७६॥ हा सीते! मज देतो त्वन्मुखजिलचंद्र ताप हा सीते!। हा सीते [illegible] म्हणवूनि पाप हा सीते! ॥७७॥ बहु लाजवीत होतो [illegible] । [illegible] करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं ॥७०॥ हा दयिते! हा [illegible]! हा [illegible]! हा [illegible]! हा सीते!। हा सुदति! हा कृशोदरि! हा सुंदरि! हा वरांगे! हा सीते! ॥८४॥ (वनपर्व अ० ११)

१. बोलण्यांत, प्रास्ताविकः–'सीतेचा शोध करण्याकरितां आपण रानावनांतून भ्रमिष्टासारखे शोक करीत हिंडत होतां; यावरून सीतेविषयीं आपली सकृपता स्पष्टच होते. असा आपण पक्षपात कां करितां?' अशा आशयाचे कवीनें उद्गार काढिले, त्यावरून देवास राग आला असेल असें मानून कवि म्हणतात. चतुर्थचरणार्थः–'देवा! आपल्यास चांगलें वाटेल असें मधुर भाषण करण्याचें चातुर्य माझ्या अंगीं नाहीं. म्हणून बोलण्यांत जरी माझ्याकडून आपलीं वर्मे निघालीं असतील तरी त्याबद्दल मला आपण क्षमा करा.' २. कृपेस योग्य, जरी मी बोलण्यांत चतुर नाहीं तरी दीन असल्यामुळें भगवत्प्रसादास पात्र आहें, म्हणून देवा! आपण सीतेप्रमाणें मजवरही दया करा. यांत हेतु नामक अलंकार आहे. केका ३२ पृ०९०; पहा. ३. सहवास. प्रास्ताविकः–सीतेवर रामाची दया फार ह्मणून सीतेकरितां रामानें अनुचित गोष्टी केल्या असें मनांत आणून कवि पुन्हा म्हणतात. ४. भगवंताचा. ५. झाले. अन्वयार्थः–'तुझा (रामाचा)

**तपोऽनलिं, तसे मुनि त्यजुनि; जोडिलीं माकडें; ।**

---

**समागम (सहवास, दर्शन भेट) घडो (घडावा) म्हणून [जे मुनि] तपोनलीं (तपरूपी अग्नींत) लांकडें जाहले (तपश्चर्या करून ज्यांनीं आपले देह शुष्क काष्ठवत् केले), तसे मुनि (तशा प्रकारचे दारुण तप करणारे ऋषी) त्यजुनि (सोडून) माकडें (वानरें) जोडिलीं (मिळविलीं); ज्या जनास्तव (ज्या प्रियजनाकरितां) बहु अयुक्त (पुष्कळ अयोग्य गोष्ट) घडे (घडली) सांकडें (संकट) पडे (पडलें), तदुक्तिहुनि (त्या जनाच्या भाषणाहून) आमुचें (आमचें) बोलणें (भाषण=मागील केकेंत 'सीतेसाठीं तुम्हांला इतके कष्ट भोगावे लागले असून तुम्ही तिच्याविषयीं सदय होतां मग मजविषयींच इतके अकृप कां?' ह्या अर्थाचें कवीचें भाषण) बहुत (पुष्कळ) वांकडें (विरुद्ध, वाईट वाटण्याजोगें) [काय] ? प्रथमार्धाचा अर्थः–देवा! ज्यांनीं तुझें दर्शन व्हावें म्हणून दारुण तप करून आपले देह काष्ठासारखे शुष्क व रोड करून घेतले, अशा महान् तपस्व्यांस सोडून तुम्ही रामावतारीं आपल्या भोंवतीं माकडें गोळा केलीं. वास्तविक तुम्ही आपल्या दर्शनाकरितां उत्सुक झालेल्या ऋषींच्या समागमांत काळ घालवायाचा. पण तें सोडून तुम्ही आपल्या भोंवतीं माकडें गोळा केलीं तेव्हां तुम्हांस काय म्हणावें? 'मुनि लांकडें झाले' असें म्हणण्यांत रूपकालंकार झाला.** ६. रामदर्शनार्थ दंडकारण्यवासी ऋषिजनांनीं आपले देह तीव्र तप करून लांकडासारखे शुष्क केले. यासंबंधी मुक्तामालेंतील पुढील श्लोक पहाः—'कुशली तेऽस्ति कुमारो मार्गोदीरंव वत! बहोः कालात् । तृषिताः पिबंतु वन्याः संन्यासिन उत्सुकाः सुकार्श्यमिताः ॥ १६. अर्थः– 'हे कौसल्ये! तुझा कुमार खुशाल आहे; रडूं नकोस. चिरकाळपर्यंत जे ऋषि सर्वस्वत्याग करून याच्याकरितां तपश्चरण करून अत्यंत कृश होत्साते मोठ्या औत्सुक्यानें याच्या मार्गाकडे डोळे लावून बसलेले आहेत, ते चातकवत् संतुष्ट होवोत.' (नि. मा.)

१. **तप (तपश्चर्या) हेंच अनल (अग्नि) त्यांत, तपश्चर्यारूप अग्नींत.** रामदर्शनार्थ उत्सुक झालेले मुनि नारायणोपनिषदांत सांगितलेला पुढील प्रकारचा यज्ञ करीत असावेत. म्हणजे त्यांच्या यज्ञांत आत्मा हा यजमान, श्रद्धा ही पत्नी, शरीर हें सरपण, उर वेदी, लोम कुश, वेद हे शिखा, हृदय हें यूप, काम हा तूप, क्रोध पशू, तप हें अग्नि, दम शमयिता, वाक् हीच दक्षिणा इत्यादि सामग्री व मंडळीच असावीत ('तस्यैवं विदुषो यज्ञस्यात्मा इ०'). **पाठभेदः**—ह्या ठिकाणीं 'तपोनिधि' (तपश्चर्येची खाण, अत्यंत तपस्वी) असा पाठ **'सर्वसंग्रह'**प्रतींत व **'यशोदापांडुरंगीं'**त आढळतो. २. **येथें मुनींचा त्याग आणि माकडांचा स्वीकार आहे म्हणून हा परिवृत्ति अलंकार होय.** याच्या स्पष्टीकरणार्थ केका १५ पृ० ४६ टीप २ पहा. याचीं आणखी उदाहरणेंः— (१) 'लागतसें तुझिया पायां । मातें ओपी सुंदर काया । माझी होऊनि वडील जाया । भाग्य भोगी इंद्राचें' (मुक्तेश्वर-विराट०) (२) 'वाजविती वेणु वनीं रात्रौ बळकृष्ण एकदां; त्यांतें । सेविति गोपी अधरामृत पाजूनि तृप्तिदात्यातें' ॥ (मोरोपंत मंत्रभागवत, दशम ४१७.)

अयुक्त बहु ज्या जनास्तव घडे पडे सांकडें,
तदुक्तिहुनि आमुचें बहुत बोलणें वांकडें ? ॥ ८२
'जगत्त्रयमनोहरा ! बलगुणैकरत्नाकरा !
ह्मणे 'कनकरंकु द्या मज, महा प्रयत्न करा.' ।

---

१. माणसाकरितां. तृतीयचरणार्थः–ज्या प्रियमाणसाकरितां तुम्हांला पुष्कळ अनुचित गोष्टी कराव्या लागल्या असून संकटेंही भोगावीं लागलीं. येथें कोणत्या जनास्तव तें कवीनें स्पष्टपणें न सांगतां मोघम ठेविलें, तरी पुढल्या केकेवरून तो जन म्हणजे रामभार्या सीता हें स्पष्ट आहे. सुवर्णमृगासंबंधीं सीतेनें धरलेल्या हट्टामुळे रामाला तपोनिधि मुनींचा सहवास मोडून वानरांचा स्नेह जोडावा लागला व सीताप्राप्त्यर्थ पुष्कळ संकटें भोगावीं लागून दारुण युद्ध करावें लागलें–असा कवीचा अभिप्राय २. संकट, दुःख. ३. त्या जनाच्या भाषणापेक्षां. तें आपण पुढील केकेंत दिलें आहे. ज्या सीतेच्या भाषणानें तुम्हांला पुष्कळ अयोग्य गोष्टी करण्यास लावून संकटांत पाडलें त्यापेक्षां माझें बोलणें देवा ! ज्यास्ती वांकडें आहे काय? अर्थात 'नाहीं' हें अप्रश्नित उत्तर हा प्रश्नालंकार झाला. ४. त्रिभुवनसुंदरा ! रामा ! अन्वयः–'जगत्त्रयमनोहरा ! बलगुणैकरत्नाकरा ! [तुम्ही] महा प्रयत्न करा [आणि] मज कनकरंकु द्या [असें] [सीता] म्हणे. प्रियाहि तुज अशी कुकार्य आज्ञापिती जाहली; कामुक सुधा त्यजूनि अंगनाज्ञा पिती [हें] प्रगट [आहे]. प्रास्ताविकः– यांत सीतेची 'अयुक्त उक्ति' दिली आहे. ५. बलगुणांचा मुख्य समुद्र अशा ! बलसामर्थ्य, आणि गुणैश्वर्यादि षड्गुण यांचा सागर. समुद्रांत रत्नें असंख्य सांपडतात म्हणून त्यास रत्नाकर [illegible] असें म्हणतात. 'जातौ जातौ यदुत्कृष्टं तद्रत्नमभिधीयते.' 'बलं गन्धरसे रूपे स्थामनि स्थौल्यसैन्ययोः । पुमान् हलायुधे दैत्यप्रभेदे वायसेऽपि च ॥.' केकासौंदर्यः– 'जगत्त्रयमनोहर व बलगुणैकरत्नाकर' ह्या दोन विशेषणांनी रामाला हाक मारण्यांत सीतेनें मोठें चातुर्य दर्शविलें आहे. हीं दोन्ही विशेषणें फार लाडिवाळपणानें व रामानें आपलें काम खचित करावें या हेतूनें योजिलेलीं दिसतात. ६. सुवर्णमृग. कथासंदर्भः– मागें केका ८० पहा. 'भारतीय रामायणांत, कनकमृग धरून आणण्याविषयीं सीतेची रामाला उक्ति पुढीलप्रमाणें दिली आहे:–ती रामासि म्हणे, 'जी ! अवलोका, मृग असोनि सोन्या या । भेद नसेचि, गृहा हा न्यावा, दुसरें असा नसो न्याया. ॥ १८ ॥ आणा धरोनि मृग हा, कैसा दिसतो मनोरम? उठावें, । जातो कीं धांवा जी ! आहे कीं हरिणहृदय मउ ठावें ॥ १९ ॥' [वनपर्व–अ० ११.] ७. परिश्रमास. प्रथम तीन चरणांचा अर्थः– 'हे त्रैलोक्यसुंदरा ! बलगुणसमुद्रा ! रामचंद्रा ! तुम्हांला कितीही परिश्रम पडले तरी मजकरितां सोसून मला तेवढा सुवर्णहरिण मारून आणून द्या' अशा प्रकारचें कुकार्य करण्याविषयीं तुमच्या लाडक्या बायकोनें तुम्हांला आज्ञा केली हें तिला फार अनुचित होतें.

प्रिया[1]हि अशि जाहली तुज कुकार्य[2] आज्ञापिती[3];
सुधा[4] त्यजुनि कामुक[5] प्रकट अंगनाज्ञा[6] पिती. ॥ ८३
स्वदास[7] समयीं जपे[8], तरि न दे वरा, चाकरी

---

१. प्रिया-प्रियकर-असूनही. २. वाईट कुत्सित, हलकें काम. कनकमृग धरून आणण्यासारखें क्षुल्लक काम. प्रास्ताविकः-सीता तुमची प्रिया असतांही तुम्हांला तिनें सुवर्णमृग आणण्यासारखें क्षुद्र काम करण्यास आज्ञा केली हें आश्चर्य नव्हे काय? वास्तविक तिनें तुम्हांला क्षुल्लक व ज्यापासून तुम्हांला फुकट त्रास मात्र व्हावयाचा असलें काम सांगावयाचें नव्हतें. बरें तिनें सांगितलें, पण तुम्हीं तरी तिच्या म्हणण्यास 'हो' कार कसा दिलात? पण लाडक्या बायकोनें केलेली आज्ञा मोडणें तुमच्याही जीवावर आलें व तुम्ही तिच्या म्हणण्याप्रमाणें कनकमृग आणण्यास धांवलां. तुम्हींही सारासार विचार न करितां केवळ स्त्रीचें प्रिय करावें ह्या उद्देशानें 'कुकार्या'चा स्वीकार केला यावरून कवि म्हणतात, 'देवा! तुम्हीं केलेंत तें ठीकच केलें.' प्रथम भगवंताला दोष देऊन नंतर तुम्हीं केलें तें ठीकच केलें असें म्हणण्याचें कारण कवि अर्थांतरन्यास अलंकाराचा आश्रय करून चरम चरणांत सांगतात. ३. आज्ञा करणारी. हा शब्द रामचंद्र कामुक म्हणून त्याच्या आज्ञेत वागणारे होते असें दाखविण्याकरितां कवीनें खुबीनें योजिला आहे. ४. अमृत. ५. स्त्रीलंपट पुरुष, स्त्रैण. कामी पुरुषाला स्त्रीची आज्ञा पालन करणें-मग ती आज्ञा योग्य असो वा नसो-अमृतापेक्षां ज्यास्त आवडतें. स्त्रैणपुरुषांना देवभोग्य अमृतापेक्षां स्त्रीच्या अधरामृताची जास्ती योग्यता वाटत असल्यामुळें ते आपल्या स्त्रीच्या अर्ध्या वचनांत असतात. सीतेच्या प्रेमाकरितां तुम्हांस स्त्रैण व्हावें लागलें व म्हणून तुम्हीं तिची आज्ञा अयोग्य असतांही पाळली-असें कवीचें म्हणणें. 'कामी पुरुष अमृतापेक्षां स्त्रीच्या आज्ञेचें पालन करणें म्हणजे ती ऐकणें जास्त प्रियकर समजतात' ह्या सामान्य वचनानें 'तुम्हीं सीतेची आज्ञा अयोग्य असतांही ती ऐकिली' ह्या विशेष वचनाचें समर्थन केलें म्हणून हा येथें अर्थांतरन्यास अलंकार झाला. ६. सुंदरस्त्रीची आज्ञा. व्यु०-'अंग' शब्दास प्राशस्त्यबोधक 'न' प्रत्यय लागून 'अंगना' हा शब्द झाला आहे. याचा अर्थ 'सुंदर स्त्री' असा होतो. ७. प्रास्ताविकः-'सीतेनें रामास कुकार्य करावयास सांगितलें एवढेंच नव्हे तर ती लक्ष्मणाशींही चांगल्या रीतीनें वागली नाहीं' असें कवि यांत सांगतात. स्वदास= दासासारखी आपली सेवा करणारा निजसेवक (लक्ष्मण). ८. जपत असे. अन्वयार्थः- स्वदास (लक्ष्मण) समयीं जपे (ज्या प्रसंगीं जें काम करावयाचें तें फार निष्ठापूर्वक करण्यास तत्पर असे) तरि [सीता] वरा (आशीर्वचनास) न दे (न देती झाली), [दास] चाकरी (सेवा) न चुके, परि [ती] देवराचा (दीर लक्ष्मण त्याचा) श्रम सार्थक न करी; [सीता देवराला] भलतेंचि (अयोग्य शब्द) वदेही (बोलली देखील); [देवा!] तें (बोलणें) तिसचि (सीतेलाच) कोप टाका (राग सोडा) [व] पुसा (विचारा); 'बा! (देवा!) मृदु (मऊ) असें (आहें) म्हणोनि (म्हणून) मज कापुसा (मला कापुसाला) न धोपटा (धोपटूं नका, मारूं नका).' प्रथमचरणार्थः-लक्ष्मणानें सीतेची अत्यंत निष्ठापूर्वक सेवा केली, तरी तिनें त्याला कधीं तोंडानें बरें देखील म्हटलें नाहीं.

**चुके न, परि सार्थक श्रम न देवेंराचा करी; ।**
**वदेहि भैलतेंचि; तें तिसेंचि, कोप टाका, पुंसा;**
**असें मृदु, म्हणोनि बा! मज न धोपैंटा कापुसा. ॥ ८४**

---

१. **सफल. द्वितीयचरणार्थः-तो सीतेची सेवा करण्यांत कधींही चुकला नाहीं, पण सीतेनें आपल्या दीराच्या श्रमाचें सार्थक केलें नाहीं. कृतसेवेबद्दल मनापासून शाबासकी मिळणें हेंच एकनिष्ठ सेवेचें साफल्य, तें लक्ष्मणास मिळालें नाहीं.** लक्ष्मणानें सीतेची सेवा इतक्या भक्तिभावानें केली कीं, नूपुराशिवाय तिचे केयूर-कुंडलादि अलंकार त्यानें कधींच पाहिले नाहींत. सीतेचा शोध करीत रामलक्ष्मण ऋष्य-मूक पर्वतावर गेले तेव्हां तेथें त्यांना सुग्रीवानें उत्तरीयवस्त्रांत बांधलेले सीतेचे अलंकार दाखविले. रामानें ते अलंकार ओळखावयास लक्ष्मणास सांगितलें. त्या वेळीं तो म्हणतो:-'(स वाक्यमब्रवीत्) जाने न केयूरे न कुंडले । नूपुरें त्वभिजानामि नित्यं पादाभिवंदनात् ॥' [स-स्कृत मंत्ररामायण-पृष्ठ १७२ श्लो० ५९]. 'मला केयूरकुंडलें ओळखूं येत नाहींत पण मी सी-तेचें नित्य पादवंदन करीत असल्यामुळें तिचें पादभूषण नूपुर मात्र ओळखतों.' २. **दीर जो लक्ष्मण त्याचा. व्यु०:-**प्राकृत 'दिअरो' पासून मराठी 'दीर' शब्द आला. ३. **बोलूं नये तें, अयोग्य.** सीता लक्ष्मणाला जें दुरुत्तर बोलली त्याचें वर्णन **पं**तांनी प्राकृत 'मंत्ररामायणां'त केलें आहे. त्याचा मासला:-"हें सीतेचें वाक्य श्रवण करितांना म्हणे, 'तुझा काम । कळला मज दुर्बुद्धे! परि मत्तनुनाथ एक रघुराम'" ॥ ५१ ॥ [illegible] लक्ष्मणाच्या मनाची झालेली स्थिति कवि वर्णितातः-"ऐसें महोग्र वचनां, लक्ष्मण करि कर्णपाणिसंगतिला । 'शिव! शिव!' म्हणोनि वंदी, दुर्वाक्यश्रवणकंपितांग तिला ॥ ५२ ॥ 'हा हा श्रीराम!' असें दुःखाकुल तो वदोनि कर जोडी । सीतेसि म्हणे, 'माते! पापाचा तूं वृथा न कर जोडी ॥ ५३ ॥ माते! राहें स्वस्था; जातों त्वत्पादपंकजा नत मी । साग्रज सत्वर येतों मग्न करावें तुवां न चित्त तमीं'." ॥ ५४ ॥ [मंत्ररामायण-अरण्यकांड]. तसेंच पंतांच्या मुक्तामालेंतील ४७,४८ हे श्लोक या संबंधीं वाचनीय आहेत. ४. **बोलणें.** ५. **सीतेलाच. सीता लक्ष्मणाला जें दुरुत्तर बोलली तें तुम्ही तिलाच विचारा, मज गरीबावर त्याचा राग काढूं नका.** ६. **विचारा, चौकशी करा.** ७. **व्यु०:-**'धोपटणें' हा शब्द हिंदुस्थानी **'धोप'** (दोन्ही हातांत धरलेली लांब काठी) ह्या शब्दापासून निघालेला दिसतो. **मी गरीब म्हणून देवा! तुम्ही माझ्यावर रागावूं नका. कापूस मऊ म्हणून त्याला धोप-टणें हें जरी लोकस्वभावानुरूप आहे तरी तें अयोग्य. सीतेचा दोष मी तुम्हांला दाखविला म्हणून तुम्हांला राग आला असेल, तर तो टाका व तिलाच तिच्या आ-चरणाचें कारण पुसा.** या केकेच्या प्रथमार्धांत कवीनें सप्ताक्षरी यमक साधलें असून द्विती-यार्धांत पंचाक्षरी यमक साधिलें आहे. 'कापुस मऊ सांपडला म्हणून त्याला धोपटूं नये, ही व्यव-हारांतील नीति चतुर्थ चरणांत संगृहित केली आहे म्हणून **हा अर्थांतरन्यास अलंकार झाला.**

न[1] जें प्रिय, सदोष तें; प्रिय सदोषही चांगलें;
स्वतोक[2] पितरां[3] रुचे, जरिहि कर्दमीं रांगलें. ।
तुलाचि[4] धरि पोटिशीं[5] कशि तदा यशोदा[6] बरें?
जरी मळविशी रजोमलिनकाय[7] तूं अंबरें. ॥ ८९

---

१. प्रास्ताविकः–मागील केकेंत स्वकीय दोषाविषयीं प्रभूची दुर्लक्षता दाखविली, तोच भाव दृष्टांतांतरांनीं कृष्णावतारलीलाकथनद्वारा सांगतात. अन्वयार्थ.–जें (जी वस्तु) प्रिय न (आवडती नाहीं, आवडत नाहीं) तें (ती वस्तु) सदोष (दोषयुक्त) [दिसते] [नसेंच] प्रिय (जी वस्तु आवडती आहे) सदोषही (ती जरी दोषयुक्त असली तरी) चांगलें (निर्दोष अशी दिसते); स्वतोक (आपलें मूल. पोटचें पोर) जरीहि कर्दमीं (चिखलांत) रांगलें [तरी तें] पितरां (आईबापांना) रुचे (आवडतें). जरी तूं रजोमलिनकाय (धुळीनें ज्याचें अंग भरलें आहे असा) अंबरें (यशोदेचीं वस्त्रें) मळविशी (मळवीत होतास) [तरि] तदा (त्या वेळेस) यशोदा तुलाचि पोटिशीं कशी धरी बरें? प्रथमचरणार्थः–जी वस्तु आपणास आवडत नाहीं तिला कांहीं तरी दोष लावावयाचा व आपणास आवडल्या वस्तूंत दोष जरी असला तरी तो गुणच भासावयाचा, ही जनाची रीतिच आहे. याला दृष्टांत पुढल्या चरणांत देतात २. आपलें मूल. ३. आई-बापांना. द्वितीयचरणार्थः–पोटचें पोर चिखलांत रांगून चिखलानें भरलें असलें तरी तें स्वतः आईबापांना गोडच वाटतें. स्वतःचें मूल कितीही कुरूप असलें किंवा त्याचें आंग धुळींत भरल्यामुळें तें कितीही घाणेरडें असलें तरी आईबापांना तें प्रियच असतें. याला संस्कृतांत 'नापिकपुत्रन्याय' ह्मणतात. एका राजानें एका नापिकाला एक अत्यंत सुंदर मुलगा आणावयास सांगितलें असतां त्यानें आपल्या कुरूप मुलालाच अत्यंत सुरूप समजून राजापुढें नेलें तेव्हां राजाला त्याचें आश्चर्य वाटलें व रागही आला. पण स्वतःचा मुलगा आईबापांस अत्यंत कुरूप असला तरी अत्यंत सुरूपच वाटतो ह्मणून न्हाव्याकडे बिलकुल दोष नाहीं अशी प्रधानानें राजाची समजूत करून राग दूर केला. अशी ह्या न्यायासंबंधी कथा आहे. म्हणूनच कालिदासानें शाकुंतलांत 'धन्यास्तदंगरजसा मलिनीभवंति. ह्मणजे 'ज्या आयांचीं वस्त्रें पोरांच्या अंगावरील धुळीनें मलिन होतात त्या धन्य होत,' असा उद्गार काढिला आहे. ४. देवा! (कृष्णावतारीं) स्वतः तुम्हांलाच. ५. पोटाशीं. ६. व्रजपति नंद त्याची भार्या व कृष्णमाता. ७. धुळीनें भरलें आहे अंग ज्याचें. प्रास्ताविकः– आपलें मूल चिखलांत भरून घाणेरडें झालें तरी तें आईबापांना चांगलेंच वाटतें या सामान्योक्तीच्या स्पष्टीकरणार्थ कवीनें येथें प्रत्यक्ष भगवंताच्या लीलावतारचरित्रांतीलच एक उदाहरण दिलें आहे. द्वितीयार्धाचा अर्थः–देवा! कृष्णावतारीं धुळीनें ज्याचें अंग मळलें आहे असा तूं जरी यशोदेचीं वस्त्रें मळवीत असस, तरी तुला यशोदा किती प्रेमानें पोटाशीं घेत होती बरें? व्यंग्यार्थः–तेव्हां ज्याला एकदां आपलेंसें ह्मटलें तेव्हां त्यानें कितीही अपराध केले तरी त्याला पोटाशीं धरून त्याच्यावर अनुग्रह करणें हेंच आपणास योग्य आहे असें कवि यांत

तुझे कथिति गोपिका विविध तीस बोभाट, ते
सुखप्रद गुणस्तवापरिस जाहले वाटते; ।

---

दुखवितात. 'रजोमलिनकाय' हें विशेषण साभिप्राय आहे ह्मणून **परिकर** अलंकार झाला आहे. ८. **वस्त्रें**. 'अंबर' शब्दाचे दोन अर्थ होतात:-१ आकाश. २. वस्त्र. 'अंबरे व्योम्नि वाससि' इत्यमरः. रामकृष्ण चिखलानें आपली अंगें भरवून मातेचीं वस्त्रेंही मलीन करीत त्याविषयीं 'कृष्णविजय' अध्याय ८ आर्यागीति १४ पहा:-'तनु भरिती संचाळें, गळां बळें धरिती मित्र ते बाळें । दाटे पान्हा थानीं, सेवावा आग्रहें जगन्नाथानीं ॥'

१. **प्रास्ताविकः-'तुह्मी रांगते होतां तेव्हां मात्र यशोदेची प्रीति तुम्हांवर होती असें नाहीं, तर मोठे चालते बोलते झालां तरी देखील तुम्हांवर तिची प्रीति फार होती, अशा अभिप्रायानें कवि म्हणतात'.** (केकादर्श). २. **गोकुळांतल्या गवळिणी**. ३. **नानाप्रकारचे**. ४. **गाऱ्हाणीं, कागाळ्या. अन्वयार्थः-'गोपिका (गवळिणी) तुझे विविध (नानाप्रकारचे) बोभाट (कागाळ्या) तीस (तुझी माता यशोदा तिला) कथिति (सांगत होत्या), ते (बोभाट) गुणस्तवापरिस (तुझ्या गुणांच्या स्तवनापेक्षां) सुखप्रद (सुखदायक, आल्हाददायक) वाटते जाहले (झाले) [ती] एकदां (एक वेळ) क्षमा न करि तरिहि [तुह्मी] फार खोडी करां (केल्या); ती [यशोदा] भय (भीति, मारण्याचें भय) न देचि (न देती झाली) [एवढेंच नव्हे. तर] ताडनोद्यमसमेत (मारण्याच्या उद्योगाबरोबर) करा (हाताला) सोडी (सोडिती झाली).'** प्रथमार्धाचा अर्थः कृष्णाच्या लहानपणीं गवळिणी त्याच्या खोड्यांबद्दल यशोदेजवळ अनेक प्रकारचीं गाऱ्हाणीं नित्य घेऊन येत. **कृष्ण आमच्या घरीं येऊन दह्यादुधांचीं शिंकीं पाडतो. डेरे फोडतो. त्यांतील गोरस खातो व इतरांना वांटतो, वगैरे निरनिराळ्या गोष्टींसंबंधीं गाऱ्हाणीं गोपिका यशोदेकडे घेऊन येत असत. पण तीं ऐकून यशोदेला वाईट न वाटतां आनंदच होई. इतरांच्या तोंडून कृष्णाच्या गुणांची प्रशंसा ऐकून तिला जितका आनंद झाला असता त्यापेक्षा अधिक आनंद कृष्णाच्या लहानपणाच्या खोड्या ऐकून यशोदेला होत असे. अत्यंत मायाळू आईला जसें मुलाच्या खोडीपासून वाईट न वाटतां उलट समाधान वाटते व ती मुलाचें कौतुकच करिते त्याप्रमाणें कृष्णाच्या लहानपणच्या खोड्यांबद्दल गाऱ्हाणीं ऐकून यशोदेला होत असे.** कृष्ण खोड्या करीत असे त्याबद्दल गाऱ्हाणीं ऐकून यशोदेला कसें वाटत असे याचें वर्णन **पंतांनीं 'कृष्णविजयांत'** फारच सुरस रीतीनें केलें आहे. 'गोपवधूजन निकटें गाऱ्हाणें येति घेऊनी जननिकडे । गाऱ्हाणींहि परिसतां, कोप करिना तरी सुता उपरि सती ॥ २४॥ [कृष्णविजय-पूर्वार्ध-अ० ८] तसेंच '**मंत्रभागवत**' दशमस्कंधांत **पंत** लिहितात:-'ते बोभाट यशोदाश्रुतिसि सुधासेकसेचि निववीती ॥ १६० ॥' बोभाट हा शब्द पंतांनीं बऱ्याच ठिकाणीं योजिलेला आढळतो. हरिवंश अ० ३६ गी० ८७ पहा. **५. सुख देणारे. ६. गुणप्रशंसेपेक्षां.**

क्षमा न करि एकदा, तरिहि फार खोडी करां;
न देचि भय, ताडनोद्यमसमेत सोडी करां. ॥ ८६

**१. एका प्रसंगीं. तृतीयचरणार्थः**–जरी कृष्ण नेहमीं फार खोड्या करीत असे, तरी यशोदा त्यांची क्षमाच करी. परंतु **एका प्रसंगीं कृष्णानें मोठीच खोडी केली तेव्हां मात्र कृष्णाच्या अपराधाची क्षमा न करितां ती काठी घेऊन त्याला मारावयास धांवली. कथासंदर्भः**–एकदां नंदवधू यशोदा वेणीफणी करून व अंगावर आपले सर्व डागिने घालून दधिमंथन करीत ज्यांत कृष्णलीला वर्णिली आहे अशीं गाणीं गात होती. तिचें दधिमंथनाचें काम आटपण्याच्या अगोदर कृष्णानें येऊन रवी धरिली व भूक लागली म्हणून हट्ट धरिला. हें पाहून यशोदेनें कृष्णाला आपल्या मांडीवर प्यावयास घेतलें. कृष्णाचें पिणें चाललें आहे इतक्यांत चुल्यांत दूध तापत ठेविलें होतें त्यावर साय येऊन तें उतूं जात आहे असें पाहून कृष्णाचें पिणें पुरतें झालें नव्हतें तरी त्याला तसाच एकीकडे ठेवून ती दुधाखालचा जाळ कमी करण्यास धांवली. ती आपणास टाकून दुधाकडे धांवली हें पाहून कृष्णाला फार राग आला. त्यानें घरांत जाऊन सर्व मडकीं दगडानें फोडून टाकिलीं व आपण एकीकडे स्वस्थ लोणी खात बसला व आपल्याभोंवतीं जमलेल्या माकडांनाही तें वांटूं लागला. इकडे यशोदा दूध उतूं जात होतें तें खालीं उतरून परत कृष्णास पाजावयास आली. तों कृष्ण जाग्यावर नसून दह्यादुधांचीं मडकीं मात्र फुटलेलीं तिला दिसलीं. इतकें जरी झालें तरी तिनें त्याबद्दल फारसा मनांत राग धरिला नाहीं पण पुढें कृष्णाला शोधितांना जेव्हां तिला तो उखळावर बसून लोणी खातांना व तें वानरांना वांटतांना आढळला तेव्हां तिला फार राग येऊन हातांत काठी घेऊन ती त्याला मारावयास धांवली. बराच वेळ कृष्ण सांपडला नाहीं पण शेवटीं सांपडला. तेव्हां तिनें त्याचे हात धरून त्याजवर काठी उगारली. आई आपणास मारणार असें पाहून कृष्णानें आपलें तोंड रडवें केलें, व तो कांपावयास लागला. हें पाहून यशोदेला त्याची दया आली व तिनें हातांतील काठी टाकली व कृष्णाचे हात धरले होते ते सोडून दिले. 'स्तनकाम **मोघ** होतां, **भग्न** करुनि मथनपात्र **मग भंवते**, । **वानर** मेळवुनि **सुरस दे**, वाटूनि खाय पातली तंव ते' ॥१२॥ (पूर्णमंत्रभागवत). **२. ताडन+उद्यम+समेत=मारणें+उद्योग+सहित=मारण्याच्या उद्योगासुद्धां. चतुर्थचरणार्थः**–**जेव्हां कृष्णानें आई आपणास मारणार असें पाहून तोंड गोरेंमोरें केलें, तेव्हां यशोदेनें त्याला भय तर नाहींच दाखविलें, पण त्याचे हात सोडून देऊन त्याला मारण्याकरितां घेतलेली काठीही टाकून दिली. ३. हाताला. 'मारणेंही सोडलें व त्याबरोबर कृष्णाचे हात धरले किंवा बांधले होते तेही सोडले' हा येथें सहोक्ति अलंकार झाला.** याचें लक्षणः–'सहोक्तिः सहभावश्चेद्भासते जनरंजनः । दिगंतमगमत्तस्य कीर्तिः प्रत्यर्थिभिः सह ॥' **जेथें चमत्कारजनक सहभाव होतो म्हणजे दोन गोष्टी एकच क्रिया करितात तेथें सहोक्ति हा अलंकार होतो. आर्याः–'साहित्य मनोरंजक जरि भासे तरि सहोक्ति कविविहित । त्याची सत्कीर्ति जवें जाय दिगंतासि रिपुगणासहित' (अ. वि.)** त्या राजाची कीर्ति याचकांबरोबर दिगंताला

जरी ह्मणसि बांधिलें, तरि न कष्टवीलें; करा;
विचार, जशि कष्टवा तशि न कष्टवी लेंकरा; ।
यथेष्ट पुरतें जरी प्रथम दाम, कां सांधिती?

---

गेली. येथें याचकाचें जाणें व कीर्तीचें जाणें ह्या दोन्ही गोष्टी बरोबरच घडल्या असून त्यांत कीर्तीचें जाणें कल्पित परंतु चमत्कारजनक आहे म्हणून येथें **महोक्ति** अलंकार [illegible]. **याचीं उदाहरणें:**–(१) 'क्षितिवरि समकाळ पडे मत्स्य, प्रेमळजनाश्र, [illegible]' (कृष्ण ८३.१९१) (२) 'होतां अकल्पितचि तो पतिलाभ, [illegible] पतिला भजाया' ॥ (कृष्ण० ५५.११) (३) 'असुरगणचि तो वृत्राला सहसा [illegible]' (कृष्ण० ८.३७) (४) 'हरवी बाळाकरवीं त्या पांचांचीहि [illegible]' (विराट ६.३३) (५) 'ससचि गृहांतुनि राजा जननयनांतुनिहि अश्रुबिंदु निघे' ॥ (आश्रम० ३.४) (६) '[illegible] बा! तव पडला ज्येष्ठसुत, पतन याचें, । कांपवि भूतें [illegible]' । (७) 'अभिमंत्रुनि बाणमय गांडीवाच्या गुणासि तो [illegible] शक्ति काय तोलावी' (भीष्मपर्व.) (८) '[illegible] जनक सभेसह कांपवि विधुमूर्धगाहि गंगेतें' ॥ (आर्या रामायण) (९) [illegible] करूनि न्हाणून । गेल्या [illegible] (आर्या रामायण). [illegible] रडवें तोंड केलें तेव्हां मातेनें त्याला मारण्याचें सोडलें [illegible] 'कृष्णविजयां'त सुरस केलें आहे. [कृष्णविजय–पूर्वार्ध–अ० ९ [illegible]]

१. प्रास्ताविक:–'यशोदेनें मला मारलें नाहीं, तरी तिनें मला उखळाशीं बांधलें ना!' अशी देवाची शंका मनांत आणून, तिचें समाधान करीत होत्साते कवि म्हणतात. २. कष्ट दिले. अन्वयार्थ:–बांधिलें (यशोदेनें मला बांधलें तर खरें) [असें] जरी म्हणसि (जरी म्हणशील तरी तथापि) न कष्टविलें (यशोदेनें तुम्हांला श्रमविलें नाहीं, तिनें तुह्मांला कष्ट दिले नाहींत) [तुम्ही] जशी (ज्याप्रमाणें) [तिला] कष्टवा (त्रास द्या) तशी [ती] लेंकरां (आपल्या मुलास, तुम्हांला) न कष्टवी (न त्रासवी); प्रथम (पहिलें) दाम (दावें) जरी (जर) यथेष्ट (पाहिजे तसें,) पुरतें (पुरें होतें, पुरलें असतें) [तर मग] कां सांधिती? (कां जोडती, एका दाव्यास दुसरें, दुसऱ्यास तिसरें, याप्रमाणें अनेक दावीं कशाला तिनें सांधलीं असतीं?) [सारांश] ती गोपिका (तुह्मी आई यशोदा) प्रबळ न (तुला बांधावयास समर्थ नव्हती) [तर] तुझी दया (मातेला दावीं जोडण्यांत फार कष्ट होत आहेत तेव्हां आपण आतां बांधून घेऊं या, अशी यशोदेविषयीं तुमच्या पोटांत दया उत्पन्न झाली ती तुमची दया) तुज बांधती (बांधण्यास समर्थ झाली). ३. याचा विचार तुह्मीच करा. ४ कष्टविलें, थकविलें. ५ पाहिजे तितकें. ६ दावें. पहिल्या तीन चरणांचा अर्थ:–यशोदेनें मला उखळाशीं तर बांधिलें पण तेव्हां देवा! तिनें तुह्मांला कष्ट दिले नाहींत. याचा विचार तुह्मीच

न ती प्रबळ गोपिका; तुज तुझी दया बांधिती. ॥ ८७
तुम्हींहि बळि बांधिला, म्हणुनि आमुची माय जी

**करा. यशोदेनें तुह्माला कष्टविलें त्यापेक्षां तुम्हींच यशोदेला ज्यास्ती त्रासविलें. (यावर 'मीं तिला कसें त्रासविलें' असें भगवान् म्हणतील अशी शंका घेऊन कवि त्यावर उत्तर देतात.) यशोदेनें हातांत घेतलेलें पहिलें दावेंच जर तुह्मांला बांधावयास बेतानें पुरतें तर ती एकास दुसरें, दुसऱ्यास तिसरें, याप्रमाणें अनेक दावीं जोडून तुह्मास बांधण्याचे परिश्रम कशास घेती? पहिलेंच दावें तुम्हांला बांधावयास पुरतें ह्मणजे तिला जो त्रास पडला तो पडला नसता तेव्हां हे सर्व परिश्रम तिला तुमच्या लीलेमुळेंच पडले.** यशोदा दांव्यानें कृष्णास उखळास बांधावयास लागली तेव्हां पहिलें दावें पुरेनासें झालें म्हणून तिनें त्यास दुसरें जोडिलें. दुसरेंही पुरेनासें झालें म्हणून तिसरें जोडिलें. अशा रीतीनें पुष्कळ दावीं तिनें एका ठिकाणीं केलीं. तीं दावीं जोडून जोडून थकली तेव्हां कृष्णाला तिची दया आली व त्यानें तिला आपणास बांधूं दिलें. या सुरस प्रसंगानें चटकदार वर्णन 'कृष्णविजयांत' आहे. [कृष्णविजय–पूर्वार्ध–अ० ९.] कृष्णाला यशोदेनें दांव्यानें बांधलें. ह्मणूनच त्याला **दामोदर** (दाम्ना बद्धं उदरं यस्य सः) म्हणतात. 'दामें उदरीं बांधी गोपी जगदीश्वरा स्वतनयातें। तेव्हांपासुनि राया! **दामोदर** म्हणति सर्व जन यातें ॥' [हरिवंश–अ०१३ गी० ४०].

१. **समर्थ (बांधावयास).** २. **गोपवनिता,** (अर्थसंदर्भानें) **यशोदा. प्रास्ताविकः–'मीं तिला पुष्कळ त्रास दिला असेन पण शेवटीं तर तिनें मला बांधिलें तर खरें' असें भगवंताचें ह्मणणें कल्पून त्यावर कवि चतुर्थचरणांत म्हणतात. चतुर्थचरणाचा अर्थः– अनंत ब्रह्मांडाचे स्वामी जे तुह्मी त्या तुम्हाला बांधावयास देवा! यशोदा अत्यंत असमर्थ होती. तिनें तुम्हांला बांधिलें तें केवळ तुह्मीं दयेस्तव तिला तसें करूं दिलें म्हणूनच घडलें.** दयाघन गोपाळकृष्ण यशोदेच्या प्रेमास्तव बांधला गेला असेच उद्गार ग्रंथांतरीं सांपडतात. पुढील उतारे पहाः—देव उद्धवास म्हणतातः–'यद्यपि सुदुर्लभ असें सुप्रेमें सुलभ यापरि सदा मी, । किंबहुना बा! लागे बांधुनि घेणेंहि या हरिस दामीं. ॥' [मंत्रभागवत–एकादशस्कंध–गी० २८६]. रासक्रीडेच्या प्रसंगीं भगवान् गोपींस म्हणतातः– 'मृदुता न कुसुमदामीं, कठिनीं जरि, तरि न लेशहि श्रम, दामीं । प्रेमें बद्ध सदा मी देव म्हणे; गोपिकांसि दे रस दामीं. ॥' [कृष्णविजय–अ० २९ गी० ६४]. तसेंच दामबंधनप्रसंगीं **पंत** म्हणतातः–'दामें त्या बांधावें, यमपाशेंही न यत्नतां बांधावें. । प्रभु निजतन्त्र, परि हरी भक्ताधीन; स्वगौरवासि परिहरी. ॥' [कृष्णविजय–अ० ९ गी० २६]. **'न करी क्षमा तमोमति भर तनुचा न गति जववती तेणें। वात्सल्यें सुत धरुं दे, बाढयशोधाम बंध गणि लेणें.॥'** १३ (पूर्णमंत्रभागवत). ३. **प्रास्ताविकः–यशोदेनें भगवंतास बांधलें, तरी तिनें दया टाकिली नव्हती, या गोष्टीस स्वतः भगवंताचें उदाहरण दाखवीत होत्साते कवि दृष्टांत देऊन म्हणतात. अन्वयः–[देवा] तुह्मींहि बळि बांधिला; ह्मणुनि जी! मनांत सहजा दया [ही] जी आमुची माय ती निपट टाकिली काय? गुरु क्षणभरीच सकोप दिसती; जें जळ**

मनांत सहजा[1] दया, निपट[2] टाकिली काय? जी[3]! ।
सकोप[4] दिसती गुरु[5] क्षणभरीच; जें तापलें
जल ज्वलनसंगमें[6], त्यजि न शैत्य तें आपलें. ॥ ८८

---

ज्वलनसंगमें तापलें तें आपलें शैत्य न त्यजि. ४. प्रल्हादाचा नातु व विरोचनाचा पुत्र. [केका ७६]. ५. आई. **प्रथमार्धाचा अर्थः—देवा! तुह्मीं देखील वामनावतारीं बलिराजास बांधिलें म्हणून आम्हां पतितांचें मातेप्रमाणें कल्याण करणारी अशी जी तुमच्या मनांतील स्वाभाविक दया तिचा तुम्हीं अगदींच त्याग केला होता काय? अर्थात् केला नाहीं. बलिराजास बांधून थोडा वेळ जरी तुह्मी निष्ठुर झालांम्सां दिसलां तरी तुम्ही त्याजवर खरोखर निष्ठुर झालां नव्हतां. कारण त्याला वर देऊन त्याचें तुह्मीं कल्याण केलें.**

**१. साहजिक, स्वाभाविक. खुबीदार शब्दयोजनाः**—देवाचा स्वभाव साहजिकच दयाळू आहे. ही देवाच्या मनांतील साहजिक दया दीन, शरणागत भक्तांची माता होय. हिच्याच जोरावर पतितांचा उद्धार होणार. म्हणून सहजा हे विशेषण सुंदर आहे. २. **निम्शुक. पूर्णपणें, अगदींच.** ३. **अजी! महाराज!** ४. **क्रोधयुक्त. प्रास्ताविकः—देवांनीं बळीला बांधला ही प्रभूची निष्ठुरता फार वेळ टिकली नाहीं; यावरून कवि अर्थांतरन्यास अलंकाराचा आश्रय करून केकेच्या द्वितीयार्धांत एका सामान्य तत्त्वाकडे वळतात. ५. थोर, वडील लोक. ६. अग्निसमागमानें. द्वितीयार्धाचा अर्थः—थोर लोकांस राग आला तरी तो क्षणभरच टिकतो, फार वेळ राहात नाहीं. याला दृष्टांत पाण्याचा. पाणी जरी अग्निसांनिध्यामुळें कढत झालें, तरी कांहीं वेळानें जसें तें फिरून थंड होतें तद्वत् कारणवशात् थोर लोकांस जरी क्षणभर क्रोध आला तरी ते आपली स्वाभाविक दया टाकीत नाहींत.** 'उत्तमस्य क्षणं कोपः' ही म्हण सर्वप्रसिद्ध आहे. शैत्य (थंडपणा) ही पाण्याची मूळप्रकृति आहे तद्वत् क्षमा किंवा शांतता थोर लोकांचा स्वाभाविक गुण होय. 'सकोप दिसती गुरु क्षणभरीच, जें तापलें जल ज्वलनसंगमें त्यजि न शैत्य तें आपलें' ही **पं**तोक्ति 'रघुवंशां'तील पंचम सर्गाच्या ५४ व्या श्लोकार्धाशीं जुळते:—(सचानुनीतः प्रणतेन पश्चान्मया महर्षिर्मृदुतामगच्छत्!) 'उष्णत्वमग्न्यातपसंप्रयोगात् शैत्यं हि यत् सा प्रकृतिर्जलस्य.' (तेव्हां पाय धरूनियां सविनयें म्यां प्रार्थियेला मुनी, । क्रोधा टाकुनि पावला नृपसुता, स्नेहार्द्रतेला मनीं;।) 'पाण्याला जरि ताप येई, तरि तो अग्न्यातपानेंचि ये, आहे शीतल वस्तुतां प्रकृतिनें ते जाणती ज्ञानिये'. ॥ ('लेले'कृत भाषांतर.) सारांश, पाणी हें अग्नीच्या आंचेमुळें उष्णत्व पावतें पण शैत्य हें त्याची मूळ प्रकृति होय (शीतळपणा हा पाण्याच्या अंगचा गुण आहे). **पं**तांनीं ही केका जेव्हां लिहिली तेव्हां त्यांच्या मनांत वर दिलेली **कालिदासोक्ति** निःसंशय घोळत असावी. **मोरोपंतास कालिदासाच्या काव्याची ओळख होती याविषयीं अल्प विवेचनः**—मोरोपंतांस रघुकिरातादि पंडितमन्य काव्यांची ओळख नव्हती, निदान ती होती असें त्यांच्या कवितेवरून तरी दिसून येत नाहीं अशी मोरोपंतांच्या भक्तांपैकीं कांहींजणांची समजूत आहे. तिला ह्या केकार्धासारख्या पंतांच्या काव्यांतील वचनांनीं बाध येतो. सुप्रसिद्ध निबंधमालाकार आपल्या 'मो-

रोपंतांची कविता' या निबंधांत लिहितातः—"अगदीं अव्वलपासून अखेरपर्यंत कोणत्याही मराठी कवीस रघुकिरातादि पंडितमन्य काव्यांची बिलकुल ओळख होतीशी दिसत नाहीं. नामदेव, तुकाराम यांची गोष्ट तर बोलायलाच नको, पण पंडितमंडळींत बरेच मोडण्यासारखे जे वामन, मोरोपंत, रामजोशी वगैरे त्यांच्या ग्रंथांतही कालिदासादिकांचा मागमूसही नजरेस येत नाहीं. संस्कृत कवितेच्या धर्तीवर जुनें मराठी काव्य म्हटलें म्हणजे रघुनाथपंडितांचें 'नलोपाख्यान'च एक होय; त्याची रचना श्रीहर्षाच्या 'नैषधा'च्या नमुन्यावर केली आहे असें कवीनेंच सरतेशेवटीं सांगितलें आहे. पण याखेरीज बाकीच्या कोणत्याही महाराष्ट्रकाव्यांत जुन्या संस्कृत कवींची पद्धति कोणत्याहि संबंधानें बिलकुल दृष्टीस पडत नाहीं. (निबंधमाला अंक ४७). आजपर्यंत जेवढा म्हणून मोरोपंत कवींच्या ग्रंथांचा भाग आमच्या वाचण्यांत आला तेवढ्यांत असें एकही स्थल आम्हांस आठवत नाहीं कीं ज्यावरून संस्कृतांतील पंचमहाकाव्यांशीं किंवा नाटकांशीं मोरोपंतांचा परिचय होता असें अनुमान करितां येईल. (निबंधमाला अंक ५७). वामन, मोरोपंत वगैरे मंडळीचा संस्कृतकवींपैकीं कितीकांशीं व कितीसा परिचय होता हें आतां समजणें अगदीं अशक्यच आहे; पण एवढें खरें आहे कीं, त्यांच्या ग्रंथांत पाहूं जातां वरील परिचयाचें फारच थोडें प्रमाण सांपडेल. आणि यावरूनच तो परिचय जरी कांहींकांचा यथाकथंचित् असलाच, तरी तो म्हणण्यासारखा दृढ नव्हता असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं". (निबंधमाला अंक ६२). या शास्त्रीबोवांच्या म्हणण्यावर निबंधमालेंत (अंक ६१, ६२). कै० वा० दा० ओक व कै० वा० कानेटकर या दोघांनीं चर्चा केली आहे. त्यांत कै० ओक ह्यांनीं विठ्ठलकवीच्या सीतास्वयंवरकाव्यांतील 'कांहीं श्री**हनुमंतनाटककथा** कांहीं **रघूवंशि**ची। कांहीं आदिकविप्रमेयरचना कांहीं गिरा देशिची' ॥ हें श्लोकार्ध पुढें करून निदान बीडकर विठ्ठलकवीस तरी 'हनुमान्नाटक' व 'रघुवंश' या काव्यांची चांगली ओळख होती असें सिद्ध केलें. पण मोरोपंत कवीला रघुवंशादि पंडितमन्य काव्यांची कितपत ओळख होती हें त्यांच्या काव्यरचनेवरून सिद्ध करण्याचा यत्न त्यांत व इतरत्र कोणीं केलेला नाहीं. या ठिकाणीं तशा प्रकारचा थोडासा यत्न केला आहे तिकडे शोधकांचें लक्ष्य लागावें. पंतांनीं हनुमंतास उद्देशून 'वाटे स्व**मंत्ररामायण** निज **नाटक** तुम्हींच तोलावें' (६६).. असें 'नामरसायनां'त म्हटलें आहे त्यावरून पंतांचा हनुमन्नाटकाशीं चांगला परिचय असावा असें दिसतें. पंतांच्या हरिवंशांतील पुढील गीतींतील उपमा त्यांना रघुवंश सर्ग ११ श्लोक ६० वरून सुचली असावी. रघुवंशांतील श्लोकः—'श्येनपक्षपरिधूसरालकाः सांध्यमेघरुधिरार्द्रवाससः । अंगना इव रजस्वला दिशो नो बभूवुरवलोकनक्षमाः ॥' हरिवंशांतील गीतिः—'जसि रुधिरदिग्धवस्त्रा गतशोभा स्त्री रजस्वला राया!। संकोचे परपुरुषा शंभर सेना तसीच ती बा! या' ॥ (३८,७७). तसेंच पंतांनीं 'जैमिनीकृताश्वमेधस्थित कुशलवचरित वर्णिलें आहे'. (नामरसायन १०६). त्यांतील कांहीं पद्यें रघुवंश सर्ग १४ तील श्लोकांशीं अत्यंत सदृश असून त्यांतील दुसऱ्या बऱ्याच गोष्टी त्यांना चवदाव्या सर्गांतील वर्णनावरून सुचल्या असाव्यात असें तीं दोन काव्यप्रकरणें ताडून पाहिलीं असतां कळून येईल. याचीं थोडींशीं उदाहरणें:-(१)'अथाभिषेकं रघुवंशकेतोः प्रारब्धमानंदजलैर्जनन्योः' (श्लोक ७), 'कौसल्या मलिना कृशा स्वतनयाश्लेषें तदा हर्षली । आनंदाश्रु, धरूनि राघव शिरीं हुंगूनियां वर्षली । पूर्वींच्यापरि विप्र होइल

असें मानूनियां क्षिप्र ती । कोणातेंहि न पूसतां करि जणों राज्याभिषेकाप्रती' (अ० १ श्लो० ९). (२) 'उत्तिष्ठ वत्से ननु सानुजोऽसौ वृत्तेन भर्ता शुचिना तवैव। कृच्छ्रं महत्तीर्ण इति प्रियार्हां तामूचतुस्ते प्रियमप्यमिथ्या'॥ (श्लोक ६). 'श्वश्रूंतें क्षितिजा नमी तंव तिहीं आलिंगिली आदरें । कौसल्या मग ते वदे सुचुबुकीं स्पर्शोनि तीतें करें, । रामाशीं चिरकाल सर्वसुखसंपूर्णा स्वपत्न्या रहा । पातिव्रत्यबळें तुझ्याचि तरला दुःखाब्धिला वत्स हा.' ॥ (अ० १ श्लो० ११). (३) 'मुखेन सीता शरपांडुरेण' (श्लो० २६), 'तामंकमारोप्य कृशांगयष्टिं वर्णांतराक्रांतपयोधराग्राम् । विलज्जमानां रहसि प्रतीतः पप्रच्छ रामां रमणोऽभिलाषम्'(श्लो० २७). 'घेउनि निजअंकावरि जनकसुता गर्भिणी नवी रमणी । तीस पुसे लंकापतिकाल क्षितिपाल सर्ववीरमणी' ॥ 'कृशांगि ! पांडुराननें ! प्रजाफलोद्भवे ! लते ! । त्रपा त्यजुनि सांग जें मनिं स्पृहा असेल तें। विदेहराजनंदिनी ! प्रिये ! पवित्रमानसे ! । तुला अदेयवस्तु राज्यमंडळांत या नसे' (अ० २ श्लो० १८,१९). (४) 'किंवा नवात्यन्तवियोगमोघे कुर्यामुपेक्षां हतजीवितेऽस्मिन् । स्याद्रक्षणीयं यदि मे न तेजस्त्वदीयमंतर्गतमंतरायः' (श्लो० ६५). 'त्वत्पादपद्मभजनाविण भारभूतें । या जीवितेंकरुनि केवळ भार भूतें । टाकूं जरी त्वरित निंद्य कलेवराला । विघ्नस्वरूप नव वीर्यनिषेक झाला' ॥ (अ० ४ श्लो० ५६). (५) 'साहं तपः सूर्यनिविष्टदृष्टिरूर्ध्वं प्रसूतेश्चरितुं यतिष्ये । भूयो यथा मे जननांतरेऽपि त्वमेव भर्ता न च विप्रयोगः' (श्लो० ६६). 'प्रसूति झाल्यावरि देहनाथा ! करीन मी तीव्र तपःप्रयोगा । जन्मांतरीं होउनियां तुझी स्त्री । जेणें न पावे क्षण विप्रयोगा' (अ० ४ श्लो० ५८). (६) 'नवोत्कीर्तिः श्वशुरः सखा मे सतां भवोच्छेदकरः पिता ते । धुरि स्थिता त्वं पतिदेवतानां किं तन्न येनासि ममानुकंप्या' ॥ (श्लो० ७४). 'सर्व ज्ञानिजनासि संमत असा श्रीमैथिल त्वत्पिता । वत्से तूंहि पतिव्रताजनशिरोभूता जगत्पूजिता । माझा केवळ तो सखा दशरथ क्षोणीशचूडामणि । या बोलेंमि कशी न होशिल दयापात्र क्षितिस्वामिणी !' (अ० ५ श्लो० ६). (७) 'उत्खातलोकत्रयकंटकेऽपि सत्यप्रतिज्ञेऽप्यविकत्थनेऽपि । त्वां प्रत्यकस्मात् कलुषप्रवृत्तावस्त्येव मन्युर्भरताग्रजे मे' ॥ (श्लो० ७३). 'केलें दुष्कर देवकार्य सकळ क्ष्मादेव केले सुखी । न्यायें भूपति पाळितो निजजनक्लेशाटवी त्या शिखी । माझा क्रोध तथापि मैथिलसुते आहेच रामावरी । दोषावांचुनि टाकिली अकरुणें सत्वोदरा सुंदरी ॥' (अ० ५ श्लो० ७). (८) 'तन्मा व्यथिष्ठा विषयांतरस्थं प्राप्तासि वैदेहि पितुर्निकेतम्', (श्लो० ७२). 'तपस्विसंसर्गविनीतसत्वे तपोवने वीतभया वसास्मिन् । इतो भविष्यत्यनघप्रसूतेरपत्यसंस्कारमयो विधिस्ते' (श्लो० ७५), 'विनोदयिष्यन्ति नवाभिषंगामुदारवाचो मुनिकन्यकास्त्वाम्' (श्लो० ७७). 'मदाश्रमपदाश्रितस्थिरचरासही व्यापदा । कदापि न शिवे सुखी विगतवैर सारे सदा । उदास हृदयीं न हो द्विजवधूसुता शर्मदा । न दावितिल भिन्नता तुज महानुकंपास्पदा. ॥ होइल सुखप्रसूती अपत्य संस्कारविधिहि भूतनये । वत्से ! मदाश्रमाला मानुनियां स्वगुरुचें निकेतन ये ॥' (अ० ५ पद्यें ९,१०). इतर सर्गांतील स्थळें:—(९) 'अरिष्टशय्यां परितो विसारिणा सुजन्मनस्तस्य निजेन तेजसा। निशीथदीपाः सहसा हतत्विषो बभूवुरालेख्यसमर्पिता इव॥' (सर्ग ३ श्लो० १५), 'रघुवंशप्रदीपेन तेनाप्रतिमतेजसा। रक्षागृहगता दीपाः प्रत्यादिष्टा इवाभवन्' (सर्ग १० श्लो० ६८). 'द्युतिकर पुत्रयुगाला यदा प्रसवली विदेहकुलभूषा । मुग्धांस पर्णशाला वाटे तेजःसमूहमंजूषा ॥ ब्रह्मन् ! भवप्रसादें सीता व्याली किशोरयुगुलाला । त्यांच्या तेजःप्रसरें दीपांचा गर्व सर्वहि गळाला' ॥ (अ०

प्रसिद्ध तुमचे महासदय पाय; जीवांकडे
चुकी, ह्मणुनि होतिल क्षणहि काय जी! वांकडे?।
न निष्ठुर पिता; ह्मणे मनिं 'न हो प्रजा टोणपी;'

---

५ श्लो० २०,२२). वरील विवेचनावरून निदान कालिदासाच्या रघुवंशनामक काव्याशीं तरी पंतांचा उत्तम परिचय होता तसेंच हनुमन्नाटकाशीं त्यांची चांगली ओळख होती ह्या गोष्टी चाणाक्ष वाचकांस कळून येतील. या केकेच्या द्वितीयार्धाशीं समानार्थक अशीं सुभाषितें खालीं दिलीं आहेत:–(१) 'तप्तहिं सन्मन धरितें पुनरपि वरितें महापय शमातें.'। [आदिपर्व–अ० ३६ गी० २५], (२) 'कुळजाच्या हृदया पळ कोप असावा नृपा! पया उतसा.'। [हरिवंश–अ० १२ गी० ६६] (३) 'तापे बहुत परि निवे सुज्ञाचें हृदय तें जसें तोय.'। (ब्रह्मो. ८,१७) (४) आमरणांताः प्रणयाः कोपास्तत् क्षणभंगुराः। परित्यागाश्च निःसंगाः भवंति हि महात्मनाम्.॥ [हितोपदेश]. ७. थंडपणा, शीतळता. भावार्थ:–देवानें कोणाला मारलें किंवा बांधलें म्हणून त्याच्या हृदयांतील माहजिक दया अणुमात्र उणी होत नाहीं.

१. प्रास्ताविक:–देवाची सद्यता कधींही नाहींशी व्हावयाची नाहीं, असा अभिप्राय कथित होत्साते कवि देवाला आळवितात. अन्वयार्थ:–तुमचे (भगवंताचे) पाय (चरण) महासदय (अत्यंत कृपाळू) [हें] प्रसिद्ध (सुप्रसिद्ध, सर्वांस माहित आहे), [ते तुमचे पाय] जीवांकडे (आम्हासारख्या प्राण्यांकडे) चुकी (दोष, अपराध) म्हणुनि (म्हणून) क्षणहि (क्षणभर तरी) वांकडे (प्रतिकूल, अहितकारक) होतील काय जी!? पिता (बाप) न निष्ठुर (कठोर, मुलाचें अहित करणारा नसतो), प्रजा (संतति) टोणपी (मूर्ख, अडाणी) न हो (होऊं नये) [असें] मनिं (मनांत) म्हणे (म्हणतो); अपथ्यरुचि (अपथ्य म्हणजे खावयाचे नाहींत अशा प्रकारच्या पदार्थांची आवड ज्याला आहे असा) कोण (कोणता) रुग्ण (रोगी) कटुक ओखदें (कडु औषधें) पी (पितो)? प्रथमार्धाचा अर्थ:–प्रभो! तुमचे चरण सर्व जीवांविषयीं अत्यंत कळकळ बाळगतात ही गोष्ट सर्वांस विदित आहे. आम्हां मनुष्यांकडून अपराध घडले म्हणून तुमचे चरण जीवांचें कल्याण करण्यास क्षणभर तरी प्रतिकूल होतील काय? अर्थात् होणार नाहींत असें उत्तर. आम्हां जीवांकडून कितीही अपराध घडले तरी तुम्हीं सदयबुद्धीनें त्यांची क्षमाच करावी. २. प्राण्यांकडे. ३. विरुद्ध, प्रतिकूळ. ४. जनक, बाप. तृतीयचरणार्थ:-['आम्हांकडून कांहीं अपराध घडले तरी त्यांची क्षमा करणेंच तुम्हांला युक्त आहे' याला कवि दृष्टांत देतात.] मुलाकडून केवढीही चूक झाली तरी बाप मुलाच्या कल्याणाविषयीं कधींही निष्ठुर होणार नाहीं. त्याच्या मनांत नेहमीं हेंच वागत असतें कीं आपलीं मुलें मूर्ख निपजूं नयेत, व त्याकरितांच तो मुलांस रागें भरतो व शासन करितो. म्हणून तो निर्दय असें म्हणतां येत नाहीं. तसेंच जीव चुकतात, स्वच्छंदानें वागतात म्हणून तुम्ही त्यांना शासन करितां एवढ्यावरून तुम्ही त्यांच्या विषयीं निर्दय झालां असें म्हणणें चुकीचें होईल. ५. मूर्ख, अक्षरशत्रु, पारमार्थिकज्ञानशून्य.

अपथ्यरुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी? ॥ ८९
असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवां मारिले;

१. अपथ्य पदार्थ खाण्याची ज्याला आवड आहे, कुपथ्य करणारा. २. रोगी. चतुर्थचरणार्थः–ज्याला कुपथ्य करण्याची हौस आहे असा कोणता रोगी आपण बरें व्हावें म्हणून कडू औषधें पिणार आहे? कोणताही पिणार नाहीं. तात्पर्य ज्या अज्ञान मुलांस किंवा जीवांस स्वच्छंदपणें वर्तण्याची गोडी लागली आहे तीं मुलें किंवा ते जीव सदुपदेश ऐकत नाहींत. म्हणून तेवढ्यापुरती शिक्षा तुम्ही त्यांस करिता. ही शिक्षा करण्यांत तुमची दयाच प्रकट होते. यांत स्वैर वर्तणें हें अपथ्यस्थानीं. आणि सदुपदेश हा कटु औषधस्थानीं असें समजावें'. ३. औषधें. 'ष' स्थत्र 'ख' घालण्याचा कवींचा संप्रदाय आहे. मोरोपंतांच्या काव्यांत 'तोख' (वन० ४ गी० १६१) 'पाखाण' (विराट० अ० ४ गी० २२) नहुख (उद्योग० अ० २ गी० ५७) 'अंबरीख' (द्रोण० ५.६६), 'उखा' (हरि० ४१. ४७), 'ओखद' (मदालसा० अ० ६ गी० १५) इत्यादि 'ष' बद्दल 'ख' घातलेले शब्द आढळतात. हा अर्थांतरन्यासयुक्त प्रश्नालंकार झाला. ४. प्रास्ताविकः–देवाच्या दयालुत्वाचें समर्थन करीत होत्साते कवि आणखी म्हणतात. अगणित. पुष्कळ. ५. दुष्ट, साधुपीडक दुर्जन (रावणकंसशिशुपालादि). दुष्टांच्या संहारार्थ व साधूंच्या परित्राणार्थ भगवान् युगायुगांचे ठिकाणीं अवतार धारण करितात. गीतेंतील 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृतां धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे' हा श्लोक प्रसिद्धच आहे. याच अर्थाचें ख्रिस्ती शास्त्रांत एक वचन आहे. तें असें:–( Cf. Bible ) 'For the oppression of the poor, for the sighing of the needy, now will I arise, saith the Lord.' ( Psalm 12.5 ). ६. युद्धांत.

अन्वयार्थः–[कवि परमेश्वरास उद्देशून म्हणतातः–] 'तुवां (त्वां, तुम्हीं) निजकरीं (स्वहस्तानें) संगरीं (युद्धांत) असंख्य (अगण्य, अपरिमित) खळ (हिरण्यकशिपुरावणकंसशिशुपालादि साधुपीडक दुर्जन) मारिले (त्यांचा वध केला) [परंतु] निष्ठुरपणें न (त्यांचा तुम्हीं वध केला तो त्यांच्या व जगाच्या कल्याणार्थ केला, निर्दयपणानें केला नाहीं) कृपा करूनि (त्यांजवर प्रसाद करून) ते (त्यांना) भवीं (संसारांत) तारिले (उद्धरिलें); तूं जगज्जनक (देवा! तुम्ही या विश्वाचे खरे पिते आहां) सकळ जीव (सर्वप्राणिमात्र) मुलें (लेंकरें) [होत] यां (जीवरूपी लेंकरांस) दटावुनिही (बाह्यात्कारीं भय दाखवूनही) बा! (बापा!) भातुकें (खाऊ) देशी (देतोस); घातुकें (दुसऱ्याचा घातक करण्याची ज्याची बुद्धि आहे अशाच्यानें) अमृत (सुधा) नेदिजे (दिलें जात नाहीं). प्रथमार्धाचा अर्थः–देवा! जगदुत्पत्तीपासून आजपर्यंत तुम्हीं आपल्या हातांनीं जो सहस्रावधि दैत्यदानवराक्षसादि साधुपीडक दुष्टांचा संहार केला तो निष्ठुरपणानें केला नसून अत्यंत सदयांतःकरणानें व त्यांचें खरें कल्याण व्हावें या हेतूनें केला. कारण ज्यांचा ज्यांचा तुमच्या हातून वध झाला ते

न निष्ठुरपणें, कृपा करुनि ते भवीं तारिले;।
जगज्जनक तूं, मुलें सकळ जीव, यां भातुकें
दटावुनिहि देशि बा! अमृत नेदिजे घातुकें. ॥ ९०
वैरी प्रगट शांतिला धरि, परंतु मीना बकी

सर्व दुष्ट लोक संसारपाशांतून मुक्त होऊन भगवत्स्वरूपीं मिळून गेले. तेव्हां तुम्हीं त्यांना मारिलें हा त्यांच्यावर अपकार झाला नसून उलट उपकारच झाला. ईश्वराच्या हातून मृत्यु पावलेले राक्षस संसारसागरांत तरले:–रामानें खरदूषणत्रिशिरांचा संहार करून शूर्पणखेला विरूप केली हें ऐकून, आपणासह सर्व राक्षसकुळांचा नाश करण्याकरितां ईश्वरच रामरूपानें अवतरला आहे असें रावण मनांत समजला व राम जर परमात्म्याचा अंश असेल तर त्याच्या हातून मरण आल्यानें मला वैकुंठाचें राज्य मिळेल, नाहीं तर राक्षसांचें राज्य भोगावयास सांपडेल असा विचार करून, तसेच रामरूपी भगवान् आपल्यावर लवकर सुप्रसन्न व्हावे म्हणून रामाशीं विरोधभक्तीनें वागण्याचा रावणानें निश्चय केला. ह्या प्रसंगींच्या रावणाच्या विचारांचें प्रतिबिंब अध्यात्मरामायणांतील पुढील श्लोकांत सुरेख दृष्टीस पडतें. तें वरील श्लोकाच्या स्पष्टीकरणार्थ उपयुक्त जाणून आम्ही वाचकांस सादर करितों:–यद्वा न रामो मनुजः परेशो मां हन्तुकामः सबलं बलौघैः। संप्रार्थितोऽयं द्रुहिणेन पूर्वं मनुष्यरूपोऽद्य रघोः कुलेऽभूत् ॥ ५९ ॥ वध्यो यदि स्यां परमात्मनाहं वैकुंठराज्यं परिपालयेऽहम्। नो चेदिदं राक्षसराज्यमेव भोक्ष्यं चिरं राममतो व्रजामि ॥ ६० ॥ इत्थं विचिन्त्याखिलराक्षसेंद्रो रामं विदित्वा परमेश्वरं हरिम्। विरोधबुद्धचैव हरिं प्रयामि द्रुतं न भक्त्या भगवान्प्रसीदेत्. ॥ ६१ ॥ [अरण्यकांड–सर्ग ५]. हरिवंशांत शंकर कृष्णाला ह्मणतात:–'नामचि घेतां पोटीं घालुनि अपराध सकळ वळलास। करिसि अरिसि निजसम तूं बा! कैसा काय न कळवळलास'. ॥ (५०.८७).

१. संसारांत. 'भवीं तारिले'=त्यांच्या अपराधांचा त्यांस यथान्याय दंड देऊन मुक्त केलें. २. जगाचा उत्पन्नकर्ता बाप. ३. खाऊ. द्वितीयार्धाचा अर्थ:—ईश्वरापासून सर्व जगाची उत्पत्ति झाली असल्यामुळें तो जगाचा पिता असून सर्व प्राणिमात्र त्याचीं लेंकरें होत. ह्या लेंकरांच्या कल्याणाकरितां कधीं कधीं ईश्वराला त्यांना शासन करून भय दाखवावें लागतें, तरी शासनानंतर त्याच्यापासून जीवरूप लेंकरांना खाऊ अर्थात् सद्गतिच प्राप्त होते. तेव्हां ईश्वर जीवांविषयीं निर्दय नसून सदयच आहे. कारण ज्याला दुसऱ्याचा घात करावासा वाटतो असा मनुष्य त्याला अमृत कदापि देणार नाहीं. तेव्हां दुसऱ्यास अमृत देणारा मनुष्य त्याचा घात करण्यास कधींही इच्छिणार नाहीं. ईश्वर रावणकंसादि लाखों दुष्टांचा संहार करून शेवटीं त्यांना अमृत (मोक्ष) देतो म्हणून तो त्यांचा घात करणारा नव्हे, उलट तो त्यांचा सदय पिताच आहे. ४. दपटशा देऊन, धाक दाखवून. ५. मोक्ष; (पक्षीं) सुधा. ६. घातक्यानें. ७. प्रास्ताविक:–'अमृत नेदिजे घातुकें' असें जें मागें सामान्य विधान केलें त्याचें या केकेंत उदाहरण देऊन कवि समर्थन करतात. ८. अन्वयार्थ:-बकी (बगळी) वरी (बाह्यात्कारीं) प्रकट (स्पष्ट, उघड) शांतिला (शांतप-

गिळी; तशि तुला टपे सुकृतबुद्धिहीना बकी; ।
जिणें गरळ पाजिलें, अमृत पाजिलें तीस तां;

णास) धरि (धरिते) परंतु मीना (माशास) गिळी (गिळते) तशी (त्या बगळीप्रमाणें) सुकृतबुद्धिहीना (सत्कर्माचरण करण्याची जिला बुद्धि नाहीं अशी) बकी (पूतना) तुला (बाळकृष्णाला) टपे (टपून राही); जिणें (ज्या पूतनेनें) गरळ पाजिलें (तुह्मांला विष प्राशन करण्यास दिलें) तिस (तिला) तां (त्वां, तुह्मी) अमृत (सुधा, पक्षीं मोक्ष) पाजिलें (प्यावयास दिलें) [हें] [तुमचें] भलेपण (चांगुलपण, मोठें उपकाराचें काम) खळासि (दुष्टांस) न दिसो (न दिसलें तर न दिसो) [पण] भल्या (साधु लोकांना, तुमच्या भक्तांना) [तुम्ही] खरे (भले, कृपावंत) दीसतां (दिसतां). प्रथमार्धाचा अर्थः– बगळी नदीतीरावर उभी राहून डोळे मिटून बाह्यात्कारीं फार सात्त्विकपणा दाखविते पण एकादा मासा आटोक्यांत आलासा दिसला कीं त्यावर पटकन् झडप घालून त्याला गिळून टाकते. तिच्याप्रमाणेंच पापिणी पूतना वरून मोठें प्रेम दाखवून देवा ! तुमचा नाश करण्यास टपत होती. कथासंदर्भः–पूतना ही बकीनामक असुरभ-राची कन्या गोकुळांत सुंदर स्त्रीचें रूप धरून आली व तिनें नंदगृहीं जाऊन कृष्ण आपणास फार आवडतो असें दर्शवून त्याला आपल्या मांडीवर घेतलें व त्याला फार लाडवूं लागली. पण कृष्णाविषयीं तिचें हें प्रेम केवळ बाह्यात्कारी असून कृष्णाचा नाश करण्यास ती संधि पाहत होती. म्हणून तिनें थोडा वेळ कृष्णाचें कौतुक करून विषानें माखलेलें आपलें स्तन त्याला प्यावयास दिले. कृष्णानें तिच्या स्तनांतील सर्व विष शोषून घेऊन अंती तिचे पंचप्राणही ओढले व अशा रीतीनें तिचा वध करून तिला उत्तम गति दिली. 'नष्टायु मोहिनी भोगे गरसम वदना कुबुद्धि तेहि तरे; । वाखाणितां सुयादिक वरदेश्वर बाळ यश करी हित रे' (कृष्णमंत्रभागवत ६).

१. सुकृत–पुण्य, तद्विषयक बुद्धि तिनें रहित; पुण्यकर्माविषयीं जीस बुद्धि नाहीं अशी; पापिणी. पूतनेनें गोकुळांत येऊन कृष्णभ्रांतीनें पुष्कळ बाळें मारलीं व शेवटीं ती नंदगृहांतील बाळ मारावयास आली. २. पूतना ही कंसाची उपमाता होती. ३. ज्या पूतनेनें. ४. विष. ५. सुधा; (पक्षीं) मोक्ष. तृतीयचरणार्थः–पूतनेनें तुम्हांला मारण्यासाठीं विष पाजिलें पण तुम्हीं उलट तिला अक्षय जीवदान देणारें अमृत पाजिलें, अर्थात् तिला मुक्त केलें. तुमची दयालुता यापेक्षां आम्हीं कोणती वर्णावी! आपल्यास विष पाजून मारण्याचा प्रयत्न करणाऱ्या पूतनेला भगवंतांनीं मुक्ति दिली हें प्रभूचें अत्यंत दयालुत्व दाखवितें. 'पूतनेनें भगवंतास विष पाजिलें पण त्यांनीं तिला अमृत दिलें' अशा प्रकारचें वर्णन पंतांनीं व इतर कवींनीं पुष्कळ जागीं केलें आहे. त्याचीं थोडीं उदाहरणें:–(१)'दत्वा विषमपरिमितं लब्धं त्वत्तोऽमृतं नु पूतनया । पूतनयाप्यवृतस्त्वं कीर्त्या तत एव नित्यनूतनया.' ॥ [कृष्णस्तवराज],(२)'यज्ञपति विष म्हणेना, झांकुनि नयनें, जगज्जनक थानीं। रुचि आणुनि, पी; तिस दे अमृत, म्हणुनि वेधले जन कथांनीं.' ॥ [मंत्रभागवत–दशमस्कंध–गीति १२१], (३)'देतांही विष पावली अमृतता ते राक्षसी पूतना.' । [वामनपंडित–रासक्रीडा–श्लोक १८४](४)'यो देवकीमिव बकीमपि विश्वयोनिः। स्वीयं निनाय पदमुज्ज्वलयैव मत्या। सर्वोपरा-

खळासि न दिसो भलेपण, खरे भल्या दीसतां.॥ ९१

सदाहि हित नायकों; बहु अपाय केले, करूं;

तरी सकृप बाप तूं ह्मणसि, 'नायके लेंकरूं;'।

कधीं न करिसी प्रभो! भजकबाळकोपेक्षण;

---

धिशमनं कमलालयायाः । को न श्रयेत कमनं कमनन्तमिच्छन्' ॥ (विष्णुभक्तिकल्पलता ४.१८).
६. त्वां. व्या०–पंतांनीं आपल्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं 'त्वां' च्या जागीं 'तां' शब्द घातलेला आढळतो. 'त्वां'च्या जागी 'तां' घातल्याचीं थोडीं उदाहरणें:–(१) नासेल बीज म्हणउनि रोधावा मार्ग वारिचा बा! तां। [आदिपर्व–अ० २ गी० १६], (२) स्त्रीकामा! गुरुघात श्रीकामापरिस तांचि हा केला। [वनपर्व–अ० ११ गी० २७], (३) परिसावें सादर मन करुनि भरतवंशभूषणा बा! तां। [कर्णपर्व–अ० १६ गी० १२], (४) तेव्हां उत्तर कोण? कोण धरुनि क्लीबा बसावें न्वि तां। कृष्णविजय–अ० ७६ श्लो० १७], (५) आत्मा व्यर्थचि पीडिला मजहि तां केलें बहु घावरें (भस्मासुरआख्यान १४).

१. चांगुलपण. विष देणाऱ्या पूतनेला प्राणान्त दंड करून शेवटीं तुम्हीं तिला मुक्ति दिली याचेंच नांव 'दटावुनि भातुकें देसी'. हा तुमचा तिच्यावर केवढा बरें उपकार झाला? चतुर्थचरणार्थः– दुष्ट व नास्तिक लोकांना जरी दुष्टांना शासन करून त्यांस सद्गति देण्याचें प्रभूचें चांगुलपण कबूल झालें नाहीं तरी साधुजनांना तुम्ही खरे कृपावंत, भले असे दिसतां. तुमच्या पायांची महासदयता जरी दुष्टांना कबूल झाली नाहीं तरी साधूंना ती निःसंशय तशी वाटते–हा भावार्थ. २. प्रास्ताविकः–कवि भगवंताच्या पूर्वोक्त सदयतेचें दृढीकरण करीत होत्साते देवास म्हणतात. अन्वयः– 'सदाहि...करूं तरी तूं सकृप बाप लेंकरूं नायके [असें] म्हणसि; प्रभो [तूं] भजकबाळकोपेक्षण (भक्तरूपी बालकाची हयगय) कधीं न करिसी; ज्यापरि पशुपपाळ (गवळ्यांचा स्वामी नंद) तुजवरि क्षण न कोपे. ३. ऐकत नाहीं. प्रथमार्धाचा अर्थः–आम्ही पापी जीव तुम्ही आमच्या कल्याणाची गोष्ट सांगत असतां तिकडे निरंतर दुर्लक्ष करितों. [तुमचा हितकर उपदेश न ऐकतां उलट] आम्हीं आत्मघाताचीं पुष्कळ कृत्यें केलीं व त्याचा पश्चात्ताप न करितां अद्यापिही करितच आहों. इतके अपराध नित्य आमच्या हातून घडत असतां तूं कृपाळु पिता आम्हांस मोठीशी शिक्षा न करितां 'काय करावें. लेंकरूं फार हट्टी असल्यामुळें कांहीं ऐकत नाहीं' एवढेंच म्हणतोस. ४. अहितकारक कर्में, ज्यामुळें स्वतःचें नुकसान होईल अशीं कृत्यें. ५. कृपायुक्त, दयाळु. ६. भजक–तुला भजणारा, जो बाळक–अज्ञजन त्याचें उपेक्षण–उपेक्षा, अज्ञान भक्तांची उपेक्षा. तृतीयचरणार्थः–(देवा! तुमचे भक्तजन हीं तुमचीं बाळकें होत. त्यांना तुम्ही त्यांच्या कल्याणाविषयीं निरंतर उपदेश करितां, पण ते त्याचा सदोदित अव्हेर करितात व मागच्याप्रमाणेंच पुढेंहि आत्मनाशक कामें करण्यास प्रवृत्त होतात. इतके जरि ते अपराध करितात तरि ) प्रभो! तुम्ही फार दयावंत बाप असल्यामुळें

नें तूंजवरि ज्यापरी पशुपपाळ कोपे क्षण. ॥ ९२

खरा जनक तूं, जनां इतर कोण हो! देव वी?

---

लहान मुलाप्रमाणें मूढ व हट्टी अशा भक्तांच्या अपराधास्तव रागें भरून त्यांना कडक शिक्षा करीत नाहीं. 'काय करावें बोवा? हीं हट्टीं पोरें सांगितलेलें ऐकत नाहींत' असे उद्गार मात्र तुमच्या तोंडून निघतात. व मूढ भक्तांना सुमार्गास लावण्याची तुम्ही आणखी पडेल ती खटपट करून त्यांचा उद्धार करितां. त्यांना दुर्गतीस जाऊं देत नाहीं. प्रभूची सदयता व पतित:—ह्या केकेच्या तृतीय चरणांतील तत्व अत्यंत उन्नत आहे. त्याची ९० व्या केकेंतील ('असंख्य खल ३०') विचाराशीं सांखळी आहे. 'कसाही पापी असला तरी प्रभु त्याला कर्मा जास्त कडक शिक्षा करून शेवटीं सद्गतिच देतो.' या आर्यधर्मांतील विचाराशीं 'जो मजवर विश्वास ठेवून बाप्तिस्मा घेतो तो तरेल परंतु ज्याचा मजवर विश्वास नाहीं, तो नरकास जाईल' हें ख्रिस्तवचन (मार्क १६-१६), तसाच 'ख्रिस्तावर विश्वास ठेवणारे अखंड स्वर्गसुख भोगतील पण त्यावर विश्वास न ठेवणारे अखंड नरकांत पडतील' हा ख्रिस्ती धर्मांतील सिद्धांत ताडून पाहून सत्यासत्याचा निर्णय करण्याचें दुर्घट काम आम्ही 'धर्माची सूक्ष्म गति' जाणणाऱ्या विचारवंत वाचकांकडे सोपवितो. भक्तांवर तुम्ही सदोदित दयाच करितां—हा कवीचा अभिप्राय.

१. प्रास्ताविक:—भक्तांनीं कितीही अपराध केले तरी देव त्यांची उपेक्षा करीत नाहीं याला कवि भगवंताच्या चरित्रांतीलच एक उदाहरण देतात. चतुर्थचरणार्थ:—कृष्णावतारीं भगवंतांनीं लहानपणीं फार खोड्या कराव्या तथापि पिता नंद त्याबद्दल भगवंतावर कधीं रागावत नसे. तद्वत् भक्तांकडून प्रभूचे कितीही अपराध घडले तरी प्रभु त्याबद्दल आपल्या अज्ञानभक्तांची कधीं उपेक्षा करीत नाहीं. त्यांच्याविषयीं त्याच्या मनांत नेहमीं दयाच असते. २. तुजवर. व्या०:—येथें ह्रस्व 'उ'कारास्तव दीर्घ 'उ'काराची योजना केली आहे. अशी योजना पंतांना आपल्या काव्यांत अनेक ठिकाणीं केलेली आढळते. त्याचीं थोडीं उदाहरणें:—(१) सुमीत्थितानें पार सव कळलें. वंदूनि वाल्मीकिपदासि भेटले. । [कुशलवोपाख्यान—अध्याय १२ श्लो० ८३]. (२) तूझी कांता प्रशांता अजतनुजवधू मैथिलाची सुता हे. । [किता—अध्याय १३ श्लो० ८५]. पुरवणी पहा. ३. पशुपालन करणारे गौळी त्यांचा पाल—पालक, स्वामी, नंद. ४. प्रास्ताविक:—यांत कवि भगवंताचें सदय पितृत्व वर्णितात. अन्वय:— तूं खरा जनक, इतर कोण हो देव जनां वी? तव पदाब्ज जगा समीहित (इष्ट, इच्छिलेलीं) फलें दे [तसेंच] देववी; हरि! अशीच करुणा असो, पिता कधीं न भंगो; इतर कोण अशा मज असाधुला संगोपिता? ५. वितो, उत्पन्न करितो, प्रसवतो. देवा! तूंच या विश्वाचा खरा बाप, उत्पादक आहेस. देवच खरा जनक:—याविषयीं तुकोबाचा पुढील अभंग फार वाचनीय आहे:—'ज्यानें जन्म दिधला । त्याला नाहीं ओळखिलें १ ॥ कोणें केले हातपाय । कवणा म्हणसी बाप माय २ ॥ तुझा बाप होता बाळ । तेव्हां कोठें होता काळ ३ ॥ तुझी माय होती तान्ही । तेव्हां कोठें होता प्राणी ४ ॥ नऊ महिने मातेपोटीं । कोणें पुरविली रोटी

समीहित[1] फळें जगा[2] तव पदाब्ज[3] दे, देववी; ।
अशीच करुणा असो हरि[4]! कधीं न भंगो[5] पिता;
अशा मज असाधुला[6] इतर कोण संगोपिता[7]? ॥ ९३
सुविद्य, धन मेळवी, वचन आयके, आवरी

---

१ ॥ निर्गुणाचा सगुण झाला । तोचि बाप कामा आला ६ ॥ तुका म्हणे अहो बापा! । चुकवी चौऱ्यायशींच्या खेपा ७ ॥ **प्रथमचरणार्थः**–तुमच्या शिवाय इतर कोणते देव ही सृष्टि उत्पन्न करण्यास समर्थ आहेत? कोणीही नाहीं हा भावार्थ. म्हणून या जगाचे खरे प्रसवित्ते तुम्हीच आहां.

१. वांछित. **द्वितीयचरणार्थः**–देवाचें चरणकमल प्राणिमात्रांना इष्ट फलें देऊन किंवा इतरांकडून देववून त्यांचे मनोरथ सर्वस्वीं पूर्ण करितें. भगवंताच्या कृपेमुळेंच भक्तांना ऐहिक व पारमार्थिक सुखाचा लाभ होतो. आतां ही भगवंताची कृपा कधीं प्रत्यक्ष व कधीं अप्रत्यक्ष होते. हें 'दे, देववी' यांतील तात्पर्य. २. जगांतील लोकांना. येथें ही उपादानलक्षणा ( Metonymy ) झाली. पृ० १४–१५ पहा. ३. पद (पाय, चरण)+अब्ज (अप्–जल, ज–झालेलें=जलापासून झालेलें, कमल), चरणकमल. ४. विष्णो! 'हरि' ह्या शब्दाचे पुष्कळ अर्थ होतात. अमरांत 'हरि' शब्दाचे अर्थ पुढीलप्रमाणें दिले आहेत:– 'यमानिलेंद्रचंद्रार्कविष्णुसिंहांशुवाजिषु । शुकाहिकपिभेकेषु हरिर्ना कपिले त्रिषु' ॥ हरि=१ यम, २ वायु, ३ इंद्र, ४ चंद्र, ५ सूर्य, ६ विष्णु, ७ सिंह, ८ किरण, ९ अश्व, १० पोपट, ११ सर्प, १२ वानर, १३ बेडुक, १४ पिंगट (रंग). **तृतीयचरणार्थः**–देवा! तुझी माझ्यावर अशीच कृपा असो. तूं सर्व जगाचा पिता आहेस तेव्हां माझाही आहेसच. हें तुझें आणि माझें पितापुत्राचें नातें कधींही भंग न पावो. तुझें पितृप्रेमबंधन कधीं न तुटो. ५. भंग पावो, तुटो. ६. अभक्ताला, पाप्याला. **चतुर्थचरणार्थः**–देवा! तुम्ही जर माझा पतित म्हणून त्याग केला तर मग दुसरा कोण माझें पाप्याचें रक्षण करणार? कोणी करणार नाहीं. तुमच्याकडून जर माझ्या पापांची क्षमा झाली नाहीं तर ती दुसरे कोठेंही होणें नाहीं. कारण सर्व देवांत दीनदयाळ व पतितपावन अशी तुमचीच कीर्ति आहे. तुम्हींच जर माझे अपराध पोटांत घालून मला क्षमा केली नाहीं तर दुसऱ्या कोठेंही माझें संरक्षण होण्याची मला आशा नाहीं. **खुबीदार शब्दयोजनाः**–'असाधुला' हा शब्द विशेष खुबीदार आहे. साधुपुत्राचें संरक्षण कोणीही करील, पण हट्टी दुर्वृत्त पुत्राचें भगवंतावांचून इतर कोणीही बाप करणार नाहीं. ७. संगोपन करणारा, रक्षणकर्ता.

८. **प्रास्ताविकः**–पुत्र गुणवान् असला तरच तो जन्मदात्या पित्यास आवडतो पण भगवंतास सर्व सारखेच आवडतात. तेव्हां पित्यापेक्षांही भगवंताची सदयता जास्ती असें कवि या केकेंत वर्णितात. सुविद्य=ज्यानें चांगली विद्या संपादन केली आहे, विद्वान्. **अन्वयार्थः**–सुविद्य (उत्कृष्ट विद्वान्), धन मेळवी (संपत्ति मिळवितो), वचन आयके (बापाच्या म्हणण्याप्रमाणें वागतो), प्रपंच आवरी (प्रपंचाच्या कामांत

प्रपंच, भर घे शिरीं, करि कृपा पिता त्यावरी;।
असा जरि नसे, रुचे तरि न तो अभद्र क्षण;
तसा तुजचि आवडे; करिसि तूंचि तद्रक्षण. ॥ ९४

---

बापाला साह्य करितो), शिरीं (डोक्यावर) भर (प्रपंचाचा भार) घे (घेतो), त्यावरी (एवंगुणविशिष्ट पुत्रावर) पिता (बाप) कृपा करी (लोभ करितो, अशा पुत्रावर बापाची माया असते); जरि असा (वरील गुणांनीं युक्त) नसे (नसला) तरि तो अभद्र (गुणहीन, करंटा पुत्र) क्षण (क्षणभर देखील) न रुचे (आवडत नाहीं): तसा (तशा प्रकारचा दळभद्र्या मुलगा) तुजचि (देवालाच) आवडे (आवडतो), तूंचि (देवा! तुम्हीच) तद्रक्षण (त्या मूर्खपुत्राचा सांभाळ) करिसि (करितां). ९. (बापाचें) सांगणें. १०. आवरितो, आटोपतो.

१. संसार. प्रपंच आवरीः-(बापाचा) सर्व व्यवहार आटोपतो. २. प्रपंचाचा सर्व भार आपले डोक्यावर घेतो. ३. प्रथमार्धाचा अर्थः-विद्वान, धन मिळविणारा, बापाच्या सांगण्याप्रमाणें चालणारा व सर्व प्रपंचाचा कारभार आपण पाहून बापास विश्रांति देणारा अशा पुत्रावर बाप लोभ करितो. असा गुणवान् पुत्र असला तर मात्र तो बापाला आवडतो. ४. करंटा, द्वाड, गुणहीन. तृतीयचरणाचा अर्थः-परंतु पुत्र अशा प्रकारें गुणवान् नसला तर तो करंटा, दळभद्रा म्हणून बापाला क्षणभर देखील आवडत नाहीं. अशिक्षित, द्रव्य न मिळविणारा, पित्याच्या आज्ञेत न वागणारा व प्रपंचाच्या कामांत मुळींच लक्ष न देणारा अशा पुत्रास बाप अभद्र म्हणजे करंटा समजतो व तसा पुत्र त्याला क्षणभर देखील नजरेसमोर नको असतो. धृतराष्ट्र दुर्योधनाविषयीं बोलतांना म्हणतोः-'शूलाधिक दुःसहतर दुःखहेतु कुनंदन विसा' [उद्योगपर्व-अ० ९ गी० ९८]. ५. तशा प्रकारचा, म्हणजे निर्गुण पुत्र. चतुर्थचरणाचा अर्थः-वर सांगितलेले गुण ज्याच्यांत नाहींत असा मूर्ख पुत्र बापाला जरी क्षणभर आवडत नाहीं तरी ईश्वराला आवडतो व तो त्याचा सांभाळ करितो. ६. तत्=त्याचें +रक्षण=पालन. त्या निर्गुण पुत्राचें संरक्षण. भावार्थः-अमुक पुत्र गुणहीन म्हणून त्याचा त्याग देव करीत नसून गुणी अगुणी अशा सर्वजणांचा देव सांभाळ करितो, तस्मात् तो बापापेक्षांही दयाळू आहे. 'प्रपंच उत्तम रीतीनें चालविण्यास जे गुण जगीं अवश्य पाहिजेत असे गुण असलेल्या पुत्रावर पिता प्रेम करितो; पण निर्बुद्ध, निर्धन, ईश्वराज्ञेचें पदोपदीं लंघन करणारा व प्रपंचाकडे ज्याचें लक्ष्य नाहीं अशा मनुष्यावर देखील परमेश्वर दया करून त्याला परमार्थमार्गास लावितो. ईश्वरप्राप्ति होण्यास नेणतेपणा, निर्धनता, व संसाराचा त्याग ह्या गोष्टी प्रतिकूळ नसून उलट त्या थोड्याबहुत तरी अनुकूळच आहेत असें येथील व्यंग जाणावें. परमेश्वरास नेणते भक्त आवडतातः-'तयासि नेणती बहुत आवडती। होय जया चित्तीं एकभाव ॥ १ ॥ ऊपमन्यु धुरु हे काय जाणती। प्रल्हादाच्या चित्तीं नारायण ॥ २ ॥ कोळी भिल्ल पशु श्वापदें अपारें। कृपेच्या सागरें तारियेलीं ॥ ३ ॥ काय तीं गोपाळें चांगली शहाणीं। तया चक्रपाणी जेवी सवें

पिता जरि विटे, विटो; न जननी कुपुत्रीं विटे;
दयामृतरसार्द्रधी न कुलकज्जलें त्या किटे; ।

॥ ४ ॥ तुका म्हणे भोळा भाविक हा देव। आह्मी त्याचे पाव धरुनी ठेलों ॥ ५ ॥ हा तुकोबाचा अभंग संस्मरणीय आहे. **जन्मदात्या पित्यापेक्षां ईश्वराचें पितृत्व जास्त असें यांत सकारण वर्णिलेलें आहे यास्तव येथें व्यतिरेक अलंकाराची स्पष्ट छाया पडलेली आहे. केकासौंदर्यः**-या केकेंत बापाला मुलगा कोणता आवडतो याचें कवीनें मोठें सरस वर्णन केलें आहे. तसेंच पुढील केकेंत वर्णिलेलें मातृमाहात्म्यही फार सुंदर वठलें आहे. 'आसका बाप निरासकी मा' (आशेचा बाप निराशेची माय) म्हणून जी व्यवहारांत म्हण पडली आहे ती आईबापांच्या प्रेमामधील फरक पाहिला म्हणजे योग्यच आहे असें दिसून येतें.

१. **प्रास्ताविकः-बापाला जरी कुपुत्र आवडला नाहीं तरी तो मातेला प्रिय असतो म्हणून ईश्वराच्या कृपेला मातेची उपमा देऊन कवि ह्या ९५ व्या केकेंत मातृप्रेममाहात्म्याचें सुंदर वर्णन करतात. अन्वयः-'पिता जरि विटे [तरि] विटो; [परंतु] जननी कुपुत्रीं न विटे; दयामृतरसार्द्रधी त्या कुलकज्जलें न किटे; परागुरूचे ( पित्याचे ) प्रसादपट ( प्रसन्नतारूप वस्त्रें ) झांकिती परि [ते] थिटे (आंखूड) [असतात]; म्हणोनि जन्मदेचें ऋण न फिटे [असें] भले म्हणती.' व्यु०**:-पाति=रक्षण करितो म्हणून पिता. 'रक्षणाच्च पिता नृणाम्' (पा-रक्षणे आकारस्य इत्वम् तृच् प्रत्ययान्तो निपातः.) २. **विटला, कंटाळला, त्रासला. (केकेच्या) प्रथमचरणाचा अर्थः-कुपुत्र बापाला जरी आवडला नाहीं तरी न आवडो पण आईला मात्र त्याचा त्रास वाटत नाहीं.** ३. **वाईट मुलाचे ठिकाणीं. व्यु०**:-'पुन्नाम्नो नरकात् यस्मात् त्रायते पितरं सुतः। तस्मात् 'पुत्र' इति प्रोक्तः स्वयमेव स्वयंभुवा ॥.' [मनुस्मृति-अध्याय ९ श्लोक १३८.] **पुत्रमाहात्म्यः**-जे अपुत्रिक असतात त्यांना स्वर्गलाभ होत नाहीं अशाविषयीं शास्त्रांतून तसेंच कवींच्या काव्यांतून जागोजाग उल्लेख केलेले आढळतात. ऐतरेय ब्राह्मणांत हरिश्चंद्रानें नारदास पुत्रोत्पत्तीपासून काय लाभ आहे म्हणून विचारलें. त्यावर नारदानें उत्तर दिलें कीं पुत्रमुख पाहिल्यानें बाप ऋणमुक्त होतो आणि अमर होतो. पृथ्वी, अग्नि व उदकें यांपासून जे उपभोग मिळतात त्यांपेक्षां पुत्रोत्पत्तीपासून अधिक उपभोग मिळतात. पुत्रलाभापासून तमाचा नाश होतो, कारण पुत्र म्हणजे केवळ अत्युच्च आकाशांतील ज्योतीच आहे. पुत्र ही एक अन्नानें भरलेली नौकाच आहे. मुलगा हाच स्वर्ग यास्तव पुत्राची इच्छा करावी. अपुत्रकाला स्वर्ग नाहीं ही गोष्ट पशूही जाणतात. याविषयीं पंतांच्या पुढील दोनच गीति पहाः-(१) 'संतति नसतां स्वर्गीं पितरांसि बसावया नसे ठाव.' । [आदिपर्व-अ० ४ गी० ५], (२) 'अनपत्यत्व स्वर्गद्वारनिरोधासि हेतु हें व्यक्त.' । [आदिपर्व-अ० १८ गी० ३३]. **भावार्थः**-आई कुपुत्राचा कधीं कंटाळा करीत नाहीं. कुपुत्र पुष्कळ झाले पण कुमाता कोणीं कधीं ऐकिली नाहीं असें संस्कृतांत एक वचन आहे. ४. **दयारूपी अमृतानें आर्द्र म्हणजे ओली झाली आहे बुद्धि जिची; जिचें अंतःकरण दयेनें ओलें झालें आहे अशी; अर्थात् परमदयाळु माता.** ५. **कुळाचें काजळ (आ-**

प्र[१]सादपट झांकिती परि प[२]रा गुरूचे थि[३]टे;
म्हणूनि म्हणती भले[४] 'न ऋण जन्मदेचें[६] फिटे' ॥ ९९
वि[७]टेल जननीहि कीं शत रची निमित्तें विधी;

पल्या दुर्गुणानें काजळासारखा कुळास डाग लावणारा पुत्र) त्यानें कुलकलंकी पुत्रानें. ६. मलिन होते. किटणें=अस्वच्छ, मलीन होणें. डाग पडणें. द्वितीयार्धाचा अर्थः- पुत्र कुलाला कलंक लावणारा जरी असला तरी परम दयाळु मातेचें अंतःकरण त्याविषयीं नेहमीं प्रसन्नच राहातें. तिला तो कधीं वाईट वाटत नाहीं; उलट ती त्यावर सदोदित दयाच करित असते.

१. प्रसन्नतारूपी वस्त्रें. २. पर-श्रेष्ठ. त्या गुरूचें बापाचें. [illegible] श्रेष्ठ अशाविषयीं कृष्णविजय-उत्तरार्ध [illegible] 'गुरु आद्य पिता, दुसरा विद्याप्रद [illegible] ज्ञानदानपटु जो की.' ॥ तृतीयचरणार्थः-बाप अपत्यप्रेमामुळें मुलाच्या अपराधांवर किंवा दुर्गुणांवर पांघरूण घालतो खरा पण त्याचें पांघरूण अपुरतें असल्यामुळें तें सर्वांग झांकित नाहीं. आईचें प्रसाद मात्र मुलाला [illegible] असून तें त्याला कोणाही बाजूनें उघडें पडूं देत नाहींत. ३. अपुरतें. तोकडें. आखूड. निरुंद. ४. आई अपत्याच्या अपराधाची पूर्णपणें क्षमा करिते यास्तव. ५. विचारशील. धीरपुरुष. चतुर्थचरणार्थः-यास्तवच आईचे उपकार जन्मजन्मांतरींही फिटत नाहींत म्हणून ज्ञाते पुरुष म्हणतात. मातृमहिमाः [illegible] कधींही फिटणें नाहीं, म्हणूनच आयधर्मग्रंथांतून [illegible] विषयीं पुढील वचनें पहाः-(१) 'न मातुः [illegible] (२) 'पितुर्नोऽपि गुरुर्माता [illegible] चन । गर्भधारणपोषाभ्यां तेन माता [illegible] शतं पिता । सहस्रं तु पितॄन् माता गौरवेणातिरिच्यते [illegible] तैत्तिरीयोपनिषदाच्या शिक्षाध्यायांतील ११ व्या अनुवाकांत अध्ययन [illegible] शिष्यास उपदेश करितात त्यांत प्रथम आईला देवाप्रमाणें मान [illegible] हें पुढील संक्षिप्त उताऱ्यावरून कळून येईल] 'सत्यं वद । धर्मं चर । [illegible] प्रमदितव्यम् । [illegible] न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् । देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव' । इत्यादि. ६. जन्म देणाऱ्या मातोश्रीचें. खुबीदार शब्दयोजनाः-येथें 'जन्मदा' हा शब्द कवीनें मोठ्या खुबीनें योजिला आहे. सापल मातेचें पुत्रावर विशेष प्रेम नसतें, उलट पुष्कळ ठिकाणीं पुत्राशीं तिचा विरोधच दृष्टीस पडतो. तेव्हां पुत्रावर सापलमातेचे उपकार फारसे नसल्यामुळें तिच्या उपकारावद्दल ऋणी असण्याचें त्याला कारण नाहीं. ७. त्रासेल, कंटाळेल. प्रास्ताविकः-यांत मातेपेक्षांही भगवान् दयाळु आहे असें कवि सांगतात. अन्वयार्थः-'जननीहि ( मातोश्री देखील )

मळे कलियुगीं श्रुती जशि, खळीं तिची तेंवि धी।
कदाचित विटेल; बा! तव दया न दीना वैरी,

( कदाचित् ) विटेल ( कंटाळेल ) कीं ( कारण कीं ) विधी ( दैव ) ( दुर्दैव ) शत ( शेंकडो ) निमित्तें ( कारणें ) रची ( उत्पन्न करितें ); जशी कलियुगीं श्रुती ( वेद ) मळे ( मळले, भ्रष्ट झाले ) तेंवि तिची धी ( आईची बुद्धि ) कदाचित् खळीं (वाईट पुत्राचे ठायीं ) विटेल ( भ्रष्ट होईल ); जशी भवन्नदी (आपली नदी, गंगा) जगदघक्षयीं ( विश्वांतील पातकाचा नाश करण्याविषयीं ) कर ( हात ) नावरी ( आवरीत नाहीं ) [ तशी ] बा! ( बापा! देवा! ) तव दया ( भगवत्कृपा ) दीनावरी ( दुर्बळावर ) [ कदाचित् ] न [ विटेल ] ( कमी होणार नाहीं ). ८. जन्मदात्री मातोश्री देखील. ९. कारण कीं. १०. दुर्दैव, प्राक्तन.

१. **प्रथमचरणार्थ:**—जननी कुपुत्राला कंटाळत नाहीं असें मागील केकेंत सांगितलें, पण कांहीं कारणामुळें तीही कुपुत्रास कंटाळेल. प्राक्तन कर्म शेंकडों कारणें उत्पन्न करितें तेव्हां तें कोणतें ना कोणतें तरी निमित्त रचून मातेच्या मनांत कुपुत्राविषयीं कंटाळा आणील. 'शत' म्हणजे 'शंभरच' असा अर्थ येथें नसून 'शेंकडों पुष्कळ' असा अर्थ होतो. **कलियुगांत.** एकंदर युगें चार:—कृत, त्रेता, द्वापार व कली. कृतयुगास सत्ययुग असेंही नांव दिलें आहे. या सर्व युगांत कलियुग अत्यंत भ्रष्ट व पापी असें गणिलें आहे. सर्व प्रकारचीं पातकें या युगांत घडतील म्हणून प्राचीन ग्रंथांतून भविष्य केलें आहे. वास्तविकपणें कृत, त्रेता, द्वापार व कली हीं चार युगें मनुष्याच्या आचरणावर अवलंबून आहेत. कर्तव्यदक्ष, धार्मिक व उद्योगी मनुष्याला नेहमींच कृतयुग असून आळशी व अविश्वासी अशा मनुष्याला मात्र नेहमीं कलियुग असतें. हा विचार ब्राह्मण ग्रंथांतील पुढील पद्यांत उत्तम रीतीनें दिसून येतो:—कलिः शयानो भवति, संजिहानस्तु द्वापरः उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन् ॥ चरैव चरैव' ( बव्हृच ब्राह्मण ). कलियुगांत श्रुतिस्मृतींचें माहात्म्य नष्ट होईल याविषयीं पुढील सुभाषित वाचनीय आहे:—'श्रुतिः शिथिलतां गता स्मृतिरपि प्रनष्टाधुना । गतिर्विपथमागता विगलिता द्विजानां ततिः । गवामपि च संहतिः समुचितक्रियातश्च्युता । कृता नु जरया तया कलियुगस्य साधर्म्यता' ॥ अर्थ:—(जरापक्षीं ) कान बहिरे झाले, स्मरण नाहींसें होत चाललें, नीट चालतां येत नाहीं, दांत पडले व इंद्रियांचे योग्य व्यापार त्यांजकडून होणें बंद झालें. (कलिपक्षीं ) वेदमाहात्म्य कमी झालें, स्मृतिलोप झाला, सद्गतीचा मार्ग सुटला, विप्रांचे संघ दृष्टीस पडत नाहींत व लोक गाईंचें पालनपोषण करीत नाहींत. तसेंच पुढील कलिकौतुक पहा:—'सीदन्ति सन्तो विलसंत्यसंतः । पुत्रा म्रियंते जनकश्चिरायुः । परेषु मैत्री स्वजनेषु वैरं । पश्यंतु लोकाः कलिकौतुकानि' ॥ आमच्या प्रमाणें ग्रीकलोकांत सुवर्ण, रौप्य, ताम्र व लोह अशीं चार युगें समजत असून मागें गेलें तें सुवर्णयुग व चालत असलेलें लोहयुग असें मानण्याचा त्यांचा संप्रदाय होता. २. **वेद. वेदाविषयीं अल्प माहिती:**—'मंत्रब्राह्मणात्मको वेदः' असें सायणाचार्यांनीं वेदाचें लक्षण दिलें आहे. यावरून वेदाचे संहिता आणि ब्राह्मण असे दोन भाग होतात. वेदाच्या मंत्रसमू-

हाला संहिता ह्मणतात. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद ह्या चार वेदांच्या चार संहिता असून, प्रत्येक संहितेचीं वेगळीं वेगळीं ब्राह्मणें आहेत. ब्राह्मणांत बहुतकरून यज्ञ कसा करावा हें गद्यरूपानें सांगितलेलें असतें, तरी त्यांत कोठें कोठें संहितेंतील मंत्र घेऊन त्याचा अर्थ केलेला असतो, किंवा मंत्राच्या संबंधानें कांहीं इतिहास सांगितलेला असतो. तशींच त्यांत निरनिराळ्या यज्ञांचीं फळेंही सांगितलेलीं असून कित्येक आचार वर्णिलेले असतात. उपनिषदें हीं ब्राह्मणांस जोडलेलीं परिशिष्टें होत. त्यांचा उद्देश वेदांचा गूढार्थ प्रकट करण्याचा आहे. प्रत्येक वेदाच्या अनेक शाखा व चरण आहेत. शाखा अथवा चरण ह्मणजे संहितेच्या निरनिराळ्या पाठांचें अध्ययन करणारे निरनिराळे लोक. ऋग्वेदाच्या शाकलबाष्कलादि मुख्य पांच शाखा असून यजुर्वेदाच्या शायशीं शाखा आहेत. शायशीं शाखांपैकीं बऱ्याच शाखांचीं नांवें अप्रसिद्ध आहेत. अथर्वण वेदाच्या मुख्य नऊ शाखा असून सामवेदाच्या हजार शाखा होत्या असें ह्मणतात. वर सांगितल्याप्रमाणें प्रत्येक वेदांत ब्राह्मण ग्रंथ आहेत. त्यांत ऋग्वेदाच्या ब्राह्मणांना 'बव्हृच' ब्राह्मण, यजुर्वेदाच्या ब्राह्मणांना 'अध्वर्यु' ब्राह्मण, अथर्वणवेदाच्या ब्राह्मणांना 'अथर्वांगिरस' ब्राह्मण व सामवेदाच्या ब्राह्मणांना 'छंदोग' ब्राह्मण ह्मणतात. मुख्य वेदाशिवाय कांहीं सूत्रग्रंथ आहेत त्यांना वेदांगें ह्मणतात. वेदांगें सहा असून 'शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, व ज्योतिष' हीं त्यांचीं नांवें होत. वरच्याशिवाय 'आरण्यक' ह्मणजे अरण्यांत बसून ह्मणण्यासारखे ग्रंथ यांचीही वेदांतच गणना होते. उपनिषदांना कोणी आरण्यकांचाच अंतर्भेद मानतात. प्रत्येक वेदाला निरनिराळीं आरण्यकें आहेत. एकंदर एकशेंआठ उपनिषदें उपलब्ध असल्याचें समजतें. त्यांत ईशकेनकठप्रश्नमुंडमांडुक्यादि श्रीशंकराचार्यांनीं भाष्य लिहिलेलीं एकादश उपनिषदें मुख्य मानतात. वेदाच्या उत्पत्तिविषयीं व्यास, जैमिनी व शंकराचार्य ह्यांचीं मतें वेद अनादिसिद्ध आहेत अशीं असून अलीकडचे शोधक वेदाच्या उत्पत्तीचा काळ ख्रिस्तीशकापूर्वी दहा हजार वर्षांच्याही पूर्वीचा असावा असें मानतात. चार वेदांत ऋग्वेद अतिशय प्राचीन आहे. त्यांतील पुष्कळ भाग इतर तीन वेदांत आले आहेत. ऋग्वेदाचे दोन तऱ्हांनीं भाग पाडिले आहेत. त्यांत मंडल, अनुवाक व सूक्त कल्पून वेदाचे भाग पाडणें ही जुनी तऱ्हा होय. एकंदर ऋग्वेदाचीं मंडलें दहा असून प्रत्येकांत चार अथवा जास्त अनुवाक असतात. प्रत्येक अनुवाकांत तीन अथवा अधिक सूक्तें असतात. व प्रत्येक सूक्तांत एकाहून अधिक ऋचा असतात. दुसरी तऱ्हा वरच्यापेक्षां जास्त सुसंबद्ध आहे. सर्व ऋग्वेदाचीं आठ अष्टकें कल्पिलीं असून प्रत्येक अष्टकांत आठ अध्याय मानले आहेत. प्रत्येक अध्यायांत पंचवीसाहून जास्त वर्ग असतात; व एकपासून नऊ पर्यंत ऋचांचा एक वर्ग होतो. ऋग्वेदाचीं सूक्तें एकहजारापेक्षां किंचित् जास्त असून प्रत्येक सूक्तांत सरासरीनें दहा ऋचा धरिल्या ह्मणजे एकंदर ऋग्वेदांत दहाहजारांपेक्षां थोड्याशा अधिक ऋचा सरासरीनें बसतात. "वेदसूक्ताची कविता साधी, सुंदर, सहजोक्तिसंपन्न आणि निष्कपट अर्थगौरवांनीं भरलेली आहे. तींत 'उषा' (प्रात:काळचें अरुणवर्णाचें तेज), 'वरुण' ( रात्रीरूप देवता ), 'सविता' (सूर्यरूपी देवता), इत्यादिक सृष्टपदार्थांचीं आणि तेजांचीं अत्युत्तम वर्णनें भरलीं आहेत." ( वेदार्थयत्न. ) वेदांत देव तेहतीस आहेत असें पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. 'ये देवासो दिव्येकादश...यज्ञमिमं जुषध्वम्' ( ऋग्वेद १-१३९-११ ) या

मंत्रावरून त्यांतील अकरा देव स्वर्गांत, अकरा पृथ्वीवर व अकरा अंतरिक्षांत राहातात असें कळून येतें. तेहतीस देवांत अग्नि, वायु, इन्द्र, मित्र, वरुण, अश्विनौ देव, मरुद्गण, ब्रह्मणस्पति, सोम, सविता, द्यावापृथ्वी, विष्णु, पूषा, भग, उषा, अर्यमा, रुद्र, सूर्य, त्वष्टा, ऋभु, अदिति हे विशेषेंकरून मुख्य मानतात. शतपथ ब्राह्मणामध्यें ( ४-५-७-२ ) अष्टवसु ( पंचमहाभूतें, सूर्य, चंद्र, व नक्षत्रें), एकादश रुद्र (दशप्राण व जीवात्मा ) द्वादशादित्य ( संवत्सराचे बारा महिने ) इंद्र ( विद्युत् ) व प्रजापति ( यज्ञ ) असे तेहतीस देव मानले आहेत. इंद्र व प्रजापतिबद्दल द्यु व पृथ्वी मानून अष्टवसु, एकादश रुद्र, व द्वादशादित्य हे बाकीचे एकतीस असेही मानतात. ऋग्वेदांत सांगितलेले बहुतेक सर्व देव कशाचे तरी अभिमानी देव असून रूपकसिद्ध आहेत. उदाहरणार्थ 'अग्नि' ह्मणजे जगतांतील जें कांहीं तेज आहे तदभिमानी देवता, 'वरुण' ह्मणजे रात्रीचा अभिमानी देव 'इंद्र' ह्मणजे आकाशांतून पाऊस पाडणारी जी शक्ति तदभिमानी देव, 'सविता' ह्मणजे सूर्यरूप देव, 'मित्र,' ह्मणजे दिवसाचा अभिमानी देव, 'मरुत्' ह्मणजे वादळांचा अभिमानी देव, व 'द्यु' ह्मणजे अंतरिक्षावरील प्रकाशानें व्याप्त झालेल्या प्रदेशाचा अभिमानी देव. 'द्यू' देवाला पति मानून पृथ्वीच्या अभिमानी देवतेला त्याची पत्नी मानिली आहे व हीं सर्व देवांचीं मातापितरें होत असेंही सांगितलें आहे. द्युलोक, पृथ्वी आणि अंतरिक्ष इत्यादि जो अवकाश अथवा पोकळी तिला अदिती अथवा अखंड पोकळी असें ह्मणून देवता मानली आहे. हिच्या पोटांत सूर्य, चंद्रादि संपूर्ण प्रकाशगोल वसतात ह्मणूनच हिला पौराणिक ग्रंथांतून देवमाता मानिली आहे. 'उषा' ह्मणजे प्रभातकालची देवता. हिला सूर्य अथवा इंद्रदेवाची योषा, तसेंच इतरत्र कन्या असें मानलें आहे. इंद्र हा वृत्राचा (अर्थात् मेघाचा) शत्रु, शचीपति (पराक्रम करणारा) व वज्रधारी (विद्युद्धारी) आहे; मरुत् देव त्यास साह्य करितात, ह्या गोष्टी; तसेंच पुरूरवस् (पुष्कळ किरणें ज्याला आहेत असा सूर्य) व उर्वशी (चहूंकडे पसरणारी उषा देवी) यांचा विवाह, इंद्र उषेचा व रात्रीचा जार आहे इत्यादि गोष्टी वरीलप्रमाणेंच रूपकसिद्ध आहेत. वेदांतील सर्व देव हे एकाच परमात्म्याच्या भिन्न शक्ति ह्मणून वर्णिल्या आहेत. वास्तविक परमेश्वराचें स्वरूप 'एकमेवाद्वितीयं' असेंच वर्णिलें आहे. वेदांतील देवस्तुतीचा मासला पृ० १६२त दिला आहे. त्यावरून त्यांतील सौंदर्य व उदात्तता हीं दिसून येतात. **कलियुगांत वेद अधर्मी व नास्तिक यांच्या हातीं पडल्यामुळें व मुखीं गेल्यामुळें मलिन व सत्वहीन होतात. वेद कधीं मळावयाचे नाहींत पण तेहि कलियुगांत जसे मलिन होतात, तद्वत् मातेची बुद्धि कदाचित् या कलियुगांत कुपुत्राविषयीं मळेल. ३. दुष्टाविषयीं, कुपुत्राविषयीं. ४. बुद्धि. ५. एखादे वेळेस तरी. ६. कृपा, दासावरील दया. 'तव दया न दीनावरी' याचा अर्थः—भगवंताची कृपा दीनदुर्बळाविषयीं कधींही कंटाळावयाची नाहीं. पाप्यावर दया करण्याविषयीं ती कदापि माघार घेत नाहीं. या कलियुगांत मातेची बुद्धि एकवार कुपुत्राविषयीं अकृप होईल पण भगवत्कृपा आपल्या पापी पुत्रावर प्रसाद करण्यास कधींच चुकणार नाहीं. कारण भगवंताच्या दयेपुढें कलिकाळाचें कांहीं चालावयाचें नाहीं.** पृ० ५२ यांत बायबलांतून व ज्ञानेश्वरींतून उतरलेलीं वचनें याशीं समानार्थक आहेत. 'नमितां न लोटिला त्वां पार्थे कोणीहि

जशी जगदघक्षयीं[1] कर भवन्नदी[2] नावरी. ॥ ९६

---

रंक रागानें.' (ब्रह्मो. २२-३२) देवदया मातापित्यांच्या दयेपेक्षां पुष्कळपटीनें श्रेष्ठ आहे:-(१) 'मायबापें संभाळिती । लोभाकारणें पाळिती. ॥ १ ॥ तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळु स्वभाव ॥ २ ॥ मनामारिखें न होतां । बाळकासी मारी माता ॥ ३ ॥ तुका म्हणे सांगूं किती । बाप लेंकासी मारिती. ॥ ४ ॥ (२) तूं माउलीहून मायाळ, चंद्राहूनि शीतळ । पा-णियाहून पातळ, कल्लोळ प्रेमाचा. ॥१॥ देऊं काशाची उपमा, दुजी तुज पुरुषोत्तमा ! । [illegible] नामा, तुझ्या वरूनी टाकाली ॥ २ ॥ तुवां केलें गे अमृत, [illegible] त्वांचा जनिता, सकळ सत्तानायक ॥ ३ ॥ कांहीं न बोलोंनी [illegible] तुका म्हणे पंढरीनाथा ! क्षमा करीं अपराध. ॥ ४ ॥ (३) [illegible] तसी न मानेला' (अभ. ४०३६). ईश्वराची दया मातेच्या दयेपेक्षांही श्रेष्ठ आहे [illegible] शास्त्रांतील पुढील वचन संस्मरणीय व [illegible] आहे.-( 4 ) 'Can a woman forget her sucking child, that she [illegible] compassion on the son of her womb? yea, they may forget [illegible] I (Lord) not forget thee.' (Isaiah 49. 15) [illegible] व लडिवाळपणें वागतें व तिच्यावर त्याचें प्रेम अतिशय [illegible] उपमा देतात. 'येग येग विठाबाई [illegible]'

१. जगत् (जग)+अघ (पाप)+क्षयीं (नाश करण्याविषयीं) जगांतील पाप नाहींसें करण्याविषयीं. २. आपली नदी; अर्थात आपल्या पायापासून निघालेली गंगा, भागीरथी. चतुर्थचरणार्थ: ज्याप्रमाणें गंगेत स्नान करणाऱ्या अथवा गंगास्मरण करणाऱ्या जगांतील लोकांचें पाप नाहींसें करण्याविषयीं गंगा आपला हात कधीं आवरून धरित नाहीं, तर जे लोक तिच्या उदकांत स्नान करितात, तिचें प्राशन करितात किंवा तिचें नुसतें स्मरण करितात त्या सर्वांचें पाप ती नाहींसें करिते; (तद्वत भगवंताची कृपा सुष्टाप्रमाणें दुष्टावरही प्रसाद करण्यास मागें घेत नाहीं). गंगेचें माहात्म्य पुराणांत फार वर्णन केलें आहे. पुढील वचनच पहा:-'गंगा गंगेति यो ब्रूयात् योजनानां शतैरपि । मुच्यते सर्वपापेभ्यो विष्णुलोकं स गच्छति' ॥. चतुर्थचरणासंबंधीं विशेष खुलासा:-भगवंताची दया पाप्यांचा उद्धार करण्याविषयीं हात आटोपित नाहीं हें चतुर्थ चरणांत कवीनें दृष्टांत दिला आहे. ज्याप्रमाणें 'त्रिलोकीसती'ला 'अतुलमौक्तिकावलि'प्रमाणें शोभा देणारी व आपल्या पायापासून निघालेली नदी भागीरथी सर्व जगाचें पातक नाहींसें करण्याच्या कामांत आपले हात आटोपित नाहीं, तद्वत् दहाव्या केकेंत आपल्या पातकाचें गुरुत्व दाखविण्याच्या हेतूनें जरी कवीनें 'भगवच्चरणकन्यका आपगा' मला निरखून भ्याली असें ह्मटलें आहे तरी या ठिकाणीं सर्व जगाचें पातक भस्म करण्याविषयीं सदा तत्पर असणाऱ्या भागीरथीचें योग्य माहात्म्य वर्णिलें आहे. 'गंगास्तुति,' 'गंगाप्रार्थना 'गंगावकिली,' 'गंगास्तव' आणि 'गंगाविज्ञप्ति' अशीं पांच गंगा-वर्णनपर प्रकरणें पंतांनीं रचिलीं आहेत, त्यांत त्यांनीं गंगामहिमा फारच सुरस वर्णिला आहे.

कृपाचि[1] जननी तुझी; सकल जीव दायाद[2]; या[3]
तिणेंचि[4] उपदेशिल्या[5] करिति सर्व दाया[6] दया; ।
असें उमजतां[7] भले[8] न गुरुभाव[9] तो टाकिती;

---

१. प्रास्ताविकः–भगवंताची कृपा हीच खरी माता, इतर जन्म देणाऱ्या माता कृपाजननीनें ठेवलेल्या दाया होत अशा अभिप्रायानें कवि म्हणतात. अन्वयार्थः–तुझी (भगवंताची) कृपाचि (दया हीच) जननी (माता); सकल जीव (सर्व मनुष्यादि प्राणी) दायाद (कृपाजननीचीं लेंकरें) [होत]; या (आमच्या प्रसिद्ध जन्म देणाऱ्या माता) तिणेंचि उपदेशिल्या (कृपाजननीनें उपदेश केल्या होत्साल्या) सर्व दाया (उपमाता) दया करिति (मुलांवर कृपा करितात, कृपाजननीच्या मुलांवर ह्या उपमाता दया करितात); भले (सुज्ञलोक) असें उमजतां (कृपा हीच खरी जननी, इतर माता केवळ दाया असें समजत असतां) गुरुभाव न टाकिती (दाया आमच्या आया नव्हत असें मानित नाहींत तर त्यांच्या ठिकाणीं मातृभावच ठेवितात); तुजहि (देवा! कृष्णावतारीं तुह्मांला देखील) गोपिका (गवळीण, अर्थसंदर्भानें यशोदा) मता (मान्य झाली, उपमाता असून तिच्या ठिकाणीं तुह्मीं खरा मातृभाव ठेविला) मग जनांस (लोकांना) किती तोटा (काय नुकसान होणार)? २. मुलें. 'दायादौ सुतबांधवौ' इत्यमरः. 'दायाद शब्दाचे (१) पुत्र, (२) नातलग असे दोन अर्थ होतात. ३. ह्या प्रसिद्ध माता. ४. कृपाजननीनें. ५. उपदेश केलेल्या सांगितल्या संवरलेल्या. प्रथमार्धाचा अर्थः–भगवत्कृपा हीच वास्तविक माता, आम्हांस जन्म देणाऱ्या माता ह्या कृपाजननीनें आमचा संभाळ करण्याकरितां ठेवलेल्या दाया (उपमाता) होत. ह्या उपमाता जी आमच्यावर दया करितात ती आपण होऊन करीत नसून कृपाजननीनें सांगितल्यामुळें त्या तसें करितात. उपमाता मुलांची जी काळजी घेतात ती खऱ्या प्रेमास्तव नसून पैशाकरितां असते तद्वत् आमच्या ह्या उपमातांना आमची काळजी असण्याचें कारण कृपाजननीनें त्यांच्याकडे तें काम सोंपविलें आहे म्हणूनच, कृपाजननीच्या लोभास्तवच आमच्या उपमाता आमच्यावर लोभ करितात. ६. उपमाता, मुलें सांभाळण्याकरितां ज्या बाया ठेवितात त्या. 'दाई' हा शब्द हिंदुस्थानी व फारशी अशा दोन्हीं भाषांतून आढळतो. हा शब्द पंतांच्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं योजिला आहे. 'स्नेहें शिशुला देइल मातेहुनि अन्य काय सुख दायी' (शांतिपर्व) 'मजपरिस तूं कराया दायींहुनि मायबाप जेंवि हित (शांतिपर्व). 'धे' स्तनपान देणें त्यापासून 'धात्री' (स्तनपान देणारी) हा शब्द निघून त्यापासून 'दायी' शब्द निघाला. (व्युत्पत्ति० पृ० ४१). ७. समजत असतां. ८. सुज्ञ पुरुष, जाणते, कृतज्ञ लोक. ९. माता ही समजूत, आईपणा, दायांना आया समजणें हा त्यांच्या संबंधीं मातृभाव. तृतीयचरणार्थः–ज्ञाते पुरुष भगवत्कृपा श्रेष्ठ आहे म्हणून आपल्या मातांविषयीं आपला पुत्रधर्म टाकित नाहींत; उलट ते उपमातांनाच आपल्या माता मानून त्यांचा आदर करितात.

मैता तुजहि ³गोपिका, मग जैनास तोटीं किती? ॥ ९७
भैरोनि कुैचकुंभ जी विषैरसें मुखीं दे बकी,

---

१. मान्य. २. गवळीण; (अर्थानुरोधानें) कृष्णमाता यशोदा. चतुर्थचरणार्थः–यशोदा तुमची उपमाता असूनही ती तुला मानवली म्हणजे तिच्या ठिकाणीं तुम्हीं खरा मातृभाव ठेविला होता. अर्थात् तिला तुम्ही आपली प्रत्यक्ष माता समजून तिला 'आई आई' म्हणून हांका मारीत होतां. यशोदेला तुम्हीं माता म्हटलें म्हणून जसें तुमचें कांहीं नुकसान झालें नाहीं तसें इतर लोकांनीं आपल्या उपमातांस आया म्हटलें म्हणून काय तोटा होणार आहे? कांहीं होणार नाहीं. ३. इतर लोकांस. ४. नुकसान. 'तोटा' हा शब्द हिंदुस्थानी आहे. ५. प्रास्ताविकः–'यशोदा जरि वास्तविक तुमची उपमाता होती, तरी ती तुमचें स्वपुत्राप्रमाणें लालनपालन करीत होती म्हणून तिला तुम्हीं माता म्हटलें, यांत कांहीं आश्चर्य नाहीं: पण बकी (पूतना) मातेच्या वेषानें तुमचा घात करावयास आली व तिनें तुम्हाला विष पाजिलें असें असून तुम्हीं तिला मातेची सद्गति दिली हें मात्र आश्चर्य खरें!' असे ९८व्या केकेंत कवि वर्णितात. ६. कुंभाकार (घागरीएवढे) स्तन. विस्तृत व पीन कुच असणें हें स्त्रीसौंदर्याचें लक्षण समजतात. कुचांना कुंभाची तसेंच मदोन्मत्त हत्तीच्या गंडस्थळांची उपमा देण्याचा कविसंप्रदाय आहे. 'सुमळिणा **कुचकुंभहि** हालति' (वामन), '**वक्षोजकुंभ** घन पीन' [विठ्ठल-बिल्हणचरित्र पृ० २१६ श्लो० २३], (मोहिनीवर्णन) '**कुंभस्तनी** मदालसमधुरगति महाविभूतिचा आली, । मूर्तिमंता ना मंजुलगतिनें जाणों मृगव्रजीं आली.' ॥ (मोरोपंतकृत अमृतमथन ३.१७) '**मातंगकुंभयुगलस्तनभार** [विठ्ठल-बिल्हण० पृ० २११ श्लो० २५]. 'स्वभुजांसि म्हणे सुरिचे आलिंगुनि **घटसम स्तन** निवारे' । (प्रेमा० ३. ७७). 'व्यर्थ स्त्रीरत्न जेंवि अस्तन गा' (अस्तन–लघुस्तन). (प्रेमा० ८. ६६) कुचांना कोणकोणत्या पदार्थांची उपमा देण्याचा संप्रदाय आहे ते पुढील श्लोकांत व्यक्त केलें आहे:–'पृगाञ्जनस्तारकबिल्वतालगुच्छेभकुंभाद्रिघटेशचक्रैः । सौवीरजंबीरकबीजपूरसमुद्गकोलगफलैस्स्तनाः' । (केशवमिश्रकृत अलंकारशेखर). गोवर्धनाच्या मतें स्त्रीकुचांचे वर्णनीय गुण म्हटले म्हणजे 'स्तनें श्यामाग्रतौन्नत्यविस्तारदृढपाण्डुता' । हे होत. ७. विषयुक्त रसानें. अन्वयार्थः–'प्रभो! (देवा!) जी बकी (पूतना) विषरसें कुचकुंभ (आपले कुंभाप्रमाणें मोठे स्तन) भरोनि (स्तनाचे ठिकाणीं विष लावून, स्तनांत विषरस भरण्यास कुच कुंभाप्रमाणें असले पाहिजेत म्हणून कवीनें येथें स्तनावर कुंभत्वाचा मुद्दाम आरोप केला आहे) मुखीं (मुखांत) दे (देती झाली), तिसहि (तिलाहि) जशी देवकी [तशी] महासुखीं (सायुज्यसुखीं) ठेविशी (ठेविता झालास); [तर मग] पशुपदार (गवळ्यांच्या स्त्रिया), गाई (धेनु) जननी (माता) कशा न होती (कां होणार नाहींत)? तत्सुखें (गोपी, गाई ह्यांचीं सुखें) लया (नाशास) न पावतिच (पावणार नाहींत) [मग] या कृति (दयाळुपणाचीं आणि कृतज्ञपणाचीं कृत्यें) कोण (कोणता कवि) न गाईल (गाणार नाहीं)? प्रथमार्धाचा अर्थः–आपल्या पीनोन्नतवर्तुलाकार स्तनांत विष माखून तुला

प्रभो! तिसहि ठेविशी, जशि महासुखीं देवकी; ।
न होति जननी कशा पशुपदार, गाई? लयीं
न पावतिच तत्सुखें, कृति न कोण गाईल या? ॥ ९८

**मारावें म्हणून जिनें ते स्तन तुझ्या मुखांत घातले अशा घातकी पूतनेस देखील देवा! तुम्ही साक्षात् जननी देवकीस द्यावयाचें असें कैवल्यसुख दिलेंत. यांत तुम्ही आपली अत्यंत दयालुता व द्वेषबुद्धिशून्यता दाखविली.** भागवतांतील पुढील श्लोक याशीं समानार्थक आहे:-'अहो बकीयं स्तनकालकूटं जिघांसया पाययदप्यसाध्वी । लेभे गतिं धात्र्युचितां ततोऽन्यं कं वा दयालुं शरणं व्रजेम' ॥ (३.२.२३) प्रभूंनीं घातकी पूतनेला माता मानून मातेला द्यावयाची गति दिली इतके ते दयाळ आहेत असें वर्णन पंतांच्या काव्यांत वारंवार केलेलें आढळतें:-(१) 'अतिदुष्टा पूतनिका; हरिनें दिधला स्वलोक परि पूत निका । मानियली जननी ती: प्रभुची गाती म्हणोनि सज्जन नीती.' ॥ [कृष्णविजय-पूर्वार्ध अध्याय ६ आ० गी० २८], (२) 'माराया तुज देवा! जी सविषस्तन्य दे बकी । केली तव प्रसादानें ती जशी धन्य देवकी.' ॥ ६ ॥ [मोरोपंतस्फुट काव्यें-विठ्ठलविज्ञापना-पृष्ठ १४२], (३) 'तैसीही तरली जी स्तन्यमिषें दे बकी सुतापन्नि ती' । [उद्योगपर्व-अ० ७ गी० ७१], 'गरळस्तन्य तुला दे ती पावे पूतना महितकाय । मग न करिशील ध्यातां जपतां निजपूतनाम हित काय?' ॥ [हरिवंश-अध्याय ५० गी० ८३.]

१. **मोठ्या सुखांत, कैवल्यसुखांत.** २. **कथासंदर्भः**-देवकराजाची कन्या व वसुदेवाची पत्नी. हीच पूर्वजन्मीं अदिती होती. हिनें व हिचा पति काश्यपऋषि ह्या दोघांनीं भगवान् विष्णूनें आपलें पुत्रत्व स्वीकारावें म्हणून तीव्र तप आचरिलें व त्यांच्या तपानें प्रसन्न होऊन भगवंतानें तीन वेळां ह्यांच्या पोटीं अवतार धारण केला. कृतयुगांत वामनावतारीं ह्यांच्याच पोटीं देव अवतरले. तसेंच त्रेतायुगांत काश्यप व त्याची स्त्री अदिती हीं अनुक्रमें दशरथ व कौसल्या झालीं व प्रभु रामचंद्ररूपानें त्यांच्या उदरास आले. द्वापारयुगांत म्ह० कृष्णावतारांत भगवान् तिसऱ्या खेपेस यांच्यापासून जन्मले व अशा प्रकारें ह्या ऋषिदंपत्याच्या तपाचें सार्थक झालें. **यमकः**-प्रथम चरणांत 'दे बकी' असे शब्द येऊन द्वितीय चरणांत 'देवकी' शब्द योजून पंतांनीं प्रास साधिला, यांत त्यांच्यावर वर्णव्यत्ययाचा दोष मुळींच येत नाहीं. कारण 'र'कार, 'ल'कार; 'ड'कार, 'ल'कार; 'श'कार, 'ष'कार; 'ब'कार, 'व'कार; या चार जोडींतल्या प्रत्येक दोन वर्णांत साम्य मानण्याची अलंकारविद् जनांची चाल आहे. 'रलयोर्डलयोश्चैव शषयोर्बवयोस्तथा । वदंत्येषां च सावर्ण्यमलंकारविदो जनाः ॥' ३. **पशुप (गवळी)+दार (पत्नी, स्त्री)= गवळिणी. तृतीयचरणार्थः-देवा, ज्या अर्थीं पूतनेला तुम्हीं देवकीची गति दिली त्या अर्थीं गोकुळांतील गवळिणी व गाई ह्या तुमच्या माता कशा नव्हत? अर्थात् होत्याच होत्या.** ४. **नाशास.** ५. **चतुर्थचरणार्थः-तुम्ही पूतनेस जर माता समजून अक्षयसुखास पोंचविलें, तर गाई व गोपी ह्यांचें तुम्हीं दुग्धपान केलें असल्यामुळें त्यांनाही अविनाश सुखाची प्राप्ति करून दिलीच असेल. मग तुमच्या कृपालुत्वाचीं हीं कृत्यें कोणता कवि गाणार नाहीं? सर्व गातील.** ६. **कृत्यें, गोष्टी, कथा. कृष्णावताराचा विलक्षणपणाः-प्रभूचें**

अशी तरि कृतज्ञता हरि! तुझ्याच ठायीं अगा!
सख्या! अणुचि मानिशी, करुनि सुप्रसादा अगा;
भुले सुकविवाग्वधू तव गुणा अनर्घ्यानगा;
ह्मणेल जन कोण, कीं यश पुनः पुन्हा तें न गा! ॥ ९९

---

अवतार अनंत आहेत त्यांतही दशावतार मुख्य आहेत. [illegible] विलक्षण. याविषयीं एकनाथी भागवतांतील पुढील उतारा वाचनीय [illegible]:- 'बहुत अवतारीं अवतरला देव । परि या अवताराचा नवलाव । [illegible] पहा हो हरिलीला ॥ १८५ ॥ उपजतांचि मायेवेगळा । [illegible] मुक्तीचा सोहळा । पूतनादि सकळां निजांगें अर्पी ॥ १८६ ॥ [illegible] । गोपाळां दाविलें वैकुंठद्वीप । परी गोवळेपणाचें रूप । [illegible] ॥ १८७ ॥ [illegible] बळियांतें मारी । अचाट कृत्यें अगादेश्वना करी । परी [illegible] ॥ १८८ ॥ ब्रह्म आणि चोरी करी । देव आणि [illegible] परी दाखविली ॥ १८९ ॥ [illegible] अतिनिःसीम निदुष्ट ॥ १९० ॥ [illegible] केला त्याग । अति अव्यंग निर्दोष ॥ १९१ ॥ [illegible] काय वानूं याची ख्याती । [illegible]

१. प्रास्ताविकः-यांत कवि भगवंताची कृतज्ञता वर्णितात. २ प्रत्युपकार करण्याची बुद्धि. अन्वयार्थः-अगा! हरि! (हे देवा!) अशी तरि (मागील श्लोकांत वर्णिलेल्या प्रकारची) कृतज्ञता (प्रत्युपकारबुद्धि) तुझ्याच ठायीं [तुझ्याच ठिकाणीं] [असे]; सख्या! (गड्या!) अगा सुप्रसादा (पर्वतप्राय उत्तम प्रसादाला) करुनि (भक्तांवर करून) अणुचि (केवळ रजःकण) मानिशी (मानितोस); सुकविवाग्वधू (व्यासवाल्मीकादि कविजनांची वाणीरूपिणी नवरी) तव (तुझ्या भगवंताच्या) अनर्घ्या (अमूल्य अपूर्व) नगा (अलंकाराला) गुणा (गुणाला) भुले (भुलते, मोहित होते); तें यश (सुकविला भुलविणारी भगवंताची कीर्ति) कोण जन (कोणता मनुष्य) पुनः पुन्हा न गा (गाऊं नका) म्हणेल (ह्मणणार आहे)? प्रथमचरणार्थः- कोणी आपणावर थोडासा उपकार केला तरी त्याबद्दल त्यावर अनन्यसामान्य उपकार करावयाचे अशी मागील केकेंत उदाहरणांनीं स्पष्ट केलेली तुझी कृतज्ञता तुझ्याच ठिकाणीं दृष्टीस पडते. इतर कोठेंही ती आढळत नाहीं. 'कृष्णविजय-उत्तरार्धी'त सुदामदेवानें कृष्णाविषयीं अशाच प्रकारचा उद्गार काढिला आहे. तो असा:-'सुहृदर्पित अणुमात्रहि तें ब्रह्मांडापरीस करि थोर' [अ० ८१ गी० ११०]. ३. येथें 'सख्या!' असें भगवंतास संबोधून कवीनें भगवंताशीं अत्यंत सलगी केली आहे ती 'सख्यभक्ति'ला अनुसरून ठीकच आहे. अशा प्रकारें एकनाथ, तुकारामादि महाराष्ट्र संत-

तुम्हीं बहु भले[2], मला उमज[3] होय ऐसें कथा[4];
कसा रसिक[5] तो? पुन्हा जरि म्हणेल आली कथी[6]; ।

वर्यांनीं प्रेमातिशयाच्या भरांत परमेश्वराशीं सलगी केलेली त्यांच्या ग्रंथांतून जागोजागीं आढळते. अशा प्रकारचा लडिवाळपणा ईश्वरभक्तांचा संबंध पितापुत्रांच्या अथवा मातापुत्रांच्या संबंधाप्रमाणें किंबहुना मित्रमित्रांच्या संबंधाप्रमाणें जेथें समजला जातो अशा देशांत असणें केवळ साहजिक आहे. त्याबद्दल कवींना दोष देणें वाजवी होणार नाहीं. ४. **पर्वताला. द्वितीयचरणार्थः–आपल्या भक्तांवर पर्वतप्राय सुप्रसाद करून फारच थोडे केले असें तूं मानतोस. विचारसादृश्यः–** परमेश्वर भक्तानें अणुमात्र कृत्य पर्वताएवढें करितो, पण आपण त्यावर उपकाराचे पर्वत करून कांहींच केलें नाहीं असें मानतो. अशाच प्रकारचे प्रेमोद्गार 'कृष्णविजयां'त भक्त सुदाम्यानें कृष्णाविषयीं काढले आहेत. 'आपण मेरु समर्पुनि मानितसे अणुपरीसही स्वल्प । कल्पतरु स्वजनांना अमृतसम मुनिहृदयनागपतितल्प ॥ [अ० ८१ गी० १०९]. ५. **उत्तम कवींची वाणीरूपिणी उपवर कन्या. तृतीयचरणार्थः–व्यासवाल्मीकादि सत्कवींची वाणी तुलाच वरण्यास इच्छिते त्याचें कारण तुमच्या जवळ जे उत्तमगुणरूपी अलंकार आहेत त्यांना पाहून आपणाला ते मिळोत म्हणून तुमच्याशींच लग्न लावण्यास ती इच्छिते. मुग्ध स्त्रियांची अलंकारांवर फार भक्ति असते व ते ज्यांच्याजवळ आहेत अशा पुरुषांकडे त्यांचें मन ओढतें हें सुप्रसिद्ध आहे. 'कवि' याचे (१) कवन करणारा व (२) ज्ञाता असे दोन** अर्थ होतात. **सारांशः**–ज्ञाते साधुपुरुष कृतज्ञता, औदार्य, सदयता इत्यादि तुझ्या गुणांना [illegible] तुझी स्तुति करतात. **पाठभेदः**–येथें 'सुकवितावधू' असाही पाठभेद आढळतो. परंतु तो विशेष प्रशस्त नाहीं. ६. **बहुमोल अलंकारांना. ७. कीर्ति. व्यु०**:–अश्नुते (व्याप्नोति) इति यशः=पसरणें (चहूंकडे) तें यश. **चतुर्थचरणार्थः–म्हणूनच कविजनांच्या वाणीला मोहित करणारी भगवत्कीर्ति वारंवार वर्णन करूं नका असें कोणता मनुष्य म्हणणार आहे? अर्थात् कोणी म्हणणार नाहीं.** यांत भगवद्गुणांस अलंकारांची उपमा व सुकवीच्या वाणीस वधूची उपमा अभेदरूपानें दिली आहे म्हणून **हा रूपक अलंकार झाला.** या केकेंतील वर्णन सरस उतरलें आहे.

१. **प्रास्ताविकः–मागील केकेच्या शेवटीं भगवद्यशवर्णनाविषयीं कवीनें आपली मनीषा इंगित केली, ती पूर्ण करण्याकरितां प्रार्थित होत्साते प्रथमतः पुढल्या चवदा केकांत ते भगवत्कथेची प्रशंसा करितात.'** [य० पां० पृ० ३२४.] **२. दयालु, सदय. प्रथमचरणार्थः–देवा! तुम्ही फार दयालु आहां यास्तव मला समजेल असें सांगा; तुमचें यश कसें वर्णावें तें मला शिकवा. किंवा, पुन्हा पुन्हा भगवद्यशवर्णन करणें कित्येकांस आवडतें तसें पुष्कळांस आवडत नाहीं म्हणून मी तुम्हांला एक गोष्ट विचारतों ती माझी चांगल्या रीतीनें समजूत पडेल अशा रीतीनें तुम्ही मला सांगा. ३. समजूत. उमज पडणें=होणें=समजूत होणें. ४. सांगा. ५. रसज्ञ. द्वितीयचरणार्थः–मी एक वेळ ऐकिली होती तीच कथा फिरून आली असें म्हणून जो मनुष्य भगवत्कथेच्या पुन**

प्रतिक्षण नवीच दे रुचि शुकाहि संन्यासिया;
न मोहिति भवत्कथा अरसिका अधन्यासि या. ॥ १००

वर्णनाविषयीं आपला कंटाळा दाखवितो तो रसिक कसा? त्याला रसिक असें कसें म्हणतां येईल? अर्थात् तो खरा रसिक नव्हे. खरा रसज्ञ पुरुष भगवत्कथारस पुनः पुनः घेण्यास कंटाळत नाहीं. ६. गोष्ट, चरित्रकथन.

१. क्षणोक्षणीं. द्वितीयार्धाचा अन्वयार्थः—भवत्कथा (आपल्या कथा, भगवंताचीं चरित्रें) शुकाहि संन्यासिया (शुकाचार्यांसारख्या अत्यंत वैराग्यशील व सर्वसंगपरित्याग केलेल्या ऋषीस सुद्धां) प्रतिक्षण (प्रत्येक क्षणास) नवीच (नूतन) रुचि (आवड, गोडी) दे (देती झाली)' या [भवत्कथा] (वर निर्दिष्ट केलेल्या भगवंताच्या कथा) अरसिका अधन्यासि (करंट्याला, दुर्दैव्याला) न मोहिति (मोहित नाहींत). तृतीयचरणार्थः—ज्यानें सर्व ऐहिक गोष्टींचा त्याग करून आपलें चित्त परमात्म्याकडे लाविलें अशा शुकमुनीला सुद्धां भगवंताची कथा प्रतिक्षणीं नवी नवी गोडी देती झाली. प्रभुयशाचें वर्णन वारंवार करण्यांतच त्याला आनंद वाटूं लागला यावरून शुकाचार्यांसारखे जे खरे रसज्ञ आहेत त्यांना भगवंताचे गुणानुवाद वारंवार वर्णन करणें आवडतें. [illegible] विषयीं असाच उद्गार काढिला आहे:—'कथामृत [illegible] अवः— हें कथामृतपान करून माझी तृप्ति [illegible] २. आवड, गोडी. [illegible] पाठभेदः—'शुकादि' असाही पाठ आहे. परंतु [illegible] खुबीदार शब्दयोजनाः—शुकाचार्यांसारख्या परमेश्वराच्या [illegible] झाला जर सगुणानंतारकथा वारंवार श्रवण करणें [illegible] कंटाळा करणारा प्रापंचिक मनुष्य अरसिक व [illegible] ओवीकडे जरा नजर द्यावीः—'श्रीकृष्णाच्या [illegible] निष्काम सकामाचा निर्दळ काम । ऐसें उदारकर्म आचरला.' (एका० भाग [illegible]) ३. संन्याशाला. शुकाचार्य जन्मादारभ्य ब्रह्मचारी असून परमात्म्याच्या चिंतनांत त्यांचा [illegible] असे म्हणून त्यांना संन्यासी (ऐहिक वस्तूंचा ज्यानें सम्यक्—चांगल्या रीतीनें, न्यास—त्याग केला आहे तो संन्यासी) म्हटलें आहे. सामान्य व्यवहारांत श्रौतस्मार्तादि अग्निसाध्यकर्मांचा त्याग करून निरग्नि होणाऱ्यास संन्यासी म्हणतात.पण गीतेच्या साहाव्या अध्यायाच्या आरंभी सांगितल्याप्रमाणें कर्मफलावरील आसक्ति सोडून कर्तव्यकर्म करणारा मात्र खरा संन्यासी. संन्याशाचें लक्षण बृहदारण्यकांत असें दिलें आहे:—'ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरंति.' तात्पर्य, लोकैषणा, पुत्रैषणा व वित्तैषणा या तीन इषणांचा त्याग करून भिक्षावृत्तीनें राहाणारा 'संन्याशी.' 'संन्यासा' संबंधीं संतमुकुटमणी तुकारामबोवा हे म्हणतातः—(१) ऐसा घेई बा संन्यास । करीं संकल्पाचा न्यास ॥ १ ॥ मग तूं राहें भलते ठायीं । जनीं वनीं खाटे भुई ॥ २ ॥ तोडिं जाणिवेची कळा । होई वृत्तीसीं वेगळा ॥ ३ ॥ तुका म्हणे नभा । होई आणुचाही गाभा. ४॥ (२) सद्भावें जो नाशी साधी नारायण । संन्यासी तो जाण धन्य एक ॥ १ ॥ तुका

कथा [1]श्रवणचत्वरीं जरि पुनःपुन्हा ये[2], [3]रते

म्हणे जेव्हां गळे अभिमान । तोचि एक जाण धन्य योगी ॥ २ ॥ रामदासपंचायनांतील एक मूर्ति प्रसिद्ध केशव स्वामी ह्यांचें 'काम्यकर्म हा त्याग करी । तो संन्याशी' (काव्यसंग्रहग्रंथमाला १३ अनेककवींचीं पदें, भाग पहिला, पृ० १४८ पहा) हें पदही ह्यासंबंधीं वाचनीय आहे. तसेंच एकनाथाचा पुढील अभंगही यासंबंधी फार उपदेशपर आहे:-(३) वासनेचें वसन समूळ फाडी। त्रिगुण जानवें तयावरी तोडी ॥ १ ॥ यापरी जाणोनी सन्यास घेई । गुरुवचनें सुखें विचरत जाई ॥ २ ॥ मन दंडीजे तोचि घेई सुदंड । जीवनेंवीण कमंडलु अखंड ॥ ३ ॥ एकाक्षरी नित्य जप करी । क्षराक्षरातीत धारणा धरी ॥ ४ ॥ स्वानंदाचें करीं कर पात्र । सहजीं सहज सेवी नारायण वक्त्र ॥५॥ एका जनार्दनीं सहज सन्यास । सहजीं सहज तेथें नलगे आयास ॥६॥ ५. **तुमच्या गोष्टी, भगवद्वर्णनपर गोष्टी.** ६. **चतुर्थचरणार्थः—अरसिक व फुटक्या नशिबाच्या लोकांना तुझ्या कथा पुनःपुन्हा ऐकणें आवडत नाहीं, पण रसिकांना तसें करणें आवडतें. प्रभूचें पुनःपुन्हा यशःश्रवण करणें ज्यांना आवडत नाहीं ते अरसिक व हतभाग्य समजले पाहिजेत. केकासौंदर्यः**—येथें भगवद्वर्णनाला स्त्री कल्पून तिच्यामुळें जितेंद्रिय शुकमुनि देखील मोहित होतात असें बाहारीचें वर्णन कवीनें केलें आहे. भगवत्कथा खरी रमणीय ह्मणूनच ती प्रतिक्षणीं नूतन कथेप्रमाणें आल्हाद देते. म्हटलेंच आहे कीं 'प्रतिक्षणं यन्नवतामुपैति तदेव रूपं रमणीयतायाः।' 'A thing of beauty is a joy for ever; Its loveliness increases; it will never, Pass into nothingness.' (KEATS). पंतांना वारंवार प्रभुलीलावर्णन करणें किती आवडत होतें याची साक्ष 'कृष्णविजयां'तील पुढील उपसंहारात्मक श्लोकांवरून चांगली पटते:—'श्रीकृष्णा! दीनबंधो! स्वजनसुरतरो! पावना! देवदेवा! । जन्मोजन्मीं स्वलीलाग्रथनकथन हें दे मयूरासि सेवा; । साधु श्रोते गुणज्ञ क्षितिवरि मुदितस्वांत नांदोत अन्य । त्वद्भक्तिश्रेष्ठयोगें खलहि बुधसभामान्य होऊन धन्य'. ॥ तसेंच 'नामार्या'तील पुढील गीति पहाः—'ये बहुगोडरसें बहु वीट म्हणुनि सेविती लवण आलें; । तूं न तसा; नामरसा सेवुनि विषयाकडे कवण आले'?

१. **प्रास्ताविकः—भगवत्कथा साधुजनांस आवडते असें कवि यांत वर्णितात. कर्णरूपी अंगणांत. अन्वयार्थः—कथा (भगवत्कथा) जरी श्रवणचत्वरीं पुनः पुन्हा ये (येते), [तरी] महारसिक (खरा रसज्ञ) तद्रसीं (कथारसांत) रते (रममाण होतो), येर (अन्य अरसिकजन) ते ऐकतां विटति (कंटाळतात); विलासिनीजन (शृंगाररसनिपुणा वेश्या) कामुका (कामी पुरुषाला) पुनः पुन्हा (वारंवार) विलोकुनि (पाहून) वश करी (मोहित करितात), (परंतु) बुळा (षंढ) [वश] नव्हे [तो विलासिनीजन] विवश (निःशंक) मुका कां घेइना? प्रथमार्धाचा अर्थः— भगवंताची कथा नटीसारखी जरी वारंवार कर्णरूपी अंगणांत नाचावयास आली तरी जे खरे रसिक आहेत तेच तिच्या नृत्यरसांत रममाण होतात. अन्य पुरुषांना तिचें फिरून फिरून नाचणें कंटाळवाणें होतें.** येथें कानाला अंगण मानून त्या ठिकाणीं भगवत्कथा नाचावयास येते असें

महारसिक[1] तेंद्रसीं,[2] विटति ऐकतां येरे[3] ते;

म्हणण्यांत **रूपकालंकार** झाला. **भावार्थः**—भगवंताची कथा शुकाचार्यांसारख्या खऱ्या भगवद्भक्ताच्या ऐकण्यांत पुनः पुन्हा जरी आली तरी त्यांना तिचा कंटाळा न वाटतां उलट ते तिच्या प्रेमरसानें मोहितच होतात. अरसिक लोक मात्र भगवंताची कथा फिरून फिरून ऐकून कंटाळतात. २. **आली. व्या०**:—'घे, ने, ये, हो, इत्यादि एकारांत व ओकारांत धातूंनीं कर्तरि विध्यर्थी द्वितीय पुरुषी एकवचनी रूपें कवितेंत कधीं कधीं स्वार्थी तृतीय पुरुषी एकवचनी वर्तमानकाळीं व कधीं कधीं भूतकाळीं योजितात.' [पद्यरत्नावली—पृ० ९०.] येथें त्याचा भूतकाळीं प्रयोग आहे. ३. **रत होतो; रमतो. व्या०**:—'गद्यात्मक ग्रंथांत ज्या काळीं जो प्रयोग मुळीच होत नाहीं किंवा क्वचित् आढळतो, तो कवितेंत पुष्कळ वेळां आढळतो. करी, राखी, बसे, येवे, मळे, रमे इत्यादि ज्या रूपांचा गद्यात्मक ग्रंथांत रीतिभूतकाळीं प्रयोग होतो, त्या रूपांचा कवितेंत प्रायः वर्तमानकाळीं व पुष्कळदां शुद्ध भूतकाळीं प्रयोग करितात.' [पद्यरत्नावली—पृ० ८७.] वरील केकेंत 'रते' ह्याचा उपयोग वर्तमानकाळीं केला आहे.

१. **मोठा रसज्ञ, परमार्थजिज्ञासु**; (अर्थांतरीं) **शृंगारहास्यादिरसज्ञ**. २. **त्या भगवत्कथारूपी नटीच्या नृत्यगायनादि रसांत; येथें 'रस' शब्द श्लिष्ट आहे. कथापक्षीं रस म्हणजे शृंगारादि नवरस, किंवा मुख्यत्वेंकरून भक्तिरस; नटीपक्षीं शृंगारहास्यादि कामीजनांस उचित असे रस. शृंगाररसः**—रसांची नांवें व त्यांविषयीं इतर माहिती मागील एका टीपेंत (पृ० १४९-१५०) दिली आहे. या केकेंत शृंगाररसाचें समग्र वर्णन आहे. परस्परांचे ठिकाणीं अनुरक्त अशा तरुण स्त्रीपुरुषांमध्यें दर्शनस्पर्शनालिंगनादिकांनीं उत्पन्न होणारी जी कामविषयक रति (आनंद) तिला शृंगार म्हणतात. ह्या रसाचे मुख्य दोन भेद आहेत. १ संभोगशृंगार, २ विप्रलंभशृंगार. जेथें काव्यांत परस्परांस अनुकूल अशा विलासी स्त्रीपुरुषांच्या परस्परदर्शनस्पर्शनचुंबनालिंगनादि हर्षभरित क्रियांचें वर्णन असतें तो संभोगशृंगार होय. जेथें स्त्रीपुरुषांमधील प्रीति अतिशय वाढते परंतु इच्छित मनोरथ पूर्ण होत नाहीत तेथें विप्रलंभशृंगार होतो. 'अनुकूलौ निषेवेते यत्रान्योन्यं विलासिनौ । दर्शनस्पर्शनादीनि स संभोगो मुदान्वितः ॥ यत्र तु रतिर्नाम प्रकर्षमधिगच्छति । नाधिगच्छति चाभीष्टं विप्रलंभस्तदोच्यते ॥' (काव्यप्रदीप पृ० ८८) शृंगाररसांत स्थायीभाव (प्रधान मनोविकार) 'रति' (स्त्रीपुरुषांची परस्परप्रीति) असतो. पुरुषास स्त्रीविषयीं रति उत्पन्न झाली तर 'आलंबनविभाव' (ज्याला धरून रसोत्पत्ति होते तें कारण) स्त्री, स्त्रीस पुरुषाविषयीं रति उत्पन्न झाली तर 'आलंबनविभाव' पुरुष असतो. एकांत स्थल, सुंदर बाग, रमणीय गृह, वनविहार, वसंत व वर्षाऋतु, पुष्पसुगंध, सुरस गायन, चंद्रोदय, शृंगारिक ग्रंथांचें वाचन हे स्त्रीपुरुषांचे ठिकाणीं प्रेमोत्पत्ति करितात; यास्तव हे उभयनिष्ठ सामान्य उद्दीपनविभाव होत. पुरुषास स्त्रीचें सौंदर्य, तिचे नेत्रकटाक्ष, तिचे अलंकार व तिचे हावभाव हे उद्दीपनविभाव असून स्त्रीस पुरुषाचें सुंदर रूप, त्याचे विद्याधैर्यशौर्यादि गुण, त्याचा सुंदर पोषाक हे उद्दीपनविभाव होत. वरील विभावांनीं रति (प्रेम) वृद्धिंगत झाली म्हणजे तो पुरुष किंवा ती स्त्री ह्यांचें मुख प्रसन्न होतें, नेत्र विकास पावतात, ते एकमेकांशीं गोड भाषणें करून एकमेकांस चुंबन किंवा आलिंगन देतात, स्मितहास्य करितात व विनोद करितात. ह्या क्रियांस अनुभाव (कार्यरूप शरीर-

चेष्टा) ह्मणतात. आलस्य, उग्रता, व जुगुप्सा हे खेरीज करून निर्वेद (संसार किंवा देह यां-विषयीं तुच्छता), ग्लानि, मद, व्रीडा, चापल्य, औत्सुक्य इत्यादि व्यभिचारीभाव (रसोत्पत्तीस साह्यकारी मनोविकार) समजावे. स्तंभ, प्रलय, रोमांच, स्वेद, वैवर्ण्य, वेपथु, अश्रु व वैस्वर्य हे अष्ट सात्विकभावही संभोगशृंगारांत येतात. विप्रलंभशृंगाराची व्याख्या वर दिलीच आहे. 'विप्रलंभ' शब्दाचा मुख्य अर्थ संभोगसुखाच्या लोभानें विशेषेंकरून अनुरक्त स्त्रीपुरुषांचें फसणें. यांत स्त्रीपुरुषांच्या वियोगावस्थेचें वर्णन असतें. ह्याचे विभाव प्रायः संभोगशृंगारांत सांगितलेले सामान्य विभाव असून शिवाय समागमास येणाऱ्या अडचणी, गुणस्मरण, पूर्वोपभुक्त पदार्थांचें दर्शन, उत्सवादिक प्रसंग इत्यादि आणखीही आहेत. ह्या व अशाच इतर कारणांनीं इष्टजनांविषयीं (पुरुषास स्त्रीविषयीं किंवा स्त्रीस पुरुषाविषयीं) वियोगाचें दुःख प्रदीप्त होऊन मनुष्यास चैन पडेनासें होतें, वर्ण पांढरा पडतो, अन्नपाणी गोड लागत नाहीं, शृंगारास वाढविणारे जे चंद्रचंदनादि शीतल पदार्थ ते तापप्रद होऊन, तो रोदन करूं लागतो, आलंबनाच्या प्राप्तीविषयीं यत्न करितो, त्यास इष्ट वियोगाविषयीं फार शोक होतो, ग्लानि येते, प्राप्ति कशी होईल याविषयीं तो तर्क बांधतो, कधीं कधीं विवेक नष्ट होऊन त्यास मोह उत्पन्न होतो, जीवित तुच्छ वाटतें, व निर्वेद होतो. अशा रीतीनें चिंता, जडता, स्वप्न, विषाद, अमर्ष, असूया इत्यादिक अन्य विकारही उत्पन्न होतात. स्त्रीपुरुषांचा वियोग होण्याचीं जीं कारणें त्या कारणांवरून विप्रलंभशृंगाराचे कोणी अभिलाषा, विरह, ईर्ष्या, प्रवास आणि शाप असे पांच भेद करितात; कोणी अयोग, विप्रयोग आणि मान असे तीनच भेद मानतात. जेव्हां स्त्रीपुरुषांत परस्पर रतिभाव तर उत्पन्न झाला असतो, परंतु उभयतां किंवा दोहोंतून कोणी तरी एक परतंत्र असल्यामुळें परस्पर समागम घडत नाहीं तेव्हां त्यास जो खेद होतो तो 'अयोग' होय. एक वेळ स्त्रीपुरुषांचा समागम होऊन नंतर वियोग झाला असतां त्यास विप्रयोग ह्मणतात. वरील पांच भेदांपैकीं प्रवास आणि शाप ह्यांचा समावेश ह्यांतच होतो. प्रियाच्या अपराधामुळें जो प्रेमयुक्त कोप येतो त्यास मान असें ह्मणतात. हा दोन प्रकारचा. एक प्रणयमान आणि दुसरा ईर्ष्यामान. प्रेमपूर्वक एकमेकांस वश असणें त्यास प्रणय ह्मणतात. त्या प्रणयाचा भंग झाल्यानें जो रोष उत्पन्न होतो तो प्रणयमान. मराठींत ह्यास 'रुसवा' हा शब्द आहे. आपल्या सवतीवर प्रियाचें प्रेम आहे असें समजल्यावरून किंवा प्रियानें दुसऱ्या स्त्रीशीं समागम केल्याचें समजल्यावरून स्त्रीस जो रोष उत्पन्न होतो तो ईर्ष्यामान होय. ह्या केकेंतील शृंगार संभोग होय. प्रथमार्धांत नटी ही आलंबनविभाव असून तिचें नाचणें हें उद्दीपनविभावांत येतें. आनंद हा मानसिक अनुभाव असून इतर कायिक व सात्विक अनुभाव होत. हर्ष, औत्सुक्य, मोह, जडता, इत्यादि व्यभिचारीभाव गुप्त आहेत. तसेंच तृतीयचरणांत 'विलासिनीजन' हा आलंबनविभाव असून तिचे नेत्रकटाक्ष हे उद्दीपनविभाव होत. ह्यांतही कायिक, मानसिक व सात्विक हे अनुभाव, तसेंच हर्ष, औत्सुक्य, जडता, मोह इत्यादि व्यभिचारीभाव वरच्याप्रमाणेंच गुप्त आहेत. ह्यांत स्थायीभाव 'रति' हें स्पष्टच आहे. 'नव्हे बुळा...मुका' ह्यांत बुळा हा विलासिनीजनाच्या कटाक्षक्षेपणचुंबनादि शृंगारिक क्रियांस प्रतिकूळ असून त्याला त्यांपासून आनंद होत नाहीं म्हणून शृंगाररसोत्पत्ति होत नाहीं. येथें नऊ रसांच्या उदाहरणींसहित त्यांचीं नांवें ज्यांत दिलीं

विलोकुनि विलासिनीजन पुनःपुन्हा कामुका
करी वश, नव्हे बुळा, विवश घेइना कां मुका! ॥ १०१

---

आहेत असा एक संस्कृत श्लोक देतों:-शृंगारी गिरिजानने, सकरुणो रत्यां, प्रवीरः स्मरे, बीभत्सोऽस्थिभिरुत्फणी च भयकृत् मूर्त्याद्भुतस्तुंगया । रौद्रो दक्षविमर्दने, च हसकृन्नग्नः, प्रशान्तश्चिरादित्थं सर्वरसाश्रयः पशुपतिर्भूयात्सतां भूतये. ॥' [काव्यमाला—तृतीयगुच्छक—श्रीरुद्रभट्टकृत शृंगारतिलक—प्रथमपरिच्छेद.] ३. इतर, अन्य, शृंगाररसानभिज्ञ; (पक्षीं) पापी लोक. महाराष्ट्रकवींच्या ग्रंथांतून हा शब्द बऱ्याच ठिकाणीं आढळतो. 'येर ते बापुडे काय रंक' [तुकाराम], 'येर गबाळाचें काम नाहीं' [तुकाराम].

१. शृंगाररसाभिज्ञा नायिका, शृंगारिक हावभावांत निपुण अशा वेश्या. 'विलोकुनि...करी वश' याचा अर्थः—कामशास्त्रांत प्रवीण अशा वेश्या नुसत्या आपल्या कटाक्षप्रेरणेनेंच (वांकड्या डोळयांनीं पाहूनच) कामी पुरुषांना मोहित करितात. कारण ते रसिक असतात. हावभावः—प्रियपुरुषास पाहून कामवेडया स्त्रिया जे हावभाव करितात, त्यांचें वर्णन 'बृहत्संहितेंत असें केलें आहे:—स्मेरं मनोभवकृतं कथयन्ति भावा नाभीभुजस्तनविभूषणदर्शनानि । वस्त्राभिसंयमनकेशविमोक्षणानि भ्रूक्षेपकंपितकटाक्षनिरीक्षणानि ॥' (वराहमिहिरकृत 'बृहत्संहिता' अ० ७८ श्लो० ३.) २. कामी पुरुषाला. स्त्रियांचे नेत्रकटाक्षः—शृंगाररसाची माधुरी कळणाऱ्या मनुष्यास स्त्रिया आपल्या सहज कटाक्षक्षेपणानेंही वश करितात याविषयीं वाचकांनीं भर्तृहरीच्या 'शृंगारशतकां'तील पुढील श्लोक वाचावेत. 'ज्याच्या मनोमंदिरामाजि तोंच । विवेकप्रदीप स्फुरे स्पष्ट साच । नयनें कटाक्षानें जो न वारी । कुरंगेक्षणा यौवनोन्मत्त नारी ॥ ४९ ॥ सन्मार्गी तोंच राहे, प्रभुपण सरवा तोंच त्या इंद्रियांचें, । लज्जेतें तोंचि वाहे, विनतपण निकें दाविती तोंचि साचें. । भ्रूचापीं ओढुनीया श्रवणपथवरी मारिला नेत्रबाणीं । नाहीं जों कामिनींहीं पुरुष मिरविती तोंवि हीं सर्व लेणीं'. ॥ ५९ ॥ (भर्तृहरिकृत शृंगारशतक वामनीभाषांतर.) ३. शृंगाररसानभिज्ञ पुरुष, नपुंसक, षंढ. हा शब्द पंतांनीं इतरत्रही योजिला आहे. 'अथवा असेल दिसतो तैसा नर परि मनें बुळा लाजो.' । (विराट ३. ८९)' 'नव्हे बुळा...मुका' याचा अर्थः—पण नपुंसक त्या शृंगारचेष्टांनीं मुळींच मोहित होत नाहीं, मग त्या विलासवती स्त्रिया त्याचे मुके कां घेईनात! विलासी स्त्रियांनीं नपुंसकाला वश करण्यासाठीं जरी आपली पराकाष्ठा केली ह्मणजे जरी त्यांनीं त्याचें चुंबन घेतलें तरी तो त्यांना वश होत नाहीं. यांत त्या विलासिनी स्त्रियांकडे कांहीं दोष नसून उलट षंढाकडे मात्र अरसिकत्व येतें. विलासिनी स्त्रियांचें चुंबन तर दूर राहो पण नुसत्या सहज कटाक्षक्षेपणानेंच शृंगाररसज्ञ पुरुषांची गाळण उडते व शृंगारोद्दीपन होऊन त्यांच्या ठायीं अष्ट सात्विकभाव प्रकट होतात. ४. चुंबन. 'मुका' हा शब्द पंतांनीं आपल्या काव्यांतून इतर ठिकाणीं योजिलेला आढळतो. 'प्राणा मुकेल इच्छुनि सिंहीचे गजहि सबहुमान मुके ।' [विराटपर्व—अ० १ गी० १३८]. या केकेंतल्या द्वितीयार्धांत दृष्टांतालंकार झाला आहे. 'येथें' कथा ह्या उपमेयाचें आणि विलासिनी ना-

केथा सुपुरुषा तुझी वश तशी करि, राधिका

यिका या उपमानाचें श्रवणविषय होणें आणि चत्वरीं आविर्भूत होणें इत्यादि धर्मांचा बिंबप्रति-बिंबभाव फार सुंदर रीतीनें दाखविला आहे ह्मणून हा **दृष्टांत** अलंकार झाला.' [य० पां०-पृ० ३२७.] या अलंकाराच्या विशेष स्पष्टीकरणार्थ केका ४ पृ० १३ पहा.

१. प्रास्ताविकः-**भगवत्कथा सत्पुरुषांना आवडते हाच मागल्या केकेंतील अर्थ कवि यांत दृढ करितात. अन्वयार्थः- जिला (ज्या राधिकेला) तूं स्वयें (स्वतः) शरीराधिका (शरीराहून जास्त प्रिय) ह्मणसि (ह्मणत होतास, मानित होतास), [ती] राधिका (राधा) जशी [ज्याप्रमाणें] तुज (भगवंताला) [वश करी] तशी तुझी कथा (भगवत्कथा) सुपुरुषा (साधु पुरुषांना) वश करी (करिते); प्रभो! रमाहृदय-वल्लभा! (लक्ष्मीप्रिया! सर्वैश्वर्यसंपन्ना देवा!) तिचें (राधेचें) सेवन (हास्यविनोदादि क्रीडा करणें) न घडतां जसें तुज (तुला) तसें, [तिचें=भगवत्कथेचें] [सेवन न घडतां] मतिस (सत्पुरुषाच्या बुद्धीस) गेह (घर) वन (अरण्यतुल्य) भासे (भासतें). भगवंताच्या कथेचा महिमा** साधुवर्य तुकाराम यांनीं पुढील अभंगांत मोठ्या सरस रीतीनें वर्णिला आहे:-(१) कथा देवाचें ध्यान । कथा साधना मंडण । कथेऐसें पुण्य । आणिक नाहीं सर्वथा ॥ १ ॥ ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥ ध्रु० ॥ मंत्र स्वल्प जनां । उच्चारितां वाचे मना । ह्मणतां नारायणा । क्षणें जळती महादोष ॥ २ ॥ भावें करितां कीर्तन । तरे नारी आणिक जन । भेटे नारायण । संदेह नाहीं ह्मणे तुका. ॥ ३ ॥ (२) कथा त्रिवेणी संगम । देव भक्त आणि नाम । तेथींचें उत्तम । चरणरज वंदितां ॥ १ ॥ जळति दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारी नर । गातां ऐकतां सादर । जे पवित्र हरिकथा ॥ ध्रु० ॥ तीर्थें तया ठाया । येती पुनीत व्हावया । पर्वकाळ पाया । तळीं बैसे वैष्णवां ॥ २ ॥ अनुपम्य हा महिमा । नाहीं द्यावया उपमा । तुका ह्मणे ब्रह्मा । नेणे वर्णूं या सुखा. ॥ ३ ॥ हरिकथेचें महत्व आणखी पाहणें असल्यास केका ५९, पृ० १५७ टीप ५ पहा. २. **साधुपुरुषाला. प्रथमार्धाचा अर्थः-रसिक आणि धन्य अशा महापुरुषाला भगवत्कथा तशाप्रमाणें वश करिते. कशाप्रमाणें? ज्याप्रमाणें राधेनें तुह्मांला वश केलें. ती राधिका कोणती? तर ज्या राधिकेला तुह्मी स्वतः आपल्या प्राणांपेक्षांही जास्त प्रिय मानित होतां.** राधिका ही देवी, कृष्णमयी, श्रेष्ठदेवता, सर्वलक्ष्मीमयी, अत्यंत तेजःपुंज व श्रेष्ठ संमोहिनी होय असें एका पुराणांत वर्णिलें आहे. 'देवी कृष्णमयी प्रोक्ता राधिका परदेवता । सर्वलक्ष्मीमयी सर्वकांतिः संमोहिनी परा' ॥ (बृहद्गौतमीय.) ३. **स्वाधीन**. ४. **राधिकाः**-दुसऱ्या केकेंत ज्या राधा नामक वृषभानुकन्येचा कवीनें उल्लेख केला आहे तीच ही. गोपीसमाजांत आठ गोपी कृष्णाला फार आवडत. त्यांत हिचें आद्यस्थान होतें. गोपांगनांतील अष्टनायकांचीं नांवें:-राधा, चंद्रावली, श्यामला, शैब्या, पद्मा, ललिता, विशाखा व भद्रा. राधा सर्व गोपींत कृष्णाला अत्यंत प्रिय होती याविषयीं प्रमाणः- 'सर्व गोपीषु सैवैका विष्णोरत्यंतवल्लभा' (पद्मपुराण). ही पूर्वजन्मींची इंद्रस्त्री शची होय. ही एकदा वैकुंठाला गेली असतां तेथें तिनें लक्ष्मीनारायणाला अवलोकन केलें आणि 'या परमात्म्याच्या अर्धांगीं जर मी बसेन तर माझ्या जन्माचें सार्थक होईल' असें तिनें मनांत आणिलें.

इतक्यांत सकलचित्तपरीक्षक नारायणानें तिच्या मनांतील अभिप्राय समजून तिला सांगितलें कीं, 'शचि! तुझ्या मनांतील हेतु परिपूर्ण होतील. पण त्यासाठीं तूं साठहजार वर्षें हिमालय पर्वतावर तप कर. ह्मणजे मी कृष्णावतार धरीन त्या वेळेस तुला आपल्या अर्धांगीं धारण करीन.' याप्रमाणें वर पावून, व तपश्चर्या करून शची कृष्णावतारीं राधा झाली. शचीनें भगवत्समागमप्राप्तीस्तव अनंत जन्म तप केलें होतें; तीच गोकुळांत राधा झाली ही कथा पद्मपुराणांत असून जयदेव कवीनें जें राधाकृष्णाख्यान लिहिलें आहे त्यांतही तसेंच वर्णन आहे. तसेंच पद्मपुराणांतर्गत वृंदावनमाहात्म्यांत राधेचें महत्व फार वर्णिलें आहे. त्यांत असें सांगितलें आहे कीं, भजन करणारांनीं प्रथम राधेचें नांव घेऊन मग कृष्णाचें नांव घ्यावें. ह्मणजे 'राधाकृष्ण' अशा सामासिक पदानेंच भजन करावें व मूर्ति पूजणें त्या देखील राधाकृष्ण, राधादामोदर, राधामाधव यांच्या पुजाव्या. ब्रह्मवैवर्त पुराणांत राधाकृष्णांच्या भक्तीचें माहात्म्य फार वर्णिलें आहे. त्यांत राधेच्याच योगानें कृष्ण शोभतो व कृष्णाच्याच योगानें राधा शोभते असें सांगितलें आहे. ('राधया माधवो देवो माधवेनैव राधिका। विभ्राजंते जनेषु ८०') या पुराणाच्या पहिल्या ब्रह्मखंडांत कृष्णापासून सर्व देवांची उत्पत्ति झाली असें सांगून पुढें कृष्ण रासमंडळांत जातांच त्याचे अंतःकरणापासून राधेची उत्पत्ति झाली असें सांगितलें आहे. तसेंच या पुराणाच्या चवथ्या खंडांत ह्मणजे कृष्णजन्मखंडांत गोलोकींचे मुख्य अधिपति राधाकृष्ण यांनीं परस्पर प्रेमास्तव गोकुळांत अवतार घेतले, असें वर्णन करून पुढें कृष्णाविषयीं अनेक मोठमोठालीं व मनोरंजक आख्यानें सांगितलीं आहेत. हें कृष्णजन्मखंड फार मोठें असून याचे १३२ अध्याय आहेत. भगवान श्रीकृष्णांनीं गोकुळांत जी अनेक विविध चरित्रें केलीं, त्यांतही गोपींशीं व विशेषतः राधेशीं त्यांनीं जी रासक्रीडा केली त्याविषयीं पुष्कळांचा शोचनीय गैरसमज झालेला आढळतो. अशांनीं पुढील अल्प लेख वाचून त्याचें मनन करावें. **कृष्णचरित्रावरील कांहीं कुतर्कांचें खंडणः**—'ईश्वराचा अवतार श्रीकृष्ण याचें व्यासांनीं वेदांतशास्त्रपर वर्णन केलें आहे. त्यांत त्यांनीं असें दाखविलें आहे कीं, 'गो' ह्मणजे इंद्रियें, व त्यांच्या अंतर्यामीं आत्मा राहून त्यांचें पालन करणारा ह्मणून आत्म्यास 'गोपाळ.' 'गो' ह्मणजे इंद्रियें त्यांच्या आंतील ज्या ज्ञानवृत्ति त्याच 'गोपिका', 'गो' ह्मणजे इंद्रियें यांच्या ठायीं जो पंचविषयात्मक भोगरस हाच गोरस, हा पंचविषयरूप गोरस आत्मा जो गोपाळ त्यानें आपल्या ज्ञानानें दूर करून, गो ह्मणजे इंद्रियें त्या इंद्रियांच्या वृत्ति ह्मणजे गोपिका ज्या त्यांना त्यानें स्वस्वरूपीं लीन केल्या. गोपिका गोपाळाचे ठिकाणीं रममाण झाल्या, असें जे लिहिलें आहे त्यांतील हें मर्म वेदांतशास्त्रपर आहे.' (वेदोक्तधर्मप्रकाश). भगवान् श्रीकृष्णांनीं गोकुळांत गोपिकांशीं क्रीडा केली त्याचें आणखी एक गूढ कारण आहे. परमेश्वरानें भूभारहरणार्थ कृष्णावतार धरिला तेव्हां त्यांच्या बरोबरच गोलोकवासी राधादिक नित्यसिद्धदेवताही गोकुळांत गोपिका झाल्या. तसेंच दंडकारण्यांतल्या ऋषींना रामदर्शनानंतर प्रभूशीं क्रीडा करावी अशी इच्छा झाली. परंतु रामावतारीं त्यांची इच्छा पूर्ण न झाल्यामुळें त्यांनींही कृष्णावतारीं गोकुळांत स्त्रियांचा जन्म घेतला. कृष्णाबरोबर देवांनींही प्रभूच्या साहाय्यार्थ पृथ्वीवर अवतार घेतले तेव्हां शच्यादि देवांगनांनींही गोपिकांच्या रूपानें प्रभूबरोबर क्रीडा करावी ह्मणून अवतरल्या. याशिवाय भगवंताशीं

नित्य सहवास घडावा म्हणून वेदांनींही गोपिकांचीं रूपें घेतलीं. अशा प्रकारें वेद, देवांगना, दंडकवासी महर्षि, व गोलोकवासी देवता ह्या चौघांनीं गोकुळांत प्रभूबरोबर क्रीडा करण्यास्तव गोपिकांचे जन्म घेतले. (याला आधार पद्मपुराण). तेव्हां ह्या भक्तांची इच्छा पूर्ण करण्याकरितां प्रभूनें कृष्णावतारीं चौर्यादि विलक्षण दिसणारीं कर्में व रासक्रीडा केली. त्यांत देवभक्तांचें अलौकिक प्रेमच भरलें असून वैषयिक प्रकाराचा गंधही नाहीं. तसेंच रासक्रीडेसंबंधीं आणखी एक गोष्ट लक्ष्यांत ठेवावी कीं, 'राधा इत्यादि गोपिकांना वाटत असे कीं, श्रीकृष्ण आह्मांला पति असावा. अशा रीतीनें गोपिकांचे जारभावनेनें श्रीकृष्णस्वरूपाकडे मन लागलें, व श्रीकृष्ण आपणांस पतीप्रमाणें कसा मिळेल? हें चिंतन गोपिकांना जागृत, स्वप्न या दोन्ही अवस्थांत लागलें. हें अंतर्साक्ष भगवान् श्रीकृष्ण याला कळून श्रीकृष्णानें आपली योगमाया प्रकट करून लक्षावधी गोपिकांस एकच काळीं असा चमत्कार दाखविला कीं, श्रीकृष्ण आपणांस पति मिळाला, आणि एकदम लक्षावधि गोपिकांजवळ लक्षावधि श्रीकृष्ण क्रीडा करूं लागले, असें गोपिकांना व इतर ऋषींना दिसलें. परंतु कंसवधार्थ व भूभारहरणार्थ जो श्रीकृष्णावतार उत्पन्न झाला तो यशोदेजवळच बसला होता. तसेंच गोपिकांच्या नवऱ्यांना आपल्या स्त्रिया गोपिका यांचा एक दिवसही वियोग झाला नाहीं आणि गोपिकांना तर असें वाटत असे कीं, श्रीकृष्णावांचून आह्मांस दुसरा पति ठाऊकच नाहीं. परंतु श्रीकृष्णावतारानें गोकुळांत बाळपणीं स्त्रीसंग केलाच नाहीं, कारण स्त्रीसंग केले-ल्यानें हातून कंसास मरण नव्हतें. ह्मणून श्रीकृष्ण हा बालब्रह्मचारी होता. तात्पर्य, पुराणांत लाक्षणिक भाषणांनीं, ह्मणजे शृंगार, वीर, करुणा, बीभत्सादि अनेक रसांच्या योजनाप्रकारांनीं बहुत ठिकाणीं आत्मज्ञान कथन केलें आहे. त्या लिहिण्याचा यथार्थ विचार न करितां, व लि-हिण्याची पूर्वापारसंगति न पाहतां भलताच शब्दार्थ समजून श्रीकृष्णास दूषणें देतात, ते शतमूर्ख समजावे.' (वेदोक्त धर्मप्रकाश.) मंगीश कवीनें 'राधाविलास' नामक काव्य रचिलें आहे. त्यांत 'आनंद' हा नंद, 'सद्बुद्धि' ही यशोदा, 'आत्मा' हा कृष्ण, 'इंद्रियें' ह्या गाई, 'शरीर' हें गोकुळ, 'इंद्रियांचे चालक देव' हे गोपाळ, 'ज्ञानवृत्ति' ह्या गोपिका, 'ज्ञान' हा वृषभानु, व 'भक्ति' ही राधा अशा रीतीनें रूपक सोडवून पुढें आत्म्याचा व भक्तीचा विलास तोच राधाकृष्णविलास असें सविस्तर वर्णिलें आहे. त्यांत राधाकृष्णविलासद्वारें कवीनें भक्तिज्ञान-योगाचें सुरस वर्णन केलें आहे. वास्तविक पाहतां रासक्रीडादि श्रीकृष्णाच्या लीलांत ठिकठि-काणीं गूढ आत्मज्ञान कथन केलें असून त्यांत एकनिष्ठभक्तीचें अत्यंत सुरस वर्णन केलें आहे. ह्मणूनच शुकाचार्यासारख्या ब्रह्मैकनिष्ठ पुरुषानें मृत्यूच्या द्वाराशीं बसलेल्या व देहाचें परम सा-र्थक व्हावें अशी उत्कट इच्छा करणाऱ्या महाभगवद्भक्त परीक्षिति राजाला भगवान् श्रीकृष्णाच्या परममंगल चरित्रांतील ह्या क्रीडा मोठ्या आवडीनें सांगितल्या. श्रीमद्भागवताच्या सुप्रसिद्ध 'तो-षणीसार' नामक टीकेंत रासक्रीडेच्या टीकेला प्रारंभ करितांनाच 'निवृत्तिपरेयं (रास) पंचा-ध्यायी ।' (ही रासपंचाध्यायी अध्यात्मपर लावावयाची आहे.) असें स्पष्ट लिहिलें आहे. रासक्रीडेंत भक्तीचें उत्कृष्ट वर्णन आहे ह्मणून वर ह्मटलें आहे. त्याचा खुलासा करण्याकरितां प्रसंगानुसार येथें स्वामी विवेकानंद यांचा 'भक्तियोग' हा उत्तम ग्रंथ व नारदाचीं 'भक्तिसूत्रें' यांच्या आधारानें पुढील दोन शब्द लिहिले आहेत. त्यावरून ह्या विषयाचें थोडें बहुत स्वरूप

समजण्यास थोडें तरी साह्य होईल. 'नारदस्तु तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति' (भगवंताला सर्व कर्मे अर्पण करणें व त्याचें क्षणभर विस्मरण झालें तरी परमव्याकुलता प्राप्त होणें याला भक्ति ह्मणावें) अशी भक्तवर्य मुकुटमणी नारदाची भक्तीची व्याख्या आहे. या भक्तीचें उदाहरण त्यांनीं 'यथा व्रजगोपिकानाम्' (गोकुळांतील गोपिकांस अशा प्रकारची भक्ति घडली) असें दिलें आहे. यावरून गोपिकांनीं प्रभूची उत्कट भक्ति केली हें सुव्यक्त होतें. आतां भक्तीचे मुख्य दोन भेद. गौणी आणि परा. आपलाच देव खरा, दुसरे देव खोटे, आपलाच आचार किंवा धर्म चांगला, दुसऱ्याचे आचार व धर्म खोटे. अशा प्रकारची भावना ठेवून जी परमेश्वराची भक्ति होते ती गौणी. सर्वत्र परमेश्वरसत्ता आहे, अशी भावना धरल्यामुळें जेव्हां मनुष्य दुसऱ्या कोणत्याही आचाराचा किंवा धर्माचा द्वेष न करितां सर्वत्र समदृष्टि ठेवून ईश्वर-भक्ति करितो तेव्हां ती भक्ति परा (श्रेष्ठ) समजावी. याचे शांत, दास्य, वत्सल, सख्य व मधुर असे एकापेक्षां एक वरचढ पांच प्रकार आहेत. सर्व वृत्ति शांत ठेवून जी परमेश्वराची भक्ति करावयाची ती 'शांत' भक्ति. ऋषि बहुधा 'शांत' भक्ति करीत. देव स्वामी व भक्त सेवक, अशी भावना करून जी भक्ति करावयाची ती 'दास्य' भक्ति. रामभक्त मारुतीनें दास्यभक्तिच केली. ईश्वर हा आपला पुत्र व आपण त्याची माता असे समजून जी प्रेमळ भक्ति करावयाची तिचें नांव 'वत्सल' भक्ति. कौसल्या व देवकी हे जन्म घेऊन अदितीनें 'वत्सल' भक्ति केली. ईश्वराला आपला जिवलग मित्र समजून त्याला आपलीं सर्व सुखदुःखें कळविणें हा 'सख्य' भक्ति. अर्जुन व उद्धव यांनीं 'सख्य' भक्ति साधिली. जगांतील स्त्रीपुरुष हे सर्व स्त्रीरूप व परमेश्वर मात्र एकटा पुरुष अशी भावना धरून ह्या जगांतील स्त्रिया पुरुषावर व पुरुष स्त्रियांवर जें प्रेम करितात तें सर्व परमेश्वरार्पण करावयाचें याचें नांव 'मधुर' भक्ति. या भक्तीच्या प्रकारांत भक्त परमेश्वरास पति व स्वतःस पत्नी समजून त्याजवर अनन्यसाधारण भक्ति करितो. रुक्मिणीचें श्रीकृष्णावरील प्रेम हें ह्या सदरांत येतें. या मधुर भक्तीतही दोन प्रकार आहेत. देवाला पति व स्वतःस पत्नी मानून जी भक्ति करावयाची हा एक प्रकार. याच्यावरील प्रकार ह्मणला ह्मणजे देवाला आपला प्रियकर मानून पिता, बंधु, पति हे सर्व नकोत नकोत ह्मणत असतां त्याजवर जें अत्यंत प्रेम करावयाचें तो होय. या प्रकारांत कांहीं जणांना वाटतें त्याप्रमाणें अमंगलत्व नसून त्यांत भक्तीची अत्यंत परमावधि होते. जारजारिणीच्या प्रेमांतील वैषयिकपणा यांत मुळीच नसून त्यांतील अ-मर्याद प्रेम मात्र हजारपटीनें यांत वाढलेलें असतें. राधाकृष्णाची भक्ति या 'मधुर' भक्तीच्या वरच्या प्रकारांत येते. त्या भक्तीला वैषयिक प्रेम समजणें हें अत्यंत असमंजस होय. अर्वाचीन 'संतमुकुटमणी' तुकाराम ह्यांच्या 'विरहिणी' (विराण्या)च्या अभंगांत 'मधुर' भक्तीचा हाच प्रकार वर्णिला आहे. रसज्ञांनीं ते अभंग अवश्य वाचावेत. कृष्ण विषयीं नव्हता याविषयीं एकनाथी भागवतांतील पुढील संक्षिप्त उतारे वाचनीय आहेत:-(१) 'ज्या बाणाचा पिसारा। लागतांचि पै भेदरा। तापसीं घेतला पुरा। सोडोनि घरदारां पळाले २२७॥ तैसे सोळा सहस्र बाण। अखंड तुजवरी अनुसंधान। करितां न मळे बोध जाण। अतिविंदान हें तुझें २२८॥ घरींच्या स्त्रिया सहस्र सोळा। गोकुळादि मथुरेच्या अबला। तुज विषयीं करावया गोपाळा। नव्हती सकळा समर्था २२९॥ त्यांचेनि तुज न करवेचि विषयी। परि त्या त्वां केल्या निर्वि-

जशी तुज, जिला स्वयें ह्मणसि तूं [1]शरीराधिका; ।
तिचें न घडतां, [2]रमाहृदयवल्लभा ! [3]सेवन

पयी । ऐसा तूं त्रैलोक्याच्या ठायीं । स्वामी पाही श्रीकृष्णा !' ॥ २३० ॥ (एक-भाग० अ० ६) (२) 'रासक्रीडा गोपिकांप्रती । कोणी ह्मणेल कामासक्ती । तेथें कामाची कैंची प्राप्ती । जाण निश्चिती उद्धवा ॥ १५२ ॥ जेथें क्रीडे आत्माराम । तेथें केवि रिघे बापडा काम । माझे कामें गोपिका निष्काम । कामसंभ्रम त्यां नाहीं. ॥ १५६ ॥ विषयबुद्धि तें मुख्य अज्ञान । तें असतां मी न भेटें जाण । असतां वेदोक्त जाणपण । तेणेंही संपूर्ण न भेटें मी ॥ १६६ ॥ जाणीव नेणीव गेलिया निःशेष । माझें पाविजे निजात्मसुख । श्रुति जाणोनि हे निष्टंक । गोकुळीं त्या देख सुखार्थ आल्या १६७ ॥ त्याचि जाण समस्त श्रुती । गोपिकारूपें गोकुळा येती । रासक्रीडामिषें एकांतीं । माझी सुखप्राप्ति पावल्या.' १६८ ॥ (अ० १२) (३) 'सकाम भक्ताचे पुरवूनि काम । त्यांसी मी करीं नित्य निष्काम । निजभक्तांसी निजधाम । मी पुरुषोत्तम पाववीं २४. २९६ ॥ यालागीं गोपींची कामासक्ती । म्यांचि आणूनी निष्कामस्थितीं । त्यांसी दिधली सायुज्यमुक्ति । जाण निश्चिती उद्धवा २९७ । म्यां गोपिकांसी काम केला । कीं निःशेष काम त्यांचा हरिला । न विचारितां या लीला । कृष्ण व्यभिचारला मूर्ख म्हणती' २९८॥ 'कपिलगीते'वरील हरिदास आचरेकर यांच्या टीकेत (तृतीयप्रसंग १–८) 'आत्मा' हा कृष्ण, 'सद्भाव' हा नंद, 'प्रवृत्ति' ही यशोदा, 'निवृत्ति' ही देवकी, 'देह' हें गोकुळ, 'हृदय' हें आंगण, 'विकल्प' हे दैत्य, 'अविद्या' ही पूतना, 'अनुहात' हा मुरली, 'वृत्ति' ह्या गोपिका, 'त्रिकूट' हें वृंदावन, 'उन्मनी' ही राधा व 'आदिमाया' ही रुक्मिणी असें कृष्णलीलेचें रूपक सोडविलें आहे. श्रीकृष्णाच्या चौरकर्माबद्दल सुद्धां ग्रंथांतून समर्पक कारणें दिलीं आहेत. एकनाथाच्या 'आवरि आवरि आपुला हरी' ह्या गवळणीच्या पद्यांत 'श्री कृष्णानें भ्रांतीचें कवाड उघडून, मायेचें कुलुप मोडून, क्रोधाची अर्गळा काढून, अज्ञानाची खीळ तोडून अविद्येचें शिंकें तोडलें, दंभाचा डेरा फोडला, प्रपंचताकाचा मडा घातला, अहंकाराचा घुसळखांब पाडला, संकल्पविकल्पाची दुधाणी फोडली व संचित ह्या शिळ्या लोण्याची धूळधाण केली, प्रारब्धाचें शिळें दहीं खालें व क्रियमाण दूधही गट्ट केलें; व आतांना द्वेषानें रांधणें व कामाचें पाळें फोडून, सुचित दुश्चित तुपाच्या घागरी बाहेर टाकून दिल्या' असें रूपकपर वर्णन केलें आहे. ह्या टीपेंत कृष्णासंबंधीं ऐकूं येणाऱ्या आक्षेपांच्या खंडणाची दिशा मात्र दाखविली आहे. सत्यान्वेषणाची हौस असणाऱ्या शोधकांनीं संतमंडळींच्या साह्यानें स्वतःच्या अंतःकरणांतच याचा विस्तार करावा. सारांश भगवान् श्रीकृष्ण पूर्ण निर्विषयी असून त्यांनीं सकाम गोपिकांस देखील निष्काम केलें. राधाकृष्णाचें प्रेम ह्मणजे भजकभज्याचें, आत्मापरमात्म्याचें अथवा जीवशिवाचें प्रेम. भक्ताचे अंतःकरणांत राधेच्या प्रेमाची ज्योत प्रकाशते तेव्हां चित्प्रकाश व भगवत्साक्षात्कार तेथें सहज होतो. या परममंगल प्रेमास वैषयिक मानणारे लोक अत्यंत हतभागी समजले पाहिजेत.

१. शरीरापेक्षां अधिक प्रिय, पंचप्राणांहून आवडती. २. रमा (लक्ष्मी) तिच्या हृदयाचा वल्लभ (प्राणेश्वर, प्रियकर) असा कृष्ण, त्या !' रमविते (रमयति) ती (सा)'

प्रभो! तुज जसें, तसें मतिस गेह भासे वन. ॥ १०२

**रमा=सकलजनमनोहरा अशी लक्ष्मी. खुबीदार शब्दयोजनाः**–भगवान् विष्णु किंवा कृष्ण हा जगन्मोहिनी लक्ष्मीच्या गळ्यांतला केवळ ताईत होता व त्याच्या शिवाय तिला क्षणभर करमत नसे. तसेंच भगवंतालाही ती फार प्रिय होती. अशी गोष्ट होती तरी भगवान् कृष्णाची प्रीति तिजपेक्षां 'वृषभानूची सुता राधिका' इजवरच जास्त होती. हें दर्शविण्याकरितां पंतांनीं 'रमाहृदयवल्लभा' ह्या समासघटितपदाची योजना केली असें वाटतें. मोरोपंतांनीं आपल्या '[illegible]' एका ठिकाणीं पुढीलप्रमाणें ह्मटलें आहे:–'व्रजीं भृंगमिषें देवा! [illegible] भक्त्यधीना तुला ती इंदिराधिका.' ॥ [श्लोक २५, [illegible]]. **२. उपभोग, संतोषीकरण. द्वितीयार्धाचा अर्थः–राधेशीं गांठ पडून तिच्याशीं हास्य-विनोदादि प्रकार एखादे दिवशीं जर न घडला तर सकलैश्वर्यसंपन्न देवा! तुला जसें आपलें घर अरण्याप्रमाणें भयाण व उदास वाटत असे तद्वत् सत्पुरुषांस ज्या दिवशीं हरिकथा श्रवण करावयास सांपडत नाहीं. त्या दिवशीं त्यांना चैन न पडून आपलें घर अरण्याप्रमाणें शून्य भासतें; ह्मणजे त्या दिवशीं त्यांना गृहदारादिकांपासून सुख वाटत नाहीं इतका त्यांना भगवत्कथेचा मोह पडलेला असतो. गूढार्थ:**– प्रभूला ह्या० 'पुरुपाला' रमा ह्या० 'आदिमाया' [illegible] आवडते. कारण प्रकृतिपुरुषाच्या [illegible] रमाविष्णूंची क्रीडा जेव्हां थांबेल तेव्हां प्रलय होतो. [illegible] आहे तरी 'पुरुपाला' अर्थात प्रभूला रमा किंवा '[illegible]' [illegible] विशेष आवडते. **समानार्थकः**–[illegible] दिवशीं हरिचरितश्रवण नसे, त्यांस [illegible] नखेंदु खणी.' ॥ [कृष्णविजय–उत्तरार्ध–अ० [illegible]].

**१. वाटत असे; (पक्षीं) वाटतें. कृष्णास वाटत असे. साधूंस वाटतें.** या केकेंत कथा आणि राधिका यांचें साम्य वर्णिलें आहे ह्मणून **उपमालंकार झाला आहे.** [illegible] (१) 'जो शर गरधरस्वरसा, पविसा, [illegible] कामाजि नागनायकसा ॥' (कर्णपर्व). (२) '[illegible]' कुरुगुरु तसें करी; तें परिसा कटकें सकंप [illegible]. **उपमेला 'अलंकारशिरोरत्न, काव्यसंपदेचें सर्वस्व, व कविवंशाची माता' असें 'राजशेखरानें** [illegible]. 'अलंकारशिरोरत्नं सर्वस्वं काव्यसंपदाम् । उपमा कविवंशस्य [illegible]' (राजशेखर) 'उपमा' अलंकारांतच किंचित् फरक केल्यानें इतर अलंकार बनतात. पृ० ५८ पहा. **'गेह हें वन भासे' यांत अपन्हुति अलंकाराची छाया पडली आहे. येथें गेहाचा अपन्हव प्रत्यक्ष शब्दानें जरी केलेला नाहीं तरी गेहाच्या ठिकाणीं असणारा धर्म जो 'तिचें सेवन' तें न घडतां त्याचें गृहत्व अपन्हुत होतेंच म्हणून हा हेत्वपन्हुति अलंकार होय. 'अपन्हुति'अलंकार, आणि त्याचे प्रकार यांचें स्पष्टीकरणः**–'प्रकृतं यन्निषिध्यान्यत्स्थाप्यते सात्वपन्हुतिः । श्लेषः स वाक्य एकस्मिन्यत्रानेकार्थता भवेत्' ॥ (साहित्यकौमुदी)

आर्या:-(१) **"अप्रकृतारोपार्थेचि करिती धर्मो निषेध जो प्रकृतीं । सत्कविमतिचातुर्यें शुद्धापन्हुति तयासि बुध ह्मणती. ॥१॥** नोहेचि हा निशापति जो गगनीं सुप्रसन्न भासतसे । तरि काय, अहो परिसा, स्वर्गंगेचें प्रफुल्ल पद्म असें ॥ २ ॥ अप्रकृतारोपार्थ=उपमानाचा आरोप करण्यासाठीं; प्रकृतीं=उपमेयाच्या ठिकाणीं. वर्णनीय वस्तूचे ठिकाणीं तत्तुल्य अन्यधर्मांचा (गुणाचा) आरोप करण्यासाठीं त्याच्या मूळधर्मांचा आणि कवीनें बुद्धिविलासानें तर्किलेल्या अन्यधर्मांचाही निषेध करणें यास शुद्धापन्हुति अलंकार ह्मणतात. जसें, चंद्राचे ठिकाणीं हें आकाशगंगेचें कमल आहे असा आरोप करण्याकरितां हा चंद्र नव्हे अशा रीतीनें त्याच्या चंद्रत्वरूप मूळधर्मांचा निषेध केला आहे. (२) **तो धर्मनिषेध जरी कवि वर्णी युक्तिपूर्वक प्रकृतीं । तरि अधिक चमत्कारिक कवि त्यासी हेत्वपन्हुती ह्मणती. ॥ ३ ॥** संतापद ह्मणुनि नव्हे इंदु, ह्मणू रवि तरी निशा आहे, । हा जलधिंतूनि निघुनी वडवानळ उडुनि उडुगणीं राहे ॥ ४ ॥ मूळधर्मांचा निषेध करतांना योग्य कारण (हेतु) दाखविलें असतां ती हेत्वपन्हुति होते. येथें चंद्राचे ठिकाणीं वडवानलत्वाचा आरोप करण्याकरितां तीव्रत्व (संतापदायकत्व) आणि रात्रिभवत्व या दोन हेतूंनीं (कारणांनीं) क्रमानें चंद्रत्व व सूर्यत्व यांचा निषेध केला आहे. (३). **कवि वर्णनीयधर्म प्रतिषेध करी जरी दुजा वरती । आरोपाया त्यातें पर्यस्तापन्हुती तिला ह्मणती. ॥ ५ ॥** जो हा गगनीं भासे सकलंक, अपूर्ण तो नव्हे चंद्र । तरि सुंदरीमुखांत विधु होय खरा अधरमधुसुधासांद्र. ॥ ६ ॥ जेथें कवीनें कांहीं एका पदार्थावरील धर्माचा निषेध अन्य वर्णनीय पदार्थाचे ठिकाणीं त्या धर्माचा आरोप करण्याकरितां केलेला असतो तीस पर्यस्तापन्हुति असें ह्मणतात. वरील उदाहरणांत चंद्राचे ठिकाणीं चंद्रत्वरूप धर्माचा जो निषेध केला आहे तो वर्णनीय अशा सुंदर स्त्रीच्या मुखावर चंद्रत्वाचा आरोप करण्यासाठीं केलेला आहे. पर्यस्तापन्हुतीचेही दोन भेद आहेत. हेतुपर्यस्तापन्हुति व शुद्धपर्यस्तापन्हुति. धर्माच्या आरोपाचें व निषेधाचें कारण सांगितलें असतां हेतुपर्यस्तापन्हुति. (४) **शंका येतां प्रकृतीं भ्रांतिनिवारण कवींद्र जरि करिती । सांगून तत्व तरि ती भ्रांतापन्हुति ह्मणूनि आदरिती. ॥ ७ ॥** ताप करूनि शरीरा कांपहि दे साजणी करूं काय । हाय! ज्वर काय? सखे! नाहीं मदन प्रिये! मधुसहाय. ॥ ८ ॥ वर्णनीय पदार्थाविषयीं शंका आली असतां खरी गोष्ट सांगून जेव्हां भ्रांतिनिवारण करितात तेथें भ्रांतापन्हुति अलंकार होतो. वरील उदाहरणांत नायिकेनें ताप व कांप देतो अशा रीतीनें मदनाचा वृत्तांत सांगितला असतां तो ज्वराकडेही सारखाच लागत असल्यामुळें सरळ बुद्धीच्या सखीनें 'सखे! ज्वर काय?' ह्मणून विचारितांच 'प्रिये ज्वर नाहीं, मदन होय' अशा प्रकारें खरें सांगून भ्रांतीचें निवारण केलें आहे. ही भ्रांति कधीं खरी व कधीं कल्पित असते. (५) **इतरांच्या शंकेस्तव सत्यार्थनिषेध चतुर जरि करिती । तरि ती रसिकाभिमता छेकापन्हुति कवींद्र आदरिती. ॥ ९ ॥** सखि! जल्पना करीतचि चरणीं संलग्न माझिया झाला । अजि काय कांत सुंदरि! नोहे नूपुर सखे सुदृढ जडला. ॥ १० ॥ कोणी एकाचें कोणापाशीं कांहीं एकांत भाषण चालू असलेलें दुसऱ्यानें ऐकलें असतां पूर्वीचे भाषणाचें तात्पर्य वेगळेंच वर्णून खऱ्या अर्थाचा निषेध केला असल्यास छेकापन्हुति अलंकार होतो. जसें कोणी नायिका आपल्या रह-

त्यांतील सखीजवळ आपल्या नायकाचा वृत्तांत सांगत असतां तो ऐकून 'सुंदरि कांत काय?' अशा रीतीनें शंका घेतलेल्या दुसऱ्या सखीस अनुलक्षून 'कांत नव्हे पैजण' असें सांगून खऱ्या अर्थाचा निषेध केला आहे. (६) **कैतवयुक्त अपन्हुति कपटादिपदीं गमे निषेध जरी । कांतासुकटाक्षमिषें निघती हे मदनबाण, भरति उरीं.** ॥ ११ ॥ कपट, मिष, निमित्त, छल, इत्यादि शब्दांनीं वर्णनीयवस्तूचा निषेध केला असतां ती कैतवापन्हुति होते. उदाहरणांत असत्यता वर्णन करणाऱ्या 'मिष' या शब्दावरून हे कांताकटाक्ष नव्हेत, तर मदनाचे बाण आहेत अशा रीतीनें निषेध व्यक्त होत आहे" (अलंकारविकाश). यांचीं उदाहरणें:-(शुद्धापन्हुति) 'न हें नभोमंडल, वारिराशी । न तारका, फेनचि हा तयाचा । न चंद्र, हा वनज शेष झाला । न अंक, तो विष्णु गमे निजेला.' ॥ १ ॥ (हेत्वपन्हुति) 'संताप दे यास्तव चंद्र नोहे । रवी म्हणावा तरि रात्र आहे । हा सागरांतूनि निघूनि गेला । आकाशमार्गी वडवाग्नि ठेला.' ॥ २ ॥ (हेतुपर्यस्तापन्हुति) 'लक्ष्मी खरें विष, हलाहल वीष नोहे । लोकांत मात्र [illegible] आहे । कीं तें पिऊनिहि सुखें शिव जागताहे । विष्णू शिवूनिच हिला भुलि पावताहे.' ॥ ३ ॥ 'न विषं विषमित्याहुर्ब्रह्मस्वं विषमुच्यते । विषमेकाकिनं हन्ति ब्रह्मस्वं [illegible]' ॥ ३ ॥ याचा अर्थ:- 'विष हें वीष नव्हे तर कर्ज हेंच विष होय; विष एकट्याचाच प्राण घेतें पण कर्ज मुलाबाळां सुद्धां काढणाऱ्याचा प्राण हरण करितें.' (भ्रांतापन्हुति, कल्पित भ्रांति) 'हार नोहे, वेणी; गरळ न गळां जें तुज दिसे, । असे कस्तूरी हा; शिरि कुसुम आहे, विधु नसे । [illegible] हे नोहे, तनुचवलता कांतविरहें; । शिवभ्रांतीनें कां छळिसि मज कामा! विफल हें.' ॥ ४ ॥ (छेकापन्हुति) 'सीत्कार शिकवितो मज, अधरीं व्रण करोनि पुलक उठवितो । नायिक मिळाला का? नोहे, हेमंतवात सखये तो' (सीत्कार [illegible], [illegible], करणें) ॥ ५ ॥ छेकापन्हुतीचें एक [illegible] उदाहरण रामजोशाचें 'राधासखिसंवादी छेकापन्हुति हे [illegible]' हें पद होय. त्यांतील थोडासा मासला:-'वांकडा [illegible] न काय ग राधिका! नव्हे, इंदुची कळा ॥ [illegible] न काय राधिका? नव्हे गड्या! कोकिला.' ॥ रसज्ञांनीं तें सर्व पद रामजोश्याच्या पदसंग्रहांत वाचावें. 'अपन्हुति' अलंकाराचीं मोरोपंताच्या काव्यांतील थोडीं उदाहरणें:-(१) 'पुत्र न ते, [illegible] पाक-वणवेच.' (अनुशासन ८.३३), (२) 'सखिहरतां हरा न नृप, पाटव[illegible] सायका मारा । (क्रोधातें भीम गिळी, गरळातें जेंवि काय कामारी)' ॥ (सभापर्व) (३) 'युद्ध न हा रिसख माता त्या सद्यःस्वर्गहेतुसत्रास.' ॥ (विराट अ० ५. ६६), (४) 'प्रतिरवमिषें शरांनीं भरता, कुंथावयासि नभ लागे.' ॥ (विराट ५.३५), (५) 'वृषसेना राणि ह्मणते नाथा! तुज न विजयें न गुरुशापें । वधिलें कृष्णाक्षोभें अथवा माझ्याचि पूर्वकृतपापें.' ॥ (स्त्री० ५.१०), (६) 'जैसें रूप तसेंचि नाम दुसरें मायावती हें धरी; । शत्रूच्या सदनीं न पाक, नप ती पत्यासिसाठीं करी.' ॥ (७) 'शुकपिकसकलकलकलस्वरें करुनि भोंवतीच आरडती । विविधपतगनिकररवछलेंकरुनि 'भूमिभूलता रडती.' ॥ (कुशलवाख्यान ४.७७), (८) 'सेतु न तो, यत्पतिनें स्वसुता नेली जशी वृकें एणी । त्या लंकेची श्रीभूदेवीनें ओढिली असे वेणी.' ॥ (वनपर्व १२. ११), (९) 'ते सत्य सर्प, न विशिख; कर्णहि न, तदीय सदन वारुळ तो; । कीं माणिक्यसर जयश्रीवरणीं शर गळां नवा

## [१]कथा [२]भुवनमोहिनी, अशि न [३]मोहिनी होय [४]ती;

---

रुळतो.' ॥ (द्रोण० १२.८२), (१०) 'सूत वरुनि लाजे कुरुवरगुरुविरहाकुळा कृशा निपट। अरिसेना काढीना धूलिपटलमिष मुखावरूनि पट.' ॥ (कर्ण० ८.२), (११) 'कर्णानें त्या समयीं सात्यकि बहु पीडिला शरस्तोमें। दिधले ढेंकर भेरीनादमिषें बाणपूरितव्योमें.' ॥ (कर्ण० १९.४).

१. **प्रास्ताविकः—यांत कवि भगवंताच्या कथेचें मोहकत्व वर्णन करितात.** २. **भुवनाला (चराचर जगताला) मोह पाडणारी; त्रिभुवनास भुलविणारी. अन्वयार्थः—कथा भुवनमोहिनी [होय], ती मोहिनी अशी न होय; [ती] असुरधी हरो; हिणें किती हो! यती भुलविले; जरि [मोहिनीनें] दक्षहा विमोहिला [तरि] नव्हे न ह्मणवे; [परंतु] [महादेवानें] शिरीं प्रिया बसविली; [तेव्हां] हा मुनिपथीं कसा दक्ष? प्रथमचरणार्थः—भगवत्कथा आपल्या मोहकत्वानें सर्व त्रिभुवनास वश करिते. समुद्रमंथनसमयीं अमृताचा विभाग करणारी ती सुप्रसिद्ध मोहिनी ह्या जगन्मोहिनी भगवत्कथेसारखी मोहक नव्हती.** ३. **कथासंदर्भः**—समुद्रमंथन होऊन त्यांतून अमृत निघालें असतां त्याविषयीं देवदैत्यांत भांडण लागलें व दैत्यांनीं बळानें अमृतकुंभ आपणाजवळ घेतला. तेव्हां देवांनीं महाविष्णूचें स्तवन केलें. त्यावरून देवांना अमृत प्राप्त करून देण्याकरितां भगवान् विष्णूनें मोहिनीरूप धारण केलें व दैत्यांस मोहित करून त्यांच्यापासून अमृताची वांटणी करण्याकरितां अमृतकुंभ आपल्यापाशीं घेतला. मोहिनीनें देवदैत्यांस रांगेनें बसावयास सांगून आपण प्रथम देवांना अमृत वाढावयास लागली. दैत्यांपैकीं राहुकेतूंना मोहिनीच्या कपटनाटकाचा संशय येऊन ते देवांचीं रूपें घेऊन देवांच्या पंक्तींत बसले. मोहिनीनें सर्व देवांना वाढून तीं या देवरूपी दैत्यांकडे येऊन त्यांनाही तिनें अमृत वाढिलें व तें त्यांच्या कंठगत होतें न होतें तोंच सूर्यचंद्रांच्या खुणांवरून हे दैत्य आहेत असें ओळखून तिनें खड्गानें त्यांचीं शिरें छेदिलीं. तेव्हां दैत्यांना हें सर्व कपट असून मोहिनीनें त्यांना फसविलें असें समजून ते देवांवर धांवले. त्या वेळेस मोहिनीनें देवांचें रक्षण करून दैत्यांचा संहार केला. भगवान् विष्णूनें मोहिनीरूप धारण केलें, त्या वेळेस त्या मोहिनीचें देदीप्यमान सुंदर रूप पाहून सर्व देव चकित झाले. त्यांत भगवान् शंकर तर तिच्या अलौकिक रूपानें अतिशय मोहित झाले—अशी कथा आहे. **समुद्रमंथन व मोहिनी अवतार यांतील रूपकः**—देवदैत्यांनीं समुद्रमंथन करून चतुर्दश रत्नें काढलीं. त्यांत शेवटीं अमृत निघालें. तिच्या करितां देवदैत्यांत भांडण लागलें. तेव्हां विष्णूनें मोहिनी अवतार धरून दैत्यांना फसवून देवांना अमृत पाजिलें या कथेंत गूढरूपक आहे. भगवंताची माया हीच मोहिनी. माया ही सर्वांस भुलविते ह्मणून तिला मोहिनी ह्मणणें फार योग्य आहे. माया किंवा 'प्रकृति' ही 'पुरुषा'चें अर्धांग व ती परमेश्वराच्या स्वाधीन आहे. सत्वगुणी मनुष्यें हे देव व तमोगुणी मनुष्यें हेच दैत्य. देव परमेश्वराला अनन्य शरण होते ह्मणून ते मायेला भुलले नाहींत पण तमोगुणी ह्मणूनच अज्ञानी दैत्य मात्र तिला पूर्ण वश झाले. केवळ सत्वगुणाच्या व ज्ञानाच्या जोरावर मायामोहांतून सुटका होत नाहीं हेंच महादेव (मोठा ज्ञानी) मायेला भुलले यांतील तात्पर्य. पूर्णज्ञानी मनुष्य देखील सात्विक अहंकारानें बद्ध झाला असतां जर मायापाशांत पडतो व अमृतास मुकतो तर

हरो असुरधी; हिणें भुलविले किती हो! यती; ।
नव्हे न ह्मणवे; असो; जरि विमोहिला दक्षहा,

मग राहूसारख्या ज्ञान्याचें सोंग घेतलेल्या, अथवा अर्धवट ज्ञानी मनुष्याला अमृत कसें पचावें? पचलें नाहीं हें नीटच झालें. मोहिनीनें स्वत: देवांस अमृत पाजिलें व दैत्य अमृतास मुकून मद्यसेवनांत तर झाले यावरून परमेश्वरास अनन्यभावानें शरण जाणाऱ्या भक्तांस माया बाधक न होतां उलट साधक होते व तिच्याच साह्यानें त्यांना अमृताचा (मोक्षाचा) लाभ मिळतो; उलटपक्षीं मूढजनांना ब्रह्मानंदाची प्राप्ति होणें तर लांबच राहतें परंतु ते क्षणिक विषयानंदांतच तल्लीन होऊन जातात ह्या गोष्टी कळून येतात. देवदैत्यांनीं समुद्रमंथन केलें या कथेंतील रूपक हरिवंश 'पुष्करप्रादुर्भाव'या प्रकरणाच्या टीकेंत सुप्रसिद्ध टीकाकार नीळकंठ चतुर्धर यांनीं सोडविलें आहे. त्याचें मोरोपंतांनीं पुढील प्रमाणें सारांशरूपानें भाषांतर केलें आहे. आमच्या वाचकांस त्याचें मनन करण्यास सांपडावें ह्मणून तेवढी गीति येथें दिली आहे:—'मन सिंधु, मतिच मंदर, कथिलें शमकाम जे सुरासुर ते, । अभ्यास हेंचि मंथन, मुक्ति सुधा, जाणती सुधी पुरते. ॥' (हरिवंश ४५. २८). ४. **सुप्रसिद्ध.**

**१. दैत्यांची बुद्धि. प्रास्ताविकः मोहिनीनें दैत्यांस वश केलें असें भगवान् ह्मणतील अशी आशंका मनांत आणून कवि ह्मणतात. द्वितीयचरणार्थः–तिणें दैत्यांचीं मनें हरण केलीं तर खुशाल करो. तिनें तसें केलें यांत मोठें नवल नाहीं. कारण बोलून चालून दैत्य तमोगुणी व स्थूलबुद्धि पडले; पण कथेनें सत्वगुणी व सूक्ष्म बुद्धि अशा हजारों तपस्व्यांस स्ववश केलें. तेव्हां मोहिनीच्या प्रभावापेक्षां कथेचा प्रभाव मोठा हें उघड झालें. २. 'यति' ह्या शब्दानें संन्यासी, योगी, तपस्वी, मुनि इत्यादि सात्विक भगवद्भक्त यांचें ग्रहण करावें. ज्यानें आपलीं इंद्रियें स्ववश केलीं तो यति. ३. मोहित केला. प्रास्ताविकः–कथेनें शेंकडों तपस्व्यांचीं मनें आपल्या स्वाधीन केलीं खरीं पण त्या मोहिनीनें सर्व योगिजनांत श्रेष्ठ जो महादेव त्यास भुलविलें अशी भगवदाशंका मनांत आणून कवि म्हणतात. तृतीयचरणार्थः–मोहिनीनें योगिजनांचा स्वामी दक्षांतक महादेव याला मोहित केलें हें खरें, माझ्यानें नाहीं म्हणवत नाहीं. पण तें एकीकडे राहो. कारण दक्षयज्ञविध्वंसक महादेव हा तरी तमोगुणीच होता. ४. दक्षाचा नाश करणारा महादेव. कथासंदर्भः–**दक्षप्रजापति हा महादेवाचा सासरा. ह्यानें एकदां यज्ञास आरंभ केला तेव्हां त्यानें सर्व देवांस पाचारण केलें. पण महादेवाला बोलाविलें नाहीं. तरी दक्षकन्या गौरी हिला बोलावणें नसतांही बापाचा यज्ञ पहावयास जावें म्हणून ती निघाली. तेथें दक्षानें तिच्या भर्त्याची पुष्कळ निंदा केली. ती न साहून तिनें आपल्या देहाची अग्निकुंडांत आहुती दिली. महादेवाला हें वर्तमान कळलें तेव्हां त्याला अत्यंत क्रोध येऊन त्यानें आपली जटा आपटली व त्यापासून निघालेल्या वीरभद्रास त्यानें दक्षयज्ञाचा नाश करण्यास आपल्या बरोबर नेलें. वीरभद्रानें यज्ञमंडपांत जाऊन यज्ञाचा विध्वंस करण्यास आरंभिलें व सर्व ऋत्विजांची दाणादाण केली. तसेंच महादेवानें दक्षाचें शिर तोडून तो मृगरूपानें पळणाऱ्या यज्ञाच्या पाठीस बाण घेऊन लागला व त्या मृगाचें शिर तोडून त्यास **मृगशीर्ष** हें नांव

देऊन त्यानें त्याची नभोमंडळांत नक्षत्रमालिकेंत स्थापना केली. ह्याच कथेवरून महादेवाचें 'क्रतुध्वंसी' असें नांव पडलें आहे. **शिवाचीं नांवें**:–शिवाविषयीं पुष्कळ रूपकें आहेत ह्मणून पृ० १८२ च्या दुसऱ्या टीपेंत सांगितलेंच आहे. पुराणांत एका स्थळीं असा एक श्लोक आढळतो:—'चरितानि विचित्राणि गुह्यानि गहनानि च । ब्रह्मादीनां च सर्वेषां दुर्विज्ञेयोऽस्ति शंकरः' ॥ ब्रह्माविष्णूचीं चरित्रें विचित्र, गुह्य व गहन तर आहेतच पण शंकराचीं चरित्रें तर समजण्यास फारच कठीण. शंकराच्या प्रत्येक नांवांत कांहीं तरी खुबी असतेच. केकावलींत महादेवाचीं 'सदाशिव' (केका० १), 'गंगाधर' (के० २४), 'कृत्तिवासा' (के० ३०), 'हर' (३१), 'शिव' (६८), 'मदनमारक' (६९), 'शंभु' (के० ७०), 'पुरांतक' (के० ७२), 'दक्षहा' (के० १०३), 'महेश्वर, (१०९) अशीं दहा नांवें आलीं आहेत. त्यांपैकीं बहुतेकांचा खुलासा टीपेंत केलाच आहे. त्यांपैकीं शिव, सदाशिव, हर, शंभु व महेश्वर हीं नांवें परमेश्वरवाचीच आहेत. उदाहरणार्थः–'शं सुखं भावयति उत्पादयतीति वा शंभुः, शं सुखं अस्मात् भवतीति शंभुः' (रुद्राध्याय, आनंदाश्रम ग्रंथांक २ पृ० ७२). 'जो सुख उत्पन्न करितो किंवा ज्याच्या पासून सुख होतें तो शंभु ('शंकर' याचा अर्थ तरी ऐहिक पारमार्थिक अशा दोन्ही तऱ्हेचें सुख करणारा–देणारा हाच आहे). 'शिवः कल्याणरूपः, अकल्मषः, निस्त्रैगुण्यः' (रुद्राध्याय पृ० ७३), 'शिव' ह्मणजे मंगलरूप ईश्वर, 'समेधयति यन्नित्यं सर्वार्थान्सर्वकर्मसु । शिवमिच्छन् मनुष्याणां तस्मादेवः शिवः स्मृतः' ॥ (महाभारत–रुद्राध्याय पृ० ७३). **दक्षाच्या कथेंतील रूपकः**–'दक्षहा' (दक्षाचा नाश करणारा) ह्या शब्दांत येणाऱ्या कथेंत तरी महादेवाच्या संबंधानें गूढ रूपकच आहे. 'दक्ष' शब्दाचा अर्थ निपुण. कोणत्याही विद्येंत किंवा कलेंत प्रवीण मनुष्य तो दक्ष. आतां दक्षता किंवा प्रवीणता प्रत्येक कलेंत किंवा विद्येंत असते म्हणून दक्षाला अनेक कन्या (अनेक विद्या) झाल्या असें ह्मटलें त्यांत ब्रह्मविद्या ही नेहमीं 'एकमेवाद्वितीयं' परमेश्वरालाच धरून राहाते ह्मणून तिला सती असें नांव देऊन तिला दक्षाची ज्येष्ठ कन्या कल्पिली; व तिनें मंगलस्वरूप परमेश्वर हाच शिव त्याच्याशीं लग्न लाविलें. पूर्वी कृतयुगांत ब्रह्मवेत्ते ऋषि यज्ञ करित. ते यज्ञ प्रेमप्रधान म्हणजे केवळ ईश्वराची कृपा आपणावर व्हावी एवढ्याच हेतूनें नूतन स्तोत्रें रचून केलेले असत. तेव्हां त्या यज्ञांत सतीचा व शिवाचा उत्तम मानसन्मान होत असे. पण पुढें पुढें जसे जसे लोक स्वार्थपर झाले तसे तसे त्यांचे यज्ञ 'प्रीतिप्रधान' होण्याचे कमी कमी होऊन शेवटीं शेवटीं ते पूर्ण 'कामप्रधान' (स्वार्थपर) झाले. म्हणजे लोक ईश्वराची आराधना ब्रह्मसुखाकरितां न करितां धनधान्यपुत्रपौत्राकरितां किंवा आयुरारोग्याकरितां करूं लागले. अशा यज्ञांत स्वार्थपर विद्यांचा व त्यांच्या पतींचा सन्मान होऊन ब्रह्मविद्या सतीचा व मंगलस्वरूप अशा तिच्या पतीचा मोठा अपमान झाला. तेव्हां सतीनें अग्निकुंडांत उडी टाकून ती भस्म झाली म्हणजे ब्रह्मविद्या गुप्त झाली. तेव्हां 'यज्ञेश्वर' (प्रीतिप्रधानयज्ञाचा ईश्वर) शिवाला राग येऊन त्यानें कामप्रधान यज्ञाचा नाश करून त्यांत हविर्भाग घेणाऱ्या देवांचें शासन केलें. पुढें सती हिमालयाची कन्या पार्वती होऊन तिनें शिवाला वरिलें. अर्थात् ब्रह्मविद्या जगांतून नाहींशी होऊन हिमालयस्थ ऋषींजवळ राहावयास गेली व तेथें मात्र केवळ परमेश्वराच्याच सेवेंत ती सादर झाली. हें रूपक सारांशरूपानें सोडविलें आहे. जास्त विस्तार प्रत्येकानें आपल्या अंतःकरणांत करावा.

प्रिया बसविली शिरीं, मुनिपथीं कसा दक्ष हा? ॥ १०३

सुरासुरनरोरगां भुलवुनी कथा न त्यजी;

न भेद करि पंक्तिचा; अमृत पाजिती सत्य जी; ।

---

१. वल्लभा, अर्थसंदर्भानें गंगा. प्रास्ताविकः—महादेवाला मोहिनीनें वश केलें यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. कारण महादेव खरा योगी नव्हता. चतुर्थचरणार्थः—महादेवानें आपली बायको गंगा हिला आपल्या डोक्यावर जटाजूटांत बसविली, म्हणून तो स्त्रीजित ठरला. अशा स्त्रीजित महादेवाला मोहिनीनें भुलविलें यांत तिनें मोठासा पराक्रम केला असें मुळींच नाहीं. महादेवाला महायोगी म्हणणें बरोबर नाहीं; कारण त्यानें आपली बायको आपल्या डोक्यावर बसवून घेतली. ज्याची बायको शिरजोर तो मुनिमार्गानें चालण्यास समर्थ असें कसें म्हणावें ? २. भागवतांतील पुढील वचन पहावें:—'किं विद्यया किं तपसा किं त्यागेन श्रुतेन वा । किं विविक्तेन मौनेन स्त्रीभिर्यस्य मनो हृतम्'॥ (२.६.११) मुनिपथीं=मुनिमार्गांत, मुनिधर्मांत. ३. चतुर, समर्थ. यांत कवीनें भगवंताशीं विनोदपूर्वक कोटिक्रम केला आहे. यांत उपमान जी मोहिनी तिजपेक्षां उपमेय जी कथा तिचें मोहकत्वगुणसंबंधानें आधिक्य वर्णिलें आहे म्हणून हा व्यतिरेक अलंकार होय. के० ३१ पृ० ८६ पहा. ४. प्रास्ताविकः—यांतही मोहिनीपेक्षां भगवत्कथेचें आधिक्य वर्णिलें आहे. सुर (देव)+असुर (दैत्य)+नर (मनुष्य)+उरग (सर्प, उरानें सरपटत जातो म्हणून सर्पाला उरग म्हणतात,) यांना=देवदैत्यमनुष्यसर्पांना. अन्वयार्थः—कथा सुरासुरनरोरगां भुलवुनि न त्यजी; पंक्तीचा भेद न करि; जी सत्य अमृत पाजिती; तिणें जरि स्वरतमानसां सुधारस पाजिला, [तरि] ती बापा ! जिला द्रव नयेचि [ती] [राहुकेतूंना] अमृत घोटितां वधी. प्रथमचरणार्थः—भगवत्कथा देवांना, दैत्यांना, मनुष्यांना, तशीच सर्पांना आपल्या मोहकगुणानें मोहित करिते. पण ती त्यांचा त्याग करीत नाहीं. उलटपक्षीं मोहिनीनें देवदैत्यमनुष्यादिकांना आपल्या सौंदर्यादि गुणांनीं चटका लावला खरा, पण शेवटीं तिनें त्यांचा त्याग केला, ती त्यांना सोडून गेली तशी गोष्ट कथेची नाहीं. ती ज्याला एकदां मोह पाडिते त्याच्या जवळ ती शेवटपर्यंत राहून त्याचा सांभाळ करिते. ५. मोहित करून. ६. भिन्नभाव. द्वितीयचरणार्थः—देवदैत्यांच्या पंक्ती बसल्या असतां मोहिनीनें देवांस अमृत पाजून व दैत्यांस न पाजून जसा भेदभाव दाखविला तसा प्रकार भगवत्कथेचा नाहीं, ती सर्वांना अमृत पाजिते. एकाला चांगला पदार्थ वाढून दुसऱ्याला तो न वाढणें किंवा वाईट पदार्थ वाढणें ह्याला पंक्तिभेद करणें म्हणतात. **भावार्थः**—समुद्रमंथन केल्यावर अमृत निघालें तेव्हां देवदैत्यांमध्यें त्यासंबंधीं भांडण लागलें. त्या वेळीं अमृत वाढण्याचें काम मोहिनीनें आपणाकडे घेऊन देवांना मात्र तिनें तें वाढलें, पण दैत्यांना वाढलें नाहीं. याप्रमाणें मोहिनीनें देवांची तरफदारी केली. 'अमृतमथनां'तील पुढील वर्णन पहा:—'सुर असुरांत बसविले बहु, असुर सुरांतहि प्रताराया । ज्यां पंक्तिभेद घडला या स्वयशें तेहि विप्र ताराया. ॥ ३–२२ ॥ बहुमानें प्रियवचनें निकटस्थासुर अति-

[1]तिणें जरि सुधारस [2]स्वरतमानसां पाजिला,
वधी अमृत [3]घोटितां, [4]द्रव नयेचि बापा! जिला. ॥ १०४

क्रमुनि जाय । दूरस्थ सुरातें दे अमृत, लहानासि पय जसें माय ॥ २३ ॥' तसा प्रकार कथेचा नाहीं. ती लहान थोर, गरीब श्रीमंत, सगळ्या लोकांना सारख्या रीतीनें वागविते व त्या सर्वांना अमृतच पाजिते. म्हणून मोहिनीपेक्षां भगवत्कथा श्रेष्ठ. **७. येथें अमृत शब्द श्लिष्ट आहे. याचे 'सुधा' आणि 'मोक्ष' असे दोन अर्थ होतात. मोहिनीनें देवांना अमृत म्हणजे सुधा पाजली, कथा सर्व लोकांना अमृत म्हणजे मोक्ष देते.** 'तेंहि अमृत ओगरितां करि मुजहि विष्णु पंक्तिभेदातें'. (विश्वेशस्तुति). ८. **खरोखर.** व्या०:–सत्य हें क्रियाविशेषण न करितां पाहिजे असल्यास 'अमृत' शब्दाचें विशेषण करावें. **सत्य अमृत=खरें अमृत, अमृत या नांवानें प्रसिद्ध असणारी सुधा हें खोटें अमृत. मोक्ष हें खरें अमृत.** यांत **'पर्यस्तापन्हुति'** अलंकाराची स्पष्ट छाया पडली आहे. अशाच प्रकारचा उद्गार कवीनें गंगास्तुतींत काढला आहे–'अमृतचि तव अमृत; म्हणे अमृत असें ज्यासि शक्र, पाणी तें; । गंगे! मागति हेंचि ज्ञाते प्रार्थूनि चक्रपाणीतें'. ॥ [गीनि ९६ पृ० ५५]. **केकामाधुर्यः**–मोहिनीनें आपल्या आवडत्या भक्तांस मात्र अमृत पाजिलें; तेंही खोटेंच; भगवत्कथा सर्वांना अमृत पाजिते तें देवपेयासारखें अशाश्वत सुख देणारें नसून कैवल्यासारखें चिरंतन सुख देतें. सुधा प्राशन करणारे देव सुद्धां क्षीणपुण्य झाले म्हणजे मृत्युलोकीं जन्म घेतात. पण ज्यांना एकदां कैवल्यसुखाची (मोक्षाची) प्राप्ति झाली त्यांचा मात्र कधीं नाश होत नाहीं व ते अखंड सुखांत राहतात.

१. **मोहिनीनें.** २. **आपल्या ठिकाणीं आसक्त झालें आहे चित्त ज्यांचें अशा देवांना;** (किंवा) **'स्व' म्हणजे आत्मा त्याचे ठिकाणीं रत म्ह० रममाण झालेल्या, अर्थात् आत्मस्वरूपनिष्ठ देवांना.** दैत्य आत्मरत नव्हते म्हणून 'स्वरतमानसां' हें पद त्यांच्याकडे लागू होत नाहीं. ३. **गिळतांना.** ४. **ओलावा; दया. द्वितीयार्धाचा अर्थः– मोहिनीनें देवांना अमृत पाजिलें, पण देवांचें रूप घेऊन देवसमाजांत बसणाऱ्या राहुकेतूंना मात्र तिनें अमृत पचूं दिलें नाहीं. तर तिनें त्यांची दया न करितां ते अमृत गिळित असतां चक्रानें त्यांचीं शिरें कापलीं. कथा अशा प्रकारचा कोणाचाही विश्वासघात करीत नाहीं. तिच्या ठिकाणीं पक्षपात मुळींच नसून ती सर्वांना सारख्या रीतीनें वागविते. भगवत्कथाः**–या ठिकाणीं कवीनें भगवत्कथा मोहिनीपेक्षां श्रेष्ठ असें सिद्ध केलें आहे. दुसऱ्या एका स्थळीं तो अमृतापेक्षां अधिक गोड आहे असा त्यानें आपला अभिप्राय दर्शविला आहे. तो असा:–'झाले जे तृप्त भास्वत्कुलतिलकरघूत्तंसलीलारसानें,। सारासारज्ञ साधु स्वमनिं अमृतही मानिती फार सानें; । पीयूषें सोदरेंदुक्षयहि न हरिला, त्यागिलेंही पित्याला, राहूचा घात केला, विषसहजनिला कोण सेवील त्याला!' ॥ १० ॥ [प्राकृत मंत्ररामायण–उपसंहार, पृष्ठ १०७] **या केकेंतही व्यतिरेकालंकार आहे.** 'अमृत' या पदाचे दोन अर्थ आहेत **म्हणून येथें श्लेषही आहे.**

अभीष्ट वरितात, [1]जे तव कथेसि [2]विश्वासती;
भली [3]असुरवंचनी, श्रुत असेचि वि[4]श्वास ती; ।
कथा कशि सखी ति[5]ची? [6]ठकवुनी हरी [7]संचितें,
तरी [8]अमृत दे, असें [9]सदय, दाखवी [10]वंचितें. ॥ १०९

---

१. प्रास्ताविकः–मोहिनीपेक्षां कथेची योग्यता मोठी आहे असें दर्शवून त्यांच्या वंचनेंत (फसवण्यांत) महदंतर आहे असें वर्णित होत्साते कवि म्हणतात. अन्वयार्थः–'जे (लोक) तव (तुझ्या) कथेसि (कथेला, कथेवर) विश्वासती (विश्वासतात, विश्वास ठेवतात) [ते] अभीष्ट (इच्छित मनोरथ, मनकामना) वरितात, (प्राप्त करून घेतात); [मोहिनी] भली (पक्की) असुरवंचनी (दैत्यांस ठकविणारी) [ह्याप्रमाणें] ती विश्वास (जगास त्रिभुवनास) श्रुत असेचि (ठाऊक आहेच); कथा तिची (मोहिनीची) सखी (सोबतीण) कशी (कशाची)? [भगवत्कथा] ठकवुनी (फसवून) संचितें (संचितकर्में, सांचविलेलीं पापपुण्यांचीं कर्में) हरी (हरण करिते, त्या कर्मांचा नाश करून त्यांस संसारदुःखापासून सोडविते), तरी (तथापि) अमृत (मोक्ष) दे (देते), सदय (दयाळु पुरुष) वंचितें (वंचना करून, फसवून) असें (ह्या प्रकारचें कल्याण) दाखवी (दाखवितो). प्रथमार्धाचा अर्थः–जे भगवत्कथेवर आपल्या उद्धाराविषयीं विश्वास ठेवितात त्यांचे इष्ट मनोरथ पूर्ण होतात. पण तशी गोष्ट मोहिनीची नाहीं. मोहिनीनें आपल्यावर पूर्णपणें विश्वास ठेवणाऱ्या दैत्यांस फसविलें; ही गोष्ट त्रिभुवनांतील सर्व लोकांस माहित आहेच. २. विश्वासतात, विश्वास ठेवितात. ३. दैत्यांस फसविणारी; त्यांना अमृताची आशा लावून तें न देणारी. ४. जगास, त्रिभुवनास. ५. त्या मोहिनीची. ६. फसवून. ७. (मोहिनीपक्षीं) संचित धनें, (कथापक्षीं) पूर्वजन्मार्जित संचितकर्में. द्वितीयार्धाचा अर्थः–आपल्यावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांचे मनोरथ पूर्ण करणारी भगवत्कथा व विश्वास दाखवून फसविणारी मोहिनी या दोघींची योग्यता सारखीच कशी बरें होईल? होणार नाहीं. म्हणून मोहिनीपेक्षां भगवत्कथा निःसंशय श्रेष्ठ. आतां भगवत्कथा ही आपल्या भजकांस एका प्रकारें फसविते खरी, पण तिच्या फसविण्यांत व मोहिनीच्या फसविण्यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. भगवत्कथा देखील आपल्या भजकांचीं पूर्वजन्मार्जित कर्में त्यांना कळूं न देतां त्यांच्यापासून हिरावून घेऊन त्यांचा नाश करिते, पण इतकें केलें तरी ती त्यांना अमृत (मोक्ष) देते. मोहिनी आपल्या भजकांस ठकवून त्यांचीं संचितें (संचित धनें) हरण करिते, पण ती त्यांना अमृत (सुधा) देत नाहीं. यावरून भगवत्कथा जरी आपल्या भजकांस वरकरणी फसविते तरी अशा रीतीनें ती त्यांचें कल्याणच करिते. यावरून कवि एक साधारण नियम सांगतात. दयाळु पुरुष दुसऱ्याला फसवून सुद्धां त्याचें कल्याणच करितो म्हणजे दुसऱ्याचें कल्याण करण्याकरितांच दयावंत पुरुषाला फसवणूक करावी लागते. ८. सुधा, मोक्ष. मोहिनीपक्षीं सुधा; कथापक्षीं मोक्ष. ९. दयायुक्त, दयालु, कृपावंत.

करा श्रवण येवढें, अपटु लोक हांसो मला;
अहो! जरि गिळावया प्रियकुमार घे सोमला, ।

'सदय...वंचितें' यांतील भावार्थः—ज्यांत लोकांचें हित आहे परंतु तें त्यांना दिसत नसून उलट अहित वाटतें अशा ठिकाणीं दयालु पुरुष दुसऱ्याचें वास्तविक हित करण्याकरितां त्याला फसवावें लागलें तरी फसवितो. अशा प्रकारचें फसविणें अपायकारक नसून उपायकारकच आहे. म्हणून कथा जरी कधीं कधीं भगवज्जनाला फसविते तरी तसें करण्यांत ती त्याचें हितच करिते. 'ठकवुनी...अमृत दे, असें सदय दाखवी वंचितें' यांतील उत्तरपदाचा कोणी निराळाच अर्थ करितात. तो असाः—"पूर्वजन्मार्जित जें जें वाईट प्राप्त झालें असतें तें मनुष्यांना हितकारकच आहे असें वाटत असतें; तें त्यांना सोडावेंसें वाटत नाहीं. कथा जनांना फसवून तीं संचितफळें हरण करून मोक्ष देते, म्हणजे चांगलें देऊन वाईट काढून घेते. पण मोहिनीनें काय केलें, तर सुंदर रूप धारण करून 'आपण मोठी दयाळू' असें वरवर दाखविलें, व नांवाला अमृत देऊन त्यांचेंच हरण केलें. सारांश मोहिनी फसवून सदयपणा वरवर मात्र दाखविते, पण आंतून गळा कापते." (सुलभ-केकावली.) १०. वंचनेनें. यांत मोहिनीपेक्षां (उपमानापेक्षां) कथेनें ( उपमेयानें ) श्रेष्ठत्व ( आधिक्य ) वर्णिलें आहे म्हणून येथें व्यतिरेक अलंकार झाला. किंवा मोहिनी आणि कथा यांच्या परस्परविरुद्ध क्रियांचा उपन्यास केला आहे म्हणून येथें 'विरुद्धगुणन्यास' (Contrast) अलंकार आहे असेंही म्हणतां येईल.

१. प्रास्ताविकः—जो दुसऱ्याला फसवितो त्याला कृपाळु कसें म्हणावें अशी मागील केकेवर कोणी आशंका घेईल तिचें समाधान करीत होत्साते कवि म्हणतात. अन्वयः—येवढें श्रवण करा, मला अपटु (अडाणी) लोक हांसो (हंसेल तर हंसो); अहो!! जरि प्रियकुमार गिळावया सोमला घे [तरि] जी माय तयासि ठकवूनि (फसवून) बहुत शर्करा दे ( देते), तिला जी! (अजी!) स्वशिशुवंचनें (आपल्या मुलाच्या फसविण्यानें) अदयता शिवे काय? प्रथमचरणार्थः—मी बोलतों तें नीट लक्ष्य देऊन ऐका व मग वाटेल तर माझ्या बोलण्यास दोष द्या. भजकांस फसविणाऱ्या कथेला मीं हितकारी म्हटलें म्हणून अडाणी पुरुष मला खुशाल हांसो, त्याची मला परवा नाहीं. समंजस पुरुष तरी मला हंसणार नाहीं. २. अकुशल, अडाणी, असमंजस, अज्ञानी. ३. हांसोत. ४. आवडता मुलगा, लाडका पुत्र. 'अहो! जरि...जी!' ह्या कवीच्या भाषणाचा अर्थः—अहो! कल्पना करा कीं एखाद्या आईचा लाडका मुलगा आहे, त्यानें साखरेसारखा दिसणारा सोमलाचा खडा हातांत घेतला व साखर समजून तो मुलगा तो खडा आतां खाणार; तेव्हां अशा वेळीं त्या मुलाची आई त्या मुलाच्या हातावर पुष्कळशी साखर देऊन त्याला फसवून युक्तीनें त्याच्या हातांतून तो सोमलाचा खडा काढून घेते. तर अशा रीतीनें ती आपल्या मुलास फसविते म्हणून त्या मातेला निर्दय म्हणावें काय? अर्थात् म्हणूं नये.

तयासि ठकवूनि दे बहुत शर्करा माय जी,
तिला स्वशिशुवंचनें अदयता शिवे काय? जी! ॥ १०९

झणोनि बहु मोहिनीहुनि भली कथा हे तुजी,

---

**ती माता आपल्या मुलाच्या हिताकरितां त्याला फसविते म्हणून तिला निर्दय न म्हणतां सदयच म्हटलें पाहिजे. भावार्थः**—त्याचप्रमाणें भगवत्कथा आपल्या भजकांस फसवून त्यांचीं पूर्वजन्मार्जित कर्में हरण करिते व त्यांना मोक्षप्राप्ति करून देते म्हणून तिला निर्दय न म्हणतां सदयच म्हटलें पाहिजे. ५. **सोमलनामक विषाला. सोमल हा खनिज पदार्थ बऱ्याच अंशीं साखरेसारखा दिसतो. हा शब्द आरबी आहे.** हा पंतांनीं इतरत्रही योजिलेला आढळतो. पुढील उदाहरण पहा:—[गोपी कुब्जेविषयीं व तिच्यावर कृपा करणाऱ्या भगवंताविषयीं म्हणतात]—'हो काळी कीं गोरी; तद्विषया श्रुत नसो मला वार्णी:। तत्संग्रह हरिहि, नसा तावद पाजुन न **सोमला** वार्णी. ॥ ३८ ॥' [मोरोपंत—गोपीगोडवा].

१. **साखर.** २. **माता, जननी. हित करण्यास्तव कपट. समानार्थक उतारा.** वडील माणसें मुलाच्या हिताकरितांच त्याच्याशीं कपट करितात या विचाराशीं पुढील गीति समानार्थक आहेत:—'प्रल्हादवंशजीं छळ करि कल्याणार्थ कनकपट तो कीं। करितो अहितपदार्थ त्यजावया स्पष्ट जन कपट तोकीं. ॥ १८० ॥ एवंच वंचक नव्हे करि बहु कारुण्य न च्छल हरी तें। प्रभुदृक् दासां पद दे न सुधोदधिर्चीहि अच्छ लहरी तें.' ॥ १९१ ॥ (वामनचरित्र.) **माता मुलाच्या हातांतून सोमल काढून त्याला साखर देते ही नेहमींच्या व्यवहारांतील गोष्ट सांगून कथेच्या ठकविण्यांतील दोष उडविला म्हणून हा एथें 'आचार' अलंकार झाला.** याचें लक्षण व उदाहरण:—'प्रकृतार्थोपयोगित्वं यत्राचारस्य तत्र सः। गोपस्यापि दधि ग्राह्यं काश्यां भक्षंति सूरयः' ॥ (कुवलयानंदकारिकापुरवणी द्वितीयप्रकरण २०). **जेथें एकाद्या आचारानें वर्णनीय गोष्टीचें समर्थन केलें असतें तेथें 'आचार' नामक अलंकार होतो.** केका २६ मध्येंही हाच अलंकार आहे. ३. **आपल्या मुलास फसविल्यामुळें.** ४. **निर्दयता.** ५. **महाराज! अजी! चतुर्थचरणांत प्रश्नालंकार झाला.** कथेचें सदयत्व सिद्ध करण्याकरितां कवीनें मुलाच्या हातांतून सोमल हिरावून घेऊन त्याला साखर देण्याचा मातेचा दाखला दिला म्हणून **हा येथें दृष्टांतालंकार झाला असेंही मानतां येईल.** हा दृष्टांत फार सरस आहे. ६. **प्रास्ताविकः—मागल्या चार केकांतील विवेचनावरून मोहिनीपेक्षां भगवत्कथा अधिक आहे असें सिद्ध झालें; त्यावर त्या दोघीही मत्स्वरूपच आहेत अशी भगवंताची शंका यांत कवि वर्णितात.** ७. **चांगली, अधिक योग्यतेची, श्रेष्ठ.** ८. **तुझी, भगवंताची. अन्वयार्थः—'म्हणोनि (या सर्व वर्णनावरून) हे (ही) तुजी (तुझी) कथा मोहिनीहुनी (मोहिनीपेक्षां) बहु भली (फार चांगली, पुष्कळ अधिक योग्यतेची) [आहे], [कारण] जी नतमनोरथां (नत=नम्र शरणागत, त्यांच्या मनोरथांना) अभीष्ट (वांच्छित) फल (अर्थ) द्यावया (देण्यास) हेतु (कारण,**

अभीष्ट फल द्यावया नतमनोरथां हेतु जी; ।
म्हणाल जरि 'मीच त्या, विषम काय दोघींत ! रे ?
जसा जन सितासिताभिधनदीसदोघीं तरे' ॥ १०७

कारणीभूत) [आहे]; यावर कवि भगवदाशंका लिहितातः–[देवा! यावर आपण] जरि म्हणाल (कदाचित् म्हणाल) त्या (कथा व मोहिनी) मीच [आहेत]; दोघींत विषम (भेद) काय? रे! जसा (ज्याप्रमाणें) जन (लोक) सितासिताभिधनदीसदोघीं (श्वेतवर्ण गंगा व नीलवर्ण यमुना यांच्या पुण्य प्रवाहांत) तरे (तरतो, स्नानानें पापविमुक्त होतो). [त्याप्रमाणें कथा व मोहिनी ह्या एकरूपच आहेत.] प्रथमार्धाचा अर्थः–वरील सर्व विवेचनावरून देवा! तुमची कथा मोहिनीपेक्षां पुष्कळ अधिक योग्यतेची आहे हें ठरलें. कारण शरणागतांचे वांछित मनोरथ पूर्ण करण्यास ती तत्पर असते. कवीचें निरंकुशत्वः— येथें कवीनें प्रासास्तव 'झ'च्या जागीं एकांशीं सवर्ण जो 'ज' त्याचा आदेश केला आहे. असें करण्यास कवीच्या निरंकुशत्वानें कवीस पूर्ण अधिकार पोंचतो व त्याचा त्यानें आपल्या काव्यांत पूर्णपणें उपयोग केलेला आढळतो. 'झ'स्तव 'ज', 'ह्या' स्तव 'जा', 'च्या' स्तव 'चा', 'श' स्तव 'स', 'ठ' स्तव 'ट', 'ट' स्तव 'ठ', 'प' स्तव 'ख' इत्यादि निरंकुशत्वाचे अनेक प्रकार या महाराष्ट्रकविराजतिलकाच्या काव्यांतून आढळतात. पुरवणी पहा.

१. इच्छिलेलें (अभि+इष+क्त), वांछित. २. नम्रजनांच्या मनोरथांना. ३. कारण. ४. कथा व मोहिनी. द्वितीयार्धाचा अर्थ—कथा व मोहिनी ह्या दोन्हीही मत्स्वरूपच आहेत, मोहिनीचें रूप तरी मींच घेतलें होतें व कथा तरी माझीच आहे. मग ह्या दोघींत तूं भेद कोणता काढतोस? सारांश, मोहिनी व कथा ह्या दोघी भिन्न नसून मत्स्वरूप एकच आहेत, त्या दोघींत कांहीं भेद नाहीं. [यास दृष्टांत चवथ्या चरणांत दिला आहे.] ज्याप्रमाणें माणसें श्वेतवर्ण गंगेच्या किंवा नीलवर्ण यमुनेच्या प्रवाहांत स्नान केल्यानें सारखींच तरतात, (त्यांना कमी अधिक पुण्य लागत नाहीं तर सारखेंच लागतें.) तद्वत् कथा व मोहिनी या दोघी एकरूपच असून त्या भजकांना सारखींच फलें देतात. ५. भेद, भिन्नता. ६. कथा व मोहिनी या दोघींत. ७. सिता (श्वेत, पांढरी)+असिता (काळी)+अभिध (अभिधा=नांव)+नदी+सत् (चांगला)+ओघ (प्रवाह) त्यांत=सिता म्हणजे गंगा आणि असिता म्हणजे यमुना या नांवांच्या ज्या पवित्र नद्या त्यांच्या उत्तम प्रवाहांत. गंगेचें उदक शुभ्रवर्ण व यमुनेचें उदक कृष्णवर्ण किंवा नीलवर्ण आहे हें सुप्रसिद्ध आहे. हें पद लांब समासाचें सुरेख उदाहरण आहे. पुरवणी पहा. गंगायमुनांच्या उदकांचा वर्ण अनुक्रमें शुक्ल व कृष्ण असल्यामुळेंच त्यांच्या संगमाला पंतांनीं 'मंत्ररामायणां'त 'मिश्रितमुक्तामरकतमणिमयहारद्वयप्रभाचोर' असें म्हटलें आहे. [मंत्ररामायण-युद्धकांड–गी० ७९८.]

अहा ! बहु विशुद्ध [२]हे प्रभु ! तव स्वरूपाहुनी;
न भिन्नतनु[३] त्या; भले भजति, एकता[४] पाहुनि; ।
परंतु वदतों जनानुभव[५] नातळो[६] पाप गा !
तशी न यमुना गमे, जशि गमे निर्लिंपापगा. ॥ १०८

१. प्रास्ताविकः–मागल्या केकेंत गंगा व यमुना यांचा दाखला देऊन कथा व मोहिनी ह्या दोन्ही एकरूपच आहेत असें भगवंताचें म्हणणें सांगितलें तें आपल्यास मान्य नाहीं अशा अभिप्रायानें कवि अत्यंत नम्रतेनें या केकेंत म्हणतात. अहा !=आनंदप्रदर्शक उद्गार. अन्वयार्थः–अहा ! (काय सांगावें) प्रभु ! (प्रभो !) तव स्वरूपाहुनी (तुझें स्वरूप जें मोहिनी त्यापेक्षां) हे (ही कथा) बहु (फार) विशुद्ध (अत्यंत शुद्ध, विशेषेंकरून शुद्ध); त्या (गंगायमुना) भिन्नतनु (भिन्नशरीरिणी, निराळ्या) न (नाहींत) [तर] एकता (अभिन्नता, ऐक्य) पाहुनी भले (ज्ञाते सुज्ञ पुरुष) भजति (भजतात); परंतु जनानुभव (लोकांचा अनुभव) वदतो (सांगतो) गा ! (देवा !) पाप नातळो (स्पर्श न करो); [लोकांची समजूत अशी कीं] जशी निर्लिंपापगा (देवनदी, भागीरथी) गमे (गमते, समजली जाते, आवडते) तशी (त्याप्रमाणें) यमुना न गमे (गमते). प्रथमचरणार्थः—तुझें रूप जी मोहिनी तीपेक्षां भगवत्कथा अत्यंत निर्मल होय. २. ही (कथा). 'ही' स्तव 'हे' नमेंच 'ती' स्तव 'ते' योजण्याचा कविवृंदांना सर्वसंमत संप्रदाय आहे. ३. भिन्नशरीरिणी, वेगळाल्या. द्वितीयचरणार्थः–गंगायमुना ह्या निराळ्या नसून एकरूपच आहेत व म्हणूनच ज्ञाते पुरुष त्या दोघींची तुजशीं अभिन्नता समजून त्या दोघींनाही सारख्याच रीतीनें भजतात. गंगेपेक्षां यमुनेचें किंवा यमुनेपेक्षां गंगेचें माहात्म्य ते अधिक समजत नाहींत, तर त्यांची तुझ्याशीं एकरूपता पाहून दोघींचीही भक्ति ते सारखीच फलदायिनी समजतात. ४. ऐक्य, अभिन्नता. ५. लोकांचा अनुभव. तृतीयचरणार्थः–पण त्यांविषयीं लोकांची समजूत काय आहे ती मी सांगतों; पण ती सांगण्याबद्दल मला पाप मात्र न लागावें. ६. न आतळो, न स्पर्शो. ७. कवि जनानुभव कोणता हें चतुर्थचरणांत सांगतात. 'निर्लिंपाः देवाः' असें त्रिकांडशेषकोशांत प्रमाण आढळतें. निर्लिंप (देव)+आपगा (नदी)=सुरापगा, देवनदी, भागीरथी. चतुर्थचरणार्थः–लोकांना ज्याप्रमाणें देवनदी भागीरथी आवडते त्याप्रमाणें त्यांना यमुना आवडत नाहीं. गंगायमुना ह्या दोघींची योग्यता जरी समसमान असली तरी लोकांचें प्रेम भागीरथीवर जितकें आढळून येतें तितकें कांहीं यमुनेविषयीं नाहीं. त्याचप्रमाणें मोहिनी व भगवत्कथा ह्या दोघी वस्तुतः भगवंताचीं स्वरूपेंच होत तरी मोहिनीपेक्षां कथा चांगली–असें कवि म्हणतात. खुबीदार शब्दयोजनाः–'निर्लिंपापगा' हें पद फार खुबीदार आहे. भागीरथीला देवनदी म्हणण्यांत ती देवांनाही पूज्य आहे असें सुचविलें. यमुना असें साधेंच लिहून गंगेविषयीं बोलतांना मात्र देवनदी असा

## जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं जिचें नांदणें,

उल्लेख करण्यांत कवीनें चातुर्य दाखविलें आहे. **मोरोपंताचें कारकुनी लिहिणें**:—मोरोपंतांची भाषा त्यांच्या कारकुनी बाण्याप्रमाणेंच ऐटदार, पांचापेंचांनीं भरलेली, मार्मिक व प्रौढ असते असें त्यांच्या काव्यांचें मार्मिकपणानें परिशीलन करणाऱ्या वाचकांस दिसून येईल. यानीं केकावलींत पुष्कळ उदाहरणें आहेत. त्यांपैकीं प्रस्तुत केका ही एक उदाहरण होय. मोहिनी व कथा ह्या गंगायमुनांप्रमाणें एकरूपच आहेत असें भगवंताचें म्हणणें सांगून व ज्ञाते लोक गंगायमुनांना एकरूपच समजतात असें स्वतः त्याचें पुष्टीकरण करून कवि पुन्हा लगेच जनानुभव निराळ्या तऱ्हेचा आहे म्हणजे लोकांच्या मतें यमुनेपेक्षां गंगेचें माहात्म्य जास्त आहे असें सांगतात व फिरून लोकांचा अनुभव सांगण्याबद्दल आपणास पाप न लागावें म्हणून भगवंताची विनंतिही करितात. अशा रीतीनें प्रभूचें म्हणणें खुबीदार रीतीनें व त्यांना राग न येईल अशा तऱ्हेनें खंडन करण्यांत पंतांनीं आपली कारकुनाची वस्ताद्‌गिरी चांगली दाखविली आहे. पेशव्यांच्या दरबारचे मुत्सद्दी व सावकार बारामतीकर जोशी यांच्या पदरीं कारकुनी केलेल्या मयूरपंतांच्या काव्यांत असले मजेदार पांचपेंच व खाचाखोचा असणें हें अगदीं साहजिक आहे. त्यामुळें त्यांच्या काव्यांत पुष्कळ प्रौढता, गंभीरपणा व दरबारी ऐट हीं आलीं आहेत.

१. **प्रास्ताविकः—यमुनेहून भागीरथी अधिक पुण्यदायिनी होय असा लोकांचा समज आहे त्याचें समर्थन या केकेंत कवि करतात. त्रैलोक्याचा गुरु जो महेश्वर प्रभु (महादेव) त्याच्या मस्तकावर. खुबीदार शब्दयोजनाः**—गंगेचें श्रेष्ठत्व स्थापण्याकरितां कवीनें 'जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं' ह्या प्रथम पदाची योजना केली आहे. आधीं कोणाच्याही शिरावर नांदणें हा मोठा मान, प्रभुशिरीं नांदणें तर त्याच्याही पेक्षां मोठ्या योग्यतेचें, त्यांत तो प्रभु जगद्गुरु व साक्षात् महेश्वर असल्यावर मग योग्यतेला काय विचारावयाचें आहे. सारांश महादेवासारख्या जगद्गुरूच्या शिरावर नांदणारी भागीरथी निःसंशय अत्यंत मोठ्या योग्यतेची असली पाहिजे. **कथासंदर्भः**—हालाहलविष प्राशन केल्यामुळें झालेला संताप दूर करण्याकरितां त्रैलोक्यगुरु महादेव यानें आपल्या मस्तकावर चंद्र व गंगा धारण केली, गळ्यांत व बाहूंत सर्पमाळा धारण केल्या, अंगास विभूति चर्चिली, थंड अशा व्याघ्रचर्मावर आसन ठोकिलें व कंठाचे ठिकाणीं अहोरात्र रामनाम धारण केलें. शिवानें मस्तकीं गंगा धारण करण्याचें दुसरें कारण असें सांगितलें आहे कीं, जेव्हां आकाशांतून गंगा पृथ्वीवर उतरली तेव्हां तिचा प्रवाह इतका मोठा व जोराचा होता कीं, जर शिवानें मध्यें येऊन तिला आपल्या जटेत घेतलें नसतें तर पृथ्वी जलमय होऊन गेली असती. **गूढार्थः**—महादेवास महायोगी म्हणतात. महायोग्यास काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे षड्विकार जाळून त्याची राख आपल्या अंगास चर्चावी लागते. त्याची वसती ज्या ठिकाणीं ह्या षड्विकारांची चिता रात्रंदिवस पेटत आहे अशा पवित्र स्मशानांत असते. त्याचा तृतीय नेत्र अर्थात् ज्ञाननेत्र प्रगट झालेला असतो. तीव्रयोगसाधनार्थ व्याघ्रचर्माचेंच तो आसन करितो. गाढ निजलेली कुंडलिनी

तिच्या जळमळें तुळे न शरदिंदुचें चांदणें, ।
प्रजा हरिहरां अशा यदुदरीं अनेका; कवी

---

योगसाधनानें जागी झाल्यामुळें जेव्हां षड्चक्रांचें भेदन करूं लागते तेव्हां योग्यास प्राणांत वेदना होतात. तेव्हां ह्या हालाहल विषाच्या शमनार्थ तो मनाचा पुत्र चंद्र व सहस्रदळांतून उत्पन्न झालेली त्रिवेणी धारा (गंगा) हीं मस्तकीं धारण करितो. खेचऱ्यादि मुद्रा धारण केल्यामुळें सर्पभूषणें सहजच त्याच्या अंगावर शोभतात. २. **ज्या गंगेचें.** यांत कवीनें गंगेचें श्रेष्ठत्व स्थापित करण्याचा यत्न केला आहे. ३. **वसति, राहाणें, नांदणूक. अन्वयार्थः- 'जिचें (ज्या गंगेचें) नांदणें (राहणें) जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं (जगद्गुरु जो शंकर, त्याच्या डोक्यावर) [असे], जिच्या जळमळें (पाण्यावरील फेसाशीं) शरदिंदुचें (शरदृतूंतील) चांदणें न तुळे (तुळत नाहीं, बरोबरी पावत नाहीं), यदुदरीं (जिच्या उदरांत) हरिहरां अशा (विष्णु व शंकर यांसारख्या) अनेका प्रजा (पुष्कळ संतति) [आहेत]; कवी (ज्ञाते पुरुष) जशी सुधा (अमृत) तशी काकवी (राब) [असें] भिऊनि (राजाला किंवा इतर दुसऱ्या अधिकाऱ्याला भिऊन) कां म्हणतील (काय म्हणून अभिप्राय देतील)? प्रथमचरणार्थः-ज्या भागीरथीची योग्यता एवढी मोठी आहे कीं त्रैलोक्यपति महादेव यानें तिला बहुमानानें आपल्या मस्तकावर धारण केली आहे.**

१. जळावरील मळानें, जळावरील फेसानें. **द्वितीयचरणार्थः-शरदृतूंतील चांदणें फार स्वच्छ असतें; पण भागीरथीच्या उदकावरील फेसाची कांहीं त्याच्यानें बरोबरी करवत नाहीं. फेसाची बरोबरी करवत नाहीं मग जळाची बरोबरी कोठून होणार? गंगेच्या पाण्यावरील फेस सुद्धां शरदृतूंतील चांदण्यापेक्षां अधिक शुभ्र, मग पाणी अत्यंत शुभ्र असेल यांत नवल तें काय?** यांत **काव्यार्थापत्ति** अलंकाराची छटा **विरोधाभास** अलंकारांत मिसळल्यामुळें दुधांत साखर पडल्याप्रमाणें अलंकारांचा स्वाद वाढला आहे. २. **शरदृतूंतील चंद्राचें.** शरदृतूंत चांदणें स्फटिकासारखें किंवा दुधासारखें अत्यंत शुभ्र असतें. कालिदासानें राजाच्या कीर्तिपांडुरत्वाला 'शरच्चंद्रमरीचिवत्' म्हटलेलें आमच्या वाचकांस माहित असेलच. ३. **संतति. तृतीयचरणार्थः- ज्या गंगेच्या उदरांत शिवविष्णूसारखीं अनेक पराक्रमी मुलें आहेत. ज्यांचीं प्रेतें गंगेंत पडतात अथवा जे सर्वकाळ गंगेंत स्नान करितात ते सर्व शिवरूप किंवा विष्णुरूप होतात असें 'गंगामाहात्म्यां'त सांगितलें आहे.** पुढील अवतरण पहाः- (१) 'सुकवि म्हणति हरिहरता देसी तूं भलतशाहि देहरता.' । [गंगास्तुति-६४ पृ० ५२]. (२) ''तुवां केलें प्राणी हरिहर,' असें आयकविते । न मच्चित्ता वेडें करितिल कमें आइ! कवि ते.'' ॥ [मोरोपंत-गंगास्तव-५]. (३) 'मज्जन तव प्रवाहीं करितां, होतात हरिहर प्राणी.' [मोरोपंत-गंगास्तुति-गीति ४४]. (४) ''भक्तांसि करिसि हरिहर तूज म्हणति सिद्धि मग न कां 'जी जी''? [गंगास्तुति-गीति ७७ पृ० ५३]. (५) 'कैलासीं वैकुंठीं हरिहर तव तोय करुन दे वसती.' ॥१० [मोरोपंत-गंगाप्रार्थना] ४. **हरि (विष्णु), हर (शंकर) यांसारख्या.** ५. **यत्+उदरीं= जिच्या पोटांत, अर्थात् ज्या गंगेच्या पोटांत.** ६. **ज्ञाते, सुज्ञ पुरुष. प्रथम तीन चर-**

भिऊनि म्हणतील कां 'जशि सुधा तशी काकवी'? ॥ १०९

णांचा अर्थः-जिला त्रिभुवनपति शंकरानें आपल्या मस्तकीं धरिली आहे, जिचें उदक शरदृतूंतील चांदण्याप्रमाणें स्वच्छ, शुभ्र व शीतल आहे, जिच्या उदकांत स्नान केल्यानें प्राणी हरिहररूपें पावतात असा ज्या गंगेच्या महिमा तिची सर यमुनेला कोठून बरें येणार? यांत उदात्तालंकार झाला. 'सुसमृद्धिवर्णन तसें स्तुत्यचरित्रहि उदात्त अन्यांग; । ज्याच्या शिखरावरि तो झाला धूर्जटिकिरीटिरण सांग.' ॥ (अ० वि०). जेथें एखाद्या पराक्रमी राजाच्या ऐश्वर्याचें, पुण्यशील साधूचें किंवा भव्य वनश्रीचें वर्णन केलें असतें तेथें 'उदात्त' नामक अलंकार होतो. वरील उदाहरणांत 'स्तुत्यचरित्र' वर्णिलें असून ह्या केकेंत गंगेच्या समृद्धीचें वर्णन केलें आहे. प्रास्ताविकः-जेव्हां गंगा व यमुना या दोघींत गंगाच श्रेष्ठ असें सर्व सुज्ञ पुरुष म्हणतील अशा हेतूनें कवि म्हणतात. चतुर्थचरणार्थः-राजाला काकवी आवडते म्हणून निस्पृह असे शहाणे लोक सुधेप्रमाणें काकवी गोड असते असें कां म्हणतील? अर्थात् म्हणणार नाहींत. केकामाधुर्यः-राजानें अज्ञाणीपणानें किंवा आपल्याला फार आवडते म्हणून काकवीची अतोनात स्तुति करून ती अमृताप्रमाणें मधुर लागते असें म्हटलें म्हणून जसे स्पष्टवक्ते ज्ञाते पुरुष आपण राजाच्या म्हणण्यास मान डोलवीत नाहींत तर त्याचा आपल्यावर राग होईल अशी भीति मनांत न बाळगतां काकवी ती काकवी व सुधा ती सुधा, काकवीला सुधेची सर कदापि येणें नाहीं असा आपला स्पष्ट अभिप्राय देतील; त्याप्रमाणेंच समंजस लोक भगवंताला गंगायमुना दोघी सारख्याच आवडल्या म्हणून गंगेची योग्यता यमुनेला येईल असें म्हणणार नाहींत. यांतील वर्णन करण्याची कारकुनी व दरबारी पद्धत ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. दृष्टांत किती सरस आहे तो पहा. उपमेची समर्पकताः-काकवीसुधांचा दाखला देण्यांत कवीनें काकवीप्रमाणें यमुना कृष्णवर्ण व सुधेप्रमाणें भागीरथी श्वेतवर्ण असा आपला अभिप्राय दर्शविला आहे.

१. राब. उंसाच्या रसापासून गूळ करितांना मध्यें पाकावर जी मळी येते तिच्यापासूनच राब किंवा काकवी करितात. 'कवि भिऊनि म्हणतील कां जशि सुधा तशी काकवी' एवढें पद सुभाषितरूप होय. या सुभाषिताच्या समानार्थी दुसरें एक सुभाषित पंतांच्या काव्यांतून आढळतें. तेथेंही 'काकवी' ह्या शब्दाचा उपयोग केला आहे:-'त्यजुनि सुधा सुज्ञ रसिक सेवूनि न काय काकवी लाजे.' [ विश्वेशस्तुति-२१ पृ० ७८ ]. अलंकारसमुच्चयः-शरदिंदूचें चांदिणें हें फार शुभ्र अर्थात् निर्मळ होय. त्यास जिच्या जळमळाचीही सर नाहीं. येथें निर्मल पदार्थाहून प्रत्यक्ष मळही शुद्ध होय असा विरोधाभास अलंकार ध्वनित होतो. याचें लक्षण वगैरे के० ७ पृ० २३ यांत पाहावें. प्रत्यक्ष गंगेच्या जळाचा मळ हा शुभ्र असणार असा शुभ्रत्वार्थ घेतला असतां विरोधपरिहार होतो. विरोधाभासाची उदाहरणें:-(१) 'तो पात्र होय होउनि कठिणहृदयही पृथासुत नुतीतें.' । (मोरोपंत-महाप्रस्थानिकपर्व) केका ७ पृ० २३ पहा. (२) 'तों राजसुता पावे भी, उदया पावतां हिमकरातें। नच दैत्यसुता भीति मुख पसरुनि धांवतांहि मकरातें.' ॥ (हरि० अ० ३६ गी० ५५), (३) 'यच्चरितें सुजनांच्या हृदयीं अमृतेंचि, 'शत्रुच्या शल्यें । सद्विज, सामाल्क,

तुला[1] स्वयमुनेसवें[2], कुवलयद्युति[3]श्यामला!
म्हणाल जरि मोहिनी निजतनू, अवश्या मला[4];
तुलीन अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला[5]

सबळ तो भरतश्रेष्ठ पूजिला शल्यें.' ॥ (आदि १५. २१), (४) 'मातेसवें विमानीं बसतां मानी पुरास दव तारा; । न निवे, न फुले कोण प्रेक्षुनि त्या कापुरा सदवतारा.' ॥ (वन० १२.१३२). जलमलास शरदिंदूच्या चांदण्याची उपमा दिली आहे म्हणून **उपमा**लंकार होय. त्यांतच 'जळमळाची बरोबरी करवत नाहीं मग प्रत्यक्ष जळाची कोठून होणार?' असें ध्वनित करण्यांत **काव्यार्थापत्ती**चा मसाला पडला. 'जशी सुधा तशी काकवी कां म्हणतील?' अर्थात म्हणणार नाहींत. येथें **प्रश्नालंकार** आहे. कोठें सुधा आणि कोठें काकवी असा यांत भाव आहे म्हणून **विषमा**लंकारध्वनि आहे. गंगेची सर यमुनेला येते असें ज्ञाते म्हणणार नाहींत असें दाखविण्याकरितां चतुर्थचरणांत **'दृष्टांत'** योजिला आहे तसेंच येथें गंगेची समृद्धि वर्णिली असल्यामुळें **'उदात्त'** अलंकारही झाला आहे.

१. **तुलना करा.** प्रास्ताविकः 'या **गोष्टींत तुमचा माझा विभाग करूं तो असा कीं, मोहिनी आणि यमुना तुम्ही आपणाकडे घ्या; आणि कथा व गंगा मजकडे द्या. मग आपण बरोबरी पाहूं, अशा अभिप्रायानें कवि म्हणतो' ( केकादर्श ).** २. **आपल्या यमुनेबरोबर.** ३. **कुवलय ( नीलकमल ) त्याची द्युति ( कांति ) तिजप्रमाणें श्यामल ( नीलवर्ण ) अशा देवा!** 'नीलतोयदमध्यस्थाविद्युल्लेखेव भास्वरा । नीवारशुकवद्रूपं पीताभं सर्वकारणम् ' ॥ (याज्ञवल्क्य). **अन्वयार्थः–'कुवलयद्युतिश्यामला! ( नीलकमलवर्णा! देवा! ) जरि मोहिनी निजतनू ( आपलें शरीर, स्वरूप ) म्हणाल ( म्हणत असाल ) [ तरी ] अवश्या मला ( मला ती तुमचीच तनु असें म्हणावयाचें आहे, मोहिनी तुमची तनु हें मला अवश्य म्हणणें आहे ); [ती मोहिनी तुम्ही] स्वयमुनेसवें (आपल्या यमुनेबरोबर) तुला (तुलना करा). अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला (सुधासागरापासून उत्पन्न झालेलें जें श्वेतकमल त्याप्रमाणें शुभ्र अशी) कथा (भगवत्कथा) सुजन (साधुजन) जींत (ज्या कथेंत सुरधुनींत) विश्रामला (विश्रांति पावला) [अशा] सुरधुनीसवें (देवनदी–भागीरथीबरोबर) तुलीन (तुलना करीन.)' प्रथमार्धाचा अर्थः**–मोहिनी माझें शरीर किंवा मद्रूप आहे असें हे नीलकमलवर्ण देवा! तुमचें म्हणणें असेल तर तें मला मान्य आहे. जसा तुमचा वर्ण नील आहे तसाच मग मोहिनीचाही असेल म्हणून तुम्ही तिची आपल्या नीलवर्ण यमुनेशीं बरोबरी करा. **'कुवलयद्युतिश्यामला' हें पद मोहिनीचें विशेषण मानल्यासही चालेल.** ४. **माझें शरीर, मद्रूप.** भगवान् विष्णूंनींच मोहिनी अवतार घेतला होता तेव्हां मोहिनी तद्रूप उघड उघडच झाली. ५. **अमृतसागरापासून उत्पन्न झालेलें पुंडरीक (श्वेतकमल) त्याप्रमाणें अमला (शुद्धा, शुभ्रा) अशी (कथा). द्वितीयार्धाचा अर्थः–( देवा! तुम्हीं स्वस्वरूप जी मोहिनी तिची यमुनेबरोबर तुलना केली म्हणजे मग मी काय करीन? तर सुधासागरापासून उत्पन्न झालेल्या शुभ्र कमलाप्रमाणें स्वच्छ कीर्ति आहे जिची**

कथा सुरधुनीसवें, सुजन जींत विश्रामला. ॥ ११०
शुकोदित पुराण ज्या श्रवण सन्मुखें साग्रही,

**त्या भगवत्कथेची तुलना मी ज्या ठिकाणीं साधुजन विश्रांति पावतात अशा श्वेतवर्ण भागीरथीशीं करीन. केकासौंदर्यः**–कथेची भागीरथीशीं तुलना करण्याचें कारण भागीरथीचें उदक शुभ्रवर्ण असून कथेचें यश पुंडरीककमलाप्रमाणें अत्यंत शुभ्रच आहे. तें पुंडरीककमल तरी कोठलें ? तर अमृताच्या सागरापासून उत्पन्न झालेलें. अमृताचा वर्ण शुभ्र हें सुप्रसिद्धच आहे. तेव्हां अमृतसागरापासून निघालेलें कमल अत्यंत शुभ्र असेल यांत नवल काय ?

१. **विश्रांति पावला. गंगास्नानः**–साधु पुरुष गंगेंत स्नान केल्यानें सर्व दोषांपासून विमुक्त होऊन स्वच्छांतःकरण होतात. साधु पुरुष आपलें उत्तर वय गंगास्नानांत व काशीश्वरपूजनांत जावें अशी फार इच्छा करितात. कारण 'काश्यां तु मरणे मुक्तिः' हें सुप्रसिद्धच आहे. ह्यासंबंधीं पुढील उतारे वाचनीय आहेतः–'तिबरी तव प्रवाहचि, गंगे ! नासून ताप तीन; रते । ज्यांचें मन तव नीरीं, नच, सुख वासून, तापती नर ते.' ॥१८॥ [मो० गंगास्तुति–पृ० ४९]. गंगातटीं राहून नित्य स्नान करण्यापासून काय होतें:–'तुझ्या नीरीं नीरीं हृदय रमतें, दुःख शमतें, । यशोगानें पानें दुरित गळतें, विघ्न टळतें, ॥ कळी भंगे गंगे ! पडरि अुरती, दोष नुरती, । दिली गामें, नामें त-शिच जगतीला निजगती.' ॥ [मो० गंगास्तव २३–पृ० ६९]. म्हणूनच साधुजन ईश्वरापाशीं किंवा गंगेपाशीं पुढील मागणें मागतातः–'गळावा त्वत्तीरीं भगवति ! न हा देह सदनीं; । पडो गंगे ! तुझें, मरणसमयीं, तोय वदनीं ॥ विवेकीं यावें, जें धवलपण हेरंबरदनीं । भवीं हो स्वर्नेत्र प्रभुनयन नेत्रीं मदनीं. ॥' [गंगास्तव ९–पृष्ठ ६७]. मोरोपंतांनीं 'प्रांतप्रार्थने'त अशाच प्रकारचें मागणें केलें आहे. ते म्हणतातः—'त्रैलोक्यपावनत्वें, भगवज्जनमंडळीच गंगा हो ! । वास्तव, अंतीं माझ्या प्राप्त हिचें संनिधान अंगा हो. ॥ १४ ॥' [प्रांतप्रार्थना पृ. २७५ मो. स्फु. प्र. भाग १].

२. **प्रास्ताविकः–मागल्या केकेंत कवीनें कथेला गंगेची उपमा दिली पण वास्तविक कथेला कशाचीच उपमा देतां येत नाहीं, ती निरुपम आहे, असें प्रतिपादित होत्साते कवि म्हणतात. शुकानें सांगितलेलें.** शुक हा वेदव्यासाचा मुलगा असून हा अत्यंत भगवन्निष्ठ होता. ह्याची गणना भागवतोत्तमांत केली आहे. श्रीमद्भागवत दशमस्कंधांत ज्या महर्षींची भागवतोत्तमांत गणना केली आहे, त्यांचीं नांवें पंतांनीं आपल्या 'मंत्रभागवतां'त पुढीलप्रमाणें दिलीं आहेतः—'श्रीकंठ, नारदमुनि, प्राचेतस, शुक, पराशर, व्यास । नमिले भागवतोत्तम जे शर शिवले परा शरव्यास. ॥' [दशमस्कंध–गी० १]. परमभागवतांचीं नांवें 'पांडवगीते'त पुढीलप्रमाणें दिलीं आहेतः–'प्रल्हादनारदपराशरपुंडरीक– । व्यासांबरीषशुकशौनकभीष्मदाल्भ्यान् ॥ रुक्मांगदार्जुनवसिष्ठविभीषणादीन् । पुण्यानिमान्परमभागवतान् स्मरामि.' ॥ (बृहत्स्तोत्ररत्नाकर पृ० ३६६, 'पांडवगीता' १). तसेंच 'वैष्णवकुळनायक । नारदप्रल्हादसनकादिक । उद्धवअक्रूरश्रीशुक । वशिष्ठादिक निजभक्त' ॥ (एक. भाग १. १३५). **कथासंदर्भः**–मृगयेकरितां अरण्यांत संचार करणाऱ्या परिक्षिति राजानें ध्यानस्थ असलेल्या शमिक ऋषीच्या गळ्यांत मृतसर्प घातला. ऋषिपुत्र शृंगीनें परीक्षिति राजास 'तूं सात दिवसांनीं सर्पदंश होऊन मरण पावशील' असा शाप दिला. तेव्हां स्वदेहाचें अत्यंत सार्थक करूं इच्छिणाऱ्या

त्या परमवैराग्यशील राजास अवधूत वेषानें फिरणाऱ्या परमभागवत शुकाचार्यांनीं सात दिवसांत साग्र भागवत ऐकविलें. 'जो चिदाकाशींचा पूर्णचंद्र । जो योगज्ञाननरेंद्र । बोलता झाला शुकयोगींद्र । परिसता नरेंद्र परिक्षिती. ॥' एक. भाग. १.१८१).

**शुकोदित पुराण–भागवतपुराण. भागवताविषयींची संक्षिप्त माहितीः–**'यत्राधिकृत्य गायत्रीं वर्ण्यते धर्मविस्तरः । वृत्रासुरवधोपेतं तद्भागवतमुच्यते ॥ १ ॥ सारस्वतस्य कल्पस्य मध्ये ये स्युर्नरामराः । तद्वृत्तांतोद्भवं लोके तद्भागवतमुच्यते ॥ २ ॥ अष्टादश सहस्राणि पुराणं तत्प्रकीर्तितम् ।' (भावार्थ–ज्यांत धर्माचें विस्तारानें वर्णन केलें आहे, ज्याचा गायत्रीनें आरंभ होतो, ज्यांत वृत्रासुराचा वध वर्णिला आहे, ज्यांत सारस्वत कल्पांतील देव व मनुष्य यांचें वृत्त आहे, तें भागवतपुराण. त्यांत १८,००० श्लोक आहेत.) पुराणांच्या यादींत या पुराणाचें पांचवें स्थान आहे. पद्मपुराणांत मात्र भागवत हें सर्वपुराणांचें सार आहे. असें सांगून त्यास अठरावें स्थान दिलें आहे. ह्याचे बारा भाग आहेत. प्रत्येक भागास स्कंध असें नांव आहे. एकंदर अध्याय ३३२ आहेत. व्यासपुत्र शुकाचार्य यानें परीक्षिति राजास जें सांगितलें तेंच सूतानें नैमिषारण्यांतील ऋषींस सांगितलें आहे. मोरोपंतांनीं भागवताच्या आधारानें गीतिछंदांत मंत्रबद्ध रचना केली आहे. त्यांतील ग्रंथसंख्या ३५९२ आहे. भागवत ग्रंथाच्या रचनेविषयीं त्याच ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं प्रथम वेदव्यासानें वेदाची व्यवस्था लाविली व त्याचे चार भाग करून त्यानें ते पैलादि ऋषींस वांटून दिले. नंतर त्यानें ज्यास पंचमवेद ही संज्ञा आहे अशीं इतिहासपुराणें रचिलीं व तीं सूतपुत्र लोमहर्षण ह्याचे स्वाधीन केलीं. परंतु वरील ग्रंथही स्त्रीशूद्रादि अज्ञजनांस अप्राप्य जाणून त्यानें महाभारत रचिलें तथापि त्याचें मन स्वस्थ झालें नाहीं. पुढें तो एकदां चिंताग्रस्त होऊन सरस्वतीतटाकीं भ्रमण करित असतां त्यास गुरु नारद भेटले व त्यांनीं त्यास ज्यांत वासुदेवाच्या भक्तीविषयीं विशेष असेल अशा ग्रंथाची रचना कर म्हणजे तुझें मन स्वस्थ होईल असा उपदेश केला. त्यावरून त्यानें भागवत रचिलें. भागवत बोपदेवानें रचिलें असाही कांहींजणांचा समज आहे.

३. **पुराणाविषयीं अल्प माहितीः**--पुरातन अनेक युगांतील कथांच्या ग्रंथांना पुराणें म्हणतात. एकंदर पुराणें अठरा आहेत. 'स्त्रीशूद्रद्विजबंधूनां न वेदश्रवणं मतं । तेषामेव हितार्थाय पुराणानि कृतानि च' ॥ म्हणजे स्त्रिया, शूद्र व पतित ब्राह्मण यांना वेदश्रवण करणें विहित नसल्यामुळें त्यांच्या हितार्थ व्यासांनीं अठरा पुराणें केलीं असें 'देवीभागवत' पुराण स्कंध १ अ० ३ यांत सांगितलें आहे. तसेंच स्त्रिया व शूद्र यांना धर्मज्ञान व्हावें म्हणून पुराणें रचिलीं असें वेदभाष्यकार सायणाचार्य यांनीं लिहिलें आहे. त्यावरून पुराण ग्रंथांच्या रचनेचा उद्देश कळून येतो. प्रत्येक पुराणाचीं पांच लक्षणें अवश्य मानिलीं आहेत. तीं पांच लक्षणें अशीं:—'सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वंतराणि च । वंशानुचरितं चैव पुराणं पंचलक्षणं' (अमरकोश) (अर्थः–उत्पत्ति, पुनरुत्पत्ति, देवप्रजापतींचें वंशकथन, मन्वंतरवर्णन व सूर्यचंद्रवंशी राजांचा इतिहास हीं पांच लक्षणें असलेल्या ग्रंथांस पुराण म्हणावें.) पुराणांचीं नांवें पुढील श्लोकांत दिलीं आहेतः–'ब्रह्मांभोरुहविष्णुवायुभगवत्संज्ञं ततो नारदं । मार्कंडेयमथाग्निदैवतमिति प्रोक्तं भविष्योत्तरं ॥ तस्मात् ब्रह्मविवर्तसंज्ञमुदितं स्कंदं वराहं तथा । लैंगं वामनमत्स्यकूर्मगरुड-

ब्रह्मांडमष्टादश ॥' तसेंच 'देवीभागवत' पुराणांत पुराणनामांच्या प्रथमाक्षरांचा उल्लेख पुढील एका श्लोकांत केला आहे:–'मद्वयं भद्वयं चैव ब्रत्रयं वचतुष्टयं । नालिंपाग्नि पुराणानि कुस्कं गारुडमेव च ॥' या श्लोकावरून मुख्य पुराणांचीं खालील नांवें निघतात:–(दोन 'म') मत्स्य, मार्कंडेय, (दोन 'भ') भागवत, भविष्योत्तर, (तीन 'ब्र') ब्रह्म, ब्रह्मांड, ब्रह्मवैवर्त, (चार 'व') वामन, वायु, विष्णु, वराह, (नालिंपाग्नि) नारद, लिंग, पद्म, अग्नि, (कुस्कं) कूर्म, स्कंद, आणि (गारुड) गरुड. 'पुराणांचे वर्ग तीन रीतींनीं करितां येतात. पहिली रीति त्यांच्या विशालत्वलघुत्वावरून वर्ग करण्याची. दुसरी त्यांच्या आराध्यदैवतावरून वर्ग करण्याची. तिसरी त्यांच्या सत्वादि गुणावरून. पहिल्या रीतीनें पुराणांचे पुराणें व उपपुराणें असे भेद होतात. दुसऱ्या रीतीनें मुख्य पुराणांचे वैष्णव पुराणें, शैव पुराणें, शाक्त पुराणें व एतद्भिन्न पुराणें असे चार वर्ग होतात. तिसऱ्या रीतीनें मुख्यपुराणांचे सत्वगुणी, रजोगुणी व तमोगुणी असे तीन वर्ग होतात. सत्वगुणी पुराणांत विष्णूचें माहात्म्य फार असनें, रजोगुणी पुराणांत ब्रह्मदेवाचें विशेष वर्णन असून तमोगुणी पुराणांत शिवाचें माहात्म्य फार वर्णिलें आहे. श्रीमद्भागवतांत एकंदर पुराणसंहिता चार लक्ष सांगितली आहे. पुराणग्रंथांची सामान्य सरणी प्रायः प्रश्नोत्तररूपानें असते व विष्णु, शिव व शक्ति हींच पुराणांचीं मुख्य उपास्य दैवतें होत.' (जनार्दनपंत मोडकांचा निबंध.) वर अठरा पुराणांचीं नांवें सांगितलीं आहेत त्यांतल्या भागवत व वायुपुराणाच्या ऐवजीं कांहीं स्थळीं देवीभागवत व शिवपुराण ह्या दोहोंची योजना केलेली आढळते. पुराणांप्रमाणें उपपुराणेंही अठराच मानिलीं आहेत. तरी त्यांच्या नांवांत पुष्कळ फरक केलेला आढळतो. देवीभागवतांत उपपुराणांची यादी पुढीलप्रमाणें दिली आहे:–सनत्कुमार, नारसिंह, नारदीय, शिव, दुर्वास, कपिल, मानव, औशनस, वरुण, कालिका, सांब, नंदी, सौर, पाराशर, आदित्य, माहेश्वर, भागवत व वसिष्ठ. कित्येक ग्रंथकार यांतील वसिष्ठ, सांब, मानव व शिव या चार उपपुराणांचीं नांवें गाळून त्या जागीं गणेश, अंबिका, मारीच व मुद्गल हीं चार नांवें घालतात. पुराणग्रंथांतून पूर्व युगांतील पुष्कळ गोष्टी सांगितल्या असून त्यांत चातुर्यार्थ नवरसयुक्त अशा लाक्षणिक कथा पुष्कळच सांगितल्या आहेत.

८. **साधूच्या मुखानें.** अन्वयार्थः-ज्या (ज्या पुरुषाला) शुकोदित पुराण (शुकाचार्यानें परिक्षितीस सांगितलेलें भागवतपुराण) सन्मुखें (साधूच्या मुखानें) साग्रही (समग्र, संपूर्णही) श्रवण (श्रुत आलें), [तो] कथा (भगवत्कथा) अतुला (निरुपमा) म्हणेल आणि (कदाचित्) तो आग्रही (पक्षपाती) [असें तुम्ही] म्हणाल; मलाचि (मला मोरोपंतालाच) हे (ही कथा) निरुपमा (अनुपमेय) यशोमंडिता (पतितांचा उद्धार केल्यामुळें मिळणाऱ्या कीर्तीनें शोभित अशी) न गमे (वाटत नाहीं) [तर] गुरूसही (तुमचा गुरु जो सांदीपनी त्यालाही) [ती] [निरुपमा यशोमंडिता गमे], स्ववरदा (आपल्याला वर देणाऱ्या) महापंडिता (भक्तिज्ञानसंपन्न अशाला) [गुरूस] पुसा (विचारा). 'शुकोदित...कथा' याचा अर्थः-ज्यानें साधूच्या मुखानें श्रीमद्भागवत श्रवण केलें तो भगवत्कथा तुलनारहित आहे असाच उद्गार काढील. श्रीमद्भागवतांत भगवत्कथेचें माहात्म्य अतिशय सुरस वर्णिलें आहे. 'तें वाचण्यांत किंवा त्यांतील

म्हणेल 'अतुला कथा' म्हणि म्हणाल, 'तो आग्रही;'
न केवळ मलाचि हे निरुपमा, यशोमंडिता,
गुरूसहि गमे, पुसा स्ववरदा महापंडिता. ॥ १११

---

**मर्म जाणणाऱ्या सत्पुरुषाच्या मुखानें ऐकण्यांत आल्यावर कथेला मोल नाहीं असेच उद्गार सहृदय वाचकांच्या किंवा श्रोत्यांच्या मुखांतून निघतील.**

**१. कदाचित्. 'म्हणि म्हणाल तो आग्रही'=भगवत्कथा अनुपमेय आहे असें जो म्हणेल त्याला कदाचित् तुम्ही आग्रही (पक्षपाती) म्हणाल. भगवत्कथेची तो अवास्तव स्तुति करितो, असें देवा! तुम्ही म्हणाल; पण तसें नाहीं. तुम्ही कोणाही सत्पुरुषाला विचाराल तरी तो अशाच प्रकारचें आपलें मत देईल. मीच असें म्हणतों असें नाहीं. २. यशस्+मंडिता=यशः+मंडिता=यशोमंडिता=यशानें मंडित, कीर्तीनें भूषित. भगवत्कथा अनुपमेयः**–श्रीमत् भागवतग्रंथ हा व्यासानें भगवंताच्या गुणवर्णनाकरितांच मुद्दाम रचिला असल्यामुळें त्यांत हरिकथेचें माहात्म्य ठिकठिकाणीं अत्यंत सुरस असें वर्णिलें आहे. त्यांतील उगीच थोडासा मासला येथें दिला आहेः–(१) 'शृण्वतां स्वकथां कृष्णः पुण्यश्रवणकीर्तनः । हृद्यन्तःस्थो ह्यभद्राणि विधुनोति सुहृत्सताम्' ॥ (१.२.१७) (२) 'इदं हि पुंसस्तपसः श्रुतस्य वा स्विष्टस्य सूक्तस्य च बुद्धिदत्तयोः । अविच्युतोऽर्थः कविभिर्निरूपितो यदुत्तमश्लोकगुणानुवर्णनम् ॥' (१.५.२२) (३) 'तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहं । श्रवणमंगलं श्रीमदाततं भुवि गृणंति ते भूरिदा जनाः' ॥ (१०.३१.९) **द्वितीयार्धाचा अर्थः–भगवत्कथा मला एकट्यालाच उपमारहित व पतितोद्धार केल्यामुळें मिळालेल्या कीर्तीनें भूषित अशी भासते असें नाहीं तर तुमच्या सांदीपनी गुरूला देखील ती तशीच म्हणजे उपमारहित व यशोभूषित भासत होती. माझ्या म्हणण्याचा प्रत्यय घेणें असेल तर तुम्ही आपल्या गुरूलाच विचारा म्हणजे तत्काल खऱ्याखोट्याचा निवाडा होईल. ३. सांदीपनी ऋषीस देखील. कथासंदर्भः–सांदीपनी** हा काश्यपऋषीचा पुत्र अवंतीपुरींत राहत असे. बळराम व कृष्ण यांची मुंज झाल्यावर ते ह्या ऋषीजवळ राहून वेदशास्त्रोपनिषदादि सर्व विद्या व चतुःषष्टिकला शिकले व गुरुदक्षिणेबद्दल त्यांनीं गुरुपत्नीच्या सांगण्यावरून समुद्रांत बुडून मरण पावलेला गुरुपुत्र परत आणून दिला. गुरूच्या येथें रामकृष्ण राहात असतांना कुचैल अथवा सुदामा हा ब्राह्मण त्यांचा सहाध्यायी होता. तेथेंच भगवान् कृष्णाचें व त्याचें फार सख्य जडलें. पृ० १०७, टीप २ पहा. **४. आपल्याला वर देणाऱ्या. खुबीदार शब्दयोजनाः**–सांदीपनीच्या ठायीं देवा! तुमचा दृढ विश्वास होता व त्याची तुम्हीं एकनिष्ठपणें सेवा केली हें जाणूनच त्यानें तुम्हांवर कृपा केली व वरदान दिलें. तेव्हां त्याचें वचन तुम्ही मान्य करालच हें 'स्ववरदा' ह्यांतील स्वारस्य दिसतें. गुरूनें कृष्णाला जें वरदान दिलें त्याची माहिती 'कृष्णविजय'–अध्याय ८० गीति ६८-७१ यांत दिली आहे. तें असें:–'तुम्हांला वेदवेदांगें इच्छा होईल तेव्हां व तेथें स्फुरोत, तुमची कीर्ति मजपेक्षां हजारोंपटीनें चहूंकडे वाढो, तुमची कीर्ति पंडित गावोत इ०.' ह्या प्रसंगीं सांदीपनीनें कृष्णसुदाम्यास जो बोध

**प्रभो[१]! तुज न मोहिनी भुलवि[२]; मोहिला[३] तोहि ती**
**त्यजी जन; नव्हे तैशी[४], तुज तुझी कथा मोहिती[५]; ।**

सांगितला त्याचें वर्णन पंतांनीं मोठ्या चटकदार रीतीनें केलें आहे:–‘कर्मी वसा, नसो परमर्मी लोचन, असा दयाधर्मी, । नर्मीहि मृषोक्ति न यो, शर्मी नांदा, शिरा क्षमावर्मी. ॥’ [कृष्णविजय उत्तरार्ध–अ० ८० गी० ६९]. ५. **मोठ्या पंडिताला: वेदशास्त्रादि सर्व धर्मग्रंथांच्या परिशीलनानें ज्याची मति प्रबुद्ध झाली असून योग्यायोग्यविचार ज्याला उत्कृष्ट रीतीनें करितां येतो त्याला. येथें ‘पंडित’ याचा अर्थ मोठा भगवद्भक्त, परमभागवतोत्तम** असा करावा. **पंडित:**–‘पंडित’ शब्दाचा हाच अर्थ **पं**तांस ह्या स्थळीं इष्ट असावा असें **मंत्र**-भागवतांतील ‘पंडित’शब्दाच्या व्याख्येवरून दिसतें. ती व्याख्या अशी:–‘गलिताहंकृति, जाणे बंधा मोक्षासि, अनुभवीं चढला, । तो पंडित; इतर नव्हे जरि पुष्कळ सर्व शास्त्रही पढला. ॥’ [एकादश स्कंध–गी० ४००]. पंडित होण्यास प्रथम अहंकारानें पतन होऊन जीवाला बंधन व मोक्ष हे कसे प्राप्त होतात ह्याचें ज्ञान आलें पाहिजे; तसाच पुष्कळसा अनुभवही आला पाहिजे. केवळ सर्व शास्त्र पाठांतर झाल्यानें पंडितत्व येत नाहीं, ही गोष्ट किती बिनमोल आहे बरें!! भगवद्गीतेंत ‘पंडित’ शब्दाची व्याख्या वरच्यापेक्षां जरा निराळ्या तऱ्हेनी केली आहे. ती अशी:–‘आकृति कामसंकल्प आरंभी सर्व कर्म जो। ज्ञानाग्नीनें कर्म जाळी म्हणती तोचि पंडित.’ ॥ ४.१९ (वामनी समश्लोकी.)

१. **प्रास्ताविक:**–**या केकेंत कवि मोहिनीपेक्षां कथेच्या अंगचा एक विशेष गुण वर्णितात. २. भुलविते, मोहित करिते. अन्वयार्थ:–प्रभो! (देवा!) तुज (तुला) मोहिनी न भुलवि (भुलवीत नाहीं, मोहित करीत नाहीं); मोहिला (मोहित केला) तोहि (तो सुद्धां) जन (मनुष्य) ती त्यजी (त्याग करिते); तुझी कथा तशी नव्हे [आणि] [तुझी कथा] तुज (तुला, देवाला) मोहिती (मोहून टाकिते); तूं निजानुभव (स्वतःचा अनुभव) पहा (विचारांत घ्या); जशी महौषधी (उग्र वनस्पती) पारदा (पाऱ्याला) बळें (बळानें) स्थिर करी, [तशी कथा तुला बळें स्थिर करी], [असें] तुवां (त्वां) नारदा (नारदाला) कळविलें (सांगितलें). प्रथमार्धाचा अर्थ:–देवा! तुमच्या मोहिनी अवतारानें देवदैत्यांस भुलविलें खरें, पण तिनें तुम्हांला कधीं भुलविलें नाहीं. आणि ज्यांना तिनें भुलविलें (आपल्या नादीं लाविलें) त्यांचाही तिनें शेवटीं त्याग केला व त्यांपैकीं दैत्यांस तर तिनें अमृताची लालुच दाखवून शेवटीं फसविलें, अशी ती विश्वासघातकी होय. तुझी कथा तशी विश्वासघातकी नाहीं. ती ज्याला मोहित करिते त्याचा ती शेवटपर्यंत सांभाळ करिते, त्याग करीत नाहीं. व आपल्या भजनीं लागणाऱ्या मनुष्यांस ती अभीष्टप्राप्तीच करून देते. त्याशिवाय तुमची कथा तुम्हांला स्वतः मोहित करिते. ३. मोहित केलेला, भुलविलेला. ४. त्या प्रकारची, मोहिनीप्रमाणें. ५. मोहित करिते, वश करिते. भगवत्कथा भगवंताला तल्लीन करून सोडिते, भगवान् स्वकथाश्रवणानें अत्यंत संतुष्टचित्त होतात–हा अभिप्राय.**

निजानुभव[1] तूं पहा; जशि महौषधी[2] पारदा,[3]
तुला स्थिरबळें करी, कळविलें तुवां नारदा.[4] ॥ ११२

**१. स्वानुभव. द्वितीयार्धाचा अर्थः—स्वकथाश्रवणानें तुम्ही मोहित होतां किंवा नाहीं ह्याबद्दलचा तुम्ही आपला अनुभव सांगा. ज्याप्रमाणें अत्यंत चंचल पाऱ्याला महौषधी स्थिर करिते त्याप्रमाणें भगवान् अत्यंत चंचल, कोठेंही फार वेळ स्थिर न राहणारा असा असतांही भगवत्कथा त्याला स्थिर करिते. याला प्रमाण भगवद्वाक्यच. जेथें भगवत्कथाकीर्तन चाललें असतें तेथून माझ्याच्यानें मुळींच हालवत नाहीं इतकें माझें मन तेथें रमून जातें असें तुम्हीं आपणच नारदाला सांगितलें. स्वकथेविषयीं तुमची आसक्ति तुमच्याच म्हणण्यावरून सिद्ध होते. २. मोठी औषधी, पाऱ्याचें चंचलत्व नाहींसें करून टाकणारी वनस्पती.** कांहीं एका प्रकारच्या वनस्पतीचा रस पाऱ्याशीं मिश्रित केला असतां पाऱ्याचें चंचलत्व मोडतें हें सुप्रसिद्ध आहे. रसायनक्रियेंत पाऱ्याचा अस्थिरपणा घालविण्याकरितां वनस्पतींचा फार उपयोग करितात. त्या क्रियेला रासायनिक क्रियेंत पारा मारणें असें म्हणतात. **३. पाऱ्याला. भगवंताची स्वकथासक्तिः—**कोठेंही भगवद्गुणवर्णन चाललें असलें म्हणजे तेथें भगवंताची स्वारी हजर असते या गोष्टीस अनुलक्षून येथें कथा भगवंताला स्थिर करिते असें म्हटलें आहे. भगवंताचें मन कोठेंही रमत नाहीं पण तें कथेंत रमतें. रमेसारख्या सर्वगुणसंपन्न भार्येजवळ सुद्धां भगवान् फार वेळ बोलत बसत नाहींत, पण तेच हरिकथेंत नेहमीं हजर असावयाचेच असा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आहे. **व्यंग्यार्थः**—कोणच्याही उपायानें स्थिर न होणारें चंचल मन हरिकथेंत स्थिर होतें. प्रभु नेहमीं स्थिरच असून स्वभक्त पुंडलिकांच्या समोर ते नेहमीं अंतर्बाह्य स्थित असतात. परंतु भक्ताचें मन अत्यंत चंचल असल्यामुळें त्याच्या ते दृष्टिगोचर होत नाहींत. कथाप्रसंगीं जेव्हां दशेंद्रियें व मन प्रभूकडे लागतात तेव्हां 'अंतर्बहिश्च यत्सर्वं व्याप्य नारायणः स्थितः' ह्या गोष्टीचा भक्तास प्रत्यक्ष अनुभव येतो. स्वतःचें चंचल मन हरिकथाप्रसंगीं स्थिर होतें ह्या गोष्टीची भ्रांति (येथें ही भ्रांति काव्यसौंदर्यास्तव मुद्दाम आणिलेली आहे) होऊन लाखों कामें पाठीमागें असल्यामुळें जात्या अस्थिर प्रभु कथाप्रसंगीं मात्र स्थिर होतात असें भक्त वर्णन करितात. पुढील कथेंत हीच भ्रांति वर्णिली आहे व त्यामुळेंच काव्यरसपरिपाक समंग झाला आहे. पृ० १३४–१३५ यांतील 'काव्यांतील भ्रामक कल्पना व काव्यानंद' ही टीप पहा. **भगवंतांनीं नारदाला काय सांगितलें तें पुढल्या केकेंतच सांगितलें आहे. केकासौंदर्यः**—फार वेळ एका ठिकाणीं स्थिर न राहणाऱ्या नारदाला भगवंतांनीं आपली अस्थिर बुद्धि कोठें नष्ट होते तें सांगणें फारच योग्य. **४. प्रसिद्ध देवर्षि नारदमुनीला. कथासंदर्भः—** नारद हा प्रस्तुत 'वाराहकल्पाच्या' स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्मदेवांनीं जे दश मानसपुत्र उत्पन्न केले त्यांत दाहावा असून पित्याच्या मांडीपासून उत्पन्न झाला. 'ब्रह्मदेवाच्या शरीरापासून झालेला म्हणून नारद म्हणतात' अशी एक 'नारद' शब्दाची व्युत्पत्ति असून, 'जो पितरांना नार (पाणी) देतो तो नारद अशी दुसरीही व्युत्पत्ति पुराणांतून दिलेली आढळते. हा पूर्वकल्पीं अर्थात् पंचविसाव्या 'घोर' कल्पांत दासीपुत्र होता. याची माता ब्रह्मनिष्ठांच्या पदरीं दास्य करित होती. तेथें याला लहानपणींच सत्संग झाल्यामुळें भागवतधर्म व भगवत्कीर्ति यांचें श्रवण करण्याची

गोडी लागली. पुढें याची माता अकस्मात् सर्पदंशानें मरण पावली तेव्हां याच्या अंगांत अत्यंत वैराग्य बाणून हा लहान असतांही तपश्चर्या करण्याकरितां अरण्यांत निघून गेला. तेथें यानें उग्र तप करून भगवंतास प्रसन्न करून घेतलें. भगवंतांनीं याला हृदयाकाशांत दर्शन देऊन अन्यजन्मीं मी तुला प्रत्यक्ष भेटेन; तोंपर्यंत तूं माझी भक्ति करित अस असें सांगितलें. तेव्हांपासून ह्यानें मरेपर्यंत ईश्वराचीं नामें व चरित्रें गात व पृथ्वीवर संतुष्टमनानें संचार करित दिवस काढले. पुढें प्रस्तुत कल्पीं हा ब्रह्ममानस पुत्र झाला. ही कथा भागवत प्रथमस्कंध अध्याय ५-६ यांत स्वत: नारदानें व्यासाला सांगितली आहे. ['हरिवंश' नामक ग्रंथांत या देवर्षीचें वर्णन पुढील प्रमाणें केलें आहे:-याची शरीरकांति देदीप्य अग्नीप्रमाणें सतेज आहे, नेत्रांचें तेज बालार्कवत् आहे, मस्तकावर जटाभार बांधला असून, शरीर सुवर्णभूषित आहे, यानें कक्षेत एक मोठी वीणा बाळगली असून चंद्रकरप्रभ असें शुक्लवस्त्र परिधान केलें आहे, यानें कृष्णमृगचर्मानें आपली काया आच्छादिली असून हस्तांत दंडकमंडलु घेतले आहेत, ह्याच्या तेजावरून हा दुसरा इंद्रच कीं काय असा भास होतो, हा त्रिभुवनांतील गुप्तकलहांचा ज्ञाता असून स्कंदासारखा ब्रह्मचारी आहे, या देवर्षीस कलहप्रिय म्हणत असतात, हा विद्वान् असून गानकलेंत निपुण आहे, हा महादेवाचा मानसपुत्र असून जणूं काय अन्य कलीच आहे, हा देव व गंधर्वलोकांचा आदिवक्ता व मुनिसत्तम आहे, हा चतुर्वेदांचें पठण करणारा असून यज्ञांत मुख्य याज्ञिक याची स्तुति करितात, या महर्षीस नारद म्हणतात, हा चिरंजीव असून याचा ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोकांत अप्रतिहतसंचार आहे.] पुराणांतून नारद या नांवाचे अनेक ऋषि वर्णिले आहेत. त्या सर्वांत वर वर्णिलेला देवर्षि मुख्य होय. **नारदाचें अस्थिरत्व:**-दक्षप्रजापतीनें सृष्ट्युत्पत्ति करण्याकरितां जे सहाहजार पुत्र निर्माण केले त्यांना या नारदानें ब्रह्मोपदेश करून सृष्ट्युत्पत्तीच्या कार्यापासून पराङ्मुख केलें त्यामुळें एकाच ठिकाणीं फार वेळ तुझा संचार होणार नाहीं असा दक्षानें याला शाप दिला. त्यामुळें नारदाचें एकास्थळीं वास करणें केवळ कार्यापुरतेंच होत असून हा त्रैलोक्यांत अखंड भ्रमण करित असतो. असें आहे तरी भगवत्कथा चालली आहे अशा स्थळीं अस्थिर नारदाला भगवत्कथा चालू आहे तोंपर्यंत एकाच ठिकाणीं रमतां येत असे. तसेंच भगवदवताराच्या समीप ही नारदाला शापाची बाधा होत नसे. 'दक्षशाप न बाधी कृष्णापाशीं। म्हणोनि नारद वसे द्वारकेशीं'। (एका० भाग० अ० १ ओ० २७८). देवर्षि नारदाचें माहात्म्य पुढील तीन 'शिवलीलामृती' ओव्यांत श्रीधरस्वामीनें सुरस वर्णिलें आहे:-'वाल्मीक, सत्यवतीनंदन,। औत्तानपादि, कयाधुहृदयरत्न,। हे शिष्य ज्याचे त्रिभुवनीं जाण। वंद्य जे कां सर्वांतें. ॥ ११.१४६ ॥ जो चतु:षष्टिकळा प्रवीण निर्मळ। चतुर्दश विद्या करतळामळ। ज्याचें स्वरूप पाहतां केवळ। नारायण दुसरा कीं. ॥ १४७ ॥ हें कमलभवांड मोडोनि। पुन्हा सृष्टि करणार मागुतेनि। अन्याय विलोकितां नयनीं। दंडे नाडी शक्रादिकां. ॥ १४८ ॥' नवविधाभक्तिपैकीं नारदाची 'कीर्तन' भक्ति होती: 'परिक्षित् श्रवणं चक्रे, कीर्तनं नारद: शुक:,। स्मरणं शिवप्रल्हादौ, लक्ष्मीश्च पादसेवनं, ॥ २ ॥ अर्चनं पूजनं ध्यानं पृथुराजादिभि: कृतं,। वंदनं ह्युद्धवाक्रूरौ, दास्यं तार्क्ष्यहनूमतौ, ॥ ३ ॥ सख्यमर्जुनकर्तव्यं, बलेश्चात्मनिवेदनं;। भक्ति नवविधां कृत्वा कैवल्यं प्राप्यते परं.' ॥ ४ ॥ (कपिलगीता अ० ४)

सुरर्षिजवळीं स्वयें वदसि, 'तत्र तिष्ठामि;' या

१. **प्रास्ताविकः-माझी कथा मला स्थिर करिते असें जें मागल्या केकेंत भगवंतांनीं नारदास सांगितलें म्हणून वर्णिलें आहे त्याचें येथें स्पष्टीकरण करीत होत्साते कवि म्हणतात. देवर्षि नारदाजवळ. ऋषींचे वर्गः**-ऋषींचे सुरर्षि (देवर्षि), राजर्षि आणि ब्रह्मर्षि असे तीन प्रकार आहेत. देवर्षि, ब्रह्मर्षि आणि राजर्षि ह्या ऋषींच्या तीन प्रकारांशिवाय महर्षि, परमर्षि, श्रुतर्षि आणि कांडर्षि असे चार प्रकार आणखी कोणी मानतात. तेव्हां ऋषींचे एकंदर सात प्रकार होतात. भगवन्निष्ठ असून अध्यात्मविषयाची चर्चा करणाऱ्या जनकासारख्या क्षत्रियांस राजर्षि म्हणतात. परमार्थविषयाची अहोरात्र चर्चा करणाऱ्या ब्राह्मणांस ब्रह्मर्षि म्हणतात. उदाहरणार्थः-वशिष्ठवामदेवविश्वामित्रादि. ज्यांचा अधिकार मोठा असून ज्यांचें स्वर्गलोकीं गमन आहे अशा ब्रह्मनिष्ठांस सुरर्षि (देवर्षि) म्हणतात. नारद, अत्रि, भरद्वाज, मरीचि इत्यादिक सुरर्षि होत. २. **स्वतः. अन्वयार्थः-सुरर्षिजवळीं (नारदाजवळ) स्वयें (स्वतः, खुद्द) वदसि (म्हणालास) 'तत्र (तेथें) तिष्ठामि (उभा राहतों);' स्वामिया! (प्रभो!) या (ह्या) तुझ्याचि वचनें (तुझ्या स्वतःच्या वचनावरून) [मी] तुज (तुला) कथावश (कथेनें वश केलेला) म्हणें (म्हणतों); जसा तूं (प्रभु) कथेंत स्थिर (निश्चल) [असतोस] तसे या मना (कवीच्या मनाला)[कथेंत] स्थिर करी (कर); स्वभक्तसुरपादपा! (भक्ताला देववृक्षप्रमाणे इच्छिलें देणाऱ्या प्रभो!) हे (ही) [माझी] कामना सफल (फलयुक्त) असो. प्रथम-चरणार्थः-देवा! तुम्ही स्वतः नारदाजवळ-'मी तेथें उभा राहतों'-असें म्हणालांत. भगवंतानें नारदास** 'नाहं वसामि वैकुंठे. योगिनां हृदये, रवौ. । मद्भक्ता यत्र गायंति, **तत्र तिष्ठामि** नारद!' **मी वैकुंठांत राहत नाहीं, योग्यांच्या हृदयांत वसत नाहीं, सूर्य-मंडळांतही राहत नाहीं, तर जेथें माझे भक्त मद्गुणानुवाद वर्णन करितात त्या ठिकाणीं मी उभा असतों, असें म्हटलें आहे. यावरून 'तत्र तिष्ठामि' हे दोन शब्द भगवंताच्या वरील भाषणांतून घेतले आहेत असें स्पष्ट दिसून येईल म्हणून 'तत्र तिष्ठामि' तेथें उभा राहतों याचा अर्थ जेथें माझे भक्त मला सप्रेमांतःकरणानें गा-तात तेथें उभा राहतों असा होतो.** ३. **पाठभेदः**-याबद्दल 'म्हणसि' असाहि पाठ आढ-ळतो. ४. **तत्र तिष्ठामि-तेथें उभा राहतों. जेथें भगवज्जन माझे गुणानुवाद गातात त्या ठिकाणीं मी उभा राहतों. समानार्थक उतारेः**-तुकोबानाहि याच अर्थाचा एक अभंग आहेः-'माझे भक्त गाती जेथें । नारदा! मी उभा तेथें.' ॥ आमेंबवानें 'पांडुरंगदंडकां'तील पुढील गीती वाचाव्याः-'निश्चळ उभा निरंतर विठ्ठल निजनामगजर परिसाया: । मग तो स्वनामकीर्तननिरत सखा; जो तदन्य अरिसा या. ॥ १३. ॥ भक्तायशस्वयशातें गात्याच्या ठाकतो पुढें मागें; । डोलतसे परमसुखें; डोलावें सुस्वरें जसें नागें. ॥ १४ ॥ भीमरथीच्या तीरीं, किंवा भाविककथेंत वाळवटीं । तो निरखिला जनें, जो मार्कंडेयें मनोज्ञ बाळ वटीं. ॥ १७॥ जें प्रेमळकृतकीर्तन, रुचतें या प्रभुसि आठ यामहि तें । म्हणतों, सज्जन तारिति हे करुनि'अभंग पाठ या महितें. ॥ १८ ॥' [पांडुरंगदंडक-मो. स्फुट. भाग १ पृ० १३३]. ५. **ह्या. द्वितीय-चरणार्थः-तुम्हीं नारदाला सांगितलें त्याच्याच आधारावर मी तुम्ही कथेच्या आधीन आहां असें तुम्हांला म्हणतों.**

तुझ्याचि वचनें म्हणें तुज 'कथावश' स्वामिया ! ।
जसा स्थिर कथेंत तूं, स्थिर करी तसें या मना;

**१. कथेच्या स्वाधीन. देवाला प्रेमळ कथा फार आवडतेः–**(१) 'देवासि तो मुख्य कीर्तनाची गोडी । म्हणोनियां उडी घाली स्वयें. ॥ १ ॥ नावडे तया आणिक संकल्प । कीर्तनीं विकल्प करितां क्षोभे. ॥२॥ आवडे गाणें गाणें नाचताति रंगीं । प्रेम येतें अंगीं देवाचिया. ॥३॥ एका जनार्दनीं धांवे लवलाहें । न तो कांहीं पाहे आपणातें.' ॥४॥ (२) 'कीर्तनाची आवड मोठी । प्रेमें देव घाली मिठी. ॥१॥ कीर्तनप्रिय पैं गोविंद । आदरें पूजितो नारद. ॥२॥ कीर्तन करितां अभेद । आदरें रक्षिला प्रल्हाद. ॥३॥ गजेंद्र करी नामस्मरण । धांवण्या धांवे नारायण. ॥४॥ एका जनार्दनीं कळवळा । भक्तांलागीं देव भोळा.' ॥५॥ अर्थात् देवाला आवडणारी कथा सप्रेम पाहिजे. नाहींतर (तुकोबा म्हणतातः–) (३) 'प्रेमाविण जें जें केलें । निरर्थक वायां गेलें. ॥ १ ॥ मुखें करितो कीर्तन । मनीं विषयाचें ध्यान. ॥ २ ॥ केव्हां मरेल हे कथा । चित्त ठेविलें मन्मथा. ॥ ३ ॥ ऐसें श्रवण कीर्तन । गेलें ओहोळीं वाहोन. ॥ ४ ॥ तुका म्हणे पांडुरंग । जाणतसे अंतरंग.' ॥ ५ ॥ प्रेमळ कथा कशी असावी त्याविषयीं तुकोबा सांगतातः– (४) 'सत्याचें शरीर गावाचें कीर्तन । प्रेम अनावर उसळे तेथें. ॥ १ ॥ आंदोळे मृदंग अंगाची टाळी । प्रेमाची आरोळी हरिनामें. ॥ २ ॥ सप्रेमाच्या वीणा निःसंगाच्या तारा । आणिका दरारा पातकांसी. ॥ ३ ॥ जगज्जीवन योगियांचा राणा । ध्यानीं मनीं आणा तुका म्हणे.' ॥ ४ ॥ **२. निश्चल. तृतीयचरणार्थः–देवा! आपण जसे कथेंत स्थिर असतां तद्वत् या मनाला तुम्ही स्थिर करा. तुम्ही जसे कथा सोडून दुसरीकडे कोठें जात नाहीं, त्याप्रमाणेंच माझ्या चंचल मनाला तुम्ही भगवत्कथेंत निश्चल करा. 'मनास निश्चल करा' हें मागणें फार मोठें आहे. मनाची स्थिरताः–**मनाला स्थिर करणें हें दुःसाध्य काम आहे. भगवद्गीतेंत अर्जुनानें म्हटलें आहेः–'कीं कृष्णा! चंचळ मन इंद्रियें जें मथी बळी । त्याचा निग्रह वाऱ्याची मोट जैशी न बांधवे.' ॥६.३४॥ (वामनी समश्लोकी.) योगवासिष्ठांत म्हटलें आहेः–'अप्यब्धिपानान्महतः सुमेरून्मूलनादपि । अपि वह्न्यशनात्साधो! दुर्लभश्चित्तनिग्रहः.' ॥ म्हणूनच तुकोबा सांगतातः–'आधीं मन घेईं हातीं । तोचि गणराज गणपति. ॥ १ ॥ मन इंद्रियांचा राजा । त्याची सर्वभावें पूजा. ॥ २ ॥ मन जीवाचा प्रधान । मन साक्षी नारायण. ॥ ३ ॥ तुका म्हणे मन चंचळ । हातीं येईल गुरूच्या बळें.' ॥ ४ ॥ मन स्थिर करून स्वरूपीं लाविलें म्हणजे ब्रह्मप्राप्ति होते. कारण विवेकवैराग्यादिसाधनचतुष्टयसंपन्नपुरुषानें ॐकार ह्या धनुष्याला जर मनाचा बाण लाविला व त्यानें तो ब्रह्मनिशाणावर रोखून नेमका सोडला म्हणजे तो ब्रह्मनिशाणावर अचुक जाऊन लागतो व अर्थातच मन ब्रह्ममय होतें असें श्रुतींत सांगितलें आहे. सारांश ह्या संकल्पविकल्पात्मक मनाचा सर्व विकार काढून तें स्वरूपाचे ठिकाणीं स्थिर केलें म्हणजे प्राणी कृतार्थ होतो. 'मनमें गंगा मनमें काशी मनमें स्नान करे । हमारो तीरथ कौन करे'? असें संत कबीर म्हणूनच म्हणतात. **कीर्तनाविषयीं पंतांचें प्रेमः–**भगवत्कथाकीर्तनाविषयीं आपल्याला अत्यंत आसक्ति असावी असा वर पंतांनीं पुष्कळ ठिकाणीं मोठ्या आवडीनें देवापाशीं मागितला आहे. 'सन्मनोरथराजी'तल्या अशा पुष्कळ गीतींपैकीं पुढील थोड्याच गीती पहाः–

स्वभक्तसुरपादपा! सफळ हे असो कामना. ॥ ११३

सुरर्षि म्हणतो, 'तुझें यशचि धन्य; यो गायना

(१) 'निश्चय करुनि, न मागें तिळही ठेवी पतिव्रता चरण, । भगवद्भजनीं माझी तैसीच करू मति व्रताचरण. ॥ ३० ॥ (२) हरिकीर्तनीं शिरावें, धनिकगृहीं जेंवि जपुनि चोरानें, । न उठावें बहु- कार्यें, बहुभारें जेंवि कुंचर ढोरानें. ॥३५॥ (३) म्यां कीर्तना टपावें, मार्जारें सर्वदा जसें दुग्धा ॥ ॥३८॥ (४) कीर्तन असो मतिस बहुमत, जैसें स्त्रीस हळदकुंकु तरी; ॥४३॥ (५) आवड असो कथेची, जशि बाळा फाल्गुनांत पुनवेची. ॥ ४७ ॥ (६) ज्यांत न हरि-हरिजन-यश ऐसें जें काय कीर्तनीं गान । तें अलवण भोजनसें नच सेवुत आर्तबाळसे कान.' ॥ ५४ ॥

१. **आपल्या भक्तांच्या कल्पवृक्षा! सुरपादप=देवद्रुम, कल्पतरु. भक्तकामकल्पद्रुम प्रभो! व्यु०**:–पादैः (मूलैः) पिबति स पादपः, जो मुळांनीं रस शोषण करितो तो पादप (वृक्ष). **चतुर्थचरणार्थः–देवा! तूं भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा आहेस तेव्हां भगवत्कथेंत माझें मन तुजप्रमाणेंच अत्यंत स्थिर होवो अशी जी मी आपणांस प्रार्थना केली आहे ती पूर्ण करणें तुमच्याकडेच आहे. म्हणून तुम्ही मजवर दया करून माझी एवढी इच्छा पूर्ण करा.** 'स्वभक्तसुरपादप' हें पद साभिप्राय आहे म्हणून हा **परिकर** अलंकार होय. [मागें पृ० ३ टीप ३ पहा.] २. **फलयुक्त, परिपूर्ण.** ३. **इच्छा, वासना.** ४. **प्रास्ताविकः–भगवत्कथेचा महिमा जाणून नारद सदा भगवद्गुणगायनांत निमग्न असतो असें कवि यांत सांगतात.** अन्वयार्थः–**सुरर्षि (देवर्षि नारद) म्हणतोः– तुझें (भगवंताचें) यशचि (कीर्तिच) धन्य (मंगलप्रद, कल्याणकारक); मला (नारदाला) गायना (गाण्याकरितां किंवा गाणाऱ्यास) यो (येवो); ते कवि (ज्ञानी पुरुष) अन्ययोगायना (भगवद्गुणांहून इतर जे योगमार्ग त्यांना) सुखद (सुख देणारे) म्हणोत; तो (नारद) तदितरें (भगवद्गुणकीर्तनाहून दुसरीं) विमुक्तिबहु- साधनें (मोक्षप्राप्तीचीं पुष्कळ साधनें) गणीनाच (तुच्छ मानतो); [आणि] वरवल्लकी (श्रेष्ठवीणा, अर्थात् ब्रह्मवीणा) सजूनि (सजवून) [मग] तव (तुझ्या, भगवंताच्या) सभांगणीं (सभांगणांत, भगवंताच्या मंदिरापुढें) नाचतो (नृत्य करितो). प्रथमार्धाचा अर्थः–देवर्षि म्हणतातः–भगवंताची कीर्तिच केवळ कल्याणप्रद आहे म्हणून ती माझ्या गाण्यांत येवो, वशिष्ठवामदेवादि इतर ज्ञानी पुरुष भगवद्गुणांहून इतर जे योगमार्ग किंवा योगसाधनोपाय ते सुख देणारे आहेत असें पाहिजे असल्यास म्हणोत. सनकसनंदनादि ज्ञानी पुरुषांनीं जरि अन्य योगसाधनें हीं कैवल्य- प्राप्तीचीं साधनें आहेत असें समजून भगवत्प्राप्त्यर्थ त्यांचा आश्रय केला, तथापि नारदाच्या मतें भगवद्गुणवर्णनच अत्यंत श्रेयस्कर असल्यामुळें तेंच आपल्या गाण्यां- तून नेहमीं यावें अशी त्याची इच्छा.** ५. **कीर्तिच, भगवद्गुणवर्णनच. व्यु०**:–'अश्नोति इति यशः'=जें चहूंकडे पसरतें तें यश=(कीर्ति). ६. **येवो. व्या०**:–'यो' हें महाराष्ट्रभाषेंत 'ये' या धातूचें केवळ ग्राम्यरूप आहे. ह्याचीं उदाहरणें पंतांच्या व इतर कवींच्या काव्यांतून पुष्कळच आढळतातः—(१) 'असुरेंद्र म्हणे हंसी! त्वरितचि **यो** भद्रनट पुरांत, नया' । [हरिवंश–अ०

मला; कवि[१] म्हणोत ते सुखद अन्ययोगायना[२].' ।

३५ गी० १२], (२) 'प्रेमोपायन घेउनि भेटाया धन्य यो, गया गमला.' । [भागवत एकादश–गी० २८७], (३) 'मागें वरुण, पुढें हरि, उजवा यम, आणि यो धनद डावा.' । [गदापर्व–अ० १ गी० २५.] ७. गाणाऱ्यास. व्या०:–गै+अन्=गायन. अन् प्रत्यय अकर्मधातूस लागून कर्तृत्ववाचक शब्द उत्पन्न होतात. जसें:–ज्वलन (जाळणारा), मंडन (शोभविणारा) इ०. 'गायना' म्हणजे 'गाण्याकरितां' असाही अर्थ केल्यास प्रशस्त. नारदाच्या मतें भगवद्गुणवर्णन करून भगवत्प्राप्ति करून घेण्याचा भक्तिमार्ग इंद्रियांचा निरोध करून तद्वारा ईश-प्राप्ति करून देणाऱ्या योगमार्गापेक्षां निःसंशय श्रेष्ठ होय.

१. जे म्हणणार असतील ते; किंवा प्रसिद्ध वशिष्ठवामदेवादि ऋषिवर्य. २. अन्य (इतर)+योग+अयना (स्थाना, मार्गाला)=इतर योगसाधनास किंवा योगमार्गास. योगाविषयीं संक्षिप्त विवेचनः–'चित्तवृत्तींचा निरोध करून चित्त स्वतःमध्यें लय करून द्रष्टा जेव्हां स्वरूपानुभवांतच निमग्न होऊन राहातो तेव्हां त्या स्थितीस योग म्हणतात' अशी योगशास्त्राचे मुख्य प्रवर्तक जे महर्षि पतंजली ह्यांनी योगाची व्याख्या केली आहे. योगाचीं अंगें आठ आहेत:–यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा व समाधि. 'दुसऱ्याला पीडा न देणें, सत्यभाषण, परवस्तूचा अभिलाष न धरणें, वीर्यरक्षण करणें, व पंचभोगांकडे लक्ष्य जाऊं न देणें' ह्याला 'यम' म्हणतात. 'अंतर्बाह्य पवित्रता, संतोष, (चित्तशुद्धि करणारीं कर्में करणें) तप, पवित्र मंत्रांचें व अध्यात्मग्रंथांचें पठण करणें, व ईश्वरपूजन' ह्याला 'नियम' म्हणतात. 'यम, नियम'हीं दोन अंगें मिळून वैराग्यकला होते. तिसरें अंग 'आसन.' श्वास (आंत घेण्याचा वायु) व प्रश्वास (बाहेर सोडण्याचा वायु) यांची गति स्थिर करणें ह्याला 'प्राणायाम' म्हणतात. हें योगाचें चवथें अंग. 'आसन' व 'प्राणायाम' मिळून अभ्यासकला होते. 'चित्ताचा आत्मस्वरूपीं लय करून इंद्रियांचें लक्ष्य विषयांपासून मागें परतवून तें आत्मस्वरूपीं लीन झालेल्या चित्ताकडे लावणें' याला 'प्रत्याहार' म्हणतात. 'चित्ताला कोणत्याही स्थानीं बांधून ठेवणें' ह्याला धारणा म्हणतात. 'या धारणेचा एकसारखा जो अनुभव' त्याला ध्यान म्हणतात. 'धारणा आणि ध्यान यांचे संबंधानें मनाचा लय होऊन त्या वेळेस दुसऱ्या कशाचाही अनुभव न होणें' याला समाधि म्हणतात. 'धारणा, ध्यान व समाधि' या तिहींना एकत्र मिळून संयम म्हणतात. 'प्रत्याहार, ध्यान, धारणा व समाधि हीं चार अंगें मिळून समाधिकला होते. समाधिकला व वैराग्यकला मिळून राजयोग होतो. अभ्यासकलेला हठयोग म्हणतात. 'ह' म्हणजे सूर्य व 'ठ' म्हणजे चंद्र या दोन नाड्यांतून वाहाणाऱ्या वायूंचा (प्राण व अपान यांचा) प्राणायामांत योग करावा लागतो म्हणून 'हठयोग' हें नांव पडलें आहे. हठप्रदीपिकेंत 'आसन, कुंभक, मुद्रा व नादानुसंधान' अशीं हठयोगाचीं चार अंगें सांगितलीं आहेत. हठयोगांत चवऱ्यायशीं आसनें सांगितलीं असून त्यांतलीं अठरा मुख्य आसनें हठप्रदीपिकेंत सांगितलीं आहेत. त्या अठरांतही सिद्धासन मुख्य समजतात. 'वाम पायाचा तळवा गुदाच्या आणि उपस्थाच्या मध्यप्रदेशीं ठेवून दक्षिण पाय शिश्नावर घ्यावा आणि हनुवटी होईल तितकी छातीवर ठेवून व

इंद्रियें विषयांपासून परावृत्त करून दोन्ही भिवयांच्या मध्यें दृष्टि ठेवून राहाणें याला मोक्षद्वार-कपाट उघडणारें सिद्धासन म्हणतात.' (हठप्रदीपिका) 'ज्ञानेश्वरी'त गुद व लिंग यांच्यामधील शिवण उजव्या पायाच्या टांचेनें दाबून त्यावर डावा पाय ठेवण्याचें वज्रासन प्रशस्त म्हणून सांगितलें आहे. वरील दोन्ही आसनांत 'मूलबंध' साधतो. (पायाच्या खोटेनें गुद व लिंग यांज-मधील शिवण जोरानें दाबून गुदाचें आकुंचन करणें व अशा रीतीनें 'अपान' वायूचें अधोगमन बंद करून त्याला ऊर्ध्वगमनी करणें ह्यालाच 'मूलबंध' म्हणतात.) आसनानंतर प्राणायाम करितात. 'पूरक, कुंभक, रेचक' अशीं प्राणायामाचीं तीन अंगें आहेत. बाहेरचा वायु नासिकाद्वारें हळुहळु आंत ओढण्याच्या क्रियेस 'पूरक' (भरणें, पूर्ण करणें) म्हणतात. तो वायु बाहेर जाऊं न देतां मस्तकरूपी कुंभांत सांठवून ठेवणें ह्याला 'कुंभक' म्हणतात. नंतर त्या कोंडलेल्या वायूस हळुहळु नासिकाद्वारें बाहेर सोडणें ह्याला 'रेचक' (सोडणें) म्हणतात. आठ मात्रांनीं पूरक केला तर बत्तीस मात्रांपर्यंत कुंभक करावा व मग सोळा मात्रांनीं रेचक करावा असें क्षुरिकोपनिषद्दीपिकेंत नारा-यण सांगतात. सुमारें साडेबारा सेकंड पूरक करून पन्नास सेकंड कुंभक करावा व मग पंचवीस सेकंड रेचक करावा असें केलें म्हणजे तो कनिष्ठप्रतीचा प्राणायाम होतो. प्राणायामाची बारापट झाली म्हणजे त्याला 'प्रत्याहार' म्हणतात. प्रत्याहाराची बारापट झाली म्हणजे 'धारणा' होते. म्हणजे धारणेंत साडेदोन तास प्राणाचा अवरोध होतो. धारणेची बारापट झाली म्हणजे 'ध्यान' होतें. अर्थात् अहोरात्र (२४ तास) मस्तकांत श्वास कोंडून राहिला म्हणजे त्याला 'ध्यान' म्हणतात. ध्यानाची बारापट केली म्हणजे एक 'समाधि' होते. यावरून बारा दिवसांचा समाधि-काल ठरतो. योग करणाऱ्यानें प्रथम 'यम' 'नियम' साधून मग चैलाजिनकुशांचें पवित्र जागेंत आसन मांडावें. नंतर त्यावर सिद्धासन किंवा वज्रासन घालून मूलबंध साधावा. पुढें नाभीच्या ठिकाणीं कोंडलेला वायु उड्डियान बंध साधून 'सोहं' मंत्रोच्चार करित वर ओढावा. (नाभीच्या वरच्या उदरप्रदेशास पश्चिमताण देणें म्हणजे त्याचें पाठीकडे आकर्षण करणें ह्या क्रियेला उड्डि-यानबंध म्हणतात.) तसेंच कंठ आकुंचित करून मान न वांकवितां हनुवटी हृदयाच्या ठेवेल तितकी जवळ ठेवून जालंधर बंध साधावा. दृष्टि अर्धोन्मीलित करून नासिकाग्रीं ठेवावी किंवा दृष्टि ऊर्ध्व करून (बुबुळें वर करून) भ्रूमध्यस्थानीं एकाग्रतेनें लक्ष्य लावावें. तसेंच पूर्वोक्त रीतीनें प्राणायाम करून, 'ॐकाराचें, 'सोहं' मंत्राचें किंवा इतर गुरूपदिष्ट मंत्राचें मनन करावें व आपल्या आराध्य देवतेच्या मोहरीच्या आठव्या हिश्श्याएवढ्या बारीक सावयव मूर्तीचें ध्यान करावें. याविषयीं 'नीलतोयदमध्यस्था विद्युल्लेखेव भास्वरा। नीवारशूकवत् तन्वी पीता भास्व-त्यणूपमा' ॥ (नीलमेघस्थ विजेप्रमाणें प्रकाशमान, पिवळी, ठिणगीएवढी व धानाच्या शेंड्याच्या अग्राएवढी बारीक अशी प्रभूची मूर्ति आहे.) असा उपनिषदाचा आधार आहे. आराध्यदेवतेच्या अतिसूक्ष्म मूर्तीच्या ध्यानाऐवजीं षण्मुखी मुद्रा साधून, व बुबुळें वर चढवून भ्रूमध्यस्थानीं एकाग्र चित्त करून, मस्तकांत ब्रह्मरंध्राचे ठिकाणीं सुवर्णकमळांतर्गत नीलाकाशगुहेंत प्रकाशमान होणाऱ्या 'सवितृदेवाच्या वरेण्य भर्गाचें' ध्यान करितां आलें तर अत्युत्तमच. ['मुखनासाक्षिकर्णांतान् अंगु-लीभिर्निरोधयेत् । तत्वोदयमिति ज्ञेयं षण्मुखीकरणं प्रियं ॥' (शिवस्वरोदय ३८२). मुख, नाकपु-ड्या, डोळे व कान ह्यांना दोन्ही हातांच्या बोटांनीं दाबणें ह्याला तत्वोदय करणारें 'षण्मुखी-

## कुंडलिनीचा पश्चिममार्गप्रवास व षट्चक्रभेदन.

प्राणापानांची मिळणी । शक्ति चेतवी **कुंडलिनी** ॥ १ ॥
ती आधारशक्ति अपार । चढे पश्चिमेचा घाट ॥ २ ॥
कुंडलिनी चालतां वाट । सुकला अभिप्रायांचा हाट ॥ ३ ॥
साधितां उल्हादशक्ति उलट । उघडलें अगम्यकपाट ॥ ४ ॥
शरीराकारें ते ओळिली । **एकाजनार्दनीं** पुरली. ॥ ५ ॥



## सहस्रदल अथवा पंढरपुर; व गुरु अथवा पांडुरंग.

पंढरीस कोणी तरी जा रे । विठोबा पहा रे ॥ ध्रु० ॥ ओट हातांवर विठोबा उभा । मध्यें सुनीळाची प्रभा । कोटि मदनांचा गाभा । सांगे तो रे ॥ १ ॥ विठोबा उभा ना बैसला । जिकडे तिकडे कोंदाटला । अवघा घनानंद भरियला । ज्याचा तो रे ॥ २ ॥ हातीं धरूनि सद्गुरूचिठ्ठी । उघडुनि अंतरींची निजपेटी । स्थूळ, सूक्ष्म, कारण पाठीं । तूर्या पहा रे ॥ ३ ॥ घेउनि तूर्येचा अनुभव । अंतःकरण शोधित जावें । मी कोण कोठिल हा आहों । विचारूनि पहा रे ॥ ४ ॥ दुर्बुद्धि ते दूर करा । सांडुनि अविद्येचा थारा । तुका ह्मणे देहतंबुरा । हातीं घ्या रे. ॥ ५ ॥

करण' म्हणतात.] वरील प्रकारच्या ध्यानांनीं 'अनाहत' ध्वनि उसळून समाधि लवकर लागते. **कुंडलिनीः**—नाभीच्या खालीं 'कुंडलिनी' नांवाची एक सर्पाकार शक्ति साडेतीन वेटाळीं घालून बसली आहे. मूलबंधपूर्वक आसन साधलें म्हणजे गुदद्वारांतून जाणारा 'अपान'वायु खालून जाण्याचा बंद होऊन गुदस्थानाजवळ असणाऱ्या 'मूलाधार' चक्राजवळून लिंगस्थानाजवळ असणाऱ्या 'स्वाधिष्ठान' चक्राच्या द्वारें जाऊन नाभिस्थानाखालीं स्वस्थ झोंप घेणाऱ्या 'कुंडलिनी'च्या अंगावर आपटतो. उड्डियान बंधानें खालचा वायु वर खेंचण्यास तसेंच कुंभक करून प्राणवायु नाभीच्या खालीं ढकलण्यास आरंभ केला म्हणजे नाभिस्थानीं असणाऱ्या मणिपुर चक्राच्या खालीं, व भ्रूमध्यापासून नाभिस्थानापर्यंत गेलेल्या सुषुम्नानाडीच्या द्वाराशीं निजलेली कुंडलिनी एकाएकीं जागृत होऊन आपलें वेटाळें हळूहळू उकलावयास लागून कांहीं काळानें सरळ होते. त्या वेळीं सुषुम्नेचें द्वार मोकळें होऊन आजपर्यंत परस्परांशीं उभा दावा करणारे पण आतां सख्य झाल्यामुळें एक झालेले प्राण व अपान हे दोघे वायु सुषुम्नेंत गेल्यामुळें व इडापिंगलांशीं त्यांचा वियोग झाल्यामुळें योग्यास मरणप्राय दुःख होतें. 'कुंडलिनी' सर्पाण जागी झाली म्हणजे ती हृदयकमलाखालीं असलेला वायु पिऊन अस्थि, शिरा, मांस यांनीं सत्त्व शोषते, नासिकेबाहेर जाणाऱ्या प्राणवायूला अधोगामिनी करिते, अधोगमनी अपानाला ऊर्ध्वगामी करिते व षट्चक्रांचा भेद करिते. योग्यांनी आपल्या शरीरांत पिंडांत (भ्रूमध्याच्या खालच्या भागांत) सहा चक्रें व ब्रह्मांडांत (भ्रूमध्याच्या वरच्या भागांत) सहा चक्रें कल्पिलीं आहेत. त्रिकुट, श्रीहाट, गोल्हाट, औटपीठ, भ्रमरगुंफा व ब्रह्मरंध्र हीं ब्रह्मांडांतील षट्चक्रें, 'मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपुर, अनाहत, विशुद्ध व अग्नि' हीं पिंडांतीं सहा चक्रें. यांच्याही वर 'सहस्रदल चक्र' आहे. 'मूलाधार' चक्र हें चतुर्दलांचें, व रक्तवर्णाचें कमळ गुदस्थानीं असून त्याची देवता गणेश आहे. 'स्वाधिष्ठान' चक्र पीतवर्ण व षट्दलयुक्त असून त्याची देवता ब्रह्मदेव होय, नाभिस्थानांत 'मणिपुर' चक्र दशदलयुक्त व नीलवर्ण असून त्याची देवता विष्णु आहे. कुंडलिनी क्षुब्ध झाली म्हणजे ती सरळ होऊन व सुषुम्नेच्या आंत शिरून आधारस्वाधिष्ठान या चक्रांचा भेद करिते व पुढें ती तशीच 'मणिपुर' चक्र भेदून, नंतर पिंगटवर्णाचें, द्वादशदली, रुद्रदेवतात्मक अशा हृदयस्थानीं असलेल्या 'अनाहत' चक्राचा भेद करिते. सर्पाण प्रवेश करून ती पांचवी कंठस्थानीं असलेल्या षोडशदलयुत, धूम्रवर्ण व 'जीव' देवतात्मक अशा विशुद्ध चक्राचा समाचार घेऊन पुढें भ्रूमध्याचे ठिकाणी असणाऱ्या विद्युद्वर्ण व द्विदल अशा 'अग्नि'चक्राचाही (याला 'आज्ञा' चक्रही म्हणतात.) घोट घेते. दोन्ही भिवयांच्या मध्यें व नासिकेच्या मुळाशीं जें स्थान आहे त्याला 'त्रिकुट,' 'शिव'स्थान, किंवा 'केदार,' म्हणतात. याच ठिकाणीं इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन नाड्यांचा संगम किंवा 'त्रिकुट' झाला आहे. या संगमाला गंगा (इडा), यमुना (पिंगला) व सरस्वती (सुषुम्ना) यांचा संगम म्हणून त्रिवेणीसंगम म्हणतात. या त्रिवेणीजवळींच 'अनुहाता'चा मेघनाद 'सोहं' शब्दाची गर्जना अखंड करित असतो. 'चैतन्यचक्रवर्तीची शोभा जगदंबा कुंडलिनी' (सोबतचें 'कुंडलिनीचें' चित्र पहा.) ह्या सहाव्या चक्राच्या स्थानींच आपला पराक्रम गाजवून राहात नाहीं. तर ती मस्तकाभोंवतीं वळसा घेऊन जेथें मस्तकाचें भोंक पाठीच्या कण्याच्या वरच्या अंगास टेंकल्यासारखें होतें त्या ब्रह्मरंध्राच्या (ध्यामेंच काकीमुख, 'क'कारांत, किंवा

दाहावी खिडकी म्हणतात) द्वारांतून मेंदूच्या वरती अधर असें सातवें 'सहस्रदळ कमळ' (येथें 'सहस्र' शब्द अनंतवाची आहे.) आहे तेथें प्रवेश करिते. या कमळाची कांति अवर्णनीय आहे. वर्णनच करावयाचें म्हणून कोणी ती सुवर्णवत् आहे, कोणी कर्पूरवत् आहे असें लिहितात. मनुष्यदेहांतील परमात्म्याचें विश्रांतिस्थान हेंच होय. ह्यालाच त्रिकुटशिखर, मेरुशिखर (पाठीच्या कण्याला मेरु म्हणतात), इत्यादि नांवें आहेत. उन्मनीचें लावण्य, तुर्येचें तारुण्य, आकाशाचा प्रांत, मोक्षाचा एकांत, महाभूतांचें बीज, महातेजाचें तेज, योगद्रुमाचें फळ, आनंदाचें चैतन्य असें अनादि अगण्य परमतत्व याच ठिकाणीं सांठविलें आहे. सत्रावी जीवनकळा, (हिलाच 'अमृताचा झरा' किंवा 'कामधेनूचा पान्हा' म्हणतात) किंवा आत्म्याची प्रभा येथेंच असून तिच्यांतून एक अमृतबिंदु अक्षय स्रवत असतो. तो हल्लीं जठराग्नीवर पडून फुकट जातो, त्याचेंच योगमार्गानें पान केल्यास मनुष्यास अमर होतां येईल असें ग्रंथांतून वर्णन आढळतें. सारांश ह्या सहस्रदल-कमळांत विसांवा घेणें हेंच योग्याचें आद्यकर्तव्य होय. तेथें राहाणारा अनिर्वचनीय परमात्मा हाच ज्ञानेश्वर तुकारामादि अर्वाचीन संतांचा पांडुरंग होय. राजयोग व हटयोगाचा हाच मार्ग होय. या मार्गाचें संक्षिप्त, पण करवलें तितकें स्पष्ट विवरण, श्रीसद्गुरुप्रसादानें केलें. त्याचा विज्ञानयुक्त विशेष खुलासा गुरुकृपेनेंच करून घ्यावा. वेदसंहिता व उपनिषदें ह्यांतून गुप्तरीतीनें सांगितलेला हा योगमार्ग पतंजलीच्या योगसूत्रांतून, तसेंच भारतभागवतादि पौराणिक वर्गांत मोडणाऱ्या ग्रंथांतून विशेष खुलाशानें सांगितला आहे. मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास, तुकाराम, सोहिरोबा, देवनाथ इत्यादि अर्वाचीन संतमंडळींनें तर ह्या सुंदर योगमंदिराचें द्वार अगदींच मुक्त करून शोधक व तत्वदिदृक्षु मंडळीस त्यांतील अमूल्यरत्नें हवीं तितकीं नेण्याची पूर्ण मोकळीक दिली आहे. विस्तारभयास्तव त्यांतील दोन तीनच निवडक रत्नें दाखवून ह्या विषयाची येथेंच इतिश्री करितों. (१) 'देहचि पंढरी, आत्मा पांडुरंग । नित्य करी संग अहर्निशीं. ॥ १ ॥ मन पुंडलिक आवरूनि धरा । तेणें येईल घरा नारायण. ॥ २ ॥ चहूं या देहाची करूनियां वीट । विटेवरी नीट उभा असे. ॥ ३ ॥ मेरूचे शिखरीं सत्रावी सुंदरी, । वैकुंठ पंढरी नांदतसे. ॥ ४ ॥ तुका ह्मणे अलक्ष लक्षावीं अंतरीं । धन्य तो संसारीं जन्मा आला.' ॥५॥ (२) 'डोळ्याची बाहुली करुनि उफराटी । पाहे ज्ञानदृष्टी ऊर्ध्वपंथा. ॥ १ ॥ त्रिकुटसंगमीं करोनि मज्जन । मन निरंजन ओळखावा. ॥ २ ॥ श्रीहाट गोल्हाटावरी भ्रमरगुंफा । तया स्थानीं बापा ! अनुहात. ॥ ३ ॥ प्रणवाचें बीज, बिंदु ज्योतिकळा । तेजाचा उमाळा दुमदुमित. ॥ ४ ॥ ऐसा हा अनुभव अनुभवी जाणे । शब्दज्ञान जाणणें बहिर्मुखा. ॥ ५ ॥ ज्ञानदेव म्हणे अनुभवी जाणे । संतांचीं हें खुण संत एक.' ॥६॥ (३) 'नरदेहीं सुगम उपाय । अजपी धरी सोय । तोचि नरनारायण होय । उलटोनि पाहतां; ॥ १७८ ॥ अजपा अव्यक्त गायत्री । योगियांसी मोक्षदात्री । हृदयीं पठण किजे नित्य-रात्रीं । त्यासी पुनर्जन्म नाहीं. ॥ २६२ ॥ स्वस्वरूपाची व्हावया प्राप्ती । अभ्यास करावा निगुती । अभ्यासाची प्रथम गति । ऐसी आहे जाण पां. ॥ १२५ ॥ मुख, नासिक, नयन, । आणिक दोन्ही श्रवण । दोन्ही हातांच्या अंगुल्या कीजे निरोधन । स्थानस्थ कीं. ॥ १२६ ॥ ऐसें साधकें करावें । भ्रूमध्य लक्ष द्यावें । नित्यनेमें अनुभवावें । श्रीगुरुकृपें. ॥ १२७ ॥ हें षण्मुद्रासाधन । येणेंचि होय ब्रह्मसनातन । न घडे तया जन्ममरण । आपला आपण भोगितो. १२८

तुह्मां जाणतियां प्रती । हेचि विनवणी पुढतांपुढती । सोहंशब्द हृदयाप्रती । सहजस्थिती असावा. ॥ १३४ ॥ ऐसियापरी ध्यान करावें । अखंड एकरूप असावें । हृदयीं 'सोहं' साठवावें । साधकेंधरी. ॥ १८० ॥ त्रिबंध राखावे वोजा । षण्मुखमुद्रेची पैजा । साम्र सर्व सिद्धींचा राजा । ब्रह्मरूप तोचि पैं. ॥ १८१ ॥ 'सोहं' सामावे चौथे शून्यीं । तेथें उठती अनुहतध्वनि । संसारीं ब्रह्मरूप प्राणी । असोनियां जीवन्मुक्त'. ॥ (पवनविजय—मुकुंदराजकृत.) **प्रभूला कीर्तन किती प्रिय आहे, कीर्तनांत लाभ कोणता व त्यांत प्रेमळभक्त कसा तल्लीन होऊन जातो याविषयीं संक्षिप्त उतारेः—**(१) 'आळस दवडूनि दुरी । अभिमान घालोनियां बाहेरी । अहर्निशीं कीर्तन करी । गर्व न धरी गाणिवेचा ॥ ७३५ ॥ गाणीव जाणीव शहाणीव । ओवाळूनि सांडावें सर्व । सप्रेम सावडी कथा गौरव । सुख अभिनव तेणें मज. ॥७३६॥ गर्जत नामांच्या कल्लोळीं । नामासरिसी वाजे टाळी । महापातकां झाली होळी । ते वैष्णवमेळीं मी उभा. ॥ ७३७ ॥ जें सुख क्षीरसागरीं नसे । पाहतां वैकुंठींही न वसे । तें सुख मज कीर्तनीं असे । कीर्तनवशें डुल्लत. ॥ ७३८ ॥ मज सप्रेमाची आवडी भारी । भक्तिभावाचिया कुसरी । मीही कीर्तनीं नृत्य करी । छंदतालवरी विनोदें. ॥ ७३९ ॥ ऐशिया कीर्तनपरिपाठी । बुडाल्या प्रायश्चित्तांच्या कोटी । खुंटली यमदूतराहाटी । काढिली कांटी पापांची. ॥ ७४० ॥ नामस्मरणाच्या आवडी । लाजल्या मंत्रबीजाच्या कोटी । तपादि साधने नापुडी । झाला वेडा हरिनामें. ॥ ७४१ ॥ ऐकोनि हरिनामाचा घोष । योगयागीं उपविले सुख । धाकें पळालें विषयसुख । विराले देख अधर्म. ॥ ७४२ ॥ हरिनामाच्या कडकडाटीं । लोप विघाले त्रिकपटी । नामोंची उतरली उटी । कीर्तन कसवटी हरिप्रिय.' ॥ ७४३ ॥ (२) 'वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च । विलज्ज उद्गायति नृत्यते च मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति'. ॥ (भागवत. ११.१४.२४.) 'अंगी रोमांच रवरवित । स्वेदबिंदु डळमळित । चित्त चेतन्यें द्रवत । तेणें सद्गदित वाचा. ॥ ३१७ ॥ हर्ष ओसंडता पोटीं । अर्धोन्मीलित होय दृष्टी । जीवशिवा पडली मिठी । गान त्रिपुटी मावळली. ॥ ३१८ ॥ आकांते थोर आक्रोशें । वारंवार रडता दिसे । रडण्यासाठीं गद्गदा हासे । जेवि लागलें पिसें महाग्रह. ॥ ३२० ॥ गाणें नाचणें हासणें । तो रडे कामया कारणें । ऐक तीही लक्षणें । तुजकारणें सांगेन. ॥ ३२३ ॥ माउली वेगळें बाळक पडे । जननी पाहता कोठें नातुडे । भेटतां ओरडूनि रडे । मिठी पडे सप्रेम. ॥ ३२४ ॥ जीव परमात्मा दोन्ही । चुकामुकी झाली भ्रमपटूनी । त्यांसि एकाकी होता मिळणी । रडे दीर्घस्वरें स्फुंदत. ॥ ३२५ ॥ देव लाघवी नानापरी । मायावी नातुडे निर्धारीं । तो सांपडला घरींच्या घरीं । तेणें विस्मय करी टवकारे. ॥ ३२६ ॥ देव सदा जवळीच असे । त्यालागीं जन कैसे पिसे । पाहों जाती देशोदेशीं । देखोनि हासे गद्गद. ॥ ३२७ ॥ देव सर्वांसि अजित । तो स्या जिंकिला भगवंत । धरोनि राखिला हृदयांत । यालागीं नाचत उल्हासें. ॥ ३२९ ॥ यापरि भक्तियुक्त । होऊनियां माझे भक्त । निजानंदें गात नाचत । तेणें केलें पुनित लोकत्रया.' ॥ ३३२ ॥

विमुक्तिबहुसाधनें तदितरें गणीनाच तो;
सजूनि वैरवल्लकी तव सभांगणीं नाचतो. ॥ ११४

१. मोक्षाचीं पुष्कळ साधनें. द्वितीयार्धाचा अर्थः-योगयागादि भगवत्प्राप्तीच्या साधनांची प्रशंसा इतर ज्ञानी जनांनीं पुष्कळहि केली तरी देवर्षि नारद त्यांना अगदीं तुच्छ समजतो व सर्वांपेक्षां भगवद्गुणकीर्तनच उत्तम व त्यामुळें भगवंताची प्राप्ति अत्यंत सुलभ रीतीनें होते असें समजून तो आपल्या ब्रह्मवीण्याच्या तारा यथास्थित लावून प्रभूपुढें प्रेमभरानें गातो व नाचतो. कारण त्याला ठाऊक आहे कीं मी प्रभुकथा गात नाचत असलों म्हणजे भगवान् लवकर येऊन मला दर्शन देईल. 'ह्या अभिन्न सुखसेवे आंत। नारद आनंदें नाचत गात। शुकसनकादिक समस्त। जाहले निजभक्त येणेंचि सुखें.' ॥ (एक. भाग. १.९२.) २. समजत नाहीं, तुच्छ मानतो. भगवंताची प्राप्ति कडीकपाटीं बसून तपश्चर्या करीत बसण्यापेक्षां भक्तिपुरःसर नामस्मरण केल्यानें लवकर होते ही समजूत संतमंडळांतील सर्व साधूंची आहे. मोरोपंताचा पुढील श्लोक पहाः- (१) श्रीरामनाम जपतां तरशील लाटीं; । हूं काय पाहसि असो भलतें ललाटीं. । राहें घरींच, न शिरेंहि कडे कपाटीं, । तें बैसवील तुज मुक्तिशिं एकपाटीं. ॥ १ ॥ [वाङ्मनःप्रार्थना]. कबीराचेंही असेंच एक पद आहे. त्यांत परमेश्वर भक्तांच्या अगदीं जवळ असून ते त्याचा शोध योगयागध्यानपूजातीर्थयात्रेंत करितात म्हणून आश्चर्य दर्शविलें आहे. तें पद असें:-(२)'मोका का तूं ढूंढे बंदे में तो तेरे पासमें। ना मैं कोई क्रिया कर्ममें ना जोगसंन्यासमें. ॥ ध्रु० ॥ ना मैं पोथी ना मैं पंडित ना काशीकैलासमें। ना रहता मैं श्रीद्वारका ना रहता जगन्नाथमें. ॥ १ ॥ ना रहता मैं रामेसरमें ना रहता बद्रीनाथमें। ना रहता मैं जंगल सहारा, मैं रहता विश्वासमें. ॥ २ ॥ कहत कबीर सुनो भाई साधो सब श्वासोके श्वासमें। जो खोजे तो तुरत मिलूं मैं छनभरकी तल्लासमें. ॥३॥ (३) शुकाचार्य राजा परीक्षितीस म्हणतो:-'नरवर्या! यज्ञतपोयोग असे मार्ग मुक्तिचे फार। परि बा! कृष्णीं होतो ज्या मार्गे भक्तियोग तो सार'. ॥ [भागवत-द्वितीय स्कंध-गी० १२]. (४) 'न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव! न स्वाधायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता.'॥ (भागवत ११.१४.२०.) तसेंच भागवतमाहात्म्य अ० २ श्लो० २१:-'अलं व्रतैरलं तीर्थैरलं योगैरलं मखैः। अलं ज्ञानकलालापैर्भक्तिरेकैव मुक्तिदा.' ॥ तसेंच (५) 'कासया करावे तपाचे डोंगर' अशा आरंभाचा तुकारामाचा अभंगही ह्यासंबंधीं वाचावा. (६) 'व्रत, तप नलगे करणें सर्वथा। नलगे तया तीर्थी जाणे आम्हां.॥ १ ॥ आपुलेचि ठायीं असा सावधान। करा हरिकीर्तन सर्वकाळ.॥ २ ॥ नलगे कांहीं वर्जावें तें अन्नजीवन। लावा अनुसंधान हरिचे पायीं. ॥ ३ ॥ नलगे योगयाग नलगे संगत्याग। असो द्या अनुराग हरिचे पायीं. ॥ ४ ॥ नलगे निरंजनीं करणें वास तुह्मां। दृढ धरा प्रेमा हरिचे पायीं. ॥ ५ नामा म्हणे नाम दृढ धरा कंठीं। तेणें येइल भेटी पांडुरंग.' ॥ ६ ॥ ३. सजवून, तयार करून, तिच्या तारा नीट करून. व्या०:-'सजणें' हा धातु बहुधा अकर्मक असतो परंतु केव्हां केव्हां याचा सकर्मकाप्रमाणें उपयोग करितात तसा येथें केला आहे. सजोनि=भगवद्गुणगायनाकरितां ब्रह्मवीणेच्या तारा यथास्थित लावून. ४. श्रेष्ठ वीणा,

तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें, यास्तव
प्रजापतिसुतत्व ये करिति साधु ज्याचा स्तव;।
स्वनीचपण मागिलें, बहु दया अशी नारदा

---

ब्रह्मवीणा, महती. नारदाच्या वीणेला **महती** असें नांव आहे. '**विश्वावसोस्तु बृहती तुंबरोस्तु कलावती । महती नारदस्य** स्यात्सरस्वत्यास्तु **कच्छपी** ॥' [वैजयंती–शिशुपालवध–स० १ श्लो० ११] '**शिवस्य** वीणा **नालंबी** गणानां तु **प्रभावती**'। [हेमचंद्रकोश–रघुवंश–सर्ग ८ श्लो० ३५ टीका]. ५. **देहभान विसरून प्रेमानें नृत्य करितो. समानार्थक**:–'नारद वैष्णवशिरोमणी। नाचे कीर्तनीं सर्वदा॥ १ ॥ देवत्ति त्याची पूजा करी। आणि नमस्कारी भेटतां ॥ २ ॥ दैत्या घरीं बहुमान त्याचा । ऐसा कीर्तनाचा बडिवार ॥ ३ ॥ निळा ह्मणे तिहीं लोकांत । कीर्तनें विख्यात हरिभक्त'. ॥ ४ ॥

१. प्रास्ताविकः–नारदाला कथाकीर्तनाची अत्यंत गोडी लागण्यास तरी कारण भगवत्प्रसादच झाला असें या केकेंत कवि सांगतात. तुझें=भगवंताचें. २. चरित्र, कथा. ३. साधूंच्या मुखानें. अन्वयार्थः–[नारदाला] तुझें चरित (भगवंताचें चरित्र, भगवत्कथा) सन्मुखें (साधूंच्या रसाळवाणीनें) श्रवण जाहलें (ऐकण्यांत आलें, ऐकिलें); यास्तव (म्हणून) प्रजापतिसुतत्व (ब्रह्मदेवाचें पुत्रत्व) ये (आलें, प्राप्त झालें); ज्याचा (ज्या नारदाचा) स्तव (स्तुति, प्रशंसा) साधु (संत, भगवद्भक्त) करिति (करूं लागले, करितात); [हे!] भवपयोधिच्या (भवसागरच्या) पारदा! (पार देणाऱ्या; पार नेणाऱ्या) प्रभो! (देवा!) मागिलें (पूर्वजन्मींचें) स्वनीचपण (आपलें नीचयातित्व) [व] बहु दया (भगवंतांनीं दर्शन देऊन आपल्यावर केलेली कृपा) अशी नारदा (नारदाला) घडिघडि (घटकोघटकीं, वारंवार) स्मरे (स्मरत असते). ४. प्रजेचा पति (स्वामी) ब्रह्मदेव त्याचें सुतत्व (पुत्रत्व), ब्रह्मदेवाचें मानसपुत्रत्व. ५. ज्या नारदाचा. ६. आपलें (मागील जन्मींचें) नीचपण, हीनकुलत्व. प्रथमार्धाचा अर्थः–ज्या देवर्षि नारदाची उत्कृष्ट भगवद्भक्तीबद्दल संतजन स्तुति करितात तो नारद पूर्वजन्मीं दासीपुत्र असून साधूंच्या मुखानें भगवत्कथाश्रवण घडलें म्हणून प्रस्तुत कल्पीं ब्रह्ममानसपुत्र झाला. नारदः–दत्तदयोदयांत पंत नारदाविषयीं म्हणतात:–'कंटाळे मायहि बहु हरितां शिशुचाहि बाह्य मळ हातें; । बाह्यांतर नतमळ तो गुरुवर हरि, करि शिवार्थ कलहातें. ॥ ५७ ॥ भवकारागृहमुक्त प्राणी करितो, हठेंचि हरिताप । बाप! प्रेम खरें तें बद्धविमोक्षीं सुखेंचि वरि शाप'. ॥ ६० ॥ '**नारदाभ्युदय**' नांवाचें पंतांचें एक स्वतंत्र प्रकरण आहे. त्यांत पूर्वजन्मीं नारद दासीपुत्र असून पुढें साधुमुखांतून भगवत्कथा श्रवण केल्यानें ब्रह्मपुत्र कसा झाला याचें सविस्तर व चटकदार वर्णन दिलें आहे. [नारदाभ्युदय–गी० २-४२.] ७. **पूर्वजन्मींचें; पूर्वकल्पीं नारदाला दासीपुत्रजन्म प्राप्त झाला होता त्या जन्मींचें**. ८. **कृपा; भगवंतांनीं दर्शन देऊन आपणावर केलेली कृपा. द्वितीयार्धाचा अर्थः–हे संसारसागराच्या पार नेणाऱ्या देवा! आपण पूर्वी दासीपुत्र**

स्मरे [1]घडिघडि, प्रभो! [2]भवपयोधिच्या [3]पारदा! ॥ ११९

तुझें यशचि तारितें, परि न केवळा तारवे;
 [5]सहाय असिला असे, तरिच शत्रुला मारवे; ।

---

असून आतां ब्रह्ममानसपुत्र झालों हें सर्व भगवत्कृपेचें माहात्म्य असें नारदाच्या मनांत वारंवार येऊन तो तुमचें यश वर्णित गात नाचत असतो. भगवंतांनीं केलेले उपकार नारद विसरला नाहीं.

१. घटकोघटकीं, वारंवार, पुनः पुनः. २. भव=संसार+पयोधि=सागर, त्याच्या; संसारसमुद्राच्या. संसाराला सागराची उपमा देणें हें कविजनांला अत्यंत संमत आहे. ही उपमा विस्तारास्तव, ती तरून जातांना लागणाऱ्या संकटांस्तव, व अगाधत्वास्तव फार सरस होय. ३. पार दाखविणाऱ्या! संसारसमुद्राच्या पैलतीरीं नेणाऱ्या! ईश्वर हा संसारसागर सुखरूप तरून जाण्यास उत्तम वाटाड्या होय. ठरींव यमकः—'पारदा' व 'नारदा' हें पंतांचें आवडतें व ठरींव यमक होय. याचीं उदाहरणें त्यांच्या काव्यांतून पुष्कळ आढळतात. [केका ११२ पद्य, कृष्णविजय—उत्तरार्ध—अ० ५५ श्लो० ३८ पृ० ३७.] ४. प्रास्ताविकः—नारद ब्रह्मपुत्र झाला, तसेंच तो संसारसमुद्रांत तरला याचें कारण त्याला साधूंच्या मुखानें भगवत्कथा श्रवण करण्यास सांपडली यावरून कवि यांत सत्संगतिमाहात्म्य वर्णितात. अन्वयार्थः—[देवा!] तुझें (तुमचें भगवंताचें) यशचि (कीर्तिच) तारितें (रक्षितें) परि (परंतु) केवळा (नुसत्या त्या यशालाच) न तारवे (तारवत नाहीं;) असिला (खड्गाला) सहाय (पाठबळ) असे (असेल), तरिच शत्रुला मारवे (मारवतें); अज्ञहृदयें (मूर्खांचीं अंतःकरणें) भागवत (भगवद्भक्त) न भेटतां (भेटला नाहीं तर), सत्संगति (साधुसमागम) न घडतां (घडला नाहीं तर) तव (तुझ्या) यशोरसीं (यशरूपी रसांत, यशोवर्णनांत) तशीं (त्या प्रकारचीं, साधुसंगतीनें रंगतात तशीं) न रंगति (रंगत नाहींत, तल्लीन होऊन जात नाहींत). प्रथमचरणार्थः—देवा! तुमच्या गुणानुवादकीर्तनानें प्राणी तरतात हें तर खरेंच; पण नुसत्या असाह्राय गुणानुवाद गाण्यानेंच ते तरत नाहींत. त्याला दुसऱ्याचें म्हणजे सत्समागमाचें साहाय लागतें. भगवद्गुणकीर्तनानेंच प्राणी तापत्रयापासून मुक्त होत नसून तसें होण्यास त्याला सत्संगतीचें साह्य लागतें. याला दृष्टांत खड्गाचा. ५. पाठबळ; त्या तरवारीची मूठ धरणारा कुशल शूरादिसहाय. द्वितीयचरणार्थः—तरवार कितीही पाणीदार असली तरी तिला धरणारा कुशल असेल तरच तिच्यानें शत्रूचा नाश होईल. नुसती तरवार काय कामाची? ती आपण होऊन थोडीच शत्रूच्या मानेवर जाऊन प्राण घेणार आहे? त्याचप्रमाणें भगवत्कीर्ति जरी पापांचे डोंगर भस्म करिते, तरी त्याविषयीं कोणी तरी सदुपदेशक लागतो. व्यंग्यार्थः—भगवत्कथाकीर्तनाची मनःपूर्वक आवड बाळगणाऱ्या भक्तास पुढें मार्ग दाखविणारा सद्गुरु भेटतो.

न भागवत भेटतां, न घडतांहि सत्संगती,
न अज्ञहृदयें, तशीं तव यशोरसीं रंगती. ॥ ११६

१. भगवद्भक्त, साधुपुरुष. भगवद्भक्तांचे प्रकारः—श्रीमद्भागवतांत भगवद्भक्तांचे कनिष्ठ, मध्यम, व उत्तम असे तीन वर्ग केले आहेत व त्यांचीं लक्षणेंही दिलीं आहेत. तीं अशीं:—'य-जितो हरितें श्रद्धेंकरुनि प्रतिमेंच्चिमाजि जो, परि तो । न हरिजनीं न च इतरीं, प्राकृत भक्त नवच्च भजन हें करितो. ॥ ३३ ॥ नलिनाक्षीं, तद्भक्तीं, मूर्खीं, अहितींहि, जो करि प्रेमा, । मैत्री, दया, उपेक्षा तो मध्यम भक्त जाण या नेमा. ॥ ३४ ॥ मोठा भागवत नृपा! सर्वा भूतांत देव जो पाहे । देवीं सर्वहि भूतें साक्षात् हरिरूप तो जगीं आहे. ॥ ३५ ॥ भगवद्भ-क्तोत्तम तो ज्याच्या हृन्मंदिरीं सदा वसती । करि हरि, नच सोडी, कीं प्रेमगुणें चरण गोविले असती. ॥ ३६ ॥ गरुडध्वजपद सोडुनि घेतां त्रैलोक्यराज्य पदरा जा (ज्या) । निमिषार्धहि चलन नव्हे, त्यातें भागवत राज्यपद, राजा!' ॥ ३७ ॥ [मंत्रभागवत—एकादश स्कंध]. सज्जनांचें वर्णन एकनाथ स्वामी करितातः—'चैतन्याचे अलंकार । कीं ब्रह्मविद्येचे शृंगार । कीं ईश्वराचे मनोहर । निजमंदिर निवासा. ॥ ३५ ॥ कीं ते भूतदयार्णव । माहेरा आली कणव । ना ते निर्गुणाचे अवयव । जाण ठेव निर्गुणाची. ॥ ३७ ॥ (भागवतप्रथमस्कंध). २. साधुसमागम, साधुसंगतिमाहात्म्यः—'दे साधुसंग जे तें निरुपम निरवधि कवींद्र सुख गाती । सत्संगा सुगति कळे, तैसी हंसादिकां न सुलगा ती.' ॥ [मंत्रभागवत—स्कंध ११ गी० २०]. भगवान् म्हणतातः—(२) 'नवलचि सत्संगाचा महिमा मज पावलाचि वृषपर्वा । तैसाचि मय, बिभीषण, सुग्रळ, हनुमानहि हें विदित सर्वा. ॥ २७६ ॥ भक्ता कुब्जा, त्याही गोपी, त्या दीक्षितांचिया भार्या । वेदव्रततप नसतां सत्संगें पावल्या मला आर्या. ॥ २७८ ॥ गतिपात्र साधुसंग, प्राप्त प्रेमेंचि केवळें गोपी; । नगखगमृगभुजगपशुहि, स-त्संगतिनेंचि मुक्ति वा! सोपी.' ॥ २७९ ॥ [मंत्रभागवत—स्कंध ११]. (३)'वर्णिति वेदपु-राणें तीर्थादिक म्हणुनि साधुच्या संगा । इतरांची काय कथा सत्संगा वांछिते स्वयें गंगा'. ॥ (ब्रह्मोत्तरखंड २१-३.) सुंदरदास साधु आपल्या 'सुंदरविलास' काव्यांत म्हणतातः—'ज्या दिन तें सतसंग मिल्यो तब ना दिन तें भ्रम भाजि गयो है । औंर उपाय थके सबही तब संतनि अद्वयज्ञान दियो है । पोतप्रवालहि क्युं करि लुंबत एक अमूलिक लाल लियो है । कौन प्रकार रहे रजनीतम सुंदर सूरप्रकाश भयो है; ॥ साधु तुकाराम म्हणतातः—'पाप, ताप, दैन्य जाय उठाउठीं । जालिया भेटी हरिदासांची इ०.' ३. जड मानवांचीं हृदयें. द्वितीयार्धाचा अर्थः— जोंपर्यंत अज्ञान जनांना एखाद्या सत्पुरुषाची गांठ पडून त्याच्याशीं सहवास घ-डत नाहीं तोंपर्यंत त्यांना भगवद्यशाची चांगलीशी गोडी लागत नाहीं व म्हणू-नच त्यांचा तरणोपायही होत नाहीं. जसा एखाद्या वस्त्राला नुसत्या रसांत बुड-विल्यानें रंग चढत नाहीं तर त्या रसांत कांहीं दुसरा मालमसाला मिळवावा ला-गतो, म्हणजे रंग पक्का चढतो त्याप्रमाणें सत्संगतीवांचून अज्ञजनांचीं मनें ईश्वरभ-क्तीचे ठिकाणीं तल्लीन होत नाहींत. अतएव भगवद्यशाची गोडी लागून मोक्ष प्राप्त व्हावा अशी इच्छा असल्यास सत्संगति जोडावी. भागवत ११-१२ श्लो०१-२ ('न रोध-यति मां' इ०) पहा. ४. कीर्तिरूप रसांत. या केकेंत दृष्टांत अलंकार आहे.

[१]बुडे, बुडवि सागरीं [२]तरि, [३]सुकर्णधाराविना;
सहाय नसतां स्वयें [४]परतटासि ती [५]दाविना; ।
सहाय [६]भगवज्जना तव सुकीर्ति जेव्हां करी,

---

'१. प्रास्ताविकः—'भगवद्यशाला साधुजनाचें साह्य पाहिजे' ह्या अर्थाचा आणखी दृष्टांत देऊन कवि मागल्या केकेंतील सत्संगमहिम्याचें समर्थन करितात. अन्वयार्थः—तरि (तारूं, नौका, नाव) सुकर्णधाराविना (उत्तम नावाड्याशिवाय) सागरीं (सागरांत, समुद्रांत) बुडे (स्वतः बुडते) [व] बुडवि (दुसऱ्यास बुडविते); सहाय नसतां (त्या नौकेंत सुकाण्या मदतनीस नसला तर) ती (नाव) स्वयें (स्वतः, आपण होऊन, आपल्या एकट्याच्या सामर्थ्यावर) परतटासि (पलीकडच्या तीरास) दाविना (दाखवीत नाहीं, पोंचवीत नाहीं); तव (भगवंताची) सुकीर्ति (कल्याणकारक कीर्ति) जेव्हां भगवज्जना सहाय करी (भगवद्भक्तांना साह्यकारी करून घेते) तर्यींच (तेव्हांच) भवोदधितटीं (संसारसमुद्राच्या तीराला) जनां (लोकांना) लौकरी (विलंब न लावितां) उतरी (उतरिते). प्रथमचरणार्थः—नाव स्वतः कितीही उत्तम असली तरी तिला चालवावयाला जर उत्तम नावाडी नाहीं तर ती स्वतः आपण समुद्रांत बुडते व नौकेंत बसणाऱ्या उतारूंसही बुडविते. भावार्थः—मात्रा अत्युत्तम आहे पण ती योजणारा वैद्य जर कुशल नसेल तर ती व्यर्थ जाऊन प्रसंगविशेषीं रोग्याचाही नाश करिते तद्वत् नाव कितीही चांगली सुदृढ असली तरी तिला चालविणारा नावाडी जर सुकाणूं वळविण्याच्या कामांत कुशल नसेल तर ती स्वतः बुडते व बसणाऱ्या उतारूंस समुद्रांत बुडविते. समानार्थक वचनः—ही केका रचित असतांना पंतांच्या डोक्यांत भागवताचा पुढील श्लोक घोळत असावा असें वाटतें. त्यांत नरदेहाला सुदृढ नौकेची, भगवंताला अनुकूल वायूची, संसाराला सागराची, व भगवद्भक्त गुरूला कर्णधाराची (नावाड्याची) उपमा दिली आहे:— 'नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारम् । मयानुकूलेन नभस्वतेरितं पुमान्भवाब्धिं न तरेत्स आत्महा' ॥ (भाग. ११.२०.१७) अर्थः—नरदेह हा वास्तविक मिळण्यास फार कठिण परंतु मिळाल्यावर फार सुलभ अशी सुदृढ नौका होय. गुरु हा त्या नौकेचा कर्णधार असून मी (भगवान्) अनुकूल वायु आहें. इतकी सामग्री सिद्ध असतांही जो पुरुष भवाब्धि (संसारसमुद्र) तरून जात नाहीं तो आत्मघाती समजावा. २. नौका. कोशः—'नाव्यं त्रिलिंग्यं नौतार्ये स्त्रियां नौस्तरणिस्तरिः' इत्यमरः. ३. उत्तम नाविकावांचून, कुशल नावाड्याच्या साहाय्यावांचून, कोशः—'सांयात्रिकः पोतवणिक्कर्णधारस्तु नाविकः । नियामकाः पोतवाहाः कूपको गुणवृक्षकः ॥' इत्यमरः ४. दुसऱ्या तीराला, पलिकडल्या तटास. द्वितीयचरणार्थः—नौकेला जर नावाडी सहाय नसला तर ती आपल्या एकट्याच्याच सामर्थ्यावर दुसऱ्या तीराला जाऊन पोंचत नाहीं. ५. दावीत, दाखवीत नाहीं; परतट दावीत नाहीं. ६. भगवद्भक्तांना, साधुजनांस. द्वितीयार्धाचा अर्थः—एकटी भगवत्कीर्तिच लोकांचा सत्वर उद्धार करण्यास समर्थ नाहीं. तिला संतसंगतीचें साहाय्य मिळालें म्हणजे मात्र

तयींच उतरी [1]भवोदधितटीं जनां लौकरी. ॥ ११७

[2]सुसंगति सदा घडो; [3]सुजनवाक्य कानीं पडो;

---

ो लोकांना संसारसागराच्या पैलतीरास सत्वर नेण्यास समर्थ होते. साधुसमागमा-शिवाय ईशप्राप्ति लवकर होत नाहीं. 'तात्पर्य मुमुक्षुजनांस अविद्याजनितसंसृतिसागर ार उतरून ब्रह्मज्ञानावाप्ति करून देण्यास सद्गुरुकृपेची आवश्यकता आहे.' (य० पां०.)

१. संसारसागराच्या पैलतीरास. काव्यालंकारः—सुकीर्ति ही तरी आणि भगवज्जन हे कर्ण-धार. एकट्या सुकीर्तीनें भवसागराच्या पलीकडल्या तीरास जाववत नाहीं. तिला भगवज्जन मुक्ताधार (=नावाडी) मिळाला म्हणजे फार त्वरेनें ती परतीरास जाऊन पोचते. यांत दृष्टांत आहे. केका ४ पृ० १३ पहा. २. ११७ श्लोकाच्या अखेरच हें काव्य वास्तविक पाहतां संपलें. ११८-१२१ या केकांत कवि देवापासून उत्कृष्ट आशीर्वाद मागून काव्याचा उपसंहार करितात. प्रास्ताविकः—आतांपर्यंत जी भगवत्प्रार्थना केली तिचें पर्यवसान सत्संगतींत आहे, असें समजून कवि मोरोपंत आपल्याला देवानें प्रथम सत्संगति द्यावी म्हणून प्रार्थना करून मग इतर वर मागतात. केका ११८–१२० ह्या तीन केकांत कवीनें लोकहितार्थ प्रार्थना केली आहे असें म्हटल्यासही चालेल. येथें 'आशी' नामक अलंकार झाला. केका ५० पृ० १२४ टीप ३ पहा. २ चांगल्या लोकांचा (=साधूंचा) समागम; भगवद्भक्तांचा संग. अन्वयार्थः—[देवा !] [मला] सदा (निरंतर) सुसंगति (साधुसमागम) घडो (घडावा); सुजनवाक्य (साधुजनांचें भाषण, साधुजनांचा सदुपदेश) कानीं पडो (ऐकावयास मिळो); मतिचा (बुद्धीचा) कलंक (डाग, मालिन्य, पापरूपी मळ अथवा अज्ञानरूपी पटल) झडो (नाहींसा होवो); विषय (ऐहिक भोग्य पदार्थ) सर्वथा (कदापि) नावडो (न आवडो, न रुचो. ऐहिक वस्तूंच्या ठिकाणीं माझी आसक्ति नसावी); मन सदंघ्रिकमळीं (साधूंच्या चरणकमळीं) दडो (दडून राहो, भ्रमरासारखें लीन होवो); मुरडितां (तेथून जर कोणी त्याला काढूं लागलें तर) [तें] (हटानें (आग्रहानें, नेटानें) अडो (अडून राहो; चिकटून राहो); वियोग (तुटातुट) घडतां (त्या मनाला कोणी जबरीनें साधूच्या चरणापासून ओढून काढिल्यामुळें वियोग घडला असतां) रडो (दुःखित होवो, अतिशय वाईट वाटो) [आणखी] भवचरित्रीं (देवा! तुमच्या कथेंत) जडो (निमग्न होवो). सत्संगमहिमाः— भर्तृहरीनें पुढील श्लोकांत सत्संगमहिमा मोठ्या सरस रीतीनें वर्णिला आहे:-(१) जाड्यं धियो हरति सिंचति वाचि सत्यं मानोन्नतिं दिशति पापमपाकरोति । चेतः प्रसादयति दिक्षु तनोति कीर्तिं सत्संगतिः कथय किं न करोति पुंसाम् ॥ [नीतिशतक–४७]. रामायणांत म्हटलें आहे:–(२) 'सतां संगतिरेवात्र साधनं प्रथमं स्मृतम् । आचार्योपासनं भद्रे मद्भुध्यामायया सदा ॥.' मोक्षप्राप्त्यर्थ सद्गुरुकृपाच पाहिजे याविषयीं 'दासबोधांत' रामदास म्हणतात. (३) 'जे वस्तु परम दुर्लभ । जयेचा अलभ्य लाभ । तोचि होय सुलभ । सत्संगें करोनी ॥ १ ॥ सद्गुरुकृपा न जोडे । तों भलतीचकडे वावडे । जैसें आंधळें चांचरोन पडे । गारीं गड्दरीं ॥ २ ॥ असो जयास मोक्ष व्हावा । तेणें सद्गुरु करावा ।

**कलंक मतिचा झडो; विषय सर्वथा नावडो; ।**

---

सद्गुरुवीण मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥ ३ ॥.' तुकोबा म्हणतात:-(४) 'सद्गुरुवांचोनि सांपडेना सोय । धरावे ते पाय आधीं आधीं ॥ १ ॥ लोहोपरीसाची न साहे उपमा । सद्गुरुमहिमा अगाधची ॥ २ ॥.' विश्वेशस्तुतींत **पंत** म्हणतात:-(५) 'हरिती संत तमातें; संतत मातें तदीय संगातें । दे देवा! प्रिय करिती सत्संगति जें, करी न गंगा तें' ॥ ७३ ॥ (६) नामदेव म्हणतात:-'संतचरणरज सेवितां सहज । वासनेचें बीज जळोनि जाय. ॥ १ ॥ मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाटूं लागे. ॥ २ ॥ भेदभ्रम आटे, आशापाश तुटे, । प्रत्यक्ष देव भेटे संतसंगें. ॥ ३ ॥ प्रेमें कंठ दाटे, आनंदपूर लोटे, । हृदयीं प्रगटे रामरूप. ॥ ४ ॥ नामा म्हणे सोपें साधन गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें'. ॥ ५ ॥ (७) एकनाथ म्हणतात:-'संतचरणींचा महिमा । कांहीं नकळे आगमानिगमां. ॥ १ ॥ ब्रह्मा घाली लोटांगण । विष्णु वंदितो आपण. ॥२॥ शिव घेतो पायवणी । धन्य धन्य संत जनीं. ॥ ३ ॥ तया संताचा सांगात । एका जनार्दनीं निवांत.' ॥ ४ ॥ (८) **निळोबा** म्हणतात:-'घडो त्यांचा समागम । ज्यांचें प्रेम विठ्ठलीं. ॥ १ ॥ सहज त्यांच्या ऐकतां गोठी । परमार्थ पोटीं दृढावे. ॥ २ ॥ अनुतापासी दुणीव चढे । वैराग्य वाढे चढोवढी. ॥ ३ ॥ निळा म्हणे वाढे भाव । संचरे स्वानुभव निजांगीं'. ॥ ४ ॥ ३. **चांगल्या जनाची उक्ति, किंवा भाषण. प्रथमचरणार्थः-देवा! मला साधूंचा समागम निरंतर घडो; तसेंच सज्जनांचा उपदेश माझ्या नेहमीं कानीं पडो.** याविषयीं पुढील ऋग्वेदांतील प्रार्थना फार संस्मरणीय आहे:-'भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षिभिर्यजत्राः । स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः' (ऋ. मं० १ सू० ८९ मं० ८) अर्थ:-'हे विश्वेदेवहो! जें चांगलें असेल तेंच आमच्या कानीं पडो, अभद्र न पडो; जें भद्र असेल तेंच आमच्या दृष्टीस पडो, अभद्र न पडो; आणि आमचे कान आणि डोळे हे सदैव आपआपलीं कामें करण्यास समर्थ राहोत. आणि देवांनीं नेमून दिलेलें जें शंभर वर्षांचें आयुष्य तें भरेपर्यंत आमचीं सर्व गात्रें स्वाधीन राहून आम्ही तुमची कीर्ति गातगात जगूं असें करा.' (वे. य.)

१. **कालिमा, डाग, मळ. द्वितीयचरणार्थः-सज्जनांचा उपदेश ऐकल्यानें माझ्या बुद्धीला जो पातकाचा डाग लागला असेल तो निघून जावो. तसेंच ऐहिक भोग्यपदार्थ नाशवंत आहेत असें जाणून त्याविषयीं माझें मन लंपट न होवो. पंचविषयांचा मला मोह न पडो. व्यंग्यार्थः**-विषयपंचकाचा त्याग झाला ह्मणजे इंद्रियजय होऊन मन स्थिर होतें. व तसें झालें ह्मणजे आत्मदर्शन होण्यास वेळ लागत नाहीं. २. **झडून जावो; पूर्ण नाहींसा होवो.** एकनाथाची पुढील सुंदर उक्ति वाचा:-'जेथें जेथें मन जाईल वासना । फिरवावें नारायणा हेंचि देई. ॥ १ ॥ वारंवार यावा नामाचा आठव । कुबुद्धीचा ठाव पुसा सर्व ॥ २ ॥ भेदाची भावना तोडावी कल्पना । छेदावी वासना समूळकंद. ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नको दुजा छंद । रामकृष्ण गोविंद आठवावा. ॥ ४ ॥ ३. **रूप, रस, गंध, स्पर्श व शब्द असे पांच विषय आहेत.** ह्यांतील प्रार्थनेवरून पुढील वैदिक प्रार्थनांची आठवण होते:-(१) 'विश्वानि देव सवितर्दुरितानि परासुव यद्भद्रं तन्न आसुव' । (यजुर्वेद.) (अर्थ:-त्रिभुवनाला उत्पन्न

सदंघ्रिकमळीं दडो; मुरडितां हटानें अडो;
वियोग घडतां रडो; मन, भवच्चरित्रीं जडो. ॥ ११८
न निश्चय कधीं ढळो; कुजनविघ्नबाधा टळो;

करणाऱ्या प्रकाशमान् प्रभो, आमचीं सकल दुरितें नाहींशीं करून जें कल्याणकारक असेल तेंच आम्हांला दे), (२) 'असतो मा सद्गमय तमसो मा ज्योतिर्गमय मृत्योर्माऽमृतं गमय'. (भावार्थः-देवा! असत्यांतून सत्याची, अंधकारांत ज्योतीची, व नश्वरांत शाश्वताची ओळख मला करून दे.)

१. सत् (साधूंच्या)+अंघ्रिकमळीं(चरणकमळीं)=साधूंच्या चरणकमळीं. २. दडून राहो, अर्थात् संसारदुःखभयापासून निर्भय होण्यास तेथें आश्रय करून असो. साधूंच्या चरणांचा आश्रय केला म्हणजे मग भवसागर तरून जाणें कठिण नाहीं. ३. मुरडून टाकिलें असतां, मागें परतविण्याचा कोणीं यत्न केला असतां. तृतीयचरणार्थः-माझें मन पंचविषयोपभोगांच्या गांजणुकींतून सुटण्याकरितां साधूंच्या चरणांचा आश्रय करून लपून राहो; तसेंच साधूंच्या चरणांचा आश्रय करून राहिलेल्या मनास विषयवासना बाहेर काढावयास लागली असतां तें तेथेंच अडून राहो. ४. अडून राहो, आश्रय न सोडो. ५. साधूंच्या चरणांपासून वियोग. चतुर्थचरणार्थः-विषयवासनेनें बळानें मनाला साधूंच्या चरणांपासून ओढून काढून त्यांचा वियोग केला तर त्याला अत्यंत दुःख होऊन तें फिरून तेथें जाण्याचा प्रयत्न करो. तसेंच माझें मन तुमच्या यशांत आसक्त किंवा लंपट होऊन राहो, अर्थात् मला नेहमीं तुमचें गुणवर्णन घडो. ६. तुमच्या चरित्रांत, कथेंत. समानार्थकवचनः-तुकोबांनीं एका ठिकाणीं असेंच मागणें मागितलें आहे. तें असें:-'वारंवार हानि न पडावा विसर। वसावें अंतर तुमच्या गुणीं. ॥ १ ॥ इच्छेचा ये दाता तूं एक समर्था। अगा कृपावंता मायबापा. ॥ २ ॥ लाभानिया ओढी उतावीळ मन। त्यापरि चिंतन चरणाचें. ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवीं जीवन ओलावा। पांडुरंगे धावा शीघ्र आतां. ॥ ४ ॥' ७. निश्चय कधीं न ढळो=साधूंच्या वचनावर जो एक वेळ विश्वास ठेवला तो मध्यें कसेही प्रसंग आले तरी ढळूं नये, नेहमीं सारखा, अचल व अबाधित राहावा. 'देह जावो अथवा राहो। पांडुरंगीं दृढ भावो ॥' अशी तुकारामांनीं वर्णिलेली निश्चयात्मिका बुद्धि राहावी. ८. हालो. ९. सत्कर्मास कुजन (दुर्जन) विघ्न करितात त्याची बाधा (पीडा). कोणी सत्कर्म करण्यास प्रवृत्त झाला असतां त्याच्या कार्यांत विघ्न करावें ही कुजनांची रीतच आहे. पुष्कळ लोक हातीं धरलेलें सत्कार्य या दुर्जनांच्या निंदेस किंवा इतर अडथळ्यास भिऊन सोडून देतात. म्हणून कुजनविघ्नबाधा टळो=दुर्जनांपासून होणारी पीडा आपण आरंभिलेल्या सत्कार्यास बाधक होऊं नये; असें येथें कवीनें मागणें केलें आहे. भावार्थः-दुर्जनांनीं वाटेल तशी आपली निंदा चालविली किंवा इतर विघ्नें आणण्याचें आरंभिलें तरी त्यामुळें आपलें धैर्य कधीं खचूं नये असें कवीचें हृद्गत म्हणणें असावें. भर्तृहरीनें एका ठिकाणीं धीर पुरुषाविषयीं पुढील उद्गार

न चित्त [१]भजनीं चळो; मति [२]सदुक्तमार्गीं वळो; ।
[३]स्वतत्त्व हृदया [४]कळो; [५]दुरभिमान [६]सारा गळो;

काढिले आहेत:-'निंदंतु नीतिनिपुणा: इ०.' याचें वामनी भाषांतर असें:-'वानोत निंदोत सुनीतिमंत, । चलो असो वा कमला गृहांत । हो मृत्यु आजीच, घडो युगांतीं, सन्मार्ग टाकूनि भले न जाती ॥' 'कोणी निंदा कोणी वंदा । आम्हां स्वहिताचा धंदा ॥' असा उद्गार तुकारामांनींही काढला आहे. १०. **नाहींशी होवो.**

१. **ईश्वरभजनांत. 'भजनीं (भगवद्भजनांत) चित्त (अंतःकरण) न चळो (चंचल न होवो)'=ईश्वरभजनांत माझें अंतःकरण स्थिर राहो.** २. **सज्जनांनीं सांगितलेल्या मार्गांत. 'मति सदुक्तमार्गीं वळो' याचा अर्थः-माझी बुद्धि साधूंनीं प्रशस्त म्हणून दाखवून दिलेल्या मार्गाकडेच वळो. बुद्धीनें प्रपंचममता सोडून साधूंनीं उपदेशिलेल्या परमार्थाकडे वळावें.** ३. **आपलें तत्त्व. आपण कोण, कोठून आलों, कशाकरितां व कां आलों, कोठें जाणार हें तत्त्व. मनुष्य परमात्म्याशीं असलेला आपला संबंध वारंवार विसरून अभिमानांत गुरफटतो.** एका कवीनें म्हटल्याप्रमाणें त्याला 'मी मी हेंचि कळे परंतु न कळे कोठील मी? कोण मी?' **तर तसें न होतां त्याला मी कोण व माझें कर्तव्य काय हें रहस्य कळून स्वतःची ओळख पटावी. आत्मबोधाशिवाय सर्व व्यर्थ**:-मनुष्य कितीही शास्त्रें पढो, कितीही तीर्थयात्रा करो, तसेंच अपरिमित द्रव्यसंचय करो तरी जोंपर्यंत त्याला स्वतःची ओळख पटत नाहीं तोंपर्यंत त्यानें आपलें आयुष्य व्यर्थ गमाविलें म्हणून समजावें, अशासारखे आर्यधर्मग्रंथांतून जागोजागीं उद्गार आढळतात. सुप्रसिद्ध कपिलगीतेच्या टीकेंतील पुढील संक्षिप्त उतारेच पहा:-(१)'नानाशास्त्रें पढिन्नला । देवतीर्थें बहुत फिरला । आपणा न जाणतां शिणला । मुक्त न होय निश्चयें. ॥ ४.६३ ॥ वधू सर्व अलंकार करी । नाहीं कुंकूं गळसरी । तरी ते शोभा नसे खरी । विटंबनाचि जाणिजे. ॥ ६४ ॥ अळंकार कांहींचि नसतां । एक कुंकूंचि भाळीं असतां । तेणें ते शोभा पावे पतिव्रता। श्रेष्ठ मानिती सुवासिनी. ॥ ६५ ॥ एक आत्मज्ञान जाणावें । तरीच सफळ होय आघवें । अनुभवावांचोनि न होय ठावें । निजात्मस्वरूप आपुलें'. ॥ ६६ ॥ (२) 'बहुत फेरे फिरोनी श्रम । नरदेह पर्वकाळ आला उत्तम । जाणोनि जो आत्मसंगम । स्नान करी निजउगमीं ॥ ४-१०५ ॥ लक्ष्य हेंचि दक्षणा । आत्माराम ब्राह्मणा । देऊनियां समाधाना । अर्पी आपण होईजे ॥ १०६ ॥ अहंदेहतर्पण । शुद्धक्रिये करूनि आचमन । आत्मारामीं पूजन । सोहं मंत्रें करावें. ॥ १०७ ॥ मन हेंचि तुळशीदळ । सुमनशुद्ध परिमळ । अर्पूनियां निर्मळ । ब्रह्मरूपीं समर्पण'. ॥ १०८ ॥ (३)'नरदेहासारिखें रत्न । सांपडलें बहु न करितां प्रयत्न । येथें जो न करी यत्न । निजात्मधनप्राप्तीचा ॥ ५.५७ ॥ येथें जेणें आळस केला । तेणें आत्मलाभ दवडिला । जन्ममरण प्रवाहीं पडला । येरझार न चुके कदा'. ॥ ५८ ॥ (४) 'नरदेहासी येवोन । न घेई जो आत्मदर्शन । तरी वृथा जाण जन्मोन । निष्कारण होय पां. ॥ ५.५५ ॥ त्याहुनि पशू बरा । जो न करी आत्मविचारा । पशु ऋतुकाळीं भोगी दारा । नर रमे नित्य गमनीं. ॥ ५८ ॥ वेदशास्त्र पठण करित । व्युत्पत्तिज्ञान सर्व जा-

पुन्हा न मन हें मळो; दुरित आत्मबोधें जळो. ॥ ११९

णत । ब्रह्मज्ञान नेणत । व्यर्थ होती श्रमचि तैं. ॥ ७५ ॥ जैसे मयूरपिच्छाचे डोळे । सुंदर दिसती चांगले । देखणें नसोन आंधळे । शोभिवंत दिसती. ॥ ७६ ॥ न करितां आत्मविचार । व्यर्थ शिणे संसार । दृष्टि मुरडोनि माघार । आपआपणा न पाहे. ॥ १०१ वाढवी मायेचा पसार । विचार न करी सारासार । देहींच देव असतां गव्हार । नेणेंचि जाण तयासी'. '॥ ॥ १०२ ॥ (५) 'जे सर्व सुखाची गोडी । निजात्मधनाची जोडी । तेथें देती जे बुडी । स्वानंद डोहीं ॥ ३१३ ॥ धन्य जन्म तयाचा । तोचि अधिकारी होय मोक्षाचा । जो स्वाद घेई ब्रह्मरसाचा । येऊनियां नरदेहीं. ॥ ३१४ ॥ सर्वधर्म तयासींच घडला । वेदशास्त्र तोचि पढियेला । जन्म तयाचाचि सुफळ जाहला । नरनारायण तोचि. ॥ ३१५ ॥ जन्माचें जाण हेंचि सार्थक । जो पाहे येऊनि आत्मकौतुक । नरदेह गेलिया नये आणिक । फिरूनि जन्म दुर्लभ हा.' ॥ ३२१ ॥ (कपिलगीतेवरील हरिदास आचरेकरकृत टीका.) (६) पूजा, स्नानें, तीर्थी दानें। मंत्र यंत्र याग हवनें। कीजे तितुकें फळ भोगणें। स्वर्गादिक सर्वथा ॥२०८ जप तप अनुष्ठानें। आणि नानापरीचीं साधनें। मोक्ष न पाविजे आत्मज्ञानें। वांचोनिया सर्वथा'॥२०९ (मुकुंदराजकृत परमामृत.) ४. कळून येवो, ५. दुष्ट अभिमान. **'सारा (सर्व, यच्चयावत) दुरभिमान (खोटा अभिमान) गळो (गळून जावो.)' मिथ्या देहाभिमान व तन्मूलक सर्व विषयाभिमान नष्ट होवो. देहादिविषयांसंबंधी अभिमान परमार्थज्ञानास अत्यंत घातक असल्यामुळें तो समूळ नष्ट होवो. अर्थात् अंगीं निरभिमानवृत्ति जडो. दुरभिमानः-**पंतांनीं 'दुरभिमाना'विषयीं एका ठिकाणीं म्हटलें आहे:-'बा! **दुरभिमान** न बरा; देऊळ धनपतिकरींहि खर्पर हा.।' भगवान् ब्रह्मदेवास म्हणतात:-'बहु पुरुषजन्म दुर्लभ तेथें अत्यंत सर्व हानिकर । पापाचा, शापाचा तापाचा होय गर्व हा निकर'॥ (वामनचरित्र गी० १४८.) तुकोबा म्हणतात:- 'अभिमानाचें तोंड काळें । दावी बळें अंधार. ॥ १ ॥ लाग त्यावा हातोहातीं । तोंडीं माती पाडोनी ॥ २ ॥.' 'ब्रह्मज्ञान जरी एके दिवशीं कळे । तात्काळ हा गळे अभिमान ॥ १ ॥ अभिमान लागे शुकाचिये पाठी । व्यासें उफराटी दृष्टि केली' ॥ २ ॥ ६. **संपूर्ण, समूळ.**

१. **मलिन होवो. 'हें मन पुनः न मळो—शुद्ध झालेलें मन दुरभिमानानें पुनः मळूं नये. दुरभिमानांतून एकवार मुक्त झालेलें मन अहंममतामळानें पुन्हा मलिन न होवो. भगवद्भक्तीला मनःशुद्धि अत्यंत आवश्यक आहे:-**अशाबद्दल तुकारामाचा पुढील अभंग पहा:-मन करारे प्रसन्न । सकळ सिद्धीचें कारण ॥ मोक्ष अथवा बंधन । सुखसमाधान इच्छा ते ॥ 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः । बंधाय विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतं' ॥ ('अमृतबिंदूपनिषत्') अर्थ:-बंधमोक्षांचें कारण मनच. तें विषयासक्त झालें असतां बंधन व निर्विषय झालें असतां मोक्ष मिळतो. २. **आत्मज्ञानानें, ब्रह्मज्ञानानें. 'दुरित (पाप, किंवा संचितकर्म) आत्मबोधें (ब्रह्मज्ञानानें) जळो (भस्म होवो)'. ब्रह्मज्ञानरूपी अग्नीनें जन्ममरणास कारण जें पातक किंवा संचितकर्म तें भस्म होऊन जावो. कारण स्वस्वरूपदर्शन झालें म्हणजे अहंता, विषयतृष्णा वगैरे सर्व मावळतात.** अहंता स्वरूपीं गळे । विषयतृष्णा मावळे । इंद्रियांचे लळे । क्रियेविण पूर्ण होती. ॥ १२-६ (मुकुंदराजकृत परमामृत) ३. **(तृणासारखें) जळून**

मुखीं हरि! वसो तुझी कुशलधामनामावली,

जावो. ज्ञानी किंवा पंडित फळाची इच्छा सोडून आपलीं सर्व कर्मजन्य पातकें ज्ञानाग्नीनें जाळतातः—याविषयीं गीता अ० ४ श्लो० १९ यावरील ज्ञानेश्वराची पुढील टीका वाचनीय आहेः—'जया पुरुषाच्या ठायीं । कर्माचा तरी खेद नाहीं । फळापेक्षा कांहीं । संचरेना ॥ १ ॥ आणि हें कर्म मी करीन । अथवा आदरिलें सिद्धी नेईन । येणें संकल्पेंहि जयाचें मन । विटाळेना ॥ २ ॥ ज्ञानाग्नीचेनि मुखें । येणें जाळिलीं कर्मे अशेखें । तो परब्रह्मचि मनुष्य वेखें । ओळख तूं ॥ ३ ॥ आचार्यांनींही 'अमरुशतकांत' याप्रमाणेंच दुरितदहन प्रार्थिलें आहेः—'क्षिप्तो हस्तावलग्नः इ०' (अमरुशतक, श्लो० २) 'दुरित—पापाचरण, अर्थात् त्यापासून निष्पन्न जें दुःखभोक्तृत्व तें आत्मबोधें—आत्मज्ञानेंकरून जळो—जळून जाऊ—अर्थात् दुरिताची स्वकार्यजननशक्ति न राहो; या शेवटील प्रार्थनेनें तर कवीनें आपलें पातित्य सुचवून त्यापासून आपली मुक्तता करण्यास ईश्वरास सर्व प्रार्थनेचें रहस्य निवेदन केलें असें येथें समजलें पाहिजे.' (य० पां०—पृ० ३७२.) या व मागील केकेंत कवीनें 'यति' येणारें प्रत्येक अक्षर सारखें जुळवून 'पुष्पयमक' साधिलें आहे.

१. प्रास्ताविकः—यांत कवि भगवन्नाममाहात्म्य वर्णितात. देवा! आणखी एकच वर मी तुम्हांला मागतों तेवढा मला तुम्ही द्याच. अन्वयार्थः—'हरि! (देवा!) तुझी कुशलधामनामावली (सर्व कल्याणाचें स्थान अशी तुझी नाममालिका—विष्णुसहस्रनामावली) मुखीं (तोंडांत) वसो (राहो)' [ती नामावली कशी म्हणाल तर] 'जी मावली (माउली, मातुःश्री) सकल कामना (सर्व मनोरथ) क्षणांत (उशीर न लावतां) पुरवील (पूर्ण करील). तूं जगत्रयनिवास (तिन्ही जगांस व्यापणारा असा तूं) दासांवरी (सेवकांवर, भक्तांवर) [जशी] कृपा करिशि (दया करितोस), तशी हे (ही नामावली) निजाश्रितजनां (आपल्या आश्रित जनांस) सदा (निरंतर) प्रकट (उघडपणें) सांवरी (सांवरिते, रक्षिते, उन्मार्गवर्ती होऊं देत नाहीं). प्रथमार्धाचा अर्थः—देवा! भक्तांचे सर्व मनोरथ क्षणांत पूर्ण करणारी व सर्व सुखाचें आद्यपीठ अशी तुझी नामपंक्ति निरंतर माझ्या तोंडांत राहो. ही नाममाता अत्यंत कृपाळु आहे. हिची बरोबरी इतर माता करूं शकत नाहींत. कारण प्राकृत माता मुलांचे सर्व लाड पुरविण्यास समर्थ नसतात, एवढेंच नव्हे तर जे लाड त्या पुरवितात ते पुरविण्यास त्यांना बराच वेळ लागतो. पण ही नाममाता इतकी सदय व समर्थ आहे कीं ती भक्तांचे सर्व मनोरथ एका क्षणांत पूर्ण करिते. भक्तांनीं तिच्या जवळ इष्ट वर मागण्याचाच काय तो उशीर. मागितल्याबरोबर सर्व मनोरथ पूर्ण झालेच म्हणून समजावें. पंतांनीं दहा स्तोत्ररामायणांत विष्णूचीं सहस्र नामें गोवून त्या स्तोत्राबद्दल आपली आदरबुद्धि प्रकट केली आहे. २. कुशल—सर्व ऐहिक आमुष्मिक कैवल्यप्राप्तीपर्यंत सुख त्याचें धाम—निवासस्थान अशी जी नामावली—नामपंक्ति. भगवन्नाममाहात्म्यः—परमेश्वराचें नामस्मरण सर्व प्रकारच्या सुखाचें घरच आहे. तें कोणत्याहि मिषानें

क्षणांत पुरवील जी सकल कामना, [1]मावली; ।
कृपा करिशि तूं [2]जगत्रयनिवास दासांवरी,
तशी [3]प्रकट हे [4]निजाश्रितजनां सदा [5]सांवरी. ॥ १२०
[6]दयामृतघना! अहो [7]हरि! वळा [8]मयूराकडे;

मुखांत येवो, आलें कीं सर्व पातकांचें भस्म करितें. वामनानें म्हटलें आहे:-(१) 'न कळतां पद अग्निवरी पडे, न करि दाह असें न कधीं घडे । अजितनाम वदो भलत्या मिषें, सकल पातक भस्म करीतसे. ॥' [नामसुधा]. पंत म्हणतात:-(२) 'प्रभुनमनस्मरण पुनर्वसुपुष्यनि सर्वकार्यसिद्धिकर.' (स्तोत्र रामायण). भागवत द्वादशस्कंधांत शुकाचार्य म्हणतात:-(३) 'अविस्मृतिः कृष्णपदारविंदयोः क्षिणोत्यभद्राणि च शं तनोति । सत्वस्य शुद्धिं परमात्मभक्तिं ज्ञानं च विज्ञानविरागयुक्तम् ॥.' भगवद्भक्तवर्य तुकाराम म्हणतात:-(४) 'नाम घेतां उठाउठीं । होय संसारासी तुटी. ॥ १ ॥ ऐसा लाभ बांधा गांठीं । विठ्ठलपायीं पडे मिठी. ॥ २ ॥ नामापरतें साधन नाहीं । जें तूं करिशी आणिक कांहीं. ॥ ३ ॥ हाकारोनि सांगे तुका । नाम घेतां राहों नका'. ॥ ४ ॥ (५) 'माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ रामकृष्ण. ॥ १ ॥ अवघ्या चांगलें गाऊं भलतैसें । कळेल हें जैसें मायबापा! ॥ २ ॥ तुका म्हणे मज नलगे वांकडें । मी तुझें बोवडें बाळ तान्हें'. ॥ ३ ॥ (६) 'हेंचि मागणें विठाबाई! । पायीं ठेवोनीयां डोई. ॥ १ ॥ शांति दया अंतःकरणीं । रंगो रामनामीं वाणी. ॥ २ ॥ मूळ द्वंद्वाचें विघडो । निजानंदीं वृत्ति जडो ॥ ३ ॥ तुका म्हणे हरी! । आतां आपुलेंसें करीं'. ॥ ४ ॥ (७) 'नामावांचुनि मंत्र नाहीं त्रिभुवनीं । ऐशी बोले वाणी वेदशास्त्रीं. ॥ १ ॥ पहा विचारूनि अनुभव तो मनीं । नका आडरानीं शिरूं ॥ २ ॥ नामावांचुनीयां तरलों म्हणती । ते आधीं बुडती भवसागरीं. ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम ॐकाराचें मूळ । परब्रह्म केवळ रामनाम'. ॥ ४ ॥

१. माता. हा शब्द अत्यंत प्रेमाचा सूचक होय. तुकारामांनीं व इतर भगवद्भक्तांनीं याचा आपल्या ग्रंथांतून वारंवार उपयोग केला आहे. जसें-'तूं माझी माउली तूं माझी साउली । पहातां वाटुली पांडुरंगे!' ॥ २. स्वर्ग, मृत्यु, पाताल ह्या तिन्ही लोकांस व्यापणारा तूं किंवा जगत्रय हें ज्याचें निवास (=घर) आहे असा परमेश्वर. ही नामावली भगवंताप्रमाणेंच आपल्या आश्रितजनांचा निरंतर सांभाळ करिते. ३. उघड, स्पष्ट. ४. निज-आपल्या आश्रितजनां-आश्रय केलेल्या लोकांस; ज्यांनीं भगवन्नाम कंठीं धारण केलें आहे अशांस. ५. सांवरित्ये, सांभाळ करिते, नाश होऊं देत नाहीं. ६. प्रास्ताविकः-यांत आपल्यास भवसमुद्रांतून पार उतरण्याविषयीं कवि आपल्या मयूर नांवास उचित अशी करुणास्वरानें शेवटची प्रार्थना करितात. करुणा हेंच कोणी अमृत तेणेंकरून भरलेला घन (मेघ), दयारूप जलाची वृष्टि करणाऱ्या मेघा! हें कारुण्यांभोद! अन्वयार्थः-अहो दयामृतघना! (कृपाजलाची वृष्टि करणाऱ्या मेघा!) हरि! (देवा!) मयूराकडे (मोराकडे; पक्षीं, मोरोपंताकडे) वळा (मुरडा, मज मयूरावर आपल्या दयामृताची वृष्टि करा). शिशु (मूल) रडे (रडतें) तशीसि

रडे शिशु, तयासि घे कळवळोनि माता कडे;
असा अतिथि धार्मिकस्तुतपदा! कदा सांपडे?

---

(त्याला) माता (आई) कळवळोनि (मुलाच्या दुःखानें कळवळून) कडे (कडेवर) घे (घेते); धार्मिकस्तुतपदा! (धार्मिकांनीं स्तविले आहेत पाद ज्याचे अशा देवा!) [तुम्हांला] असा (माझ्यासारखा, जन्मदरिद्री) अतिथि (याचक, भिकारी) कदा सांपडे (कधीं मिळेल? कधीं मिळणार नाहीं हा ध्वनि)? दासां (सेवकांना, भक्तांना) भवार्णवीं (संसारसमुद्रांतून) उतरितां (पैलतीरीं नेत असतां) तुम्हां (देवा! तुम्हांला) जड (कठिण) न पडे (पडणार नाहीं). प्रथमचरणार्थः—अहो! दयारूपी जलाची वृष्टि करणाऱ्या मेघा! देवा! तुम्ही या त्रितापदवपावकानें होरपळलेल्या मयूरावर आपल्या दयामृताची वृष्टि करा म्हणजे त्याला त्रितापापासून कृपा करून मुक्त करा. मयूराला सुख देणारा मेघावांचून जसा दुसरा कोणी नाहीं, तद्वत् मयूरपंताचा उद्धार करून मला सुख देणाऱ्या करुणामूर्ते! देवा! तुजवांचून दुसरा कोणी नाहीं. मेघमयूरांचा संबंध सेव्यसेवकाचा आहे:—वर्षाकालीं मेघ पाहून मोराला आनंद होतो व तो आपल्यासाठीं मेघानें वृष्टि करावी म्हणून आक्रोश करीत असतो. मेघवृष्टीसारखी सुखप्रद गोष्ट मोराला दुसरी कोणतीही नसते. मेघवृष्टि व्हावयास लागली किंबहुना नुसतें मेघदर्शन झालें तरी मयूरास अतिशय आनंद होऊन तो त्या भरांत आपला चित्रविचित्र रंगाचा पिसारा डौलानें उभारून सुंदर नृत्य करितो, हें सुप्रसिद्ध आहे. अलंकारः— 'दयामृतघना' यांत रूपक आहे. ७. हा शब्द येथें श्लिष्ट आहे. हरि—१ विष्णु, २ इंद्र. मेघवृष्टि करणें जसें इंद्राच्या स्वाधीन, तसें दयामेघाचा वर्षाव करविण्याचें सामर्थ्य भगवान् विष्णूच्या स्वाधीन. ८. मोराकडे; (पक्षीं) मोरोपंताकडे. 'मयूर' शब्दावर येथें श्लेष आहे. स्वतःस मोर म्हणवून देवास मेघाची उपमा पंतांनीं पुष्कळ ठिकाणीं दिली आहे. केका ८५ पृ० १२१ टीप पहा. अंतिम श्लोकांतील 'कारुण्यांभोद राम प्रियसख तुम्ही जो मयूरा नटाचा' हा प्रथम चरणही ह्यासंबंधानें ध्यानांत ठेवण्याजोगा आहे.

१. (त्याच्या दुःखानें) दुःखित होऊन. द्वितीयचरणार्थः—मूल रडूं लागलें म्हणजे आईच त्याच्या दुःखानें कळवळून त्याला कडेवर घेऊन समजावितें, दुसऱ्या कोणाला मुलाची कींव येत नाहीं. सुंदर उपमाः—येथें दिलेला मातेचा दृष्टांत व्यावहारिक म्हणूनच सुविशद असून फार सरस होय. हा दुसरा चरण दृष्टांतरूप होय. हाच आशय साधुमुकुटमणि तुकाराम यांनीं आपल्या एका अभंगांत वर्णिला आहे. तो वाचून पंतांचें म्हणणें वाचकांच्या मनावर चांगलें ठसेल म्हणून तो आम्ही येथें देतों:—'माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा? ॥ १ ॥ हें कां नेणां नारायणा! मज चाळवितां दीना? ॥ २ ॥' २. कडेवर, कमरेवर. ३. माझ्यासारखा, कवि मोरोपंतासारखा. तृतीयचरणार्थः—देवा! तुम्ही अत्यंत दानशील अशी उदार लोकांनीं तुमची स्तुति केली आहे व मी पुण्यधनाचा लेश सुद्धां ज्याच्या जवळ नाहीं असा जन्मदरिद्री याचक आहें. तेव्हां तुम्ही मजवर

तुह्मां जड [१]भवार्णवीं [२]उतरितां न दासां पडे. ॥ १२१

## उपसंहार.

[स्रग्धरा.]

[३]कारुण्यांभोद [४]राम प्रियसख गुरुही जो [१]मयूरा नटाचा,

---

कृपा करून माझें पापदारिद्र्य नाहींसें करा. उपमासौंदर्य:—स्वतःस अतिथि कल्पून देवाला दात्याची उपमा देण्यांत कवीनें फार चातुर्य दाखविलें आहे. कवीच्या म्हणण्यांत पुढीलप्रमाणें आशय दिसतो:—अत्यंत दानशूर व अत्यंत भिकारी अशा दोघांची गांठ पडली असतां पहिला जसा दुसऱ्याचें दारिद्र्य नाहींसें करून त्याला खूप श्रीमंत करून सोडतो व आपल्याला औदार्य दाखविण्याची आलेली वेळ सफल करितो त्याप्रमाणें देवा! तुम्ही पतितोद्धार करण्याविषयीं सदैव तत्पर असे आहां व मी अत्यंत पतित असा आहें. तेव्हां माझा उद्धार करण्यास विलंब लावूं नका. जितका याचक भिकारी असेल तितकें धार्मिकानें औदार्य जास्त समजलें जातें. शरणागत जितका जास्ती पापी असेल तितकीच भगवंताच्या पतितपावन गुणाची कीर्ति जास्त होईल. म्हणून कवि म्हणतो कीं देवा! मजसारखा पापी मनुष्य आजपर्यंत तुम्हांला कधितच शरण आला असेल. तो आज आला आहे म्हणून तुम्ही त्याला सत्वर उद्धार करून त्यामुळें मिळणारी कीर्ति प्राप्त करून घ्या. ४. याचक, भिकारी. ५. धार्मिक (दानशील, उदार अशा सर्वांनीं) स्तुत (स्तविलें आहे) पद (चरण) ज्याचें ते तुम्ही, 'वदान्यजनसद्गुरो!' (केका १.) ६. कधीं. कदा सांपडे?=कधीं सांपडणार आहे? अर्थात् कधींही सांपडणार नाहीं.

१. भव (संसार) तोच अर्णव (समुद्र) त्यांत, संसारसागरांत. चतुर्थचरणार्थ:—तुम्हांसारख्या समर्थांना आम्हांसारख्या पतित सेवकांचा उद्धार करणें कांहींच कठिण नाहीं. हें काम तुम्हांला हाताच्या मळासारखें सोपें आहे. म्हणून या संसारसागरांत गटंगळ्या खाणाऱ्या मला पैलतीरीं न्या. २. पार नेत असतां. व्यु०:—येथें 'उतरणें' या क्रियेचा 'उतरविणें' असा प्रयोजकार्थ केला आहे. ३. येथें कवि आपल्या उपास्यदेवतेचें स्मरण करून कविसंप्रदायाप्रमाणें भिन्न वृत्तांत (स्रग्धरावृत्तांत) ग्रंथसमाप्ति करितात. कारुण्य (दया) अंभोद (घन-जलद)—दयाघन. मेघाचें दर्शन मयूरास अत्यंत हर्षप्रद होतें. पंताच्या मुक्तामालेंतील पुढील श्लोक पहा:—'शृणुत मयूरा यं प्रियमाश्रितुमत्यंतमुत्सुकामुदिरं । स महाभागत आगत उत्सव एकांतिकेऽद्य नृत्यत्वं. ॥' ४. श्रीरामचंद्र; (किंवा) पिता रामाजीपंत पराडकर; [येथें कवीनें 'राम' शब्दानें पितृनामनिर्देश करून ग्रंथाच्या अखेर पित्यालाही वंदन केलें आहे.] (पक्षीं) रमविणारा, मनोरम (मेघ). अन्वयार्थ:—जो मयूरा नटाचा (नाचणाऱ्या मोराचा, पक्षीं भगवत्कथेंत नाचणाऱ्या भक्त मोरोपंताचा) प्रियसखा (आवडता मित्र, पक्षीं भक्तवत्सल) गुरुही (आचार्य देखील, मयूरपक्षीं गुरु—नृत्य शिकविणारा, मोरोपंतपक्षीं गुरु—उपास्यदेवता श्रीराम), [मयूर] भववनीं (संसार-

होतां तापत्रयार्त त्वरित भववनीं रक्षिता रानटाचा, ।

---

वनांत) तापत्रयार्त (कायिक–वाचिक–मानसिक दुःखांनीं पीडित) होतां (झाला असतां) रानटाचा (रानांत राहाणाऱ्या मोराचा, पक्षीं अज्ञ जनाचा) त्वरित (सत्वर येऊन) रक्षिता (रक्षण करणारा) [असा] कारुण्यांभोद (दयामेघ) राम (मयूर पक्षीं मनोरम मेघ, मोरोपंत पक्षीं उपास्यदेवता श्रीराम), मग (असें असतां) त्याचें (त्या घनाचें किंवा त्या रामचंद्राचें) साचें (खरोखर) स्वभद्रस्मरण (कल्याणकारी स्मरण) त्या कवीस (त्या शहाण्या मोराला, पक्षीं त्या मोरोपंत कवीला) कसें न ये (कसें येणार नाहीं)? [यास्तव] एक (एकट्या) सख्यातें (सख्या मेघातें किंवा सखा श्रीरामचंद्र त्याला) स्मरुनि (स्मरण करून) एकशें एकवीस केका (मयूर-वाणी, किंवा केकारूप श्लोक) करि (करिता झाला). ५. प्रिय जे भक्त त्यांचा सखा, भक्तकनवाळु. येथें कवीनें सावयव रूपकालंकार योजिला आहे. दाशरथि राम हाच करुणारसाची वृष्टि करणारा मेघ, व मोरोपंत कवि हाच मयूर. मोर मेघास पाहून आनंदानें नाचतो, कवि मयूरही रामकथाकीर्तनांत नाचतो. मेघ मोराविषयीं अत्यंत सदय असून त्याचा गुरु (त्याला नृत्य शिकविणारा) आहे, रामचंद्र हा मोरोपंताचा गुरु (त्याची उपास्यदेवता) व प्रियसख (अत्यंत भक्तवत्सल) असा आहे. मेघ जलवृष्टि करतो, राम भक्तांवर कारुण्यवृष्टि करितो. तसेंच मोर हा रानट (रानांत राहणारा), मोरोपंत कवि हाही रानट (अज्ञानी). ६. गुरु सुद्धां. मयूरपक्षीं–गुरु म्हणजे शिकविणारा, मोरोपंतपक्षीं–उपास्यदेवता श्रीरामचंद्र, 'गुरु' शब्दाचा अर्थ पिता होतो तेव्हां यांत कवीनें 'राम' आपला 'गुरु' म्हणजे पिता देखील आहे (अर्थात् पित्याचें नांव रामाजीपंत आहे) असें सुचविलें. ७. मयूरा नटाचा=नाचणाऱ्या मोराचा; (पक्षीं) भगवत्कथाकीर्तनांत आनंदानें नृत्य करणाऱ्या मोरोपंत कवीचा. व्यु०:–'मयूर' ह्या संस्कृताचें प्राकृतांत 'मोरो' असें रूप आहे. मराठींत 'मयूर' शब्दास 'मोर' आदेश होतो. येथें पंतांनीं आपल्या उपास्यदेवतेचें मयूरघनरूपकानें मोठ्या भक्तिपुरःसर स्मरण करून कविसांप्रदायानुरूप आपलें नांवही युक्तीनें सुचविलें आहे. असा प्रकार पंतांनीं जागोजाग केला आहे. पुढील उदाहरणें पहा:—(१) 'राघव करुणाजलधर अवलोकुनियां प्रसन्न नयनांहीं; । भक्तमयूरेश्वर बहु नाचति, ज्यांला त्रिताप भय नाहीं.' ॥ [मंत्ररामायण–उत्तरकांड–गी० ४२६], (२) 'श्रम न घडतांचि वरगति निजगुणसक्ता जनासि दे राम । सरसिजलोचन करुणामृतघन सेवकमयूर विश्राम.' ॥ [सन्नामगर्भरामायण–गी० ११०], 'एवं भक्तमयूरें श्रीमद्रामप्रसादघनपर्वीं, । केलें तांडव तोषें श्रीमद्भारततृतीयवनपर्वीं.' ॥ [महाभारत–वनपर्व–उपसंहार.]

१. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक ह्या तीन तापानें पीडित.
२. रानांत राहाणाऱ्याचा (मोराचा); (पक्षीं) अज्ञजनाचा (मोरोपंताचा).

त्याचें साचें स्वभद्रस्मरण, मग न तें त्या कसें ये कैवीस?
केका, एका संख्यातें स्मरुनि, करि अशा एकशें एकवीस. ॥१२१

१. राममेघाचें. २. आपल्यास कल्याणकारक असें चिंतन, मांगल्यसूचक स्मरण. पहिल्या तीन चरणांचा अर्थः–(मयूरपक्षीं) आकाशांत मेघ पाहून मोराला फार आनंद वाटून तो नाचूं लागतो. याचें कारण मेघ त्या पक्ष्यावर मोठी दया करून त्याला पिण्याकरितां जलवृष्टि करितो हें होय. म्हणूनच मयूर मेघाला आपला प्रियमित्र व नृत्य शिकविणारा गुरु मानतो. आणखीही मेघाचे मोरावर मोठे उपकार आहेत. जेव्हां मोर वनांत उन्हानें संतप्त होऊन तहानेनें व्याकुळ होतो तेव्हां मेघच जलवृष्टि करून त्याची तहान भागवितो व उन्हानें झालेल्या तापापासून त्याचें रक्षण करितो; इतके जर त्या मेघाचे मोरावर उपकार आहेत तर मग त्या शहाण्या कृतज्ञ पक्ष्याला आपल्या स्वतःस कल्याणकारक असें त्या मेघाचें स्मरण कसें होणार नाहीं? अर्थात् होईल. (मोरोपंतपक्षीं) भक्तवत्सल श्रीरामचंद्र हा भगवत्कथेंत आनंदानें नाचणाऱ्या मोरोपंतावर अतिशय दया करणारा असून तो त्याची उपास्यदेवताही होय. आणखी तो रामचंद्र कसा आहे तर भक्त मोरोपंत संसारवनांत तापत्रयानें पीडित झाला असतां त्याजवर अतिशय करुणा करून तो त्याचें रक्षण करितो. त्या श्रीरामचंद्राचे मोरोपंत कवीवर इतके उपकार असतां कवीला त्या आपल्या आराध्यदेवतेचें मांगल्यसूचक स्मरण कसें बरें येणार नाहीं? येईलच येईल. काव्यमांगल्यः– या पद्यांत इष्टदेवतेचें स्मरण केलें असल्यामुळें तें मांगल्यसूचक आहे. 'स्वभद्रस्मरण' ह्या शब्दानें तर मांगल्य स्पष्टच सुचविलें आहे. काव्याच्या किंवा शास्त्राच्या प्रारंभीं मध्यें किंवा शेवटीं मंगलाचरण करावें ह्मणजे त्यामुळें वीरपुरुष उत्पन्न होतात, आयुष्य वाढतें व अध्ययन करणारे उत्तम वक्ते होतात असें भगवान् भाष्यकाराचें ह्मणणें आहे. 'केकावलि' काव्यांत प्रारंभीं, मध्यंतरीं व अखेरीस अशा तिन्ही स्थळीं मंगलाचरण केलें असल्यामुळें तें मंगलमय समजावें. उक्तं भगवता भाष्यकारेण–'मंगलादीनि मंगलमध्यानि मंगलांतानि च शास्त्राणि प्रथंते, वीरपुरुषाणि आयुष्मत् पुरुषाणि भवंति, अध्येतारश्च प्रवक्तारो भवंति' (भट्टिकाव्य–भट्टाचार्यांची आवृत्ति–पृ० ६५). याप्रमाणें काव्याच्या आरंभीं मंगलाचरण करण्याची चाल बहुतेक सार्वत्रिक आढळते. काव्याच्या मध्यें किंवा अंतीं तसें केलेलें फारसें आढळत नाहीं. आपल्या कवीचें हें काव्य स्तोत्ररूप असल्यामुळें सर्वत्रच मंगलप्रद आहे. ३. शहाण्या मोरास किंवा कवि मोरोपंत यास. ४. मोराचे टाहो, पक्षीं प्रार्थनारूप श्लोक. संस्कृत भाषेंत मोराच्या शब्दास केका म्हणतात, मराठींत त्याला मोराचा टाहो म्हणतात. केकांची आवली=(पंक्ति) म्हणजे एकामागें एक मोराचे टाहो त्यांस केकावली म्हणतात. मोरोपंतानें आपल्या नांवाप्रमाणें आपल्यास मोर समजून दयाघन राम ह्यास उद्देशून जे एकामागें एक प्रार्थनारूप श्लोक रचिले त्यांस त्यानें केकावली असें योग्य नांव दिलें आहे. ५. रामसख्याला, किंवा मेघसख्याला.

**चतुर्थचरणार्थः-मोराला मेघाचें स्मरण झालें म्हणजे तो जसा एकामागें एक टाहो फोडतो, त्याचप्रमाणें मोरोपंतानें आपली आराध्यदेवता जो श्रीराम त्याचें स्मरण करून एकशें एकवीस श्लोक रचिले. मोर जसा एकट्या मेघाचें स्मरण करून तद्दर्शनार्थ उत्कंठेनें टाहो फोडतो त्याचप्रमाणें मोरोपंत कवीनें स्वोद्धारार्थ रामचंद्राचें स्मरण करून हें एकशें एकवीस श्लोकांचें स्तोत्र रचिलें.** यासंबंधीं पुढील गीति वाचनीय आहे:—'रामघनसत्प्रसादामृत जों जों बहु वळोनि वर्षतसे । तों तों भक्त मयूर रवार्या केका करूनि हर्षतसे'. ॥ (विराट ७,३७) ६. **हा श्लोक उपसंहारात्मक असल्यामुळें यांत कवीनें काव्याची श्लोकसंख्या दिली आहे.** स्फुट काव्यांत विशेषतः स्तोत्रांत पुष्कळदां **पं**तांनीं अखेरच्या कवितेंत ग्रंथसंख्या दिलेली आढळते, त्याचप्रमाणें त्यांनीं येथेंही केलेलें आहे. **ग्रंथ समाप्त झाला असतां शेवटचा श्लोक भिन्न वृत्तांत रचण्याची कवींची चाल आहे तीस अनुसरून हा अंतिम श्लोक पंतांनीं स्रग्धरा वृत्तांत रचिला आहे. ह्या पूर्वींचे श्लोक पृथ्वीवृत्तात्मक आहेत. स्रग्धरा वृत्ताचें लक्षण असें:**—'भुजंगैः मरभनैर्यैश्च त्रिभिः सप्ताक्षरैस्त्रिभिः । छंदेश्च **स्रग्धरा**वृत्तमेकविंशाक्षरं विदुः ॥ (सुवृत्ततिलक). काव्याच्या शेवटचा एक तरी श्लोक अन्य वृत्तांत रचावा ह्याविषयीं 'एकवृत्तमयैः पद्यैरवसानेऽन्यवृत्तकैः' अथवा 'सर्वत्र भिन्नवृत्तान्तैरुपेतं लोकरञ्जकम् । काव्यं कल्पान्तरस्थायि जायेत सदलंकृतिः ॥' [काव्यादर्श १-१९] असा नियम संस्कृत काव्यांत आढळतो आणि त्याचाच **पं**तांनीं अवलंब केला आहे. **शेवटल्या श्लोकाचें वृत्त भिन्न आहे आणि त्यांत ग्रंथसंख्या स्पष्टपणें दिली आहे यावरून हें 'केकावली'नामक स्तोत्र येथेंच संपलें. केकावलीच्या कित्येक प्रतींतून याच्या पुढें आणखी दोन पद्यें लिहिलेलीं आढळतात. तीं वरील कारणावरून व त्या पद्यांतील अंतःप्रमाणावरून मोरोपंतांनीं लिहिलेलीं नसून केकाश्रवणानें हर्षरोमांचित झालेल्या त्यांच्या कोणीं तरी भक्तानें रचिलीं असावीं.** आमच्या रसिकवाचकांकरितां तीं पद्यें पुढें पुरवणी १ यांत दिलीं आहेत. इति श्रीमयूरपुराणे स्तोत्रखंडे केकावलिकाव्यं संपूर्ण.



# केकावलीच्या पुरवण्या.

## पुरवणी १.

(श्लोक.)

तनू भववनीं त्रितापदवपावकें कावली,
म्हणोनि करुणस्वरें करि मयूर 'केकावली;' ।
दयाघन हरि त्वरेंकरुनि भावुका सारहा
त्रिताप हरि, त्या गमे स्वजनमीनकासार हा. ॥ १

(गीति.)

ऐकुनि विश्व सुखावे ज्या केकांचा अपूर्व तो टाहो, ।
त्यांला ईशकृपेनें आयुष्याचा कधीं न तोटा हो. ॥ २

१. शरीर. २ संसारारण्यांत. ३. त्रिविधताप हाच दावाग्नि त्यानें. ४. कासावीस झाली, पोळली. ५. मोर, (पक्षी) मोरोपंत. ६. केकांची पंक्ति-अर्थात्-'केकावलि' नामक काव्य. येथें मयूर आणि केकावली हीं पदें श्लिष्ट समजावीं. प्रथमार्थाचा अर्थः-संसारवनांत फिरत असतां कवि मयूराचें शरीर त्रिविधतापरूपी वणव्यानें भाजून तो कासाविस झाला तेव्हां त्यानें दयाघन परमेश्वरानें कृपामृतवृष्टि करून आपलें पोळलेलें शरीर थंड करावें म्हणून त्याची अत्यंत सद्गदित अंतःकरणानें एकामागून एक श्लोकरूपी टाहो फोडून प्रार्थना केली. ७. करुणामय. ८. भक्तास, अनन्यगतिकाला. ९. सार (तत्त्व)+हा (घातक) आत्मज्ञानरूप तत्त्वाचा नाश करणारा, आत्मज्ञानविघातक, भगवत्प्रेमरसनाशक. हा शब्द 'त्रितापाचें' विशेषण. १०. हरण करतो, शमवितो (त्रिताप) घालवितो. ११. त्या भक्ताला. १२. स्वजन (स्वभक्त, भगवद्भक्त)+मीन (मत्स्य)+कासार (जलाशय, तलाव)-स्वभक्तमीनांस तलावासारखा. १३. 'दयाघनहरि' यांत रूपक अलंकार आहे. द्वितीयार्थाचा अर्थः-दयाघन देवानें मयूर कवीचा टाहो ऐकतांच कृपामृताची वृष्टि करून देवभक्तांच्या परस्पर प्रेमांचा नाश करणाऱ्या त्रिविधतापांचा नाश केला. देवभक्तांचा प्रेमसंबंध इतका सुदृढ आहे कीं भक्त आपणास मत्स्य मानून प्रभुला करुणाजलानें भरलेला तडाग समजतात. १४. सुख पावतें, आनंदी होतें. १५. केकावलिरूप काव्याचा. १६. चमत्कारिक, पूर्वीं न ऐकिलेला असा. १७. केकास्वर, करुणास्वर. १८. त्या या केकांला, केकावलिनामक काव्याला. १९. चिरकाल नांदो. गीत्यर्थः-ज्या 'केकावली' काव्यांतील करुणविलाप वाचून किंवा ऐकून विश्वांतील रसिक आनंदभरित होतात तें हें 'केकावली' काव्य चिरकाल नांदो; अर्थात् रसिकलोक ह्या काव्यास निरंतर गावोत असा या पद्यांत कोणी भक्त भगवंताचा प्रसाद मागत आहे.

# पुरवणी २.

## महत्वाच्या टीपांची सूची.

# पुरवणी ३.

## अलंकारांची सूची.

या काव्यांत आलेल्या अलंकारांपैकीं बहुतेकांचा उल्लेख टीपांत झाला असून तेथें त्यांचें स्पष्टीकरणही केलें आहे. हें काव्य लक्ष्यपूर्वक वाचणाऱ्या अलंकारशास्त्रज्ञ वाचकांस आणखीही कांहीं अलंकार सांपडण्याचा संभव आहे. ह्या ठिकाणीं टिपांत उल्लेख केलेल्या सर्व अलंकारांची यादी वर्णानुक्रमानें (केका व पृष्ठ यांच्या आंकड्या-सुद्धां) वाचकांच्या सोयीकरितां दिली आहे.

१. अतिशयोक्ति (Hyperbole) के० ८०. पृ० ११२: ४३, ११९. याला 'रूपकातिशयोक्ती'ही ह्मणतात.

२. अर्थांतरन्यास-(Maxims) के० २ पृ० ८; के० २३ पृ० ६३, ६४: ४१, ११४; ४८, १३१: ६१, १६६; ७८, २०२ ८३, २११ ८४, २१२.

३. अर्थापत्ति-(काव्य)के०५,पृ० १६-१७: २१. ५७-५४, १४५; १०९,२६६.

४. अनन्वय -के० २७ पृ० ७७.

५. अनुप्रास (Alliteration)-के० १ पृ० ८. ३३, ९४: ४९, १३३.

६. अनुमान-के० ५२, पृ० १४१.

७. अनुषंग-के० ७६, पृ० १९९.

८. अनुज्ञा- के० १४, पृ० ४४.

९. अपन्हुति के० १०१, पृ० २५०-२५२ १०४, २५७.

१०. अवसर- के० १, पृ० ४. ३५, ९८.

११. असम-के० ५१, पृ० १३७.

१२. आचार-केका० २६, के० १०६ पृ० २६०.

१३. आशी-के० ५०, पृ० १३४.

१४. आक्षेप-(धर्माक्षेप)(Prolepsis) के० ४, पृ० १३-१४; के० ७, २७.

१५. उदात्त (Sublime) के० १०९ पृ० २६५; १०९, २६६.

१६. उपमा-(Simile) के० २१, पृ० ५७-५८; (मुख्यालंकार) ५८; (पूर्णोपमा) ३४, ९६; ७८, २०१; १०२, २५०; १०९, २६६.

१७. उत्प्रेक्षा-(Poetic Probability) के० ३०, पृ० ८१-८२.

१८. काव्यलिंग-के० ८, पृ० ३०; १३, ४३; ३२, ९०.

१९. तुल्ययोगिता-के० ५८, पृ० १५६; ६५, १७५.

२०. दृष्टांत-(Parable) के० ४, पृ० १३; ८, ३०; २३; ६३; ३०, ८३,

४३. विशेषोक्ति–के० ४, पृ० ११-१२; ५८,१५६.

४४. विषम–के० ६५, पृ० १७३; १०९, २६६.

४५. व्यतिरेक–के० ३१, पृ० ८६; ७५, १९७; १०३, २५६; १०४, २५७.

४६. श्लेष ( Paronomasia or Pun ) के० ३३, पृ० ९२;(तपशील)के० ४३, ११८-११९. 'केकावली'ची प्रस्तावना, अलंकारवैपुल्य हें सदर पहा.

४७. सम–के० ३ पृ० १०.

४८. समुच्चय–के० १०९ पृ० २६५.

४९. सहोक्ति–के० ८६, पृ० २१५-२१६.

५०. सार ('उदार') (Climax )–के० ५, पृ० १७; १२, ४०; ६३, १६९.

५१. संभावना–के० ४३, पृ० ११९-१२०.

५२. स्वभावोक्ति–के० १० पृ० ३५-३६; ४६, १२६.

५३. हेतु–के० ३२, पृ० ९०.

**अलंकारांचे दोन प्रकार:**—१ शब्दालंकार ( Figures of words ) व २ अर्थालंकार ( Figures of Sense ). अनुप्रास, यमक व श्लेष हे शब्दालंकार असून बाकीचे सर्व अर्थालंकार होत.

**काव्यगुण:**—

१. अर्थश्लेष–के० ३४ पृ० ९७.

२. ओज–के० ४२ पृ० ११५.

३. औदार्य–के० ३२ पृ० ९०.

४. प्रसाद–के० ४० पृ० ११२; ४२, ११५; ५५, १४७.

५. समाधि (Transferred Epithet)–के० ५१, पृ० १४०.

**लक्षणा:**—

१. उपादानलक्षणा. } (Metonymy)–के० ५, पृ० १४-१५; ७६, १९९.
२. लक्षणलक्षणा. }

**न्याय:**—

१. 'कैमुत्य'न्याय (अथवा दंडापूप' न्याय ) पृ० १६, ५७.

२. 'काकाक्षिगोलक' न्याय पृ० १३१.

३. 'नापिकपुत्र' न्याय पृ० २१३.

# पुरवणी ४.

## केकावलींतील कथानकांची सूची.

# पुरवणी ५.

## केकावलींतील श्लोकांच्या प्रथम चरणांची सूची.

# पुरवणी ६.

## निवडक (मुंबई) विश्वविद्यालयीन प्रश्न.

( १८६३ ) ( **म्याट्रिक** ) १. दयामृतघना अहो **हरि वळा** मयूराकडे । रडे शिशु तयासि घे कळवळोनि **माता** कडे ॥ वरील ओळींचें इंग्रेजींत भाषांतर करा व जाड टाइपांतील शब्दांचें व्याकरण चालवा. त्यांत सामासिक शब्द असल्यास त्याचा विग्रह करा. 'मयूराकडे' या शब्दांत असलेला व्याकरणविशेष सांगून त्याचें समर्थन करा. (के० १२१ पृ० २९३-२९४ पहा.)

**( एफ्. ए. )** १ चकोर, चातक, चक्रवाक व कौस्तुभ यासंबंधीं कविसंकेत व माहिती सांगा. २ मोरोपंत कवीचें संक्षिप्त चरित्र लिहा व त्यांच्या ग्रंथाची यादी द्या. ( परिशिष्ट 'इ' पहा ). ३ नवरसांचीं नांवें द्या व महाराष्ट्रकविवर्यांच्या ग्रंथांत त्यांपैकीं कोणते रस विशेष आढळून येतात हें उदाहरणासह सांगा. ( पृ० ६६-६७, १४९-१५० पहा ).

( १८६६ ) **( एफ्. ए. )** १ 'तसाचि उरलों कसा...विषक्षीर वी' ह्या केकेचें इंग्रेजींत भाषांतर करा.

**( बी. ए. )** १ मुक्तेश्वर व मोरोपंत या कवींची तुलना करा व मोरोपंताच्या लोकप्रियतेचीं कारणें सांगा. ( 'मोरोपंताचें चरित्र' हें सदर पहा ).

( १८७० ) **( बी. ए. )** १ अलंकार व रस यांच्या व्याख्या द्या. नवरसांचीं व मुख्य अलंकारांचीं नांवें सांगून त्यांचीं इंग्रेजी नांवें द्या. 'उत्प्रेक्षा,' 'श्लेष' व 'अन्योक्ति' या अलंकारांचें पूर्ण स्पष्टीकरण करा व त्यांचीं उदाहरणें द्या. ( पृ० १४९-१५०; अलंकारांची पुरवणी; पृ० ८१-८२, ९२-९३, ११८-११९ पहा. )

२ 'दयाब्द वळशील तूं...उमोप द्रवा' या केकेचें इंग्रेजींत भाषांतर करा.

( १८७४ ) **( म्याट्रिक )** १ '**सदैव** अपराध हे...**अजांडशतकोटि** ज्या...कां दवा?' या केकेचा अन्वयार्थ द्या व जाड टाइपांतील शब्दांचें व्याकरण चालवा ( के० ४७ पृ० ४८-४९ ).

( १८८९ ) **( म्याट्रिक )** १ महाराष्ट्र काव्यांतून कोणत्या मुख्य वृत्तांचा विशेषतः उपयोग झाला आहे व कोणत्या महाराष्ट्र कवींनीं त्यांत विशेषेंकरून ग्रंथरचना केली तें सांगा.

**( यु. एस्. एफ्. )** १ 'पिता जरि विटे...जन्मदेचें फिटे; 'अशी तरि कृतज्ञता...पुनः पुन्हा तें न गा.' ह्या दोन केकांचा अन्वयार्थ लिहा. ( के० ९५ पृ० २२९-२३०; के० ९९ पृ० २३८-२३९ ).

२ मोरोपंताच्या काव्यांतून उपमेचीं व उत्प्रेक्षेचीं पांच पांच उदाहरणें द्या. ( अलंकारांची सूची पहा ).

३ केकावलीचें वृत्त कोणतें व त्याचें लक्षण काय तें लिहा. ( 'काव्यवृत्त' सदर पहा ).

( १८९० ) **( म्याट्रिक. )** १ 'निजस्तुति तुह्मां रुचे **स्तविति**...**नमस्कृतिपरां**... **नव्हे** जना याच कां' या कवितेचा अन्वयार्थ सांगून जाड्या टाइपांतील शब्दांचें व्याकरण चालवा. ह्या कवितेचें वृत्त कोणतें?

**( यु. एस्. एफ्. )** १ 'केकावलि' असें नांव काव्याला कां दिलें? यांतील तात्पर्य काय? कवि या नात्यानें मोरोपंताचे गुण कोणते आहेत ते सांगा. (टीपा पृ० १ व कविचरित्र पहा).

२ 'तसाचि उरलों कसा...विषक्षीर वी;' 'प्रभो शरण...विना पांखरें' ह्या केकांचा अन्वयार्थ लिहा. (के० ४ पृ० ११-१२; के० ४० पृ० ११०-११२).

३ 'कळी करि सुनिर्मळी परम उग्र दावा नळीं' यांतील कथासंदर्भ लिहा. (पृ० ५६ पहा).

४ 'आर्या' वृत्ताचें लक्षण सांगा. पंतांनीं एके जागीं 'आर्या आर्यांसि रुचे हीच्या ठायीं असे जशी गोडी। आहे इतरां छंदीं गोडी परि यापरीस ती थोडी' असा उद्गार काढिला आहे तो तुमच्या मतें कितपत यथार्थ आहे? (मोरोपंताचें चरित्र परिशिष्ट 'ई' पहा).

(१८९१) (**यु. एस्. एफ्.**) १ अनुप्रास, उपमा, उत्प्रेक्षा व श्लेष यांचीं लक्षणें सांगा. (अलंकारांची सूची पहा).

२ मोरोपंतांचें संक्षिप्त चरित्र लिहा व त्यांच्या मुख्य ग्रंथांचीं नांवें सांगा व कोणते थोर पुरुष त्यांचे समकालीन होते त्यांचीं नांवें सांगा. ('मोरोपंताचें चरित्र' पहा).

३ दयाब्द वळशील...**अनन्यगतिका**...**करुणार्णवा**...उमोप द्रवा ॥ ह्या कवितेचें वृत्त कोणतें? त्यांतील गणरचना स्पष्ट करून दाखवा व जाड्या टाइपांतले सामासिक शब्दांचा विग्रह करा. ('काव्यवृत्त' सदर, व के० २० पृ० ५४-५५ पहा.)

४ 'दयामृतघना अहो...न दासां पडे' या केकेचा अन्वयार्थ द्या.(के० १२१ पृ० २९३-२९३).

५ 'केका' शब्दाचा अर्थ लिहा. (पृ० १).

(१८९२) (**यु. एस्. एफ्.**) १ यमक, अन्योक्ति व रूपक यांचीं लक्षणें सांगा.'यमक' व 'अनुप्रास' यांतील भेद काय?

२ केकावलीचें वृत्त व त्याचें लक्षण सांगा. पंतांच्या इतर ग्रंथांत व केकावलींत काय फरक आहे तो सांगा.

३ 'तुझें यशचि तारितें...**यशोरसीं** रंगती' ॥ '**कृतांतकटकामलध्वजजरा**... कापि तो हा गळा' ह्या केकांचा अन्वयार्थ लिहा व जाड्या टाइपांतले समास सोडवा.

४ 'घनांबु न पडे मुखीं उघडिल्या विना पांखरें' यांतील संदर्भ लिहा.

५ 'छंदोभंग' व 'यतिविच्छेद' ह्मणजे काय? छंदोभंगाचीं दोन उदाहरणें लिहा.

(१८९३) (**यु. एस्. एफ्.**) मोरोपंताचें चरित्र थोडक्यांत लिहा व त्यांच्या ग्रंथांविषयीं थोडक्यांत माहिती सांगा.

२ 'अजांडशतकोटि ज्या उदरिं...स्थळ दिलें नदा कां दवा?' या केकार्धाचा कथासंदर्भ देऊन अर्थ लिहा व जरूर तेथें विशेष स्पष्टीकरणार्थ टीपा लिहा. (के० १७ पृ० ४९-५०)

३ 'पिता जरि...**दयामृतरसार्द्रधी**...जन्मदें फिटे' याचा अर्थ लिहा व जाड टाइपांतील समास सोडवा. (के० ९५ पृ० २२९-२३०).

(१८९४) (**यु. एस्. एफ्.**) १ मोरोपंत कवि नव्हता असें जे कित्येक ह्मणतात त्याला अनुकूळ किंवा प्रतिकूळ असें तुमचें काय ह्मणणें आहे तें प्रमाणसहित सांगा. (पृ० १५७-१६०, ९९-१००, १२९-१३०).

२ 'न निष्ठुर पिता...ओखदें कोण पी?' ह्याचें भाषांतर करा.

३ 'न जें प्रिय सदोष...तूं अंबरें' याचा अन्वयार्थ लिहा. (के० ८५ पृ० २१३).

४ 'कळी करि...**अविशुद्ध**...दावानळीं' याचा कथासंदर्भासहित अर्थ सांगा व जाड्या टाइपांतला समास सोडवा.

५ 'उत्प्रेक्षा' व 'अपन्हुति' यांतील भेद काय? तो दाखविण्याकरितां प्रत्येकाचीं दोन उदाहरणें द्या.

६ केकावलींत कोणत्या वृत्तांचा उपयोग झाला आहे व त्या वृत्तांत गण कोणते असतात ते लिहा.

(१८९५) (**यु. एस्. एफ्.**) १ मुक्तेश्वर व श्रीधर तसेंच मुक्तेश्वर व मोरोपंत या कवींच्या काव्यांत तुह्माला कोणता फरक दिसतो व तुह्माला कोणत्या कवींचीं काव्यें आवडतात हें प्रमाणासहित सांगा. ('मोरोपंताचें चरित्र' पहा).

२ 'असंख्य खळ...**देशि वा!** अमृत **नेदिजे** घातुकें यांचें भाषांतर करा व जाड्या शब्दांचें व्याकरण चालवा.

(१८९६) (**यु. एस्. एफ्.**) १ '**कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या...** गुणैकदेशश्रमें...संभ्रमें' या केकेचा अन्वयार्थ लिहा; तसेंच त्यांतील वृत्ताचें लक्षण सांगून जाड्या टाइपांतले सामासिक शब्दाचा विग्रह करा.

(१८९७) (**यु. एस्. एफ्.**) १ रामदास व मोरोपंत यांचीं संक्षिप्त चरित्रें लिहा. ('मोरोपंताचें चरित्र' पहा).

२ 'मुक्तेश्वर' व 'मोरोपंत' यांच्या काव्यांची तुलना करा; व त्या दोघांत श्रेष्ठ कोण असें तुह्मांला वाटतें तें सप्रमाण लिहा.

३ 'करा श्रवण...**सोमला...शिवे** काय जी' 'दयामृतघना...उतरितां न दासां पडे;' यांचा अन्वयार्थ लिहा. यांतील वृत्त कोणतें आहे? जाड्या टाइपांतल्या शब्दांचें व्याकरण चालवा. (के० १०६ पृ० २५९-२६०, के० १२१ पृ० २९३-२९४ पहा).

४ 'ह्मणे अगद ऐकिलें हि न कधीं असें पाप गा!;' 'तर्री प्रभुवरा तसें गदय कां असे आज हो!' 'न तृजवरि ज्यापरी पशुपपाल कोपे क्षण' यांतील कथासंदर्भ लिहा. (के० १० पृ० ३३; के० ८१ पृ० २०६, के० ९२ पृ० २२६ पहा).

(१८९८) (**म्याट्रिक**) १ उपमा, उत्प्रेक्षा व श्लेष यांचीं लक्षणें सांगा. (पृ० ७५ ८१, ११८-११९ पहा).

(**यु. एस्. एफ्.**) १ 'कथासुरंभ...**शिशूंस**...सर्वथा वाटती;' 'पिता जरि.. **कुलकज्जले**...फिटे;' यांचा अन्वयार्थ लिहा. यांतील वृत्तें कोणतीं त्यांचीं नांवें सांगा व जाड्या टाइपांतल्या शब्दांचें व्याकरण चालवा.

२ 'भातुकें' या शब्दाचा अर्थ सांगा.

(१८९९) (**यु. एस्. एफ्.**) १ 'कवीश्वर,' 'प्रणतवत्सल,' 'अमृतकर' यांतील समास सोडवा व त्यांचीं नांवें सांगा.

२ रामदास व मोरोपंत यांच्या काव्यांची तुलना करा. ('मोरोपंताचें चरित्र' पहा.)

३ 'गमो मधुर...**सद्यशोमुख...प्रभुवरा**...ओपिशी' याचा अन्वयार्थ लिहा, यांतील वृत्त कोणतें? व त्यांतील गणरचना कशी आहे ती लिहा. जाड्या टाइपांतील समास सोडवा. (के० २३ पृ० ६२-६४ पहा).

४ 'पशुपपाळ' याचा अर्थ सांगा.

५ 'धना परिजना घरीं...सेविती,' याचें इंग्रजींत भाषांतर करा.



# मोरोपंताच्या चरित्राचीं परिशिष्टें.

## परिशिष्ट 'अ' मयूरकविस्तुति.

### १ सुप्रसिद्ध मुश्लोकलाघवकार विठोबा अण्णा दप्तरदारकृत.

इह मुख्यकलोपेतो कोऽभवत्कविनायकः ।
इति मीमांस्यमाने तु मयूरेशः स्मरत्यलं ॥ ( मुश्लोकलाघव ८१३ ).

ह्या जगांत ज्याची कविता उत्तम काव्यगुणांनीं मंडित आहे असा कोणता कविश्रेष्ठ झाला असा प्रश्न निघाला असतां मला मयूरेशाची ( मोरोपंताची ) फार आठवण येते. ( 'कविनायक' शब्दांतून आरंभींचा 'क' कार काढिला असतां 'विनायक' ह्मणजे मयूरेश किंवा गणपति उरतो असा दुसरा अर्थ ).

आर्यार्पितमहानंदः सर्वलोककृतादरः ।
विराजते मयूरेशः कल्याधरशिरोमणिः ॥ ( ८१४ ).

आर्यावृत्तांत ग्रंथरचना करून ज्यानें मोठा आनंद दिला व ज्याचा सर्व लोक आदर करितात असा कविश्रेष्ठ मयूरेश ( मोरोपंत ) चांगल्या रीतीनें शोभा पावतो. ( पक्षीं, जो आर्य-लोकांस अर्थात भक्तिमान लोकांस किंवा आर्या पार्वती हीस आनंद देतो, सर्व लोक ज्याची भक्ति करितात, ज्यानें मस्तकावर चंद्र धारण केला आहे असा मयूरेश ( गणपति ) उत्तम प्रकारें शोभतो ).

अतिचित्रकलापाढ्यः सदारामपरस्थितिः ।
कालिकाजनितानंदो मयूरेशो विराजते ॥ ( ८१५ )

ज्यानें अतिशय चमत्कृतियुक्त अशी ग्रंथरचना केली, ज्याचें श्रीरामाचे ठिकाणीं ( रामो-पासक असल्यामुळें ) सर्वदा लक्ष्य आहे, भारत भागवत रामायणादि विस्तृत ग्रंथांचें सार-रूपानें ज्यानें वर्णन केलें असा मयूरेश ( मोरोपंत ) शोभतो. ( मोरपक्षीं, ज्याचा चित्र-विचित्र पिसारा आहे, ज्याला सदोदित बगिच्यांत राहणें आवडतें, कालिका ह्मणजे मेघमाला दिसली पाहून ज्याला हर्ष होतो असा उत्तम मयूरपक्षी फार शोभतो; गणपतिपक्षीं, चित्रा नक्षत्र अतिक्रांत झाल्यावर येणाऱ्या आश्विन पौर्णिमेच्या कलापानें ह्मणजे चंद्रानें जो युक्त आहे, राम-ध्यानतत्पर शिवाच्या जवळ ज्याचें नेहमीं राहणें, कालिका ( पार्वती ) हि ज्याला आनंद देते असा मयूरेश्वर गणपति उत्कृष्टपणें शोभतो. )

## २ मोरोपंताचे चिरंजीव रामकृष्णपंतकृत.

श्रीमन्मयूरकविची देते संतोष मानवा कविता ।
असता जरि भूमिवरी सुरगुरु तरि तोहि मान वांकविना. ॥ १ ॥

## ३ मोरोपंताचे समकालीन प्रसिद्ध 'लावणी'कार रामजोशीबोवा सोलापुरकरकृत.

वाणी मयूरवदनीं जी न शुका त्या द्विजोत्तमा यावी ।
पक्ष श्रीहरि धरि जरि काय न करि जो अनंत माया वी. ॥ ( नि. मा. ६२

## ४ अनामकविकृत.

आर्यातरुचा पक्षा त्या गा बारामतींत मोराशीं ।
आर्यांत रुचा, पक्षा त्यागा बारा मतां तमोराशी. ॥ १ ॥
आर्या कविता कीजे एका बारामतींत मोरानें ।
अन्य कवी ते करिती, फिरती बारामती तमोरानें. ॥ २ ॥
बा राम तींत आहे ह्मणउनि बारामती असें नांव ।
तींत वसे तो मोरोपंत भवाब्धींत जींत नव नाव. ॥ ३ ॥
आर्याछंदें जोडुनि रामायणभारतादि आयकवी ।
नायक वीरकवींचा, ऐसा होईल अन्य काय कवी. ॥ ४ ॥
( काव्येतिहाससंग्रहांतील मोरोपंताचें चरित्र ).

## ५ रामचंद्र बडवेकृत.

भगवत्तनू हरि कथा करि आर्यांनीं अलंकृतीयुक्त ।
मोरेश्वरपंताची ह्मणती पंडित अलं कृती युक्त. ॥ १ ॥
मोरेश्वरपंताची ऐकुनि कविता मनीं सुकवि लाजे ।
पावे विवर्णता तें मी किति वर्णूं जनीं सुकविला जे ॥ २ ॥
मोरेश्वर पंताची कविता रसनिपुण सत्सभागेया ।
अभिमानें सेर्ष्य कवन करितां सम सुरभिवास भागे या. ॥ ३ ॥
अक्षरसंगति, यमकें, सुशब्द, अर्थाचिया चमत्कृतिला ।
पाहुनि भुले कवि ह्मणे बुडवूं या काय नीच मत्कृतिला. ॥ ४ ॥
आर्या केका करितचि शिरला वाटे मयूर यमकवनीं ।
सुजनासि फार पीडिल ह्मणुनि भुलविला किरातयम कवनीं. ॥ ५ ॥
यत्स्थिति पहातां मूर्धा डोलविला निज असेल जनकानें ।
यच्छांति यत्सदयता ऐकोनि किती शिके सुजन कानें. ॥ ६ ॥

आर्या अर्थविचारें गातां ही सुस्वर शिकतांना ही ।
अक्षरसंगति यमकें वेधी मन जेंवि रसिक तानांहीं. ॥ ७ ॥
कवितेंत भाषणांतहि भासे मृदुतेकरोनि शुकपिकसा ।
विश्वफळ श्रीरामा घाली कव तेंचि हा शिशु कपि कसा ? ॥ ८ ॥
सुश्लोक वामनाचा अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची ।
ओवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंताची. ॥ ९ ॥
अष्टोत्तरशत केलीं जेणें रामायणें पृथग्रस तीं ।
भारतभागवतादि ग्रंथ करी मान्य जे समग्र सतीं. ॥ १० ॥
सर्वोत्कृष्ट कवन करि परि बाधे गर्व लेशही न जया ।
सत्कुलज नम्रता धरि गुणनिभृतत्वें न होय हीनज या. ॥ ११ ॥
कठिण ग्रंथ ह्मणुनियां आर्यांतें निंदिती, न सुकवी ते; ।
मोठ्या मोठ्या कविंचे मान्या यद्वर्णिनति ओष्ट सुकवीते. ॥ १२ ॥
सुजनोत्थ कवनसद्रस दुष्टास न घेववू सके कानीं ।
संतोष मयूराच्या काय बिडालास होय केकांनीं ! ॥ १३ ॥
सुस्वर करें रसिकें आर्या गातां मयूरबाबाची ।
वेधी सुजनमनातें न तशी धुन एक तार बाबाची. ॥ १४ ॥
खग शब्द ब्रह्मजा, ह्मणउनि शुक धरितसेचि अभिधान ।
हा धरि मयूरपंतहि आणी गौणत्व यासि अभिधा न. ॥ १५ ॥
वाणी पंढरि न तसें साकेतातें सरयाविमुक्तातें ।
वर्णी भक्ताभक्ता न तसें सत्यास भवविमुक्तातें. ॥ १६ ॥
कवन सुरेंद्राद्यमरा मिळतें तरि हे सदार शिकते ते ।
सास्वर मिळतां सेविल नामाभागें उदार सिकतेतें ! ॥ १७ ॥
हें मिळतां अन्य न मनि, घृत मिळतां जेंवि सद्रसिक तेला ।
वणिज न गंगेच्याही आणुनि पावेल भद्र सिकतेला. ॥ १८ ॥
रामायणभागवतीं मंत्रोद्धारेंच रामहरिपूजा ।
संपादी ह्मणुनि भिउनि कामादिक देति हे महा रिपू जा. ॥ १९ ॥
कवनश्रवणक निर्बल मानव न रमेल येथ न रमो; तें ।
परि सज्जन श्रुतीतें भूषविलचि तेंवि जेंवि नर मोत्यें. ॥ २० ॥
केकारवें मयूरें विठ्ठलघनकाय जाण नाचविला ।
ऐशाही कवनाच्या पशु तो, नर काय ? जाणता चविला. ॥ २१ ॥
या जन्मतांचि गेल्या काशीरामेश्वरा नमायाला ।
प्रौढपणीं आर्यांतें जगतीतलही पुरे न मायाला. ॥ २२ ॥
आर्याग्रंथ रचुनि बहु विठ्ठलचित्तासि तोषवी फार ।
त्या मोरेश्वरपंता माझा साष्टांग हा नमस्कार. ॥ २३ ॥

मोरेश्वरपदपद्मा चोविस आर्यामयें कुसुमदामें ।
पूजियलें नतिपूर्वक भावें बडवोपनामकें रामें. ॥ २४ ॥

( काव्येतिहाससंग्रह–अनेककविकृत कविता भाग २ रा, पृ० २०३-२०५ ).

## ६ सुप्रसिद्ध महाराष्ट्रपंडित व मयूरभक्त परशुराम तात्या गोडबोलेकृत.

घाली प्रभुच्या कंठीं सन्मणिमाला रचोनि जो भावें ।
तेणेंही त्या सत्तममाळेंतचि तत्समान शोभावें ॥ १ ॥

## ७ कोल्हापुरस्थ लक्ष्मीपूजक दाजि मुनीश्वरकृत.

कविता मयूरकवीची, तीस मना ! सुरभि मान, वाचा वी ।
तीच सतत, निरसाया कविंहीं निजदुरभिमान वाचावी. ॥ १ ॥
ज्यां श्रीमयूरकविपरि न परिसिला सकल कवि महीवरता; ।
साजेना कां तैशा त्या कविला सकलकविमहीवरता. ॥ २ ॥
श्रीमन्मयूरकविच्या होय जसें सुख रसिकजनां कवनीं ।
विबुधेश्वरासहि तसें ऐकुनि न निनद पिकज नाकवनीं. ॥ ३ ॥

( काव्यसंग्रह, उद्योगपर्व पृ० ३३३, टीप. )



# परिशिष्ट–आ.

## (१) मोरोपंताची वंशावळ. (काव्येतिहाससंग्रह व केसरी ११.१२.१९०० वरून.)

**रामाजीपंत पराडकर** (गोत्र जामदग्न्य) × लक्ष्मीबाई

- **सोनोपंत** (काशींत)
  - **बापूजीपंत**
    - रावजी
- (बारामतींत) **मोरोपंत** × आनंदीबाई (२) × रमाबाई (१)
  - **रघुनाथ** (ग्वाल्हेरीत)
    - **गोविंदराव**
    - **केशवभट**
  - **रामकृष्णपंत** (पंढरीत) × सुंदराबाई (काशिनाथबावा पाध्ये यांची कन्या)
    - **मोरुभाऊ**
      - **नानापंत**
        - **विठ्ठलपंत.**
          - **गोविंदपंत** (खच्यास आहेत म्हणतात)
        - **बळवंतराव** उर्फ **मोरोपंत, मयूरपंडित.** मृ. शके १८२१
        - **सीताराम** (नोकर)
          - **दिनकर**
        - **रघुनाथ** (कोल्हापुरी आहेत)
          - **भास्कर**
    - **रामचंद्रपंत** (खुद्द ब्रह्मांत वारला)
    - **विठाबाई** × लिंबेकर नाडर
    - **काशिनाथपंत**
      - **विनायकपंत**
      - **रामकृष्णपंत**
        - **दत्तात्रय** उर्फ **गुंडो नाना**
          - **रामकृष्णपंत** (वाईस तळवलकरांचे घरीं)
        - **नरहरी**
      - **व्यंकोपंत** मृत्यु शके १८१८
        - **काशिनाथ** उर्फ **भय्या** (वाईस)
        - **रामकृष्ण** (वाईस)
- **आबाजीपंत** (ब्रह्मावर्ती) × सगुणाबाई
  - **बाळाजीपंत** उर्फ **आप्पा**
    - **बापूजीपंत**
  - **दिनकरपंत**
  - **सदाशिवभट**
  - **लक्ष्मणराव**

## २ मोरोपंताच्या यजमानांची वंशावळ.

**केसोबानाईक जोशी** (गोत्र शांडिल्य) [याचे पूर्वज मूळचे केळशीकर जोशी, ते पुढे काशीस गेले.]

|

**सदाशिवनाईक बारामतीकर** [यांस बाळाजी विश्वनाथ पेशव्यानें काशीहून बारामतीस आणले.]

|

- **बावूजीनाईक** × ताईबाई
  - ⋮
  - **कृष्णराय बावडेकर** (मृ. इ. स. १८[illegible])
    - × रमाबाई
    - × सगुणाबाई (मृ. इ. स. १८६३)
    - |
    - **गणपतराव** (बी. ए. वकील) (ह्यास मटनकराच्या कुटुंबांतून दत्तक घेतला)
- **आवूजीनाईक** × कमळाबाई ऊर्फ आवाई (भिऊबाई, भागूबाई)
  - |
  - **नीलकंठराय मेडतकर**
  - |
  - **नारायणराव**
  - |
  - **रघुनाथराव**
  - |
  - **सदाशिवराव** **गणपतराव** **नारायण** (दत्तक दिला)
  - **पांडुरंगराय** बारामतीकर × [illegible]
    - |
    - **सदाशिवराव**
    - |
    - **सिद्धेश्वरराव** (मृ. इ. स. १८८०)
- **गोविंदराव** (हे बुंदेलखंडात, सागरास पेशव्यांच्या तर्फे वकील म्हणून गेले)
  - |
  - **बाळाजी**
  - |
  - **रघुनाथराव**
  - |
  - **सदाशिवराव**
  - **गोविंदराव**
  - |
  - **सदाशिवराव**
  - **नांव माहित नाहीं** × [illegible] (परशुराम [illegible] [illegible] हिच्या [illegible] पुनाजी [illegible] [illegible])

## ३ पंताचे संबंधी पाध्ये यांची संक्षिप्त वंशावळ

**काशीनाथ**

|

- **यज्ञेश्वर**
  - |
  - **सदाशिव**
- **अनंत**
  - |
  - **काशीनाथ** (धर्मसिंधुकर्ता)
  - |
  - **सुंदराबाई** × मोरोपंताचे चिरंजीव रामकृष्णपंत पराडकर

(४८) शिव रा. (द्वितीय) (४९) **श्रवणामृत** रा. (५०) श्रीरमणीय रा. (५१)श्रीहररमणीय रा. (५२) **सच्छ्राव्य** रा. (५३) सत्कीर्ति रा. (५४) सत्स्व रा. (५५) सद्भक्तसर्वस्व रा. (५६) सद्रत्न रा. (५७) सद्वित्त रा. (५८) सन्नामगर्भ रा. (५९) सप्तमंत्र रा. ( ६० ) सवाई रा. (६१) सीता रा. (६२) सु रा. (६३) सूरा रा. (६४) सौम्य रा.(६५—७४) **स्तोत्र** रामायणें दहा (७५) **हनुमत्** रामायण.

**( आ ) उपलब्ध नसलेलीं.** रावजी विन केशवराव सांभारे ह्यांचा 'मे' १८६९ चा 'कल्पतरू' कोशांक व शामराव मोरोर्जींचें 'श्रीहरिचरित्रमंजरी' पुस्तक या दोहोंतही आढळणाऱ्या रामायणांची यादी— (१) **अरुण** रामायण (२) **आगम** रा. (३) आचार्य रा. (४) **कथासुधा** रा. (५) कन्यारत्न रा. (६) कौतूहल रा. (७) **जलो**-द्धतगति रा. (८) **तन्वी** रा. (९) **दंडक** रा. (१०) **धर्म** रा. (११) **नानाछंद** रा. (१२) **पुत्र** रा. (१३) पूत रा. (१४) पौलस्ती रा. (१५) प्रहर्षण रा. (१६) **बिभीषण** रा. (१७) **भावार्थ** रा. (१८) **मन्मथ** रा. (१९) मुद्गल रा. (२०) **व्यास** रा. (२१) **श्री** रा. (२२) **सत्** रा. (२३) सद्गर्भ रा. (२४) सार रा. (२५) सुख रा. (२६) सुग्रीव रा.

**(इ)** सांबाऱ्यांचा कल्पतरू कोशांक, श्रीहरिचरित्रमंजरी, व नि. मा. अंक ६२ 'स. नि. प.'चें पत्र यांत पृथगत्वें आढळणाऱ्या रामायणांची यादी (१) * **अगस्ति** रामायण (२) **अग्निवेश** रा. (३) **अद्वैत** रा. (४) *अध्यात्म रा. (५) **कल्पतरू** रा. (६) *कालिका रा. (७) ***कूर्म** रा. (८) **केशव** रा. (९) **दान** रा. (१०) **दाशप्रहर्ष** रा. (११) ***नाटक** रा. (१२) ॥ **नामच्छेद** रा. (१३) *नारद रा. (१४) **पद्य** रा. (१५) *पद्म रा. (१६) ***ब्रह्म** रा. (१७) ***भरत** रा. (१८) भविष्य रा. (१९) **रसाळ** रा. (२०) ***वशिष्ठ** रा. (२१) *वाल्मीकि रा. (२२) *शुक्र रा. (२३) शैव रा. (२४) **सत्ता** रा० (२५) ॥सद्गीत रा० (२६) सांब रा० (२७) सुसंगवी (?) रा. (२८) *स्कंद रामायण.

[टीप— * अशी खुण असलेलीं रामायणें सांभाऱ्यांच्या यादींतील, ॥ हीं 'स. नि. प'च्या पत्रांतील बाकीचीं श्रीहरिचरित्रमंजरीतील समजावीं.] एकूण पंताचीं १२९ रामायणें होतात. परंतु मोरोपंतांनीं १०८ च रामायणें रचलीं असल्यास (आ) व (इ) तील ५४ रामायणांपैकीं मोरोपंताचीं ३३ रामायणें कोणतीं असावींत याचा शोध पंतभक्तांनीं लावून तीं उपलब्ध करून काव्यसंग्रहांत छापण्यास पाठवावीं अशी पंताच्या शोधक वाचकांस सविनय विज्ञप्ति आहे.

**(ई) ७५ रामायणांची वर्गवारीः—** (१) ७५ रामायणांपैकीं, ३३ अक्षरगणवृत्तांत, ३८ मात्रागणवृत्तांत, २ अनेक वृत्तांत व २ प्राकृत वृत्तांत रचिलीं आहेत. अक्षरगणवृत्तांतील ३३ पैकीं ३१ समवृत्तांत व २ अर्धसमवृत्तांत आहेत. समवृत्तांतील ३१ पैकीं ५ अष्टाक्षरी वृत्तांत ( विद्युन्माला छंदांत १, व अनुष्टुभ छंदांत ४ ), २ एकादशाक्षरी वृत्तांत ( रथोद्धता छंदांत १ व इंद्रवज्रा छंदांत १ ), ६ तोटक, भुजंगप्रयात, प्रमिताक्षरा, जलोद्धतगति (२), व सारंग या द्वादशाक्षरी वृत्तांत, ४ मत्तमयूर, वसंततिलका, मालिनी, व पंचचामर या अनुक्रमें त्रयोदश, चतुर्दश, पंचदश व षोडशाक्षरी वृत्तांत, ५ पृथ्वी, हरिणी, लक्ष्मी, नर्दटक, व मंदाक्रांता या सप्तदशाक्षरी वृत्तांत, १ विबुध-

प्रियानामक अष्टादशाक्षरी वृत्तांत, ३ शार्दूल-विक्रीडित नामक एकोनविंशति अक्षरवृत्तांत, १ स्रग्धरा नामक एकवीस अक्षरी वृत्तांत, ३ बावीस अक्षरी वृत्तांत (अश्वधाटी छंदांत २ व अमृतध्वनि छंदांत १), व १ मदिरा नामक तेवीस अक्षरी वृत्तांत आहे. अर्धसम-वृत्तांत वियोगिनी व पुष्पिताग्रा या दोन वृत्तांतील प्रकरणें आहेत. मात्रागण वृत्तांतल्या अडतीस पैकीं ३१ गीति वृत्तांत, २ मार्का वृत्तांत, १ आर्यावृत्तांत, १ पज्झटिका वृत्तांत, २ दोहावृत्तांत, व १ सौम्यावृत्तांत आहेत.

**(उ) रामायणांचीं नावें**-हीं मुख्यत्वें चार कारणामुळें ठेविलीं असावींत असें दिसतें. (१) कांहीं रामायणांचीं नावें वक्त्याच्या नांवावरून-जसें हनुमत् रामायण, सीता रामा; (२) कांहींचीं वृत्तांवरून-जसें अश्वधाटी रामायण, ओंवी रामायण, पृथ्वीरामायण; (३) कांहींचीं त्यांतील विशेष गुणावरून जसें विचित्र रामायण, भाव रामायण, रम्य रामायण; व (४) बाकी सर्वांचीं नावें त्यांतील चित्रकाव्यगुणावरून-जसें स्तोत्ररामायणें, मंत्र रामायण, निरोष्ठ, दाम, परंतु रा.-ठेविलेलीं दिसतात.

## (३) आगष्ट १९०७ अंक १०४ येथपर्यंत मोरोपंताचा जो भाग काव्यसंग्रहांतून प्रसिद्ध झाला त्याची संक्षिप्त यादी.-

(१) महाभारत. आदिपर्व—भीष्मपर्वअखेर ७९६५; द्रोण. अ० २२ अखेर २३६९, अ०२३ च्या १२१ गी. पैकीं ३७ छापल्या. (या पर्वाच्या शेवटच्या अ० २४ अध्यायांत फक्त ३१ गीतिच आहेत.) ... १०३७१

(२) रामायणें (६९). भाग चार-४२ रामायणें ग्रंथसंख्या १०२६७; चालू पांचवा भाग ४३—६९ ची ग्रंथसंख्या २०१२; मध्यां ७० व्या सीतारामायणाच्या १६७ संख्येपैकीं २६ वृत्तें छापलीं आहेत. (यापुढें अश्वधाटी रा. ग्रं. सं. १०, ओंवी रा. १७, घनाक्षरी रा. १३६ रम्य रा. १००, व श्रीगुरु रा. ८५, हीं पांच रामायणेंच छापावयाचीं राहिलीं.) एकूण ग्रं. सं. १२३०५

(३) कृष्णविजय (संपूर्ण)... ... ३३६९

(४) मंत्रभागवत (दशम अखेर २७१८ गीति [एकच श्लोक] एकादशाच्या ३४९ गीतिपैकीं ३२७ छापल्या; द्वादशांत फक्त २२० गीति व पांचच श्लोक उरले.) एकूण ... ३०४५

(५) स्फुटकाव्यें भाग १ ला संपूर्ण ४०९२

(६) स्फुटकाव्यें भाग २ रा अपूर्ण १९९८

एकूण... ३५४८०

## (४) मोरोपंताचा एकंदर ग्रंथ ३ लक्षांवर आहे.

असें निबंधमालेंत म्हटलें असून लोकप्रवादही तसाच आहे. त्यांच्या आजवर अनुपलब्ध ग्रंथांचा कोणी पंताचे जिज्ञासु वाचक शोध लावून ते प्रसिद्ध करण्याचें महत्कार्य घेतील काय? घेतल्यास त्यांचे अखिलमहाराष्ट्रावर चिरस्मरणीय उपकार होतील.

# परिशिष्ट—ई.

## आर्याछंदस्तुति.

छंदःशास्त्रीं आद्या, सन्मान्या जसि सतीगणीं आर्या ।
आर्या हे सद्रसिका जेंवि शिवा ती तसी प्रिया आर्या. ॥ १ ॥ (स्वर्गा २. ५२)
शुद्धें अचंचल मनें अवलोकाव्या बुधें जशा आर्या ।
निःशेषपापतापव्यापत्प्रशमार्थ या तशा आर्या. ॥ २ ॥ ( २. ५४ )
ज्यांच्या गानें व्हावें प्रेमाश्रुक्षपितचंदन मयूरें ।
आर्या समर्पिल्या हरिचरणीं श्रीरामनंदन मयूरें. ॥ ३ ॥ ( २. ५५ )
वहुमानीलचि पूर्व प्रेमातें न त्यजूनि ओव्याही ।
आर्यासि ह्मणेल रसिक अभिनव विहिणींस जेंवि 'ओ'व्याही.॥ ४ ॥ (२. ५६)
आर्या आर्यांसि रुचे हीच्या ठायीं असे जशी गोडी ।
आहे इतरा छंदीं गोडी परि यापरीस ती थोडी. ॥ ५ ॥ (भीष्मभक्ति. १० )
प्रकटी प्रथम भगीरथ नृप लोकीं सुरनदीस ती आर्या ।
तसि हे मयूर नाहीं तरि सर्वांला न दीसती आर्या. ॥ ६ ॥ ( नामसुधाचषक १११ )
उचित प्रचार भासो रसिकांस प्राकृतांत आर्यांचा ।
युष्मद्वरेंचि होतो सत्कार प्राकृतांत आर्यांचा. ॥ ७ ॥ (११२)
गद्यें ओव्या सवया दोह्यातें सर्व जाणती लोक ।
श्लोक प्रिय ज्यांस जया प्रसन्न तूं पुण्यपूर्वकश्लोक. ॥ ८ ॥ (११३)
आर्यानाथा ! आधीं छंदःशास्त्रांत पिंगळाचार्या ।
आर्यांगप्या देवा ! त्वांचि पढविल्या मनोहरा आर्या. ॥ ९ ॥ (११४)
आर्यासुधा बुधांनीं आकंठ प्राशिलीच धन्यांनीं ।
कानीं मात्र परिशिल्या होती हो ती रती तदन्यांनीं. ॥ १० ॥ ( ११५ )
ते हे सुधा बुधांनीं मज लुब्धाला दिली सदा त्यांनीं ।
केलों पात्र दयेला आधीं, मग मी किलोस दात्यांनीं. ॥ ११ ॥ (११६)
सुखद प्रचार रसिकां वाटेल प्राकृतांत आर्यांचा ।
तुमच्या वरेंचि जेंवि व्रजवासि प्राकृतांत आर्यांचा. ॥ १२ ॥ (११८)
आर्यावृत्तक्षीरीं युष्मद्गुतिशुद्धशर्करा प्राज्य ।
वरि ओतिलें यथेच्छ स्वच्छ श्रीरामनाम भव्याज्य. ॥ १३ ॥ (११९)

तसेंच भीष्मपर्व ('पुरवा आर्यावृत्तें इ०) अ० १२ गी० ७९; कृष्णविजय अ० १ गी० ५, ६ (वृत्तीं आधीं आर्या ध्याव्या...५; ह्मणति भलीला आर्या...६) पहा.

---

# परिशिष्ट–ड.

## रसिकत्वाविषयीं मोरोपंताचे उल्लेख.

क्षीरवीं बहु रमला नृप, सरसीं रसिक काय तो कवनीं. ॥ १ ॥ (आदि. अ० १० गी० ८०)
सत्कृतिशीं रसिकाची तुजशीं माझी तशीच गांठ पडो. ॥ २ ॥ (आदि. १२.३७)
श्रवणीं तुमच्या मज जें रसिकांच्याहि रसिकां सुख न कवनीं. ॥३॥ (आदि० अ० २८ गी० ४९)
संधानशक्ति माझी कांपवि तन्हृदय, जेंवि शिर कविता. ॥ ४ ॥ (उद्योग० १३.७७)
रसिककवि परमसज्जन भगवद्भक्त प्रगल्भ होतील
न रमेल यांपरिस हित तो जो वदनांत अमृत ओतील. ॥ ५ ॥ (भीष्मपर्व उपसंहार ४)
खंडन करी प्रतिपदीं कटकीं दोषज जेंवि दुष्कवनीं. ॥ ६ ॥ (द्रोण. ११.२८)
ती त्याचें कांपवि, जेंसि आणुनि नेत्रांसि तोय शिर कविता. ॥ ७ ॥ (द्रोणपर्व १७.७)
ती कांपवी तयाचें, रसिकांचें जेंवि काय शिर कविता. ॥ ८ ॥ (कर्ण. ४७.४६)
सविता विसर्नासि वरी, कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता. ॥ ९ ॥ (कृष्णविजय ८६.२७)
रस न समजती, ह्मणविति रसिक ह्मणुनि चित्त बहुत हळहळतें,
जें तान्निदक भाषण होतें कर्णांत तप्त हळहळ तें. ॥ १० ॥ (रामगीति ३०)
थोरांहीं लाविले कांथ, नविदा निळहि गोरसत नाहीं. ।
मज सुरसग्रंथाहीं, वृत्ति परा जेंवि रोग वतनाहीं. ॥ ११ ॥ (रामगीति ३१)
झाली जीर्ण तरि मनीं आहे रसिकांत भर वसायाचा. ॥ १२ ॥ (रामगीति ३७)
साधुप्रसाद, आर्यामृतरस रसिकां सख्यांसि दाखवितो. ॥ १३ ॥ (नामसुधानायक ११७)
भेटो रसिक, लवहि जो ग्रंथीं चपकांत नूर्गव प्राशी ।
ऐसा वर दे वरदेश्वरचरणा ! मज मयूरविप्राशी. ॥ १४ ॥ (नामसुधानायक १२०)
उधशा करितां होइल द्रुपकन्यकाधिमर्शिकापात. ।
रसिकांसि शोधितों मी, तों चपकावरि असो तुझा हात. ॥ १५ ॥ (नामसुधा. १२१)
कटीं भरुनि व्हावें सत्कृतिला पात्र सज्जनीं रसिकीं. ॥ १६ ॥ (प्रश्नोत्तररत्नमाला उपसंहार ३)
ज्वरितासि शर्करा जसि, कटु होय खळांसि सुरसही कविता. ॥ १७ ॥ ( प्रश्नो. उपसं. ५ )
सेवावें रसिकें वच याचें श्रीराघवें जसें बदर. ॥ १८ ॥ (सन्मनोरथ. २५)
बोलूनि डोलवू हा डोलवितो जेंवि रसिक शिर कीर. ।
मग चिंता काय जडा वाटो याची सदैव किरकीर. ॥ १९ ॥ (सन्मनो. २७)
देतो सत्संग जना अमृतकराहून शुद्ध सयश तें ।
जें गावें सत्कविनीं रसिकसभेमाजि गद्यपद्यशतें. ॥ २० ॥ (सत्संगस्तव १४)
भेटे दशार्णपति, बहु वर्षे प्रेमाश्रु, रसिक सत्कृतितें ।
तेंवि दृढ धरी हृदयीं माहिपीतें कीर यथार्थ सत्कृति तें. ॥ २१ ॥ (ब्रह्मोत्तरखंड)
भक्त मयूरकरें हें श्रीगुरुनें लिहविलें सभापर्व, ।
कीं आर्यानंदाचें रसिकांचें नित्य हो सभा पर्व. ॥ २२॥ (सभा ७-९.७)

रामसुत मयूर ह्मणे ज्ञात्या रसिकांसि पसरुनी पदर. ॥ २३ ॥ (अनु. अ. ८.९९)
रामकृष्णचरणीं समर्पित ग्रंथ हो रसिकचित्त तर्पित. ॥२४॥ (कृष्णवि.पूर्वार्धे अंतिम सज्जनप्रार्थना)
सांगुनि असें दिराला निरोप हा पाठवी क्षितिवराला।
दृढ करुनि हृदय कानें तो ऐकावा समस्त रसिकानें. ॥ २५ ॥ ( कुशलवा० ४-५४)
ऐसें ऐकूनि वाल्मीकि वदता जाहला मुखें।
आकर्णावें रसज्ञांहीं स्वस्थ होऊनियां सुखें. ॥ २६ ॥ (कुशलवा० ५-५)
रसिकास जैशी कविता ती सती, पाहे योग्य पति जनीं वनीं. ॥ २७ ॥ (सावित्रीआख्यान अभंग २२)

# परिशिष्ट-ऊ.

## मोरोपंताच्या स्वकाव्याविषयीं अभिमानोक्ति व निंदकास वाग्बाण.

ऐका सज्जन हो ! भवद्गुच खरें, आश्चर्य म्यां पाहिलें,
वाल्मीकिप्रभृति स्ववंदिनिकरीं दीना मला वाहिलें. ।
केलें प्राकृत काव्य ईश्वरपदीं धत्तूरसें वाहिलें,
सांगूं काय वरप्रसाद ? अजि तें व्यासेंहि कीं साहिलें. ॥ १ ॥ (आदि. ३३-१०४)
आर्येला मानियले बहु पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला ।
खळचि न मानिति, जैसे बहु दूषणसज्ज नीच सत्कृतिला ॥ २ ॥ ( सभा. ५-११५)
गुरुघनमयूर ह्मणे निववाल्रचि सुरसिकांसि केका हो !
शंभुहि ह्मणे न सेविति मंद ह्मणुनि झुरसि काशिके कां हो ? ॥ ३ ॥ (वनपर्व १३-१०८)
रामघन सत्प्रसादामृत जों जों बहु वळोनि वर्षतसे ।
तों तों भक्त मयूर स्वार्याकेका करूनि हर्षतसे. ॥ ४ ॥ ( विराट. ५-३५ )
श्रीनारद वाल्मीकि व्यास पराशर वशिष्ठ शुक सुकवि ।
प्रतिभारक्षक; नाशक खळ किति ? अमृताश्रिता दव न सुकवि. ॥ ५ ॥ (भीष्म. उपस. ६)
श्रीरामगुरुपदाब्जीं सुकृतिनिर्तचि मयूर स्वकृति हे वाहे ।
श्रीतुलसीसीं पावुनि बहुमान न कां करील हेवा हे. ॥ ६ ॥ (शांति. ५-१२४)
वदले साधु मयूरा शुकसम गमसी वरा शिशो ! भावें ॥ ७ ॥ (अनु. ३-९४)
रामसुतमयूर ह्मणे जाणेल निका मनीं चमत्कृतिला ।
नुमजुनि कथे न मानिल तुज नेंवि, निकाम नीच सत्कृतिला. ॥ ८ ॥ (अनु. ५-१०७)
स्तवनीं समर्चनीं जरि जिव्हा हस्तें चुका, परि समोर ।
नाचा प्रभुच्या ह्मणती गुरु, कीं बहुमत शुकापरिस मोर. ॥ ९ ॥ (अश्वमेध ३-८६)
धन्य श्रीराम पिता, धन्या लक्ष्मी प्रसू जगीं झाली, ।
आली सत्यवतीची कीं भारतकीर्ति सुतमुखीं आली. ॥ १० ॥ ( स्वर्गा. २-४२)
ज्यांच्या गानें व्हावें प्रेमाश्रुक्षपितचंदन मयूरें ।
आर्या समर्पिल्या हरिचरणीं श्रीरामनंदन मयूरें ॥ ११ ॥ (स्वर्गा. २-५५)
ज्यांच्या वचनीं चित्तीं कर्मी सर्वत्र भाव कुशल वसे ।
या कृतिस तेचि गानिल सुकृती वाल्मीकिकृतिस कुशलवसे. ॥ १२ ॥ (स्वर्गा २-५७)
सच्चेतःकैरवातें विकच करि, जगत्ताप संपूर्ण टाळी, ।
अज्ञानध्वांत सारें हरि, रसिकचकोरासि अत्यंत पाळी; ॥
नानावस्तु प्रकाशी, कविहृदयपयोराशिसंतोषहेतु,
काव्येंदु स्वप्रभेनें खळविरहि जनीं होतसे धूमकेतु. ॥ १३ ॥ (प्राकृतमंत्ररा. उपसंहार ८)
विशुद्ध स्वांताला रुचति गुण पीयूषसम जे, ।
परी त्यातें दुष्ट स्वमनिं विष ऐसेंचि समजे; ॥
घृतें क्षीरें होतीं प्रमुदित मखीं निर्जर खरे,
परी तेही तापप्रदरस जयाला ज्वर भरे. ॥ १४ ॥ (मंत्र. उपसं. ९)

जसे होती देव प्रमुदित शचीनायक वनीं, ।
तसे सारज्ञाते बुधजन मयूरेश कवनीं; ॥ १५ ॥ (मंत्र. उपसं. १२)
माजी सत्कृति दूषिली जरि खळें उच्छृंखळें आग्रहें, ।
सेवावीच परंतु नित्य रसिकें हे सद्गुणाच्या गृहें; ॥
चंडाळ त्रिदशापगेंत वमला कीं धेनुला स्पर्शला, ।
त्यांचें श्रोत्रियदेवसेव्य पयही, त्याही सदा निर्मला. ॥ १६ ॥ (मंत्र. उपसं. १३)
खळ निंदिति ह्मणुनि बुधें टाकावी काय हरिगुणासक्ति? ।
दीरननणंदाजाचें साध्वी न त्यागिती सुपतिभक्ति. ॥ १७ ॥ (मंत्ररा. उपसंहार ५)
काव्य करावें म्यां नच वचकावें दूषिती परि लघूस ।
कां न सदन बांधावें कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस. ॥ १८ ॥ (सन्मनोरथराजि ९)
हा कवि मयूर हर्षे सद्धन पाहोनि सरस नाचावा, ।
अति विस्मयें ह्मणावें, खळ हो! निंदूनि न रसना चावा. ॥ १९ ॥ (सन्मनो. ७०)
प्राकृत ह्मणोनि निर्भर हांसोत अतज्ञ नीच मत्कृतिला ।
परि जाणशील बा! तूं रसिक कविवरा! मनीं चमत्कृतिला. ॥ २० ॥ (नामरसायन ६९)
तुमच्या पदप्रसादें फार चमत्कार अर्थ यमकांचे ।
त्यांत प्रभुयश, तद्वशजगदुद्धाराधिनेंचि यम कांचे ॥ २१ ॥ (नामरसा. ६९)
प्रेम, प्रतिभा, शिक्षारीति पहा, आयका बरें कवन; ।
पवनप्रियपुत्रा! बा! म्यां हें केलें न निजगुणस्तवन. ॥ २२ ॥ (नामरसा. १०३)
आर्यामुक्तामाला दावीन परंतु जरि न मागाल; ।
लागाल प्रभुकंठीं घालूं, फुगवील कीं रमा गाल. ॥ २३ ॥ (नामरसायन १०९)
संत मयूरेश्वर कृत कवनीं नवनीत कोमळीं गोडी ।
घेतील कीं तयाची करणें परगुणविवृद्धि ही जोडी. ॥ २४ ॥ (प्रश्नोत्तररत्नमाला, उपसंहार)
पद्माकांत पदींच 'कृष्णविजय' ग्रंथांबुजन्माजळीं ।
भावें वंदुनि अर्पिला हरिजनांमध्यें किती जे अळी, ।
ते याचा रस सेवितीलचि शिरीं वाहेल सन्मंडळी ।
हा स्वस्वामिपदप्रसाद खल तो भीतील जैसा कळी. ॥ २५ ॥ (कृष्ण० ९०° उपसं. ४)

# परिशिष्ट–ग.

## वर्णनविस्तार व वर्णनसंक्षेप.

पंतांच्या काव्यांत वर्णनविस्तार हा प्रकार फारसा आढळत नाहीं. त्यांना भारत, रामायण, भागवत वगैरे अनेक मोठ्या ग्रंथांतील कथा वर्णन करावयाच्या असल्यामुळें वर्णनविस्तार करण्यास सवडच नव्हती. एक रामकथाच त्यांनीं १०८ निराळ्या प्रकारांनीं वर्णिली आहे. मंत्रभागवतांत भागवतांतील सर्व कथा आणली असून दशमस्कंधाच्या आधारें त्यांनीं बृहद्दशम (कृष्णविजय)ही रचिला. याशिवाय १८ पर्वें भारत, कित्येक पौराणिक आख्यानें व अनेक स्फुट काव्यें त्यांनीं रचिलीं असल्यामुळें जेथें जेथें त्यांना विस्तारपूर्वक वर्णन करण्याची आपली आवड कष्टानें एकीकडे ठेवून व हात आटोपून वर्णनसंक्षेपच करावा लागला असावा असें दिसून येतें. तरी कांहीं ठिकाणीं त्यांनीं वर्णनविस्तार केल्याचें दिसून येतें. या दोन्ही प्रकारांचीं थोडींशीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

**(१) वर्णनविस्तार**—कृष्णविजयांत पंतांनीं थोडाबहुत वर्णनविस्तार पुष्कळ ठिकाणीं केलेला आढळतो. यांतील कित्येक वर्णनांस मूळांत मुळींच आधार नसून तीं वर्णनें पंतांच्या स्वतंत्र करामतीचीं व उज्वल प्रतिभेचीं दर्शक आहेत. कित्येक ठिकाणीं मूळांतील अत्यल्प वर्णनांत पंतांनीं आपल्या उज्वल कल्पनेचा नवीन मालमसाला घालून सुरेख चिरेबंदी काम उठवून दिलें आहे. कृष्णविजयांतील टीपांत याविषयीं जागोजागीं उल्लेख केले आहेत. याचीं थोडीं उदाहरणें:—

(नारदाचें वर्णन) जो लोकत्रितयीं फिरे, स्थिर नसे, नाटीं जगा पारद, ।
स्वांत ध्येयपदींच निश्चळ भवांबोधींत जो पारद, ॥
जो वर्णे गगनोदरीं क्षण दिसे पूर्णेंदु कीं शारद, ।
श्रीशांत:पुरचत्वरींच उतरे तो सन्मुनी नारद. ॥ १ ॥ (कृष्ण. ५५-३८.)

वरील नारदाच्या वर्णनास मूळांत कांहीं एक आधार नाहीं. तसेंच पुढें नारदानें प्रद्युम्नाचें शंबराहरणादि सर्व वृत्त कथन केलें एवढ्याशा पराला धरून कवीनें ३९—४६ या श्लोकांत वर्णनविस्तार केला आहे.

तसेंच अ० ५६ श्लो० ३५ त कृष्णाच्या सुहृद्वर्गांनीं महामाया दुर्गेची स्तुति केली एवढेंच वर्णन असून पंतांनीं कृष्णविजयांत अ० ५६ श्लो० ४०–४२ त देवीची विस्तारपूर्वक स्तुति वर्णिली आहे. अध्याय ६५ श्लो० १, ११, १३, १७, २७–२९, ३६, ३७, या श्लोकांस मुळांत क्वचितच आधार असून ते पंतांच्या प्रतिभारूपी मुशींतून निघाले आहेत. उदाहरणार्थ:—३७ श्लोकांत यमुना बळरामाच्या पायां पडली तेव्हांचें वर्णनच घ्याना:—

रामाच्या पदपुंडरीकयुगुळीं सेवी रमा षट्पदी,
किंवा भक्तसमर्पिता सुतुलसीमालाचि कीं तोरदी, ।
लोळे तत्पदशृंखळाचि, अथवा तो देव हंसच्छदीं
छाया, किंबहुना दिसे प्रभुपदीं रम्याचि कृष्णानदी. ॥ ६५-३७.

तसेंच २७-२९ श्लोकांतील मदिरापानाचें व भगवत्कीर्तिपानाचें वर्णन कसें सुरस झालें आहे त्याचा थोडासा मासला पहाः—

लज्जा, गेहकुटुंबधर्मरुचि, भी देहस्मृतीही गळे,
आधीं हांसति बाळ कर्मठ भले, होती नयां वेगळे: ।
तोंडीं शब्द विचित्र अश्रु नयनीं, पुण्यधि सारी ढळे: ।
कां पीती मदिरार्चा मूर्ख भगवत्कीर्ति प्रिया नाढळे ? ॥ ६५-२७
देहातें विसरे, न मृत्युस गणी, हांसेहि, नाचे, रडे,
लज्जा जाय, तुरेहि रीति पहिली, अन्याचि अंगीं जडे, ।
हें पानव्यसनीं असे सुख, तरी तें कीर्तिपानीं घडे,
पायीं विश्व पडे, न जाय नरकीं, कां मद्यप्या नावडे ? ॥ ६५-२८.

अ० ६९ श्लो० २६; अ० ७१ श्लो० ९, १२, १४, १५ ह्यावरून, पंतांचे रचनाचातुर्य व कल्पकता हे गुण चांगले दिसून येतात. अ० ७१ श्लो० १९-२७ हे नऊ श्लोक पंतांनीं मूळांतील एका (२१ व्या) श्लोकाच्या आधारानें रचिले आहेत. त्यावरून त्यांची विस्तारप्रियता दिसून येते. तसेंच कृष्णविजयांत पंतांनीं अनेक कल्पना अगदीं नव्या घातलेल्या आढळतात. त्यांचीं उदाहरणें शोधक वाचकांस त्यांत मुबलक सांपडतील. अ० ८१ गी० ८६–९० या पांच आर्यांतील प्रेमळ व रसाळ वर्णनास मुळांत आधार अगदींच अल्प आहे. योग्य प्रसंगीं वर्णन-विस्तार कसा करावा हें या व पुढील उदाहरणांवरून पंतांस चांगलें कळत होतें असें ह्मणावें लागतें.

पंत प्रसंगविशेषीं वर्णनविस्तार किती व कसा करित असत याचें मार्मिक व उत्कृष्ट उदाहरण पाहावयाचें असल्यास तें ८३ अध्यायांत कृष्णस्त्रियांनीं द्रौपदीला आपल्या विवाहकथा सांगितल्या आहेत तें होय. मूळांत कालिंदी, भद्रा, जांबवती, मित्रविंदा, भामा, सत्या व लक्ष्मणा यांच्या विवाहकथा एक एका श्लोकांत आटपल्या असून मोरोपंतांनीं त्यांच्या वर्णनांत अनुक्रमें ७, ८, ९, १३, १६ व २९ इतक्या गीती खर्चिल्या आहेत. रुक्मिणीचें विवाह-वृत्त मुळांत एकाच श्लोकांत वर्णिलें आहे. तें पंतांनीं अत्यंत सुरस रीतीनें ९२ गीतींत वर्णिलें आहे. पंतांनीं प्रसंगविशेषीं 'भारत, मंत्ररामायण' व 'हरिवंश' या ग्रंथांतूनही वर्णनविस्तार केलेला आढळतो. भीष्म. अ० १ गी० ९३–९५ यांतील कृपाचार्योक्तींत वर्णनविस्तार असून हरिवंश अ० ५४ तील त्रिपुरवधकथेंतही विस्तारच आहे. के० पृ०१८९–१९० टीप पहा.

**(२)(अ) वर्णनसंक्षेप किंवा विस्तारभीरुत्व**—याबद्दल तर पंतांची मोठी ख्याति आहे. महाभारतांतील कित्येक मोठालीं आख्यानें प्रसंगविशेषीं त्यांनीं थोडक्यांत ह्मणजे एखाद दुसऱ्या गीतींत आटपून टाकिलेलीं आढळतात. एवढेंच नव्हे तर कांहीं प्रसंगीं त्यांनीं एकाच गीतींत आख्यानाचें आख्यान आटपलें आहे. क्वचित् प्रसंगीं एका गीतींत दोनचार आख्यानांचा उल्लेख करून पंत पुढच्या मार्गास लागले आहेत. विस्तरभीरुत्वाचे उल्लेख पंतांच्या काव्यांत पुष्कळच आढळतात त्यांपैकीं कांहीं निवडक उदाहरणें पुढें दिलीं आहेतः—

व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी ।
आर्यावृत्तें रचितों स्वल्पांतचि आणितों कथा सारी. ॥ १ ॥ (आदि. १-१)
अमृतार्थ युद्ध दारुण केलें ती बहुकथा, असो; यत्नें ।
सिंधूंतुनि चतुर्दश संख्याक प्रकट जाहलीं रत्नें. ॥ २ ॥ (आदि. ४-६३)
रणविस्तर काशाला हेमाक्षरणीं महाकिरी टिकला. ।
कीं अर्जुन कर्णरणीं अरिस बहु लोपवी किरीटिकला. ॥ ३ ॥ (आदि. ३३-३५)
विस्तर असो तयासीं भीमासीं बाहुयुद्ध आरंभे; ।
पूर्वागत म्हणति किती हा उर्वशि! हा घृताचि! हा रंभे! ॥ ४ ॥ (सभा. १-१०१)
सेवी पांडव सिद्धाश्रमतीर्थातें; तदीय महिम्यातें ।
विस्तरभयें न लिहिलें रसिकानुमतें मनोरमांहि त्यां तें. ॥ ५ ॥ (वन. ५-१०)
स्वल्पचि रसिक मन वदति; बहुत लिहुनि काय कवि कथा लिहितां? ॥ ६ ॥ (द्रोण. ५-५४)
गाया श्रवण कराया योग्य परी ग्रंथ विस्तराकरितां ।
इतिहास गाळिला हा झाल्या श्रम सज्जहि चित्त आंवरितां ॥ ७ ॥ (कर्ण. २१-४४)
राजा! त्या देवांच्या आचार्याला प्रवेशला द्रोण; ।
मुनि वदला परि विस्तरभीरु कवि पुन्हां वदेल हें कोण? ॥ ८ ॥ (स्वर्गा. २-२३)
होउनि पुल्कसदास द्वादशमास क्षितीश तो राहे. ।
पाहे स्वप्न तयावरि तें, हें संक्षिप्त वर्णिलें आहे. ॥ ९ ॥ (हरिश्चंद्राख्यान ३-४)
नंद कुरुक्षेत्रांतुनि गेला यदुवीरही निजागारा ।
या सार कथा गातां आंवरितों ग्रंथविस्तरचि दारा. ॥ १० ॥ (कृष्णविजय ८४-४२)
वाखाणावें किति तें त्यां विस्तरभीरुनें! जयां न मन ।
विसरे क्षणहि कवींचें केलें साष्टांग हें तयां नमन. ॥११॥ (मंत्रभागवत ७-१५०)
मोठें चरित परि तसें तें देवें थोडक्यांत आटविलें; ।
कीं मुग्ध तज्ज्ञ जनाला काय श्रीवामनें न वाटविलें. ॥ १२ ॥ (मं. भा. ९-३४)
सुकुमारबुद्धि वक्ते श्रोते जे त्यांसि कीर्तनश्रवण ।
व्हाया स्वल्पचि कथा लिहिन रसिकसाधुरंजन प्रवण. ॥ १३ ॥ (हरिवंश १-७)

**(आ)** ग्रंथविस्तार फार होईल, अजून मजल पुष्कळ मारावयाची म्हणून **मुद्दाम कथासंक्षेप** केला अशांचीं उदाहरणें:—

झाला नृपति वशिष्ठस्पर्धेनें विप्र तें असो आतां
विस्तरभय दे नाहीं तरि काळाचेंहि भय नसे गातां. ॥ १४ ॥ (आदि. ३२-४०)
वाढेल ग्रंथ म्हणुनि आवरितों मी बळेंचि रसनेला ।
परि त्यां भागवतानें भागवतांतील फार रस नेला.॥१५॥(मंत्रभागवत १०-४२८)
वाढेल ग्रंथ बहु प्रणति करुनि सोडिलाचि त्यां गातां; ।
तत्वें पुरुषप्रकृती भक्त पुसे लिहिन किमपि तें आतां. ॥१६॥ (मंत्रभा. ११-४४७)

**(इ) मंत्ररचनेंत अडचण पडते ह्मणून वर्णनसंक्षेपः—**

वानावीं पाताळें सप्त बळि श्रीअनंत वानावे ।
परि मंत्रवर्ण अडविति; आदरिले गुरु कसे न मानावे? ॥१७॥ (मंत्रभा. ५-६२)

**(ई) खुबीदार वर्णनसंक्षेपः—**

ज्या पापें सुरवानरकृतघनजयरव मुहूर्तें लोपविला, ।
खळदारविलापरवा कां वर्णिल कवि मयूर कोपविला? ॥ १८ ॥ (वनपर्व १२-८०)
त्याच्या दक्षिणपार्श्वीं अश्वत्थामा, पुढें कृप, द्रोण ।
दुःशासनादि बहु खळ होते, आर्यांत योजितो कोण? ॥ १९ ॥ (विराट. ६-२२)
श्रोते हो! वर्णावें किति? मज गप्पी असें वदाना कीं? ।
स्वल्प उपप्लव्यपुरीं उत्सव, बहु होय हो तदा नाकीं. ॥ २० ॥ (विराट. ७-३५)
खळकृतगुरुनिंदेतें वर्णील कधीं न विस्तरें सुकवि; ॥
कीं ती श्रीगुरुभक्ति प्रेमामरपादपांकुरा सुकवि. ॥ २१ ॥ (विराट. ४-१७)
रावणसा बहु विनवी प्रेम प्रत्यक्षरींहि नव दावी।
कीचक नीच कलुषनिधि त्याची आर्यांत गोष्ट न वदावी. ॥२२॥ (विराट. १-४७)
देवाच्या कीं गातीं तद्भक्तांच्या यशास नर; कां तें ।
हर्षद सोडुनि, वर्णूं तापद जे त्यां कशास नरकातें? ॥ २३ ॥ (मं. भा. ५.६४)

**(उ) अतिसंक्षेप.** आख्यानाचें आख्यान किंवा दोनचार आख्यानें एकाच गीतींत आटोपल्याचीं थोडीं उदाहरणें:—

एक कृषीवळ—पीडित दुर्बळ वृष पाहतांचि महिवरती, ।
ख्याता सुरभी देवी स्नेहें झाली उदंड गहिंवरती. ॥ २४ ॥ (वन. १-३०)
तो ब्राह्मणमाहात्म्य क्षत्रियमाहात्म्य त्यासि आयकवी; ।
वर्णी पतिव्रतेचें माहात्म्यहि सर्व योगिराय कवी. ॥ २५ ॥ (वन. ६-५५)
धर्मव्याध स्कंदप्रभवादि कथा उदंड तो बोले; ।
श्रवणें धर्म ब्राह्मणगण नारद फार देवही डोले. ॥ २६ ॥ (वन. ६-५६)
सांगुनि निजवृत्त, तिचें वृत्त पुसे तीस कोटिक विहितसें, ।
स्वल्पांत तीहि सांगे बोलों शकती न कोटि कविहि तसें. ॥ २७ ॥ (वन. ९.५)

तसेंच आदि. ८, ५६; ९-१; २७-२६; सभा. १-११; २-२४; २-३९; वन. १-९६; ५-३; ५-१२; ५-७२; १२-७९, १३-७२; अश्व. ५-१२८; विराट. ४-९७; उद्योग. २-१७; ३-७३; ३-९५; ४-१७; कृष्ण. अ. ७०; ८५-४९; ८८-८५; मंत्रभाग. ४-१०७; ५-६१; ५-६३; ८-१५४; ९.३६९—३७०; १२-८०; पहा.

# परिशिष्ट–ऋ.

## (१) अनुप्रासचमत्कार.

सारख्या अक्षरांची आवृत्ति होणें याला अनुप्रास ह्मणतात (वाग्भट). जेथं केवळ व्यंजनांचेंच सादृश्य असतें किंवा एका व्यंजनाची अनेकदां आवृत्ति होते तेथं वृत्त्यनुप्रास होतो (अलंकारसर्वस्व). जेथं अनेक व्यंजनांची स्वररहित किंवा स्वरसहित अशी वारंवार आवृत्ति होते तो छेकानुप्रास जाणावा. शब्दार्थाचें स्वरूप भिन्न नसून तात्पर्य मात्र भिन्न असतें, किंवा जेथं अर्थरहित शब्दाची आवृत्ति होते (अन्वयमात्र भिन्न पदाशीं असतो) तेथं लाटानुप्रास समजावा. मोरोपंताच्या काव्यक्षेत्रांत अनुप्रासांच्या पिकांची रास अतिशय झालेली आढळते. त्यांतून कांहीं निवडक उदाहरणें पुढें दिलीं आहेत:—

श्रीकृष्णाचें चित्तीं चिंतावें सुचिर चारु पदकमळ; ।
प्रक्षाळी हृदयींचें जें श्रीवक्षस्थळैकपदक मळ. ॥ १ ॥ (श्रीरामभक्तिभाग्य १)
देवा दयासमुद्रा दत्ता! दासासि देसि अपवर्ग. ॥ २ ॥ ( दत्तदयोदय १३)
हित इतर न धन शमसम, यावरि तुज हें न कार्य सत्र पहा; ।
कवि रविरुचि शुचिभव नव व्हावा येणें न आर्य सत्रप हा. ॥ ३ ॥ (आदि. ३३-९४)
दावीं प्रियेसि अगनगगगनगखग मृग नवे नद नद्या या ॥ ४ ॥ (वन. १२-१३४)
तो पाशपाणिपुरुषाप्रति पतिपार्श्वीं पतिव्रता पाहे. ॥ ५ ॥ ( वन. १३-५३ )
धीर धरुनि धर्मज्ञें धीरें धर्में धनुष्य चढविलें. ॥ ६ ॥ (द्रोण. २-२७)
पावे पराक्रमि पुरुष पति पाहुनि दर्पिपारणा रंभा. ॥ ७ ॥ (द्रोण. २०-७९)
विश्रुतविभव वरप्रद विभु विश्वाधार विश्व जो रचितो. ॥ ८ ॥ (कर्ण. २१-४३)
स्पर्शे पिनाकपाणी परमेश्वर पूतपाणिपद्मानें ॥ ९ ॥ (कर्ण. २२-२३)
भक्षिति गरुड पळति अहि, महिसहितहि अहित कांपती धाकें ।
पक्षिपपक्षपवनरय भय दे, जय देव ह्मणितलें नाकें. ॥ १० ॥ (कर्ण. ३३-४७)
पल्यंकावरि पडला पांडुपृथापुत्र पावला पीडा;
वैरिविजित विक्षतवपु विमुखत्वें वीरवर वरी व्रीडा. ॥ ११ ॥ (कर्ण. ३९-६)
करिल क्रूर कुमति कुरुकुळकीर्तिकलंककाळ कां हो तें? ॥ १२ ॥
( शल्य. ३-६८ )

मुनिमान्य मुक्तिचा हा मार्ग महामहिन मानला मजला. ॥ १३ ॥ (शांति. ३-२६)
सेवुनि सोमरसातें सकल सुरसमाजसहित शतमन्यु ।
स्वर्गासि जाय होउनि सत्कृत सानंद साधु गतमन्यु. ॥ १४ ॥ (अश्व. ३-७५)
झाला हा निबरवया हानि बरवया न जाणतां होय ॥ १५ ॥ (अश्व. १-१२५)
भीम वधी पर–वारण परवा रणपंडिता तया नाहीं. ॥ १६ ॥ (कर्ण. ३८-२१)

कृष्णा ! कृपी कृशाकृति कृपणा झाली पहा महाशोकें. ॥१७॥ (स्त्रीपर्व ५-४२)

देवि ! दयावति दवडिसि दासाची दुःखदुर्दशा दूर; ।
पापातें पळवितसे परमपवित्रे तुझा पयःपूर ॥ १८ ॥ (गंगास्तुति ५१)

त्रिभुवनरक्षादक्षा ! नमितों तुजला स्वभक्तसुरवृक्षा !
तिमिरद्विपहर्यक्षा तेजःपक्षा क्षतामरविपक्षा ! ॥ १९ ॥ (कुशलवा० ९-३)

उरःक्षतक्षरत्प्रभूतरक्तसिक्तविग्रह । प्रमीलिताक्ष तो जगत्क्षयीं जसा रवि ग्रह॥
सुराश्रुबिंदुसंततीसह क्षणें रथीं पडे । सखेद लेख देखतां प्रमोद त्यांसही घडे ॥
२० ॥ (कुश० १३-३१)

प्रचंडपंक्तितुंडदंडदक्ष बाहुदंड हा ।
किशोरकांड खंडितां स्वपिंड जाहला अहा; ॥
सनोक देवलोकही सशोक तो करी क्षमा—।
तळीं निजाश्रुवृष्टिला तृणोद्गमास जे क्षमा. ॥ २१ ॥ (कुश. १३-३२)

क्षेत्रज्ञ ! क्षमिणांवर ! क्षितिभरक्षत्रापह ! क्षोभण !
क्षुत्तृष्णादिविकारषट्करहित ! क्ष्मानिर्जरैकप्रिय !
क्षत्तृप्रेमपद ! क्षताहितपद ! क्षेमालय ! क्षौद्रवाक !
क्षेत्रेश क्षणदाचरेशदमन ! क्षोणीपते ! पाहि मां. ॥२२॥ (हरिसंबोधनस्तोत्र ८२)

पतिप्रतिनिधिप्रति प्रभुवरक्रिया पाहती. ॥ २३ ॥ (कृष्णविजय ५५-२७)

गणपति गुरु गुह गौरी गिरीश गंगा गुणाढ्य गीर्देवी॥२४॥(कुशलवा०१-१)

भूषाभुजंग भक्ताभीतिद भव्यप्रभाव तुज भार ।
भावी भयं भवानीभर्ता भगवान् भुले भला फार.॥२५॥ (कृष्णवि.८८.३७)

सुटल्या सटा समस्ता सुरसरितासलिल सर्प सोमसुधा ।
सांडिति सरणींत ह्मणे सूतशुकव्यास सर्व सत्य बुधा. ॥२६॥ (कृ.वि. ८८-३८)

कटु परि पटु हरि बटु वरि अमृताधिक मधुरबोलणें बोले, ।
पळभरिखळकरिबळहरिवदला,परि आज कविसभा डोले.॥२७॥(कृ.वि.८८-३९)

नयनागोचर देवर झाल्यावर ती पडे धरेवरती ।
तळमळ करि, पळभरि खळ न पडे, करपद तिला न आंवरती. ॥ २८ ॥
(कुशलवा. ४-३७)

जनहीनवनस्थानीं दीना जनकनंदिनी ।
राजरामा रजोरिक्ता रुचिराक्षी रवें रडे. ॥ २९ ॥ (कुशलवा. ४-३८)

विश्वांत विश्वपावन विस्तृत विघ्युक्त होय तो यज्ञ. ॥३०॥(अश्वमेध. ४-३८)

चळली मळली कळली बळिकन्या तेहि पूतना मातें. ॥३१॥ (हरिवंश.११-४६)

राणी आणी पाणी नयनीं, करि घाबरें जगत्सदन. ॥ ३२ ॥ (हरि. २६-६६)

शंकरेशान शशिचूड शितिकंठ शिव शर्व शाश्वत शरण्येश शंभो !
भाललोचन भुजगभगिनभूषण भवानीश भवभीतिहर भद्रभजना !
गरलगल गुहगजाननतात गोवाह गीर्वाणगणगीतगुणभाजना ! ॥ ३३ ॥
(मोरोपंतकृत, स्फुट काव्यें भाग १ पृ० ३७१ समग्र पद पहा.)
वाल्मीकिकृतिस्वकथा केवल कल्याणराशि कुशलवती ॥ ३४ ॥ (दशम मंत्ररामा. ७३°)
दामोदर दासा हे अनुमोदन तो करावया नवरी ।
दादास देव दावी दारकरीनि स्वयें सदैव वरी. ॥ ३५ ॥ (कृष्ण. ८६-१७)
या तेजा भजनों तरि कुक्कुर वृक काक कंक कां खाते ? ॥३६॥ (स्त्री. ६-६०)
मधुनिलय मधुवनातें मर्दुनि मनुवंशमानवेशाला ॥३७॥ (मं.रा.सु.३४८)
रक्षोराज क्षोभे मारीचा राक्षसा पुढें प्रेषी. ॥ ३८ ॥ (दीर्घरामायण २६)
आली सीता भीता, दारा वीरा म्हणे पतिप्राण ।
रक्षीं, लक्ष्मी धर्मा, साधो ! बाधो न मी करि त्राण. ॥ ३९ ॥ (दीर्घरामा. २९)
अंभोदसंनिभ सुभग भावुकजनभव्यभाग्यभर भोळा ।
भासे उभा शुभाशय शयविधृतानतंबाबिंब हरि डोळां ॥४०॥ (आर्याके. ५२)
हा कल्पपादपाचा रोपा, लसल्लसित कोवळा, सोपा ।
याच्या आंगीं खोपा, घेती सनकादिहंस मुमक्षोंपा. ॥ ४१ ॥ (आर्याकेका ५४)

(२) **अर्थानुरूपध्वनि.** (अ) काव्यकलांतील ध्वनि अर्थाचा प्रतिध्वनि असावा हें पाश्चात्य व पौर्वात्य काव्यशास्त्रज्ञांस संमत असलेलें तत्त्व मोरोपंतासही मान्य होतें असें दिसतें. अर्थाप्रमाणें शब्दरचना कोमल, कठोर, मृदु, मधुर, तीक्ष्ण असावी ही गोष्ट पंतांस चांगली अवगत होती. याची थोडीशी उदाहरणें खालीं दिलीं आहेत:—

गोपशिशु म्हणति, 'पलिसा ललनां हलितेंचि झालिल्या पाय,।
गाला उल्लोनि पलला, गल्व खलें, नवल कलितसा काय!' ॥१॥ (हरिवंश. १३-९)
समजावुनि त्यांसि म्हणे, 'एसें लालिचल्यासि माल्लीन ।
कां ललनां आललनां पललनां मी मागलांत ताल्लीन.' ॥ २ ॥ (आदि. ३०-३२)
कलचलनाला ललनां झालिल अगतां कुमाल बहु आल्लतां,
सकताम उघल घलला पदनखलसलल, तोंचि हा घलघलला. ॥ ३ ॥ (कृष्ण. ७-९)
प्रस्फुरदधरदल प्रभु बलभद्र म्हणे 'खरेंचि सांगारे!' ॥४॥ (कृष्ण. ८६-३९)
खरतर नरहरशर परजीवन एकक्षणींच संहरती. ॥५॥ (वन. ३-७)
होती शब्द खणखण व्योमीं उडती तुटोनि खंड सणसण. ॥६॥ (प्रल्हादविजय १)
तेव्हां दांत करारा चावी, फिरवी मुरारि नेत्र गरारां. ॥ ७ ॥ (प्रल्हादवि. ३-११)
जरि न वळतें विशृंखल खळखळ खळरक्तपूर वाहविती. ॥ ८ ॥ (वन. २-३३)
तेव्हां स्तविति खल खलां, गळति खळखळां सुसाधुनेत्रजळें. ॥ ९॥ (सभा. ६-८८)
चोळी खळांनकर कर, करकर रद खाय, हाय हाय करी. ॥१०॥ (आदि. २९-१४)
गाजत, वाजत, साजत, आज नया जनन करुनि आणा हो! ॥११॥ (विराट. ६-७५)

ज्याचे पितीहि घटघट घटघट घडि घडि घरींहि अरि पाणी.॥१२॥(उद्योग. १०-७२)
क्षतजप्रतिमाक्ष क्षितिनाथ क्षण न क्षमावशीं राहे. ॥१३॥ (कर्ण. ४०-४५)
शापगुणझणत्कारें दिग्वारण मस्तकेंहि झणझणवी. ॥१४॥ (कर्ण. ४८-५१)
नरवर गरधरखरतरशर करकर दांत खाउनी सोडी.॥ १५ ॥ (शल्य. २-८४)
ऐसें गर्जुन अर्जुन भरभर खरतर शरप्रकर सोडी. ॥१६॥ (अश्व. ५-६६)
द्विज खरतरशरनिकरें निकरें करि अरिशरीर तक्षणही. ॥ १७॥ (कर्ण. ३६- ३५)
सूं सणणण सणणणणण वाजति शरनिकर कायहानिकर. ॥१८ ॥ (भीष्म. ३-५८)
शुक पिक सकल कलकलस्वरें करुनि भोंवतीच आरडती ।
विविधपतगनिकररवच्छलें करुनि भूमिभूलता रडती. ॥ १९ ॥ (कुशलवा. ४-७७)
यापरि अवार करि वरि खरतरशरवृष्टि, दृष्टि हरि त्यांची. ॥२०॥ (कर्ण. ३०-६४)
संनद्ध युद्धबद्धश्रद्ध क्रुद्ध प्रसिद्ध विबुधारि. ॥ २१ ॥ (मंत्ररामा. ६.५८२)
ते दुंदुभि वाजविती धिमिधिमिधिमि देवलोक आनंदें, ।
गंधर्व करिति तननन तत्थैथैथय्य अप्सरोवृंदें. ॥ (मंत्ररामा. ६.५९५)

**(आ)अनुकरणवाचक शब्द:**—हा ध्वनि साधण्यांत 'कचाकच' (द्रोण. १२.१६३), 'करकरा' (कर्ण. १७.२५), 'खळखळा' (सभा. ६.८८), 'खदखद' (सभा. ३.३५), 'घटघट' (कर्ण. ४६.५८), 'चरचरा' (कर्ण. ४५.१४), 'झटझट' (सभा. ५.८९), 'डरडरा' (सभा. २.२५) 'परपर' (द्रोण. ११.११०), 'फरफरा' (सभा. ५.७), 'भरभर' (अश्व. ५,६६), इत्यादि पुष्कळ अनुकरणवाचक शब्दांचें पंतांना मोटें साह्य झालें असून त्यामुळें काव्यरसपाकही खमंग उतरला आहे.

# परिशिष्ट–ह.

## मोरोपंताचीं यमकें.

जीं अक्षरें ज्या क्रमानें एकापुढें एक अशीं एक वेळ आलीं असतात त्याच क्रमानें फिरून त्यांची आवृत्ति झाली असतां तेथें यमकालंकार होतो. यमकें दोन प्रकारचीं:–१ संयुतावृत्ति व २ अयुतावृत्ति. पहिल्यांत मध्यें इतर पदें नसतात, दुसरींत तीं असतात. संयुतावृत्ति व अयुतावृत्ति यमकें हीं पादाचीं (चरणाचीं), पदाचीं किंवा वर्णाचीं असतात. म्हणजे संयुतावृत्ति पादयमक, संयुतावृत्ति पदयमक, संयुतावृत्ति वर्णयमक, अयुतावृत्ति पादयमक, अयुतावृत्ति पदयमक, व अयुतावृत्ति वर्णयमक असे सहा प्रकार होतात. तसेंच संयुतावृत्ति यमकाच्या तीन प्रकारांपैकीं प्रत्येकाचे आदि, मध्य व अंत्य असे तीन उपप्रकार असून अयुतावृत्ति यमकाचे आदिमध्य, मध्यांत, व आद्यन्त असे तीन उपप्रकार आहेत. असे एकंदर यमकाचे अठरा भेद झाले. प्रथम पादाचें तृतीय पादाशीं यमक साधलें असल्यास त्यास 'संदंश', द्वितीय पादाचें चतुर्थपादाशीं यमक असल्यास 'संदष्टक', व प्रथमार्धाची द्वितीयार्धांत आवृत्ति झाली तर 'समुद्र' अशीं नांवें 'काव्यप्रदीपां'त दिलीं आहेत. पंतांच्या काव्यांत विशेषतः त्यांच्या भारत, कृष्णविजय व कुशलवाख्यानांत यमकांची गर्दी झालेली आढळते. त्यांचीं थोडीं निवडक उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

### (१) संयुतावृत्ति यमकें· (अ) संयुतावृत्ति आदिपदयमकें:–

**जलजल**सद्रम्यमुखी, **नव नव**नीतापरीस मृदुला हे; ।
**शिव ! शिव !** मजविण भीरू **न वनव**सति दुःख भोगणें लाहे. ॥ १ ॥ (कुशलवाख्यान २·४५)

**हा ! सति ! हासति**रस्कृतचंद्रे ! तुज विकुनिही न घामेलों; ।
**हा ! तनय ! हातनय** मी जोडुनिहि न या महा अघा, मेलों. ॥ २ ॥ (हरिश्चंद्राख्यान २·६५)

**अहित अहि,** तयां झाला **विवर, विवर** गांपडे दिलें न रणीं; ।
**महित मँहित**ळीं झाले **न मुनि न मुनि**मुत हटी द्विषन्मरणीं. ॥३॥ (आदिपर्व १६.३१)

### (आ) संयुतावृत्ति मध्यपदयमकें:—

पुशी अव**निजा निजा**श्रुस**लिला**-। **लिला;** सुवि**कळा कळा**र्नाभिमुखी; ॥
उठूनि, **नमुनी मुनी**स मग **ती,** । **गती** करि **तदा तदा**श्रमपदा.॥४॥(कुश. ५.११)

भवाब्धि सु**कवी कवि**प्रिय **करी** । **करी**शनम **हा महा**दय हरी ॥
सुकीर्ति पर**मा रमा**प मि**रवी** । **रवी**डित**महा महा**सद नवी. ॥ ५ ॥
(विचित्र रामायण १)

( वरच्या दोन उदाहरणांत कवीनें दामयमकही साधिलें आहे. विचित्ररामायणांतील प्रत्येक श्लोकांत मध्यपदयमक व दामयमक हीं विचित्र रीतीनें साधिलीं आढळतात. )

**सुसव वासव वा**नि असा करी; । **मुनिजना निजना**यक उद्धरी; ॥
**यश मला शमला**पह तें रुचे; । **ठकवितें, कवितें** न दुजें मुचे. ॥ ६
(कृष्ण. ८०-४२

करिति विठ्ठलभक्त कथा बरी, । सुदृढ बाळहि जीस मनीं धरी; ।
वश जयासि सदा भगवान् हरि । **कुतुक या तुकया**परि भूवरी. ॥ ७
(विठ्ठलभक्तस्तुति ५

('विठ्ठलभक्तस्तुति' या प्रकरणांत पंतांनी रघुवंशाच्या नवव्या सर्गातील श्लोकांप्रमाणें प्रत्येक चतुर्थचरणांत संयुतावृत्ति मध्यपदयमक साधिलें आहे.)

**भव ! न तेऽवनते** कठिनं मनः । **सुरगुरो रगुरो**रिव भोगिनि ! ॥
**कुरु चिरं रुचिरं** शिरसीश मे । **स्वपदमापदमा**शु यदुद्धरेत्. ॥ ८ ॥ (शंकर-स्तव २३)

## (इ) संयुतावृत्ति अंत्यपदयमकें:—

फार तूं श्रमलीस हिंस्रगणांचिया भ**वनीं वनीं**; ।
दुःखभीतिसमयावरि क्षितिकन्यके न **मनीं मनीं**; ॥
प्रार्थिली असि पूजिली मग तापसीनि**करें करें**; ।
अर्पिलीं तिस कंदमूळफळें मुनिप्र**वरें वरें**. ॥ ९ ॥ (कुशलवा. ५-१४)
ह्मणे सत्या अत्यादृतमति मला हा **वर वर**; ।
स्वताताच्या गोष्टी प्रियसखि ! बऱ्या या **वरवर**; ॥
पदीं कन्यारत्नार्पण न करि, मध्यें **करकर** ।
स्तुतीची; हा अंबे ! त्वरित धरु गोदा**कर ! कर**.॥१०॥ (कृष्णविजय ५८-२१)
पुढें येऊनियां भीमा बोले वार्ग**शिवा शिवा**; ।
लवे लोचनही तीचें त्याकाळीं उ**जवें जवें**. ॥ ११ ॥ (कुशलवा. ४-३)
शिशुच्या न रुचे **शमनास मना**; । जन शिक्षि, न तूं **वदना ! वद ना**;
वचकें न निरा**शमना ! शमना**; । वनवृत्ति भजे **भवनाभ वना**. ॥१२॥
(हरस्मर्णार्यु रामायण. ४३)

## (२) अयुतावृत्ति यमकें:—(अ) अयुतावृत्ति आदिपदयमकें:—

**तरणि**वर बसुनि झडकर **तरणि**कुलवरक्ष्माभृदनुकूला ।
**देवर**तिकर नदीच्या **देवर**सह शीघ्र जाय परकूला. ॥ १३ ॥ (कुशलवा. ४-१३)
**ओक** आत्मधनस्त्रीतें **ओक** मानूनि मानसें ।
**तोक**वत् रोदन तदा **तो क**री ऐकतां असें. ॥ १४ ॥ (कुशलवा. ४-३४)
**प्रभाव** ज्याचा निःसीम **प्रभा** शुभ्र हिमाहुनी, ।
**प्रभा**तुगुरु तो हर्षें **प्रभा**साप्रति पाहुनी. ॥ १५ ॥ (कृष्णविजय. ७९-२७)
तो **दा**साचा कल्पशाखी **मोदा**मृतपयोनिधि ।
**गोदा**वरीस जाऊनि, **गोदा**नें दे यथाविधि. ॥ १६ ॥ (कृष्णविजय. ७९-१३)

वासराधिपराजीवा ! वासरा जननीस्तन ।
वा ! सरा ! भक्तयादांच्या आसरा तूं दयाघन. ॥ १७ ॥ (विठ्ठलविज्ञापना १७)
कुशल वचन ऐकतांचि ऐसें, कुशलव मुष्टिधर द्विजेंद्र गेला; ।
रुचिरवदनबालकद्वयाच्या । रुचिरवसंग्रहणें प्रहृष्ट झाला. ॥ १८ ॥
(कुशलवा. ५-२४)

कृष्णाग्रजावरज वळकृष्णाश्रित करुनि कीर्तिला जनन, ।
कृष्णात्मजकुलनंदन कृष्णापति वीर पावले वनन. ॥ १९ ॥ (आदि. ३६-६७)
पर्वरात्रिरमणामृतभासां सर्वगर्वहर निर्मलकांते ।
पर्वतेश्वरसुताधव शंभो ! शर्वमामवननं जनमार्तम् ॥ २० ॥ (शंकरस्तव १)
राधापुत्र वहु करी बाधा पार्थासि; तेधवां त्याला ।
राधाहृच्चोर ह्मणे, धा ! धाक प्राप्त कां तुला झाला. ॥ २१ ॥ (कर्ण. ४८-५७)
तारामणमुखी ते तारागवें रडोनियां त्यातें, ।
तारा ह्मणे कपींद्रा ! तारावें दुःखसागरीं मातें. ॥ २२ ॥ (मंत्ररामा. ८-३२)

(आ) अयुतावृत्ति मध्यपदयमकें:—

वंदेऽहं विठ्ठलं दातुं शं देहं भुवनप्रभुः ।
संदेहं हंतुमुदितो मंदेहं योऽंशुमानिव ॥ २३ ॥ (विठ्ठलप्रार्थना १)
स्तविति नमुनि समुनिसुर प्रभुच्या शम्भारग मग रुडनळास ।
स्तविति लकवितिलकांहि कां परमदकलिच्यांहि न गरुड नळास. ॥ २४ ॥
(हरिवंश. ९. १३१)

( यांत सयुतावृत्ति मध्यपदयमक, अयुतावृत्ति आदिपदयमक व अंत्यपदयमक हीं साधलीं आहेत. )

सेवावा सर्वनाथांनीं, ठेवावा मनिं सज्जनीं, ।
देवा वाटे त्याहि तोष, देवावर्गनिमज्जनीं. ॥ २५ ॥ (कृष्ण. ७९-२०)
(वरच्यांत सयुतावृत्ति मध्यवर्णयमकही साधलें आहे.)

(इ) अयुतावृत्ति अंत्यपदयमकें:—

स्वजनभवांबुधितरणे ! त्रिजगत्तपनमहामणे तरणे ! ॥
दे मज चापास रणीं दाविन दुष्टांस काळग्रहसरणी. ॥ २६ ॥ (कुशलवा. १०-८)
मज दुःख पहावेना, आरडणें क्षणहि हें सहावेना ।
सदनांत रहावेना, उद्वेगें राज्यभर वहावेना. ॥ २७ ॥ (ब्रह्मोत्तरखंड. १०-१८)
अस्मत्परिभव करितो आजि नभातें शरव्रजें भरितो ।
गोधन हरितो, वरितो कीर्ति, अशनिभृदरिकरिघटा हरितो. ॥ २८ ॥ (विरा. ३-८६)

तसेंच हरिवंश ('शकचिर्कोर्पित कळलें ३०') अ० ५०° गी० ५२ पहा.

(पंतांच्या काव्यांत दोन अर्धांच्या शेवटीं जीं यमकें आढळतात तीं याचींच उदाहरणें होत. त्यांतील कांहीं लांब यमकें पुढें दिलीं आहेत.)

**(३) पुष्पयमकः**—वृत्तांत यति येणारीं अक्षरें सारखीं जुळविलीं असल्यास **पुष्पयमक** होतें, त्याचीं उदाहरणें केका ११८, ११९ ह्या होत. त्याचीं आणखीं थोडीं उदाहरणें:—

कितेक रथ मो**डिले**, ध्वज कितेकही तो**डिले**, ।
कितेक शर सो**डिले**, गज कितेकही झो**डिले**, ॥
असंख्य भट ता**डिले**, यमपुराकडे धा**डिले**. ।
शिरःप्रकर पा**डिले**, बहुत यापरी ना**डिले**. ॥ २९ ॥ (कुशलवा. १०-९)

शिळेसि दिधली **गती**, जिस महामुनी मा**गती**, ।
द्विषत्सहज स**न्नती** करि, तयासि अत्यु**न्नती**, ॥
करूनि नत पा**वती**, वरिति सिद्धि दे पाव **ती**, ।
जयास खळ कां**पती**, अजित आमुचा तूं **प**ती. ॥ ३० ॥ (कृष्णवि.५६-३०)

( कृष्णविजय अध्याय ५६ श्लोक २९, ३१ व ३२ ह्यांतही पुष्पयमक साधिलें आहे. )

**(४) अश्वधाटी यमकः**—'यमकाच्या पाठीं व पुढें निराळें व्यंजन असल्यामुळें, प्रत्येक व्यंजनावर जशी काय उडी मारित यमक चाललें आहे, असा भास झाला ह्मणजे **अश्वधाटी यमक** झालें. हें जसें चरणाच्या आरंभापासून तसें एकदम मधून व आद्यंतींही गुंफलेलें आढळतें' ( अलंकारमीमांसा ). याचीं थोडीं उदाहरणें:—

वा**जत**, गा**जत**, ला**जत** सा**जत** रा**जत**रणी पुरा गेला. ॥ ३१ ॥ (शांति. ५-३)
**हरिजन अरिजन परिजन** करि, **जन**नि ! प्राज्ञ**जन**सभे ! काय ।
हा दा**स** या**स** हा**स** त्रा**स** नसो,-शिशुंसि निंदिना माय.॥३२॥(स्वर्गारोहण.२-४८)
**दाटुनि वाटुनि घाटुनि चाटुनि** पीतोसि विष मरायातें.॥ ३३ ॥ (गदा. १९०)
न धरीं बा ! **दर**, हा **दर**, सा**दर** दे वाजवूं पुन्हां नीट. ॥ ३४ ॥ (विराट.८-८)

**(५) आद्यंत यमकः**—चरणाच्या किंवा अर्धाच्या आरंभीं व अखेर यमक साधिलें असलें तर त्याला '**आद्यंत यमक**' ह्मणतात. याचीं थोडीं उदाहरणें:—

**गळती**समान नयनें **गळती**; । **लपनें** न येति धड आ**लपनें**; ॥
**निजवि**ग्रहासि उठवी **निजवी**; । **जनका**त्मजा स्मरतसे **जनका**. ॥ ३५ ॥
(कुशलवा. ४-७०)

**शोक लास्य** करी हृदंगणिं कंठ केवळ **शोकला**; ।
**कोमला**नन पूर्णचंद्र तिचा तदा बहु **कोमला**; ॥
**कां पती** रुसला ह्मणे सकळेंद्रियें बहु **कांपती**; ।
**भार तीस** निजांग होय, वदे अशी मग **भारती**. ॥ ३६ ॥ (कुशलवा. ४-७१)
**कां नवलास नव्हे**, घट कर्ण गळीं जरि बसेल **कानवला**?॥३७॥(द्रोण.१०-२१)

**जा, गा** महानगुणा, दिधलें तुज जीवदान जा **जा गा,** ।
**जागा** दाटुनि केल्या हरि, वांचाया नसे गजा **जागा.** ॥ ३८ ॥(कर्ण. ३१-४१)
(वरच्या ३८ व्या गीतींत आद्य यमकही साधिलें आहे.)

**(६) दामयमकः**—वृत्ताच्या जवळच्या दोन चरणांस जोडणाऱ्या यमकास **दामयमक** ह्मणतात. याचें उत्कृष्ट उदाहरण मोरोपंताचें दामरामायण होय. या यमकप्रकाराचीं थोडींशीं उदाहरणें:—

सेवुनि **संतत पाला, संत तपाला** यदर्थ करितात, ।
तो प्रिय या **स्तवना कीं यास्तव नाकीं**हि हेंचि वरितात.॥३९॥ (भीष्मभ.११७)
पुसोनियां शोक**पाणी, पाणी** जोडूनियां नयें, ।
रामापुढें दीन**वाणी, वाणी** भरत हे स्वयें. ॥ ४० ॥ (कुशलवा. ३-५)
करूनियां मज्जन विश्वपा**वनीं, वनीं** प्रवेशे मग जानकी वनीं; ॥
सचिंत पाहे मग देवरा**स तीः । सती** ह्मणे आश्रम कां न दीसती. ॥ ४१ ॥
(कुशलवा. ४-१७)

ह्मणे श्रीराम**रमणी रमणी**य वपु**र्धरा** ।
**धरा**कन्या जगत्**पद्मा पद्मा**क्षी कंबुकंधरा. ॥ ४२ ॥ (कुशलवा. २-२०)
त्याचें करूनि नि**वारण वारण**शत्रुप्रताप कुश बोले ।
धरुनि वृथा **काम रणीं कां मरणीं** सिद्ध मूढ हे झाले.॥४३॥(कुशलवा.१३-१२)
गुणग्रहण दक्ष ते ह्मणति साधु साधु **क्षमा** ।
**क्षमा**दुहितृनंदना ! धरु तुझा सदा प**क्ष मा** ॥
**क्षमा**बळपराक्रमद्युति यशोनिधी स**र्वदा** ।
**वदा**न्यपति हो सुखी चिर वसे सुहृत्सर्वदा. ॥ ४४ ॥ (कुशलवा. १३-५१)

**(७) समुद्गयमकाचीं** उदाहरणें:—

बहुमान सदा सांवरि साधु निका महित सज्जन वनौका ।
बहु मानस दासावरि साधुनि कामहित सज्ज नवनौका ॥ ४५ ॥ (नामरसायन ३२)
अनलसमोहित साधो राया ! वारा महावरा ! कामा ।
अनलस मोहि तसा धीरा ! यावा रामही वरा का मा ! ॥ ४६ ॥ (वनपर्व ८५०)

**(८) संदंश यमकाचीं** उदाहरणें:—

**हार विलासवतीनें** केला हा लक्ष्मणप्रसूनें कीं; ।
**हारविला सवतीनें** क्षितिनें पूजिला सुरप्रसूनें कीं. ॥ ४७ ॥ (स्त्रीपर्व ४-१६)
**अश्वत्था मागावा** वर पूजुनि परि भला न व्हे मुंजा; ।
**अश्वत्थामा गावा** कीं तो गुरु खंडिजेचि शरपुंजा. ॥ ४८ ॥ (कर्ण. ११-३१).
**तोया याद वराया** ज्या प्रेम्या धरितसे, भला भजनीं
**तो या यादवराया** प्राप्त असो, कीं दुजा न लाभ जनीं.॥४९॥(विष्णुपदवर्किली २८)
**पुंडरिका ! क्षमा केली** त्वां वैकुंठाधिका सदा. ।
**पुंडरिकाक्ष माकेली**स्थाना त्या नाठवी कदा. ॥ ५० ॥ (पुंडरीकप्रार्थना ५)

(९) **संदष्टक यमकांचीं** उदाहरणें:—

पावे, प्रसन्न होतां **देव, सुदामा जिला, असी मातें ।**
श्री, कीर्तिहि, जरि अल्पचि **दे वसु दामाजिला असीमातें.** ॥५१॥ (सन्मणि-माला १८)

साधु ह्मणावे ह्मणती **नरमाधवदास साधु याला जे**
अतिसारीं पट ज्याचे **न रमाधव दाससा धुया लाजे.** ॥५२॥ (सन्मणि. ६३)

गावा, नच मानावा **चोखामेळा महार सामान्य;** ।
ज्याच्या करि साधूंचा **चोखा मेळा महारसा मान्य.** ॥५३॥ (सन्मणि. ७९)

श्रीविष्णुसा न तारी **जन काय ज्ञानदेव वेगानें ?** ।
हा दे तें स्वर्गाच्या **जनका यज्ञा न देवग्रे गानें.** ॥ ५४ ॥ (ज्ञानदेवस्तव १)

श्रीराम ह्मणे, 'मदधिक **गुरुचरण, त्यजुनि काय निघसी ते'** ।
लक्ष्मण, ह्मणे, 'भजावे **गुरुचरण त्यजुनि काय निघ सीते !'** ॥ ५५ ॥ (वनप. १०-३८)

तुजविण न दीपिके ! मति ! **कृष्णे ! तरतो नयज्ञहि तमातें ।**
करितों जरि तरि गमता **कृष्णनर तो न यज्ञ हित मातें.** ॥५६॥ (वन.८-५४)

कुरुसैन्यांत गमे ज्या **परि रंभाकाननांत वारा हो ।**
त्या विजयश्री देउनि **परिरंभा कां न नातवा राहो ?** ॥ ५७ ॥ (द्रोण. ३-८८)

नुरवि, करुनि परकवचा **अंगप तितऊ पलसमय मनिं भानें.** ।
भीमानें शर गणिले **अंगपतिन उपलसम यमानिभानें.** ॥५८॥(द्रोण.१२ १३)

हरहर ! जाणों चुरिला **तो वाळ करेणुनीं चरणपातें ।**
शिवशिव ! भरितिल कीं हो **तो वाळक रेणुनींच रणपातें.** ॥५९॥(द्रोण. ७-२३)

जोडुनि गुण पार्थ करी **कुरुसेनापाल–विप्र–कटकांता ।**
कीं गुरुपराभवेंही **कुरुसेना पालवी प्रकट कांता.** ॥ ६० ॥ (द्रोण. ९-३३)

न रणा तूं योग्य; ह्मणुनि **'हा ! केशवसारथे ! रडायास.** ।
काय भिववशिल, देउनि **हाके शवसार थेरडा, यास.'** ॥६१॥(द्रोण.१७-५७)

गमला हित ओगरितां **कांजी मधु सूद नाकपाळाला ।**
अर्थ तसा आला हे **कां जी ! मधुसूदना कपाळाला.** ॥ ६२ ॥ (द्रोणपर्व)

जी वेश्या बुध वरिल **त्यजुनि अमर्यादरा जनीं तीतें ।**
भजतों अनीतितें हा **त्यजुनि अमर्याद राजनीतीतें** ॥ ६३ ॥ (उद्योग. ८-८)

**न** शिके त्याचा बोल न **बाला, मंदार सावरिल काय ।**
पतनेच्छुचा न, न वरिल **बाला मंदा, रसा वरिल काय?** ॥६४॥(शल्य.१-११)

कृष्णा ! त्वत्सम तव कृत **वर्णन भाचा परा सुकविता कीं;** ।
झाला घालाया धृत**वर्ण नभाचा परासु कवि ताकीं.** ॥ ६५ ॥ (स्त्री.४-३९)

भवदवन करित होता **बहुभास्वर थावरुनि हात रणीं;** ।
वाटे जणों उतरला **बहुभा स्वरथावरुनि हा तरणी.** ॥ ६६ ॥ (स्त्री.६-५१)

झाला हरिसहि पडवुनि **नयशोभाजनक विप्रसा दानें** ।
केला कोण शिवाच्या **न यशोभाजन कवि प्रसादानें.** ॥६७॥ (अनु. ३-४२)
यादव ह्मणति, 'दवानळ **दुर्वासाः हे लता पहा, काय** ।
या उग्र ग्रीष्मीं हे **दुर्वा साहेल ताप हा काय ?** ॥ ६८ ॥ (अनु. ७-५२)
स्त्रीचेहि अतिथिला दे **सक्तु सुबाहुमान सत्व राखाया:** ।
तो त्या क्षुधिताचे करि **सक्तु सुबहु मानस त्वरा खाया.**॥६९॥(अश्व. ७-१३)
संतीं श्री सुरतरुचें **नवि नवि लक्षि प्रसून हित याची** ।
मग सक्तु या ह्मणुनि कां **न विनविल क्षिप्र सूनहि तयाची.**॥७०॥(अश्व. ७-१६)
आलि ह्मणे गे! कुमुदिनि! **वैराटि! कलाप हा, सुखेंव दया** ।
करुनि याया येतो, **वैरा टिकला पहा. सुखें वद या.**॥७१॥(आश्रम. ६-२०)
पाहे प्रणता तोका **न व्यास महाकवि प्रसादास** ।
विप्राच्या दे न करी **नव्यासम हाक विप्र सादास.** ॥ ७२ ॥ (स्वर्गा. २-४१)
करीत होती तेथेंच **नवसा गरती रती** ।
पावे त्यापासुनि चिंता**नवसागरतीर ती.** ॥ ७३ ॥ ( कृष्ण. ५५-४३ )
दयाघनें जरी केला **परिहास त्यजावया,** ।
गर्वास हेतु तापाही **परि हा सत्य जावया.** ॥ ७४ ॥ ( कृष्ण. ६०-६ )
दीनावनें होय साधुवाद, **या लोक लागती.** ।
मातेशीं बाळ करितो **बा! दयाळो! कळागती.** ॥७५॥ (विठ्ठलविज्ञापना ६४)
ह्मणे जना 'भव सुखें **तर वारकरी तसे:** ।
जे शत्रु नच्छिरीं उग्र **तरवार करीतसे.** ॥ ७६ ॥ (पुंडरीकप्रार्थना २५ )
कपींस स्वर्ग रुचला **न पुष्पकविमानसा** ।
त्वद्यश प्रिय नाकींचें **न पुष्प कविमानसा** ॥ ७७ ॥ ( रामप्रार्थना ३४ )

(दोहावृत्त) लाविति पदांरसुखांसि हे **संत मस, तप नसेच.** ।
ऐसे इतरीं नाशिति **संतमस तपनसेंच.** ॥ ७८ ॥ ( सद्वर्णन ७ )
जो पापतर्गी तृणगर्मी **अनळसमान, सदार**
प्रभु संतांचें सेवितो **अनळस-मानस दार.** ॥ ७९ ॥ (सद्वर्णन १७)

तसेंच सद्वर्णन १२, १६, २०, ३२; विठ्ठलविज्ञापना १०, ३३; पुंडरीकप्रार्थना २, ३० ३३. ३५, ३६; रामप्रार्थना १२, ३०, ३२, ३८, ३९; महालक्ष्मीस्तव ६; साधुर्गति ४६; द्रोण. ६, २१; १५, ११०; १६. १२ स्त्रीपर्व ३, ४७; अनु. ८-८२; ३० पहा.

(१०) **लांव (अंत्य) यमकांचीं उदाहरणें:—**

गेला सजही सोडुनि **हाता पसरुन कोप सारा या**
तव गुरुचि अगद जोडुनि **हा ताप सरु नको पसा राया.**॥१॥(अश्व.१-११८)
समुपेक्षिले, टकविले, **पृतना महिमा नको पित्या; सहसा**
स्यां मारावे खळ ते **कृतनामहि, मान कामित्यासह सा.** ॥२॥(द्रोण.२[illegible]६)

गमले दोघे हरिसे, मग **भुलले पळ ससे समरसिकते** ।
रक्तें न्हाले झाले बहु **फुलले पळससे समरसिक ते.** ॥ ३ ॥(शल्य.२-७८)
जो काय सुरसदूषक अघ **परिहरिता तसा चिकुर वाळी** ।
निर्गर्व करुनि चुकला बहु **परि हरि तातसाचि कुरवाळी**.॥४॥(उद्योग.८-७६)
नरहरिनामा पावे **संत न सोनार दास मान कसा ?** ।
तरला करुनि भवाचा **अंत नसो नारदासमान कसा.**॥५॥(सन्मणिमाला ७६)
काय उणें त्या, करि **सश्रीकृष्णा जा निवास विप्राशी.** ।
कर्णाहीं स्वस्तुतिस **श्रीकृष्णाजानि वासवि प्राशी.** ॥ ६ ॥ (द्रोण. ९-५)
कथिलें कसें असें मज **धर्मा ! करवाल काढ कलहातें**: ।
मृत्युमुखीं कुलकरगुणश**र्माकरवालका ढकल हातें**. ॥ ७ ॥ ( द्रोण. ४-५ )
वळवावया करावें काय **पतितपावना तप शुभ जनें**? ।
द्रवला स्वयेंचि पशुपति देव **अतितपा वनांत पशुभजनें.** ॥८॥ (अनु. ६-३९)
राम ह्मणे 'धर्म वदसि गुरुचि **महाजनक विप्र तारक हा** ।
तरि तूं न ह्मणसिल कसा जरिहि **महाजन कवि प्रतारक हा!** ॥९॥(शांति.२ ४८)
हे राजश्री व्हाया म**म तोकांचा विनाश शिकलें तें** ।
तपनालाहि गिळी जो त**म तो कां चाविना शशिकलेतें** ?॥१०॥(स्त्रीपर्व१-५८)
वृत्त कथुनि कविसि, ह्मणे, ती **निष्ठुरता पहा निरोपाची**: ।
छाया कराचि; न करो अति **निष्ठुर ताप हानि रोपाची**.॥११॥(आदि.१०-२८)
स्पर्शन मोहाचा हो तुज, **अंतर्हित परा शराचा हो**: ।
ऐसं बोलुनि झाला सुत **अंतर्हित पराशराचा हो.** ॥ १२ ॥ (द्रोण. ६-८५)
जेंवि क्षम लीलेनें, सर्व**परमदा पिनाक, साराया**; ।
नरचाप तसाचि परा, उग्र **परम, दापिना कसा राया**? ॥१३॥(द्रोण.१८-२१)
देता तुलाचि भजतिल, पळही **पर, मानदा! न वसुधेतें** ।
बा ! पावेल, करुनिही कष्टा **परमा न दानव सुधेतें** ॥ १४ ॥ (द्रोण.१७-३०)
गोपीजन ठकवाया खाया न**वनीत साय, कनकपटा** ।
चालों देइल माझा, शिरतां अ**वनींत सायक न कपटा.** ॥१५॥ (द्रोण.२२-२)
वत्सा ! मी केवळ रवि मम **सर्व स्वच्छवि प्रवर दास**; ।
स्वात्म्यापरीस बहुमत मज **सर्व स्वच्छ विप्र वरदास.** ॥१६ ॥(द्रोण. ४-३६)
पाहे हाहि पसरुनि प्रभुसि **तपःपदर विप्र भव्यास** ।
झाला सुत सुज्ञ अजर अमर **तपःपद रविप्रभ व्यास.** ॥१७॥ (अनु. ६-५६)
इंद्र ह्मणे तव गुरुतें जाणे **बहुधा कवि प्रयास महा** ।
करिती पवितीव्रतें, याचा **बहु धाक, विप्र यासम हा.**॥१८॥ (अश्व.१-११७)
आभीर म्लेंच्छ करिति विपदु**द्‌या लूट जींत नय नाहीं** ।
**येतें कथूं पृथेचा क्षम सुदयालूटजीं तनय नाहीं.** ॥ १९ ॥ (मौसल. २-७१)

जो देणारा विष्टपबाह्य **विषयवास विप्रतापातें** ।
होय स्वयेंचि तो तव तान **विषय वासविप्रतापातें.** ॥ २० ॥ (महाभारतपर्व)
प्रभुभाव असा गमला देय **इला शाप हा तप सराया** ।
हें न बुडवितां येते सर्व **इलाशाप हात पसराया.** ॥ २१ ॥ (स्त्रीपर्व ६-१२)
शोभा सोडुनि होता शुद्ध **वसंतीं करीरसा पार्थ** ।
मग मंत्रातें व्हाया उद्धव **संतीं करी रसापार्थे.** ॥ २२ ॥ (विराट.६-१२३)
ताप हरिल तव दर्शन मुखर्युनि **बहु मानसा धुनीजाचा:** ।
कीं तो तूं गर्वस्वें कीजे **बहुमान साधुंनीं जाचा.** ॥ २३ ॥ (शांति. ६-४८)
काय इतर गज देता जं**भारातीभ वाट वीरा या:** ।
त्या सुज्ञा सेना बहुसं**भारा ती भवाटवी राया.** ॥ २४ ॥ (द्रोण. ११-४८)
कार्मिण ह्मणे पळ इकडे पाहुत मज्ज**न न पत्रिकेतुकडे.** ।
चर्मोपरि लिहिले कीं वपुचें मज्ज**ननपत्रिके! तुकडे** ॥ २५ ॥ (द्रोण. ३-१३१)

तसेंच द्रोण. ११-७९; १२-७६; १५-५८; १५-५९; १५-६३; १२-११४; १९-९१; ११-३३; १-६; ५-५३; १२-४४; १२-१८४; १३-१६. आदि. ११-८१; विराट. ३-९; मन्मणि. १००; वामनचरित्र १५०; १५४; शल्य. १-१६; ४-२१; स्त्री ४-५५; अनु. ३२. पहा.

# परिशिष्ट–ह्.

## मोरोपंतांचीं ठरींव यमकें.

मोरोपंतांचा यमककोश तयार केल्यास आधुनिक कवींना त्याचा बराच उपयोग होईल असें वाटल्यावरून त्यांच्या ठरींव यमकांची एक मासल्याकरितां लहानशी यादी तयार करून येथें जोडिली आहे. ती वाचकांस उपयुक्त वाटल्यास तशा प्रकारचा विस्तृत व पद्धतशीर प्रयत्न करण्यास उत्तेजन येईल. स्थलसंकोचास्तव हीं ठरींव यमकें जेथें आढळतात त्या सर्व स्थळांचा निर्देश करणें अशक्य असल्यामुळें एक दोन स्थळांचाच निर्देश केला आहे.

अगा धसाधस ते–अगाधसा धसते
(हरि ९/६६, ४८/१४७)

अगा धाल्या–अगाधा त्या
(वामन १४९, गदा ९/१५, अनु ३/४०)

अगा राया–अगारा या
(शल्य ३/४५, आश्र १/५८, हरि २२/१०६)

अघ नाहीं–न घनांहीं (कर्ण ३५/१६, अनु ८/४३)

अघा बरवी–न घाबरवी (कर्ण ४३/३१, अश्व ३/२२)

अटरा जे–हट राजे (स्त्री ४/२, शांति ६/१३)

अर्णव तो–वर्णवतो (कर्ण ४३/२७, अनु १/४)

अंतकसा–अंत कसा (कर्ण ३०/३६, ४०/४)

अथवा हो–पथ वाहो (अनु ६/७२, ९/१२)

अंधकार मला–अंधका रमला
(हरि २७,२२; ३२,३८)

अंधकारा ती–अंधकाराती
(कर्ण ३५,२६; हरि २५,२१)

अनघातें–जनघातें
(कर्ण २८,७;. आश्र २,१००)

अनळ साचा–अनळसाचा
(कर्ण ४९,२१; हरि ३६,८०)

अन्याया–अन्या या (अश्व २,४७; द्रोण १३,६०)

अनुग्रह रित्याते–अनुग्र हरि त्याते
(वा. १६८, हरि ३४,६१)

अनुग्रह रे–अनुग्र हरे
(अनु ३,५१; अश्व २,४२)

अगामान्य–अगा मान्य
(कर्ण ५०,७४; गदा १,११०)

अगा राया–अगारा या
(अनु ६,२८; शांति २,६९)

असुख पावे–असु खपावे
(अनु २, १०; आश्र. २,८६)

असुख रचिते–असु खरचिते
(कर्ण ४५,८; वा ७१)

असुर-हित–असु-रहित
(वा. च. १२४, आदि ९,८)

असे नातें–असेना तें
(गोपीगोडवा ८५; भीष्म १२,५५)

असो नमन–असोन मन
(हरि ५०,४२,८८; अनु ८,८)

अक्षम रणाला–अक्ष मरणाला
(गदा २,९; शल्य ८,३२)

आइ कसी–आइकसी
(कर्ण ४३,८८; आश्र ४,६)

आतेला–आ तेला (द्रोण १,३९; उद्योग १०२९)

आर्ठवर्ता–आठ विती
(आश्र २,१०८; हरि ३८,४२)

आठविली–पाठविली
(अश्व १,१०५; स्त्री ५,२०)

आयकवी–काय कवी
(हरि ४३,२१; आश्र ४,५०)

आयाकिली–काय किली
(हरि ३५,७५; गदा ८,२७)
आयकों दावा–काय कोंदावा
(वामन च. ११७; वन ४,५६)
आयकों देहा–काय कोंदे हा
(गोपीगोडवा ३, शांति ७,३६)
आयुध-त्याग–आयु धत्याग
(गदा ६,१६; हरि ४८,१९५)
आलि मये–आलिम ये
(शांति ५,११; हरि ३५,७७)
आवांके–आ वांके (द्रोण १,४; हरि ३४,२४)
उजगाया–तुज गाया
(अनु ७,१०६; अश्व १,७०)
उणीव रितें–गुणी वरतें
(गोपीगोडवा २३; विराट ५,३७)
उत्तमश्लोक–उत्तम श्लोक
(हरि ३,५४; कृष्ण ८३,४७)
उपायनसें–उपाय नसें
(शांति ४,२३; हरि ३०,९६)
उरतें–उर तें (कर्ण ४५,१२)
कर्कशानें–नर्कशानें (विराट २,५; ३,३५)
कदंवातें–मदंवा तें (अनु २,१९; ८,१००)
कनकाची जनकाची (अश्व १,५४; १,५७)
करकांहीं–कर कांहीं (अनु १,१९; ४,७)
कराल करवाल–कराल करवाल
(हरि ४८,१३९; द्रोण १,३८)
करी नमन–करीन मन
(हरि ४३,९५; कर्ण ४३,२९)
करी लगट–करील गट
(हरि ४७,७२; शल्य २,७७)
कविराजे–न विराजे
(गदा ६,१३; हरि ११,१२)
काज वेंचितसे–काजवेंचि तसें
(हरि ४७,४८; ४८,२४७)

काननीं चोर–कां न नीचोर
(विराट १,११४; ६,८)
कानांहीं–कां नाहीं
(शांति ७,१२०; हरि २२,९९)
कांपाविला–कां पविला
(अनु ८,९१; कर्ण ३८,३८)
कां मरणा–काम रणा
(शल्य २,६७; कर्ण २७,५)
काय गाजीव–कायगा जांव
(हरि ४३,२२; ५१,३४)
काय होनान–कायहो नान
(हरि ४७,६२; अनु ७,७७)
काळजी वाहे–काळ जांवा हे
(हरि ४१,११४; कर्ण ६,६४)
कुंद रिनें–गुंदरि नें
(हरि २९,४५; आदि ११,९)
कुनर पितयानें–पुनरपि तयानें
(अश्व १,८१; हरि ४८,२३७)
कुमार मणी–उमा रमणी
(हरि ३५,६७; गोमि. २,२३)
केशव दे–लेश वदे (गदा ५,२३; कर्ण ४१,२)
क्रियापर महर्षि–प्रिया परमहर्षी
(अनु ८,५५; शांति ४,१)
घेगाया–घे गाया (विराट ४,६८; द्रोण १,१४)
चवघांग–चव घाग
(आश्र १,६५; अश्व ५,१८)
जनकाग–जन काग
(हरि ४१,८; आश्र २,७०)
जळजनाभा जी–खळजना भाजी
(हरि ५०,६४; ९,१०८)
जवन वाजी–जव नवा जी
(मौस. १,६८; गदा १०,२)
जें विरवी–जेंवि रवी
(विराट ६,३६; शांति ७,९६)

जें विशंक राबेल–जैंवि शंकरा बेल
(अनु ४,१; शांति ७,६६)
जें विहित–जैंवि हित
(कर्ण ४१,३५; शांति ७,६३)
तडा खातो–तडाखा तो
(गदा ३,२५; हरि ३१,५३)
तपोनिधी राजा–तपोनि धीरा जा
(आश्र ३,५८; हरि ४,१७)
तया लुबरी–दयालु बरी
(हरि ४१,९४; ४८,२९९)
तापसत्वानें–ताप सत्वानें
(अनु ६,४३; आश्र १,५२)
तेजातें–तें जातें (वा. च. १; ऐषि ३,८)
ते लटिके–तेल टिके (अश्व १,९२—)
तेलिंगा–ते लिंगा (राधा. १५; सन्मनोरथ)
तोक रितें–तो करितें
(हरि ४१,१५८; अश्व. ४,७७)
तोक वच–तो कवच (विराट २,४०; ३,३०)
तोक सामान्य–तो कसा मान्य
(शांति १,१३; विना. माहात्म्य)
तोख चला–तो खचला
(हरि ४१,३०; अश्व ५,७२)
तोख पवि–तो खपवि
(द्रोण १८,४५; हरि. ३८,६७)
तोख रचि–तो खरचि
(हरि ८,१०७; शांति. ५,१७)
तोख राजीव–तो खरा जीव
(द्रोण १५,१०५; शांति ५,१६)
तोयाची–तो याची
(ऐषि १,४०; अश्व. २,६१)
तोयांत–तो यांत
(वा. च. ६९; महाप्रस्था १,१५)
तोलावी–तो लावी
(अश्व ५,४५; हरि. ३८,२७)

दयालु गळ्या–दया लुगळ्या
(वन २,१७; विराट १,९७)
दयालो हें–दया लोहें
(उद्योग ९,३४; कर्ण ४३,२८)
दिलीप गडी–दिली पगडी
(राधा. २४; द्रोण. ५,२२)
दे खिलारा या–देखिला राया
(हरि. ४७,३४; ४३,१०२)
देवकी नाश–देव कीनाश
(उद्योग १०,२८; द्रोण ९,३४)
देववी राजा–देव वीरा जा
(शल्य ४,५७; अश्व. २,१५)
दे वसुधा–देव सुधा
(वा. च. ५९; कर्ण १२,२४)
दे वाजी–देवा जी
(शांति ३,८३; अश्व. ५,३६)
दे हातें–देहातें (अश्व १,९०; हनुमद्रामा. २२)
धडकले वरतें–धड कलेवर तें
(हरि ४८,२५७; ऐषिक २,१८)
धन दानें–धनदानें (शांति ५,५८)
नका राहू–'न' कारा हूं
(हरि. ४४,४५; ५२,१०९)
नको चिरडों–नकोचि रडों
(आदि ९,३२; हरि. ४१, १६२)
नको पावें–न कोपावें
(गदा ८,२१; हरि. ४३,६८)
नको विदरे–न कोविद रे
(द्रोण १२,१७६; अनु. ६,१०)
नंदनवनीं तें–नंद नवनीतें
(अनु. ४,७३; हरि १३,५९)
नदी नातें–न दीनातें
(गोपीगोडवा ४७; आदि—)
नभा वातें–न भावातें
(स्त्री ४,३३; स्वर्गा. १.२९)

नभा सविता–न भासविता
(शांति ६,२२; स्त्री ६,५५)
नय ज्ञाते–न यज्ञाते
( अश्व १,४३; अनु. ८,६४)
नर कास–नरकास
(कर्ण ४१,७६; सौप्ति १,१४)
नरवरा हे–न रव राहे
(आश्र १,६८; अश्व ६,१३)
नरा जन्य–न राजन्य
(अनु ८,७९; ऐषि. १,१७)
नरा नीचा–न रानींचा (हरि ८,६२–)
नव दावी–न वदावी (हरि ५२,२६०; विराट)
नवनीतें–न वनीं तें
(राधा. ३८; आश्रम. ३,३३)
नसे उचिता–न सेउ चिता
(शांति ४,३३; ७,६४)
नसे कांहीं–न सेकांहीं
(अश्व ३,४१; आश्र ३,४१)
नसो सवतें–न सोसवतें
(हरि ८,१०२; कर्ण ४३,६)
नायका पूस–काय कापूस
(शांति ६,४०; ७,९३)
निंदुनि घे–इंदु निघे
(ध्रुवचरित्र ३८; हरि ९,९५)
निवे दीन–निवेदीन
(सौप्ति. १,३८; हरि,११,२)
निवे दूत–निवेदूत
(अश्व. १, ७२; स्वर्गा १,३१)
निवे दून–निवेदून
(हरि. ४८,३; अश्व ६,३१)
पण तूतें–पणतू तें (हरि १८,३३; अनु ८,८७)
पदक मळ–पदकमळ
(वा. च. ११९; भीष्मभ. १)
पद नमुनी–वदन मुनी
(हरि ४३,१२५; अश्व. २,२५)

पद नमुनी–सदन मुनी
(हरि अश्व. १.३९; शांति २,३२)
पर महर्षि–परम हर्षि
( हरि. २७,३४; वा. च. ३० )
परिवेष–परि वेष (द्रोण १०,३७; अनु ५,३६)
परिस राया–परि सराया
( हरि. ४७,१; मौसल १,१३२ )
परिस राया तें–परि सरायातें
( शल्य. २,१; द्रोण १,४३ )
परिसून–परि सून
( शल्य. ४,२२; अश्व. १,१८ )
परिसेना–परि सेना
( कर्ण ४९,७३; विरा. २,२८)
पाठउनी–पाठ उनीं
(विराट १,१३६; स्त्री. ४,२८)
पुनरपि तयातें–पुनर पितयातें
(द्रोण १२,१६२; अनु. ७,९४)
प्रतिज्ञा ती–प्रति ज्ञाती
(गदा ४,१२; आश्रम १,२३)
प्रसूनांहीं–प्रसू नाहीं
(अनु ७,२८; गदा. ९,२३)
बा धाल्या–बाधा ल्या
(हरि ४७,१४; शांति. ६,४९)
बाहूनी (बोलावून)–बाहूंनीं (हातांनीं)
(आदि १६,१२; कर्ण २१,१४)
बा हेर–बाहेर
(अश्व ६,३; स्त्री २,१; हरि ३३,५४)
बुधा समग्रास–सुधागम ग्रास (हरि १,८–)
बोल कानांहीं–बोलका नाहीं
(आदि १,३; हरि २७,९)
भर वसायाचा–भरवसा याचा
(अश्व ३,५६; रामगीत ६७)
भर विलापाला–भरविला पाला
(स्त्री, ४,१३; शल्य ५,११)

भाउनि घे-भाउ निघे
(विराट ४,९०; मौसल २,५५)
भीम रणा-भी मरणा
(कर्ण ३६, १९; ४३, ६९)
भीमातें-भी मातें
(कर्ण ३९,४९; गदा २,१४)
भुज गमला-भुजग मला
(हरि १३,७७; आश्रम १,८७)
मग राया-मगरा या
(हरि ४८,२८८; कर्ण ३२,२३)
मज्जन कराया-मज्जनक राया
(अनु ६,२३; स्वर्गा १,४)
मत्तप हा-मत्त पहा
(हरि २७, ६२; स्त्री ३, ६)
मत्तपाहून-मत्त पाहून
(वन ११, १२४; अनु ३,८)
महाभुज गदेतें-महाभुजग दे तें
(कर्ण २७, ६०; शल्य ३, २७)
मान लेकांहीं-मानले कांहीं
(गदा ८, २०; आश्रम १, ४०)
मान वेदास-मानवे दास
(शांति ७, १०९; सौप्तिक २, ४४)
मी नाहीं-मीनांहीं
(हरि २६, ५१; शांति ५, ६५)
मुनिवरा गेला-पुनिव रागेला
(हरि ९, ९०; अश्व २, ४६)
मुलास कळकळतें-तुला सकळ कळतें
(अश्व ४, ४३; ७, १५ गदा ५, १४; ८,)
२२; ऐषि १, २०; स्त्री ३, ९)
याद तळमळतें-पादतळ मळतें
(वा. च. ११८; गदा ९, २)
येऊन-ये ऊन (अनु, ७, २१; आश्रम७,१)
यो जीन-योजी न
(विराट ५,७६; शांति ७,१०८)

रसनेला-रस नेला (स्त्री २,९; मंत्रभाग.)
राहु निघे-राहुनि घे
(हरि ४८,२५; द्रोण १,८९)
राहु टळे-वाहुटळे (हरि ४८,१८०—)
लोक पहा-लोकप हा (हरि ४७,६९;—)
वंदील-मंदील (शल्य १,५६; सन्मणिमाला)
विप्र भजनांत विप्रभ जनांत
(अवतार. २०१; अनु. ७,८)
विप्र भत्याग-(र) विप्रभ त्याग
(अनु ६,५६; शांति १,२)
विरोध रणीं-विरो धरणीं
(विराट २,२७; अश्व. ४,१०१)
विश्वास (जगास) विश्वास (भाव)
(अनु १,५२; ६,४४)
शन गावें-न नगावें
(हरि ४७,२३; अश्व ३,८१)
शांत नवा-शांतनवा
(शांति ७,३९; ७,१४; सौप्ति. २,४५)
शिव राहो शिबिरा हो (कर्ण ५०,१२—)
शिर कविता-शिरकविता
(कर्ण ४७,४३; हरि १,१)
शिरे नमनें-शिरेन मनें
(वा. च. १३४; अनु. ५,५०)
शोकदा वार्ता-शोक दावार्ता
(अश्व. ५,३१; स्त्री २,११)
सखे दास-सखेदास
(शांति ६,५; अश्व ५,९०)
संग रहा-संगर हा
(हरि २८,१०६; अश्व. ६,२२)
सत्तमा न वांचावें-मत्त मानवा चावें
(अश्व. ३,६५; हरि ४१,११)
सत्वरतें-सत्वर तें
(वा. च. १४२; शांति ७,७१)
सदा रमला-सदार मला
(हरि २९,७२; अनु. ५,२४)

सदाशिव तो–सदा शिवतो
(कर्ण. ४३,५४; अनु. २,१५)

सभाजन कराया–सभा जनकराया
(शांति ५,४०; अनु. ८,७३)

समस्त नग–सम स्तनग
(हरि २६,४५; वन—)

समस्त वक–सम स्तवक
(वन १२,२८; आश्रम १,३८)

समस्त वन–सम स्तवन
(विराट ३,५२; स्वर्गा. १,५९)

समयज्ञ–सम यज्ञ (अश्व. ६,४३; ७,३)

सवघड तो–सव घडतो
(अश्व १,७; हरि. ५२,१००)

संहरिते–अं हरितें
(वा. च. १४०; मौसल १,१७)

सांग मला–कां समला
(हरि ४४,१८; शांति ६,२८)

साधुनि घे–साधु निघे (शांति ४,१८; ६,१९)

साधुरीतीची–साधुरी तीचा
(वा. च. १४५; आश्रम १,१८)

सुखविलसाचा–सुखविला साचा
(हरि ४२,९; आश्रम २,२२)

सुतपा हे–सुत पाहे (हरि ५२,८; शांति १,२०)

सुनासीर–सुना सीर
(कर्ण ४५,५३; गदा २,१३)

सुयोधन हो–सुयोध न हो
(विराट ३,१; ६,१७)

सुरमणीया–सुरमणी या
(वा. च. १५७; हरि ४९,३३)

सुर-सहित–सुरस हित
(हरि ४३,११८; अनु ५,३८)

सुरा माती–सुरामा ती
(हरि ४१,३५; ४९,३३; विराट १,५९)

हरपावे–हर पावे (हरि ४१,३; ४२,१०४)

हाकाविला–हा काविला
(हरि १६,२१; शल्य ४,२३)

हा केला–हाकेला (शांति ७,१६; गदा ५,५)

हा तनय–हात नय
(आश्रम २,५४; द्रोण ३,७२)

हा निकट कांहीं–हानि कटकांहीं
(कर्ण १९,२२; शल्य १,७५)

हा तरणी–हात रणीं
(अश्व ५,११; स्त्री ६,५१)

हा निकर–हानि कर
(वा. च. १४८; हरि ३३,५२)

हानि सकळ–हा निसकळ
(कर्ण ४०,६०; शल्य २,५३)

हा निघे गया–हानि घे गया
(हरि ४०,५४; ४८,८)

हा निजायाचा–हानि जायाचा
(स्त्री १,५; अश्व ५,८४)

हा नियम–हानि यम
(हरि ४८,४२; कर्ण ४६,४१)

हा निगोपाने–हानि गोपाने
(हरि ४८, ३७१; आश्रम २,६)

हा नीच–हानीच (हरि ४९,२६; स्त्री ३,५०)

हा यजन–हाय जन
(कर्ण ५०,५८; अश्व १,४२)

हा यमुने–हाय मुने (वा. च. १०६; शांति)

हारविला–हा रविला
(कर्ण ७,३२; स्त्री ४,१५)

हा हा ते–हा हाते
(वा. च. १२८; हरि ४८,१५५)

हे निघ गया–हेनि घेगया
(हरि ४२,५२; गदा १,५)

हे माजें–हेमा जें (शांति ५,६४; गदा १०,२१)

हे माते–हेमातें
(गोपीगोडवा ५०; स्वर्गा १,५२)

होकारितां–हो कारितां
(कर्ण ४९,६८; उद्योग ७,६४)

होतान–हो तान
(हरि ४७,६२; आश्रम २,[illegible]३)

———

# परिशिष्ट—ए.

## लांब समासाचीं उदाहरणें.

(श्लोकचरण) 'मद्वंशोत्पन्नतेजस्विवरदशरथापत्यरामप्रतापें' ॥१॥ (रम्यरामायण, उत्तरकांड ४)
'विद्याश्रीमदमद्यमूढहृदयस्वर्द्विण्मरुद्वासुकी' ॥ २ ॥ (कुशलवोपाख्यान ४, ८)
'दासीदासाश्वरत्नाक्षितिकनकरथेभेंद्रधेन्वंशकांहीं' ॥३॥ (कुश० १३, ९०)

( श्लोकार्ध ) 'होमधूमारुणाकर्णशोणाब्जच्छदलोचना' ॥ ४ ॥ ( कुश० ४, २४)
तदा 'स्मितलसन्मुखद्विजसमूहशुभ्रद्युति-
च्छटाधवलितांबरक्षिति' कथी कुश स्वस्थिति. ॥ ५ ॥ (कुश० १३, ३७)

( गीत्यर्ध ) 'हयभालबद्धकांचनदललिखितार्थग्रहप्रदीप्तमदें' ॥ ६ ॥ (कुश० ६, १५)
'सुततनुगतरिपुशस्त्रव्रणावलोकप्रहर्षिताभीता' ॥ ७ ॥ (कुश. १३, ७१)

(श्लोकचरण) 'स्थानस्रस्तोत्तरीयालकमुकुटपटस्नक्कारुण्यसिंधु' ॥७॥ (पृथुकोपाख्यान-भगवद्दर्शन)
'दिव्यस्त्रीप्रतिमद्युतिप्रविलसद्दासीसहस्रस्तुता' ॥ ९ ॥ (पृथुको० स्वालयप्रवेश )

( गीत्यर्ध ) 'भगवत्प्रसादकल्पद्रुमशिखरसमाश्रितापगेर्यापकें' ॥१॥ (भीष्मभार्त्तिभाग्य ९, ४)
'वरपद्मरागमरकतहीरकहरिर्नीलमणिमयागारा' ॥ ११ ॥ (कृष्णविजय ८१, ९९)
'सन्मणिकिरीटकुंडलरुचिपुंजसुरंजितालकस्तोम' ॥ १२ ॥ (कृष्ण० ८९, ८८)

(श्लोकचरण) 'विध्युक्तस्नानसंध्याजपशिवचरणब्रह्मगोपूजनातें' ॥ १३ ॥ ( कृष्ण० ७०, २ )
'भूवस्त्रान्नेभशय्यातिलरजतगृहस्वर्णरत्नादिदानें' ॥ १४ ॥ ( कृष्ण० ६४, ९ )

( श्लोकार्ध ) 'हत्तमक्षयकरेश्वरहस्तस्पर्शकामहृतचित्त' समस्त. ॥ १५ ॥ (कृष्ण० ५८, ५९)

( गीत्यर्ध ) 'गजदंतगर्भवर्णप्रजवसबलकालबालहययुक्तीं' ॥ १ ॥ (कर्ण ३१, २७)
'मत्स्यध्वजकूर्माबुजवज्रच्छत्रांकुशादिलक्ष्मधरें' ॥ १७ ॥ (कर्ण ३१, २९)
'मंदाकिनीसरोरुहमकरंदनिषेकशीतळें' पदरें ॥ १८ ॥ (कर्ण ३५, ५४)
'दुःसहवृषरविशरकरतप्ताखिलभूपवीरवरपक्षी' ॥ १९ ॥ (कर्ण ३८, ४३)
'भुजलीलासंपादितदुर्घटजंभारिमुखनिर्लिपार्थें' ॥ २० ॥ (कर्ण. ४४, ३७)
'स्वपदाश्रितजनकामप्रमुखाहितषट्कनाशकादेवा' ! ॥२१॥ (कर्ण ५०, ३१)
'नागमयांगदकुंडलहारकटकमध्ययज्ञसूत्रधर, ॥ २२ ॥ (सौप्तिक १, २३)
'स्वपरौदार्यक्रौर्यसुगुणजितजळमुग्धराशिशु' भ्राते ॥ २३ ॥ (शांति ४, २)
कृष्णा ! 'सजलजलदहरिनीलनिभानंदकंदनवदेहा' ॥ २४ ॥ (अनुशा० ४, ४७)
जो 'विविधवर्णशतमखचापशतद्युतिविलासिनीकुंज' ॥२५॥ (अनुशा० ५, २१)

( गीति ) 'श्रीकंठसायकासनभंगकुपितभार्गवस्मयहराचा; ।
गौतमभार्याशापक्लेशसुमहदंधकारमिहिराचा ॥२६॥ (प्राकृत मं. रा. सुंदर. ११३)
सत्यव्रतजनकाज्ञात्राणार्थत्यक्तराज्यकामाचा; ।
त्वद्भगिनीवैरूप्यक्रुद्धखरायसुरबळविरामाचा; ॥ २७ ॥ (सुंदर० ११४)

कांचनकायमृगच्छलहृतकांताविरहतप्तदेहाचा; ।
निजभार्याचोरासुक्षयप्रतिज्ञाविलासगेहाचा; ॥ २८ ॥ (सुंदर० ११५)
तावकपराक्रमार्यमराहुप्रभवालिवीरकाळाचा; ।
अभिमतवितरणहर्षितसुग्रीवादिप्लवंगपाळाचा; ॥ २९ ॥ (सुंदर० ११६)
वरविक्रममंडितभुजदंडनिहितचंडचापदंडाचा;' ।
मी दूत राघवाचा, त्वद्विधदुष्टैककालदंडाचा. ॥ ३० ॥ (सुंदर० ११७)
'वनदायुतकोटितडित्पद्मार्बुदगर्जनादिगुरुनादें' ॥ ३१॥ (मंत्रभाग. सप्तम११५)
'जगदीश्वरनिजनाभीसरोवरोद्भूतपद्मजनितातें' ॥ ३२ ॥ (मंत्ररामा. बाल. ३४)
'शरणागतजनसंसृतिभीतिध्वांतप्रभंजनैकरवी.' ॥ ३३ ॥ (मं. रा. बा. ३७)
मग 'यमदंडाशनिसमनिजचंचूपक्षपादनखरांहीं' ॥ ३४ ॥ (मं. रा. अ. ६३)
'हरिवरुणश्रीदयमज्वलनश्वसनग्रहेशसोमातें' ॥ ३५ ॥ (मं. रा. यु. ६६)
'दृढतरशरासनासिप्रखरेषुधरप्रचंडदोर्दंड' ॥ ३६ ॥ (मं. रा. यु. १९४)
'सौमित्रिसर्पराजत्रातदयानंदबलनिधानातें' ॥ ३७ ॥ (मं. रा. यु. २३३)
अथवा 'प्रलयज्वलनज्वालाकवलीकृतेंदुभास्करसे' ॥ ३८ ॥ (मं. रा. यु. ३४९)
'खदिरकुटजधवसरलस्यंदनतरुबिल्वतालसालवट' ॥ ३९ ॥ (मं. रा. यु. ४७६)
'पौलस्त्यकुमाराध्वररक्षकरक्षःक्षयस्पृहावंत' ॥ ४० ॥ (मं. रा. यु. ५७८)
'श्रीमद्रामानुजनिजभुजभुजगाशिलीमुखैकरदविद्ध' ॥ ४१ ॥ (मं. रा. यु. ५८९)
'कालभुजंगमवक्त्रज्वलनज्वालांतकोपमा' शक्ती ॥ ४२ ॥ (मं. रा. यु. ६५०)
'रामपराक्रमपावकदग्धाखिलराक्षसाटवीमार्गा.' ॥ ४३ ॥ (मं. रा. यु. ६९६)
'राक्षसतिमिरापहरघुरामयशश्चंद्रचंद्रिकाजालें' ॥ ४४ ॥ (मं. रा. यु. ७०८)
'आबालप्रवयस्कप्रजाप्रमोदाश्रुसिक्तभूवरना' ॥ ४५ ॥ (मं. रा. यु. ८२४)
'सुग्रीववालिवानरजन्मकथाकर्णनस्पृहाधामें' ॥ ४६ ॥ (मं. रा. उ. २०५)
'बालग्रहोपशांतिप्रज्ञावल्कीर्तिशांनिशातकरें' ॥ ४७ ॥ (मं. रा. उ. २९६)
'स्वर्गणिकाशतनृत्यसुगायकगीतसुवाद्यरवें' नभ गाजे ॥४८॥ (सवाई रामा. ६३)
'तक्षककर्कोटधिकोग्रदशाननरक्षउपद्रुतविश्वभयापह' ॥४९॥ (सवाई रा. १४५)
'धनधान्यगृहक्षेत्रग्रामरथद्विरदधेनुहयदानें.' ॥ ५० ॥ (द्रोण. ६, ३०)

# परिशिष्ट—ऐ.

## १ मोरोपंती काव्यांतील संस्कृत वाक्यें.

( गीत्यर्ध ) 'त्वयि तनुवितरणसमये' गंगे हरिता नकोंच दे हरता. ॥१॥ (गंगास्तुति ६४)

प्रभुसम पूज्य मला तो ह्मणतां 'तुभ्यं नमो रमाजाने !' ॥२॥ (हरिवंश ५,९०)

(श्लोकचरण) 'अयि क्वासि क्वासि प्रियतम' असें गद्गद वदे. ॥ ३ ॥(कृष्णविजय ६२-११५)

( गीति ) 'श्रीमद्गणेशगुरुपदनखशशिकांतिच्छटा जयंतुतरां ।
प्रतिभारत्नं लब्धं यासु मयेदं मनस्तमोघ्नीषु'॥४॥ (प्राकृतमंत्ररामायण उपक्रम १)

( गीत्यर्ध ) 'जयतितरां श्रीरामो सुग्रीवो जयति लक्ष्मणो जयति.' ॥५॥(प्रा०मं. युद्ध० २६१)

'शत्रुं जहि राम!' असें वदोनि दे हर्ष सूर्य विश्वास. ॥६॥(मंत्र रामा. युद्ध. ६९३)

( श्लोकार्ध ) 'मातर्नमस्ते क्षमस्वा'पराधीन । मानी मला सर्वथा पराधीन. ७ (कुशलवो० ४,३२)

(श्लोकचरण) 'श्रीविघ्नेश्वर ते नमःकुरु कृपां निर्विघ्नमस्त्वद्य मे.' ॥८॥(कुशलवोपाख्यान १०,५)

( श्लोक ) 'या प्रासूत स्वयं गौरीं कीर्तिं मेनेव सन्नुताम् ।
या सद्गुनवसंतश्रीः कल्पवल्लीव याऽर्थिनाम्' ॥ ९ ॥
'यस्याः स्नुषा रत्नगर्भा सपत्नी चामरावती ।
तस्या श्रीगोपिकादेव्याः किमपीदं कृते कृतम्'॥१०॥(भीष्मभक्तिभाग्य उपसंहार)

( गीत्यर्ध ) ज्यासि 'अहो रूपमहो महिमाऽयं सुकृतुर्वयं धन्याः'.॥११॥ (भीष्मभक्ति १६६)

आलों मृगानुसारें; 'आपृच्छे त्वां तदहमितो यामि.' ॥१२॥ (आदि. १०-६६)

'किं जितमिह किं जितमिह' ऐसें असकृत् पुसे अचक्षु रसें.॥१३॥(सभापर्व ४,८०)

'भो भगवन् ! भो वत्सल ! भो हतचाणूरमल्ल!' भागावें ॥१४॥(सभा० ५-७८)

'हे नाथ ! रमानाथ ! व्रजनाथ ! हरे ! मुकुंद कंसारे !
गोविंद ! कृष्ण ! केशव ! दीनार्तिहरस्त्वमेव संसारे' ॥ १५ ॥ (सभापर्व ५,६९)

मुनि ह्मणति 'वानराणामपि न नराणां सुमंगलं जननं.'॥१६॥(वन. १२-१६२)

भरत ह्मणे 'शिव! शिव! इह केयमपूर्वेदशी कुशीला' हो ॥१७॥(वन. १०-७३)

भीष्मा! मजला ह्मणसी जरि 'जयमाशास्व मे विभो राम!'॥१८॥(उद्योग. १३,६७)

'भगवति गदे नमस्ते' त्वां कितिकां करुनि संगरा खावें ॥ १९ ॥ (भीष्म. ३,४)

मुनि वदले, 'मा मैवं पीडय पापाय बालकौ शल्य!' ॥ २० ॥ (भीष्म. ८-३१)

'भक्तः प्रणश्यति न मे' हें कीं वदलासि तूंचि भविकवच. ॥२१॥(द्रोणपर्व—)

शरतिमिरीं कृष्ण ह्मणे 'मच्चेतोंऽबुजनवातप क्वासि' ॥ २२ ॥ (द्रोणपर्व—)

नित्य ह्मणे 'सिंहोऽस्मि श्वस्त्वं गंतासि कृष्णकरिप क्व'. ॥२३॥(द्रोणपर्व २०-४७)

'पार्थं न हन्मि यावत् पादौ तावन्न धावयेऽहमिति ।
घोरं यस्य व्रतमिदमहह! कथं सोऽप्यगाल्लयं समिति'.॥२४॥(कर्णपर्व ६-५७)

भीम 'सुषेण हतोऽसि स्थैर्यं कुरु' हें वदोनि शर सोडी.॥२५॥(कर्ण ३०-५२)

वदला दास 'करिष्ये वचनं तव' तो करी न पार्थ कसें ?॥२६॥(कर्ण ३६-४०)

'पादौ न धावयिष्ये पार्थे जीवत्यहं कदापीति'. ॥ २७ ॥ (कर्ण ४०-२३)
मातुळपुत्रा 'माभैर्वत्स' असें मागतों तुला सदया. ॥ २८ ॥ (कर्ण ४३-१७)
'मा भैर्वत्स' जयश्री एवं वाक्यें हरी पितामह ती ॥ २९ ॥ (कर्ण ४७-६९)
तेही नरनारायण ह्मणतिल 'वीरोऽयमेव कौ' शल्य ॥ ३० ॥ (कर्ण ४४-३२)
दे, 'पार्थ हतोसि' ह्मणे निश्चय तेव्हां जनेंही हा केला. ॥३१॥(कर्ण ४७-७२)
'कर्णेन गीर्णचक्रा सप्तद्वीपाधरा सशैलवना ।
चतुरंगुलमुत्क्षिप्तेत्यूचे भगवान् मुनिर्विशुद्धमनाः' ॥ ३२ ॥ (कर्ण ४८-५८)
'नश्यति न मे जनो'या बोल न लागो दिला तुवां स्ववचा.॥३३॥(कर्ण ५०-५४)
संहर्त्यातें व्हाया सुख भजसि 'नमोऽस्तु ते विवेकाय'॥३४॥(अनुशासन ३, ३४)
संजय धरुनि तयातें 'मैवं मैवं' ह्मणोनियां शमवी. ॥ ३५ ॥ (स्त्रीपर्व २-२५)
तूं नित्य 'यतो धर्मस्ततो जय' असेंच ह्मणत होतीस. ॥ ३६ ॥ (स्त्रीपर्व ३,३)
ऐसें वदोनि देवी तीं 'क्क स राजा' असें पुसे धर्मा. ॥ ३७ ॥ (स्त्रीपर्व ३,४८)

...शिवाय गंगारामा. ३१; तीर्थरामा. ५१; मंत्रभागवत १०-६६० पहा. तसेंच पृ० ११६ च्या टीपेंत आठ उदाहरणें दिलीं आहेत तीं इष्ट तर पहावीं.

## (२) संस्कृताच्या तऱ्हेवर रचना.

### (अ) संस्कृत लिंगें:—

(१) संपन्न **मित्र असतें,** तरि **येतें** संकटांत कामातें. ॥ (हरिश्चंद्राख्यान अ० २ गी० ८)

(२) भीमाच्या तुझियाही **पायांचा शपथ** सत्य हें कथितों. ॥(कर्ण ६३-४१)
**माझा शपथ** तुज असे जें सत्य! सत्य तेंचि सांग मला. ॥(हरिवंश २६-६७)
(३) **ऐसा स्वप्न** विलोकुनि तो श्रीमान् कर्ण जाहला जागा. ॥(वनपर्व १४-१५)
(४) **हा विघ्न** योगिहृदया सहसा सावधपणांतही मळवी. ॥ (हरिवंश ५४-३८)
(५) तों ये तेथ पहावयासि उदरीं **ज्याचें** निच्या **जन्म** ती. ॥ ६ ॥ (कृष्णविजय ५५ ५८)

(६) जो तोचि आपणांतहि **आकाश जसा** घटांत तेविं असे.॥७ (मंत्रभा. ११)
(७) **ते नंदयशोदोद्भव** रात्रीला नेणतीच सरलीला.॥८(मंत्रभाग.१०-५८९)
(८) दुर्योधन पंचाक्षरिमंत्रें परमोग्र **भूतसा** स्ववळे. ॥ (सभापर्व)
(९) **ग्रथिली उपनिषद** प्राकृता कशी यशो! कवनांत ॥(दोहारामा.३६वें,४६)
(१०) **प्रेमा कैसा** किती **हा** पटु अपटु असे कीं नसे दंभ गर्व. ॥ (कृष्ण. उत्तरार्ध ऊपसं. ३)

(११) **'दार'** शब्दाविषयीं विवेचन पृ० २२,२३ पाहावें.
(१२) राज्यच्युतसंगें श्रमपात्र करिसि दिव्य **देह** कां गे **हें**? ॥ (वन. ९-८)
(१३) श्रीरामरावणसमर होय श्रीराम**रावणसमरसा.** ॥ (वन. १३-६६)

**(आ) संस्कृत विभक्ति—**

(१४) परिभवखिन्न युधिष्ठिर **राज्ञौ** प्रभुला ह्मणे अगा अजिता ! ॥ (भीष्म. ३,१)

(१५) अंगीकृतगहनाटन **दाशरथी** त्यक्तधैर्य 'हा!' **करिती.** ॥
(निरोष्ठ रामा. २३)

(१६) झालें त्वन्नाथवरें यापासुनि देवि ! **कालि !** याही तें. ॥ (द्रोण. १३-२५)

**विशेषणाला विशेष्याची विभक्ति—**

(१७) जो **तापशमनें, स्वच्छें, यशें**, लाजवि कापुरा ॥ (मंत्रिगमायण १२)

**(इ) संस्कृत क्रियापद—**

(१८) थोडें याहुनि, पाहुनि **नटती** कादंबिनीस केकी ते. ॥ (वन. ६,५८)

**(ई) संस्कृताप्रमाणें अवग्रहलोपः—**

(१९) विप्रसती ह्मणति 'शिवे ! ऐसेंचि सदा कथोक्त दे **ऽगाई** ॥ (द्रोण. ५-१९)

---

# परिशिष्ट—ओ.

## कवीचें निरंकुशत्व. ( Poetic License. )

'कोठें दूरान्वितपद, कोठें चुकली असेल यति मात्र; । अतिमात्र दोष ऐसें, न वदोत कवी समस्तगुणपात्र'. ॥ (मंत्ररामा. उपक्रम. १९)

**(१) अग्राह्य समास** (संस्कृत प्राकृत समास):-( १ ) तोडुनियां **गृहवेड्या, आला** झालां न देखतां मज वेड्या. ॥ ( कृष्णविजय ३२-२९ ), **क्रियावेड्या** (कर्ण. ४१-१९), ( २ ) तव दर्शन बा पांचा प्राणासुख; लाभ हा **जननिवापांचा** ॥ ( कृष्ण० ३९-६ ) ( ३ ) पाहे ह्राहि पसरुनि प्रभुगि **तपःपद्र** विप्र भव्याग ॥ ( अनुशासनपर्व ६-५६ ) ( ४ ) नवल रविपुढें कीट स्वकृत **तमोनाशकाज** वाखाणी ॥ ( वनपर्व अ०—गी०- ) ( ५ ) एक ब्राह्मणसत्तम, एक क्षत्रावतंस **धीटपती** ॥ (कर्ण. १०-१५) (६) झाला हा **निबरवया** हानि बरवया न जाणतां होय ॥ (अश्व० ३-७) ( ७ ) दूत आगारि घेनी ह्मणुनि सुमति ते जोडिती **पायमाचे** ॥ ( कृष्णविजय, उत्तरार्ध ) ( ८ ) कुंकुम **माथानीचे** ज्या कर तो पाविजेल माथानींचें (कृष्णवि० १६-३८ ) ( ९ ) हा **विधिनेम** उगं हा ह्मणतां तो जाय होउनी मऊ, गेहा ॥ ( कृष्ण० ) (१०) मृदुरक्त सहज चरण **व्यालशिरोमणिखड्यावरी** सहचरण ॥ (कृष्ण-) ( ११ ) किति जेवति वरदगडीं कुसुमफळीं **सिक्थपल्लवांकुर-दगडी** ॥ (कृष्णविजय अ० ७ ) ( १२ ) हा **साहावाख्याय** श्रवण करावा रगज्ञमुख्यांनीं (कुशलवोपाख्यान अ०६) ( १३ ) त्या सुगुणसागराचा पाविलें न अंत **सुकविधीटिट्वी** ॥ ( द्रोणपर्व ) ( १४ ) **सुरतश्रांतगोपिकाननग्रामा** ( कृष्णविजय पूर्वार्ध ) ( १५ ) **स्नेहरिण** ( कृष्णविजय ३२-२९ ) (१६) **स्वजनभरवसा** ( कृष्णविजय उत्तरार्ध) (१७) **स्वात्मघरसें** ( कुशलवोपाख्यान ).

**(२) अनुस्वारव्यत्ययदोषः**—'ण' 'न' 'म' ह्या अनुनासिक वर्णांवरील अनुस्वार-व्यत्यय सदोष मानणें योग्य होणार नाहीं ह्मणून तशीं उदाहरणें न देतां इतर वर्णांवरील अनुस्वारव्यत्ययदोषाचीं उदाहरणेंच दिलीं आहेत:—(१) देवा व्हावें चक्षुर्मजःसंपन्न **आश्रमामाजी** । मामाजी ऐसें या मानि साहेनाचि त्या **श्रमा माजी** ॥ (वन.१३-६६) (२) असुरांचें **उर गाजे** यत्स्मरणें वर्ण्य करिकरां **उरगां जे**॥ (कृष्णविजय ३८-३२)(३)पारव रौरव गौरव कर्ता भर्ता भला **मला गमसी** । समशील बुद्धि होउनि नीतीनें आजि योलुं **लाग मसीं.** ॥ (आदि. ११-७३) (४) संजय ह्मणे कुंतेकाश्रिनगर्वस्वदुर्धार **संगति ही** । कां जी करिजेल इतर मणिमंत्रौषधिरगज्ञ **संग तिहीं.** ॥ (भीष्म. ६-५)

**(३) आकारांत शब्दास तृतीया विभक्तीचा स्वरप्रत्यय लाविल्याचें उदाहरणः-** (१) करितों तच्छिक्षित मी, वैस उगा, तूं न होसि कवि **तोरें.** ॥ (सभापर्व अ० ४ गी०३८)

**(४) 'छ' अक्षराचा कधीं कधीं जोडाक्षराप्रमाणें उपयोगः—** (१) बहु तेज प्रकट करी शुचि सत्वगुण **च्छर्वी**, हिरा ऊर्नी. (वन. ४-७४) (२) कीं यांत **च्छळ** पुष्कळ

जो सावध तोचि शुद्ध यश लाहे ॥ (हरिश्चंद्रा. ५-२५) (३) चारीही हय वेधिले ध्वज मग **च्छे**दूनियां पाडिला. ॥ (कुश.) (४) रागें वदतां झाली प्रकट **च्छं**दोमयी अशी वाणी. ॥ (मंत्ररामायण प्राकृत); तसेंच भीष्मभक्ति. गी० ११ पहा.

**(५) दीर्घास्तव ऱ्हस्वः-** (१) धर्ममतिला प्रजा तसि आवडते जेंवि **आइला** दुहिता ॥ (आश्रम २-८३) (२) तो धृतराष्ट्र प्रमुख स्वगुरुतें नमुनि जाय **आजि**कडे ॥ (अश्वमेध. ६-३३) (३) यज्ञननीच्या होउनि दुग्धधिनें लोल वानिलें **कुशिला** (द्रोणपर्व) ('कुशीला' हें शुद्ध रूप कृष्णविजय प्रद्युम्नाख्यानांत आढळतें) (४) ऐसें पुसतां मारुति सांगे **तिस** वृत्त सर्वही याचें. ॥ (मंत्ररामायण-सुंदरकांड ६५) (५) 'तीराला' बद्दल **'तिराला'** हें रूप मंत्ररामायण प्राकृत ७।१७५ यांत आढळतें. (६) 'तूं' बद्दल **'तु'** हें ऱ्हस्व रूप मंत्ररामायण प्राकृत ६।७३८यांत आढळतें. (७) गंगेमाजि उलूपी तापोनि उडी, जसी **मगरि** घाली ॥ (महाप्रस्थानिक १-२०) श्रमतम रजकणवेची, **वाणि** न करि सत्प्रियतम रजकणवेची (कृष्णविजय पूर्वार्ध) ('वाणी' हें शुद्ध रूप मदालसाख्यानांत आढळतें). (८) दाखविती तोक **रिती,** पूजुनि गुरुसा कृतार्थ बहु तो करिती ॥ (कृष्णविजय) ['रीति' हें शुद्ध रूप भीष्मभक्तिभाग्य व उद्योगपर्व यांत आढळतें-**रीति** दहांची हे कीं पहिले समजाविती लहानातें—(उद्योग). कैंची इतर जनीं ती जी दावी ज्ञानराशि शुक **रीति?** ( भीष्मभक्ति )]

**(६) पुढें जोडाक्षर असून मागचें अक्षर द्वित्व होत नाहीं:**—(१) मथिले त्वदनुज**हि ह्म**णत होते आह्मां रणांत न तरा जे. ॥ (गदा० २-७) (२) साधुनि देईन **सख्या** राया दुर्योधना जशी महिला. ॥ (कर्ण. ६-७.)

**(७) यतिभंगः-** (१) मागे सुधेविणें **अज—रामरता** केतुवास वरदा त्या ॥ (आदि. अ० ४) (२) शोधूं बरें करूं **कर—णं** तें न विचारिता नव्हे नीट.॥(आदि० ३४-८०) (३)आश्रय देइल कशि **मृग—पागस्कर** मत्त सिंधुरा जगती ॥ (स्त्रीपर्व अ० ५-१८) (४) असा करुनियां बरा. दृढ विचार **लंकापति—। कुळांतक** असें वदे कठिण कीं श्रुती कांपती ॥(कुशलवो० ३-२०) (५) झाला तसा जसा **सुनृ—पा** पाहुनि दस्यु वचकला होतो. ॥ (ऐषिक. २-६) याचीं शोधक वाचकांस आणखी पुष्कळच उदाहरणें सांपडतील. विस्तारभयास्तव येथें जास्ती दिलीं नाहींत.

**(८) यमकासाठीं शब्दाची ओढाताणः**—'अ'काराचा अशुद्ध लोपः— (१) गृध्राद्विज अनुजातें करुनियां **ऽपांजलि**प्रदान, मनीं. ॥ (मंत्ररामा. किष्किंधा. १२१ ) (२) 'असतो' स्तव **'अस्तो'** (द्रोण. ४-९७) (३) 'असला' स्तव 'असिला'.—खवळेचि पीडकावरि पन्नग भोगार्धशेष जरि **असिला** ॥ (कर्ण. ३६-३१) (४) 'उरवी' स्तव 'उर्वी'—तरि कुरुपांडव युद्धारंभ समय यश तिचें न तें **उर्वी** ॥ (कर्ण. ८-३१-१५) (५) 'जुन्या' स्तव 'जुनिया'. जो भावी अपकारा हृदयांत सदा नव्याचि सम **जुनिया** ॥ (आश्रम-२-९२) (६) 'जो' स्तव 'जा'. मामाजीस ह्मणसि, तें न ह्मण, ह्मण तयांसि आर्य **आजाबा** ॥ (आदि. ३३-७२) (७) 'ज्या' स्तव 'जा'. कीं त्या अयश नसावें, ह्मणती उचितेऽ वेव वीर **जा** ॥ (बालमंत्ररामा० बाल. २२) (८) 'ज्याला' स्तव 'जाला'. शक्रहि रक्षू

न शके संहाराया सजेन मी **जाला** ॥ (कर्ण. १४-४०) (९) **'झ' स्तव 'ज'. 'तुझी' स्तव 'तुजी'** केका १०७, (१०) आजा धर्म गमेलचि जो त्यासि पहा प्रताप हा **माजा** ॥ [ऐषिक. ३-१४] (११) न करावा शोक तुह्मी अवलोकुनि हे असी दशा **माजी** (गदा १०-२३) (१२) **'झाली'** स्तव 'जाहली' 'कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य **जाहली** आहे॥ (कृष्णवि० ८६-२) (१३) **'झाले'** स्तव **'जाहले'** केका ८२ (कर्ण. २८-५८) (१४) **'ठ' स्तव 'ट'** केली **हे** मर्यादा, जे आतां चालती जगीं **मोटी**. (आदि. १८-४८) (१५) **'ड' स्तव 'ढ'** गांधारी त्यासि ह्मणे हूं ह्मण वा वासवप्रभा **वढिला**. ॥ (आश्रम. ६-४८) (१६) 'ती' स्तव 'ते'—पाहे शिळा बिळाच्या वदनीं, फोडी भुजाबळें पर **ते** ॥ (मंत्ररामा० किष्किंधा० ३७) (१७) 'तीनदा' स्तव 'तिंदा'—प्रिय पार्थ मी न देतां परिभव **तिंदा** कशास हा याला. ॥ (द्रोण. १५-९१) (१८) तुझ्यास्तव **'तुझिया'**—केका ४१. (१९) 'तुमच्या' स्तव 'तुमंचिया' केका १८. (२०) 'त्वां' स्तव **'तां'**—केका ९१ पृ० २२५. (२१) 'त्वां' स्तव **'तुवां'**—केका ९०. (२२) 'दा' स्तव 'धा'—ते केले दुर्विधिहतमति शशकांनीं हरी **परागंधा** (आदि. २९-१८) (२३) 'दूर गे' स्तव 'दुर्गे'—(स्वपदभजनीं बहुमुख, हाणुनि ह्मणे भक्त मुक्तिला **दुर्गे** ॥ (भीष्म. १-४४) तसेंच 'दुर्गास्तव' १४ पहा. (२४) 'न्हाला' स्तव 'नहाला'— शरणागतासि सांग, श्रेय क्षीरें सदा **नहाला** जो ॥ (भागवत २-७९) (दुर्गास्तव १४) (२५) 'दोघे' स्तव दोघ—भिन्ना मूर्तीच त्यांच्या नमन निजगणीं यापरी **दोघ** बंधू ॥ (कुश. अ० ५-३५) (२६) 'परतावें' स्तव 'पर्तावें'—पडतां गिरिशिखरच्युतबृहदुपलें कीं खलें न **पर्तावें** ॥ (कर्ण. २८-६) (२७) 'प्याला' स्तव 'पियाला' प्या स्वजनार्थ क्रोधा जेंवि विषा विश्वनायक **पियाला**. ॥ (उद्योग. १२-७८) (२८) 'बहिरी' स्तव 'भेरी'—वाजति, तेव्हां झाली केवळ ते राक्षसचमू **भेरी** ॥ (मंत्ररामा. युद्ध. ६२१) (२९) 'बहिरी' स्तव 'भेरी'—भेरीप्रभृत्यखिलवाद्यस्वनें करुनि **भेरी**च होय जगती ॥ (कुश० १३-८८) (३०) 'मर्दान' स्तव 'मरदीन'—कीं तो पामर दीन स्वबळेंचि ह्मणे, त्रिलोकपा **मरदीन** ॥ (कृष्णवि. ३९-२७) (३१) 'मातें' स्तव 'मतें'—हा मकरालय दुस्तर याहुनिहां जानकीवियोग **मतें** ॥ (मंत्ररामा. युद्ध. १८) (कुश. ४-४२ पहा.) (३२) 'मानी' स्तव 'मनी' शोकाकुळ होउनि, तो स्वदशा तेव्हां मुखप्रदा न **मनी** ॥ (मंत्ररामा. किष्किंधा. १२१) वरील दोन रूपें 'अपि माषं मषं कुर्यात् छंदोभंगं न कारयेत्। या नियमाप्रमाणे योग्य आहेत. (३३) 'मामातें' स्तव 'माम्यातें'—कथुनि तसें व्हावें कां नृप पळवी मृळिना **स्वमाम्यातें** (कर्ण. ४४-८) ('मामातें' हें शुद्ध रूप गदा. ३-५ यांत दिलें आहे) (३४) 'वणव्यांत' स्तव 'वणवयांत स्वाघस्मरणांत मला ताप जसा कुंजरा **वणवयांत** (आश्रम. १-४४) (३५) 'शकून' स्तव 'सकून'—त्या नंदीश्वर शापी, प्रभुसामर्थ्यें वधास्महि **सकून** (बालमंत्ररामा. उत्तर. ५) (३६) 'ष' स्तव 'ख'-**उखा**—हरिवंश व कृष्णविजय, (३७) कोणी न क्षत्रिय या स्वमतें कल्पूनि **दोख** टाकु सवा ॥ (स्त्रीपर्व ३-११) (३८) हीरक वीरकरगनवटंकेंहि चिरे न, जेंवि **पाखाण** (विराट. ४-३२) (३९) ज्याहुनि अन्य प्रियतर नरलोकीं नच मना **पुरुख** गमला ॥ (ऐषिक १-६१) (४०) 'सवित्यास' स्तव **सवितयास**' (आश्रम. १-३१) (४१) **'स्कंद स्तव 'स्कंध'** गरुडस्कंधीं मधुरिपु जेंवि मयूरद्विजावरी **स्कंध** ॥ (मंत्ररामा. युद्ध. २९) (४२) **'हिमा'**

स्तव 'हिंसा'—कीं व्हावा बहु दुःसह जठरानलताप भलतसा **हिंसा** ॥ (कर्ण० ४१-४९)(४३) ह्ये' स्तव 'हे'—**हे** मानसचारांची वाग्मुक्तांची सदैव रसिका कीं ॥ (मंत्ररामा. युद्ध. ७-५३) (४४) 'होउनि' स्तव '**होनि**—(मंत्ररामा. ६-३५२) (४५) 'नातवातें' स्तव '**नातुवातें**' (महाप्र० १-५) (४२) 'चिखल' स्तव '**चिखोल**' (कर्ण. १२-२५)

**(९) ऱ्हस्वास्तव दीर्घ—** (१) 'उचलायाला' स्तव '**ऊचलायाला**' हें रूप मंत्ररामायण उत्तरकांड ११८ यांत आढळतें. '**ऊचलिका**' केका ४३ पहा. (२) 'उदंड' स्तव '**ऊदंड**'—आखंडलविष्णूसे, गमती देतां प्रहर्ष **ऊदंड** (मंत्ररामा. ४-१६) (३) 'उठुनि' स्तव 'ऊठुनि.—धर्म प्रसन्नचित्तें **ऊठुनि** भेटे प्रभूसि कर जोडी ॥ (कर्ण. ४३-२२) (४) 'कवि' स्तव 'कवी'—अतिमात्र दोष ऐसें न वदोत **कवी** समस्तगुणपात्र (मंत्ररामा. उपक्रम) (५) **तीच्या**—मंत्ररामा. (६-६०९) (६) **तूझी**—(कुशलवो. १३-४०) (७) **तूझे**—(कर्ण. ४३-७९.) (८) **तूजवरि**—केका ९२ (९) **दीसती, दीसतां**—केका ७७, ९१. (१०) **दूसरा**—मंत्ररामा. ६, २४९. (११) **पूरवूं**—केका ४८ (१२) (वासर) **मणी** (आदि १५, १४) (१३) **वारी**—भीष्म भक्ति २. (१४) नागपुरीं भगिनीचें **शकुनी** पूजूनि भूरिदान करी (आदि. १४, ९२) (१५) **हानी**—आदि २४, ३२. (१६) **तूकडे** (कुशलवो. १३, ५६) (१७) **प्रभू** तनय (कृष्णावि. अ. ८५, २८) (१८) **प्रायशा** (केका २६) (१९) **ब्रह्मर्षी** (भीष्मभक्ति. ३६) (२०) **राजर्षी** (भीष्मभक्ति. ३६) (२१) 'सवती' स्तव '**सौती**' (आदि. १-२२) (२२) **हरी** (भीष्मभक्ति. ४)

**(१०) वर्तमानकाळवाचक धातुसाधितानेंच पूर्णवर्तमानाचा अर्थ साधिला आहे:—**

(१) अत्यभ्यासें जातों, तिळहि न चळतो मुखांत पाणि तमीं, । होईन शब्दवेधी तिमिरांतहि हें मनांत **आणित** मी. ॥ (आदि २४, १४)

**(११) समास असून संधि न केल्याचीं उदाहरणें**—(१) तीणें दासी मोहा कुळविरहीं अधर**अमृत** पाजी शमोहा ॥ (कृष्णविजय पूर्वार्ध) आंग**उपायन** (ध्रुवचरित्र ३२) (३) ओक**आत्म**धनस्त्रीतें । ओक मानूनि मानसें ॥ (कुशलवो० ४) (४) अंध-ज**अंधकहर** हो तूं पुण्यश्लोक नीच कलि हा वा ॥ (गदा १, १०६) (५) नकुलशरगण गमे घन झांकाया **कर्णअर्यमा** वळला. ॥ (कर्ण १४, ५७) (६) **कृपाअरुणा**—आर्या केका ६ (७) गुल्मद्रुमवल्ली**गणअंत**र्हित (मंत्ररामा. ४, ५५) (८) चंदन**उटी** (कुश. ४, ४१) (९) दुरितकर**असुर**भर (१०) धनुष्य**अब्द** (विराट. ६, ४२) (११) धृत असि (विराट. ६, ४२) (१२) ब्रह्म स्वपरम**आत्मा** ऐसें ह्मणती सदा परतरा ज्या ॥ (अनुशा. ३, ३८) (१३) हर्षकराचि होती जरि पडती बहु **पशु+इलाप** परि सव„ ते (स्त्री ५, ४९) (१४) **भट्टआमलक** विखुरले होय तयांची मुखप्रभा मळकी, ॥ (कर्ण. ३९, ३०) (१५) मातृदृगाब्ज**अर्के** (कुश. १०) (१६) स्मरत**मइना** (अनुशा. ६, ७५) (१७) **स्वआननें** (कर्ण ४५, २३) (१८) **स्वआश्रमातें** (कुश. ८, २२)

( १९ ) तो येउनि सद्भावें, **स्वउरीं** प्रभुपादपंकजें कवळी. ॥ ( कर्ण २२, १३ ) ( २० ) **स्वआयु** ( आश्रम. २, ६० ) ( २१ ) **'तेजओका'** कर्ण ३२, ९:, (२२) **निजओक** (मंत्रभाग. १०-४०७) (२३) **सत्वउडुप** (द्रोण. २२-२०)

**(१२) समास नसून संधि केल्याचीं उदाहरणें:—**(१) **कुरवाळी** (कुरव अळी) [द्रोणपर्व १५, ८० ] (२) रण जनविस्मयकारक दारकयुग्मासवें असें रामें। केलें खरतर शरवरधरकरपद्में **गुणांचियारामें** (=गुणाचिया आरामें ) [ कुशलवोपाख्यान ] ( ३ ) असाधु अथवा साधु **परंत्वत्याज्य** ( =परंतु अत्याज्य ) लेंकरूं ॥ [कुशल० ४, ५२ ](४) मातर्नमस्ते **क्षमस्वापराधी** ( =क्षमस्व अपराधी ) न [ कुशलवो० ४, ३२ ] ( ५ ) होतां **वृथाग्निनें** तुज मृत्यु नृपा हा अनिष्ट मज वाटे. ॥ (आश्रमवासी ७, १५) (=वृथा अग्निनें). (६) **ग्रंथकृद्जरामर** (=ग्रंथकृत्+अजरामर) (अनुशा १,५५).

**(१३) षष्ठी विभक्ति व तिचा संबंधवाचक शब्द (दूरान्वय):—**मयूरकवीच्या काव्यांत षष्ठी विभक्ति एकीकडे तिचा संबंधवाचक शब्द भलतीकडे असा प्रकार पुष्कळदां आढळतो. परंतु तो संबंधवाचक शब्द कवितेंत अशा खुबीनें ठेविलेला असतो कीं षष्ठी विभक्तीचा संबंध इतर शब्दांशीं न लागतां त्याच दूरस्थ शब्दाशीं लागावा. त्यांचीं कांहीं उदाहरणें:—(१) ज्यांत **शुकाच्या** केलें प्रकट कथुनि धर्मराजयश **तातें** ॥ ( स्वर्गारोहण २, ३० ) (२) दिधलें **सत्यवतीच्या** पुण्य, यश, अनंतशर्म **दायादें** ॥ (स्वर्गारोहण २, ३१) (३) **प्रभुचा** मर्मी हाणी सर्वांसहि तीन तीन शर **भाचा.** ॥ ( द्रोणपर्व ) (४) **ज्याचा** शास्त्रीं शस्त्रीं व्यवहारीं वासुदेववत् **समज** ॥ (द्रोणपर्व) (५) **चैत्राचिया** प्रतीक्षा करि दीक्षा यावयासि **पुनिवेची** (अश्वमेध. ४, ९९) (६) रे उत्तरा! **शकुनिच्या** या व्यूहांत न दिसे मला **भाचा.** ॥ (विराटपर्व) (७) **आर्तांच्या** कां देइल धर्मज्ञ न हाक विप्र **सादास?** (अश्वमेध ७, ३६).

# परिशिष्ट—औ.

## मोरोपंती काव्यांतील श्लेषांचा स्थलनिर्देश.

१ अंक (१ चिन्ह, २ लांछन) आदि. १७-२१

२ अज (दशरथपिता, २ ईश्वर) मुक्तामाला.

३ अंधकारातें (सभंगश्लेष) (१ अंधकशत्रो शिवा! २ अंधकाराला) हरिहरस्तव ४.

४ अधोगति (१ नरकवास, २ पाताळगमन. ३ खालीं जाणें) कर्णपर्व केका ७५.

५ अधःपतन (१ नरकपतन, २ खालीं जाणें,) अमृतमथन १-१०.

६ अनल (१ अग्नि, २ नलराजा नव्हे तो) वन ४-३३

७ अनामया (१ नामदेव जवळ नाहीं अशाला, २ निरामय देवाला) ज्ञानदेवस्तव.

८ अपार्थ (१ व्यर्थ, २ अर्जुन नव्हे तो) विराट ६-४१.

९ अंबर (१ वस्त्र, २ आकाश) कृष्णविजय २९-१.

१० अमृत (१ मोक्ष, २ सुधा, ३ पाणी) केका ४१, अश्वमेध २-६६.

११ अर्क (१ रुईचा वृक्ष, २ सूर्य) कृष्णविजय ८९-५७.

१२ अर्जुन (१ पार्थ, २ सहस्रार्जुन, ३ तृण) कृष्ण० ८९-५७.

१३ अर्थ (१ शब्दार्थ, २ द्रव्य) सन्मनोरथराजि १४.

१४ आत्मजाग्रह (१ कन्यारूप ग्रह, २ कन्येविषयीं आग्रह) केका ३३.

१५ आडवें येणें (१ सत्कारार्थ सामोरें जाणें, २ प्रतिरोध करणें) विराट ५-६१.

१६ आर्या (१ सती, २ कुलीन पुरुषाला, ३ आर्यावृत्त, ४ पार्वती) सभा५-११५भीष्मभक्तिभाग्य, स्वर्गा. २-५२.

१७ इला (१ पृथ्वी, हिला) गदा १. ३५ द्रोण ५.३५.

इलाप हा—इला पहा (अश्व ५.८३)

१८ उडुप (१ चंद्र, २ लघु नौका) कर्ण ७.२२

१९ उत्तर (१ अधिक चांगला, २ विराटपुत्र) विराट ६.३३

२० उलूक (१ राजनाम, २ घुबड) कर्ण ३८-१२

२१ ओक (१ गृह, २ वांति) मंत्रभागवत. १०. ४०७.

२२ कच (१ केश, २ बृहस्पतिपुत्र) आदि ९-६३

२३ कनक (१ धोत्रा, २ सुवर्ण) कृष्ण. ८३. ८१; मंत्रभाग. १०.४१४.

२४ कर (१ हस्त, २ किरण) आदि १०-१३

२५ करग्रहण (१ विवाह, २ हस्तग्रहण) परंतुरामा. १४.

२६ कर्ण (१ कान, २भारती वीर) कर्ण६-२७.

२७ कलंक (१ डाग, २ पाप) गोपीगोडवा.

२८ कवि (१ कवनकर्ता, २ ज्ञानी, ३ शुक्राचार्य) केका १२२, वामनचरित्र १९५ ('सुकवि')

२९ कांत (१ पति. २ सुंदर) मंत्रभाग. १०. ४०६.

३० कु (१ पृथ्वी, २ वाईट) स्त्री ५-१४; विराट ५-५५

३१ कुटिल (१ वांकडा, २ कुरळे, ३ कपटी) सत्संगस्तव ५० आदि. ९-६३

३२ कुलज (१ पर्वतोत्पन्न, २ सत्कुलोत्पन्न) नाममाहा. २५.

३३ कुशलं स्वस्त्यस्तु (१ कल्याण असो, २ मरून मोक्षास जा) सभा. १-९५

३४ कृष्ण (१ काळा, २ वसुदेवसुत, ३ पार्थ, ४ व्यास) कृष्णवि० ६५-१०; कर्ण. ४४ ३६; अश्वमेध० ६-८५; मंत्रभाग १०. ३९८

३५ कृष्णा (१ द्रौपदी, २ काळी) विराट १, १२४. कृष्णाश्रिता (१ द्रौपदीची आश्रिता, २ कृष्णदेवाची आश्रिता) विराट. १. ११.

३६ कृष्णागुरुला (१ चंदनाला, २ कृष्णप्रभुला) भीष्मभक्ती. १९५

३७ कोटि (१ धनुष्कोटि, २ शतलक्ष) आदिपर्व.

३८ खद्योत (१ काजवा, २सूर्य) वन. ३,११.

३९ गणपति, गणेश (१ श्रीगणेश, २ मोरोपंताचे गुरु गणेशपंत) मंत्र रा० १. कुशलवो. १,१.

४० गति (१ सुगति, मोक्ष, २ चालणें) ('सुगतिप्रद') ज्ञानदेवस्तव ५; ('सुगति') वामनचरित्र १९४.

४१ गदासवें (१ रोगांबरोबर, २ गदाशस्त्रांनीं) केका ४६ 'सगद,' 'अगद' (१ रोगासहित, निरोगी, २ गदेसहित, गदेवांचून) उद्योग ४,७३.

४२ गभीराशय (१ खोल, २ गंभीरमनाचा) नाममाहात्म्य २५

४३ गुण (१ दोरी, २ सद्गुण) सभा ५,१२, सन्मणिमाला ४.

४४ गुरु (१ बापं, २ उपदेष्टा सद्गुरु, ३ यजमान, ४ जड) केका १२२; कृष्णवि. ८८,५४; द्रोण. २२,१६.

४५ गोत्रज (१ पर्वतोत्पन्न, २ कुलीन) नाममा. २५

४६ गौरी (१ गौरवर्ण, २ पार्वती) भीष्मभक्ति.

४७ घन (१ गंभीर, २ मेघ) वन. १२,८०.

४८ चमत्कृति (१ काव्यचमत्कार, २ वस्त्रे पुरविण्याचा चमत्कार) सभा. ५.११५.

४९ छळ (१ कपट, २ दुःख) केका ७५.

५० जड (१ भारी, २ मूर्ख, ३ जल) केका ४३; दत्तदयोदय ८४.

५१ जटिल (१ ज्वालायुक्त, २ जटायुक्त) कृष्णवि. ६६,३१.

५२ जपे (१ जपकरी २ रक्षी) मंत्रिरामा. ११

५३ जलधि (१ समुद्र, २ मूर्ख) कृष्णवि. ५७,३८.

५४ जीवन (१ प्राण, २ जल) साधुस्तव ६.

५५ तप्त (१ तापलेलें, २ संतापलेलें) आदि. ३६,२५

५६ तम (१ अंधार, २ अज्ञान. ३ दुःख) विराटपर्व, कर्ण ४२,८.

५७ तरणी (१ नौका, २ सूर्य) कर्ण. ७,२२

५८ ताप (१ उष्णता, २ दुःख) आदि. १७, २१.

५९ थोर (१ उंच, २ थोर मनाचा) नाममा. २५

६० दंड (१ शासनदंड, २ काठी) शांति. ३,८६.

६१ दक्षिणा (१ दक्षिण दिशा, २ दान द्रव्य) वन. ११,११८.

६२ दान (१ दान द्रव्य, २ गंडस्थावी मद) स्त्रीपर्व. ५,९.

६३ द्विज (१ पक्षी, २ ब्राह्मण, ३ वैश्य, ४ दांत) कृष्णवि. ९०,२८; हनुमद्रामा. १२६

६४ द्विजराज (१ चंद्र, २ ब्राह्मणश्रेष्ठ) संशय. रत्नमाला ३७.

६५ देवी (१ राज्ञी, २ देवकी) भीष्मभक्तिभाग्य, कुशलवोपाख्यान.

६६ धनंजय (१ अग्नि, २ अर्जुन) कर्ण ८,३६ कृष्णवि. ५८,३४.

६७ धर्म (१ युधिष्ठिर, २ धर्म, ३ यमधर्म) कर्णपर्व ४९,१६ कर्ण ४९,११.

६८ धाम (१ तेज, २गृह) नामसुधांबषट्क ९.

६९ ध्रुव (१ उत्तानपादपुत्र, २ खरोखर) केका ६५.

७० नकुळ (१ माद्रीसुत, २ मुंगुस) कर्ण-पर्व. १४ ३६.

७१ नंदन (१ पुत्र, २ स्वर्गवन, ३ आनंद देणारा) साधुरीति ५०, आदि. ३६,५७; ('नंदन-वनं व्रज'–मुक्तामाला)

७२ नर (१ अर्जुन, २ मनुष्य) वन. १४,२९

७३ नाग (१ सर्प, २ हत्ती) उद्योग. ४,६१; गदा ३,२१.

७४ निर्गुण (१ मूर्ख, २ ईश्वर) भीष्मपर्व १,६४.

७५ नीरस (१ रसविहीन, रुक्ष, २ दयाहीन) आदि ९,६३

७६ नृसिंह (१ नरश्रेष्ठ, २ अवतारी कृष्ण) कर्ण. ४०,१.

७७ पंक (१ चिखल, २ पाप) आदि १५,५४.

७८ पतंग (१ सूर्य, २ किडा) कृष्णविजय ८१,९२.

७९ पतित (१ पडलेला, २ पापी) कृष्णवि. ६२,२३ केका ५, सौप्तिक १,४१.

८० पद (पाऊल, २ वाक्यांश) द्रोण. ११.२८

८१ पय (१ दुग्ध, २ पाणी) स्फुटकाव्यें भागी

८२ परपुरुष (१ अन्य पुरुष, २ ईश्वर) सन्म-नोरथराजि ४५.

८३ परस्व (१ दुसऱ्याचें द्रव्य, २ ईश्वराचें द्रव्य) केका ५७.

८४ पराभूति (१ पराभव. २ उत्कृष्ट ऐश्वर्य) गदा. ४,२१.

८५ पर्व (१ पर्वणी, २ खंड) अनुशासनपर्व ७,१.

८६ पाणि (१ जल, २ हस्त) मंत्रीभाग. १०. ४००.

८७ पुनर्भव (१ पुन्हा जन्मणारा, २ पुन्हा उत्पवणारे केस) (आदि. ९,६३)

८८ पुराणपुरुष (१ ईश्वर, २ वृद्ध) संशय रत्नमाला २३.

८९ पुरारे (सभंग श्लेष) (१ त्रिपुरशत्रो शंकरा!, २ पुरा-रे–पुरून टाका) हरि-हरस्तव ९.

९० पुरुष (१ जीव, २ मनुष्य) सावित्री-आख्यान अभंग.

९१ पुष्पवती (१ पुष्पयुक्तलता, २ ऋतुमती स्त्री) मंत्ररामा. यु. ७९१

९२ प्राकृत (१ साधारण मनुष्य, २ प्राकृत ह्म० मराठी भाषा) ज्ञानदेवस्तव ९.

९३ बळी (१ शक्तिमान, २ राजनाम) केका ७६.

९४ भागवत (१ भाग करणारा, २ भगव-द्भक्त) मंत्रभाग १०. ४२८.

९५ भीम (१ शिव, २ पृथापुत्र, ३ भयं-कर) विराट. २,४९. वनपर्व ९,४५ ('भीमाकृति')

९६ भुजग (१ भुजस्थ अलंकार, २ सर्प) वनपर्व ११,९८.

९७ भुजंग (१ सर्प, २ जार) वनपर्व १२,८८.

९८ मंगल (१ शुभ, २ ग्रहविशेष) कृष्ण-विजय अ० २९

९९ मत्स्य (१ मासा, २ मत्स्यदेशस्थ) विराट. २,३२. स्त्रीपर्व ४,६२.

१०० मधुप (१ भ्रमर, २ दारूबाज) वनपर्व १२,८८.

१०१ मयूर (१ मोर, २ मोरोपंत) केका १२१,१२२; भीष्मभक्तिभाग्य.

१०२ मल (१ पाप, २ विष्ठा) केका ५८.

१०३ मलिन (१ मळकट, काळे, २ पापी) कृष्णवि. ६५,३४ ('मलिनवदन'२१ दुष्कर्मांनीं कृष्णवदन, २ काजळानें कृष्ण वदन—कृष्णवि. ८१,९३)

१०४ मानस (१ मन, २ सरोवर) उद्योग ११.१७.

१०५ मार्गण ( १ बाण, २ भिक्षुक ) कर्णपर्व ३०,५३; शल्य. २,१०८.

१०६ मित्र (१सूर्य.२ स्नेही) अश्वमेध३,५९.

१०७ मुक्ता (१ मोतें, २ सोडलेली) तुलसीस्तव २२.

१०८ मुरारे (सभंग श्लेष) (१मुरशत्रो विष्णो, २ मुरून जा) हरिहरस्तव गी० ९.

१०९ यादवा (सभंग श्लेष) (१ कृष्णा, २ या • दवाग्निला). ( हरिहरस्तव) गी० ५.

११० रस (१ जलरस, २ दुग्धरस, ३ शृंगारादि रस. ४ प्रेमरस ) कृष्णवि. ६१,१. केका ५८. १०१; अनुशा. ५,७१.

१११ रंभा (१ केळ, २ अप्सरा) कुशलवोपाख्यान अ० ७.

११२ राग (१ क्रोध, २ प्रेम) विराट ५.११; ५,२८.

११३ रानट (१ अडाणी, २ रानांत राहणारा) केका १२२.

११४ राम (१ मनोरम,२ श्रीराम, ३ रामाजीपंत पराडकर) केका १२२ विराट.७,३७.

११५ लघु (१ लहान, २ क्षुद्र) गोपीगोडवा

११६ वत्स (१ अर्भक, २ वांसरूं) केका ५८.

११७ वन (१ अरण्य, २ जल) वनपर्व ५,४१. केका ४८,

११८ वर (१ पति,२ श्रेष्ठ) मंत्रभाग.११.३०.

११९ वर्ण (१ जाति, २ अक्षर) आदि, १,२.

१२० वरासवें (१वर द्यावयास लागल्याबरोबर) २ वररूपी मद्यानें) केका ६८.

१२१ वंश (१ वेळु, २ कुल) मुरलीपंचक ४; वनपर्व ९,२९.

१२२ विनत (१नम्र,२सखल)विराट.६,११९.

१२३ विमद (१ गतगर्व, २ मदस्राव झालेले हत्ती) स्त्रीपर्व ५,९.

१२४ विराट ( १ नृपनाम, २ विराट्पुरुष ईश्वर ) विराट. १.१४०.

१२५ वृष (१ कर्ण, २ इंद्र) कर्णपर्व ६,११.

१२६ शर (१ जल, २ बाण) विराट. ४,१२, कर्ण. २४,१६.

१२७ शल्य (१ बाणाग्र, २ राजनाम) कर्ण. २१,३१.

१२८ शिखंडी (१ मोर, २ पांचाळ. भीष्मशत्रु) भारत.

१२९ शिव(१ कल्याण,२शंकर)वन.१३,४६.

१३० शिलीमुख (१ भ्रमर,२ बाण) कुशलवो० ६,३४.

१३१ शुक ( १ पोपट, २ शुकाचार्य ) कृष्णस्तवराज १७. तुकारामस्तुति २७.

१३२ शुचि ( १ शुभ्र, २ पवित्र ) आदिपर्व १७,२१. ('शुचिमूर्ति' सन्मणिमाला ४.)

१३३ शुद्धोभयपक्ष (१ उभय पंख पांढरे.) २ उभय कुलें पवित्र)कृष्णविजय९०,२८.

१३४ श्रवणोचित (१ ऐकण्यास योग्य, २ कानांत घालण्यास योग्य) सन्मणिमाला ४.

१३५ श्रुतिमत (१ वेदमान्य, २ ऐकावयास योग्य) आदिपर्व १,२.

१३६ संचित (१ संचित कर्मे; २ सांचवलेलें द्रव्य) केका १०५.

१३७ सत्याश्रित (१ सतीचा आश्रित, २ सत्याचा आश्रित) वनपर्व ४,१२२.

१३८ सदाचरणप्रभवा ( १ सदाचारोत्पन्न, २ सत्-परमेश्वर, त्याच्या चरणापासून झालेली) विराट ६,३७.

१३९ सदंड (१ काठी हातांत घेतलेला, २ संन्यासी) केका ५४.

१४० समर्याद ( १ मर्यादशील, २ मर्यादयुक्त सागर ) नाममाहात्म्य २५.

१४१ सरंध्र (१ उणेपणा असलेला, २ छिद्र असलेला) सभापर्व ६,७९.

१४२ सरला (१ वांकडी नव्हे ती, सरळ. २ निष्कपट) मुरलीपंचक ४.

१४३ सरस (१ नवरसयुक्त, २ जलपूर्ण). नाममाहात्म्य २५.

१४४ सर्वांगोपभोग (१ सकल अंगदेशाचा उपभोग, २ सकल अवयवांचा उपभोग) स्त्रीपर्व ५,११.

१४५ सक्षय (१ क्षय झालेला, २ कृष्णपक्षांत उणा होणारा) दत्तदयोदय ८४.

१४६ सीतार्त (१ सीतावियोगार्त, २ शीत-पीडित) वनपर्व ११,१२०.

१४७ सीताराम (सभंगश्लेष) (१ थंड बगीचा, २ सीतायुक्त रामचंद्र) हरिहरस्तव गी०४.

१४८ सीमंतिनी (१ स्त्री, २ तन्नामक प्रसिद्ध पतिव्रता) गदा ८,२५.

१४९ सुदक्षिणपण (१ सुदक्षिणराजत्व, २ उत्तम चातुर्य) कृष्णविजय ६६,२४.

१५० सुदर्शन (१ विष्णुचक्र, २ शुभदर्शन ३ नामविशेष.) आदि. ११,८५; मंत्र-भाग. १०. ४१४.

१५१ सुधा (१ चुना, २ अमृत) केका ५१.)

१५२ सुवर्ण (१ सोनें, २ उत्तम अक्षरें) नामसुधाचषक ४६,४७.

१५३ सुवृत्त (१ सदाचरणी, २ वाटोळें) सन्मणिमाला ४.

१५४ सूक्त (१ उत्तम वचन,२केळीचें सोप) सन्मनोरथ. १८.

१५५ सौवर्ण (१ उत्तम अक्षरांचा, २ उत्तम रंगाचा) वनपर्व ४.५६.

१५६ स्तनग (१ स्तनांवरील हार, २ स्त-नावर लोळणारा) वनपर्व ११,९८.

१५७ स्नेह(१तेल,२लोभ)कृष्णविजय८१.९३.

१५८ हरि (१अश्व, २ इंद्र, ३ विष्णु,४ सिंह. ५ हरण करी) के०३६, १२१, कृष्णवि. ६६,११; कुशलवो. ७,३; कर्ण. ११,५९.

१५९ हरिरंभासंबंध (१ इंद्ररंभासंबंध, २ केळीचा व घोड्याचा संबंध) कुशलवो. ७,३.

१६० हिं मठद्वारांतुनि (सभंगश्लेष) (१ देखिल मठद्वारांतून, २ हिमठ-पक्के, द्वारांतून) कृष्णविजय-सुभद्राख्यान.

१६१ हे वामना (सभंगश्लेष) (१ हे वामनरूपधारी विष्णो, २ हेवा मना) हरिहरस्तव गी० ७.

१६२ हंस (१ पक्षी, २ संन्यासी) आर्या-केका ५४.

१६३ क्षण (पळ, २ आनंद) ब्रह्मो. ८.८.

१६४ क्षमा (१ क्षमागुण, २ पृथ्वी) वनपर्व २,५६; स्त्रीपर्व ३,६.

याशिवाय काली (१ देवी, २ अग्नि जिव्हा) द्रोण ११.९८; चक्रपाणि (१ कृष्ण, २ चक्रधारी अभिमन्यु) द्रोण ३.१३२. जय, विजय (१ अर्जुन, २ यश), तीक्ष्णप्रकृति (१ क्रूर, २ तीक्ष्णधारेचा), प्रताप (१ प्रखर उष्णता, २ पराक्रम), मूर्ति (१ देह, २ प्रतिमा) इत्यादि श्लेष कर्णपर्वांत व पंतांच्या भारतादि काव्यांत शोधकांस आढळतील.

# परिशिष्ट—अं.

## १ शब्दावर कोट्याः—

(१) तो '**क्षेम**'**पूर्व**'**धन्वा**' ज्याच्या सुयशें समस्त बुध धाला. ॥ (हरिवंश १,८८)
(२) स्वैर क्रीडावयाचा रतिनिजमतिचा **दीर्घपूर्व** '**प्रसाद.**' ॥ (कृष्णविजय ५५,१३)
(३) गृहीं भेटला सर्वलोक प्रभू ती। सुसंपत्ति नोहे '**परा**'**पूर्व** '**भूती.**' ॥ (कृष्ण. ५६,२८)
(४) आह्मां द्यायासि केली असतचि, दिधली तेचि '**गो**'**पूर्व**'**विंदा.**' ॥ (कृष्ण. ५७, ५)
(५) न्यायें पावेल कैसा परिभव समरीं तो '**जरा**'**पूर्व**'**संध?**' ॥ (कृष्ण. ७१, ३)
(६) '**सु**' दुजा '**व**' वर्ण आधीं, मग '**देव**' सुता जयाचिया नामीं. ॥ (मंत्रभागवत २,७४)
(७) '**य**' **विरामांसि** ह्मणे प्रभु 'जा शर्म असो तुह्मांसि मी सोडा.' ॥ (मंत्रभाग. ३, ७७)
(८) '**यव**' '**अव**'**पूर्व** अपूर्व प्रेक्षीं पतिचेंहि देवहूति मनी. ॥ (मंत्रभाग. ३, ११०)
(९) '**भद्र**'**पदपूर्व**'**काळी**' देवी ती कारणें नृपलपतिनें ॥ (मंत्रभाग. ५, ४७)
(१०) **वामाद्यदेव** जाणे त्या अपरिज्ञेयवीर्यजलधीतें. ॥ (मंत्रभाग. ८, ९८)
(११) '**गर्त**' पुढें प्रथम '**अजी,**' ज्याच्या नामीं नयाकडे गेला. ॥ (मंत्रभा. ९,१०३)
(१२) **वामादिदेव** वेगा धरिल भगीरथ ह्मणे अघहि गंगे. ॥ (मंत्रभाग. ९, १२८)
(१३) '**मोदन**' '**अनु**' **पूर्वक** त्या शापातें देवदेव दे वसुना. ॥ (मंत्रभाग. ११, १३)
(१४) '**देवन**' '**परि**'**पूर्व** करुनि घातलिच उडी नयावरि कपोतें. ॥ (मंत्रभाग. ११, १७४)
(१५) अठरासहस्र कथिले अतिसुखद '**ब्रह्म**'**पूर्व** '**वैवर्त**' ॥ (मंत्रभाग. १२, २१५)
(१६) गगनीं अगणित भरलें द्याया '**उत्**' पूर्व '**सव**' सुरविमान. ॥ (हरिश्चंद्राख्यान)
(१७) '**सु**' **प्रथम** '**दर्शन**' नया मागे लागे सुनी पळे त्रासें. ॥ (अंबरीषाख्यान)
(१८) श्लोक प्रिय त्यास जया प्रगट तूं '**पुण्य**'**पूर्वक** '**श्लोक.**' ॥ (नामसुधानायक ११३)
(१९) संतमा निववी धन, वन शृंगारी '**व**' **कारवान्** '**संत.**' ॥ (नामरसायन ६४)
(२०) कुळजविरोधें संतत **तापगुण** मनीं **अपूर्वता** पावे. ॥ (आदि. ३६, ७८)
(२१) ऐसें ऐकुनि सोडी अहिपतिस **भीमसेन** सुरकारा।
बहुधा गुरुसंकोच प्राणी तन्नाभवानि **सु** '**स**' **कारा.** ॥ (सभा. ३, २३)
(२२) ते वृष्टि जसें न करिति तासि शुचि **स**'**श**'**कार** '**रावण**' समरसा. ॥ (वन. १२, ६६)
(२३) माता तात परततां बहु रडती परि रडे न '**सावित्री:**'।
सुमृदु सुमंत्रींहि ह्मणुनि त्यासि ह्मणे **नामसा नसावि** '**त्री.**' ॥ (वन. १३, २९)
(२४) द्याया त्या दुष्टांच्या जणु '**अंतः**' **पूर्व** '**पुर**' विलापाला ॥ (विराट १, १६२)
(२५) वाटे सु'**भट**' पुत्रें मेळविला विप्रसेवनीं नव '**ट.**' ॥ (उद्योग. १०, ३२)
(२६) ब्रह्मा नामीं **दुसरा** योग्य, क्षत्रा न, जलजनाभा! '**ट.**' ॥ (उद्योग. १०, ३३)
(२७) कुंती कर्णासि ह्मणे वत्सा कौंतेय तूं न '**राधेय**'।
राधे यथेष्ट ह्मण परि कर्णा! कर्णासि फार बाधे '**य.**' ॥ (उद्योग. ११, ९)
(२८) हे मात्र न ऐकवती सुखद मला '**मनुदु**'मिलित.'**राधेय.**' ॥ (उद्योग. ११, १०)

(२९) लिहिति '**रतिस्तुति**' पूर्वी मात्रा देऊनि बा '**य**'**कारा** जा. ॥ (द्रोण. ५, ६९)
(३०) पुसतां कसे श्रुत असे आपणचि '**कृपा**'पुढें तरि ह्मणा '**ण.**' ॥ (द्रोण, १५, २७)
(३१) जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत '**दंपती**'च **अ**'**प**'**कार.** ॥ (कर्ण. ४१, २)
(३२) '**शूर**' '**स**'**कार** '**श**'**कारीं** व्हाया दे द्विषदुरांत फटकारा ।
'**भट**' भीमेतर असता तरि तेव्हां रक्षिता न च '**ट**'**कारा.** ॥ (गदा. ३. १८)
(३३) होतें अंगीं '**भट**'पण त्याचा आला उमाप निटकारा ।
त्यांतचि मला **दुसरिया** देता झाला उमापति '**ट**'**कारा.** ॥ (अनु. ६. ३२)
(३४) प्रथमचि युगळ मथी त्या ज्याच्या नामांत '**या**' **पुढें** ये '**तृ**'॥ (द्वितीयस्तोत्र रामायण ५६)
(३५) '**श्री**'**पूर्व**'**वत्सवक्षा**' दशरथसुत होय दे जगा तोष. ॥ (सप्तमस्तोत्र रा. १)
(३६) **उत्पूर्वसव** जगा दे ब्रह्ममुख ह्मणुनि जया ह्मणति कवि 'क'. ॥ (अष्टमस्तोत्र रा. १३)
(३७) '**ण**' पुढें मागें '**रा**' ज्या तो राय कपीस भेटला वानी. ॥ (मात्रा रामा. २३)
(३८) '**राग**' '**अनु**'**पूर्व** भगवद्दास्यीं बहु ज्यासि तो महासुकृती. ॥ (नामांक रामा. ९९)
(३९) '**रा**' मग '**ता**' आधीं, हें नाम जिचें, तीस घे, जग नयानें. ॥ (नामांक रामा. ११४)
(४०) '**भ**'व्या **रता** '**त**'त्वा आधींचे तीन वर्ण तन्नाम. ॥ (दिव्य रामा. ४)
(४१) यन्नामीं आधिं '**त्रि**' प्रांतीं '**टा**' हा '**ज**'कार त्यामध्यें. ॥ (दिव्य रामा. ८३)
(४२) **स्वाद्या मित्रा** तिचे दोघे तीचे दोघे तज्जन्में धन्यत्वा तो घे. ॥ (सौम्या रामा. ४)
(४३) यन्नामीं '**लक्ष्मा**'चा अंतीं '**ण**' प्रेमानें घ्यावा संतीं. ॥ (सौम्य रामा. ५)
(४४) आधीं **भ** या वर्णापुढें **रत** स्थापी असें. ॥ (सूरा रामा.)
(४५) यदीय नाम युग्मवर्ण '**पं**' अणीक '**पा**' असे. ॥ (पंचचामर रामा. २३)
(४६) सुत ज्येष्ठ जो तो घनश्याम राम; द्वितीया '**भरा**'न्ती'**त**'हें रम्य नाम.॥२(सुरामायण)
(४७) तदनुजनि '**बिभी**' हे ज्याचिया वर्ण नामीं ।
मग '**षण**,' न कराया सुज्ञ तद्वर्णना मी; ॥ (रामायणपीयूष. ५५)
(४८) भली '**त्रि**'युक् '**जटा**'भिधा निशाचरी परोपरी । (पंचचामर ३९ रामा.)
(४९) '**व्याल**', '**दाव**', '**बाण**' या पदत्रयांत अक्षरें, ।
तीन शेवटील तेंचि नाम सेविलें खरें. ॥ (पंचचामर रामा. ८५)
(५०) '**चित्र**' पदोत्तर '**कूट**' नगा प्रभु जाय; नरोत्तमही विलयातें. (सवाई रा. १०)
(५१) '**मां**' पहिला मग '**धा**' मग '**ता**' तिन वर्ण असे गुरु ज्या नृपनामीं. ॥
(सवाई रामायण ११७)
(५२) '**राज**' पदोत्तर '**सूय**' असें अभिधान जयास, तयास कराया (सवाई रा. १२२)
(५३) '**पं**' असा प्रथम वर्ण '**पा**' मग (गदन्नरामायण ५८). (५४) 'शर्मा इ.' (द्रोण २.९)

## २ चित्रकाव्य.

### (अ) रामायणेंः—

'Moropant's Ramayans with their fantastic principles of arrangement are a curiosity in literature.' (Report on

native publications 1867 by Rao Bahadur M. G. Ranade.)

'मोरोपंतांनीं रचिलेलीं तऱ्हेतऱ्हेचीं रामायणें हीं महाराष्ट्र ग्रंथसंग्रहांतील एक चमत्कारिक व अपूर्व चीज होय.' (१८६७ पर्यंत छापलेल्या मराठी ग्रंथावरील रावबहादुर रानड्यांचा रिपोर्ट ).

**१ मात्रारामायण.** यांत 'अ'पासून 'ज्ञ'पर्यंत बहुतेक वर्ण गीतींच्या आरंभीं योजून रचना केली आहे. त्यांत 'अः', 'ट', 'ण' व 'ज्ञ' हे वर्ण कसे खुबीनें योजिले आहेत ते पहाः--

**अः**त्रें शस्त्रें प्रार्थिति, परि धैर्य धरी चरित्र वाढाया. । १३
**ट**पकरि मार्गे घेउनि गेली स्त्री त्या दशानना क्षुद्रा. । २२
'**ण**' पुढें, मागें 'रा' ज्या, तो राय कपीस भेटला, वानीं; । २६
**ज्ञ**हि अज्ञहि जन तारी नामें कामादि शत्रुही मारी ।
स्वयशें भवभय वारी, करि भक्तमयूरघन दया भारी. ॥ ४६

**२ नामांक रामायण**-यांत पूर्वार्धाच्या आरंभीं 'रा' व उत्तरार्धाच्या आरंभीं 'म' याप्रमाणें प्रत्येक गीतींत रामनाम साधिलें आहे. यांतील पहिली गीति अशी आहेः-

**रा**जीवोद्भव विनवी विश्वाहितदशमुखासि माराया; ।
**म**धुकैटभारि दशरथसुत होय, त्रिभुवनासि ताराया. ॥ १

**३ मंत्रमय रामायण**-यांत प्रत्येक गीतींत **श्रीरामजयरामजयजयराम** हा मंत्र साधिला आहे. याचीं दोन उदाहरणंः-(सीतास्वयंवरप्रसंगाचें वर्णन)

**श्री**गलशरासन **म**थुनि, **जय** करुनि, ध**राम**नोव्यथा हरिली; ।
**ज**नक**य**ज**ना**यतनजा, **रा**जगभा**म**द हरुनियां, वरिली. ॥ ५
(रामराज्याचें वर्णन) **श्री**दांत पु**राम**धिल **ज**न, सुज्ञान सद**य** ख**रा** पर **म**हर्षी ।
**ज**लदोद**य** वनजनयन, सर्व मयूरापरी पर**म** हर्षी. ॥ २४

४,५,३३,४०,४१,४२, या रामायणांत ह्मणजे **बालमंत्ररामायण, प्राकृत मंत्ररामायण, मंत्रगर्भ साकीरामायण. मंत्रिरामायण** (अनुष्टुपछंद), **सप्तमंत्ररामायण,** (अनुष्टुपछंद), **संस्कृतमंत्ररामायण** यांत, तसेंच ७२ व्या **रम्यरामायणांत श्रीरामजयरामजयजयराम** हा त्रयोदशाक्षरी मंत्र साधिला असून तो बालकांडांत प्रत्येक श्लोकाच्या पहिल्या चरणाच्या पहिल्या अक्षरांत, अयोध्याकांडांत दुसऱ्या अक्षरांत, अरण्यकांडांत तिसऱ्या अक्षरांत याप्रमाणें क्रमानें शेवटच्या उत्तरकांडांत सातव्या अक्षरांत आला आहे. ६४,६५, **त्रिःसप्तमंत्ररामायण,** व **सत्स्वररामायण** यांत प्रत्येक श्लोकांत सबंध त्रयोदशाक्षरी मंत्र आलेला आहे. याचीं उदाहरणंः—

(त्रिःसप्तमंत्ररामायणांतील) **श्री**कंठादिसुरर्षिसंस्तुत ध**रा**देवा**म**रत्राया हिता ।
**ज**न्मे **य**क्षव**रा**नुजप्र**म**थना सूर्यान्वयीं, रक्षिता ।
धर्माचा **म**नु**ज**, स्वयें **य**श जगीं व्हाया, **भय** त्यागिता,
झाला **रा**घव दिग्रथात्मज **म**हातेजा विश्वाचा पिता. ॥ १

(सत्स्वरामायणांतील) **श्रीमान्** गाधिज**राज** या दशरथा मागे **म**हात्मा सखा
**ओजस्वी** तन**य,** क्षपाचरहता **रा**खावयाला **म**खा; ।
दे व्हाया **जय** रामलक्ष्मण **ज**गच्छ्रेय**स्क**रे क्ष्मापती, ।
**ते रा**त्रिचर **म**र्दुनी, विनविती त्या कौशिकाची मती. ॥ ३

**६-१५ स्तोत्ररामायणें.** या दहा स्तोत्ररामायणांत सुप्रसिद्ध 'विष्णुसहस्रनाम' या स्तोत्रांतील हजार नांवें प्रत्येक रामायणांत शंभर प्रमाणें गुंफिलीं आहेत. याचा मासला:—
(प्रथमस्तोत्ररामायण)

**विश्व**स्रष्टा **विष्णु**प्रति विनवी दशमुखक्षयार्थ, तया
**वर** वेदशास्त्र**षट्का रक्षा**या दे जगीं करुनि दया. ॥ १
**भूपस्तुतभव्य**यशा रविकुल**भव** सत्**प्रभु** प्रथित भारी ।
जो दशरथ प्र**भूत**द्विजहित अस**कृत** सुरव्यसन वारी. ॥ २

(नवमस्तोत्ररामायण) किति बुध **सनात् सनातनतम कपिल** असें रघूद्वहा ह्मणती, ।
**कपि** पापांचा **अव्यय** यापरि संस्तविति, करिति या प्रणती. ॥ ८२ ॥
(दशमस्तोत्ररामायण) वदला प्रणतां सर्वा, 'संरक्षीनाच बुधाबुध स्वा मी'; ।
भक्तमयूरदयाघन हा **सर्वप्रहरणायुध** स्वामी. ॥ ८३

याचप्रमाणें ६ व्या प्राकृतमंत्ररामायणाच्या उत्तरकांडांत रामरक्षास्तोत्र पंतांनी गुंफिलें आहे हें रसज्ञांस सुविदितच आहे.

१६,१८,१९,२०,२१ यांत ह्मणजे (प्रथम) **शिवरामायण, उमारामायण, काशीरामायण, प्रयागरामायण, गंगारामायण** व यांतील प्रत्येक गीतींत अनुक्रमें शिव, उमा, काशी प्रयाग व गंगा अशीं नांवें साधिलीं आहेत. १७ व्या ह्मणजे द्वितीय **शिवरामायणां**त शिवाच्या अष्टोत्तरशत नांवांचा संग्रह केला आहे.

२२,२३,२४,२५ त ह्मणजे **तीर्थरामायण, ऋषिरामायण, राजरामायण, व सन्नामगर्भरामायण** यांतील प्रत्येक गीतींत अनुक्रमें एका तीर्थाचें, राजाचें व देवमुनिसंतसाधुभक्ताचें नांव गोंविलें आहे. मासल्याकरितां पुढील उदाहरणें पहाः-

तीर्थरामायणांतील ५८ गीतीत पुष्कर, सरयू, गंडकी, गोमती, शोणभद्र, फल्गु...... शिवगंगा, महान्हद, कावेरी, ताम्रपर्णी, सेतुवाहिनी ह्या तीर्थांचीं नांवें गोंवून शेवटच्या गीतींत **सर्वतीर्थ** हें नांव पंतांनीं साधिलें आहे. तें असें:—

श्रीराम **स**कळहितकर निर्जरत**र्व**धिकचरणकंजरजा ।
जग**तीश** पुम**र्थ**प्रद यश करि कवि ह्मणति वज्रपंजर ज्या. ॥ ५९

तसेंच ऋषिरामायणांत यवक्रीत, रैभ्य, कक्षीवान, औषिज, भृगु.....निशाकर, शंख, लिखित, पराशर, वालखिल्य, अशीं नांवें गोंवून शेवटीं सर्वर्षि हें नांव साधिलें आहे. उदाहरण:—

केला भूप बिभीषण अभिषेक **अणीक मांड**वुनि **भव्य,** ।
दिव्योत्तीर्णा देवी प्रभुचा उत्संग शोभवी सव्य. ॥ ६७.

कपिपतिसुततुस महिजनि निजनिकटचि बसविं, सुखवि बहु परमा; ।
वदलि, 'सखि ! मम पतिस तव पतिच जवळि मजहि सदयमति सरमा.' ॥

या रामायणांत पंतांनीं लघ्वक्षरें योजून अनुप्रासही चांगले साधले आहेत. चित्रकाव्याच्या नात्यानें या रामायणाची योग्यता मोठी आहे.

**२८ निरोष्ठरामायणांत** पंतांनीं ओष्ठ्यवर्णांची योजना केली नाहीं. पुढच्या **दामरामायणां**त गीतीच्या प्रत्येक अर्धाचीं शेवटील थोडीं अक्षरें (बहुतकरून तीन, क्वचित् स्थळीं दोन किंवा चार) दुसऱ्या अर्धाच्या आरंभीं आणून फुलें एकांत एक गुंतवून जसा त्यांचा हार करितात तसा (दाम=हार) बनविला आहे. याचीं उदाहरणें:- (प्रभुचरित्रमहिमा)

पिक वीतबाध कवि या चरितामृवनांत कूजती, सुरस ।
सुरसद्मींचा लाजे, यश हें श्रीशिव ह्मणे 'शिवे परिस.' ॥ ३
परिस सुवर्ण करितसे लोहा, जीवासि शिवचि हा महिमा, ।
महिमान्या स्वर्गाही, स्वकुल ह्मणे धन्य यत्प्रभा अहिमा. ॥ ४

**३१ व्या दीर्घरामायणांत** प्रत्येक गीतींत कवीनें योजवतील तितके 'म'गण योजिले आहेत. गीत्यर्धाच्या सहाव्या स्थानीं फक्त पंतांनीं 'ज'गण निरुपायास्तव योजिलेला आढळतो. प्रत्येक गीत्यर्धातील १६ अक्षरांपैकीं १४ अक्षरें गुरु असून २ मात्र लघु आहेत. उदाहरण:—

कल्याणाच्या मूळा श्रीकांता **भक्तवत्स**ला ताता
प्रार्थी अत्युन्मत्ता दिक्कंठातें **वधाव**या धाता. ॥ १

**३७ व्या 'सौम्य रामायणां'**त वृत्तनियमाप्रमाणें पहिल्या अर्धांत सर्व गुरु अक्षरें व दुसऱ्या अर्धांत सर्व लघु अक्षरें योजिलीं आहेत. लघुरामायण, दीर्घरामायण, व हें सौम्य रामायण यावरून पंतांचें भाषाप्रभुत्व चांगलें व्यक्त होतें. याचें उदाहरण:— (अहिल्योद्धार व सीताहरण.)

वारी पादस्पर्शे तापा, तारी साध्वी, नाशी शापा; ।
पुरवि जनकपण, चुरि पुरहरधनु, वरि विभु महिजनु सुरुचिरतरतनु. ॥ ८

**अद्भुत रामायण**— या नांवाचें एक त्रुटित प्रकरण मोरोपंतकृत ह्मणून आढळतें असें एका गृहस्थानें काव्यसंग्रहकारास मागें कळविलें होतें. रसिकांनीं त्याचा शोध करावा ह्मणून त्यांतील एक आर्या पुढें दिली आहे:-

कैलासा डळमळवी त्यातें शिवचाप काय न ढळावें ? ।
हें **अद्भुत** सीतेनें तें धनु घोडा करूनि खेळावें. ॥

**७३ वें ओवी रामायण**:— यांत ओवी व गीति अशीं दोन्हीं वृत्तें साधिलीं आहेत. त्याचीं उदाहरणें-

वंदुनि सरस्वतीला ध्याती कुलदेवतेसि कवि सर्व ।
गाती निजपूर्वजगुरुमूर्ती हरि गुरु तथैव कवि शर्व. ॥ ६३ ॥

(ओवी) वंदुनि सरस्वतीला ध्याती । कुलदेवतेसि कवि सर्व गाती ।
निजपूर्वजगुरुमूर्ती । हरि गुरु तथैव कवि शर्व. ॥

सीताकांता ! मेघश्यामा ! हा दीन दास लक्षावा ।
रामा ! अनुदिनि वदनीं नामा वसवोनि नित्य रक्षावा. ॥ ५ ॥

(ओवी) सीताकांता ! मेघश्यामा ! । हा दीन दास लक्षावा रामा ! ।
अनुदिनीं वदनीं नामा । वसवोनि नित्य रक्षवा. ॥

**(आ)महाभारत:—** मोरोपंतीं भारताच्या प्रत्येक पर्वाच्या पहिल्या गीतेचें आद्याक्षर घेऊन तीं एकापुढें एक मांडिलीं असतां त्यापासून **'श्रीपांडवसहायोभगवानरविंदाक्षो जयति'** असें वाक्य निष्पन्न होतें. अशा रीतीनें भारताच्या अठराही पर्वांची मोरोपंतांनी एक माळ बनवून पांडवांचा साहाय्यकारी कमलनेत्र भगवान श्रीकृष्ण यास ती अर्पण केली आहे.

**(इ)मंत्रभागवत:—** यांत पंतांनीं **'नमो भगवते वासुदेवाय'** हा एकादशाक्षरी मंत्र प्रत्येक गीतेच्या आरंभीच्या अक्षरांनीं साधिला आहे.

**(ई)मंत्रमयभागवत:—** यांत प्रत्येक गीतींत **'नमो भगवते वासुदेवाय'** हा एकादशाक्षरी मंत्र साधिला आहे. यांच्या एकंदर १०८ गीती (उपसंहारात्मक धरून १०९ आहेत. यांचीं कांहीं उदाहरणें कथानुरोधानें निकालबर्थांच्या ग्रंथांतून दिलीं आहेत. येथें त्यांची तीन उदाहरणें रसिकांस माहितीकरितां सादर केलीं आहेत:--

**न**त**मो**ऽहं **भ**वविपिनज्व**ग**दीश **व**रेण्य **ते**सते**य**ज्ञस्थ ।
**वा**रया **वसु**धाभर **दे**ह धरी **वा**सवाधियज्ञस्थ. ॥ १ ॥
**न**रा **मो**हुनि. **भ**वनीं **ग**वळ्याच्या **ते**ज आपुलें **य**श ।
**वा**ढवि. **सु**ख **दे वां**छुनि **य**शोदांकीं घनश्याम. ॥ २ ॥
**न** रमो **चि**त्र **भ**गवद् **य**श घन **गा**जित **वा**णी **ते**थ शेष **य**री ।
**वा**रिधि जशी **सु**खें **दे**वा **य**मुना. न मार्गविघ्न करी. ॥ ३ ॥

**(उ)कृष्णविजय:—** बळराम ब्रह्महत्याक्षालनार्थ तीर्थयात्रा करित करित वेंकटाचळ पर्वतावर आला. तेव्हांचें वर्णन:—

**पाव**नांत्रि भला **गावें** । सुधाकदंब**टा**मळा ।
ज्यास तो **चपळा**लक्ष्य । **पावला वेंकटाचळा.** ॥ (कृष्ण. ४२,१०)

वरील श्लोकांत जीं जाड टाइपानें अक्षरें छापलीं आहेत त्यांतच चवथा चरण होतो.

**(ऊ)स्फुट काव्यें:—** पंतांनीं क्वचित आपल्या काव्यांत बंधही साधिले आहेत. त्याचें ठळक उदाहरण त्यांचें 'अम्लानपंकजमालाबंधपंचक' काव्य होय. मोरोपंती स्फुटकाव्यें भाग १ ला, पृ० २२४-२२५ त तें काव्य व बंधरचना दिली आहे. याचें एक उदाहरण:

**दाता धाताविना** त्वं गृह इह गहनं **लोकशोकघ्नकर्मा** ।
दीनानां **नाथ नान्यो** हतनतपतन **त्वां विना विश्वविन्न** ॥
**मायेशाये** न **ये** त्वामनु **नु** मनु**जा**स्तैः **कृतं कृत्य**कृत्यं ।
**वा**ग्विद्याविनयविवर्धन ! हतमतयो **राम** ! वा मद्यमनाः ॥ १ ॥

